

माझी विठ्ठल माउली । प्रेमपान्हा पान्हायली ॥ कुर्वाळूनि लावी स्तनीं । न वजे दुरी न्याहाळूनि ॥
केली पुरी आळी । नव्हे निष्ठुर कावळी ॥ तुका म्हणे वाम । मुखीं घाली अमृत ॥



तुकाराम

तुकाराम । नाम घेतां कांपे यम ॥ धन्य तुकोबा समर्थ । जेणें केला पुरुषार्थ ॥
जळीं दगडासहित वह्या । तारियेल्या जैशा लाह्या ॥ म्हणे रामेश्वरभट्ट द्विजा । तुका-विष्णु नाहीं दुजा ॥

# भक्तिभावाने समर्पण



## -: मातृकृपांकित :-

### तीर्थरूप कै. नरहरशास्त्री जोशी, खरशीकर.

तुमच्या मुखातून लहानपणापासून कीर्तन प्रवचनातून
ज्ञानेश्वरतुकारामांच्या अमृतमधुर वाणीचा संस्कार
प्रथम झाला जेवढे देण्याजोगे होते तेवढे तुम्ही
संतोषाने व मुक्त हस्तांनी दिले त्यातील माझ्या
चिमटीत किती आले कुणास माहीत? परंतु तुमच्याच
स्मरणातून साकार झालेली ही ग्रंथकृती तुमच्याच
चरणांवर भक्तिभावाने समर्पित करीत आहे

—प्रल्हाद

# श्रीतुकाराममहाराजांच्या चरणी स्तुतिसुमनांजली

पंडित वैदिक अथवा दशग्रंथी । परि सरी न पवती तुकयाची ॥
शास्त्रेंही पुराणें गीता नित्य नेम । वाचितांही वर्म न कळे त्यांसी ॥
कर्म अभिमानें वर्ण अभिमानी । नाडले ब्राह्मण कलियुगीं ॥
तैसा नव्हे तुका वाणी व्यवसायी । भाव त्याचा पायीं विठोबाचे ॥
अमृताची वाणी वदला शुद्ध । करी त्या अशुद्ध ऐसा कोण ॥
चहूं वेदांचें हें केलें विवरण । अर्थही गहन करूनियां ॥
उत्तम मध्यम कनिष्ठ वेगळे । करूनि निराळे ठेविले ते ॥

—रामेश्वर भट

तेरा दिवस वह्या रक्षूनियां उदकीं ।
कोरड्याचि काढूनी दाखविल्या लोकीं ।
अपार कविताशक्ती मिरवूनि इहलोकीं ॥
कीर्तनश्रवणें तुमच्या तरती जन लोकीं ॥
बाळवेष घेऊनी श्रीहरी भेटला ।
विधिचा जनिता तोचि आठव हा दिधला ॥
तेणें ब्रह्मानंदें प्रेमा डोलविला ।
न तुके म्हणुनी तुका नामें गौरविला ॥
प्रयाणकाळीं देवें विमान पाठविलें ।
कलिच्या काळामाजी अद्भुत वर्तविलें ॥
मानवदेह घेऊनी निजधामा गेले ।
निळा म्हणे सकळ संत तोषविले ॥ ५ ॥

—निळोबा

न बोलवे शब्द अंतरींचा धावा । नाइके तुकोबा काय कीजे ॥
अदृष्ट करंटें साह्य नव्हे देव । अंतरींची हाय काय करूं ॥
तेरा दिवस ज्यानें वह्या उदकांत । घालुनिया सत्य वांचविल्या ॥
महाराष्ट्र शब्दांत वेदांतीचे अर्थ । बोलिला लोकांत सर्वदृष्टा ॥
अंतर्साक्ष आहे निरूपणीं हेत । जडे परी चित्त ओळखेना ॥
बहेणी म्हणे मीच असेन अपराधी । अन्याय त्रिशुद्धी काय त्याचा ॥

—बहिणाबाई

जडदेहा घेऊनि धामी गेला तो ऐसा वाणी ॥ ध्रु ॥
घट फोडुनि जनकादिक ते अनुभविते झाले मानी ।
हा नोहे तुकया तैसा घट राखुनी धरिला चित्तीं ॥ १ ॥
इतर ते वारुनि दुग्धा परिणामक घेती पाणी ।
हा नोहे तुकया तैसा पय राखुनि चाखी लोणी ॥ २ ॥
इतरीं तें फोडुनि कोऽहं मग चाखियला सोऽहं ।
हा नोहे तुकया तैसा अच्छेद्य पचविला कोऽहं ॥ ३ ॥
इतरीं त्या मिथ्य पुटालें देऊनियां जड टाकियलें ।
तो नोहे तुकया तैसा परिसानें हेमचि केलें ॥ ४ ॥
जडबुद्धि अहं या देहा निजरूपीं वाहूनि गेला ।
निजरंगीं रंग पहाया रंगानें निश्चय केला ॥ ५ ॥

—रंगनाथस्वामी निगडीकर

धन्य तुकोबा कीं तुकोबा कीं । तुका उतरला तुकीं ॥ ध्रु ॥
कीर्तनीं टाळ धरी । मागें नृत्य करितो हरि ॥ १ ॥
अभंगाचे कागद रक्षी । उदकीं देव तयाचा पक्षी ॥ २ ॥
शीतळ केलें पाणी । माजी प्रकटे चक्रपाणी ॥ ३ ॥
अवस्था देहाची तनु । ब्रह्म झाला त्याची धेनु ॥ ४ ॥
केसरि गुरु अवतारी । शिवदिन श्रवणमात्रें तारी ॥ ५ ॥

—शिवदिन केसरी

विष्णुयशाचें घाली धाया अमृता अपा बुकान तुका ।
जरि यासि न देयासी श्रीरामासीही पादुका न तुका ॥ १ ॥
नाइक न गा म्हणे जो घातुकचि दिसो अघातुकावाणी ।
प्रेमें ध्यावा गावा भस्म करावा अघा तुकावाणी ॥ २ ॥
नरकांतुनि काढितसे काढुनि बहु पतित पातुकावाणी ।
तो गुरु कसा नव्हे हो ज्ञानांबुधि अतितपा तुकावाणी ॥ ३ ॥
भगवान् स्वभुजासि म्हणे तुजसी तारुनि जना तुकीं वाहो ।
नारदमुनिसा सुयशें बहुमत सज्जनमना तुकोबा हो ॥ ४ ॥
साधु म्हणेल मन स्मृति हरिची तैसी न टाकुं तुकयाची ।
की औदार्यधनांची ज्याप्रति पावुनि घटा कुतुक याची ॥ ५ ॥

—मोरोपंत

नमो तुकारामा सर्वसाधुवर्या ! ॥
भक्तीच्या आचार्या ! भाग्यवंता ॥ १ ॥
नमो जी पावना ! पांडुरंग-प्रिया ! ॥
अमाया ! अमेया ! महोदारा ! ॥ २ ॥
नमो जी सद्‌गुरो ! नमो दीनबंधो ! ॥
थोर कृपासिंधो ! ज्ञानमूर्ते ॥ ३ ॥
नमो नामनिष्ठा ! महाकविश्रेष्ठा !
सुजनवरिष्ठा ! निर्विकारा ! ॥ ४ ॥
नमो पुण्यश्लोका ! अकामा ! अशोका ! ॥
त्रितापहारका ! सौख्यकरा ॥ ५ ॥
नमो जी सत्स्वरूपा ! समदृष्टे ! शांता ! ॥
धन्य तूं अनंता कोंडीयेलें ॥ ६ ॥
नमो जी विरक्ता ! महाभागवता ! ॥
भवीं तूंच आर्ता त्राता थोर ॥ ७ ॥
नमो "रामा-" धामा ! नमो पूर्ण-कामा ! ॥
नमो निरुपमा आत्मारामा ! ॥ ८ ॥

[ सार्थ तुकाराम गाथेचे एक निष्ठावत वाचक नासिक येथील वकील श्री. रा. व खाडिलकर यांनी ही कविता पाठविली आहे. ]

## प्रकाशकाचे निवेदन :

संतशिरोमणी श्रीतुकाराम महाराज यांच्या समग्र अभंगगाथेची सार्थ आवृत्ती गेली कित्येक वर्षे मराठी वाचकांना व वारकरी विठ्ठलभक्तांना उपलब्ध नव्हती. ही एक मोठी उणीव भरून काढावी या हेतूने त्या दयाघन पांडुरंगाच्या प्रेरणेने आम्ही सार्थ गाथेच्या प्रकाशनाचे मोठे अवघड व जबाबदारीचे कार्य हाती घेण्याचे ठरवून त्याप्रमाणे दोन वर्षांपूर्वी सार्थ गाथेचा पहिला खंड प्रसिद्ध केला. या आमच्या सार्थ गाथेत अनेक महत्त्वाच्या अभंगांवर स्पष्टीकरणात्मक असे मर्मग्राही, उद्बोधक आणि संतबोधास अनुसरून विवरणही देण्यात आले आहे हे आमच्या सार्थ गाथेचे एक महत्त्वाचे वैशिष्ट्यच मानावे लागेल. पुणे येथील व्यासंगी पंडित व संतवाङ्मयाचे निष्ठावान उपासक डॉ. प्र. न. जोशी यांनी हे काम अंगावर घेऊन आम्हांस मदत केली आहे.

पहिला खंड प्रसिद्ध झाल्यानंतर शक्य तो लौकर दुसरा व तिसरा खंड वाचकांच्या हाती देणे आमचे एक प्रकारचे कर्तव्यच होते. परंतु हा दुसरा खंड वाचकांच्या हाती, देण्यास फारच विलंब होत आहे, याबद्दल आमच्या ग्राहकांनी आम्हांस क्षमा करावी. तुकाराम महाराजांच्या सार्थ व सविवरण *गाथेविषयी आमच्या मनात एकसारखी तळमळ लागलेली होती.* पहिल्या खंडाचे स्वागत ग्राहक व अभ्यासक यांच्याकडून उत्साहजनक झाले. दुसरा खंड लौकर तयार व्हावा अशा दृष्टीने आमचे प्रयत्न सुरू झाले. गाथेचा दुसरा खंड केव्हा तयार होणार ? असा प्रश्न अनेक ग्राहक समक्ष वा पत्राने करीत. परंतु अनेक अडचणींमुळे आम्हांस या प्रश्नाचे नक्की उत्तरही देणे शक्य झाले नाही. अनेक अडचणींमुळे या दुसऱ्या खंडाच्या प्रकाशनास विलंब फारच लागला, यासाठी आम्हांसही मोठा संकोच वाटत आहे. तरी आमच्या ग्राहकांनी आमच्याशी सहकार्य करावे, आणि या अतिशय महत्त्वाच्या कामी हातभार लावावा अशी नम्र विनंती आहे.

आयुष्याचे सार्थक करणारे एखादे प्रकाशन आपल्या हातून व्हावे म्हणून आम्ही उतार वयात या कामी पडलो. त्या सर्वसमर्थ प्रभूच्या व तुकाराम महाराजांच्या कृपेने हे कार्य उत्तम रीतीने पार पडेल असा विश्वास आहे. आता उरलेला तिसरा खंड येत्या कार्तिकी एकादशीस वाचकांच्या हाती देण्याचा आमचा संकल्प आहे. कुठलीही अडचण आता या कामी येऊ नये अशी श्रीविठ्ठलाच्या चरणी आमची प्रार्थना आहे.

—शिवराम वामन आवटी
प्रकाशक

## ग्रंथकाराचे मनोगत :

सार्थ व सविवरण अशी तुकारामगाथा संपादित करण्याचे काम मुंबई येथील श्रीभारत बुक डेपोचे मालक श्री. शिवराम वामन आवटी याच्या आग्रहामुळे मी स्वीकारले. लहानपणापासून तुकाराम महाराज आणि त्यांचे अभंगवाङ्मय इतर संतांप्रमाणेच माझ्या नित्य स्मरणातील असल्यामुळे व घरात संतसेवेचा वारसा मिरासदारीने आलेला असल्याने मी हे काम उत्साहाने पण सेवाबुद्धीने पत्करले; आणि त्यानुसार १२५१ अभंगांचा पहिला खंड दोन वर्षांपूर्वी तुकारामबीजेस प्रसिद्ध झाला. या गाथेत प्रत्येक अभंगाचे सुबक संपादन, ठळक पाठभेद, शब्दार्थ व टीपा, प्रत्येक ओळीचा सुलभ गद्यामध्ये अर्थ आणि कित्येक महत्त्वाच्या अभंगावर संतबोधास अनुसरून विस्तृत विवरण; असा एकदर प्रकार असल्यामुळे सर्वसामान्य भाविकांपासून चिकित्सक अभ्यासकापर्यंत सर्वांनाच तुकाराम महाराजांचे हृद्गत समजणे सोयीचे झाले आहे.

पहिल्या खंडानंतर हा दुसरा खंड पुष्कळच उशिरा प्रसिद्ध होत आहे. गाथेचे संपादन करण्याचे काम स्वीकारण्यापूर्वीच हाती घेतलेली काही महत्त्वाची कामे पूर्ण करणे अगत्याचे होते. शिवाय दुसरे असे की, सार्थ व सविवरण गाथेचा हा अभिनव व विशेष उपक्रम ज्याच्यासाठी मी आखलेला होता, त्या वाचकांची आणि संतवाङ्मयप्रेमिकांची यासंबंधीची यथायोग्य प्रतिक्रिया काय आहे, हे समजावून घेणे मला अगत्याचे वाटले यासाठी थोडे थांबणे भाग होते. संतोषाची बाब अशी की, महाराष्ट्रातील वृत्तपत्रांनी, विद्वानांनी आणि संतप्रेमी वाचकांनी या उपक्रमाचे मनापासून स्वागत केले. यापूर्वी कधीही तुकारामगाथेचे या अभिनव व मर्मग्राही पद्धतीने संपादन झालेले नसल्याने वाचकांना हा उपक्रम एकदम पसंत पडला. वक्त्याला जसे श्रोते फुलवतात, त्याप्रमाणे लेखकास त्याचे वाचक उत्तेजन देत असतात. एकांतातील चिंतन फार मोठे हे खरेच. 'वृक्ष वल्ली आम्हां सोयरी वनचरें। पक्षीही सुस्वरें आळविती' ही संतश्रेष्ठ तुकोबाची साधना श्रेष्ठ तर खरीच. 'मनासी संवाद। आपुलाचि वाद आपणासीं' ही अवस्था खरोखरीच श्रेष्ठ आहे; परंतु 'धर्माचें पाळण। करणें पाषांड खंडण। हेंचि आम्हां करणे काम। बीज वाढवावें नाम॥' अशी घोषणा करणाऱ्या तुकाराम महाराजांना लोकाभिमुख होणेच अगत्याचे वाटले. त्यांच्या आत्मबोधाचेच हे एक दुसरे अंग म्हणावे लागेल. पुराणांचा अर्थ लोपला, शब्दज्ञानाने नाश केला, विषयलोभी लोकांनी विपरीत मार्ग दाखविला. म्हणून भक्तीचा डांगोरा पिटण्यासाठी 'तीक्ष्ण उत्तरें। हातीं घेऊन बाण फिरे' अशा पवित्र्यात तुकाराम महाराज लोकाभिमुख झाले. एकांतवासातील स्वात्मसुखास असा बाहेरून सुंदर व टवटवीत फुलोरा येत राहिला. यासाठी श्रोते आणि वाचक यांची योग्यता व श्रेष्ठता अनेक साधुसंतांनी वर्णन केली आहे. पूर्वी वाचकांपेक्षा श्रोत्यांनाच मान मोठा होता. आज शिक्षणाच्या प्रसारामुळे वाचकांशी मनोमय संवाद ग्रंथकाराचा होत असतो.

अशा प्रकारचे उत्तेजन वाचकांनी व संतअभ्यासकांनी दिल्यामुळे गाथासंपादनाचे कार्य मी उत्साहाने पुढे करू शकलो. वाचकांनी व संतवाङ्मयप्रेमी अभ्यासकांनी माझ्या या अल्प उपक्रमाचे केवढे कौतुक केले त्याचे थोडक्यात दर्शन पुढे दोनतीन पृष्ठांत घडविण्याचा प्रयत्न केलेला आहे. गाथेच्या सर्वसामान्य व भाविक वाचकांची ही साथ मला उपकारक झाली हे मान्य करतानाच त्यांची एका बाबतीत मला क्षमाही मागावयाची आहे. या दुसऱ्या खंडास अपेक्षेपेक्षा उशीर झाला आहे. दुसरा खंड होणार की नाही ? अशी चिंता अनेकांना पडली. प्रकाशक व ग्रंथकार यांच्याकडे अशी चौकशी अनेक वाचकांनी आणि ग्राहकांनी केली. यात व्यावहारिक दृष्टीपेक्षा औत्सुक्याचा व तुकाराम महाराजाविषयी असलेल्या प्रेमाचाच भाग अधिक होता हे तर खरेच; पण वाचकांची व ग्राहकांची ही प्रेरकताही मला उपयोगी पडली हेही नमूद करावयास हवे. वाचकांना व ग्राहकांना या खंडासाठी फार वेळ वाट

...२

पाहावी लागली. त्याच्या या गैरसोयीबद्दल त्यांनी मला क्षमा करावी. सार्थ गाथा अधिक परिपूर्ण, अधिक निर्दोष व अधिक मर्मग्राही व्हावी अशा हेतूने कार्य चालले असल्यामुळे हा विलंब लागला. या विलंबापोटी झालेली गैरसोय आम्ही तिसरा खंड लौकरच प्रकाशित करून दूर करण्याचे ठरविले आहे.

आणखी एकदोन बाबींचा उल्लेख करणे जरुरीचे आहे. या माझ्या सार्थ व सविवरण गाथेच्या संपादनासाठी मी कोणती गाथा प्रमाण मानली ? व तीच का ? असा प्रश्न मला अनेकांनी विचारलेला आहे. प्रथम खंडातील माझ्या निवेदनात मी यासंबंधी पूर्ण खुलासा केला आहे. त्याकडे याही वेळी मी निर्देश करीत आहे. उपलब्ध असलेल्या सर्व गाथांपैकी मला शंकर पांडुरंग पंडिताची गाथा फारच महत्त्वाची वाटली. महाराष्ट्र सरकारनेही हीच गाथा प्रमाण मानून स्वतःची आवृत्ती तयार केली आहे. माझ्या गाथासंपादनाचे स्वरूपही मी प्रथमखंडाच्या माझ्या मनोगतात स्पष्ट केलेले आहे. तुकोबांच्या अभंगांचे शास्त्रशुद्ध संस्करण, पाठशुद्धीची चिकित्सा, तुकोबांच्या अस्सल अभंगांची निश्चिती इत्यादी विषय अर्थातच माझ्या या उपक्रमात नाहीत, हेही कबूल करावयास हवे. हे संशोधन अतिशय महत्त्वाचे असले तरी ते या प्रस्तुतच्या कार्याच्या मर्यादेच्या बाहेरचे आहे.

सार्थ व सविवरण तुकारामगाथेचे प्रकाशक श्री. दादासाहेब आवटी यांची सततची प्रेरणा मला उत्साहित करीत आली आहे. श्री. आवटी हे काही तसे मातबर व थोर प्रकाशकांपैकी नाहीत. पण आयुष्याच्या उतार वयात आपल्या हातून एक फार चांगले व मोलाचे कार्य व्हावे या हेतूने ते या उपक्रमाच्या पाठीशी उभे राहिले. 'जोडोनियां धन उत्तम व्यवहारें । उदास विचारें वेंच करी ॥' या तुकाराम महाराजांच्या उक्तीप्रमाणे ते या फार मोठ्या व खर्चाच्या उपक्रमाची व्यावहारिक बाजूही सांभाळीत आहेत. तुकारामगाथेचे काम लौकर पूर्ण व्हावे अशी त्यांच्या मनाची एकसारखी तळमळ आहे. मराठी भाषेतील असंख्य संतप्रेमी वाचक त्यांना उत्तम प्रकारे साथ देतील अशी आशा आहे.

गाथेच्या मुद्रणाचे मोठे बिकट काम अत्यंत सुबक रीतीने करून देण्यात येथील ज्ञानविलास प्रेसचे श्री. मधुकरराव जोशी बी. ए. व त्यांचे चिरंजीव रा. प्रकाश जोशी यांनी फारच तत्परता दाखविली आहे. प्रेसकॉपी, तपासलेली मुद्रिते इत्यादी बाबतीत प्रयत्नाला नेहमी सांभाळून घेण्याची सौजन्यशील वृत्ती या पितापुत्रांची असल्यामुळे मी या बाजूला निश्चिंत असे. उरलेल्या तिसऱ्या खंडाचेही मुद्रण त्यांच्या हातून लौकरच पूर्ण होईल अशी माझी खात्री आहे.

आता याखेरीज जास्त काही सांगावयाचे आहे असे नाही. उरलेला तिसरा खंड लौकर पूर्ण करण्यासाठी दयाघन श्रीपांडुरंगाने आणि श्रीतुकोबारायांनी मला सर्व प्रकारचे बळ द्यावे एवढीच त्यांच्या पायाशी विनवणी आहे. माझा अधिकार मी ओळखून आहे. पण या दोन दैवतांचा अधिकार मला चांगलाच परिचयाचा असल्याने शेवटी त्यांनाच तुकोबांच्या शब्दात विनवून हे मनोगत पूर्ण करतो.

'काहीं बोलिलों बोबडें । मायबापा तुम्हांपुढें । सलगी लाडेंकोडें । मज क्षमा करावी ॥
काय जाणावा महिमा । तुमचा म्यां पुरुषोत्तमा । आवडीनें सीमा । सांडविली मज हातीं ॥
घडे अवज्ञा सख्यत्वें । बाळें बापासी न म्यावें । काय म्यां सांगावें । आहे ठावें तुम्हांसी ॥
तुका म्हणे देवा । प्रेम लोभ न सांडावा । पाळिला पाळावा । लळा पुढती आगळा ॥'

'रेणुका', लक्ष्मीपार्क
नवीपेठ, पुणे ९

— प्र. न. जोशी
आषाढी एकादशी १८९०
सहा जुलै १९६८

# सार्थ तुकारामगाथेच्या प्रथम खंडाचा प्रकाशन-समारंभ

## डॉ. प्र. न. जोशी यांच्या ग्रंथाचे प्रकाशन

सार्थ व सविवरण गाथेच्या प्रथम खंडाचे प्रकाशन दि. ८ मार्च १९६६ या दिवशी पुणे येथे विजयनगर वसाहतीतील 'शांतिमंदिर' या ठिकाणी महाराष्ट्र विधानसभेचे सभापती ना. बाळासाहेब भारदे यांच्या अध्यक्षतेखाली झाले. अनेक अभ्यासू व नामवंत वक्त्यांनी या गाथासंपादनाचे वैशिष्ट्य स्पष्ट करून सांगितले. दोन अडीच तास चाललेल्या या भक्तिरसपर सोहळ्याचे मुंबईच्या 'मराठा' दैनिकाच्या खास प्रतिनिधीने घडविलेले हे संक्षेपाने दर्शन वाचकांसाठी मुद्दाम दिलेले आहे.

पुणे, दि. १६–दि. ८ मार्च १९६६ या श्रीसंत तुकाराममहाराजांच्या ३१७ व्या पुण्य-स्मृतिदिनी येथील विजयनगर वसाहतीतील न्यायरत्न धुंडिराज शास्त्री विनोद यांच्या 'शांतिमंदिरात' महाराष्ट्र विधानसभेचे सभापती ना. बाळासाहेब भारदे यांच्या अध्यक्षतेखाली डॉ. प्र. न. जोशी यांनी संपादित केलेल्या तुकारामअभंगाच्या सार्थ गाथेच्या पहिल्या खंडाचे प्रकाशन झाले. समारंभाची वेळ रात्री ८–३० अशी आडवेळ असूनही पुण्यातील विद्वान व चिकीत्सक मंडळींची समारंभास गर्दी झाली होती. मुम्बई येथील भारत बुक डेपोचे श्री. आवटी यांनी हा ग्रंथ प्रकाशित केला असल्यामुळे त्यांनी सर्वांचे स्वागत केले. सुप्रसिद्ध गायक सिनेनट श्री. शंकरराव कुळकर्णी यांनी एक अभंग गाऊन कार्यक्रमास प्रारंभ केला.

गाथेचे संपादक डॉ. प्रल्हाद नरहर जोशी आपल्या प्रास्ताविक भाषणात म्हणाले की, मी जरी विज्ञानशास्त्राचा अभ्यास केला असला तरी पूर्वसंस्कारामुळे अध्यात्मवादी असून या गाथेचे तीन खंड पूर्ण करण्याचा संकल्प केला आहे. अगदी लहानपणापासून माझ्यावर तुकाराममहाराजांच्या अध्यात्मवादाचे संस्कार झाले असल्यामुळे मला यासंबंधी संशोधनपर लेखन करण्यात एक प्रकारचा विशेष आनंद वाटतो, नव्हे ते मी माझे कर्तव्य समजतो. माझ्या या लेखनाला मी श्री. पंडित यांच्या सरकारी गाथेचा आधार घेतला आहे. ती गाथा मला विशेष प्रमाणभूत व अधिकृत वाटते. याशिवाय तुकाराम महाराजांच्या गाथेचे जितके पाठभेद आहेत ते सर्व लक्षात घेऊन या ग्रंथाचे लेखन केले आहे.

यानंतर पुणे विद्यापीठातील संतवाङ्मयाचे अधिकारी डॉ. शं. गो. तुळपुळे यांचे भाषण झाले. त्यांनी डॉ. जोशी यांचा ग्रंथ संतवाङ्मयाच्या अभ्यासकांना मार्गदर्शक होईल असे सांगितले. तुकाराममहाराज व मराठी संत यांच्या वाङ्मयाचा अभ्यास करून 'महाराष्ट्र संतांचे तत्त्वज्ञान' ह्या प्रबंधाचे लेखक डॉ लेदरले या फ्रेंच पंडिताचे ९९ टक्के शुद्ध मराठीमधे भाषण झाले. डॉ. लेदरले म्हणाले की, या ग्रंथामुळे महाराष्ट्रातील भाषेचा सर्वत्र प्रसार होईल अशी आशा आहे. या ग्रंथात तुकारामाच्या चरित्राचेही संशोधन झाले आहे. हिंदुधर्म किंवा त्या धर्म-तत्त्वज्ञानाची ओळख करून घेण्यास काशी–बनारस येथे जाण्याची आवश्यकता आता राहिली नाही, असे आम्ही परदेशातून येथे त्यासाठी येणाऱ्या पंडितांना सांगतो. कारण या पुण्यात संतवाङ्मयाचा आणि एकंदर भारतीय पांडित्याचा जो अभ्यास चालू आहे त्यामुळे कोणाही पाश्चात्य जिज्ञासूची तृप्ती होईल असा मला विश्वास आहे.

पुण्यातील विद्वानांवर तुकाराम व ज्ञानेश्वर आदी संतांनी प्रसृत केलेल्या तत्त्वज्ञानाची छाप पडलेली आहे. मराठी भाविकांसही तुकारामाचे अभंग समजतात त्यापेक्षा ते डॉ. जोशी यांच्या या

ग्रंथांतील टीकेमुळे अधिक चांगल्या प्रकारे समजतील तेव्हा त्यांनी या ग्रंथाचे राहिलेले दोन खंड लवकर पूर्ण करावेत

तुकाराम महाराजाबद्दल प्रत्येकाला गोडी आणि त्यांच्याविषयी आपुलकी वाटावी इतका प्रसाद त्यांच्या अभंगात आहे आणि म्हणून मी जेव्हा कधी स्वर्गात जाईन तेव्हा तेथे मला तुकाराम महाराजांची प्रत्यक्ष भेट होईल या विश्वासाने मला आतापासून आनंद होत आहे

एका ख्रिस्ती शाळेत मी गेलो असता तेथील अध्यापकाने मला मुलांसाठी सकाळची प्रार्थना म्हणण्याकरिता एक मराठी कविता द्या अशी विनंती केली, तेव्हा मी त्यांना " जेथें जातां तथें तू माझा सांगाती । चालविसी हातीं धरूनियां ॥ ' हा अभंग दिला, आणि ही सकाळची प्रार्थना म्हणून तेथे अत्यंत लोकप्रिय झाली आहे तुकाराम महाराज हे सर्व धर्मांचे व सर्व जातींचे आहेत ते अमुक एका धर्माचे नसून खरेखुरे धर्मातीत असे आहेत म्हणून ते सर्व धर्मांतील लोकांना आपलेसे वाटतात

यानंतर म म दत्तोपंत पोतदार यांनी आशीर्वादपर भाषण करून डॉ जोशी यांच्या श्रमाचे कौतुक केले डॉ प्र न जोशी यांचे वडील श्री नरहरबुवा खर्डीकर जोशी हे प्रख्यात कीर्तनकार व संतवाङ्मयाचे अभ्यासक असल्यामुळे त्यांच्या विद्वत्तेचे संस्कार झालेले डॅा. जोशीच प्रकाशकांना हवी तशी गाथा संपादित करू शकतील असा विश्वास वाटल्यामुळे म म पोतदार यांनीच डॉ जोशी यांचे नाव सुचवून हा ग्रंथ संपादित करण्याचे प्रोत्साहन दिले होते तुकारामाची गाथा प्रत्यक्ष पाण्यात बुडली नाही ती कधीच बुडणार नाही तेव्हा तुकारामाच्या वाङ्मयावर लिहिलेले ग्रंथ प्रकाशित करणारास कधीही आर्थिक नुकसान सोसावे लागणार नाही असे म म पोतदार यांनी आपल्या भाषणाच्या शेवटी सांगितले महाराष्ट्र माणसाचे पोषण करणारा हा ग्रंथ असल्याचेही म म पोतदार यांनी सांगितले न्यायरत्न धुंडिराजशास्त्री विनोद यांनी आशीर्वादपर भाषण केल्यानंतर अध्यक्ष ना बाळासाहेब भारदे यांनी ग्रंथ प्रकाशित झाल्याचे जाहीर केले

ना भारदे आपल्या भाषणात म्हणाले की, " मी स्वत संतवाङ्मयाचा अभ्यासक नाही परंतु माझेकडून सत्संग झाला असल्यामुळे मी या विषयावर थोडाफार बोलू शकतो

'तुकाराम महाराज हे प्रापंचिक भक्त होते असे मी मानतो केवळ भक्तियोगाने संसार सुखाचा करता येतो हे तुकाराम महाराजांनी दाखवून दिले आहे वास्तविक तुकाराम महाराज हे त्यांच्या प्रपंचात सर्व बाजूंनी पूर्णतया दु खी होते त्यांच्या आवतीभोवतीची परिस्थिती प्रतिकूल होती आर्थिक दृष्ट्या ते अत्यंत गरीब होते अशा प्रतिकूल प्रापंचिक परिस्थितीत वाढलेला तुकाराम केवळ भक्तीच्या जोरावर पूर्ण समाधानी होऊ शकला हेच त्यांच्या भक्तीचे सामर्थ्य होय प्रतिकूल परिस्थितीवर मात करून ते म्हणतात की,

' अवघा जिंकिला संसार । हा उपकार विठोबाचा ॥ '

डॉ जोशी यांनी हा ग्रंथ अभ्यासपूर्ण असा लिहिला आहे, याबद्दल त्यांचे अभिनंदन या ग्रंथात ' शोध आणि बोध ' असतीलच पण मला यात ' मोदही ' मिळाला आहे, हे सांगताना आनंद वाटतो या ग्रंथात पुष्कळच रसास्वाद आहे सामान्य लोकांवर असामान्य संस्कार करण्याचे काम या ग्रंथामुळे होईल अशी आशा आहे

साधुत्व ही जी काही चीज आहे ती सर्व धर्मांत खरोखरच आहे म्हणून संत हे खरे धर्मातीत असतात व त्यांची शिकवण हीच निधर्मी किंवा धर्मातीत शिकवण होऊ शकते

" उत्कटता आणि व्यापकता हे दोन्ही गुण तुकारामाच्या वाङ्मयात असून डॉ जोशी यांनी त्यांचे सुंदर विवरण केले आहे यापुढे शाळा–कॉलेजातून संतवाङ्मयाचा संस्कार होईल अशा प्रकारे ते शिकविले जावे असे मला व्यक्तिश वाटते आयुष्य तरून जाण्यास संतवाङ्मयाचा विशेष उपयोग होईल अशी माझी श्रद्धा आहे '

# सार्थ व सविवरण तुकारामगाथा-गौरव

दोन वर्षांपूर्वी प्रसिद्ध झालेल्या सार्थ तुकारामगाथेच्या प्रथम खंडावर अधिकारी विद्वानांनी जे अभिप्राय वृत्तपत्रांतून प्रकट केले, त्यांतील निवडक येथें दिले आहेत सार्थ तुकारामगाथेचे अनेक विशेष व एकंदरीत स्वरूप याचे नेटके दर्शन यामुळे वाचकांना होण्यासारखे आहे

**केसरी – डॉ. के. ना. वाटवे**

## अभंगवाणीच्या गंगेस शानदार घाट

सार्थ तुकारामगाथेचा हा पहिला खंड पुणे येथील संतवाङमयाचे प्रसिद्ध अभ्यासी डॉ. प्र न. जोशी यांनी संपादित केला आहे. डॉ. जोशी यांना हा संतसाहित्याचा वारसा घरूनच म्हणजे त्यांचे वडील कै. नरहरशास्त्री खरदीकर यांच्याकडूनच प्राप्त झालेला आहे. या पहिल्या खंडात १२५१ अभंग असून पुढील अभंग त्यानंतर प्रसिद्ध व्हावयाच्या दोन खंडामध्ये यावयाचे आहेत.

या पहिल्या खंडाचे संपादन डॉ जोशी यांनी इतक्या उत्तम तऱ्हेने केले आहे की, पुढील खंडा-बद्दलच्या वाचकांच्या अपेक्षा खूपच उंचावल्या आहेत. पहिल्या खंडास संतवाङमयाचे प्रसिद्ध अधिकारी प्रा. श. घा. दांडेकर यांचा पुरस्कार आहे हेही या खंडाचे एक वैशिष्ट्य समजले पाहिजे. याशिवाय ग्रंथाच्या प्रारंभी डॉ. जोशी यांनी 'ग्रंथकाराचे मनोगत', तुकाराम महाराजांचे 'संक्षिप्त चरित्र' आणि 'तुकाराममहाराजांची अभंगवाणी', अशी तीन प्रकरणे लिहिली आहेत पहिल्या प्रकरणात तुकारामाच्या गाथेच्या मुद्रणाचा संक्षिप्त इतिहास असून प्रत्येक गाथेची वैशिष्ट्ये विवेचली आहेत.

### उत्कंठित वाचक

डॉ. जोशी यांनी शंकर पांडुरंग पंडित यांनी संपादित केलेली गाथाच आधारभूत मानलेली आहे. तुकारामाच्या अभंगांची चर्चा व समग्र अर्थ यापूर्वी देण्यात आलेला आहे त्यातील कै. विष्णुबुवा जोग यांच्या सार्थ गाथेचा डॉ जोशी यांनी अनेक प्रसंगी उपयोग करून घेतलेला आहे. 'तुकाराम महाराजांची अभंगवाणी' हे सोळा पानी विवेचन इतके रसाळ, मार्मिक व मूलगामी आहे की त्यामुळे तुकाराम महाराजांच्या अभंगवाणीची अवीट गोडी चाखण्याची वाचकास उत्कंठा लागते.

अभंगाचे विवेचन करण्याची डॉ जोशी यांची पद्धती पुढीलप्रमाणे आहे. प्रथम महाराजांचा अभंग, नंतर शब्दार्थ व टीपा, नंतर तंतोतंत अर्थ आणि शेवटी विवरण अत्यंत मार्मिक विवरण देणे हे या गाथेचे अनन्यसामान्य वैशिष्ट्य आहे अशी उत्तम विवरणे अभंग ३६, ४५, ९८, ९५३, ९८७, २५७, १०२२ इत्यादी ठिकाणी पहावीत.

### अभंगाचे मानसशास्त्र

डॉ. जोशी यांनी सांप्रदायिक अर्थास न डावलता, आपल्या स्वतंत्र बुद्धीचा व ऐतिहासिक पद्धतीचा अवलंब केला आहे ही फार चांगली गोष्ट आहे सांप्रदायिक अर्थ म्हटला तरी, त्यामध्ये थोडेथोडके मतभेद नाहीत. म्हणून वरील दोन गोष्टींची जोड त्यास दिल्यामुळे अर्थाचा उलगडा चांगल्या तऱ्हेने होतो याचे उदाहरण अभंग ५५ हा आहे. 'महारासि सिवे । कोपे ब्राह्मण तो नव्हे' हाच अभंग घ्या या ठिकाणी एक आध्यात्मिक अर्थ लावला जातो. तो सांप्रदायिक या ठिकाणी महार म्हणजे क्रोध होय तो सांप्रदायिक अर्थ म्हणून डॉ जोशी यांनी दिलेला आहेच. पण संतकालीन इतिहास आणि संतांची शिकवण लक्षात घेता, महार म्हणजे महार जातीची व्यक्ती असा घेऊन संतांनी जातिभेदाची तीव्रता आध्यात्मिक प्रांतात तरी कमी केलेली होती, त्याची दखल घेतली पाहिजे. तसेच अभंगक्र. ७ आणि अभंग क्र. ४५ 'बाळो जन मज म्हणोत शिंदळी' व 'दुजे खंडे तरी' हे दोन अभंग पाहिले असता डॉ. जोशी

यांच्या अर्थानेच अधिक समाधान होते विराण्या म्हणून प्रसिद्ध असलेले संतांचे अभंग एकत्र करून डॉ. जोशी यांनी त्यांच्या विवेचनात 'मधुरा भक्ति' म्हणून स्वतंत्र प्रबंध लिहिला असून अशा अभंगांची मानसशास्त्रीय चर्चा केली आहे म्हणून डॉ. यांचा अर्थ अधिक समर्पक वाटावा असा आहे. येथील डॉ. जोशी यांची विवरणे अत्यंत समर्पक आहेत

परमेश्वराला पेच

डॉ. जोशी यांच्या विवरणात खुद्द तुकाराम महाराज व इतर संत यांची योग्य व चपखळ वचने ठिकठिकाणी दिलेली असतात त्यामुळे ती विवरणे अत्यंत समाधानकारक उतरलेली आहेत त्यामुळे अभंगाची ऐतिहासिक, सुसंगत आणि शास्त्रीय बैठक तयार होते अभंग १५६ 'सुजंचि पासाव' हा प्रसिद्ध अभंग असून यात तुकोबांनी परमेश्वराला एका पेचात अडकविले आहे असाच तऱ्हेचा पेच नामदेव व बहिणाबाई या दोन्ही संतांनी परमेश्वराला टाकला आहे या अभंगातील वरील विवरणात जीवाच्या उत्पत्तीचा व जीव आणि शिव यांच्या वेगळेपणाचा प्रश्न डॉ. जोशी यांनी विवेचला आहे परंतु या प्रश्नाचे निर्णायक उत्तर देण्यास कुणास शक्य होणार आहे? कांही विवरणामध्ये स्पष्टीकरणार्थ योग्य त्या पौराणिक कथाही दिलेल्या आहेत त्याचा फार उपयोग होतो (उदा अभंग २५७) त्याचप्रमाणे 'नको ब्रह्मज्ञान आत्मस्थिती भाव' या प्रसिद्ध अभंगाच्या विवरणात संतांच्या मुक्तीवरील भक्तीचे उत्तम विवेचन आले असून अशा अभंगाची गोडी वाचकाच्या ठिकाणी हटकून निर्माण होईल.

गंगेला घाट

थोडक्यात सांगावयाचे तर शब्दार्थ व टीपा, अभंगाचा अर्थ व विवरणे या अंगांसहित असलेली ही मागं तुकारामाच्या अभंगाची गाथा अभ्यासकाचे पूर्ण समाधान करील अशीच आहे तुकारामाच्या अभंगाची भाषा वरून दिसावयास सोपी असली तरी तिचा अर्थ अवघड आहे, शब्द अपरिचित आहेत (उदा अभंग ५२) अशा ठिकाणी डॉ. जोश्यांसारखा वाटाड्या वाचकास उत्तम मार्गदर्शन करतो या सार्थ गाथ्याच्या सहाय्याने तुकाराम महाराजांच्या अमृतवाणीच्या गंगेस एक उत्तम घाट बांधण्यात आला आहे, असेच वाचकाचे मत होईल संपादकाने आणि प्रकाशकाने याच पद्धतीने उरलेले खंड प्रकाशित करून वाचकास ऋणी करावे असे कोणीही म्हणेल

## महाराष्ट्र टाइम्स – डॉ. र. वि. हेरवाडकर

## तुकारामाचे व्यक्तित्व व वाङमय साकार करणारी डॉ. प्र. न. जोशी यांची नवी गाथा

गेल्या शंभर वर्षांत तुकारामबुवांच्या अभंगाचे मुद्रण अनेक वार होत आहे इ. स. १८६२ च्या सुमारास माधव चंद्रोबांचा पहिला प्रयत्न झाला त्यानंतर गणपत कृष्णाजी, तुकाराम तात्या, इंदुप्रकाश (सरकारी), निर्णयसागर, इंदिरा प्रेस, जगद्हितेच्छु, आर्यभूषण इत्यादी अनेक गाथा प्रसिद्ध झाल्या. त्यांपैकी काहींनी तुकारामबावांच्या अभंगाचे विषयवार वर्गीकरण केल्यामुळे अभ्यासकांना व सामान्य जनांना त्या उपयुक्त ठरल्या

प्रस्तुत डॉ. प्र. न. जोशी संपादित गाथा (प्रथम खंड) प्रकाशित करताना कै. शंकर पांडुरंग पंडित संपादित (सरकारी) गाथा प्रमाण मानून तिची रचना केली आहे ही सरकारी गाथा व्यवस्थित असून त्यात अभंगाचा क्रम त्यांचे गट त्यांची मूळची वर्गवारी हे तिचे विशेष आहेत ते कायम ठेवून या आवृत्तीत शब्दार्थ टीपा, सरळ गद्यार्थ, महत्त्वाचे पाठभेद व काही अभंगावर विवेचनात्मक व समग्राही असे आधारासहित व संतसंप्रदायाला अनुसरून साध्या भाषेत स्पष्टीकरण केलेले आहे या आवृत्तीतील शब्दार्थ, टीपा व अर्थ यात ग्रंथकाराचा जसा भाविक अभ्यास दिसतो, तसाच विवरणात

त्याच्या वैचारिक अभ्यासाचा प्रत्यय येतो विवरण हे मूळ अभगाला पूरक असे आहे उदाहरणार्थ, पहिल्या मगलाचरणाच्या सहा अभगाच्या विवरणांत मगलाचरणविषयक संस्कृत साहित्यशास्त्रातील थोडक्यात इतिहास दिला असून त्याच्या विविध प्रकाराची चर्चा केली आहे तुकारामाचे हे अभग नमस्क्रियारूपच आहेत असे जे लेखकाने म्हटले आहे ते पटण्यासारखे आहे अभगगाथेची रचना मुळात ग्रथात्मक नसल्यामुळे कुणी तरी जवळच्या शिष्याने हे निवडक अभग मगलाचरण म्हणून बसविले असण्याची शक्यता आहे लेखकाचे हे अनुमान पटावे.

गाथेचे वैशिष्ट्य

प्रस्तुत गाथेचा प्रमुख विशेष म्हणजे अभगाचा शब्दार्थ सागताना मुळातील कल्पना जास्तीत जास्त स्पष्ट करण्याचा प्रयत्न त्यात केला आहे हा प्रयत्न अर्थातच आत्मनिष्ठ पद्धतीने म्हणजे अभगातील भावनाशी समरसून केला आहे हे अर्थातच इष्ट असे झाले विवरण करताना न्याय, वेदान्त, मीमासा, आधुनिक विज्ञान इत्यादीचा आधार घेतल्यामुळे तर त्याला एक प्रकारची पक्की नि स्थिर-स्वरूपाची अशी बैठक प्राप्त झाली आहे

तुकारामाच्या अभगाचा एक चमत्कार असा की, बावाचे चारित्र्य, त्याचे अतरग, त्याचा आत्मानुभव, त्याचा सर्वाभूती समभाव, त्याची उत्कट भगवद्‌भक्ती या सर्वांचा त्यात ठसा उमटलेला दिसतो तुकारामाची वृत्ती इतर सतकवीच्या तुलनेनें अधिक अतर्मुख अशी आहे तिला पाडित्य आणि वादविवाद याचा मनस्वी कटाळा आहे कारण ती त्याच्या वाऱ्यासही उभी राहत नाही सुप्रसिद्ध टीकाकार वा ल भिडे म्हणतात त्याप्रमाणे स्वानुभवाचे भाव तुकारामबोवाच्या वाग्विलासातून गाळून टाकिले, तर त्याचे कवित्वच पुसून टाकल्यासारखे होईल सदर आवृत्तीत तुकारामाच्या या स्वानुभवाचे दर्शन पावलोपावली होते यात शका नाही

प्रस्तुत गाथेच्या शेवटी जी अभगसूची दिली आहे ती आवश्यक होय पण याहीपेक्षा विवरणा-तील विषयाची सूची हे या आवृत्तीचे भूषण मानले पाहिजे त्यात कृष्णजन्मासारख्या सामान्य परंतु परिचित विषयापासून भक्तवात्सल्य सर्वव्यापकता इत्यादी फारसे परिचित नसलेले विषयही आहेत सुमारे सहाशे पृष्ठाच्या ह्या ग्रथराजात शुद्धिपत्र नाही हे आणखी एक आश्चर्य सुरुवातीस तुकारामाचे सक्षिप्त चरित्र देऊन पुढे त्याच्या अभगवाणीची चर्चा केलेली आहे या सर्वांमुळे तुकाराम व्यक्ती आणि वाङ्मयही साकार होऊन वाचकापुढे उभी राहतात हे कबूल केले पाहिजे

आता काही मतभेदासबधी ग्रथकार म्हणतात की, 'निळोबाराय पिपळनेरकर इत्यादी अनेक शिष्य मडळी बुवाच्याभोवती जमा झाली, (पृ १६) अर्थातच हे विधान अनैतिहासिक होय, कारण निळोबानी तुकारामाचा छद घेतेवेळी तुकारामाच्या निर्याणास वीस पचवीस वर्षे होऊन गेली होती निळोबानी चेचाळीस दिवस निरशन वृत्तीने धरणें घेतल्यानतरच तुकारामाचा त्याना स्वप्न साक्षात्कार होऊन अनुग्रह झाला (पहा–वारकरी पथाचा इतिहास १९२७ पृ ३८) महाराष्ट्र सारस्वत (शके १८७६, पृ ९६४), विठ्ठल या शब्दाची व्युत्पत्ती 'बिट्टी' या कानडी (विष्णु या शब्दाचा अपभ्रश) शब्दापासून झाली असल्याचे पडित भाडारकराचे मत दिले आहे तसेच विष्णू विठ्ठ व विठू किंवा विठ्ठल या मार्गानेही विठ्ठलाचा सबध विष्णूशी पोचतो, असे म्हटले आहे (पृ ७) आमच्या मते पाली भाषेतील गौतम बुद्धास लावलेल्या 'वितुल' (अतुल या अर्थी) या मार्गाने तो शब्द आला असावा मध्ययुगात विठ्ठल हा शब्द विशेष रूढ झाला हे लक्षात घ्यावयास हवे पृ २३७ वर 'सौरियाचे फेरी' यातील 'सौरी' या शब्दाचा 'निर्लज्ज स्त्री' हा दिलेला अर्थ बरोबर आहे पण 'भावीण, मुरळी' हे जे आणखी अर्थ दिलेले आहेत ते तेथे चपखल बसत नाहीत 'नाही निर्मळ जीवन। काय करील साबण' (क्र ७६५) याचा अर्थ पाणी जर स्वच्छ नसेल तर साबणाचा [illegible]

उपयोग ? हा अर्थ पटण्यासारखा नाही त्यापेक्षा माणसाचे जीवन जर स्वच्छ व पापरहित नसेल तर वर वर साबण लावून काय उपयोग ? हा दुसरा दिलेला अर्थच अधिक पटणारा आहे

असो उपरिनिर्दिष्ट काही मतभेद मान्य करूनही हा ग्रंथराज उपयोगी पडण्यासारखा आहे त्यात दिसून येणारी विद्वत्ता, भावना आणि श्रम ही आदरणीयच होत असा प्रकारचे जितके ग्रंथ निर्माण होतील तितके हवेच आहेत तुकाराम बावांनी आपल्या हयातीत स्वतःच्या वाणीने तेजस्वी अशा प्रकारच्या ग्रंथांनी आज अमर होऊन अभंग हे नाम सार्थ होत आहे हीच तुकोबांच्या कार्याची फलश्रुती या बाबतीत ग्रंथकार व प्रकाशक या उभयतांनी जी सक्रिय निष्ठा व्यक्त केली त्याबद्दल त्यांचे अभिनंदन

## नवशक्ती – मुंबई

तुकाराम महाराजांच्या गाथेच्या अनेक तऱ्हेच्या अनेक आवृत्त्या आतापर्यंत निघाल्या आणि पुढेही निघत रहातील तुकोबांच्या गाथेचा अभ्यास होईल तितका थोडाच आहे कारण त्यात साधकदशे-पासून सिद्धावस्थेला पोचलेल्या महापुरुषाचे त्याच्याच परखड भाषेतले आत्मचरित्र आहे शिवाय आजची मराठी भाषा ज्यांच्या वाणीने घडली त्यांत तुकोबांचे स्थान मोठे आहे पण एक प्रकारे अर्वाचीन असलेल्या मराठी भाषेतील या अभंगांची 'सार्थ' गाथा प्रसिद्ध करण्याची आवश्यकता आहे काय ?

अनेकांना असा प्रश्न सहज पडेल ह भ प प्रा सोनोपंत दांडेकर यांची साक्ष महत्त्वाची मानली पाहिजे ते म्हणतात, 'तुकोबांचे सर्वच अभंग सहज समजतील असे मात्र नाही त्यांतील काही अभंग तर खूपच कठीण आहेत ' आणखीही काही मोठ्या लोकांच्या अशा साक्षी काढता येतील पण वाचकाने तुकोबांचा गाथा स्वतः अर्थाच्या दृष्टीने वाचला तर त्याला स्वतःच्या अनुभवाची साक्षही काढता येईल शब्दार्थापासून अनुभवापर्यंत तुकोबांच्या अभंगाचा अभ्यासच केला पाहिजे. हा अभ्यास प्रत्येकाने स्वतःच करायचा असता सार्थ गाथ्याचा उपयोग या अभ्यासाला मार्गदर्शक म्हणून होतो. डॉ प्रल्हाद नरहर जोशी यांनी हे मार्गदर्शन हाडाच्या शिक्षकाला शोभेल अशा तऱ्हेने आपल्या 'सार्थ तुकारामगाथे'मध्ये केलेले आहे

अलिकडेच ह भ प शंकरमहाराज खंदारकर यांनी गाथाभाष्य दोन खंडात प्रसिद्ध केले आहे त्यात अभंगाचा अर्थ आहे पण डॉ. जोशी यांनी या ग्रंथात अभंग, शब्दार्थ, टीपा, मग संपूर्ण अभंगाचा अर्थ दिला आहे आणि आवश्यक त्या अभंगाचे स्वतंत्रपणे विवरणही केले आहे या विवरणा-मुळे तुकाराम महाराजांचा स्वभाव, अभंगातील विषय मांडण्याची दृष्टी, त्यांची सामाजिक, धार्मिक मते, त्यांचे तत्त्वज्ञान यावर प्रकाश पाडण्यास मदत होणारी आहे ' अशी ग्वाही सोनोपंत दांडेकर यांनीच दिलेली आहे

## दै. मराठा – मुंबई

अलीकडच्या काळात तुकाराम गाथेच्या अनेक संपादित आवृत्त्या मराठी वाचकासाठी उपलब्ध होऊ लागल्या आहेत प्रत्येक संपादकाचा काही वेगळा दृष्टिकोण असल्यामुळे प्रत्येक संपादित आवृत्तीचे काही वेगळे वैशिष्ट्य असू शकते प्रकाशक श्री दि वा आवटी यांनीही नुकतीच एक तुकारामगाथा प्रकाशित केली असून तिचे संपादन डॉ प्रल्हाद नरहर जोशी यांनी केले आहे डॉ जोशी यांचे वडील कै नरहरशास्त्री जोशी हे एक थोर कीर्तन–प्रवचनकार होते, त्यामुळे लहानपणापासूनच तुकाराम महाराजांच्या अभंगाशी त्यांचा विशेष परिचय झाला संतवाङ्मयाचे ते जसे भक्त तसेच गाढे पंडित त्यामुळे तुकारामाची गाथा संपादित करण्यास ते अधिकारी आहेत यात शंका नाही गाथेचा पहिला खंड संपादित करताना त्यांनी महाराष्ट्र सरकारचीच गाथाआवृत्ती प्रमाण मानून ग्रंथरचना केली आहे अभंगाचे संपादन शब्दार्थ अभंगार्थ आणि वर माहितीपूर्ण टीका इत्यादि तपशीलासह केले असून या संपादनामागची मेहनत व पांडित्य त्यातून स्पष्ट झाल्याखेरीज रहात नाही

## ' धर्माचें पालण । करणें पाषांड खंडण '

### ' पडली छाया ब्रह्मींची '

देहूच्या भूमीत आणि इंद्रायणीच्या परिसरात श्रीतुकाराम महाराज या नावाने जे रोपटे रुजले आणि वाढले त्याचा भावभक्तिमिश्रित सुगंध किती विविध प्रकारानी नटलेला होता हे आपण प्रथम खंडाच्या प्रास्ताविकात 'तुकाराम महाराजाची अभंगवाणी' या विशेष लेखात पाहिले तुकारामबुवा प्रथम तरी सर्वसाधारण माणसासारखेच व्यावसायिक व प्रापंचिक असून त्याच्या कुळात पूर्वपरंपरेने श्रीविठ्ठलाची भक्ती व पंढरीची वारी चालू होती बुवाच्या ससारात फारसे अनुकूल वातावरण नव्हते. बाहेरच्या जगातही दुष्काळ, उपासमार, दुकानाचे दिवाळे, कर्जदाराची कटकट इत्यादी व्यापामुळे बुवाचे चित्त व्यथित झाले, ससारतापाने बुवा त्रस्त झाले पूर्वसुकृताची जोड असल्यामुळे त्याच्या मनात वैराग्य निर्माण होऊन साधुसताची सगत, हरिकीर्तन, नामस्मरण, सद्ग्रथाचे वाचन, ईश्वरचिंतन यात त्यांचे चित्त रमू लागले ससाराच्या तापाने तप्त झालेले त्याचे मन 'नित्य नवा दीस जागृतीचा' अनुभवू लागले सद्गुरुनायाकडून उपदेश मिळाला नामदेवाकडून अभगरचनेची प्रेरणा मिळाली आणि तुकोबा नामसकीर्तनात, भजनकीर्तनात, प्रभुप्रेमात दग होऊन गेले प्रभुप्रेमास दृष्ट लागेल म्हणून त्यानी एकान्तवास पत्करला वृक्षवल्ली व वनचरे याच्याशी त्यांनी सोयरीक केली ईश्वराच्या साक्षात्काराने, प्रभूच्या भेटीने, विठ्ठलाच्या अगसगाने ते तृप्त होऊन गेले सर्वत्र प्रभूचे रूप विलसत असल्याचा अनुभव त्याना आला मनाने जो अभिलाष धरिला होता तो पूर्ण झाला 'आत हरि बाहेर हरि । हरिनें घरीं कोंडिले–' अशी स्थिती प्राप्त झाली जन्मजात व्यवसाय चालू ठेवण्याऐवजी हाच एव 'बरवा झाला वेवसाय । पायलों चिंतिलाचि ठाय । दृढ पायीं राहिला भाव । पावला जीव विश्रांति', अशा स्थितीत सर्व शीण दूर झाला देहभाव पालटून शरीरावर 'पडली छाया ब्रह्मींची' असा अनुभव येत राहिला. अविनाशी आनदघन, अमूर्तमूर्ती मधुसूदन प्राप्त झाला सततसहवासात पद्मनाभाचा ठेवा सापडला सताच्या पगतीत आता ब्रह्मरसाचे भोजन होत राहिले 'आलिंगन कंठाकंठीं । पडे मिठी सर्वांगें ॥ न घडे मागें परते मन । नारायण सभोगीं' अशा अनुभवाच्या नाना तऱ्हा मोठया तल्लीनतेने तुकोबानी अनुभवल्या

### संतांची समाजाभिमुखता

अशा रीतीने भावारूढ झालेल्या तुकोबाना ज्या लोकसमुदायातून ते फटकून दूर झाले त्याची आठवण किती होती ? त्याच्याशी त्याचा कोणता सबध राहिला ? स्वानुभवाच्या आनदसाम्राज्यात रममाण झालेल्या तुकाबाना आपल्या पाठीमागे खूप दूरवर राहिलेल्या लोकाची चिंता होती की नव्हती ? या सवसामान्य लोकासाठी त्यानी काय केल ? इत्यादी प्रश्नाची उत्तरे थोडक्यात येथे पाहा-वयाची आहेत कोणत्याही भगवद्भक्ताचे जीवन कधी एकेरी राहूच शकत नाही ईश्वराशी एकरूप झालेल्या त्याच्या अनुभूतीचे दुसरे अग समाजाभिमुखच राहाते सर्वत्र ईश्वरच भरून राहिलेला आहे अशी अनुभूती ज्याना आली त्याना सर्व समाजच हरिरूपच दिसतो त्याची आठवण त्यांना सतत येणारच महाराष्ट्रात तरी दशी भाषेतील ही परपरा श्रीचक्रधर-ज्ञानेश्वरापासूनची आहे गैनीनाथ-निवृत्तिनाथ या मार्गाने उपदेश व साक्षात्कार झाल्यानतर ज्ञानेश्वराना त्र्यंबकेश्वराच्या मागच्या पर्वतातील गुहेत आत्मचिंतनात रमता आले असत पण त्यात ज्ञानेश्वराच्या जीविताचे सार नव्हते. जे मागासलेले आहेत, कष्टी आहेत, दलित आहेत, पीडित आहेत, वचित आहेत, अज्ञानी आहेत, पतित आहेत, त्याच्या कल्याणाची, त्याच्या उद्धाराची काळजी या सतांना सतत असते. या श्रेष्ठ सतांच्या सहानुभूतीचे ते एक महत्त्वाचे अगच असते ताटी लावून काढून घेणाऱ्या आपल्या धोरल्या

भावास म्हणजे ज्ञानेश्वरास मुक्ताबाईने समजाविले आहे, 'योगी पावन मनाचा । साही अपराध जनाचा । विश्व रागें झाले वन्ही । संतें सुखें व्हावें पाणी ' याच वृत्तीमधून ज्ञानेश्वर, एकनाथ, तुकाराम असे थोर संत समाजाभिमुख झालेले असतात दैवी कृपेने कृतकृत्य झालेले सत्पुरुष मागे राहिलेल्या आर्तांचे अश्रू पुसण्यासाठी सरसावतात दुरिताचे तिमिर जावे, खळांची दुष्ट बुद्धी दूर व्हावी व सर्वत्र स्वधर्माची प्रहाट व्हावी म्हणून ज्ञानेश्वरासारखे महात्मे भगवद्‌गीतेवर भाष्य लिहिण्यास तत्पर राहातात. ज्या समाजाने त्रास दिला त्याना संत विसरणार कसे ? जगाचे पापताप दूर करावे, तीरावरील वृक्षाचे संवर्धन करावे हेच गंगेचे कार्य ना ? संतजीविताचेही हेच कर्तव्य असते; विश्वाचा अंधकार घालवीत व लक्ष्मीची निवासस्थाने जी कमळे त्याना प्रफुल्ल करीत सूर्य प्रदक्षिणा करायला निघतो ना ? या साधुसंताचेही तसेच आहे ' तैसीं बांधिलीं सोडीत । बुडालीं काढीत । सांकडीं फेडित । आर्तांचिया ॥ किंबहुना दिवसराती । पुढीलांचे सुख उपजती । आणित आणित स्वार्थी । प्रवेशिजे-' अशा मार्गाने संत जनतेस मार्गदर्शन करण्यास उत्सुक होतात

## 'हातीं घेऊनि बाण फिरे'

ज्ञानेश्वर, नामदेव व एकनाथ यांच्या परंपरेत तुकोबा कळसरूपाने सर्व वावतींत शोभणारे होते ' सर्व सुखाचे आगर ' जरी त्याना भंडाऱ्याच्या डोंगरावर भेटले तरी तुकोबाना मागील जन-समुदायाचा विसर पडला नव्हता ' बुडते हे जन न देखवें डोळां ' म्हणून त्यांच्या मनास कळवळा आला आपला अधिकार तुकोबानी यथार्थपणे ओळखला होता आपल्या वाणीतून आता कोण बोलत आहे, याविषयी त्याना आत्मविश्वास होता आपणास तो विश्वंभर बोलवितो, आपण त्याचेच कार्य करीत आहोत, आपला ' शिकविता धनी ' कोण आहे, याची जाणीव असल्यामुळे त्यानी सामाजिक उद्बोधना-कडे आग्रहाने लक्ष दिले. आपण आता उपकारापुरतेच उरलेलो आहोत असा त्यांचा विश्वास होता ' धर्माचें पाळण । करणें पाषांड खंडण ॥ हेंचि आम्हां करणें काम । बीज वाढवावें नाम ' या कार्या-साठी आपला अवतार असल्याचे त्यानी ओळखले ' आम्ही वैकुंठवासी । आलों याचि कारणासी । बोलिले जे ऋषी । साच भावें वर्ताया ॥ झाडू संतांचे मारग ॥ आडरानीं भरलें जग । उच्छिष्टाचा भाग । शेष उरला तो सेवूं ॥ अर्थे लोपलीं पुराणें । नाश केला शब्दज्ञानें ॥ विषयलोभीं मनें । साधनें बुडविलीं ॥ पिटूं भक्तीचा डांगोरा । कळिकाळासी दरारा । तुका म्हणे करा । जयजयकार आनंदें ॥ ' या एकाच हेतून आता तुकोबा आत्मसाक्षात्कारानंतरही उरले होते ' आपण जेववुनी जेववी लोका । संतर्पण करी तुका ' अशी त्यांची भूमिका होती या संतर्पणास सर्व जातीचे, सर्व वयाचे, सर्व धर्मांचे स्त्रीपुरुष यावेत अशी त्यांची अपेक्षा आहे ' या रे या रे ल्हान थोर । याती भलते नारी नर । करावा विचार । न लगे चिंता कोणासी ' अशी त्यांची हाक साऱ्या जगास गवसणी घालणारी होती या कार्यासाठी तुकोबा निश्चयाने व निर्भिडपणे सिद्ध झाले ' कांस घालोनि बळकट । झालों कळिकाळासी धीट । केली पायवाट । भवसिंधूवरूनी ' अशा भूमिकेवर प्रसंगी तुकोबा कडक शब्दानी बेताल व बेफाम चनत चाललेल्या समाजावर कडक प्रहार करू लागले ' तीक्ष्ण उत्तरें । हातीं घेऊनि बाण फिरे । नाहीं भीड भार । तुका म्हणे साना थोर ' अशा थाटात हा वैष्णवाचा गाढा वीर समाजाभिमुख होऊन सुधारणेच्या कार्यास तत्पर झाला

होती ? जन्मजात जातीच्या प्राबल्यामुळे समाजास घातक स्थिरता कशी येत होती ? इत्यादी अनेक प्रश्नांचे चिंतन तुकोबांनी केले आणि आपल्या नेहमीच्या फटकळ, स्पष्ट व निर्भिड वृत्तीने लोकांवर प्रहार करून, कधी ममत्वाने सांगून त्यांना ताळ्यावर आणले. त्यांची वाणी विठ्ठलाच्या ठशाने प्रभावित असल्यामुळे त्यांच्या सांगण्या-बोलण्याचाही प्रभाव पडत गेला.

ज्या कलियुगातील सर्वोत्तम मानव म्हणून तुकोबांची गणना होते त्या कलियुगाचा समकालीन प्रभाव तुकोबांनी वर्णन केला आहे. ' आचारभ्रष्ट होती लोक कलीं । पुण्य क्षीण बळी जालें पाप ।। ......वेदाचें पाठक सेविती मद्य । न देखती भेद विषयीं भांडण ।। ' असे त्यांचे निरीक्षण आहे. ब्राह्मण हे सर्व वर्णांचे गुरू. पण त्यानीच धर्म सोडला, आचार सोडला. ' आचार सांडिती द्विज लोक ', अशी त्यांची तक्रार आहे. आचार सोडणारे ' द्विज चाहाड झाले चोर ' असा तुकोबांचा दावा आहे. ' टिकें लपविती पातड़ीं । लेती विजार कातडी ' असे हे भ्रष्ट ब्राह्मण नीचाचे चाकर होऊन ' चुकलीयां खाती मार ' अशी ही दैना सर्व वर्णांचे प्रमुख असे ज ब्राह्मण, त्यांची झालेली तुकोबांनी पाहिली. सर्वश्रेष्ठ म्हणून गणलेल्या ब्राह्मणानीच आचार सोडल्यामुळे ' वैश्यशूद्रादिक । हे तों सहज नीच लोक ' त्यांची दैना काय विचारावी ? सर्व समाजात ' दोष जाले बळिवंत । नाहीं ऐसी झाली नीत । मेघ पडों भोती । पिकें सांडियली क्षिती ' अशी अवस्था होऊन गेली.

## विपरीत कौटुंबिक नाती

या कलियुगातील सामाजिक अनाचाराचे चित्तथरारक वर्णन तुकोबांनी वारंवार केलेले आहे. स्वार्थ, लोभ, सत्ता, पैसा, विषयसुख, हेवादावा, अरेरावी, हिंसक वृत्ती, अनीती इत्यादींच्या कर्दमात *सडत चाललेल्या समाजास कोण हात देणार ? या समाजाचे मन असत्यावर स्थिरावले होते.* ' पापा देती अनुमोदन । करिती हेळण संतांचें ' ही समाजाची वृत्ती होती. ब्रह्मकर्म जाणून ज्ञानाची व विद्येची साधना करणारे द्विजवर दावलपीरास भजू लागले. शांती, क्षमा, दया, भावभक्ती, सत्क्रिया यांची नाव-निशाणीही नाहीशी झाली. सत्वधैर्य भंगून गेले. वर्णाश्रमधर्म राहून गेला. रामनाम म्हणताना लोकांना फारच श्रम होत राहिले. कथापुराणांची मस्तकात तिडीक उठू लागली. ' धनाढ्य देखोनि अनामिक । सयातें मानिती आवश्यक । अवमानिले वेदपाठक । सात्त्विक शास्त्रज्ञ संपन्न ' अशी एकंदर समाजाची वृत्ती होऊन गेली होती. एकंदर समाजाचा आधार म्हणजे व्यक्तिव्यक्तीचे कौटुंबिक नाते. तेही विपरीत होत राहिले होते. ' पुत्र ते पितयापाशीं । सेवा घेती सेवका ऐसी । सुनांचिया दासी । सासा जाल्या आंदण्या....भार्या भ्रतारेसी । रंक तैसीं मानिती ' अशी कौटुंबिक नाती धसास लागली होती हरिदासांना नमस्कार करताना मनास कोण संकोच ? पण पोटासाठी हे लोक ' म्लिंच्छाच्या सोसांच्या ' पायांवर लोटांगण घेतात.

## ' दैन्यवाणी पतिव्रता '

अशा प्रकारे समाज रसातळाला चालला होता; सर्वत्र पापाचा प्रसार होत होता. ' बहुत पाप झालें उचंबळ । उत्तम न म्हणती चांडाळ । अभक्ष भक्षिती विटाळ । कोणी न धरी कोणाचा ' सर्व लोकांचे वर्तन बिघडून गेले होते. समाजाचे स्थैर्य, विशेषत: स्त्रियांच्या आचारावर, वर्तनावर अवलंबून असते, पण त्यांची अवस्था कशी होती ? तुकोबानी वर्णन केले आहे, ' कामिनी विटंबिल्या कुळवंती । वदनें दासींची चुंबिती । केळवती व्यभिचारिणी । दैन्यवाणी पतिव्रता ' असा या समाजाचा आदर्श बनत राहिला होता. ' मद्य-पानाची सुराणी । नवनीता न पुसे कोणी । ' अशा अवस्थेचा परिणाम चराचर जगतावरही जणु झालेला होता. ' मेघें मंद जाल्या मेघवृष्टि । आकांतली कांपे सृष्टि । देव रिगाले कपाटीं । आटाआटी प्रवर्तली ।। अपीक धान्यें दिवसें दिवसें । गाई म्हैसी चेवल्या गोरसें । नगरें दिसती उध्वसें । पिकली बहुवसें पाखांडें ।। '

आणि ही पाखांडे तरी कशी व कोणती होती ? होमहवन, यज्ञयाग, अनुष्ठाने, जपतपादी साधने यांतील आचरण भ्रष्ट झाले. 'गीता लोपली गायत्री। भरले चमत्कार मंत्रीं। अश्वाचिया परी कुमारी। विकती वेदव्रते' वेदांच्या अध्ययनाची रुची मंदली. सर्वोत्तम साधनें लोपून 'क्षुद्रें कापट्यें महामोहनें। मिरवताती दुर्जन.' जारणमारण, जडीबुटी, मंत्रतंत्र, नवससायास, जादूटोणा यांचेच राज्य सुरू झाले. सन्यासी, तापसी, ब्रह्मचारी हे 'कामक्रोधें व्यापिले भारी' राजे प्रजाचे अंतक बनले. 'पिते पुत्र सहोदर। एकाएक शस्त्रघातें वर्त्तती' अशी अवस्था निर्माण झाली.

### भयानक लोकस्थिती

समाजाचे हे विदारक चित्र तुकोबांनी केवळ पुराणांतील कल्पनांच्या आधारावर रंगवलेले नाही. तुकारामबुवांचे समकालीन संत समर्थ रामदास स्वामींनी तर उभा भारत पायी हिंडून पाहिला होता. समाजाची निकृष्ट अवस्था पाहून या भ्रमणशील वैराग्याचे चित्त उन्मळून गेले. 'कैसी वाचतील जनें ?' म्हणून त्यांचे मन गागरून गेले. 'चितेनें ऊर फाटतो' असा आक्रोश त्यांनी केलेला आहे. माणसांना खायला अन्न नाही, अंथरुणपांघरूणही नाही. घराचे खोपटे उभे करण्यास सामग्री नाही. महागाईने कहर केला. कित्येक माणसे मरणाच्या पथाला लागली. कित्येकांनी देशत्याग केला. 'कितीयेक ते मेघही मंद जाले। अनावृष्टि स्थळोस्थळी लोक मेले॥ ...किती येक ते धान्य लुटूनि नेती। किती येक ते पेव खणोनि नेती॥' अशी लुटालूट सर्व चीजवस्तूंचीच होत राहिली. इतकेच नव्हे तर 'किती गुजिणी भ्रष्टवील्या। किती शामुखी जाहाजीं फांकविल्या। किती येक देशांतरीं त्या विकील्या। किती सुंदरा हाल होऊनि मेल्या' समर्थांनी लोकस्थितीचे हे केलेले वर्णन आजही अंगावर शहारे आणणारे आहे. ते आणखी एके ठिकाणी म्हणतात,

'सुडके पटकर पटकर न मीळे पांघराया। मक्ती नाही रे नाही रे कोंपट कराया॥
बायेला लेंकुरें लेकुरें सांडुनिया जाती। भीक मागती मागती तिकडेचि मरतीं॥
रांडा पोरांच्या पोरांच्या तारावळी होती। मोल मजुरी भीकारी होऊनि वांचती॥
नदी भरतां भरतां घालुनीयां घेती। वीख घेउनी घेउनी उदंड मरती॥
उदंड चाकरी चाकरी मीळेना भाकरी। लोक नीलंड नीलंड काढुनी नेतो पोरी॥
न्याये बुडाला बुडाला जाहाली शिर्जोरी। पैक्या कारणें कारणें होति मारामारी॥
येतो पाहुणा पाहुणा लौकरी जाईना। अन्न खातो रे खातो रे थोडेही खाईना॥
लोक भलेसे दीसती खेटरे चोरीती। वस्त्रे धोतरे पातरे लपउनी पळती॥'

अशा या लोकांना आधार कोण देणार ? अस्मानी व सुलतानी संकटांनी बेजार झालेल्या लोकांना कुठलाही आश्रय नव्हता. या लोकांना प्रपंचाचा उपदेश करावा की परमार्थाचा ? लोक असे संकटात सापडले की भुरट्या पुढाऱ्यांना व ढोंगी नेत्यांना फावते. लोकांच्या असाह्य परिस्थितीचा ते फायदा घेतात. छा छू करून, मंत्रतंत्र करून लोकांचे दुःख कमी करण्याचे नाटक सुरू होते. अल्प श्रमात किंवा आळसात भरपूर पैसा मिळविण्यासाठी उपचार सुरू होतात. ताईत, गंडे, दोरे यांची चलती होते. जिकडेतिकडे अनाचार, ढोंग, अनीती, हिंसाचार, स्वार्थ यांचाच सुकाळ होतो.

### पोटभरू कथाकार

अशा परिस्थितीत तुकारामबुवा प्रथम या तथाकथित ढोंगी लोकांवर कडाडून प्रहार करू लागले. रामायणमहाभारतातील आदर्श लोकांपुढे ठेवणारे हे पुराणिकबुवा पाहा. 'पुराणिक म्हणविती। जाणोनि कांदे ते भक्षिती. श्रेष्ठ वर्ण ब्राह्मणाचा। संग न सुटे शूद्राचा' असे हा ढोंगी पुराणिक आणि

कथेकरी कसे निर्माण झाले ? कथेकरी, कथाप्रसंग यासंबंधीच्या सर्व मर्यादा बुवांनी अनेक अभंगांतून स्पष्ट केल्या आहेत. पण बुवाच्या भोवती कथेकरी कोणत्या जातीचे होते ? ' न कळे ब्रह्मज्ञान आचार विचार । लटिका व्यवहार करीतसे ॥ द्रव्य इच्छेसाठीं करीतसे कथा । काय त्या पापिष्टा न मिळे खाया ॥ पोट पोसावया सोंडें बडबडी । नाहीं घडफुडी एक गोष्टी ' अशी पोटासाठी विटंबना करणाऱ्या कथेकऱ्यांस तुकोबांनी वारंवार हटकले आहे. ' उभ्या बाजारात कथा । हें तों नावडे पंढरीनाथा ॥ अवघें पोटासाठीं सोंग । तेथें कैंचा पांडुरंग ' अशा पोटभरू कीर्तनकारांस पाहून तुकोबांनी म्हटले आहे, ' थू थू त्याच्या तोंडावरी । व्यर्थ सिणविली वैखरी ' अशा कथेकरी माणसाच्या मनात पांडुरंगाविषयी प्रीतीचा लवलेशही नव्हता.

## ' घरोघरीं झाले कवि '

तुकोबाच्या मुखातून पांडुरंगाच्या कृपेने अभंगवाणी स्रवू लागली. त्यांच्या भक्तिप्रेमाने लोक त्यांच्या भोवती जमले. त्यांच्या रसाळ वाणीकडे आकृष्ट झाले. एवढ्याने तथाकथित नकली कवी बिथरून गेले. त्यांनी जुन्या संतांच्या व प्रसंगी तुकोबाच्याही काव्याची मोडतोड करून आपला कवित्वाचा धंदा चालू ठेवला. तुकारामबुवा या कविवृंदांचीही गय कशी करणार ? ' कलियुगीं कवित्व करिती पाषांड । कुशळ हे भांड बहु झाले ' यांच्या मनात ईश्वराविषयी शुद्ध भावना नव्हती. ' घरोघरीं झाले कवि । नेणें प्रसादाची चवी ॥' त्यांच्या कवितेत प्रसाद कुठून येणार ? कारण ' उष्टया पत्रावळी कल्पनियां गोळा । दाखविती कळा कवित्वाची ॥ ऐसे जे पातकी ते नरकीं पचती । जोंवरी भ्रमती चंद्र सूर्य ' अशा रीतीने प्रसाद ओगळ रीतीने चितरडणाऱ्या कवीश्वराचा तुकोबांना अतिशय कंटाळा होता.

## असे हे पोटभरे संत

जसे कवी, तसेच भोंदू संतही गावोगावी निर्माण झाले होते. मनात ईश्वराच्या विषयी थोडेही प्रेम नसताना बायकांमुलांना फसवून उपदेश देणारे संत पाहून तुकोबांनी म्हटले आहे, ' ऐसे पोटभरे संत । त्यां कथा भगवंत ? । रांडापोरांतें गोविती । धर्मासनें ते लाविती ' आणि या अशा फसव्या संतांचे व बुवांचे उद्योग व व्यसनें तरी किती विविध प्रकारचीं ! ' ऐसे संत जाले कळीं । तोंडी तमाखूची नळी ॥ स्नान संध्या बुडविली । पुढें भांग ओढविली ॥ भांगभुर्का हेंचि साधन । पचीं पडे मद्यपान ' अशा सोगापोटी पांडुरंगास कोठले स्थान असणार ? अंगी सामर्थ्य नसताना हे संत पोपटाप्रमाणे बडबड करून स्त्रीपुरुषांची नुसती करमणूक करतात. हे साधुसंत ' लावूनियां मुद्रा बांधोनियां कंठीं । हिंडे पोटासाठीं देशोदेशीं ॥ नेसोनि कौपिन शुभ्र वस्त्र जाण । पाहाती पक्वान्न क्षेत्रांचें तें ' या संतांच्या मनात ईश्वराविषयी प्रेमाचा उमाळा कधीच नसतो. ' कथा करोनियां दावी प्रेमकळा । अंतरीं जिव्हाळा कुकर्माचा ॥ तुळसी खोवी कानीं दर्भ खोवी दोंदीं । लटिकी धरी बोंदी नासिकाची ॥ टिळे टोपी माळा देवांचें गबाळें । वागवी ओंगळ पोटासाठी ॥ गोसाव्याच्या रूपें हरी परनारी । तयाचे अंतरीं कामलोभ ॥ कीर्तनाच्या वेळीं रडे पडे लोळे । प्रेमेविण डोळे गळताती ' असे हे ' मावेचे मइद ' असल्याने ' त्याच्यापाशी गोविंद नाहीं नाहीं ' असे बुवानी स्पष्टपणे सांगितले आहे– ' मुखीं बोले ब्रह्मज्ञान । मनीं धन आणि मान ॥ ... पोटासाठीं संत । झाले कलींत बहुत; ' चुकून कोठे विरळा व खराखुरा संत भेटेल तर तुकारामबुवा त्यास लोटांगण घालायलाही तयार आहेत.

## अनाचारी गुरू

जसे भोंदू संत व साधू; तसेच भोंदू गुरूही बुवांच्या नजरेतून सुटले नाहीत. खरे म्हणजे ' गुरुशिष्यपण । हें तो अधम लक्षण ' पण वाटेल त्या माणसास वाटेल त्या मार्गाने गुरुपदेश

देण्याचा धंदाच सर्वत्र सुरू झाला शिष्याची सेवा घ्यायची, त्याच्या द्रव्यावर लक्ष ठेवायचे, आपलाच वडेजाव माजवायचा आणि देवाच्या व धर्माच्या नावावर सर्वांना लुटायचे तुकोबानी या गुरूची संभावना करताना म्हटले आहे, 'एक करिता गुरु गुरु । मोंवता भार शिष्यांचा ।। पुस नाही पाय चारी । मनुष्य परी कुतरीं तीं ।। परस्त्री मद्यपान । पेंडखाण माजविलें ।। ' या गुरूचा लोभ वर्णन करिताना तुकोबा म्हणतात, ' तन्न शिष्या मान । दुधा म्हणे नारायण ।। ऐशीं ज्ञानाचीं डोंबडें । आशा विटंबिली मूढें ।। उपदेश तो जगा । आपण सोवळा इतका मांगा ।। रसना शिश्नाचे अंकित । तुका म्हणे वरदळ स्फीत । ' अशा या अनाचारी व स्वार्थी गुरूनी समाजास कोणती शिकवण दिली असेल ?

## चळलेले ब्राह्मण

समाजाला मार्ग दाखविणारे ब्राह्मण किती चळले होते ते वर सांगितले आहेच आपला विद्यार्जनाचा उद्योग सोडून हे ब्राह्मण सेवाभावात व दुराचारात रमले होते 'अगीं ब्रह्मक्रिया खिस्तीचा व्यापार । हिंडे घरोघर चाडाळाचे ।' खिस्तीचा म्हणजे सावकाराचा उद्योग करण्यात ब्राह्मण धन्यता मानीत होते या उद्योगात ते 'अत्यजाची खिचडी घेताती मागून । गालिया प्रश्न मायबहिणी ' ब्राह्मणानी हा जो एक नवा उद्योग आरंभिला होता, त्याचे बुवाना भारी नवल वाटले. त्यानी स्पष्ट शब्दात म्हटले आहे,' खिस्तीचा उदीम उदीमांत हीन ।' करिती ब्राह्मण कलियुगीं ।। बेवसाव करी पर्वत मागापासी । ते पैं विटाळासी न मानिती ।। मांगिणीशीं नित्य करीतसे लेखा । तोंडावरि थुका पडतसे ' असे हे पराधीन झालेले ब्राह्मण समाजास कसले मार्गदर्शन करणार ? या क्रियानष्ट ब्राह्मणावरही कडक टीका करताना तुकोबानी संकोच केलेला नाहीं ' अभक्त ब्राह्मण जळो त्याचें तोंड ' म्हणून त्यानी ब्राह्मणाची वासलात लावलेली आहे ' सध्या करितोसी केशवाच्या नावें । आरती तें ठावें नाहीं कैसें ? ' म्हणून त्यालाच प्रश्न केला आहे ज्याला हरिकीर्तन आवडत नाही, ज्याच्या मनात वैष्णवाविषयी प्रेम नाही, तो कसला ब्राह्मण ? चामार जर विष्णुभक्त असेल तर तो तुकाराम महाराजाना अधिक जवळचा आहे ज्याला हरिनामाची आवड आहे तोच एक पवित्र असे त्याना वाटे

## पढिक पंडित

काही ब्राह्मणानी पुष्कळ पाठांतर केले असेल, पण त्याच्या मनात विठ्ठलाविषयी प्रेम नसेल तर त्या पांडित्याचा काय उपयोग ? 'काय करावें घोकिलें । वेदपठन वाया गेलें ।। वेदीं सांगितलें न करी । सम ब्रह्म नेणें दुराचारी' असा हा मूर्ख पंडित व पढिक बुवाना कसा मानवणार ? ' पंडित हे ज्ञानी करतील कथा । न मिळती अर्था निजसुखा ' या पिंडपोषकाच्या ज्ञानगोष्टींना आग लागो असे एकदा वैतागाने तुकाराम बुवानी म्हटले आहे 'कोडियाचें गोरेपण । तैसें अहंकारी ज्ञान ।' या अहंकारी माणसाची वा अहंकाराची नवलगोष्ट ज्ञानदेवानी अशी सांगितली आहे की, तो ज्ञानी माणसासच विशेष झगतो या पंडितांच्या वडवडीस बुवानी उत्तर दिले आहे 'नाना मतांतरें शब्दाची व्युत्पत्ति । पाठान्तरें होती वाचाळ ते ।। माझ्या विठोबाचें वर्म आहे दुरी । कैची तेथें उरी देहभावा ? ।। ' विठोबाच्या आठवणीने खरे म्हणजे देहभाव उरू नये, पण येथे तर प्रत्येक वारीचा मूर्तिमंत अहंकार ! पण या शहाण्याचा काय उपयोग ? 'उदंड शहाणे होती तर्कवंत । परि नेणवेचि अंत विठोबाचा ' आणि विठोबाचे मर्म न जाणणारे तुकोबाना कुठून खपणार ?

## नाना प्रकारचे धर्मठक

समाजाला नाडणार अनेक धर्मठक होते गोसावी देवऋषी, मांत्रिक, भविष्यवादी, विद्याभिमानी मौनी, कर्मी, वितंडवादी, सन्यासी, जपी, तापसी, जोगी आदित्याई मानी, लोभी, भिक्षेकरी, मायपंथी जंगम, सिद्ध, मल्लंगफकीर, दावल्मलिक, मानभाव, दास इत्यादी अनेक भोंद साधू आणि

बैरागी समाजास तापदायक होत होते यातील कित्येकाची मूळ स्थाने फार थोर असतील पण पथात शिरणाऱ्या अनेक भणग व स्वार्थी लोकानी धर्मविचाराचा बाजार केला, त्यात अनाचार आणले, ‘ रागोळिया चौक शृगारूनी बोजा । आवरण पूजा यत्र करी ’ अशा भक्ताच्या आचाराचा उल्लेख करून तुकोबानी म्हटले आहे, ‘शुद्ध परमार्थ बुडविला तेणें । गुरुत्व भूषणें मग भोगी ॥’ अशा या वामाचारी मार्गाने जाणाऱ्या माणसाबद्दल चीड येऊन बुवानी म्हटले, ‘ शाक्त नघडा जमे देशीं । तेथें राशी पापाच्या ॥ मद्यभक्षण मागिणजाती । विटाळ चित्तीं साठविला ’ या शाक्तानी अधर्माची वाढ केली, अनाचार माजविला, रामराम म्हणायचे सोडून दोम दोम म्हणणाऱ्या ब्राह्मणाना पाहून तुकोबाना राग आला आहे ‘कौडीकौडीसाठी फोडिताती शिर । काढूनि रुधिर मलग ते ’ अशी मलगफकीराची वाट त्यानी लाविली आहे घरोघरी जाऊन शख वाजविणारे जगम कसे होते ? तर ‘शिवाचे निर्माल्य तीर्थें न सेविती । घटा वाजविती पोटासाठीं ॥’ अशा शिवभक्तानी पोटासाठी व्यापारच माडलेला होता. नाथपथी लोक ‘घालोनिया फेरा मागती द्रव्यासी । परि शकरासी नोळखिती ॥ ’ अल्पज्ञान असूनही अगात मोठा ताठा उभारणारे जोगी तुकोबाना नको होते भगवी वस्त्रे आणि लाब दाढीजटा वाढविणारे गोसावी तर सर्वत्रच हिंडत होते. ‘जगीं कीर्ति व्हावी । म्हणोनि जालासी गोसावी ॥’ पण जर ‘चित्तीं नाहीं अनुताप । लटिके भगवे स्वरूप ’ याची जाणीव त्यानी गोसाव्यास वारवार करून दिली आहे ‘टिळा टोपी उच दावी ॥ जगीं मी एक गोसावी ’ असे म्हणून लोकाना फसविणाऱ्या गोसाव्यास त्यानी सागितले आहे, ‘ अवघा वरपग सारा । पोटीं विषयाचा थारा ॥ मुद्रा लाविती कोरोनी । मान व्हाव-यासी जनीं । तुका म्हणे ऐसे किती । नरका गेले पुढे जाती ’ लावलाब जटा वाढवतात, अगभर विभूतिलेपन करतात, पण त्याचे सारे लक्ष मिष्टान्नाकडे असते भगव्या वेषानें जर भगवत भेटणार असेल तर कुत्र्याचा रगही तोच असतो की ! कोल्हयाला जटा असतातच, उंदीरघुशी भूमीच्या विवरातूनच राहातात, उगाच देहाला दड देणें काय कामाचे ? डोक्याला केस वाढवून अगात भुते आणण्याचा उद्योग करणारे देवऋषी सत कसले ? गुडगुडीची नळी सतत ताडी घरून साधना करणारे लोकाना कसला सन्मार्ग दाखविणार ? शकुन व भूतभविष्य सागणाऱ्या लोकाचा तर तुकोबाना फारच कटाळा होता

अशा या ढोंगी साधुसतानी व भोंदू गुरूनी समाज पोखरून गेला होता खऱ्या धर्माचे व देवाचे मर्म विसरला होता एका विठ्ठलास विसरून इतर क्षुद्र दैवतावर त्याची निष्ठा स्वार्थापायी जडत होती. ‘ अगीं कचडे घाली गळां । परडी कळाहीन हातीं । गळां गाठा हिंडे द्वारीं । मनुष्य परी कुतरीं तीं ’ अशाच्या नादी लागून देव भेटणार कसा ? ‘हरिहर सांडूनि देव । धरिती भाव क्षुल्लकीं ’ आणि ही क्षुल्लक दैवते कोणती ? तर जोखाई, जाखाई, मायराणी, मेसावाई, याचा उल्लेख करून बुवांनी सागितले आहे, ‘ बळिया माझा पढरीराव । जो हृपा देवांचाहि देव ’ रडी, चडी, बहिरव, खडेराव, गणोबा, मुजा, म्हैसासुर, वेताळे, फेताळे याच्यापेक्षा तुकाराम महाराजाना रखुमाईचा पती श्रेष्ठ वाटत होता. त्याची उपासना सर्वत्र दृढ व्हावी असा त्याचा प्रयत्न होता

**असा हा प्रपच**

समाजाला मार्गदर्शन करणारे ब्राह्मण, पडित, पुराणिक, कथेकरी, सत इत्यादीची ही अवस्था असल्यावर मग समाजाचे वा त्यातील व्यक्तीचे काय वर्णन करावे ? समाज किती खालावलेला होता हे आपण पाहिले आहे आता व्यक्तीच्या कुटुबाची, व्यवसायाची थोडी आळख करून घेऊ ब्रह्म-चितनात रगून गेलेल्या तुकोबानी सर्वसामान्य प्रापचिकाची जी शब्दचित्रे रगविली आहेत ती त्याच्या खालावलेल्या वा भलत्याच मार्गास लागलेल्या ससाराची यथार्थपणे कल्पना देणारी आहेत या सांसा-रिकाना केवळ बायकामुले, केवळ पैसा, केवळ सत्ता, केवळ भोग यांचाच ध्यास लागलेला होता त्या-वेळच्या सर्वसामान्य माणसाचे एक चित्र बुवानी चितारले आहे–

सोईऱ्यासी करी पाहुणेर वरा । काढितो ठोवरा सतालागी ॥ १ ॥
गाईसी देखोनि बदबदा मारी । घोडयाची चाकरी गोड वाटे ॥ २ ॥
पान फूल नेतो वेश्येसी उदड । ब्राह्मणासी खाड देऊ नेदी ॥ ३ ॥
पर्वकाळ धर्म न करी ना सरी । वेची राजद्वारी उदडचि ॥ ४ ॥
कीर्तना जावया होतसे हिंपुटी । खेळतो सोकटी रात्रदिस ॥ ५ ॥
बाइलेच्या गोता आवडीनें पोसी । मातापितयासी दवडीतो ॥ ६ ॥
तुका म्हणे त्याच्या थुका तोडावरी । जातो यमपुरी भोगावया ॥ ७ ॥

असा ससार तुकोबाना कसा मान्य होणार ? देवाला चागले वस्त्र मिळणे कठीण. पण ' स्त्रियेसी पाठवी उच साडी ' गाय पाळण्याचा विचार कधी त्याच्या मनात येत नाही, पण धन्याच्या ' अश्वासी खरारा करी अगें, ' हा मनुष्य कधी साधुसताचे पाय धूत नाही, पण स्वत च्या मुलाचे ढुगण मात्र स्वत धूत बसतो अशा माणसास रागावून बुवा म्हणतात, ' तुका म्हणे त्याच्या तोंडावरी थुंका । जातो यमलोका भोगावया ' याला देवाचे सगुणचरित्र कधी गोड वाटत नाही, पण ' विनोदार्थ कथा गोड वाटे ' नकला व जावईबापूच्या गोष्टी असणारी कथा याला पसत असते. अशा वेळी हा ' हातावरी हात हासोनी आफळी । वाजविता टाळी लाज वाटे ' याच्या वागणुकीचा अर्थच कधी समजत नाही ' दगडाच्या देवा वगाड नवस । बाईल कथेस जाऊ नेदी ' हा मनुष्य पैसा खर्च करून स्मशानात थडगे उभारील, पण दारात तुळशीचे वृदावन कधी बाधणार नाही. जवळचे धन चोरानी नेले तरी चालेल, पण ब्राह्मणाच्या हातावर कधी एक पैसाही तो ठेवणार नाही. व्याही माणसाचा पाहुणचार चागला करील, पण अतिथी दारात पाहाताच पाठ वळवील. हा मनुष्य ' देवब्राह्मणासी जाईना शरण । दासीचे चरण वदी भावें ' याची इतर वागणूकही लक्षात ठेवण्यासारखी असते. ' संत देखोनिया स्वयें दृष्टी टाळी । आदरें न्याहाळी परस्त्रीसी ॥ वीट ये कर्णासी सतवाक्यामृता । स्त्रीशब्द ऐकतां निवे कर्ण ॥ कथेमाजीं नीज वाढे निरयक्षणीं । स्त्रियेचे कीर्तनीं प्रेमें जागे ' ससारलपट अशा माणसाची आणखी कितीतरी वर्णनें बुवानी अभगातून केली आहेत, असा एक मासलेवाईक अभग पाहा—

उरा लावी ऊर आळगिता कांता । सतासी भेटता अग चोरी ॥
अतीत देखोनि होय पाठमोरा । व्याह्यासी सामोरा जाय वेगीं ॥
द्विजा नमस्कारा मनी भाव कैचा । तुर्काच्या दासीचा लेक होय ॥
तुका म्हणे तुम्ही क्रोधासी न यावें । स्वभावा करावें काय कोण ? ॥

### आणि ही पतिपत्नींची कुजबूज

तुकारामबुवानी स्वत चा प्रपच मन लावून केला नाही, हे तर प्रसिद्धच आहे परतु ससारातील सारी रहस्ये त्याना माहीत होती पतिपत्नीची कुजबूज कोणत्या बाबतीत होऊ शकते हे त्याना अवगत होते घरोघरी चालतेल्या खाजगी सवादास बुवानी एका ठिकाणी प्रकट रूप देऊन सासारिक लोक केवळ कामाने—केवळ लोभाने कसे वाहात चालले आहेत, यासबधी फार चांगले दिग्दर्शन केले आहे.

एक पत्नी आपल्या घरची कहाणी पतीस सागत आहे.

भ्रतारासी भार्या बोले गुजगोष्टी । मज ऐसी कष्टी नाही दुजी ॥ १ ॥
अराड तुमचे धद्यावरी मन । माझें तो हेळण करिती सर्व ॥ २ ॥
जोडितसा तुम्ही साती चोरेपारे । माझी तव पोरें हळहळती ॥ ३ ॥

तुमची व्याली माझे डोई ही पेटली । सदा दुष्ट बोली सोसवेना ॥ ४ ॥
दुष्ट वृत्ती नदुली सदा द्वेष करी । नादो मी ससारी कोण्या सुखे ? ॥ ५ ॥
जावा दीर काही घडही न बोले । नादो कोण्या खाले कैची आता ? ॥ ६ ॥
माझ्या अगसगें तुम्हासी विश्राति । मग घड गति नाही तुमची ॥ ७ ॥
ठावते ठमकते जीव मुठी धरूनी । परि तुम्ही अजुनी न धरा लाज ॥ ८ ॥
वेगळे निघता ससार करीन । नाही तरी प्राण देते आता ॥ ९ ॥
तुका म्हणे जाला कामाचा अकित । सागे मनोगत तैसा वर्ते ॥ १० ॥

यावर पतीने बायकोची समजूत काढण्यासाठी म्हटले-

कामाचा अकित कातेते प्रार्थित । तू का हो दुश्चित निरतर ? ॥ १ ॥
माझी मायबापे वधु हो बहिण । तुज करी सीण त्यागीन मी ॥ २ ॥
त्याचे जरी तोड पाहेन मागुता । तरि मग हत्या घडो तुझी ॥ ३ ॥
सकाळ उठोन वेगळा निघेन । वाहतो तुझी आण निश्चयेसी ॥ ४ ॥
वेगळें निघता घडीन दोरे चुडा । तू तव माझा जोडा जन्माचा की ॥ ५ ॥
ताईत साकळी गळयाची दुल्लडी । बाजुबदजोडी हात सर ॥ ६ ॥
वेणीचे ते नग सर्वही करीन । धरू नको सीण मनी काही ॥ ७ ॥
नेसावया साडी सेलारी चुनडी । अगीची काचोळी जाळीया फुले ॥ ८ ॥
तुका म्हणे केला राडने गाढव । मनासवे धाव घेतलीसे ॥ ९ ॥

'जन गोवियेले मायेकरून'

वयात आलेल्या तरुण पत्नीच्या व पतीच्या मनातील ही ओढ प्रसगी समजण्यासारखी आहे, पण म्हातारपण आल्यावर तरी ससाराचा लोभ कमी व्हावा ना ? म्हातारपणी देहाची कोण विटबना होते ! 'दात दाढा पडिल्या ओस । हनुवटि भेटे नाकास ॥ हात पाय राहिले कान । नेत्रा पाझर हाले कान ॥ अगकांति परतली । चिरगुटा ऐसी जाली ॥' पण ससाराचा लोभ कधी कमी होत नसतो श्रीहरीचे स्मरण करावे असे कधी वाटत नाही काशीयात्रेस निघालेल्या एका म्हाताऱ्या माणसाचे ससार-प्रेम तुकाराम महाराजानी एका अभगात फार चागले रगविले आहे धान्याची पेवें मुलानी फोडू नयेत, 'भिकाऱ्याला काही घालू नये,' सागाल जेवाया ब्राह्मण । तरी कापाल माझी मान ॥ तुम्ही खावें ताक पाणी । जतन करा तूप लोणी ॥' म्हणून ससाराची चिता वाहाणाऱ्या नष्ट माणसास बुवानी बोल दिला आहे असाच एका म्हाताऱ्या व लोभी बाईचे शब्दचित्रही प्रसिद्ध आहे पढरपुरास निघालेली ही भय-'कर बाई वेशीवरूनच परत येऊन म्हणते,

परिसे गे सुनेबाई । नको वेचू दूध दही ॥ १ ॥
आवा चालली पढरपुरा । वेसीपासुनी आली घरा ॥ २ ॥
ऐके गोष्टी सादर बाळे । करी जतन फुटके पाळें ॥ ३ ॥
माझे हातीचा वळवडू । मजवाचुनि नको फोडू ॥ ४ ॥
वळवट क्षीराचे लिपन । नको फोडू मजवाचून ॥ ५ ॥
उखळ मुसळ जाते । माझें मन गुतल तथें ॥ ६ ॥
भिक्षुक आल्या घरा । साग गेली पढरपुरा ॥ ७ ॥

भक्षी परिमित आहारू । नको फारसी वरो सारू ॥ ८ ॥
सून म्हणे बहुत निके । तुम्ही यात्रेसी जावे सुखें ॥ ९ ॥
सासूबाई स्वहित जोडा । सर्व मागील आशा सोडा ॥ १० ॥
सूनमुखीचे वचन कानी । ऐकोनि सासू विवची मनी ॥ ११ ॥
सवतीचे चाळे खोटे । म्या जावेसे इला वाटें ॥ १२ ॥
आता कासया यात्रे जाऊ । काय जाऊनि तेथें पाहू ? ॥ १३ ॥
मुले लेकरे घरदार । येथेंचि माझें पढरपुर ॥ १४ ॥
तुका म्हणे ऐसे जन । गोवियेले मायेकरून ॥ १५ ॥

अशा प्रकारच्या मायेत सापडलेल्या ससारिकाना खरा मार्ग दाखविण्याचे काम तुकाराम-बुवांना करायचे होते ढोंगदभ, अनाचार, भोंदुगिरी, हीन दैवते, जादुटोणा, मत्रतत्र, जडीबुटी, अगारा-धुपारा, नवससायास, कर्मकाड, जपतप, योगयाग इत्यादी जजाळातून समाज मुक्त कसा होईल याची चिंता त्याना होती 'जन तरी देखें गुतलें प्रपंचें । स्मरण तें त्याचें त्यासी नाहीं । म्हणऊनि मागें परतलें मन ।' असे तुकाराम महाराजानी म्हटले आहे पाखाडी लोकापासून लोकाचे रक्षण करण्यासाठी तुकोबाचा अवतार होता यासाठी स्वत कडे गुरुत्व न घेता कीर्तनभक्तीच्या द्वारे त्यानी दभस्फोट करून ढोंगाचा नाश केला 'भुकू नका भुकू नका । आला तुका विष्णुदास' अशी गर्जना त्याची असे 'गाढवाचें घोडें । आम्हो करू दृष्टीपुढें' असा त्याचा आत्मविश्वास होता 'शिकवणेसाठी वाटते तळमळ' अशी त्याच्या मनाची व्यथा असल्याने त्यानी लोकाच्या व्यवहाराची व प्रपचाची माडणी नीटपणे करण्याचा प्रयत्न केला

## 'नाहीं जातीसवे काम'

पापाडखडणाबरोबर धर्माचे पाळणही तुकोबाना अभिप्रेत होते यासाठी एक प्रमुख गोष्ट त्यानी केली, ती अशी की, नामसकीर्तनाचा सोपा भक्तिमार्ग बलिष्ठ केला नाना साधने, नाना कर्मकाड नाना मतातरे, नाना तीर्थव्रते, नाना जपतपादी साधने याच्या जजाळातून लोकाना मुक्त करून अत -करणाच्या शुद्ध उपासनेचा एक नवा लोकधर्म जो ज्ञानेश्वरानी प्रवर्तित केला होता त्याचा त्यानी पुनरुद्धार केला यासाठी पूर्वपरपरेने आलेल्या जन्मजात जातिभेदास त्यानी थारा दिलेला नाही, वर्णाच्या वा जातीच्या अभिमानाने कोण ब्राह्मण झाल ? म्हणून त्यानी प्रश्न विचारलेला आहे 'अत्यजादि योनि तरल्या हरिभजनें । तयाची पुराणें भाट जालीं' म्हणून त्यानी निर्वाळा दिलेला आहे. 'यातायाती धर्म नाही विष्णुदासा' असा वेदशास्त्राच्या आधारानेच त्याचा उपदेश आहे 'तुका म्हणे नाहीं जातीसवें काम । ज्याचे मुखीं नाम तोचि धन्य' असा या वचनीत त्याचा निष्कर्ष आहे इतकेच नव्हे तर पूर्वी काही पाप हातून झाली तरी अनुतापाच्या योगे त्यातून मुक्तता भक्तामुळ मिळते, या भागवत धर्माच्या तत्त्वास त्याना पुष्टी दिली 'न व्हावीं तों झालीं कर्मे नरनारी । अनुतापें हरी स्मरतां मुक्त ॥ तुका म्हणे पूर्व नाठवी श्रीहरी । मूळ जो उच्चारी नक त्यासी' असं सागून हरिभक्ताच्या पूर्ववृत्ताची चौकशी करण्याची जरुरी नसल्याचे त्यानी सांगितले आहे

## 'जाती कुळ नाहीं तयासी प्रमाण'

ज्याला हरिकीर्तन आवडत नाही, वैष्णवांचे नर्तन आवडत नाही, त्याला ब्राह्मण मानायला बुवा तयार नाहीत उलट ज्याच्या मुखात रामकृष्णाचे नाम आहे तो 'ब्राह्मण तो याती अत्यज असतां । मानावा तत्वतां निश्चयेंसी' असा निर्णय त्यानी दिलेला आहे हरिभक्ताची जात कुणी विचारू नये असा एक संकेत भागवत धर्मात दृढ झाला कृष्णमय वृत्ती ज्याची बनली आहे अशा गोपींविषयी

तुकोबांनी म्हटले आहे, ' विसरल्या आम्ही कोणीये जातीच्या । वर्णही चहूंच्या एक जाल्या ' या अशा स्थितीत ' वर्ण याती काज न धरिती ' हाच विचार रूढ झाला. ' जिहीं म्हणविलें हरिचे अंकित । जातीचे ते होत कोणी तरी ।। जाती कुळ नाहीं तयासी प्रमाण । अनन्या अनन्य तुका म्हणे ' पंढरपुरच्या वाळवंटात सर्व भेदभाव नाहीसे होतात. ' भावना भेदाची जाय उठाउठी । तुका म्हणे भेटी गोविंदाचे ' एकदा ही वृत्ती दृढ झाली की मग ' महारासी सिवे कोपे ब्राह्मण तो नव्हे ' या ओळीचा अर्थ सहज ध्यानात येण्यासारखा आहे. ' जातीचा ब्राह्मण न करितां संध्यास्नान । तो एक नांवाचा ब्राह्मण । होय हीनाहूनी हीन ' असा स्पष्टपणे निर्वाळा बुवांनी दिलेला आहे. उलट ' वैष्णव चांडाळ धन्य त्याची माता । शुद्ध उभयतां कुळ याती ' असाच निर्धार त्याचा आहे. तुकोबाच्या मताने थोर जाती कोणती ? ' उत्तम त्या याती । देवा शरण अनन्य गातीं । '

## ' जातीं व्यक्ति पडे बिंदुलें '

तुकाराम महाराजांच्या जातिविचाराचे मूळ आणखी मागे नेता येण्यासारखे आहे. चातुर्वर्ण्याची बंदिस्त चौकट भक्तीच्या, परमार्थाच्या क्षेत्रात प्रथम सैल केली ती भगवद्गीतेने. ' मां हि पार्थ व्यपाश्रित्य येऽपि स्युः पापयोनयः । स्त्रियो वैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यान्ति परांगतिम् '—पार्था, माझा आश्रय करून स्त्रिया, वैश्य व शूद्र किंवा अंत्यजादी जे पापयोनी असतील ते देखील परमपदाच्या गतीस जातात. गीतेच्या या घोषणेमुळे दुराचारी, पापी व हीनयातीमधील लोक यांना अनुतापाच्या साह्याने परमेश्वराच्या दरबाराची वाट खुली झाली. भक्तीच्या क्षेत्रात वा परमार्थविचारात हा उंच, हा नीच, हा वरिष्ठ, हा कनिष्ठ; हा शुद्ध, हा चांडाळ असा भेद कमी होत गेला. भगवद्गीतेने दिलेल्या या सवलतीचा विस्तार ज्ञानेश्वर महाराजांनी केला. ' म्हणौनि कुळ उत्तम नोहावें । जाती अंत्यजही व्हावें । परिदेहाचें नि नांवें । पशूचेंही लाभो ' उत्तम कूळ नसले तरी चालेल, जन्माने अंत्यज असला म्हणून काही हरकत नाही, देह पशूचा असला म्हणून काय झाले ? एक चित्त ईश्वराशी जडले की माणसामाणसांत समानता निर्माण व्हावी, हाच विचार आणखी पुढे नेऊन श्रीज्ञेश्वरांनी म्हटले आहे, ' अगा नावें घेतां वोखटीं । जें आधवेया अधमांचिये शेवटीं । तिये पापयोनींही किरीटी । जन्मले गा ।। ते पापयोनी मूढ । मूर्ख ऐसे जे दगड । परि माझे ठायीं दृढ । सर्वभावें ।।... म्हणोनि जाति कुळ वर्ण । हें आघवेंचि गा अकारण । एथ अर्जुना माझेंपण । सार्थक एक ... तैसे क्षत्री वैश्य स्त्रिया । कां शूद्र अंत्यजादि इया । जाती तंवचि वेगळालिया । जंव न पवती मातें ' मला जोपर्यंत मिळालेल्या नाहीत तोपर्यंत जाती उरतात; मला मिळाल्यानंतर मग ' जातीं व्यक्ति पडे बिंदुलें ' अशी अवस्था होऊन जाते. सागरात जसे लवणकण मिळावेत, तशा व्यक्ती व जाती ईश्वरस्वरूपात मिळून जातात.

ज्ञानेशांच्या भाग्याचे स्वरूप असे की, त्यांनी जो जातिविचार प्रसृत केला त्याचे फलित रूप त्यांना त्यांच्या थोडक्या आयुष्यातही पहावयास मिळाले. प्रत्येक जातीत एकएक संत निर्माण होऊन पंढरपुरचा विठ्ठल लेकुरवाळा बनला. चोखा महाराच्या अभंगात हीन यातीविरुद्धच्या तक्रारी आजही हृदयद्रावक अशा आहेत. एका बिंदूपासून विश्वरचना झाली असेल तर मग उंचनीच हा भेद कुठून आला ? एकाच बीजाचा जर हा विस्तार, एकाच भांगाराचे, सुवर्णाचे जर हे अलंकार, एकाच सागरावरील जर या लहरी; तर मग त्यांच्यात एवढी तफावत कशी संभवते ? बीजाचे गुणधर्म फळात, कारणाचे गुणधर्म कार्यात येतात ना ? असे एक विशाळाचे तत्त्वज्ञानच चोखोबांनी निर्माण केले आहे. पुढे एकनाथांनी तर प्रत्यक्ष व्यवहारातही हा विचार प्रसृत केल्याच्या अनेक कथा प्रसिद्ध आहेत. विचारांची हीच परंपरा तुकोबांनी चालविली. त्यांची शिष्या बहिणाबाईनेही या विचाराचा विस्तार करून ' ब्रह्म जाणे तोचि ब्राह्मण ' असा निर्वाळा दिला आहे.

## ‘सुखाचें ओतलें । दिसे श्रीमुख चांगलें’

यांप्रमाणे तुकाराम महाराजांच्या धर्माच्या पालनात व पापाडखंडणात जातिविचाराला महत्त्वाचे स्थान होते भेदाभेद अमंगळ असून सर्व जग विष्णुमय असल्याची त्यांची शिकवण होती सर्वांभूती भगवद्भाव हे त्यांचे सूत्र होते या सूत्राभोवती चित्तशुद्धीवर आधारलेल्या भागवतधर्माची उभारणी ज्ञानेश्वर-एकनाथांनी जी केली होती तिचाच परितोष तुकारामांनी केला या धर्मपालनात जन्मजात जातिभेदास थारा नव्हता. कर्मकांडास महत्त्व नव्हते यज्ञयाग, तीर्थस्नान, उपासतापास, खडतर व्रतेवैकल्ये, योगादी क्रियांतील देहदंडन इत्यादींना स्थान नसल्यामुळे सोवळओवळयात गुरफटलेले कर्मकांडही उरलेले नव्हते सर्व जातीच्या लोकांना एकाच पांडुरंगाची उपासना या पंथाने प्रवर्तित केली पुंडलीक महामुनीने चंद्रभागेच्या तीरावर पंढरपूर येथ ज्या विठ्ठलाची स्थापना केली तो त्यांचा देव बनला या विठ्ठलाशिवाय अन्य दैवत वारकरी पंथाने मानले नाही हाच विष्णू, हाच शिव, हाच बालकृष्ण हेच संतांच्या सर्वसुखाचे आगर होय याचे रूप त्यांना अनुपम्य वाटते ‘पांडुरंगकांती दिव्य तेज झळकती । रत्नकीळा फाकती प्रभा । अगणित लावण्य तेज पुंजाळलें । न वर्णवे तेथीची शोभा’ अशा थाटात संतांनी या विठ्ठलाचे मनापासून वर्णन केले आहे हा श्यामसुंदर, हा पीतांबरधारी विटेवर उभा असून त्याचे ‘समचरण सुंदर’ सर्वांनाच कौतुकाचा विषय बनून राहिले आहेत. याचे ‘नेत्र विशाळ भाळ दंत हिरया ज्योती’ प्रमाणे असून भक्तांना तो मदनमूर्तीप्रमाणे वाटतो ‘पाय जोडूनि विटेवरी । कर ठेउनी कटावरी ॥ रूप सावळें सुंदर । कानीं कुंडलें मकराकार ॥ गळां माळ वैजयंती ॥ पुढें गोपाळ नाचती’ अशा रूपाने जनाबाईस वेध लागला होता तुकाराम महाराज तर याच्या रूपावर एकदम लुब्ध झालेले होते ‘सुखाचें ओतले । दिसे श्रीमुख चांगलें,’ ‘सुंदर तें ध्यान उभें विटेवरी । कर कटावरी ठेवूनिया’, ‘रूपीं गुंतलें लोचन । पायीं स्थिरावलें मन ॥ देहभाव हारपला । तुज पाहातां विठ्ठला’, ‘राजस सुकुमार मदनाचा पुतळा । रविशशिकळा लोपलिया’ अशा भाषेत तुकारामांनी विठ्ठलाचे वर्णन केले आहे हा पांडुरंग म्हणजे त्यांना ‘भागल्याचें तारू शिणल्याची साउली । भुकेलिया घाली प्रेमपान्हा’ असा वाटतो हा भक्तांचा विसावा असून त्याच्या हातात प्रेमाचे भातुके आहे ‘विठ्ठल आमुचा निजाचा । सज्जन सोयरा जीवाचा ॥ मायबाप चुलता बंधु । अवघा तुजशी संबंधु’ अशी श्रद्धा तुकोबाची याच्याविषयी आहे त्यांचे सर्वस्व म्हणजे विठ्ठलच होय

> विठ्ठल माझा जीव विठ्ठल माझा भाव । कुळधर्म देव विठ्ठल माझा ॥ १ ॥
> विठ्ठल माझा गुरू विठ्ठल माझा तारू । उतरील पारू भवनदीचा ॥ २ ॥
> विठ्ठल माझी माता विठ्ठल माझा पिता । विठ्ठल चुलता बहिणी बंधू ॥ ३ ॥
> विठ्ठल हे जन विठ्ठल माझे मन । सोयरा सज्जन विठ्ठल माझा ॥ ४ ॥
> तुका म्हणे माझा विठ्ठल विसावा । नश्वरित गावा जाईन त्याच्या ॥ ५ ॥

माहेर। अनंत रूपाचें हें सार। ' वाटतें त्यांना यापुढे वैकुंठाची पर्वा नाही ' सर्व सुखरासी भीमरेचे तीरीं। आमुची पंढरी कामधेनु ॥ प्रेमामृत दुभे सदा संतजना। वोसंडतो पान्हा नित्य नवा ' म्हणून नामदेवांनी या पंढरपुरचे माहात्म्य वर्णन केले आहे या पंढरपुरचे केवढे कौतुक त्यांच्या मनात होते पाहा–

> आधी रचिली पंढरी। मग वैकुंठ नगरी ॥ १ ॥
> जेव्हा नव्हते चराचर। तेव्हा होते पंढरपुर ॥ २ ॥
> जेव्हा नव्हती गोदागंगा। तेव्हा होती चंद्रभागा ॥ ३ ॥
> चंद्रभागेच्या तटी। धन्य पंढरी गोमटी ॥ ४ ॥
> नासिलिया भूमंडळ। उरे पंढरीमंडळ ॥ ५ ॥
> असे सुदर्शनावरी। म्हणूनि अविनाश पंढरी ॥ ६ ॥
> नामा म्हणे वा श्रीहरी। ते म्यां पंढरी देखिली ॥ ७ ॥

तुकोबानाही याच पंढरीच्या वारीची ओढ मनास सतत असे ' होय होय वारकरी। पाहे पाहे रे पंढरी ' असा त्यांचा ध्यास होता ' चला पंढरीस जाऊं। रखुमादेवीवरा पाहू ' ही त्यांची एकमेव भूक होय ' पंढरीस जा रे आलेनो संसारा। दीनाचा सोयरा पांडुरंग ' अशी त्यांची हाक होती. ' पंढरीस दुःख न मिळे ओखदा। प्रेमसुख सदा सर्वकाळ ' अशी त्यांची श्रद्धा होती याच पंढरपुरचे वारकरी खरे मोक्षाचे अधिकारी आहेत असे त्यांना वाटे ' आमुची मिरास पंढरी। आमुचे घर भीमातीरीं,' ' होईन भिकारी। पंढरीचा वारकरी , ' धन्य झालों हो संसारीं। आम्ही देखिली पंढरी ', ' पावलों पंढरी वैकुंठभुवन। धन्य आजि दिन सोनियाचा ' अशा वचनांनी तुकोबांनी पंढरपुरचा अनेकदा गौरव केला आहे

## ' नाम पावन पावन '

पंढरपूर व तेथील विठुराय यांच्या भोवती भागवत धर्माच्या प्रसाराचे एक नवे वलय निर्माण झाले होते एकादशी, सोमवार हे उपवास, गळ्यात तुळशीमाळ, ज्ञानेश्वरी एकनाथी भागवताचे वाचन, शुद्ध आचरण, मुखामध्ये रामकृष्णहरी हा मंत्र, आणि भजनकीर्तनाविषयी मनापासून आवड हे या धर्मपंथाचे स्थूल स्वरूप होते कलियुगात नामस्मरणासारखा सोपा मार्ग दुसरा त्यांना वाटला नाही. ' तत्त्वमस्यादि महावाक्य उपदेश। नामाचा अधोरा नाहीं तेथें ' अशी वचुली श्रीज्ञानेश्वरांनी दिलेली आहे ' शास्त्रांचें जें सार वेदांचे गव्हर। उतराया पार आणिक नाहीं ॥ विठ्ठल विठ्ठल म्हणा उघडा मंत्र जाणा। कळिकाळ अकणा होईल तुम्हां ॥ ' अशी श्रद्धा नामाविषयी नामदेवांची होती हेच सर्व वेदांचे व उपनिषदांचे सार होय तुकाराम महाराजांनी तर ' समुद्रवलयांकित पृथ्वीचे दान। करितां समान नये नामा ' म्हणून नामाची महती वर्णन केली आहे 'नाम पावन पावन। त्याहूनि पवित्र आहे कोण ?' म्हणून त्यांनी प्रश्न विचारलेला आहे इतर साधनामध्ये व नामस्मरणामध्ये कोणता फरक आहे हे सांगताना त्यांनी म्हटले आहे–

> मंत्र चळे पिसे लागते सत्वर। अबद्ध ते फार तरले नामें ॥ १ ॥
> अशौच तो बाधी आणिक अक्षरा। नाम निंदसुरा घेत तरे ॥ २ ॥
> राग ज्ञान घात चुकतां होय वेळ। नाम सर्वकाळ शुभदायक ॥ ३ ॥
> अणिका भजना बोलिला निषेध। नाम ते अभेद सकळां मुखीं ॥ ४ ॥
> तुका म्हणे तपे घालिती घासणी। वेश्या उद्धरूनि गेली नामें ॥ ५ ॥

असे हें नाम सर्व साधनाचे साधन आहे 'मुखीं नाम हातीं मोक्ष। ऐसी साक्ष बहुतांची' असल्याने आबालवृद्धानाही हे सुलभ आहे रोज रामकृष्ण मुरारी हा मत्र म्हटल्यानें इतर काही करण्याची जरूरी नाही. सर्व सिद्धीचे हेच एक साधन आहे 'उपास पारणें न लगे वनसेवन। न लगे धूम्रपान पचाग्नितापण' अशी या नामाची महती आहे 'नाम घता न लगे मोल। नाममत्र नाहीं खोल' असा नामाचा महिमा असल्याने तुकाराम महाराजानी सर्वांनाच समत्वाने उपदेश केला आहे

नामसकीर्तन साधन पैं सोपें। जळतील पापें जन्मातरीची ॥ १ ॥
न लगती सायास जावे वनातरा। सुखें येतो घरा नारायण ॥ २ ॥
ठायीच बैसोनि करा एकचित्त। आवडी अनत आळवावा ॥ ३ ॥
रामकृष्ण हरि विठ्ठल केशवा। मत्र हा जपावा सर्वकाळ ॥ ४ ॥
याविण आणिक नाही पैं साधन। वाहतसे आण विठोबाची ॥ ५ ॥
तुका म्हणे सोपें आहे सर्वांहुनि। शहाणा तो धणी घेतो येथें ॥ ६ ॥

## 'ऐसा या कीर्तनीं ब्रह्मरस'

याच हरिनामाबरोबर कीर्तनभक्तीची प्रीती साधुसतानी समाजास लावली या कीर्तनाच्या मर्यादा सतानी पुन पुन सांगितल्या आहेत कीर्तनकार व श्रोते याचे गुणावगुण पुन पुन विवरण करून सांगितले आहेत ईश्वराशी त्वरित तादात्म्य कीर्तनात होत असून हे अतिशय सुलभ व सोपे साधन असल्याचा विश्वास सताचा आहे 'अवीट हे क्षीर हरिकथा माउली। सेविता सेविली वैष्णवजनीं ॥ अमृत राहिलें लाजोनी माघारें। येणें रसें थोरें ब्रह्मानदें' याच हरिकीर्तनात पतीत व पातकी पावन होऊन गेले आहेत याच कीर्तनात सर्व सुखे मोहोरून येतात येथेच पाडुरग आपले निर्गुणनिराकार रूप सोडून थयथय नाचत असतात कारण 'कीर्तनाच्या सुखें सुखी होय देव। पढरीचा राव सर्गी आहे' अशी अनुभूती सतांची आहे देव, भक्त आणि नाम असा त्रिवेणी सगम हरिकथेत असतो पवित्र हरिकथा जे ऐकतील त्याच्या पापाचे डोंगर जळून जातील, नारीनर शुद्ध होतील 'टाळ दिंडी हातीं घेऊनि नाचा' असा उपदेश तुकोबाचा आहे 'समाधिचें सुख सांडा ओवाळूनी। ऐसा या कीर्तनीं ब्रह्मरस' म्हणून त्यानी कीर्तनावरील आपला विश्वास प्रकट केला आहे 'साता दिवसाचा जरी झाला उपवासी। तरी कीर्तनासी टाकू नये ॥ फुटो हें मस्तक तुटो हें शरीर। नामाचा गजर सोडू नये' असा त्यांनी दृढभाव कीर्तनाबद्दल व्यक्त केला आहे जेथे कीर्तन चालले असते तेथे यमदूताना प्रवेश नसतो या कीर्तनभक्तीवर केवढा विश्वास तुकोबाचा होता। त्यानी एका ठिकाणी स्पष्टपणे म्हटले आहे—

घोटवीन लाळ ब्रह्मज्ञान्या हाती। मुक्ता आत्मस्थिती साडवीन ॥ १ ॥
ब्रह्मीभूत काया होतसे कीर्तनी। भाग्य तरी ऋणी देवा ऐसा ॥ २ ॥
तीर्थभ्रामकासी आणीन आळस। कडु स्वर्गवास करिन भोग ॥ ३ ॥
साडवीन तपोनिधा अभिमान। यज्ञ आणि दान लाजवीन ॥ ४ ॥
भक्तिभाग्यप्रेमा साधीन पुरुषार्थ। ब्रह्मीचा जो अर्थ निजठेवा ॥ ५ ॥
धन्य म्हणवीन इहलोकी लोका। भाग्यें आम्ही तुका देखियेला ॥ ६ ॥

## मोक्ष नको, वैकुंठ नको

नामसंकीर्तनात रगलेल्या भागवतधर्मीय सताना या सुखापुढे स्वर्ग तर नकोच नको रिद्धी-सिद्धींचा लाभ नको वैकुंठवास नको मोक्षही नको मुक्तिपदाची अभिलाषा धरून सतसगाची व रूपदर्शनाची गोडी टाकायची हे संताना पसत नाही 'क्षणी मुक्तिपद देसी पांडुरगा। मग या सतसगा

पाहू कोठे ?' म्हणून नामदेवानी व तुकोबानी प्रश्न केला आहे. ' गर्भवासा भीती ते आंधळे जन। मुक्तीसी कारण नाहीं आम्हां ' म्हणून एकनाथांनी मानवी जन्माची सार्थकता दाखवून दिली आहे ' भुक्तिमुक्तीचें सांकडें नाहीं विष्णुदासा । प्रपचाचीं आशा मा तेथें कैंची ? । वैकुंठ कैलास अमरपदें तिन्ही । तुच्छवत् मनीं मानिताती ' असा लोभ सगुण प्रेमाचा साधुसंताना आहे. ' मोक्षपदें तुच्छ केली या कारणें । आम्हां जन्म घेणें युगायुगीं ' अशा भाषेत तुकोबानी मानवी जन्माची महती सांगितली आहे. ' सांडुनि सुखाचा वाटा । मुक्ति मागे तो करंटा ' असे तुकोबानी म्हटले आहे. ' मोक्ष तुमचा वेवा । तुम्ही दुर्लभ तो ठेवा ॥ मज भक्तीची आवडी । नाहीं अंतरीं ते गोडी ', म्हणून तुकोबांनी पांडुरंगास विनविले आहे. ईश्वराची चरणसेवा नित्य घडावी म्हणून पुनः पुनः मानवी जन्माची मागणी त्यांची आहे.

## भागवतधर्माचे सार

नामसंकीर्तनावर भर देणाऱ्या या नव्या मानवधर्माची माडणी साधुसंतांनी करून समाजातील सर्व थरांतील लोकाना यात सामावून घेतले. जन्माचे सार्थक करण्यासाठी आता देहदंड नको, यज्ञयाग नको, कर्मकाड नको, उपासतापास नको, व्रतेवैकल्ये नकोत, तीर्थयात्रा नकोत. ' कां सांडिसी गृहाश्रम । कां सांडिसी क्रियाकर्म । कासया सांडिसी कुळींचे धर्म । आहे तें वर्म वेगळेंचि ' या अभंगात ज्ञानेश्वरांनी या नव्या पंथाचे रहस्य निवेदन केले आहे. भस्म उधळण, जटाभारू, उदास दिगंबरू इत्यादीचा आधार आता घेण्याची जरूरी नाही. ' जपतप अनुष्ठान । क्रियाकर्म यज्ञदान । कासया इंद्रिया बंधन । आहे तें निधान वेगळेंचि ' यज्ञयागात व योगियाच्या ध्यानात न येणारे रूप पंढरपुरास विटेवर उभे राहिलेले असंख्य भाविकांनी पाहिलेले आहे. अत्यंत सोप्या व सर्वसाधारण प्रापंचिकांना सहज सुलभ अशा या भक्तिमार्गात सहज आचरणात आणण्यासाठी नियमही सांगितले आहेत. परस्त्री मातेसमान मानावी, परद्रव्याची इच्छा धरू नये, परोपकार नित्य करीत जावा, असा संतांचा उपदेश आहे. या धर्मपंथाचे सार सांगताना तुकोबांनी म्हटले आहे,

> पुण्य परउपकार पाप तें परपीडा । आणिक नाही जोडा दुजा यासी ॥ १ ॥
> सत्य तोचि धर्म असत्य तें कर्म । आणिक हे वर्म नाही दुजें ॥ २ ॥
> गति तेंचि मुखी नामाचें स्मरण । अधोगति जाण विन्मुखता ॥ ३ ॥
> संतांचा संग तोचि स्वर्गवास । नर्क तो उदास अनर्गळ ॥ ४ ॥
> तुका म्हणे उघडे आहे हित घात । जयाचे उचित करा तैसें ॥ ५ ॥

याशिवाय दुसरा उपदेश आपणाजवळ नाही असे तुकोबानी म्हटले आहे. अन्नपाणी टाकून कुठे वनात रानात जायला नको. ' नको मुंको भोगी । नको पडो त्यागी । लावुनि सरे अंगीं देवाचिया । तुका म्हणे नको पुसो वेळोवेळा । उपदेश वेगळा उरला नाहीं ॥ ' सुखाने संसार करावा, पण संसार म्हणजे काय ? यावर चित्त असावे. मी संसार करतो, मी पैसा मिळवितो, मी खर्च करतो, असा भाव नसावा. ' जोडोनिया धन उत्तम व्यवहारें । उदास विचारें वेंच करी ' यातील मर्म हेच आहे. उत्तम मार्गाने प्रपंचात धन मिळवावे व निर्विकार, निरहंकारी वृत्तीने चागल्या ठिकाणी ते खर्च करावे. या अभंगात तुकोबांनी प्रापंचिकांना किती मार्मिक उपदेश केला आहे ! ' परउपकारी नेणें परनिंदा । परस्त्रिया सदा बहिणीमाया ॥ भूतदया गाई पशूंचें पालन । तान्हेल्या जीवन वनामाजीं ॥ शांतिरूपें नव्हे कोणाच्या वाईट । वाढवी महत्त्व वडिलांचें ॥ तुका म्हणे हेचि आश्रमाचें फळ । परमपद बळ वैराग्याचें ॥ '

## प्रापंचिकांना सुंदर बोध

एकदा भागवत धर्माचे रहस्य मनावर बिंबले की मग संसारातील व्यर्थ हावही कमी होईल. ' कोणाही जीवाचा न घडो मत्सर ' या सूत्रान्वये जीवन मंगलकारक होईल. हाव, सत्ता, स्पर्धा, हिंसा, लोभ, काम, इत्यादी विकाराच्या प्राबल्यामधून संघर्ष निर्माण होतात. नुसता स्वत:चा संसार, स्वत:ची बायकोमुले, स्वत:ची इस्टेट, स्वत:चा लाभ यापेक्षा दुसरे काही थोर व उत्तम मानवी जीवनात असू शकते, याची ओळख साधुसंतानी लोकाना करून दिलेली आहे. ' नका घालू दूध जयामध्यें सार। ताकाचे उपकार तरी करा ।। नेदा तरी हे हो नका देऊ अन्न । फुकाचें जीवन तरी पाजा ' एवढ्या-वरही त्याचे समाधान आहे. या वृत्तीमुळे दुसऱ्याचे दु:ख ओळखण्याची मानसिक ऐपत उपजते. ही उमज ज्याला आली आहे तो किती अल्पसंतुष्ट असतो ! ' पोटापुरतें काम । परि अगत्य तो राम ' अशी त्याची निष्ठा बनते. तो नारायणाला विनवून सांगतो,

> निर्वाहापुरतें अन्न अच्छादन । आश्रमासी स्थान कोंपी गुहा ।। १ ।।
> कोठेंही चित्तासी नसावे बंधन । हृदयीं नारायण साठवावा ।। २ ।।
> नये बोलो फार बैसो जनामधी । सावधान बुद्धी इंद्रियें दमी ।। ३ ।।
> तुका म्हणे घडी घडीनें साधावी । निर्गुणाची गोवी उगवूनि ।। ४ ।।

उपदेशाचा असा वर्षाव तुकाराम महाराजांनी मेघवृष्टीच्या न्यायानें सतत केलेला आहे. सर्व जगतास गुरुपदेश देण्याचा अधिकार असताना ' नेणे फुंकों कान । नाहीं एकान्तीं ज्ञान । कपट काही एक । नेणें भुलवायाचे लोक ।। तुमचे करितों कीर्तन । गातों उत्तम ते गुण ' अशी विनयाची वृत्ती त्यांनी घेतलेली होती. ' मेघवृष्टीनें करावा उपदेश । परि गुरूनें न करावा शिष्य ' असा त्याचा बाणा होता. ' उपदेशी तुका । मेघवृष्टीने आइका ।। ' असं त्याचे सांगणे होते. पर्जन्याने आपल्या स्वभावा-प्रमाणे वर्षावे. आपापल्या मगदुराप्रमाणे भूमी पिकत राहील असा त्याचा विश्वास होता. मन लावून पण श्रीहरीचे स्मरण करून प्रपंच करणाऱ्या स्त्री-पुरुषाना तुकारामबुवांचा उपदेश आहे—

> सडासमार्जन तुळसी वृंदावन । अतीथिपूजन ब्राह्मणाचे ।। १ ।।
> वैष्णवांची दासी होईं सर्वभावें । मुखीं नाम घ्यावें विठोबाचें ।। २ ।।
> आपुला तूं गळा घेईं उगवोनी । चुकवी जाचणी गर्भवासा ।। ३ ।।
> किंचित हें सुख टाकीं वो थुंकोनी । पावशील धणी परमानंद ।। ४ ।।



|| श्रीविठ्ठलाय नमः ||

|| श्रीनिवृत्तिनाथाय नमः || श्रीज्ञानेश्वराय नमः ||

|| श्रीराघवचैतन्यश्रीकेशवचैतन्य ||

|| श्रीबाबाचैतन्यसद्गुरुभ्यो नमः ||

# || भूपाळ्या || अभंग || ८ ||

१२५२ बोलोनि दाऊं का तुम्ही नेणा जी देवा। ठेवाल ते ठेवा ठायीं तैसा राहेन ।। १ ।।
पांगुळलें मन काही नाठवे उपाय। म्हणऊनि पाय जीवीं धरूनि राहिलो ।। २ ।।
त्यागें भोगें दुःख काय साडावें मांडावें। ऐसी धरियेली जीवें माझ्या थोरी आशंका ।। ३ ।।
तुका म्हणे माते बाळा चुकलिया वनीं। न [१]पवता जननी दुःख पावे विठ्ठले ।। ४ ।।

शब्दार्थ व टीपा –नेणा–जाणीत नाही ? पांगुळले–पांगळे, दुबळे झाले आहे, नाठवे–आठवत नाही, साडावें–सोडून द्यावे, मांडावें–ग्रहण करावे, आशंका–शंका

अर्थ –देवा, तुम्हाला मी बोलून काय दाखवू ? सर्व परिस्थिती तुम्ही जाणीत का नाही ? तुम्हांस हवे त्या स्थितीत तुम्ही देवा, मला ठेवा मी जसे तुम्ही ठेवाल तसे राहीन १ माझे मन आता अतिशय दुबळे झाले आहे, ते ताळ्यावर आणण्यासाठी मला काहीच उपाय सुचत नाही, म्हणून तर देवा, मी तुमचे पाय माझ्या जिवात धारण करून मी जगत आहे २ कोणते भोगदुःख सोडून द्यावे ? कोणते ग्रहण करावे ? हेच मला आता समजेनासे झाले आहे याबद्दल माझ्या मनात शंका निर्माण झाली आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, विठ्ठला, माऊली, रानात आईची व बाळकाची चुकामूक होऊन मुलाची भेट आईशी झाली नाही तर त्या बालकास फार दुःख होते माझी तशीच अवस्था झाली आहे ४

विवरण –येथून पुढचे सातआठ अभंग भूपाळ्यांचे अभंग म्हणून प्रसिद्ध आहेत पहाटेच्या सुमारास भूप रागात परमेश्वराला आळविण्यासाठी जे गीत म्हटले जाते त्यास भूपाळी असे म्हणतात अशा गीतातून मुख्यतः परमेश्वराला विनम्र भावाने जागे करण्याची कल्पना असते यशोदा, कौसल्या या आपल्या मुलांना पहाटेच्या वेळी जागे करताना गाणे म्हणत असल्याची कल्पनाही काही कवींनी केलेली दिसते भूप रागातील या गीतातून ईश्वराचे स्तवन, रूपवर्णन, प्रार्थना इत्यादी भाव असतानाच, परंतु प्रभातसमय जवळ आला आहे, प्रभू, आता तुम्ही जागृत होऊन जगाच्या उद्धारास प्रवृत्त व्हा असा मोठा उद्बोधक विचार कवीने प्रगट केलेला असतो

१ पावना.

प्राचीन मराठी गीतमाटारात भूपाळीवाङ्मयाचे महत्त्व अनन्यसाधारण आहे. 'उठा उठा हो सकळीक। वाचे स्मरावा गजमुख' (रामानंद), 'उठोनिया प्रातःकाळीं। जपा रामनामावळी। स्वयें ध्याती चंद्रमौळी। शैल-बाळी समवेत' (रामदास), 'घन श्याम सुंदरा श्रीधरा अरुणोदय झाला' (होनाजी बाळा) 'ऊठि गोपाळजी', 'ऊठि उठि बा पुरुषोत्तमा। भक्तकामकल्पद्रुमा', 'उठोनिया प्रातःकाळीं' इत्यादी प्रसिद्ध भूपाळ्या महाराष्ट्रात घरोघरी गाइल्या जात असत श्रीकृष्ण, राम, विठ्ठल इत्यादी देवांना जागे करीत करीत स्वतःच्या अंतःकरणातील प्रभुरूप जागृत करून दिवसाच्या कामास प्रारंभ करण्याची मोठी चांगली प्रथा असे चित्तात सदैव ईश्वरी कृपेचा भाव वर्तत राहिल्यास त्याचा परिणाम नित्याच्या व्यावसायिक जीवनावरही झाल्यासेरीज कसा राहील ?

*आजकाल भूपाळी हा शब्दही नव्या पिढीस पारखा झाला आहे पहाटे उठून कामास लागावे, स्वाध्यायात* रममाण व्हावे, शांततेच्या, एकांताच्या वेळी प्रभूचे गुणगान करावे, सभोवतीच्या सृष्टीत नवा उल्हास ओसंडत असलेला पाहून हेच प्रभूचे लाघव मानून चित्त आनंदाने व उत्साहाने परिपूर्ण करून प्रभूचे गुणवर्णन स्मरणे, त्याची प्रार्थना करणे इत्यादींतील माधुर्य आता दुर्मिळ होत चालले आहे प्राचीन कवींनी पहाटेच्या वेळी करावयाच्या ईशस्तवनासंबंधीच्या भूपाळ्या अनेक लिहिल्या आहेत अजूनही काही मंदिरातून पहाटेच्या वेळी काकडा पेटवून काकडआरती करण्याची प्रथा कुठेकुठे दिसते आश्विन पौर्णिमेपासून कार्तिक पौर्णिमेपर्यंत पहाटे स्नान करून नित्य काकडआरती करणे, भूपाळ्या म्हणणे इत्यादी प्रथात अजूनही काही ठिकाणी दिसतो

तुकाराम महाराजांच्या या भूपाळ्यांच्या अभंगाचे स्वरूप काहीसे निराळे आहे भूपाळीत येणारे पहाटेच्या *जागृत निसर्गाचे वर्णन येथे नाही, अथवा निद्रिस्त परमेश्वरास जागे करण्याचा प्रत्यक्ष प्रयत्न यात नसला तरी* पहाटेच्या समयास ईश्वराशी लीन भावाने केलेली प्रार्थना मात्र येथे आहे स्वतःची हीनदीन वृत्ती व ईश्वराचे सामर्थ्य यांचे मोठे हृद्य वर्णन या अभंगातून आहे या पहिल्याच अभंगात तुकोबांनी आपण अगतिक झालो आहोत, आईपासून चुकलेल्या लेकराप्रमाणे आपली दयनीय स्थिती झालेली आहे, आपले मनच पांगळून गेले आहे! असा भाव थोडक्यात पण प्रभावी रीतीने व्यक्त केलेला आहे शेवटच्या ओळीमध्ये 'न पावतां जननी' म्हणजे आई भेटली नाही तर बाळ दुःखी होते, हा सरळ अर्थ तर युक्तच, पण थोडा फरक करून 'बाळा न पावतां जननी दुःख पावे,' म्हणजे बाळ जर भेटले नाही तर आई दुःखी होते, तसे विठ्ठला, तू माझ्यासाठी व्हावस, असा अर्थाची छटाही मोठी गोड आहे

१२५३ ऐसी वाट पाहे काहीं निरोप कां मूळ। का हे कळवळ तुज उमटेचि ना॥ १॥
आवो पाडुरंगे पंढरीचे निवासे। लावूनिया आस[1] चाळवूनी ठेविलें॥ २॥
काय जन्मा येवूनिया केली म्यां जोडी। ऐसे घडघडी चित्ता येतें आठवूं॥ ३॥
तुका म्हणे खरा न पवेचि विभाग। धिकारितें जग हेंचि लाहो हिशोबें॥ ४॥

शब्दार्थ व टीपा—मूळ–बोलावणे, चाळवूनी–फसवून जोडी–प्राप्ती, न पवे–प्राप्त झाला नाहीच, लाहो–मिळाला

अर्थ – देवा, मला तुमचा काही निरोप यावा, तुमचेकडून बोलावणे यावे, याची मी वाट पाहात आहे देवा माझ्याविषयी तुमच्या चित्तात काहीच कळवळा कसा उमटत नाही हो? १ अहो पांडुरंगा या पंढरपूर क्षेत्रात निवास करायला लावून तुम्ही नुसतीच आशा लावलीत मला मला फसविलेत देवा तुम्ही मजवर कसलीच कृपा केली नाही तुम्ही २ मी या मानवी जन्मास येऊन कोणता लाभ करून घेतला? याविषयी प्रत्येक क्षणात माझ्या मनात विचार येऊन मी अधीर होत आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, मला या जन्मात तुमच्या भक्तिसुखाचा वा तुमच्या भेटीचा कधीच लाभ झालेला नाही, उलट साऱ्या जगाने माझा धिक्कार करावा, हाच लाभ माझ्या पदरी आहे ४

विवरण – स्वतःच्या मनातील हुरहूर व चिंता तुकारामांनी या अभंगात अतिशय समर्पक रीतीने व्यक्त केली आहे ईश्वराकडून आपणास कधी बोलावणे येईल? या एका प्रश्नाच्या चिंतेने तुकाराचे मन व्याकुळ झालेच

[1] आस

आहे. मूल स्थानाचे ' मूळ ' म्हणजे आमंत्रण, बोलावणे यावे अशी इच्छा बुवांच्या मनात स्वाभाविकपणे आहे. ' मूळ ' शब्द वापरून तुकोबांनी एका फार नाजुक अशा मनाच्या अवस्थेची सूचना केलेली आहे. पूर्वी लग्ने लहानपणी होत असत. पहिल्या पहिल्या वेळी माहेरची माणसे सासरहून मुलगी घरी माहेरी यावी म्हणून ' मूळ ' घेऊन जात असत. या ' मूळ ' आणणाऱ्या माणसाची मोठ्या उत्सुकतेने ही बालवधू वाट पाहात असे. तिच्या मनातील उत्सुकता व तळमळ बुवांनी या ठिकाणी एवढ्यासाठी सूचित केली आहे की, तिच्यावरून ' दिवाळीच्या मूळा लेक आसावली ' म्हणून दुसऱ्या एका अभंगात तुकोबांनी आपल्या मनातील तगमग व्यक्त केली आहे ती आठवावी. सर्व आयुष्य पंढरपुरास वाढून विठ्ठलाच्या मनात कसलीच करुणा उपजू नये, उगाच आशा लावून पांडुरंगाने आपल्याच भक्तांना फसवावे याचेही बुवांना नवल वाटते. ईश्वराचा लाभ तर दूरच; पण लोकांत फजिती मात्र होत राहिली. अशी तक्रार तुकाराम महाराजांनी या अभंगात केलेली आहे.

१२५४ कां गा केविलवाणा केलों दीनाचा दीन । काय तुझी हीन शक्ति जालीसी दिसे ॥ १ ॥
लाज येते मना तुझा ह्मणवितां दास । गोडी नाहीं रस बोलिली यासारिखी ॥ २ ॥
लाजविलीं मागें संतांचीं हीं उत्तरें । कळों येतें खरें दुजें एकावरूनि ॥ ३ ॥
तुका म्हणे माझी कोणें वदविली वाणी । प्रसादावांचूनि तुमचिया विठ्ठला ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा.–दुजें–दुसरे, वाणी–वाचा, प्रसादावांचूनि–कृपेवाचून.

अर्थ:–देवा, मला असे केविलवाणे तुम्ही का केले आहे? दीनांतील दीन अशी स्थिती माझी तुम्ही का करून ठेविली आहे? मला अशा अवस्थेत का ठेवलेस तू? माझ्या उद्धाराची शक्ती तुझ्यात नाहीच की काय? तुझी उद्धार करण्याची शक्तीच कमी झाली की काय? १ देवा, तुझा दास म्हणविताना मला भारी लाज वाटते. कारण तुम्ही कृपा कराल या शब्दांतील गोडी व तात्पर्याचा रस या गोष्टी आता संपल्यासारख्या झाल्या आहेत. २ मागील संतांनी तुझ्या सामर्थ्याविषयी किती वर्णन केले आहे; पण त्याच्याही शब्दांना व्यर्थ ठरवून तू लज्जित केले आहेस. एका संताचे उत्तर खोटें ठरले की दुसऱ्या संतांची तशीच गत होते ना. ३ देवा, आता माझेच पाहा ना. माझ्या या वाणीस तरी तुमच्या कृपाप्रसादाशिवाय कुणी बोलते केले आहे? असे असून मी मात्र असा दीन का? ४

विवरण :– ईश्वराचे दास असे केविलवाणे राहिले तर तो उणेपणा कुणास लागणार? ईश्वर सर्वशक्तिमान, दयाळु, पतितपावन, भक्तवत्सल, इत्यादी वर्णनावरून संतांनी त्याची महती वारंवार वर्णन केली असताना त्याचा भक्त, त्याचा दास दीनवाणा दिसला तर मग या संतांचे शब्द खोटे की काय? तुकोबांनी हाच प्रश्न येथे विठ्ठलास विचारला आहे. स्वतःची वाणी देवाच्याच कृपाप्रसादाने मधुर व प्रभुप्रीतीने रंगलेले शब्द उच्चारते; आणि वस्तुस्थिती पाहिली तर स्वतः दीनाहून दीन अशी. तुकोबांना या अवस्थेचे भारी नवल वाटते. निदान संतांच्या शब्दासाठी तरी ईश्वराने आपणास जवळ करावे; अशी त्यांची प्रार्थना आहे. देव भावाचा भुकेलेला आहे. तो भक्ताचे रक्षण करतो, तोच त्याच्या भेटीसाठी उत्सुक असतो, अशा प्रकारची वचने साधुसंतांनी कितीतरी वेळा उच्चारलेली आहेत. माझ्या भजनात ज्याला आस्था आहे त्याला आम्ही डोक्यावरचे मुकुट करू, असे ज्ञानेश्वरीत भगवंताच्या मुखाने ज्ञानदेवांनी सांगितले आहे. त्या भक्ताची लायही आम्ही आमच्या हृदयावर धारण करू, अशी ग्वाही आहे. इतकेच नव्हे तर, त्या आपल्या भक्तास पाहाण्यासाठी आपण सगुण व साकार झालो, त्याला आलिंगन देण्यासाठीच आपणास दोन सोडून चार हात असल्याचे भगवंतांनी सांगितले आहे ' तो पाहावा हे डोहळे । म्हणोनि अचक्षूसि मज डोळे । हातींचेनि लीलाकमळें । पूजूं तयातें ॥ दोंवरी दोनी । भुजा आलों घेऊनी । आलिंगावयालागुनी । तयाचें आंग ॥ आम्ही तयाचे करूं ध्यान । तें आमुचें देवतार्चन । .. तयाचें आम्हा व्यसन । ते आमचें निधि निधान ' इतक्या तीव्रतेने भगवंताने स्वमुखाने आपल्या भक्ताविषयी सांगितले आहे. ' म्हणोनि गा भक्तां । नाहीं एकही चिंता ' अशी भाषा सर्वत्र आहे. कधी कधी तर याही पुढे जाऊन भगवंतांनी सांगितले आहे. या भक्ताच्या रक्षणाचा पक्करच आपण घेतला आहे; समर्थाच्या पत्नीने काय कदान्नाची भिक्षा मागावी? अशा भाषेत ज्ञानेश्वरांनी

हे भक्तवात्सल्य वर्णन केले आहे. ' ऐसे अनन्ययोगें । विकलें जीवें मनें यांगें । तयांचे कांपि एक सांगें । जें सर्व मी करीं ॥ तेंथि मी तयां । जंसे असतो तैसियां । कळिकाळ नोकोनियां । घेतला पटा ॥ ये-हवीं तरी माझिया भक्ता । आणि संसाराची चिंता । काय समर्थाची कांता । कोरान्न मागे ?'

एवढी मोठी ग्वाही भगवताच्या मुखातून साधुजनानी दिलेली असताना आपणच असे उदासवणे का ? आपल्याच बाबतीत परमेश्वर शक्तिहीन का झाला ? असे प्रश्न तुकोबाच्या मनात निर्माण झाले आहेत. दुसऱ्या एका अभगात अधिक स्पष्ट करून तुकाराम महाराज म्हणतात की, आम्ही भक्त जर केविलवाणे दिसू, तर मग पुराणाना व वेदवचनाना लाज वाटू लागेल कारण त्यानी भगवताविषयी दिलेला दिलासा व्यर्थच वाटू लागतो. मग ' लाजतीं पुराणें । वेदां येऊं पाहे उणें । आम्ही नामाचे धारक । केविलवाणी दिसों रंक । बोलिले ते संतीं । बोल वायाविण जाती ' तेव्हा वेदाचे, पुराणाचे, साधुसंताचे बोल वाया जाऊ नयेत म्हणून तरी ईश्वराने आपणास जवळ करावे, आपणावर कृपा करावी असा भावार्थ

१२५५ जळो माझें कर्म वाया केली फटकट । जालें तैसें तट नाहीं आलें अनुभवा ॥ १ ॥
आता पुढें धीर काय देऊं या मना । ऐसे नारायणा प्रेरिलें तें पाहिजे ॥ २ ॥
गुणवंत केलों दोष जाणायासाठीं । माझें माझें पोटीं बळकट दूषण ॥ ३ ॥
तुका ह्मणे अहो केशीराजा दयाळा । बरवा हा लळा पाळियेला शेवटीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा –वायां–व्यर्थ, तट–बोभाटा, ख्याती, प्रसिद्धी बरवा–चागला.

अर्थ -देवा, माझे सर्व कर्म जळून जावो मी तुमच्या पायापाशी फटफट केली ती सारी व्यर्थच गेली म्हणायची कारण भक्तवत्सल, पतितपावन इत्यादी नावांनी जी तुमची कीर्ती झालेली आहे, तिचा अनुभव काही मला मुळीच आलेला दिसत नाही १ देवा, आता मी माझ्या मनास धीर द्यावा, यावद्दल तुम्हीच माझ्या मनास काही योग्य अशी प्रेरणा द्यावयास हवी २ मला खरे म्हणजे दुसऱ्याचे दोष जाणून ते दूर करण्याइतके गुणवंत तुम्ही केलेत, पण मी गुणवंत, मी गुणवंत, हे गुण माझे, हाच अभिमानाचा दोष माझ्यात निर्माण झाला ३ तुकाराम महाराज म्हणतात, अरे केशवा, राजा, दयाळा, अशा प्रकारे माझे हे लाड फार चांगल्या प्रकारे पुरविलेत ! ४

१२५६ कामें नेले चित्त नेदी अवलोकूं मुख । बहु वाटे दुःख फुटो पाहे हृदय ॥ १ ॥
का[1] जी सासुरवासी मज केलें भगवंता । आपुलिया सत्ता स्वाधीनता ते नाहीं ॥ २ ॥
प्रभातेसि वाटे तुमच्या यावें दर्शना । येथें न चले चोरी उरली राहे वासना ॥ ३ ॥
येथें अवघें वाया गेले दिसती सायास । तुका म्हणे नास दिसे जाल्या वेचाचा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा –कामें–विषयाच्या वासनेने, नेदी–देत नाही, अवलोकूं–पाहू, स्वाधीनता–स्वातंत्र्य, प्रभातेसि–सकाळच्या वेळेस, सायास–प्रयत्न, नास–नाश, वेचाचा–खर्च झालेल्या आयुष्याचा

अर्थ –देवा, माझे चित्त इंद्रियादिक विषयाच्या इच्छेने व्यापून गेलेले असल्यामुळे तुमच्या मुखाकडे मी पाहूच शकत नाही यामुळे हृदय फुटून जाईल एवढे दुःख मला होत आहे १ भगवंता, मला अशा वासनांच्या सासुरवासात का ढकलून दिलेत ? त्यामुळे माझी माझ्यावर सत्ता काहीच राहिलेली नाही फसलेच वागण्याचे या तुमच्याकडे येण्याचे स्वातंत्र्य मला उरलेले नाही २ सकाळच्या प्रहरी देवा, तुमच्या दर्शनास यावे असे मला फार वाटते, पण मन धजावत नाही मनात इंद्रियसुखाची वासना उरलेली असल्याने रिक्त मनाने तुमच्याकडे येता येत नाही मनातील ही वासना चोरून तशीच ठेवून तुमच्याकडे मने येणे जमत नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, आजपर्यंत मी तुमच्या प्राप्तीसाठी केलेले सारे प्रयत्न वायाच गेले आहेत असे दिसते आजवर खर्च झालेल्या आयुष्याचा नाशच झाला म्हणायचा ४

---

१ का गा

१२५७ जळोत तीं येथें उपजविती अंतराय । सायासाची जोडी माझी तुमचे पाय ॥ १ ॥
आतां मज साह्य येथें करावें देवा । तुझी घेईं सेवा सकळ गोवा उगवूनि ॥ २ ॥
भोगें रोगा जोडोनियां दिलें आणीकां । अरुचि ते हो कां आतां सकळांपासूनि ॥ ३ ॥
तुका म्हणे असो तुझें तुझे मस्तकीं । नाहीं ये लौकिकीं आतां मज वर्तणें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा –अंतराय–तुटी, विन्मुखता, सायासाची–प्रयत्नाची, जोडी–प्राप्ती, गोवा–गुंतागुंत, उगवूनि–सोडवून, अरुचि–नावड वर्तणें–वागणे.

अर्थ.–देवा, तुझ्या भेटीत जे जे तुटी निर्माण करतील ते ते जळून जावेत, त्यांचा नाश व्हावा. कारण मी मोठ्या प्रयत्नाने तुमच्या पायाची प्राप्ती करून घेतलेली आहे. १ आता देवा, तू मला येथे मदत करावीस. सर्व सासारिक व लौकिक गुंतागुंतीतून सोडवून तू माझी सेवा घ्यावीस. २ अनेक प्रकारच्या रोगाची प्राप्ती मी माझ्या प्रारब्धामुळे करून घेतली आहे पण आता त्या सर्वांविषयी माझ्या मनात नावड निर्माण व्हावी ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, आता तुझे जे काही आहे ते तुझ्याजवळ असो; मला मात्र आता या लौकिक जगात राहावयाचे नाही, वागायचे नाही ४

१२५८ न संगतां तुह्मां कळों येतें अंतर । विश्वीं विश्वंभर परिहारचि न लगे ॥ १ ॥
परि हे अनावर आवरितां आवडी । अवसान ते घडी पुरों देत नाहीं ॥ २ ॥
काय उणे मज येथें ठेविलियें ठायीं । पोटा आलों तईंपासूनिया समर्थ ॥ ३ ॥
तुका म्हणे अवघी आवरिली वासना । आतां नारायणा दुसरियापासूनि ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा –अंतर–मन, परिहार–स्पष्ट करून सांगणे, अनावर–आवरण्यास कठिण अशी, आवडी–प्रेम, घडी–क्षणभर, ठायीं–ज्या जागी आहे त्या जागीच

अर्थः–देवा, माझ्या मनातील तुमच्या विषयीचा भाव खरे म्हणजे न सांगता तुमच्या ध्यानात येतो कारण सर्व विश्वात भरून राहिलेले असे विश्वंभर तुम्ही असल्यामुळे, मनातील काही भाव स्पष्ट करून सांगण्याची जरूरीच नाही. १ मग मी हा भाव पुन पुन स्पष्ट करून का सांगतो ? तर देवा, तुमच्या विषयी माझ्या मनात जी अपार प्रीती आहे ती आवरता आवरली जात नाही ती आवरून धरण्याचे सामर्थ्य एक क्षणभरही माझ्या चित्तात नाही २ देवा, माझ्यात अशी कोणती उणीव आहे की, ज्यासाठी तुम्ही मला आहे त्याच अवस्थेत ठेविले आहे ? पण देवा, मी तुमच्याच पोटी आलो असल्याने जन्मास आलो असल्यापासूनच समर्थ असा आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, आता मी इतर सर्व सुखापासून, इंद्रियांच्या विषयापासून माझी वासना आवरून धरिली आहे ४

विवरण :– या अभंगात एक फार समर्पक व सुंदर असे तत्त्व तुकोबांनी स्पष्ट केले आहे भक्ताने आपली दु.खे पुन पुनः मागण्याची जरूरीच काय ? ईश्वर सर्व विश्वात भरून राहिलेला विश्वंभर आहे ना ? मग त्या सर्वसाक्षी व सर्वव्यापी परमेश्वराला भक्ताचे मन समजत नाही असे कसे होईल ? ही जाणीव पक्की असूनही मग भक्त पुन पुन. ईश्वरास का आळवितात ? का करुणा भाकतात ? का स्वतःच्या मनाची तळमळ व्यक्त करून दाखवितात ? तर त्याचे उत्तर असे की, ईश्वराविषयी आवडच भक्ताच्या मनात एवढी की, त्याचा ईश्वराचा उच्चार केल्याखेरीज एक क्षणही न जावा, तो त्याचा सहजधर्मच जणु बनलेला असतो याच अभंगात तुकाराम महाराजांनी दुसरा एक महत्त्वाचा व विनतोड असा युक्तिवाद केला आहे माझ्यात काय उणे आहे ? मला आहे याच अवस्थेत का ठेविले आहे ? असा अर्थ तिसऱ्या कडव्याचा आपण घेतलेला आहे, पण या कडव्यातील दुसऱ्या चरणाचा रोख लक्षात घेता निराळा अर्थ घेणेही युक्त दिसते देवा, मी तुमच्याच पोटी निर्माण झालो असल्याने जन्मापासून मी समर्थ आहे समर्थाचा मुलगा समर्थच नव्हे का ? मग मी आहे या स्थानी राहिलो तरी काय कमतरता आहे ? कारण मी जन्मापासून तुमच्या गुणांनी युक्त असा आहे.

१२५९ तुजसवें आम्हीं अनुसरलों अबळा । नको अगी फळा राहों हरी हीन देऊं ॥ १ ॥
सासुरवासा[1] भीतों जीव ओढे तुजपाशीं । आता दोहींविशीं लज्जा राखें आमुची ॥ २ ॥
न फळतां संग जाला सहज खेळतां । प्रवर्तली चिंता मागिलांचियावरि ॥ ३ ॥
तुका म्हणे असतां जैसे तैसे बरवें । वचन या भावें वेचूनियां चिनटलों ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा–तुजसवें–तुझ्या बरोबर, अबला–बलहीन स्त्रिया, प्रवर्तली–निर्माण झाली, चिनटलों–रंगून राहिलो

अर्थ–देवा, आम्ही बलहीन स्त्रिया तुला मनापासून अनुसरलो आहोत; सर्वस्व तुला अर्पण केले आहे. आता आमच्या अंगी असलेही हीनत्व लाग देऊ नकोस १ देवा, आम्ही आमच्या सासुरवासास, इंद्रियसुखांच्या जाचास फार कंटाळलो आहोत त्याची मोठी भीती आम्हांस वाटते आमचा जीव एकसारखा तुझ्याकडेच ओढ घेत असतो आता आमच्या दोनही आश्रमाबद्दल तुलाच चिंता वाटावी या दोहींतून तूच आमची लाज राख २ देवा, सहज खेळता खेळता नकळतच तुझी संगत आमच्याशी जडली, आणि त्यामुळे अनेक सुख आता मागील सख्यांना मिळावे अशी चिंता मनात निर्माण झाली ३ तुकाराम महाराज म्हणतात, आता आम्ही जसे आहोत तसाच स्थितीत चांगले दिसू या शब्दातील भावाने मी तुमच्या चरणी रंगून राहिलो आहे ४

विवरण – भूपाळ्यांच्या अभंगातील हा अखेरचा अभंग ईश्वराला आपण किती तत्परतेने अनुसरलो आहोत, हे व्यक्त करण्यासाठी तुकोबांनी या अभंगात आपण अबला स्त्री आहोत अशी भूमिका घेतली आहे एकदा ही भूमिका घेतली की मग सासुरवास, माहेरची ओढ, दोन्हीकडची लाजलज्जा, न कळत झालेला संग इत्यादी शब्दांचे अर्थ व्यावहारिक संदर्भावरून चांगलेच ध्यानात येणारे आहेत या लौकिक प्रपंचात आपण सासुरवासी आहोत, येथील इंद्रियसुखाचा व प्रवृत्तीचा जाच आपणास फार आहे, येथून मूळच्या स्थानी, माहेरास, मातेच्या घरास आपण जावे, हा सर्व भाव या स्त्रीभूमिकेवरून स्पष्ट घेण्यासारखा आहे या थोर ईश्वराशी न कळत, सहज खेळता खेळता आपला संबंध आला, पण आपल्या जीवाचे सार्थक झाले व अन्य साधक मागील लोकांच्या जन्माचेही व्हावे अशी इच्छा तुकोबांनी येथे प्रकट केली आहे किंवा या ओळीचा दुसराही एक अर्थ संभवतो सहज खेळता खेळता संग या परमपुरुषाशी जडला खरा, पण आता या नादी लागलेल्या बायांचे काय होणार ? अशी लौकिकाची शंका मागील सख्यांना वाटू लागली स्त्रीच्या भूमिकेवरून ईश्वराशी संधान बांधणाऱ्या भक्तांच्या भूमिकेविषयी विस्ताराने विवेचन प्रथम खंडात अभंग क्र ७ च्या विवरणात पृष्ठ ८ वर केलेले आहे

१२६० रवि दीप हीरा दाविती देखणें । अदृश्य दर्शने संताचे[2] नी ॥ १ ॥
त्याचा महिमा काय वर्णूं मी पामर । न कळे तो साचार ब्रह्मादिकां ॥ २ ॥
तापली चंदन निववितो कुडी । त्रिगुण तो काढी संतसंग ॥ ३ ॥
मायबापें पिंड पाळियेला माया । जन्ममरण जाया संतसंग ॥ ४ ॥
संताचे वचन वारी जन्मदुःख । मिष्टान्न तें भूकनिवारण ॥ ५ ॥
तुका म्हणे जवळी न पाचारितां जावें । संतचरणीं भावें रिघावया ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा–रवि–सूर्य दीप–दिवा, देखणें–प्रकाशित दिसणारे, पामर–गरीब, साचार–खरोखर, कुडी–शरीर त्रिगुण–सत्व, रज, तम हे तीन गुण, पिंड–पुत्राचा देह वारी–निवारण करते, न पाचारिता–न बोलावता, रिघावया–जावयास

अर्थ–सूर्य दिवा आणि हिरा या पदार्थांच्या प्रकाशात दृश्य वस्तूचेच म्हणजे असणाऱ्या वस्तूचेच दर्शन होते, पण या उपायांनी न दिसणारे विठ्ठलाचे रूप मात्र संतांच्याच कृपेने दिसते १ मी गरीबाने या संतांचे माहात्म्य काय वर्णन करावे ? खरोखर त्यांचे महत्त्व ब्रह्मादिकांनाही समजत नाही २ संसारतापाने तापलेल्या शरीरास

1 सासुरवासी भीत 2 संतांचिया

चंदनाच्या लेपामुळे शीतलता वाटेल, परंतु सत्व, रज, तम अशा त्रिगुणाची बाधा मात्र संतसंगानेच दूर होते ३ पुत्रास जन्म देऊन त्याचे आईबाप देहाचेच तेवढे पालनपोषण करतात, परंतु त्याच्या जन्ममरणाच्या संकटाचे निवारण मात्र साधुसंतांच्याच कृपेमुळे होत असते ४ मिष्टान्न ज्याप्रमाणे भुकेचे निवारण करते, त्याप्रमाणे संताच्या वचनामुळे जन्ममरणाचे दुःख दूर होते; जन्ममरणाचे दुःखच वाटेनासे होते ५ तुकाराम महाराज म्हणतात, अशा या संताच्या कडे त्यानी बोलविले नाही, तरी आपण मुद्दाम जावे मोठ्या भक्तिभावाने त्याच्या चरणावर शरण जाण्यासाठी सिद्ध व्हावे ६

विवरण –संताचा महिमा किती मोठा आहे, हे तुकारामबुवा अनेक दृष्टान्त देऊन या अभगात वर्णन करीत आहेत सूर्य, दिवा, हिरा याच्या प्रकाशात दृश्यमान असणारी वस्तूच दिसेल; पण संताच्या सहवासात मात्र या साधनाच्या साह्याने न दिसणारा विठ्ठलही दिसेल चंदनाच्या लेपाने तप्त झालेले शरीर शांत होईल, पण जन्म-मरणाचा ताप संताच्या कृपेनेच दूर होईल आई-बाप आपल्या मुलाच्या देहाचे पोषण करतील, पण त्याच्या साऱ्या जीवनाचा विचार मात्र साधुसंताच्याच संगतीत होईल असा हा संतसहवास असल्यामुळे मराठी संतानी संताचे व त्याच्या सहवासाचे मुक्त कंठाने गुणगान केले आहे

या संताच्या भेटीची इच्छा प्रत्यक्ष ईश्वरही करीत असतो 'संत भेटती आजी मज। तेणे मी झालों चतुर्भुज।' असे ज्ञानेश्वरानी भगवताच्या मुखातून सांगितले आहे. 'या या संतासी भेटता। हरे संसाराची व्यथा॥ या या संताचे देणें। कल्पतरूहूनि दुणें। परिसापरिस अगाधपणे। चिंतामणी ठेंगणा॥' अशा शब्दात त्यानी संताचे महत्त्व वर्णन केले आहे या संताच्या पेक्षा दुसरा उदार कोण आहे? हेच आपले खरे मायबाप, इष्टमित्र, सोयरे-धायरे होत कारण त्याच्या अंगी 'कृपाकटाक्षें न्याहाळिलें। आपुल्या पदीं बैसविलें' असे सामर्थ्य असते

या संताचा महिमा वर्णन करताना ब्रह्मदेवसुद्धा शिणून जातो 'संताचा महिमा कोण जाणे सीमा। सीणला हा ब्रह्मा बोलवेना। असे नामदेवरायानी म्हटले आहे परिसाच्या संगतीत जसे लोहाचे सुवर्ण व्हावे, 'तैसा भेटे नारायण संतसंगें' असे त्यानी सांगितले आहे 'धन्य नरदेही संत संग करी। त्रैलोक्य उद्धरी हेळामात्रें' अशी साक्ष नामदेवानी दिलेली आहे. संताचा संग हा असातसा नाही, असे सांगून जनाबाईने म्हटले आहे, 'पालटावी दशा तात्कालिक' असे त्याचे सामर्थ्य आहे 'चंदनाचे संगें पालटती झाडें' त्याप्रमाणे संताच्या संगतीत सामान्याचे जीवन पालटून जाते याच 'संतसंगतीने थोर लाभ झाला। मोह निरसला मायादिक।' म्हणून श्रीसेनाने ग्वाही दिलेली आहे

या संताचे महिमान केवढे? एकनाथानी थोडक्या शब्दात वर्णन केले आहे, 'संतचरणींचा महिमा। कांहीं न कळे आगमा निगमा॥ ब्रह्मा घाली लोटांगण। विष्णु वंदितो आपण॥ शिव ध्यातो पायवणी। धन्य धन्य संतजनीं' हे संत म्हणे देवाचे सोयरेच होत हेच आपले खरे मायबाप होत. म्हणूनच 'संता धावें आलिंगन साडूनिया थोरपण' असा निर्वाळा एकनाथानीच दिलेला आहे

तुकाराम महाराजानी या संताचे उपकार वारंवार वर्णन केले आहेत 'काय सांगों मी या संताचे उपकार। मज निरंतर जागविती' असे त्यानी म्हटले आहे 'कृपेचे सागर हेचि साधुजन। तिहीं कृपादान केलें मज' असा अनुभव त्यानी सांगितला आहे 'संतचरण लागतां सहज। वासनेचे बीज जळोनि जाय' अशी ग्वाही तुकोबानी एका अभगात दिलेली आहे म्हणूनच 'पायीं संताचे मस्तक। असो जोडोनि हस्तक' अशी स्वस्थिती त्यांनी वर्णन केली आहे या संताचा महिमा वर्णन करण्याचे काम फारच कठिण असल्याचेही त्यानी पुनःपुन स्पष्ट केले आहे 'संतांचा महिमा तो बहु दुर्गम। शाब्दिकांचे काम नाहीं येथें' या संताचे सामर्थ्य असे की 'आलिंगनें घडे। मोक्ष सायुज्यता जोडे। ऐसा संतांचा महिमा। झाली बोलायाची सीमा' आईबाप फक्त आपला देह वाढवितात, पण सतसहवास जन्माचे सार्थक करतात प्रत्यक्ष ज्ञान देणारा श्रीगुरुही संतापुढे कमी पडतो कारण तुकोबाच्या मते 'गुरुचिया मुखें होईल ब्रह्मज्ञान। न कळे प्रेमखूण विठोबाची' अशी प्रेमखूण दर्शविणाऱ्या संताचा महिमा या अभगात तुकोबानी मोठ्या समर्पक शब्दात वर्णन केला आहे

१२६१ हरि हरि तुम्हीं म्हणा रे सकळ । तेणे मायाजाळ तुटईल ॥ १ ॥
आणिका नका काहीं गबाळाचे भरी । पडो[1] येथें थोरी नागवण ॥ २ ॥
भावे तुळसीदळ पाणी जोडा हात । म्हणावा पतित वेळोवेळा ॥ ३ ॥
तुका म्हणे हा[2] तव कृपेचा सागर । नामासाटीं पार पाववील ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा –मायाजाळ–मायेची बंधने, तुटईल–तुटतील, गबाळ–फापटपसारा, थोरी–मोठी, पार–पलीकडचा काठ

अर्थ –लोकहो, तुम्ही सर्वजण हरि हरि म्हणून या परमेश्वराचे नाव घ्या यामुळे मायेची सर्व बंधने तुटून जातील १ तुम्ही याखेरीज दुसऱ्या कुठल्याच फापटपसाऱ्यात पडू नका कारण त्यात तुमची फार मोठी नागवणूक आहे २ इतर व्याप न करता, तुम्ही काय करावे ? तर मनोभावे हातात तुळशीचे पान घ्या, पाणी घ्या व मी पतित आहे, मी पतित आहे, असे वारंवार म्हणून ते त्या भगवंतास अर्पण करा ३ तुकाराम महाराज म्हणतात, हा ईश्वर तर कृपेचा सागरच असून केवळ तुम्ही त्याचे नामस्मरण कराल, तरीही तो तुम्हास या भव्य भवसागरातून पार करून पलीकडच्या काठावर नेऊन ठेवील

विवरण – भागवत संप्रदायात यज्ञयागादी क्रिया, तीर्थादी व्रते, देहास कष्टविणाऱ्या योगादी क्रिया यांना फारसे महत्त्व नाही केवळ सद्भावनेने भगवंताचे नामस्मरण करून त्याला 'पत्र, पुष्प, फल, तोयम्' यांपैकी काहीही समर्पण केले तरी तो संतुष्ट होतो व आपल्या भक्तावर पूर्ण कृपा करतो, असा सहजसुलभ मार्ग सर्वसामान्य भाविकांना सांगितला आहे ज्ञानेश्वरांनी ज्ञानेश्वरीच्या बाराव्या अध्यायात या वृत्तीचे व भक्तीच्या सामर्थ्याचे फार बहारदारपणे वर्णन केले आहे एखादे फळ, एखादे सुकलेले पान, किंवा पाण्याचा एखादा थेंब, यांपैकी जे मिळेल ते भगवंताला 'निःसीमभावउल्हासें' अर्पण करावे अशी तुळशीदलाची, पाण्याच्या थेंबाची मनोभावे दणगी मिळताच ईश्वर किती संतुष्ट होतो ? हा कृपेचा सागर किती तृप्त होतो ? ज्ञानेश्वरांनी म्हटले आहे, भक्ताच्या या ल्हानशा दणगीमुळ मला फार मोठे दवाल्यच प्राप्त झाले आहे, असे ईश्वरास वाटते कौस्तुभापेक्षाही मौल्यवान रत्न ज्याच्या योगे ईश्वरास प्राप्त झाल्यासारखे वाटते दरिद्री मित्र सुदामदेव याच्या पाठीच्या गाठी भक्ताच्या प्रेमासाठीच ईश्वराने मोठ्या अधीरतेने सोडल्या ना ? कारण भगवंतानेच सांगितले आहे, 'पैं भक्ति एकी मी जाण । तेथ सानें थोर न म्हणे । आम्ही भावाचे पाहुणे । भलतेया ' या भक्तवत्सल ईश्वरास केवळ भावभक्ती प्रिय आहे

१२६२ ऐसे कुळीं पुत्र होती । बुडविती पूर्वजा ॥ १ ॥
चाहाडी चोरी भाडवण । वाटा आला भागासी ॥ २ ॥
त्याचियानें दुःखी मही । भार तेही न साहे ॥ ३ ॥
तुका म्हणे ग्रामपशु । केला नाशु आयुष्या ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – मही–पृथ्वी, भार–ओझे, ग्रामपशु–कुत्रा

अर्थ – घराण्यातील पूर्वजांचे नाव बुडविणाऱ्या व त्यांना अधोगतीस नेणाऱ्या पुत्राचे वर्णन काय करावे १ दुसऱ्याची चोरी करणे, चहाडी करणे हेच भांडवल ज्याच्या वाट्यास आलेले असते २ ज्याच्या पापकर्मांने सारी पृथ्वी दुःखीकष्टी झालेली असते तिला त्याचे ओझे सहन होत नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात असा हा दुष्ट पुत्र गावात भटकणाऱ्या कुत्र्याप्रमाणेच असून त्याचप्रमाणेच याच्या आयुष्याचा सर्वनाश झालेला असतो ४

१२६३ गाठोळीस धन भाराचो करणा । दावूनि सज्जना फोंव पीडी ॥ १ ॥
नाठेळाची भक्ति कुचराचें ब्रह्म । फोरडें वोंगळ मार खाय ॥ २ ॥
साडोव्यासी घाली देवाची करंडी । दिल्हाळ त्या थोडी पूजा दावी ॥ ३ ॥
तुका म्हणे ऐसे माकडाचे छंद । अवघे धिंदधिंद[3] सिदळीचे ॥ ४ ॥

१ पडो तयें २ आहे ३ धदपद

शब्दार्थ व टीपा -गाठोळीस-पाठीशी, पदराशी, पीडो-त्रास देतो, नाठेळाची-ढोंगी माणसाची, कुचराचे-कामात कुचराई करणाराचे, थोंगळ-अमंगल, सांडोव्यासी-कुरवंडी करून त्याग, विल्हाळ- दुःखाच्या गोष्टी सांगणारा, धंदथंद-ढंग, सिंदळीचे-वाईट स्त्रीचे.

अर्थ.-पदरात पुष्कळसे धन असूनही जो मजजवळ काही नाही, काही नाही असे म्हणतो, करुणा भाकतो तो सज्जनांना त्रास देणाराच समजावा. १ ढोंगी माणसाची भक्ती आणि कामचुकाराचे बळ यांचा काय उपयोग ? या गोष्टी कोरड्या व अमंगलच असतात. यांना मारच खावा लागतो. २ अशी माणसे त्याग करायला निघाली तर देवाची फरडीच रस्त्यावर मोकळी करतील, व स्वतःच्या दुःखाची कथा पुनः पुनः सांगणारे हे लोक धोंड्यांच्या पूजेचा पसारा मात्र दाखवितील. ३ तुकाराम महाराज म्हणतात, असे हे या माकडांचे छंद असतात. एखाद्या बाजारबसवी स्त्रीप्रमाणे त्यांचे हे ढंग असतात. ४

१२६४ कैसें असोनि ठाउकें नेणां । दुःख पावाल पुढिले पेणा[1] ॥ १ ॥
आतां जागें रे भाई जागें रे । चोर निजल्या नाडूनि भागे रे ॥ २ ॥
आतां नका रे भाई नका रे । आहे गांठीं तें लुटवूं लोकां रे ॥ ३ ॥
तुका म्हणे एकांच्या घायें । कां रे जाणोनि न धरा भयें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपाः-पेणा-मुक्कामावर, नाडूनि-चुकवून, भागे रे-पळा रे, घायें-आघाताने, भयें-भय

अर्थ -लोकहो, तुम्हांस ठाऊक असून तुम्ही कसे जाणीत नाही ? आता पुढल्या मुक्कामास पुढल्या जन्मात मोठे दुःख पावाल ना ? १ बाबांनो, आता तुम्ही नीट सावध व्हा हो. कामक्रोधादी वृत्तीरूपी चोर झोपले आहेत तोपर्यंतच त्यांना चुकवून तुम्ही परमेश्वराकडे पळा. २ बधूनो, तुमच्या शिलकीत असलेले आयुष्य आता विनाकारण दवडू नका. किंवा चोरांहातो लुटवूही नका हो. ३ तुकाराम महाराज म्हणतात, लोकहो, तुम्ही एकास आघात झाल्यावर सावध होऊन कामक्रोधादिकांचे भय कां धरीत नाही ? ४

१२६५ मुदल जतन जालें । मग लाभाचें काय आलें ॥ १ ॥
घरीं देउनि अंतर गांठी । राखा पारिख्यां न सुटे मिठी ॥ २ ॥
घाला पडे थोडेंच वाटे । काम मंदाचेंच पेटे ॥ ३ ॥
तुका म्हणे वरदळ खोटें । फांसे अंतरिंच्या कपटें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा -घाला-हल्ला, मंदाचें-मूढाचे, वरदळ-वरवरचे.

अर्थ -एकदा मुद्दलाचेच रक्षण झाले की मग त्यावर लाभच होणार हे ओघानेच आले की. १ भक्ति-भावाच्या या मुद्दलाला चांगली आतली गाठ देऊन मनोमंदिरात जतन करून ठेवावे कामक्रोधादी परक्या शत्रूंच्या हातून त्याचे रक्षण करावे. २ या मूढ कामक्रोधादी शत्रूंचा हल्ला हळूहळू पडेल; म्हणून त्याचे नीट रक्षण करा. ३ तुकाराम महाराज म्हणतात, वरवरचे खोटे फासे टाकून फसविणारे हे मनोविकार फार कपटी असतात. ४

१२६६ मज अंगाच्या अनुभवें । काई वाईट बरें ठावें ॥ १ ॥
जालों दोहींचा[2] देखणा । नयें मागें पुढें ही मना ॥ २ ॥
थोर वसनि[3] ठावी । परि हे चाली दुःख पावी ॥ ३ ॥
तुका म्हणे घेऊं देवा । सर्वे करूनि बोळावा ॥ ४ ॥

---

१ पणा, २ देहींचा, ३ वोसीन.

शब्दार्थ व टीपा –अगाच्या–स्वतःच्या, देखणा–पाहाणारा, वोळावा–सोबती

अर्थ –स्वतःच्या अनुभवाने मला काही बरे, वाईट असे समजून आले १ मी या दोनही बाबींना पाहाणारा झालो माझ्या मनास मागचेपुढचे काहीही येत नाही २ कधी गावची वस्ती नाही हे माहीत असूनही त्या गावास जाण्याची दुःखद गोष्ट मला करावी लागते ३ यासाठी तुकाराम महाराज म्हणतात, मार्ग सुरक्षित राखणारा देवच आपल्याबरोबर सोबती म्हणून घ्यावा ४

१२६७　पाववावें ठाया । ऐसे सर्वे बोलो तया ॥ १ ॥
भावा ऐसी क्रिया राखे । खोटया खोटेंपणें वाखे ॥ २ ॥
न ठेवू अंतर । काहीं भेदाचा पदर ॥ ३ ॥
तुका म्हणे जीवें भावें । सत्या मानविजे देवें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा –ठाया–मुक्कामास, वाखे–दुःखे

अर्थ –आम्हास योग्य मुक्कामावर पोचवावे, अशी प्रार्थना त्या ईश्वराला नहमी करीत जावी १ जसा *आपल्या मनात भाव असेल तसे त्याचे वर्तन देवापाशी होते, व देवही त्याच्याशी तसेच वागतो खोटेपणाच्या* वाटयास नानाप्रकारची दुःखेच येतात २ यासाठी देवापाशी आम्ही कसलेही अंतर न ठेवता वागू ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवालाही जीवाभावाने केलेले सत्याचे आचरणच मानवते ४

१२६८　मोल देऊनिया साटवावे दोष । नटाचे ते वेष पाहोनिया ॥ १ ॥
हरिदासा मुखें हरिकथाकीर्तन । तेथें पुण्यें पुण्य विशेषता ॥ २ ॥
हरितील वस्त्रें गोपिकांच्या वेशें । पाप त्यासरिसें मात्रागमन ॥ ३ ॥
तुका म्हणे पाहा ऐसें जालें जन । सेवाभक्तिहीन रसीं गोडी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा –मोल–किंमत, त्यासरिसे–त्यासारखे

१२६९ बहुखीदखीण। आलों[1] सोसुनियां वन ॥ १ ॥
विठोबा विसांवया विसांवया। पडों देईं पायां ॥ २ ॥
बहुतां काकुलती। आलों सोसिली फजिती ॥ ३ ॥
केली तुजसाटीं। तुका म्हणे येवढी आटी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा.–बहुखीदखीण–फार झालेल्या दुःखाचा त्रास, आटी–परिश्रम

अर्थ –अनेक जन्माच्या संसारवनातील भयानक दुःखांचा त्रास सहन करून देवा आता मी तुमच्या चरणाशी आलो आहे १ विठ्ठला, आता मनास विश्रांती मिळावी म्हणून मला तुमच्या पायां पडू द्या. २ आजपर्यंत मी पुष्कळांजवळ काकुळतीस आलो व अनेक प्रकारची फजितीही सहन केली. ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तुझी प्राप्ती व्हावी म्हणून तर मी एवढे परिश्रम केले. ४

१२७० कां गा धर्म केला। असोन सत्तेचा आपुला ॥ १ ॥
उभाउभी पाय जोडीं। आतां फांकों नेदीं घडी ॥ २ ॥
नको सोडूं ठाव। आतां घेऊं नेदीं वाव ॥ ३ ॥
तुका म्हणे इच्छा। तैसा करीन सरिसा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा.–कां गा–का रे या अर्थी, ठाव–स्थान, वाव–विसावा.

अर्थ :–देवा, तुझी प्राप्ती हे आमच्या सत्तेचे असूनही केवळ दानधर्माचे स्वरूप त्याला का रे दिलेस? १ आता मात्र तू पाय जोडून नीट उभा रहा पाहू एक क्षणही तुला मी दूर करणार नाही २ आता तू आपले स्थान बिलकुल सोडू नकोस. मीही आता तुला विसावा घेऊ देणार नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, आता माझ्या इच्छेस येईल त्याप्रमाणे मी तुझे करीन. ४

१२७१ तुमची तों भेटी नव्हे ऐसी जाली। कोरडीच बोली ब्रह्मज्ञान ॥ १ ॥
आतां न बोलावें ऐसे वाटे देवा। संग न करावा कोणांसवें ॥ २ ॥
तुह्मां निमित्यासी सांपडलें अंग। नेदावा हा संग विचारिलें ॥ ३ ॥
तुका म्हणे माझी राहिली वासना। आवडी दर्शनाचीच होती ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा–कोरडीच–व्यर्थ, नेदावा–देऊ नये, विचारले–विचार केला

अर्थ.–देवा, आता तुमची व माझी भेट होत नाही असे झाले आहे मग आता नुसतेच व्यर्थ असणारे ब्रह्मज्ञान बोलण्यात काय अर्थ आहे? १ आता देवा, कुणाशी काहीच बोलू नये व कुणाचीच संगत धरू नये असे मला वाटते २ माझी ही विसंग वागणूक तुम्हास माहीत झाली व ते एक निमित्तच सापडून तुम्ही याला संगत देऊ नये असाच विचार केला की काय? ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तुमच्या दर्शनाची माझ्या मनात एकमेव इच्छा होती, तेवढीच आता उरलेली आहे ४

१२७२ आहे तेंचि आम्ही मागों तुजपाशीं। नव्हों तुज ऐसीं क्रियानष्टें ॥ १ ॥
न बोलावीं तोच वर्में बरें दिसे। प्रकट ते कैसे गुण करूं ॥ २ ॥
एका ऐसे एका द्यावयाचा मोळा। का तुम्हां गोपाळा नाहीं ऐसा ॥ ३ ॥
तुका म्हणे लोका नाहीं कळों आले। करावें आपुलें जतन तों ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा.–नव्हों–नाहीत, क्रियानष्टें–दानाची क्रिया न करणारे, मोळान–रीत चाल.

[1] जालो

अर्थ.-देवा, तुझ्यापाशी जे देण्यासारखे आहे तेच आम्ही मागू. जवळच असून देण्यासारखा क्रियानष्टपणा तुझ्यासारखा आमच्या जवळ नाही. १ देवा, ही तुझी वर्मे बोलू नयेत हेच लोकांत बरे दिसणार आहे. तुझ्यासारख्याचे हे अवगुण मी प्रकट कसे करू ? २ गोपाळा, जे कृपादान एकास तुम्ही दिले; तीच रीत माझ्याही बाबतीत कां नाही राखीत ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, हे तुमचे गुण लोकांत समजून आले नाहीत, तोपर्यंतच तुम्ही आपले महत्त्व जतन करून ठेवावे ४.

१२७३ आम्हीं याची केली सांडी । कोठें तोंडीं लागावें ॥ १ ॥
आहे तैसा असो आतां । चित्तें[1] चिंता वाढते ॥ २ ॥
बोलिल्याचा मानो[2] सीण । भिन्न भिन्न राहावें ॥ ३ ॥
तुका म्हणे आम्हांपाशीं । धीराऐसी जतन ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा.-सांडी केली-संबंध सोडला, सीण-त्रास.

अर्थ.-आता आम्ही या देवाचा संबंधच सोडून दिलेला आहे. कारण त्याच्या तोंडी आता कुठवर लागावे ? १ आता तो जसा वागेल तसाच आम्ही त्यास समजावून घेऊ. त्याच्या संबंधीच्या काळजीने काळजी एकसारखी वाढतच राहते २ आम्ही त्यास जे जे बोलतो त्याचा वृथा शीण मात्र आम्हांस झाला. त्यामुळे देवाने व आम्ही वेगवेगळे असावे असाच संकेत दिसतो. ३ तुकाराम महाराज म्हणतात, आम्ही फार मोठ्या धीराचे जतन केले आहे. ४

१२७४ आम्हांपाशीं याचें बळ । कोण काळवरी तों[3] ॥ १ ॥
करुनि[4] ठेलों जीवेंसाटीं । होय भेटी तोंवरि ॥ २ ॥
लागलों तों न फिरें पाठी । पडिल्या गांठी वांचूनि ॥ ३ ॥
तुका म्हणे अवकाशें । तुमच्या ऐसें होवया ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपाः-काळवरी-काळापर्यंत, अवकाशें-थोड्याच अवधीत.

अर्थः-आमच्यापाशी या देवाचे बळ कोठपर्यंत चालणार ? १ आम्ही आपल्या जीवासाठी यास हृदयात धरून ठेवले आहे. आता त्याची भेट होईपर्यंत त्याला सोडणार नाही. २ आम्ही आता याच्या शोधासाठी याच्या पाठीमागे लागलो आहोत, त्याची गाठ घेतल्याशिवाय काही आम्ही आता थांबणार नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, थोड्याच अवधीत देवा, आम्ही तुमच्या बरोबरीचे होऊ. ४

१२७५ बोलिलेचि बोलें पडपडताळूनि । उपजत मनीं नाहीं शंका ॥ १ ॥
बहुतांची माय बहुत कृपाळ । साहोनि कोल्हाळ बुझाविसी ॥ २ ॥
बहुतांच्या भावें[5] वांटिसी भातुकें । बहु कवतुकें खेळविसी ॥ ३ ॥
तुका म्हणे ऐसें जाणतसों वर्म । करणें तों श्रम न वजे वांयां ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपाः-पडताळूनि-अनुभव पाहून, कोल्हाळ-गोंगाट, कटकट भातुकें-खाऊ, न वजे-जाणार नाहीन.

अर्थ-देवा, यापूर्वी साधुसंत जे जे बोलले आहेत, त्याचा अनुभव पाहूनच मी बोलत आहे. म्हणून आज माझ्या मनात कसलीही शंका येत नाही. १ देवा, तू पुष्कळांची आई असून अतिशय कृपाळू आहेस. म्हणून भक्तांची कटकट सहन करून त्यांची प्रेमाने समजूत काढतोस. २ पुष्कळांच्या मनांतील भाव पाहून त्याचप्रमाणे त्यांना खाऊ वाटतोस, त्यांना मोठ्या कौतुकाने खेळवितोस ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, हे तुझे वर्म आम्ही पूर्णपणे जाणून आहोत. त्यामुळे जे श्रम आम्ही करू ते कधीच वाया जाणार नाहीत. ४

१ चित्तें, २ मनीं, ३ तें, ४ धरूनि, ५ नावें.

१२७६ कोठें भोग उरला आतां । आठवितां तुज मज ॥ १ ॥
आड कांहीं नये दुजें । फळ बीजें आणिलें ॥ २ ॥
उद्वेग ते[1] वांयांविण । कैंचा सीण चिंतनें ॥ ३ ॥
तुका म्हणे गेला भ्रम । तुमच्या धर्में पायांच्या ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :-भोग-प्रारब्ध, दव, सीण-त्रास.

अर्थ:-देवा, आता एकदा तुझी आठवण स्मरणपूर्वक केल्यानंतर माझा प्रारब्धभोग कुठून उरणार ? १ आता तुझ्या भेटीच्या आड काहीही येणारे नाही. तुझ्या नामस्मरणाचे बीज अशा रीतीने चांगलेच फळास आले. २ तुझ्या स्मरणाने मनातील उद्वेग निघून गेला. सर्व त्रास नाहीसा झाला. ३ तुकाराम महाराज म्हणतात, तुमच्या पायांच्या कृपेने माझा संसारविषयक भ्रम पूर्णपणे नाहीसा झाला. ४

१२७७ संसार तो कोण देखे । आम्हां सखे हरिजन ॥ १ ॥
काळ ब्रह्मानंदें सरे । आवडी उरे संचली ॥ २ ॥
स्वप्नीं ते ही नाहीं चिंता । रात्री जातां दिवस ॥ ३ ॥
तुका म्हणे ब्रह्मरसें । होय सरिसें भोजन ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:-संचली-साठलेली, सरिसें-बरोबर.

अर्थ:-आता वरवरच्या संसाररूपास कोण पाहते ? कारण आता हे ईश्वरभक्तच आमचे सखे झाल्यामुळे आम्हांस संसाराची काय चिंता ? १ आता आमचा काळ ब्रह्मानंदाच्या प्राप्तीत जात आहे. त्याविषयीची आवड आमच्या हृदयात साठवून भरलेली आहे. २ रात्री आणि दिवस मोठ्या सुखाने जात आहेत. स्वप्नातही कसली चिंता आता आम्हांस नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, आता या हरिभक्ताच्या बरोबर रोज आम्हांस ब्रह्मरसाचे भोजन मिळत आहे. ४

विवरण : या एका लहानशा अभंगात तुकोबांच्या आत्मतृप्तीचे उद्‌गार फार समर्पक रीतीने व्यक्त झाले आहेत. एकदा साधुसंतजन व प्रभुकृपेतील भक्त हेच सखेसोयरे झाल्यानंतर संसाराची चिंता कुणासही उरत नाही. सर्व जीवित ब्रह्मानंदाच्या प्राप्तीत व्यतीत होते. याच देहाने याच जगात ब्रह्मपदाची अनुभूती येते. मनास कसलीही चिंता कधी स्वप्नातही वाटेनाशी होते. हरिभक्ताच्या पंगतीत रोज ब्रह्मरसाचे सेवन करून नित्य नवी पक्वान्ने चाखण्यातील सुख अवीटच मानावे लागेल.

१२७८ पडियेलों वनीं थोर चिंतवनीं । उसीर कां आझूनि लावियेला ॥ १ ॥
येई गा विठ्ठला येई गा विठ्ठला । प्राण हा फुटला आळवितां ॥ २ ॥
काय तुज नाहीं लौकिकाची शंका । आपुल्या बाळका मोकलितां ॥ ३ ॥
तुका म्हणे बहु खंती वाटे जीवा । धरियेलें देवा दुरी दिसे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:-चिंतावनीं-चिंतेच्या अरण्यात, लौकीकाची-कीर्तीची, मोकलितां-टाकून देताना, खंती-काळजी.

अर्थ:-देवा, विठ्ठला, मी या संसाराच्या चिंतेच्या घोर अरण्यात सापडलो आहे. तू उशीर का लावीत आहेस ? माझ्या रक्षणार्थ का धावून येत नाहीस ? १ अरे विठ्ठला, तू लौकर माझ्या साहाय्यासाठी धावत ये रे. तुझी प्रार्थना करता करता माझा प्राण फुटत चालला आहे. २ तू भक्तवत्सल आहेस, पतितपावन आहेस, या

[1] तो.

लौकिकाची रिया कीर्तीची काही काळजी तुला आहे की नाही? तुझ्या आपल्या बालकास दूर टाकून देत आहेस तू! ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, माझ्या जिवाला फारच काळजी वाटत आहे रे तू मला एवढे दूरवर का धरले आहेस? ४

विवरण तुकाराम महाराजांच्या कारुण्याच्या वृत्तीच्या अभंगातील हा एक उत्तम अभंग आहे विठ्ठला, विठ्ठला, करून कंठ सुकून गेला तरी विठ्ठल स्वतःवर कृपा करीत नाही, याची चिंता बुवांच्या मनास फार मोठी लागून राहिलेली आहे त्याचा प्राण फुटून चालला आहे एवं मारखा आक्रोश कंठ फुटेपर्यंत देवामाठी करण्याने भक्तीची भावना प्रबळ होत जाते चित्त द्रवून जाते, आणि ज्याच्यासाठी हा टाहो फोडणे सुरू असते, तो ईश्वरही या करुण वाणीच्या आळवणीमुळे पाझरतो त्याजही दया वाटते या दयेच्या, कृपेच्या, परमेश्वरभेटीच्या आनंदाचाही स्वानुभव तुकोबांनी अनेकदा वर्णन केला आहे याच्या आधीच्याच अभंगात ही तृप्तता आढळून येईल

१२७९ आपुले गावींचे न देखेसे जाले । परदेसी एकले किती कंठू ॥ १ ॥
म्हणऊनि पाहें मूळ येता वाटे । जीवलग भेट कोणी तरी ॥ २ ॥
पाहता अवघ्या दिसतील दिशा । सकळ ही वोसा दृष्टीपुढें ॥ ३ ॥
तुका म्हणे कोणी न सगे वारता । तुझी वाटे चिंता पांडुरंगा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा–मूळ–आमंत्रण यालावण, वारता–वार्ता, हकीगत

अर्थ–आपल्या गावी असणारे परिचित असे भक्तजन आता दिसेनासे झाले मग या परदेशातील मी आता किती दिवस एकटेपणाने दिवस काढू? १ म्हणूनच देवा तुम्ही मला प्रेमाने बोलावणे पाठवाल, याची वाट मी पाहात आहे कारण त्यायोगे कुणीतरी माझा जिवलग तेथे भेटेल असा भरवसा मला आहे २ आता मी सभोवती बघत आहे तो सर्वत्र दिशा मला उजाड दिसत आहेत ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, सर्वजण भेटतील अशी वार्ता मला कुणीच कसे सांगत नाहीत? तुझी ही वार्ता मला समजत नसल्याने पांडुरंगा, मला भारी चिंता वाटत आहे ४

विवरण तुकोबासारख्या साधुसंतांना श्रीविठ्ठल किंवा त्याचे भक्त यांच्याशिवाय इतर कुणीही जिवलग सगे सोयरे नसतात त्यामुळे साधुजनांची संगत कमी झाली की त्यांचा जीव तगमगू लागतो आपण दूर देशात पडलो असल्याची तीव्र जाणीव त्यांना राहून राहून होत असते कुणी जिवलग आपल्याच आवडीचा भेटेल की काय? याच्या चिंतेत ते असतात 'माझिया जातीचा मज भेटो कोणी' अशी उत्कंठा त्यांना लागलेली असते कुणी प्रिय प्रभूची अथवा त्याच्या भक्तांची हकीगत सांगतील का? म्हणून त्यांची विचारणा असते या दृष्टीने या अभंगाचे महत्त्व आहे पुढे तुकोबा स्वतः आजारी असताना त्यांच्या मनाचा तगमग जी झाली तिचेही वर्णन अभंग क्र १९०९ पासून सहासष्ट अभंग आहेत ते या संदर्भात पाहण्यासारखे आहेत प्रिय व्यक्तींच्या चिंतेने जीव किती व्यथित होतो, याचा उत्तम नमुना या अभंगातून सापडेल

१२८० जन तरी देखे गुंतले प्रपंचे । स्मरण तें त्याचे त्यासी नाहीं ॥ १ ॥
म्हणऊनि मागें परतलें मन । घालणीचे रान देखोनिया ॥ २ ॥
इंद्रियांचा गाजे गोंधळ ये ठायीं । फोडीतसे डोई अहंकार ॥ ३ ॥
तुका म्हणे देवा वासनेच्या आटें । केलीं तळपटें बहुतांचीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा घालणीचें–घात करणारे आटें–अतिरेकान, तळपटें–नाश

अर्थ–भोवतालचे लोक पाहावेत तर ते सर्व आपल्या प्रपंचातच रमून गेलेले दिसतात. त्याचे त्यानाच आत्मोद्धाराचे स्मरणही नसते. १ असे असल्यानेच माझे मन त्यांच्या संगतीतून मागे फिरले आहे. घात करणारे संसारवन त्यास मानवेनासे झाले आहे २. या लोकांच्यात इंद्रियसुखाचा गोंधळच मोठा तयार झाला आहे. त्यामुळे अहंकाराची वृत्ती ज्याचे त्याचे डोके फोडणारी बनली आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, इंद्रिय-सुखांच्या अतिरिक्त वासनेने सर्वांचाच नाश केला आहे. ४

१२८१ धांवे त्यासी फावे[1] । दुजें उगवूनि गोवें ॥ १ ॥
घ्यावें भरूनियां घर । मग नाहीं येरझार ॥ २ ॥
धणी उभें केलें । पुंडलिकें या उगलें ॥ ३ ॥
तुका म्हणे ठसा । गेला पडोनियां ऐसा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा–गोवें–गुंता, येरझार–जन्ममरण, धणी–स्वामी, जगाचा मालक, उगलें–शांत, ठसा–प्रसिद्धी.

अर्थ–देहात्मबुद्धीच्या भ्रमाच्या गुंत्यातून सोडवून घेऊन जे विठ्ठलाकडे धाव घेतात, त्यानाच त्याच्या स्वरूपाची प्राप्ती होते. १ आपले अंतःकरणरूपी घर या प्रभूच्या वास्तव्याने भरून घ्यावे. मग जन्ममरणाची कटकट काही राहणार नाही. २ याच विश्वासाच्या जोरावर पुंडलीक महामुनीने विश्वाचा हा स्वामी शांत स्वरूपात विटेवर उभा केला आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, याविषयी अशी प्रसिद्धी साऱ्या जगात आधीच झालेली आहे. ४

१२८२ लहानपण दे गा देवा । मुंगी साखरेचा रवा ॥ १ ॥
ऐरावत रत्न थोर । तया अंकुशाचा मार ॥ २ ॥
ज्याचे अंगीं मोठेंपण । तया यातना कठीण ॥ ३ ॥
तुका म्हणे जाण । व्हावें लहानाहूनि लहान ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:–ऐरावत–इंद्राच्या हत्तीचे नाव.

अर्थ–अरे देवा, मला आपले तू लहानपणच दे ना. कारण मुंगी अगदी लहान असल्यानेच तिला साखरेचे कण खावयास मिळतात. १ उलट इंद्राचा ऐरावत हत्ती किती थोर! पण त्यास मात्र रोज अंकुशाचा मार खावा लागतो. २ ज्याच्या अंगी मोठेपणा आहे त्याला फार मोठ्या यातना सहन कराव्या लागतात ३ म्हणून तुकाराम महाराज म्हणतात, आपण लहानापेक्षाही लहान व्हावे, असे ध्यानात असावे ४

१२८३ नीचपणा बरवें देवा । न चले कोणाचा ही दावा ॥ १ ॥
महा पुरें झाडें जाती । तेथें लव्हाळे राहाती ॥ २ ॥
येतां सिंधूच्या लहरी । नम्र होतां जाती वरि ॥ ३ ॥
तुका म्हणे कळ । पाय धरिल्या न चले बळ ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा–नीचपण–हलकेपण, बरवें–चागले, कळ–वर्म.

अर्थ–देवा, लहानपण, हलकेपणच मला फार चागले वाटते. कारण लहानपणाचा कुणीही मत्सर करीत नाही, कुणी हेवादावा साधीत नाही. पाहा ना, नदीला महापूर आला तर मोठमोठी झाडे वाहून जातात, मोडून पडतात; पण नम्रपणाने पाण्याखाली वाकणारे लव्हाळ्याचे गवत मात्र वाचते. २ सागरावरच्या मोठमोठ्या लाटा

जरी उसळल्या तरी त्यांच्या पुढे नम्र होतात त्या त्यांच्या पाठीवरून जातील व त्यांच्या जीविताचे रक्षण होईल ३ तुकाराम महाराज म्हणतात, सर्वांत खाली असणारे पाय मनोभावे धरल्यास मोठमोठ्या बलवान माणसांचेही मग काही चालत नाही, असे नम्र होण्यातील वर्म आहे ४

विवरण : वरील दोनही अभंग मराठी भाषेत फारच प्रसिद्ध असे आहेत नम्रत्वाचे, लीनपणाचे, लहानपणाचे महत्त्व साध्या साध्या दृष्टान्तांच्या साहाय्याने तुकारामबुवांनी फारच थोडक्या शब्दांत विशद केले आहे 'जया अंगी मोठेपण, तया यातना कठीण,' 'महापुरे झाडे जाती तेथें लव्हाळे राहाती' इत्यादी ओळी मराठी भाषेत चटकदार व अर्थवादी सुभाषिते अथवा म्हणी म्हणूनच मान्यतेस पावल्या आहेत अगदी थोडक्या शब्दात मानवी अनुभवाचे सार सांगण्याची फार चांगली कुशलता या अभंगातून बुवांनी व्यक्त केलेली आहे पुढच्या मानवजातीसही सार्वकालिक सत्याचा पडताळा या ओळीतून वारंवार घेण्यासारखा आहे लीनत्व, नम्रत्व या दुर्मिळ होत जाणाऱ्या गुणाचा पुरस्कार पुन पुन्हा संत करीत असतात, त्यातील मर्महि समजावून घेण्यासारखे आहे भोवती सर्वत्र अरेरावी, महत्त्वाच्या पदासाठी धडपड, द्वेषमत्सर, यांची वाढ सतत होते मी मोठा, की तू मोठा असा अभिमान बळावतो, आणि अनिष्ट अशी स्पर्धा सुरू होते या स्पर्धेत कुणासही कधी शांती लाभत नाही मानवी प्रगतीसाठी स्पर्धा आवश्यक असली तरी द्वेष, मत्सर, अप्रामाणिकपणा यांच्या मदतीने मोठेपणा मिळविणाऱ्यांची पंगत पाहाण्यापेक्षा लहानपणात व नम्र वृत्तीत संतुष्टता मानणाऱ्यांचे महत्त्व विशेष मानावे लागेल

१२८४ उष्टया पत्रावळी करूनिया गोळा । दाखविती कळा कवित्वाची ॥ १ ॥
ऐसे जे पातकी ते नरकीं पचती । जोंवरी भ्रमती चंद्रसूर्य ॥ २ ॥
तुका म्हणे एक नारायणा ध्याई । वरकडा वाहीं शोक असे ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा –उष्टया पत्रावळी–आधी होऊन गेलेल्या कवींचे भ्रष्ट अनुकरण, कळा–कौशल्य, पचती–खितपत पडतात, वरकड–इतर मार्ग

अर्थ —कितीतरी सामान्य कवी आधी होऊन गलेल्या थोर कविश्रेष्ठांच्या कवितेमधील शब्द उसने घेऊन आपल्या कवितेचे कौशल्य दाखवितात १ असे जे कुणी भ्रष्ट कवी असतील ते पातकीच असून नरकामध्ये मात्र खितपत पडतात चंद्रसूर्य जोपर्यंत आकाशात भ्रमण करतात, तोपर्यंत त्यांचा नरकवास सुटत नाही २ तुकाराम महाराज म्हणतात, म्हणून त्या एका परमेश्वराचेच गुणगान करावे, त्यालाच शरण जावे इतर मार्गांत पडल्यास वृथा शोक मात्र होईल ३

विवरण तुकाराम महाराजांच्या वेळी जशी अध्यात्माची, परमार्थाची, धर्मविचाराची भ्रष्ट नक्कल होऊन सर्वसामान्य जनांची फसवणूक भोंदू साधूकडून होत असे त्याचप्रमाणे या भोंदु साधुमताच कविवही तसेच भ्रष्ट व अनुकरणाचे असे त्याला प्रासादाची चवा कधीच नसे कवित्वाची वरवर कला दाखवून, जुन्या श्रेष्ठ कवींच्या शब्दांची भ्रष्ट नक्कल करून साधुत्वाचा आव आणणार भोंदू संत कवित्वाचाही पसारा मांडीत असत त्यांच्या वेळी श्रेष्ठ कवित्वाचा व्याख्याही ठरलेला असे वाचे बरवें कवित्व । कवित्वीं बरवें रसिकत्व । रसिकत्वीं परतत्त्व– । स्पर्शु जैसा ॥ अशी सत्काव्याची व्याख्या श्रीज्ञानेश्वर महाराजांनी केलेली आहे श्रेष्ठ कवित्वात नुसती रसवत्ता असून चालणार नाही त्याला परतत्त्वाचा अध्यात्मविचाराचा, ईश्वरभक्तीचा स्पर्श असेल तर त्याची गणना श्रेष्ठ कवितेत होऊ शकते असा संतांचा अभिप्राय आहे शृंगारादी नवरसांत भक्तीचा शांतरस त्यांना श्रेष्ठ वाटतो 'शृंगारादि नवरस । हे येथें दिसती विरस । तें परब्रह्म एकरस । जाणावें प ' अशा परब्रह्मरसाची महती आदिकवी श्री मुकुंदराज यांनी वर्णन केली आहे शृंगारादिक रसांच्या माथ्यावर पाय ठेवून, म्हणजे त्यांना दूर सारूनच शांत रस 'समुद्राहूनि सखोल । अथ भरित ' अशा पदवीप्रत पोचतो असा श्रीज्ञानेश्वरांचा अभिप्राय आहे 'भक्तिज्ञानारहित

गोष्टी न कराव्या ' असा इशारा एकनाथानी दिलेला आहे कविता प्रासादिक म्हणजे ईश्वरी कृपेने परिपूर्ण कोणती? रामदासानी या विषयाची चर्चा करून निर्णय दिला आहे की, ' देवाचेन प्रसन्नपणें । जे जें घडे बोलणे । तें ते अत्यंत श्लाघ्यवाणे । या नाव प्रासादिक ॥' साराश असा की, कवित्वास परमार्थविचाराचा, ईश्वरी प्रेमाचा स्पर्श नसेल तर ते व्यर्थच होय, असा भावार्थ सर्व संतवचनाचा आहे

आणि असे ईश्वरी प्रेम भोंदू साधुसतात कधीच नसते त्याचे लक्ष पैशाकडे, लौकिक प्राप्तीकडे असल्याने त्याना खऱ्या भक्तीचा, अथवा ईश्वरप्रेमाचा विचार माहीतच नसतो त्यामुळे त्याच्या कवित्वाचे नाणे खोटे पडते केवळ कविता, अगदी नवरसात्मक कविता केली तरी ते कधी खऱ्या अर्थाने नसतात, सत तर नसतातच, ' नव्हती ते सत करिता कवित्व । काय कवित्वाची घालूनिया रूढी । करू जोडाजोडी अक्षराची ॥ ' असे तुकोबानी स्पष्टपणे म्हटले आहे. ' नव्हे कवित्व हें टाकसाळी नाणे ' असा शब्दात त्यानी खऱ्या प्रासादिक कवित्वाचे वर्णन केले आहे, टाकसाळीत पडणाऱ्या नाण्याप्रमाणे कवित्वाचे शब्द पडत नाहीत ते ईश्वरी कृपेने आपोआप उमटावे लागतात दुसऱ्याच्या कृतीचे अनुकरण करून काम भागत नाही

१२८५ आवडीच्या मतें करिती भजन । भोग नारायणे म्हणती केला ॥ १ ॥
अवघा देव म्हणे वेगळें ते काय । अर्थासाटीं डोय फोडूं पाहे ॥ २ ॥
लाजे कमंडलु धरिता भोपळा । आणीक थीगळा प्रावरणा ॥ ३ ॥
शाला गडवे धातुद्रव्यइच्छा चित्तीं । नैश्वर्य बोलती अवघें मुखें ॥ ४ ॥
तुका म्हणे यास देवा नाहीं भेटी । ऐसे कल्पकोटि जन्म घेता ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा .– डोय–डोळे थीगळा–ठिगळे, प्रावरणा–वस्त्राना, नैश्वर–नाश पावणारे, कल्पकोटि–कोटयावधी कल्प, वर्षे

अर्थ — नुसते कोरडे ब्रह्मज्ञानी अथवा शब्दज्ञानी कसे असतात पाहा आपापल्या आवडीप्रमाणे नाना प्रकारचे पदार्थ करून भोजन करतात व पुन स्वत ची आवड बढवून ठेवतात व म्हणतात की, परमेश्वर सर्व भोगणारा आहे त्यानेच आमच्या मुखाने भक्षण केले १ सर्वत्र देवच आहे हे वरवर मानतात देवाशिवाय या जगात वेगळे काय आहे ? तेव्हा वाटेल तसा पैसा मिळवावयास काय हरकत आहे ? असे मानून हे शब्दज्ञानी पैशासाठीं एकमेकाची डोकी फोडतात २ याच्यापाशी कमडलू पाण्यासाठी असतो यानी भिक्षेसाठी भोपळ्याचे पात्र घेतलेले असते याच्या वस्त्राना ठिगळेही दिसतील, पण या वस्तू याच्या मनीचा कोरडा भाव पाहून लज्जित होतात किंवा असाही अर्थ की, कमडलू, भिक्षापात्र, जीर्ण वस्त्रे याला धारण करतांना या भोंदी माणसाना लाज वाटते ३ ही सर्व ढोंगी माणसे हे सर्व जग व दृश्य सृष्टी नाशवत आहे, असे म्हणतात, पण याच्या मनात मात्र भरजरी शाली, धातूचे गडवे आणि नाना द्रव्ये याची इच्छा असते ४ तुकाराम महाराज म्हणतात,अशा प्रकारच्या ढोंगी शब्दज्ञान्यानी कोटयावधी वर्षे जन्म घेतला तरी कधी देवाची भेट होणार नाही ५

१२८६ म्हणता[१] हरिदास का रे नाहीं लाज । दीनास महाराज म्हणसी हीना ॥ १ ॥
काय ऐसे पोट न भरे तें गेले । हालविसी कुले सभेमाजी ॥ २ ॥
तुका म्हणे पोटें केली विटंबना । दीन जाला जना फोंव भाकी ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा – हरिदास– हरीचा दास, कथाकार, कीर्तनकार, कुले–ढुगण

अर्थ .–अरे हीन माणसा, स्वत ला कीर्तन करणारा हरिदास म्हणविताना तुला लाज कशी रे वाटत नाही ? दीन झालेल्या लोकांकडून महाराज म्हणवून घेतोस ? याचाही सकोच नाही वाटत तुला ? १ ईश्वरी प्रेमाचे कीर्तन करण्याचे सोडून वेडेवाकडे हावभाव करून ढुगण नाचवतोस तू ! असे वेडेचार तू का करतोस ? याखेरीज तुझे पोट भरेनासे झाले की काय ? २ तुकाराम महाराज म्हणतात, केवळ पोटासाठी याने अशी विटंबना करवून घेतली आहे दीन होऊन पोटासाठी हा लोकांपुढे भीक मागत आहे ३

---

१ म्हणविना

विवरण –थोर सतकवींचे अनुकरण करून कवित्वाचे सोंग आणणाऱ्यांची जशी निर्भर्त्सना तुकोबांनी केली आहे, तशीच ती केवळ पोटासाठी हरिदासाचा धंदा करणाऱ्यांचीही केली आहे मनात प्रभूविषयी प्रेम नसताना केवळ बिदागी मिळाली म्हणून कथाकीर्तन करणाऱ्याचा दंभ तुकारामांनी या अभंगात व्यक्त केला आहे नाना प्रकारचे वेडेविद्रे व शृंगारमिश्रित हावभाव करून सवंगपणे लोकांचे मनरंजन करणार विशेष हरिदास बुवाबाजीच्या वेळी असावेत केवळ पोटासाठी चालणाऱ्या प्रथेची, परपरेची विटंबना करणाऱ्यांवर बुवांनी अनेक प्रसंगी प्रहार केले आहेत प्रभुप्रेमाची रंगत कीर्तनात असावी, हरिदास ईश्वरभक्तीत तल्लीन झालेला असावा याविरुद्ध केवळ नृत्यसंगीतात शृंगारिक हावभावात मोठ्या बिदागीच्या लोभात गुंतणारा मनुष्य हरिदास कसा मानावा ? असा प्रश्न तुकाराम महाराजांनी उपस्थित केला आहे

कीर्तन करणाऱ्याने लौकिक प्राप्तीचीच केवळ इच्छा मनात ठेवू नये, वेडवाकडे विकारोत्पादक हावभाव निर्माण करू नयेत, पोटासाठीच हा धंदा करू नये, याविषयी सर्वच मताचा कटाक्ष असे ' करूनी हरिकीर्तन । तेथें सेविती जे अन्न । ऐसे अभागी खळ । परम चांडाळ कलीयुगी ', ' करूनी कीर्तन मागती जे द्रव्य । तें जाणावें वैधव्य विधवेचें ' अशा शब्दात एकनाथांनी या धंदेवाईक हरिदासाचा हेटाळणी केली आहे ' कथा करोनिया द्रव्य घेती देती । तया अधोगति नरकवास ', ' कथा करोनियां मोल ज्याचे घेती । तेही दोघे जाती नरकामध्यें ' असा इशारा तुकोबांनी दिलेला असून ' जेथें कीर्तन करावें । तेथें अन्न न सेवावें ' असा एक नियमही त्यांनी सांगितला आहे

१२८७ रिद्धिसिद्धी दासी कामधेनु घरीं । परि नाहीं भाकरी भक्षावया ॥ १ ॥
लोडें बालिस्तें पलंग सुपति । परि नाहीं लंगोटी नेसावया ॥ २ ॥
पुसाल तरि आम्हा वैकुंठीचा वास । परि नाहीं राहावयास ठाव कोठें ॥ ३ ॥
तुका म्हणे आम्ही राजे त्रैलोक्याचे । परि नाहीं कोणाचे उणें पुरें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – रिद्धीसिद्धी–ऋद्धी व सिद्धी या दोन दासी गणपतीच्या यांच्या साह्याने संपत्ती व परिपूर्णता यांची प्राप्ती होत असते तपस्या प्राप्त करूनही मिळालेले ऐश्वर्य बालिस्तें–तक्क्या वगैरे, सुपति–गादी, ठाव–स्थान

अर्थ – सर्व प्रकारचे सामर्थ्य अंगी असूनही आपण कसे निर्लेप व निरिच्छ आहोत हे दर्शविण्यासाठी तुकाराम बुवा म्हणतात, आमच्या पायाशी रिद्धीसिद्धी या दासी कामधेनूप्रमाणे काय हवे ते देणाऱ्या आहेत पण आम्हीच निरिच्छ व उदासीन असल्यामुळे आम्हास दुपारची घड भाकरीही खायला मिळत नाही १ आमच्याकडे लोड, तक्के गाद्या, पलंग इत्यादी सुखदायक गोष्टी असूनही प्रत्यक्ष अनुभव असा की, आम्हास नेसायला बोटभर लंगोटीही कधी मिळत नाही २ आमचे निवासस्थान कुठे असते ' असे विचाराल तर ते परमेश्वरापाशी वैकुंठात असते, पण याच कारणामुळे आम्ही कुठे एकाच ठिकाणी आहोत असे दिसत नाही आमचे राहणे एकाच स्थानावर कधीही नसते ३ तुकाराम महाराज म्हणतात, तसे पाहिले तर आम्ही खरे म्हणजे त्रैलोक्याचे राजे आहोत, पण आम्ही कोणाचे उणेंदुणे लागत नाही आम्ही सर्व बाह्य उपचारापासून अलिप्तच आहोत ४

१२८८ घरोघरीं अवघें जालें ब्रह्मज्ञान । परि मेळवण बहु माजी ॥ १ ॥
निरें कोणापाशीं होय एक रज । तरि द्या रे मज दुर्बळासी ॥ २ ॥
आशा तृष्णा माया कालवूनि दोन्ही । दंभ तो दुरोनि दिसतसे ॥ ३ ॥
काम क्रोध लोभ सिणवी बहुत । मेळवूनि आंत काळकूट ॥ ४ ॥
तुका म्हणे तेथें काहीं हाता नये । आयुष्य मोले जाये वायाविण ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – अवघें– सर्व, मेळवण–मिश्रण, निरें–खरेखुरे, शुद्ध स्वरूपाचे, सिणवी–त्रास देतात, मेळवूनि–मिसळून, काळकूट— भयानक विष

अर्थ -घरोघरी आज सर्वत्र ब्रह्मज्ञानाच्याच पोकळ गोष्टी बडबडताना लोक दिसतात पण त्याच्यात पुढील दोषाचेच चित्रण फार मोठे असते १ जर कुणाजवळ खरेखुरे, शुद्ध स्वरूपातील ब्रह्मज्ञान असेल तर मला दुर्बलाला ते कुणी थोडे तरी द्या हो. २ प्रत्येक घरी दिसणाऱ्या या ब्रह्मज्ञानाबरोबर आशा, तृष्णा, माया याचे चित्रण झालेले असून, दुरून पाहाणारासही त्यातील दंभ स्पष्टपणे दिसून येतो ३ त्याच्यात कामक्रोधलोभ याच्याकडून दोष मिसळले असल्यामुळे हे बोध फारच त्रासदायक होत आहे ४ तुकाराम महाराज म्हणतात, अशा प्रकारच्या वृथा ब्रह्मज्ञानानें कशाचीही प्राप्ती होणार नसून किमतवान आयुष्य मात्र विनाकारण वाया जाते ५

विवरण -तुकाराम महाराजाच्या वेळी सर्वत्रच ढाग पसरले होते दाढीजटा वाढवून, भगवी वस्त्रे घालून, कवित्वाची ऐट आणून जो तो संत झाला होता व लोकाना भुलवीत होता घरोघरी ब्रह्मज्ञानाच्या गोष्टी वाचाळपणे बोलल्या जात होत्या अतरंगात भक्तीचा जिव्हाळा नाही, खरीखुरी ज्ञानजिज्ञासा नाही, परतु लोकाना फसविण्यासाठी वरवरचे ढाग मात्र सर्वत्र दिसत होते बुवानी या बाह्य डामडौलाचा तिरस्कार वारवार केला आहे. ब्रह्मज्ञानाच्या वरवरच्या गोष्टी बोलणारे व सर्वसामान्य लोकाना फसविणारे लोक नाना प्रकारचे होते कन्या, गाय, कथा याची विक्री करणारे होते, शकुन सागणारे होते भगवा वेष धारण करणारे होते, जटा वाढवून अगात भुते आणणारे होते वहुत पाठातर करूनही धर्म न जाणणारे होते, 'अगी लावूनिया राख । डोळे झाकूनि करिती पाप ' अशाही जातीचे काही होते ' टिळा टोपी उंच दावी । जगीं मी एक गोसावी ' असे म्हणणारे काही होते कुणी शिवाला न ओळखणारे जगम होते, कुणी ' नेसोनि कौपीन शुभ्रवर्ण जाण । पाहाती पक्वान्न क्षेत्रीचे ते ' अशा प्रकारचेही होते कुणी ' कान फाडूनिया मुद्राते घालती । परी शकरासी नोळखती ' या जातीचे होते, कुणी सन्यासी होते, कुणी सर्वांगावर विभूतीचे लेपन करणारे होते, कुणी विषयाची वासना मनात धरून वरवरचा वेष साधूचा करणारे होते, कुणी डोक्यास केस वाढवून अगात भुते आणणारे होते, कुणी तोडात सतत ' तमाखूची नळी ' धारण करून देव देव करणारे होते कुणी कवित्वाचा माड माडून दुसऱ्याचे उणेदुणे काढून भाडखोर बनले होते, ' घरोघरीं झाले कवी नेणे प्रसादाची चवी ' अशा प्रकारचे कवी घरोघरी होऊन कविता गवताप्रमाणे उदड वाढली होती. कुणी तीळतांदुळ यज्ञामध्ये जाळून उगाच मानदभ वाढवीत होते कुणी तीर्थयात्रात गुतून होते, कुणी बहुरूप्याचे साग घेऊन लोकाना फसवित होते अशा लोकात कमलेही भक्ती नव्हती, ईश्वराविषयी प्रेम नव्हते म्हणूनच तुकारामबुवा म्हणतात, निखळ व शुद्ध स्वरूपाचे ब्रह्मज्ञान मला कुठे तरी दिसेल काय? मला दुर्बळास कुणी ते आणून देतील काय? असे बुवा या अभगात विचारीत आहेत

१२८९ अवघ्या भूताचे केले संतर्पण । अवघीच दान दिली भूमि ॥ १ ॥
अवघाचि काळ दिनरात्रशुद्धी । साधियेली विधि पर्वकाळ ॥ २ ॥
अवघींच तीर्थें व्रतें केले याग । अवघेंचि साग जाले कर्म ॥ ३ ॥
अवघेंचि फळ आले आम्हा हाता । अवघेंचि अनता समर्पिले ॥ ४ ॥
तुका म्हणे आता बोलो[1] अबोलणे । कायावाचामने उरलो नाहीं ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा -भूताचें-प्राणिमात्राना, सतर्पण-तृप्तीचे दान, याग-यज्ञ, साग-परिपूर्ण

अर्थ - आम्ही आमचे सर्वस्व सर्व प्राणिमात्राना तृप्तीचे दान देऊन टाकले आहे दानातील श्रेष्ठ दान जे भूमिदान, तेही आम्ही सर्व देऊन टाकले आहे १ दिवस व रात्र असा सब काळ शुद्ध स्वरूपाचा करून आम्ही त्याला पर्वकाळाचे स्वरूप प्राप्त करून दिले आहे २ आम्ही सव तीर्थयात्रा केल्या व्रते केली यज्ञयागादी कर्मे केली सर्व कर्मे आमची यथासाग झाली आहेत ३ या सर्व साधनाचे फळ जे आमच्या हातात आले तेही आम्ही त्या श्रीहरीलाच समर्पण केले आहे ४ तुकाराम महाराज म्हणतात, आता आम्ही मूक राहूनच सर्व काही बोलू स्तब्ध, काही न बोलता राहणे हेच आमचे बोलणे असून आम्ही आता आमचे कायावाचामनें करून उरलेलो नाही ५

विवरण - सर्व वासना व चित्तातील विकल्प-सकल्प एकदा परमेश्वराच्या रूपात मिळून गेल्यावर सत्पुरुषाच्या मनाची धारणा कशी होत असते याचे मोठे वेधक व समर्पक वर्णन तुकोबानी या अभगात केले आहे त्याने

[1] बोलणे

सर्वस्वाचे दान केलेले असते सर्व काळ त्याला पवकाळाएवढाच पवित्र व पुण्यवान वाटतो सर्व तीर्थयात्रा, यज्ञयाग त्याचे यथासांग पार पडलेले असतात आणि या सर्वांचे जे फळ प्राप्त झालेले असते, तेही त्याने भगवतालाच अर्पण केलेले असते मग मात्र तो स्वस्थ चित्ताने स्थिर होतो त्याच्या मनातील सर्व शंका, आशंका फिटतात, सर्व विकल्प संपतात, सर्व विकल्प जळून जातात कायेने म्हणजे शरीराने, मनाने, वाचेने तो स्वतःचा उरत नाही त्याचे अबोल्पणच वक्तृत्वपूर्ण असते म्हणजे त्याच्या मूकपणातही बोलण्याचे सर्व फायदे असतात

भागवत संप्रदाय किंवा वारकरी पंथ मुख्यतः भगवद्गीतेच्या तत्त्वज्ञानावर उभारलेला असल्यामुळे सर्व कर्मे भगवंतालाच समर्पण करणे, वा ज्या ज्या क्रिया होतात त्या सर्व भगवंताकडूनच होत आहेत, असे मानणे याचा उगम गीताप्रणीत फलत्यागाच्या सिद्धान्तात आहे 'मत्कर्मपरमो भव', 'सर्वकर्मफलत्यागं ततः कुरु यतात्मवान्' म्हणजे माझ्यासाठी कर्मे करायला तयार हो, सर्व कर्मफलाचा त्याग कर, इत्यादी आदेश गीतेचे आहेत ते सर्व संतांच्या मतात उमटलेले असतात गीताप्रणीत हा सोपा उपाय यज्ञयागादी कर्मकांड, तीर्थयात्रा, व्रतवैकल्ये याच्यापेक्षा सर्वांना सुलभ असा आहे म्हणूनच ज्ञानेश्वरांनी 'इंद्रियें न कोंडी । भोगातें न तोडीं' असा उपदेश करून सांगितले आहे की, 'परि मनें वाचा देहें । जैसा जो व्यापारु होये । तो मी करितु आहे । ऐसे न म्हणे, 'जे जे आपण करीत आहो, ते मी करीत आहे, असे न मानणे हाच एक श्रेष्ठ उपाय या संतांनी सांगितला आहे तुकाराम महाराज म्हणतात, 'काया वाचा मनें उरलें नाही' यातील अर्थ हाच 'करणें का न करणें । हे आघवें तोचि जाणे' अशी स्थिती असल्यामुळे कर्तृत्व आपण स्वतःकडे कधीही घेऊ नये

परंतु सर्व कर्तृत्व परमेश्वराकडे आहे असेही समजणे अशक्य असेल तर मग सर्व कर्मफलाचा त्याग करायला तयार व्हावे अवघे फळ अनंताला अर्पण करण्याची तुकारामांची ही रीतही गीताप्रणीत धर्मास धरूनच आहे ज्ञानेश्वरांनी हा सोपा उपाय सांगताना म्हटले आहे, 'आणि जेणें वेळें । घडतीं कर्में सकळें । तयांचीं तियें फळें । त्यजितु जाय' ज्या ज्या वेळेस जे जे कर्म होईल, त्या त्या वेळचे कर्म परमेश्वराला अर्पण करावे वृक्ष आणि वेली आपली फळे नाही का दुसऱ्यासाठी देत ? हा कर्मफलत्याग ज्ञानेश्वरांच्या मते 'योगामाजी योगु' असा आहे

१२९० महुरा ऐसीं फळें नाहीं । आलीं काहीं गळती ॥ १ ॥
पक्वदशे येती थोडीं । नास आढी वेचे तो ॥ २ ॥
विरळा पावे विरळा पावे । अवघड गोवे सेवटाचे ॥ ३ ॥
उच निच परिवार देवी । धन्या ठावी चाकरी ॥ ४ ॥
झळके तेथें पावे आणी । ऐसे क्षणी बहु थोडे ॥ ५ ॥
पावेल तो पैल थडी । म्हणों गडी आपुला ॥ ६ ॥
तुका म्हणे उभान्यानें । कोण खरें मानितसे ॥ ७ ॥

शब्दार्थ व टीपा – महुरा– मोहोर, आंब्याच्या झाडाचा फुलोरा, विरळा–क्वचित, गोवे–स्थान, पावे–पाय, उभान्याने–बाहेरच्या डौलाने

अर्थ –आंब्याच्या झाडाला जेवढा मोहोर येतो, तेवढी काही फळे लागत नाहीत त्यातूनही जी येतात त्यातीलही पुष्कळशी गळून जातात १ त्यांच्यांतीलही परिपक्व होणारी फार थोडीच, उरलेल्यांचा आढीमध्ये नाशच होतो २ त्याचप्रमाणे भक्तिमार्गात असणारे पुष्कळच असतात पण निश्चित अशा ईश्वराच्या स्थानापर्यंत पोचणारे फारच थोडे असतात कारण हे अखेरचे स्थान प्राप्त करून घेणे फार कठीण असते ३ देवाच्या ठिकाणी लहानमोठ्या सर्वच सेवकांचा परिवार असतो पण त्यांच्याकडून होणाऱ्या चाकरीचा भाव तो धनी नीट जाणीत असतो, त्याला सर्व माहीत असते ४ ज्यांची ईश्वरनिष्ठा थोरपणाने झळकते तेथे त्याचे पाय त्याला जवळ होतात, किंवा तो

सत्वर पावतो पण हा लाभ फार थोड्यांनाच मात्र होतो ५ अशा प्रकारे निष्ठेने भवसागर तरून जो पैलतीरी जाऊन ईश्वरासंनिध उभा राहतो, तोच आमचा खरा मित्र होय. ६ तुकाराम महाराज म्हणतात, नाहीतर उगाच बाहेरच्या डौलाने अथवा उसन्या ऐटीने काय होणार ? अशा देखाव्यास कोण खरे मानणार ? ७

१२९१ अवघ्या उपचारा । एक मनचि दातारा ॥ १ ॥
घ्यावी घ्यावी हेचि सेवा । माझी दुर्बळाची देवा ॥ २ ॥
अवघियाचा ठाव । पायांवरि जीवभाव ॥ ३ ॥
चित्ताचें आसन । तुका करितो कीर्तन ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – दातारा–सर्व प्रकारचे दान देणाऱ्या देवा, ठाव–आश्रयस्थान.

अर्थ :– देवा, सर्व उपचारात, साधनात सर्वश्रेष्ठ साधन म्हणजे हे मनच तुला अर्पण करणे हे होय, म्हणून तेच मी तुला अर्पण करीत आहे १ देवा, मी हीन, दुर्बल आहे माझी गरिबाची हीच सेवा तुम्ही घ्यावी. २ तू सर्वांचेच आश्रयस्थान असल्याने तुझ्याच पायावर मी माझा सर्व जीवभाव अर्पण केला आहे. ३ माझ्या चित्ताचे मी देवा, तुझ्यासाठी आसन तयार करून मी मोठ्या प्रेमाने तुझ्या गुणाचे कीर्तन करीत आहे. ४

विवरण – ईश्वराच्या सन्निध जाण्याचा एक सोपा व अत्यंत उपयुक्त असा मार्ग तुकोबानी या अभंगात सांगितला आहे. तो म्हणजे आपले मनच परमेश्वराला अर्पण करणे, चित्ताचे आसन त्याच्यासाठी निर्माण करणे. सर्व चित्तवृत्तींच्या सहित आपले हृदय भगवंताला अर्पण करण्यापासून, सर्व जीवभाव त्याच्या पायावरच ठेवण्यापासून त्याच्याशी एकरूप होण्याचा, त्याच्या जवळीकतेचा लाभ होतो. 'मय्येव मन आधत्स्व मयि बुद्धि निवेशय । निवसिष्यसि मय्येव अत ऊर्ध्वं न संशय ' माझ्या ठिकाणी मन सर्व वृत्तीसहित अर्पण कर. तुझी बुद्धी माझ्या ठिकाणी समर्पण कर, म्हणजे तू माझ्या ठिकाणी निवास करशील अशी ग्वाही भगवंतानी गीतेमध्ये दिलेली आहे एकदा मन अथवा सर्व वृत्तीसहित अशी बुद्धीच ईश्वराला अर्पण केल्यानंतर मग काय उरणार ? ' अगा मानस हें एक । माझ्या स्वरूपीं वृत्तिक । करूनि घाली निष्टंक । बुद्धि निश्चयेसी ॥ इयें दोनी सरिसीं । मजमाजीं प्रेमेसीं । रिगालीं तरी पावसी । मातें तूं गा ' एकदा मनबुद्धी ईश्वराला अर्पण केल्यानंतर मग मी–तू भाव असा उरणारच नाही असा भावार्थ ज्ञानेश्वराच्या या ओवीचा होय. दिवा मालविला की तेज सपते, सूर्य मावळला की प्रकाश सपतो, त्याप्रमाणेच ईश्वरास अर्पण केलेल्या मनबुद्धीबरोबरच अहंकारादी वृत्तीही समर्पित होतात. म्हणूनच तुकाराममुवानी या साधनाला सर्वांत श्रेष्ठ साधन म्हटले आहे.

१२९२ आली सलगी पायापाशीं । होइल तैसी करीन ॥ १ ॥
आणीक आम्हीं कोठें जावें । येथें जीवें वेचलों ॥ २ ॥
अवघ्या निरोपणा भाव । हाचि ठाव उरलासे ॥ ३ ॥
तुका म्हणे पाळीं लळे । कृपाळुवे विठ्ठले ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– वेचलो– खर्च झालो, अर्पण करते झालो, निरोपणा–सांगण्यासाठी, लळे–हट्ट.

अर्थ –देवा, तुमच्या पायाशी जशी आवडेल तशी सलगी करून मी राहीन. १ आता तुला सोडून आम्ही जावे तरी कुठे ? आमचा जीव आम्ही तुमच्याच पायी अर्पण केला आहे २ देवा, आमचे सर्व मनोगत सांगण्यासाठी हेच एक स्थान आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, कृपाळू देवा, तुम्हीच आता आमचे लाड पूर्ण करावेत. ४.

१२९३ देह आणि देहसंबंधें निंदावीं । इतरें वंदावीं श्वानसूकरें ॥ १ ॥
येणें नावें जाला मी भाग्याचा झाडा । मोहा नांवें खोडा गर्भवास ॥ २ ॥

गृह आणि वित्त स्वदेशा विटावें । इतरा भेटावें श्वापदझाडा ॥ ३ ॥
तुका म्हणे मी[1] हें माझें न यो वाचे । येणें नावें साचे साधुजन ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – देहासंबंध–अगदी जवळचे नातेवाईक, श्वानसूकरें–कुत्रे, डुक्करे वगैरे, झाडा–झिंझोडा–अटकाव, अडथळा, वित्त–संपत्ती, श्वापदझाडा–इतर जनावरे व झाडे, साचे–खरोखर

अर्थ –स्वतःचा देह आणि आपल्या देहाशी संबंधित असणाऱ्या रक्ताच्या नात्याची, आई, बाप, बहीण, बंधू अशी नाती सर्व निंद्य समजून त्याच्यापेक्षा इतर कुत्रे–डुकरे यानाच वंदन करावे १ याच अवस्थेत मी व माझे या द्वंद्वरूप भावनेचा हिशोब पूर्ण होईल तो संपेल मोह, देहाची व नात्यांची आसक्ती यांना यामुळे अटकाव येईल, किंवा मोहाच्यामुळे गर्भवासाच्या खोड्यात, प्रतिबंधात सापडावे लागते ते संपेल २ स्वतःचे घर, संपत्ती, स्वदेश या सर्वांचा वीट मानावा, आणि इतर जनावरे व झाडेझुडपे यांनासुद्धा जवळ करावे ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी, माझा देह, हे माझे नातेवाईक, अशी भावना आपल्या वाणीतून सुद्धा प्रकट होऊ नये या अवस्थेत जे असतील तेच खरेखुरे संतजन होत ४

विवरण –या एका अभंगात खऱ्याखुऱ्या साधूचे अथवा संताचे वर्णन तुकाराम महाराज करीत आहेत स्वतःच्या देहाचीच तेवढी आसक्ती धरू नये, स्वतःचे जवळचे नातेवाईक तेवढेच जग समजू नये मी व माझे याच्या पलीकडे जी सृष्टी आहे तीही आपल्याशी संबंधित आहे, हा भाव मनात असू द्यावा कुत्रे व डुकरे आणि झाडेझुडपे याच्यातूनही एकच आत्मतत्त्व खेळून राहिले असल्याची जाणीव या साधुसंतांना असते जवळच्या नातेवाईकात व इतर प्राणिसृष्टीत भेद करण्याचा विचार त्यांच्या मनास शिवतही नाही याच अवस्थेवरील साधुसंतांच्या पुढे मोहाची किंवा त्यामुळे निर्माण होणाऱ्या गर्भवासाची भीती उरत नाही स्वतःचे घर व संपत्ती याना सुद्धा आपण जवळ करू नये, असाही विचार संतसज्जन करीत असतात

साधक, संतसज्जन जेव्हा देहाचा, संपत्तीचा, नात्याचा तिरस्कार करितात, तेव्हा त्याचा भावार्थ मोठ्या सावधतेने समजावून घ्यावयास हवा देहाला, संपत्तीला, नात्याच्या माणसाना विसरावे व श्वानसूकराना व झाडाझुडपाना जवळ करावे या विचाराचा अर्थ काय ? साधुसंताच्या उद्गारातून अशी वचने वारंवार बाहेर पडत असतात ज्ञानेश्वराच्या आधीचे सत्पुरुष व महानुभाव पंथाचे प्रवर्तक श्रीचक्रधर यानी तर वैराग्य, त्यागवृत्ती याचे आचारातील महत्त्व पुनः पुनः विवरून सांगितले आहे ' स्वदेशसंबंधु त्याज्य स्वग्रामसंबंधु त्याज्य संबंधियाचा संबंध तो विशेषत त्याज्य ॥ ' कारण इंद्रियादिकाना आवडणारा विषय हा एकदा का आवडू लागला की मग त्याची संगत सुटणे कठिण होऊन बसते ' नावडत नावडत सेवी तेंचि आवडोनि ठाके ' मग सांडितांहि न संडे ॥ ऐसा विखो बापुडा ' असे श्रीचक्रधरानी म्हटले आहे म्हणून या देहाची व मोहात फसविणाऱ्या आप्ताची निंदा संतजनानी केलेली दिसते

तुकारामानीसुद्धा देहाची, संसाराची, स्वबांधवाची निंदा केलेली दिसते द्रव्य आणि भाग्य याचा त्याना कंटाळा होता त्याचा त्याना उद्वेगच वाटे फकीर झालो तरच रात्रंदिवस हरीचे नाव वाचेत येईल असे त्याना वाटे शरीराची विटंबना होवो वाटेल तेवढ्या विपत्ती येवोत पण ' राहो चित्ती नारायण ' अशी त्याची वृत्ती बनलेली होती ' पिंड पोसावें हें अधमाचें ज्ञान ' असा त्याचा विश्वास होता एका चक्रपाणीवाचून आपणास जवळचे कुणीही नाहीत असे त्याना वाटे काळाची उडी येईल तेव्हा मायबाप, राजा, गावचा पाटील, सोयरेधायरे कुणीही सोडविणार नाहीत त्यातून, फक्त ईश्वरच साह्यास येतो ' हो कां पुत्र पत्नी बंधु । त्यांचा तोडावा संबंधु ' असे त्यानी सांगितले आहे ' जेणें घडे नारायणीं अंतराय । होत मायबाप वर्जावीं तीं ' असा त्याचा आग्रह आहे देवाच्या सख्यत्वासाठी ' जिवलगासाठीं तुटी ' पाडाव्यात असे समर्थ रामदासानी म्हटले आहे

शरीरसौंदर्य, इंद्रियादिक वृत्तीचा मोह याच्या मोहात सापडून आयुष्य व्यर्थ जाऊ नये म्हणून संतानी अतिरेकाने देहाचे, आप्तस्वकीयाचे वर्णन केले असले तरी त्यालाही दुसरी बाजू आहे सर्व धर्मांचे आद्य साधन शरीर हेच आहे याचाही विसर संताना नाही शरीराचे लाड करू नयेत केवळ त्याच विलासात राहू नये, यासाठी ते अतिरेकाने

[1] मुर्खे

बोलतात पण शरीर तरी कुणाच्या सत्तेवर चालते ? भोवती असलेला आप्तवर्ग कुणाच्या रूपाने नटला आहे ? असेही प्रश्न त्यांनी उपस्थित केले आहेत जर अहंकार संपला, पण वैराग्याची वृत्ती अंगी बाणून राहिली, तर 'सकळ शरीर चिंतामणी' असाही अनुभव तुकोबांनी सांगितला आहे 'शरीर दुःखाचे कोठार। शरीर रोगाचे भांडार' हे जितके खरे, तितकेच 'शरीर उत्तम चांगले। शरीर सुखाचे घोसुले। शरीरें साध्य होय केले। शरीरें साधले परब्रह्म 'असाही अनुभव तुकोबांना आलेला होता मग शरीर किंवा देह याचे स्वरूप नमके काय आहे ? 'इहलोकाचा हा देह। देव इच्छिताती पाहे' अशा इच्छेचा हेतू कोणता ? तुकोबांनी निर्णय देताना म्हटले आहे, 'शरीर घोखटें ना चांग। तुका म्हणे वेग करीं हरि भजनीं' शरीर कशाच्या नादात आहे यावर सर्व अवलंबून आहे

ईश्वरभजनी लागलेल्या देहाचा गौरवही साधुसंतांनी केलेला आहे 'देहा ऐसें गोमटें। पृथ्वीमाजी नाहीं कोठें।' असं म्हणून एकनाथांनी लगलीच बजावले आहे, 'देहा ऐसें वोखटें, पाहतां न भेटे त्रिलोकीं' यामुळे साध काची पंचाइतच होते कारण शरीरास 'वोखटें म्हणोनि त्यागावे। तें मोक्षसुखासीं नागवावें' बरे, या शरीराचा भोग घ्यावा तरी अडचणच कारण 'हे का गोमटें म्हणून भोगावें। तें अवश्य जावें नरकासीं' म्हणून या पेचातून सुटका करण्यासाठी एकनाथांनी निर्णय देताना म्हटले आहे, 'तरी हें त्यागावें ना भोगावें। मध्यमार्गे विभागावें। आत्मसाधनीं राखावें। निजस्वभावें हितालागीं।' सारांश आत्मसाधनेत लावलेला देह हा श्रेष्ठच होय, यात संशय नाही या देहाची विटंबना संतांच्या दृष्टीत नसते केवळ बाह्य सुखात रमणारा देह व त्याच्या संबंधित असलेले आप्तवर्ग याच्याविषयीची सावधगिरी या अभंगात तुकोबांनी वर्णन केली आहे

१२९४ देवाचिये माथा घालुनिया भार। साडीं कळिवर ओवाळूनि ॥ १ ॥
नाथिला हा छंद अभिमान अंगीं। निमित्याचे वेगीं सारीं ओझें ॥ २ ॥
करुणावचनीं लाहो एकसरें। नेदावें दुसरें आड येऊं ॥ ३ ॥
तुका म्हणे साडीं लटिकयाचा संग। आनंद तो मग प्रगटेल ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा –साडी–सोडावा, ओवाळून टाकावा, कलेवर–देह, नाथिला–खोटा, वृथा, सारी–दूर कर, लाहो–प्राप्त करून घ, नेदावे–येऊ देऊ नये

अर्थ –देवाच्या माथ्यावर आपला सर्व भार घालून त्याच्यावरून स्वतःचा देह ओवाळून टाकावा १ देह म्हणजेच मी हा वृथा अभिमान खोटा आहे, तो या निमित्ताने तू त्वरेने दूर कर त्याचे ओझे काढून टाक, २ करुणापूर्ण वचनांनी एकसारखी आठवण त्या परमेश्वराची करावी त्याशिवाय दुसरे काहीही आपल्या हृदयात येऊ देऊ नये ३ तुकाराम महाराज म्हणतात, या देहाचा व इंद्रियवृत्तींचा, खोट्या गोष्टींचा संग सोडून द्यावा तर तुमच्या हृदयात ईश्वरभेटीचा आनंद प्रकट होईल ४

१२९५ देह नव्हे मी हे सरे। उरला उरे विठ्ठल ॥ १ ॥
म्हणऊनि लाहो करा। काळ सारा चिंतनें ॥ २ ॥
पाळणाची नाहीं चिंता। ठाव रिता देवाचा ॥ ३ ॥
तुका म्हणे जीवासाटीं। देव पोटीं पडेल ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा –लाहो–लाभ, पाळणाची–पालनाची, ठाव–स्थान, रिता–रिकामा

अर्थ –मी म्हणजे देहच, असा अहंकार संपल्यानंतर जीवाची जी उरलेली अवस्था ती केवळ विठ्ठलस्वरूप असेल १ म्हणून त्याचे स्मरण करून त्याचा लाभ करून घ्या त्याच्याच चिंतनात तुमचा काळ जाऊ द्या २ आपले पालनपोषण कसे होईल, याची चिंताच करू नका कारण देवाच्या अस्तित्वाखेरीज एकही स्थान नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, असा समर्पण बुद्धीच्या जीवासाठी देव त्याच्या हृदयातच प्रकट होऊन राहील ४

१२९६ पृथक मी सांगों किती । धर्म नीती सकळा ॥ १ ॥
अवघियांचा एक ठाव । शुद्ध भाव विठ्ठलीं ॥ २ ॥
क्षराअक्षराचा भाग । करा लाग पंढरीये ॥ ३ ॥
तुका म्हणे आगमींचे । मथिलें साचें नवनीत ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा-पृथक-निरनिराळी, ठाव-रहस्य, तात्पर्य, क्षराक्षराचा- नाशवंत व शाश्वत यांचा, लाग लाभ, आगमींचें-वेदशास्त्राचे, मथिलें-घुसळून काढलेले, नवनीत-लोणी, सार

अर्थ -आता सर्वांना वेगवेगळी अशी धर्मनीतीची तत्त्वे मी सांगू तरी कशी व किती ? १ सर्व नीतिधर्मांचे एकच तात्पर्य असे की, श्रीविठ्ठलाच्या ठिकाणी शुद्ध भाव ठेवावा २ नाशवंत व शाश्वत अशा दोन्ही प्रकारच्या सृष्टीस सामावून घेणारा हा श्रीविठ्ठल पंढरीस आहे, त्याचा लाभ सर्वांनी करून घ्यावा ३ तुकाराम महाराज म्हणतात, सर्व वेदांचे व शास्त्राचे घुसळून काढलेले सार हेच एक आहे ४

१२९७ पुण्यविकरा तें मातेचे गमन । भाडी ऐसें धन विटाळ तो ॥ १ ॥
आत्महत्यारा हा विषयाचा लोभी । म्हणावे तें नाभी करवी दंड ॥ २ ॥
नागवला अल्प लोभाचिये सांटीं । घेऊनि काचवटि परिस दिला ॥ ३ ॥
तुका म्हणे हात झाडिले परत्रीं । श्रम तोचि श्रोत्रीं वेठी केली ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा -पुण्यविकरा-पुण्याची विक्री, भाडी-कुंटणपणा करून मिळविलेले द्रव्य आत्महत्यारा-आत्मघातकी स्वतःची हत्या करणारा नाभी-भिऊ नको, काचवटि-काच, हात झाडिले-परलोकात, स्वर्गात पुण्य खर्च केले वेठी-मजुरीस असल्याप्रमाणेच

अर्थ -कोणत्याही पुण्याची विक्री करणे हे मातेशी गमन केल्याप्रमाणे घातक आहे त्यापासून मिळणारे धन व सुखविलास वाईट मार्गांनी मिळविलेल्या द्रव्यासारखे आहे १ जो इंद्रियसुखाचा व विषयाचा लोभी आहे तो स्वतःची हत्या करणाराच समजावा त्याला भिऊ नये असे म्हणणारा दंडाच्या शिक्षेस पात्र होतो २ अल्पकालीन सुखाच्या लोभासाठी पुण्याचा विक्रय करणाऱ्यांना परिस देऊन काच घेणाऱ्याप्रमाणेच लुबाडले जाते ३ तुकाराम महाराज म्हणतात, हे लोभी श्रोत्रीय पुण्य खर्च करण्यासाठी स्वर्गास जातात व तेथ पुण्य संपवून हात झाडतात, पण यांचे पुण्य मात्र संपते त्यांचे हे श्रम केवळ वेठीस धरलेल्या मजुराप्रमाणेच असतात ४

विवरण -ईश्वराकडे न जाता सकाम असे यज्ञयाग करून स्वर्गातील सुखभोग भोगणाऱ्या श्रोत्रीयांच्यावर या अभंगाचा रोख आहे यज्ञयागादी कर्मे करून हे दीक्षित पुण्य मिळवतात, पण ते पुण्याची विक्री करून स्वर्गातील सुखाचे भोग इच्छितात पण त्यांची अखेरची गती मात्र शोचनीय असते भगवद्गीतेच्या नवव्या अध्यायातील विसाव्या श्लोकात यज्ञकर्म करणाऱ्या श्रोत्रियांचे वर्णन आले आहे 'त्रैविद्या मां सोमपाः पूतपापा यज्ञैरिष्ट्वा स्वर्गतिं प्रार्थयन्ते । ते पुण्यमासाद्य सुरेंद्रलोकमश्नन्ति दिव्यान्दिवि देवभोगान्'— सोमरसाच्या सेवनाने पवित्र बनलेले व तीन वेदांचे अध्ययन करणारे हे कर्मठ दीक्षित अनेक प्रकारची यज्ञयागादी कर्मे करतात व स्वर्गसुखाची इच्छा धरतात त्या इच्छे-नुसार ते इंद्रलोकास जाऊन तेथ देवांना अनुरूप असे दिव्य भोग घेतात — पण हा त्यांनी आपल्या पुण्याचा एक प्रकारे विक्रीच केलेली असते त्यामुळे त्यांना त्याचे फळही तसेच मिळते 'ते तं भुक्त्वा स्वर्गलोकं विशालं क्षीणे पुण्ये मर्त्यलोकं विशन्ति । एवं त्रयीधर्ममनुप्रपन्ना गतागतं कामकामा लभन्ते' हे कर्मठ असे याज्ञिक स्वर्गात अमर्याद अशा सुखाचा भोग घेतात आणि ज्याच्या आधारावर त्यांना हे भोग मिळतात ते पुण्य संपत आल्यावर ते परत माघारी मर्त्यलोकी येतात केवळ उपभोगाचीच इच्छा धारण करणारे हे दीक्षित स्वर्गाच्या खेपा करतात त्यांना ईश्वराची प्राप्ती होत नाही ईश्वरास वगळून केवळ स्वर्गसुखाची इच्छा धरणाऱ्या व अशा प्रकारे पुण्याची विक्री करणाऱ्या याज्ञिकांच्या बद्दल श्रीज्ञानेश्वरांनी फार प्रखर भाषेत लिहिले आहे

हे दीक्षित खरे म्हणजे स्वत च यज्ञाचे स्वरूप असतात पण त्यानी 'पुण्याचेनि नांवें पाप। जोडिलें देखें। कारण ते शेकडो यज्ञयाग करून ईश्वराला चुकवून स्वर्गाची वाट धरतात कल्पतरूच्या छायेत बसून झोळीला गाठ देण्यासारखेच हे आहे ज्ञानेश्वरानी स्पष्टपणे म्हटले आहे -'म्हणोनि मजवीण पाविजे स्वर्ग। तो अज्ञानाचा पुण्यमार्गु।' या पुण्यमार्गास पुण्यसुद्धा म्हणू नये असे त्याना वाटते 'आणि मजचिमाजी असतां। जेणें मीं दुऱ्हावें पाडुसुता। तें पुण्य ऐसे म्हणता। जीभ न तुटे काई?' पुण्याची विक्री करून स्वर्गात हे दीक्षित कोणते सुख प्राप्त करून घेतात? ते अमरत्वाच्या सिंहासनावर क्षणभरच बसतात ऐरावताचे वाहन त्याना प्राप्त होते राजधानी अमरावतीत त्याना राहायला मिळते महासिद्धींची भाडारे तेथे खुली असतात अमृताची कोठारे मोकळी असतात कामधेनूची खिल्लारे तेथे असतात तेथे सर्व देव सेवेस तत्पर असतात गधर्व गाणी गातात, रभा नृत्य करीत असते उर्वशीसारख्या विलासी स्त्रीची सोबत तेथे असते, जोपर्यंत पुण्याचा साठा गाठीशी आहे, तोपर्यंत हे भोग सुखाचे वाटतात पण मग पुण्य क्षीण झाल्याबरोबर मात्र दीक्षिताचा मोहरा पृथ्विलोकाकडे वळतो दीक्षिताच्या या लाजिरवाण्या जिण्यासबधी श्रीज्ञानेश्वरानी म्हटले आहे, 'जैसा वेश्याभोगी कवडा वेंचे। मग दारही चेपूं नये तियेचें। तैसें लाजिरवाणें दीक्षिताचें। काय सांगों?' स्वप्नात सुखाचा साठा सापडावा व जागेपणी तो नाहीसा व्हावा, 'तैसें स्वर्गसुख जाणावें वेदज्ञाचें'

पुण्याची विक्री स्वर्गलोकी अशी माडणाऱ्या दीक्षिताच्या लाचार जिण्याचे वर्णन केल्यावर भगवद्गीतेनें मग यथार्थ असा मार्गही सागितला आहे इतर सर्व गोष्टीचा त्याग करून मला जे भजतात, त्याचा सर्व योगक्षेम मी चालवितो, अशी ग्वाही पुढल्याच श्लोकात भगवतानी दिली आहे 'ऐसे अनन्यगतिकें चित्तें। चिंतित सातें मातें। जे उपासिती तयांतें। मीचि सेवीं' मी त्याची जपणूक करतो अशी ग्वाही यथे आहे

१२९८ अंतरींचें ध्यान। मुख्य या नांवें पूजन ॥ १ ॥
उपाधि ते अवघें पाप। गोड[1] निरसतां संकल्प ॥ २ ॥
आज्ञा पाळावी हा धर्म। जाणते हो जाणा वर्म ॥ ३ ॥
तुका म्हणे वृत्ति। अविट हे सहज स्थिति ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा -अंतरींचें-अंत करणपूर्वक, उपाधी-इतर माग, निरसतां-नाश केल्यावर

अर्थ -अंत करणपूर्वक भगवताचे ध्यान करणे हीच तर त्याची खरी पूजा आहे १ याखेरीज सर्व प्रकारच्या उपाधी पापमय असल्याने त्याचा किंवा त्यांच्या सकल्पाचा नाश करणे हे चागले आहे २ अहो जाणते हो, ही आज्ञा पाळणें हाच धर्म असल्याचे वर्म तुम्ही ओळखून असावे ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशी सहजस्थिती प्राप्त होणे, हीच खरी अवीट अशी अवस्था आहे ४

१२९९ मूळ करणें[2] संता। नाहीं मिळत उचिता ॥ १ ॥
घडे कासयाने सेवा। सांग ब्रह्मांडाच्या जीवा ॥ २ ॥
सागर सागरीं। सामावेसी केंची थोरी ॥ ३ ॥
तुका म्हणे भावें। शरण ह्मणविता बरवें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा -मूळ-आमंत्रण, प्रमुख, सामावेसी-एकरूप होणे

अर्थ -सन्मानाने संतांना आमंत्रण द्यावे तर उचित अथवा योग्य अशा संताची भेट होत नाही किंवा सर्व चराचर जगाच्या व्यवहारास प्रमुख कारण अशी जी एक चैतन्यसत्ता आहे, तिच्याशी उचित अशा प्रकारचा व्यवहार होत नाही १ म्हणून हे ब्रह्मांडीच्या जीवा, तुझी सेवा कशा रीतीने होईल, करता येईल ते सांग ना २ एका सागरास दुसरा सागर एकरूप करून घेईल एवढा मोठा सागर आहे तरी कुठ? आणि एकरूप झाले तरी त्यांच्यात

१ गोडी २ कारण

सेवेची थोरवी कशी उरणार ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, म्हणून देवा, तुम्हांस भक्त म्हणून शरण आहे असे म्हणत राहाणे हेच चांगले ४

१३०० बरवी नामावळी । तुसी महादोषां होळी ॥ १ ॥
जाले आम्हांसी जीवन । धणीवरि हें सेवन ॥ २ ॥
सोपें आणि गोड । किती अमृता ही याड ॥ ३ ॥
तुका म्हणे अच्युता । आमचा कल्पतरु दाता ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा –नामावळी–रामकृष्ण, श्रीहरीविठ्ठल असे नामस्मरण, धणी–तृप्ती, याड–थोर.

अर्थ –देवा, रामकृष्ण अथवा श्रीहरीविठ्ठल अशी तुसी नामावळीच चांगली असून तिच्या योगानें महापातकांचे दोष जळून जातात १ आमचे जीवन तीच झाली असून तिचे सेवन आमची तृप्ती होईपर्यंत आम्ही करू २ कारण ती अतिशय सोपी आणि गोड असून अमृतापेक्षाही थोर आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, हे अच्युता, तू कल्पतरूप्रमाणे आमचा हवे ते देणारा दाता आहेस ४

१३०१ तृषाकाळीं उदके भेटी । पडे मिठी आवडीची ॥ १ ॥
ऐसियाचा हो का संग । जिवलग संताचा ॥ २ ॥
मिष्टान्नाचा योग भुके । म्हणता चुके पुरेसे ॥ ३ ॥
तुका म्हणे माते बाळा । कळवळा भेटीचा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा –तृषाकाळीं–तहान लागली असताना

अर्थ –अतिशय तहान लागलेली असताना पाण्याची भेट झाल्यावर त्याचे सेवन मोठ्या आवडीने आपण करतो १ जिवलग संताची संगत अशाच प्रीतीने होत असते २ अतिशय भूक लागलेल्यास मिष्टान्नाची प्राप्ती पुरे पुरे म्हणेपर्यंत झाली तर ती प्रियच आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, आईच्या व मुलाच्या भेटीत जो कळवळा आहे तोच संताच्या भेटीत आम्हांस वाटतो ४

१३०२ कुचराचे श्रवण । गुणदोषावरि मन ॥ १ ॥
असोनिया नसे कथे । मूर्ख अभाग्य तें तेथें ॥ २ ॥
निरर्थक कारणीं । कान डोळे वेची वाणी ॥ ३ ॥
पापाचे सागाती । तोंडीं ओढाळाचे माती ॥ ४ ॥
हिताचिया नावे । वोस पडिले देहभावें ॥ ५ ॥
फजीत करूनि सांडीं । तुका करी बोडाबोडी ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा –कुचर–अगचोर कपटी बोडाबोडी फजिती

अर्थ –कथा चालली असताना अगचोर किंवा कपटी श्रोता असतो त्याचे सारे लक्ष वक्त्याच्या गुणदोषाकडेच अधिक असते १ असा हा अभागी व मूर्ख श्रोता असून नसल्यासारखाच तेथ समजावा २ तो आपले कान डोळे आणि आपली वाचा याचा उपयोग निरर्थक अशा इतर व्यावहारिक गोष्टींसाठीच करीत असतो ३ पापाच्याच संगतीत असलेल्या अशा या ओढाळ श्रोत्याच्या तोंडात शेवटी मातीच पडते त्याला काही लाभ होत नाही ४ देहभाव त्याचा नेहमी जागृत असल्याने आत्महिताच्या दृष्टीने त्याचे आयुष्य फुकटच चाललेले असते ५ अशा या वक्त्याची चांगली हजामत करून आम्ही त्यास फजीत करू, असे तुकाराम महाराज म्हणतात ६

१३०३ जग तरि आम्हां देव । परि हे निंदितों स्वभाव ॥ १ ॥
येतो हिताचा कळवळा । पडती हातीं म्हून काळा ॥ २ ॥
नाहीं कोणी सखा । आह्मां निपराध पारिखा ॥ ३ ॥
उपक्रमें वदे । तुका वर्मासी तें भेदे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा –म्हून–म्हणून, काळा–यमाच्या, निपराध–दुष्ट, नीच, पारिखा–परका, दुसरा, उपक्रमें–सरळ मार्गाने, वर्म–दोष.

अर्थ–तसे पाहिले तर सर्व जग हे आम्हांस देवाप्रमाणेच आहे. पण आमचा स्वभाव असा की, जे वाईट आहे त्याची आम्ही निंदाच करतो १ कारण हे वाईट लोक यमाच्या मुखात जात असल्याने त्यांच्या हिताविषयी आमच्या मनात कळवळा निर्माण होतो. २ कुणी आमचा जिवलग मित्र नाही, की कुणी नीच आमच्या दृष्टीने परका नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, आम्ही नेहमी सरळ मार्गानेच बोलत असतो, पण जेथे आम्हास दोष दिसेल त्याचा मात्र आम्ही भेद करू. ४

१३०४ सोपें वर्म आह्मां सांगितलें संतीं । टाळ विंडी हातीं घेऊनि नाचा ॥ १ ॥
समाधीचें सुख सांडा ओंवाळून । ऐसें हें कीर्तन ब्रह्मरस ॥ २ ॥
पुढती घडे चढतें सेवन आगळें । भक्तिभाग्यबळें निर्भरता ॥ ३ ॥
उपजोंचि नये संदेह चित्तासी । मुक्ति चारी दासी हरिदासांच्या ॥ ४ ॥
तुका म्हणे मन पावोनि विश्रांती । त्रिविध नासती ताप क्षणें ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा –वर्म–रहस्य, निर्भरता–निव्वाळजीपणाची अवस्था

अर्थ–या संतांनी आम्हांस ईश्वरप्राप्तीचे एक सोपे रहस्य सांगितले आहे, ते असे की, हातात टाळ, वीणा घेऊन श्रीहरीचे नाव घ्यावे व नाचत राहावे. हाच सोपा मार्ग आहे १ अशा या कीर्तनात भक्तिप्रेमाचा जो ब्रह्मरस निर्माण होतो, त्याच्यावरून समाधीचे सुख ओवाळून टाकावे एवढी त्याची योग्यता आहे २ पुढे पुढे तर या भक्ति-प्रेमाच्या अधिक सेवनाने, या भक्तीच्या भाग्यबळामुळे एक निराळ्याच प्रकारची निश्चिंत अशी अवस्था प्राप्त होते. ३ या भक्तिप्रेमाच्या अवस्थेत मनात कसल्याही प्रकारचा संदेह निर्माण होत नाही. कारण सलोकता समीपता इत्यादी चारही मुक्ती कीर्तन करणाऱ्या हरिदासांच्या दासी होऊन राहिलेल्या असतात. ४ तुकाराम महाराज म्हणतात, संत-प्रणीत या नामसंकीर्तनाच्या मार्गानेच मनास पूर्ण विश्रांती मिळते. एका क्षणात त्रिविध तापांचा नाश होतो ५

विवरण– भागवत संप्रदायात यज्ञयाग, योगसमाधी, कर्मकांड याच्यापेक्षा कीर्तनाला, नामस्मरणाला महत्त्व अधिक आहे. सर्वसामान्य अशा बहुसंख्य लोकांना हाच एक सुलभ मार्ग संतांनी सांगितला आहे नाम-संकीर्तन साधन पैं सोपें । जळतील पापें जन्मांतरें ' असा उपदेश तुकाराम महाराजांचा आहे यज्ञयागादी क्रियाकांड न करता, देहास कष्ट देऊन समाधी न लावता एकाच ठिकाणी बसून त्याची प्रार्थना करावी, ' रामकृष्ण हरी विठ्ठल केशवा । मंत्र हा जपावा सर्वकाळ ' हेच वर्म अतिशय सोपे व सर्वांना सुलभ असे तुकोबांनी सांगितले आहे

अव्यक्ताची, निराकाराची निर्गुणाची उपासना श्रेष्ठ खरी या मार्गानेही ईश्वराचीच प्राप्ती होते हेही खरे. पण हा मार्ग अतिशय कष्टाचा, त्रासाचा, म्हणून सर्वसामान्य लोकांना अवघड वाटणारा गीतेच्या बाराव्या अध्यायामधील पाचव्या श्लोकात स्पष्टपणे म्हटले आहे, ' क्लेशोऽधिकतरस्तेषाम् अव्यक्तासक्तचेतसाम् । अव्यक्ता हि गतिर्दुःखं देहवद्भिरवाप्यते ' अव्यक्ताच्या उपासनेत ज्याचे चित्त मग्न झाले आहे त्याला सगुणोपासकापेक्षा कष्ट अधिकच भोगावे लागतात देहधारी प्राण्यांना अव्यक्त तत्त्वाची प्राप्ती मोठ्या श्रमाने होते. या श्लोकावर भाष्य करताना श्रीज्ञानेश्वरांनी स्पष्टपणे इशारा दिला आहे की, ' म्हणोनि योगाचिया वाटा । जे निगाले गा सुभटा । तयां दु:खाचिचि शेल वाटा । भागा आला । '

यासाठी सर्वांना सहज सुलभ वाटेल असे नामस्मरणाचे व हरिकीर्तनाचे साधन संतांनी प्रचारात आणून सर्वांना मार्ग दाखविला. या कीर्तनसुखापुढे समाधीचे किंवा अव्यक्ताच्या प्राप्तीचे सुख फिके असते. रिद्धीसिद्धी या दासी होऊन येथे राहतात, असाच भावार्थ संताच्या उपदेशाचा आहे. 'साधावया स्वरूपसिद्धी। सिद्ध साधक समाधी। बैसोनि ध्यानस्थ बुद्धी। परि तो हरी न सापडे ।। धन्य धन्य वैष्णवसंग। अखंड तेथें पांडुरंग। कीर्तनीं नाचतसे अभंग। अखंड काळ सर्वदा' असे नामदेवांनी म्हटले आहे. 'कीर्तनें सिद्धि, कीर्तनें सिद्धि। कीर्तनें निरसे आधिव्याधी' असे एकनाथांनी म्हटले आहे. या नामसकीर्तनाचे माहात्म्य केवढे आहे? तुकोबांनीच एका अभंगात म्हटले आहे, 'घोटवीन लाळ ब्रह्मज्ञान्याहातीं। मुक्ता आत्मस्थिती सांडवीन।'

अशा प्रकारे समाधिसुखासही महत्त्व देणारे नामसंकीर्तनाचे सोपे, साधे व सुलभ साधन संतांनी निर्माण करून लोकप्रिय केले. देवाला अशा भक्तिमय कीर्तनाची गोडी विशेष असते. याच सुखासाठी तो वैकुंठाहून धावत येतो. 'नवल वैकुंठींच नसे। तो कीर्तनीं नाचतसे', 'कीर्तनाचे थोर सुख। यदुनायक उभा असें', 'देवासीं प्रिय होय कीर्तन। नाचे येऊन आनंदें', 'कीर्तनें तोषे अधोक्षज' अशा भाषेत देवास कीर्तन किती प्रिय आहे ते श्रीएकनाथ महाराजांनी सांगितले आहे. या कलियुगामधील हेच सर्वश्रेष्ठ असे साधन आहे. 'कीर्तन श्रेष्ठ कलियुगीं सेवा। तरले पातकी ते देवा' असा महिमा एकनाथांनी गायिला आहे.

१३०५ गंगा न देखे विटाळ। तेंचि राजणीं ही जळ ।। १ ।।
अल्पमहदा नव्हे सरी। विटाळ तो भेद धरी ।। २ ।।
काय खंडिली भूमिका। वर्णा पायरिका लोकां ।। ३ ।।
तुका म्हणे अग्नीविण। बीजें वेगळीं तों भिन्न ।। ४ ।।

शब्दार्थ व टीपा –महदा–मोठे, पायरिकां–पायरीच्या.

अर्थ –गंगेच्या प्रवाहास विटाळ नाही, पण तेच पाणी जर लहानशा राजणात घातले व त्यास ओवळयाने स्पर्श केला तर मात्र ते विटाळते. १. याचप्रमाणे अगदी थोडे व फार मोठे यांना एकाच स्वरूपाचे मानणे बरोबर नाही. त्याच्या त्याच्या या लहानमोठया रूपामुळेच विटाळाचा भेद निर्माण होतो. २. सर्व वर्णांचे व जातींचे लोक पृथ्वीला पायरीच्या रूपाने मापून तिच्यावर वावरतात म्हणून काय ती कधी भेद करीत नाही. ३. तुकाराम महाराज म्हणतात, अग्नीपासून बीज वेगळे आहे तोपर्यंतच ते भिन्न असते. अग्नीशी संबंध आल्यावर मग मात्र त्याचा दोष जातो. लहानाचा मोठयाशी संपर्क आला की दोष कमी होतो असा भावार्थ. ४.

१३०६ देवावरिल भार। काढू नये काहीं पर ।। १ ।।
तानभुके आठवण। घडे तें बरें चिंतन ।। २ ।।
देखावी निश्चिती। तेचि अंतर श्रीपती ।। ३ ।।
वैभव सकळ। तुका मानितो विटाळ ।। ४ ।।

शब्दार्थ व टीपा –पर–संबंध असलेला, निश्चिती–चिंतन न केल्याने.

अर्थ –देवावर असलेला आपला भार काढू नये. कारण तो संबंध मूळचाच असलेला आहे. १. तहान, भूक यांच्या वेळी त्याची आठवण होते, हे एक चांगलेच चिंतन घडते त्याचे. २. देवासंबंधी कसलेही चिंतन न केल्यामुळे त्या श्रीपतीत अंतर पडते, तो दुरावतो. ३. म्हणून तुकाराम महाराज म्हणतात, साऱ्या बाह्य वैभवाशी मी विटाळ मानतो. ४.

१३०७ [1]थुंकोनियां मान । दंभ करितों कीर्तन ॥ १ ॥
जालों उदासीन देहीं । एकाविण चाड नाहीं ॥ २ ॥
अर्थ अनर्थ सारिखा । करून ठेविला पारिखा ॥ ३ ॥
उपाधिवेगळा । तुका राहिला सोवळा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:-एकावाचून-एका ईश्वरावाचून, अर्थ-पैसा, अनर्थासारिखा-संकटाप्रमाणे, पारिखा-दूर.

अर्थ -मान, सन्मान, दंभ अशा वृत्ती थुंकून टाकून आम्ही कीर्तन करीत असतो. १ मी देहाविषयी संपूर्ण उदासीन झालो असून त्या एका ईश्वरावाचून मला दुसऱ्या कोणाचीच पर्वा नाही. २ द्रव्य अथवा पैसा यास संकटाप्रमाणे मानून त्याला दूरच ठेविले आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी सर्व उपाधींपासून वेगळा व सोवळा असाच राहिलो आहे. ४

१३०८ काय ह्याचे ध्यावें । नित्य नित्य कोणे गावें ॥ १ ॥
केले हरिकथेनें वाज । अंतरोनी जाते निज ॥ २ ॥
काम संसार । अंतरीं हे करकर ॥ ३ ॥
तुका म्हणे हेड । ऐसे मानिती ते लंड ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा -वाज-व्यर्थ, नीज-झोप, करकर-कटकट, हेंड-पशु, लंड-ठग, फसविणारे.

अर्थ :-कित्येक दुर्जन म्हणत असतात, या देवाचे काय घ्यावे ? याचा विश्वास तरी कसा धरावा ? आणि रोज रोज याला किती गावे ? १ या हरिकथेनेच आमचे आयुष्य व्यर्थ केले. आमची झोप मात्र व्यर्थ नाहीशी होते. २ या कीर्तनाच्या कटकटीमुळे सुखभोग व संसारातील कामधंदा याना मात्र अंतर पडते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, हे असे मानणारे लोक पशू असून फसविणारे लंड असतात. ४

१३०९ वदे साक्षत्वेसीं वाणी । नारायणीं मिश्रित ॥ १ ॥
न लगे कांहीं चाचपावें । जातों भावें पेरीत ॥ २ ॥
भांडार त्या दातियाचें । मी कैचें ये ठायीं ॥ ३ ॥
सावावीत गेला तुका । येथें एकाएकीं तो ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा .- साक्षित्वेंसी-अनुभवाने, प्रत्ययाने, पेरीत-उपदेश करीत, सावावीत-सावध करीत.

अर्थ :-माझी वाणी ईश्वराच्या अनुभवाने या नारायणाच्या कृपेने मिश्रित अशी आहे. १ त्यामुळे चाचपत जाण्याचे अथवा मोली बाळगण्याचे कुणास कारण नाही. मी भक्तीचा भावार्थ पेरीत चाललो आहे. २ हे सर्व वैभव त्या दात्या ईश्वराचे असून, मी या ठिकाणी क्षुद्र आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी जरी एकटा असलो तरी सर्व लोकाना सावध करीत चाललो आहे ४

विवरण -तुकाराम महाराजाना आपल्या वाणीविषयी व कर्तृत्वाविषयी जी यथार्थ जाणीव होती, ती या अभंगात प्रकट झाली आहे. आपली वाणी व आपले कार्य हे ईश्वराच्या कृपेने मिश्रित आहे. आपण क्षुद्र असूनही केवळ त्या परमेश्वराच्या कृपेने बलवान झालो आहोत असा भाव त्यानी अनेक अभंगातून व्यक्त केला आहे. आपण जे बोलतो ते आपले बोलणे नसून त्यापाठीमागे श्रीविठ्ठलाची प्रेरणा आहे. विठ्ठलच आपल्या मुखातून बोलत आहे, असे त्यानी वारंवार सांगितले आहे. 'नव्हतो माझे बोल बोले पांडुरंग', 'बोलवती देव मज', 'आपुलिया बळें नाहीं मी बोलत' अशा वचनातून तुकोबानी आपली वाणी 'नारायणीं मिश्रीत' कशी आहे ते दर्शविले आहे. त्या

---

[1] थुंकोनिया

दात्याचे भांडारच आपण लुटीत आहोत, हा भावही अनेक ठिकाणी त्यांनी प्रकट केला आहे. धन्याचे भांडार फोडून आपण फक्त हमालाचे काम करीत आहोत, असे एका अभंगात बुवा म्हणताना दिसतात

१३१० ऐसी जिव्हा निकी । विठ्ठल विठ्ठल कां न घोकी ॥ १ ॥
जेणें पाविजे उद्धार । तेथें राखावे अंतर ॥ २ ॥
गुपोनि चावटी । तेथें कोणा[1] लाभें भेटी ॥ ३ ॥
तुका म्हणे कळा । देवाविण अमंगळा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – निकी–चांगली, अंतर–अंतःकरण, गुपोनि–योजून, कळा–कला

अर्थ – आपली जीभ इतकी चांगली असून ती विठ्ठल विठ्ठल असे नाम कां घोकीत नाही ? १ जेथून आपला उद्धार होतो तेथे आपले अंतःकरण समर्पित करावे लागते २ उगाच चावटपणाच्या बोलण्याने कोणता लाभ होणार आहे ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, एका ईश्वराच्या संगतीशिवाय सर्व कला अमंगळच समजाव्यात ४

१३११ साजे अळंकार । तरि भोगिता भ्रतार ॥ १ ॥
व्यभिचारा टाकमटिका । उपहास होती लोकां ॥ २ ॥
शूरत्वाची वाणी । रूप मिरवे मंडणीं ॥ ३ ॥
तुका म्हणे जिणें । शक्तीविण लाजिरवाणें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा — साजे–शोभून दिसतो, अलंकार–दागिना, टाकमटिका–थाटमाट, मंडणी– शोभायमान अवस्थेत

अर्थ –जर भ्रतार अनुकूल राहून उपभोग घेत असेल तरच स्त्रीचा दागिना शोभून दिसतो १ नाही तर व्यभिचारी स्त्रीने कितीही थाटमाट केला तरी त्याचा सर्वत्र उपहासच होतो २ शूरत्वाच्या बोलण्यास शोभणारे रूपही सुशोभित असते ३ तुकाराम महाराज म्हणतात, शक्तिसामर्थ्यावाचून जीवन जगणे लाजिरवाणे आहे ४

१३१२ मानामान किती । तुझ्या क्षुल्लका संपत्ती ॥ १ ॥
जा रे चाळवीं बापुडीं । कोणी धरिती तीं गोडी ॥ २ ॥
रिद्धिसिद्धी देसी । आह्मीं चुंभळें नव्हों तैसीं ॥ ३ ॥
तुका म्हणे ठका । एसे नागविले लोकां ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – मानामान–मान आणि अनमान, चुंभळें–आशाळभूत, हावरे

अर्थ –मान किंवा अपमान ही तुझ्यापुढे किती क्षुल्लक अशी संपत्ती आहे १ जे इंद्रियाधीन असतील, त्यांच्यापुढे त्या चाळीव, आमच्या सारख्यांना त्यात कुठली गोडी ? २ तू रिद्धीसिद्धींचे दान देशील, पण त्याचा स्वीकार करण्याइतके आम्ही आशाळभूत नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, ठका, अरे, तू किती लोकांना या मानापमानामुळे आणि रिद्धीसिद्धींच्यामुळे फसवशील ? ४

१३१३ पाहातोसी काय । आतां पुढें करीं पाय ॥ १ ॥
वरि ठेवूं दे मस्तक । ठेली जोडूनि हस्तक ॥ २ ॥
यरवे करीं सम । नको भंगों देऊं प्रेम ॥ ३ ॥
तुका म्हणे चला । पुढती सामोरे विठ्ठला ॥ ४ ॥

---

१ कोण लाभ

शब्दार्थ व टीपा :– ठेलों–उभा राहिलो सम–सारखे.

अर्थ :– देवा, आता काय पाहातोस ? तुझे पाय पुढे कर ना. १ या तुझ्या पायांवर मला मस्तक ठेवू दे. मी हात जोडून उभा आहे २ तुझे पाय चांगले एकसारखे असू दे त्यांच्याविषयीं माझ्या मनात जे प्रेम आहे त्याचा भंग करू देऊ नकोस. ३ तुकाराम महाराज म्हणतात, विठ्ठला, चला माझ्यासमोर या ना. किंवा चला आपण सारेजण त्या विठ्ठलाच्या सामोरे जाऊ ४

१३१४ भक्त ऐसे जाणा जे देहीं उदास । गेले आशापाश निवारूनि ॥ १ ॥
विषय तो त्यांचा झाला नारायण । नावडे धन जन माता पिता ॥ २ ॥
निर्वाणीं गोविंद असे मागेंपुढें । कांहींच सांकडें पडो नेदी ॥ ३ ॥
तुका म्हणे सत्य कर्मा व्हावें साह्य । घातलिया भये नर्का जाणें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– निर्वाणीं– संकटप्रसंगी, सांकडे– संकट, सत्यकर्मा– चांगल्या कार्यासाठी.

अर्थ :–जे देहभावाविषयी उदास झाले आहेत व ज्यांचे आशापाश नष्ट झाले आहेत, त्यांनाच ईश्वराचे भक्त समजावे १ त्यांना नारायण हाच एक विषय झालेला असून धन, लोक, माता, पिता असा लौकिक आवडेनासा होतो. २ अशा भक्तांच्या संकटप्रसंगी त्यांना सांभाळणारा गोविंद त्यांच्या मागेंपुढें उभा असतो तो त्यांना काहीच संकटे पडू देत नाहीं. ३ तुकाराम महाराज म्हणतात, चांगल्या कार्याला सर्वांनी साह्य करावे; याविषयी कुणी भय घालेल तर तो नर्कासच जाईल. ४

१३१५ तोंच हीं क्षुल्लकें सर्वो सहोदरें । नाहीं विश्वंभरें वोळखी तों ॥ १ ॥
नारायण विश्वंभर विश्वपिता । प्रमाण तो होतां सकळ मिथ्या ॥ २ ॥
रवि नुगवें तों दीपिकांचें काज । प्रकाशें सें तेज सहज लोपे ॥ ३ ॥
तुका म्हणे देहसंबंध संचितें । कारण निरुतें नारायणीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– सहोदरें–भाऊवद, प्रमाण होता–अनुभवास आल्यानंतर, नुगवे–उगवला नाही, काज–कारण, संचितें–प्रारब्धाच्या योगाने, निरुतें–खरे.

अर्थ – जोपर्यंत विश्वाला व्यापून राहणाऱ्या श्रीहरीची ओळख पटली नाही, तोपर्यंतच सखेसोयरे व भाऊबंद यांची क्षुल्लक नाती उरलेली असतात. १ एक नारायण सर्व विश्वात भरून राहिला आहे व तोच विश्वाचा पिता आहे, म्हणून एकदा अनुभव आला की मग सर्व बाह्य जगत मिथ्याच वाटू लागते २ जोपर्यंत सूर्य उगवला नाही तोपर्यंतच लहान लहान दिव्यांचे कारण असते, एकदा सूर्याचा प्रकाश फाकल्यावर मात्र लहान दिव्यांचे तेज लोप पावते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, हा देहसंबंध प्रारब्धानेच प्राप्त झालेला असतो देहरूपापासून येऊन खरे कार्य नारायणासाठीच करायचे आहे. ४

१३१६ यज्ञ भूतांच्या पाळणा । भेद कारिया कारणा । पावावया उपासना । ब्रह्मस्थानीं प्रस्थान ॥१॥
एक परी पडिलें मार्गी । फळ बीजाचिये अंगीं । धन्य तोचि जगीं । आदि अंत सांभाळी ॥२॥
आवश्यक तो शेवट । मार्गे अवघी खटपट । चालों जाणे वाट । ऐसा विरळा एखादा ॥३॥
तुका होवोनि निराळा । क्षराअक्षरावेगळा । पाहे निगमकळा । बोले विठ्ठलप्रसादें ॥४॥

शब्दार्थ व टीपा :–भूतांच्या–प्राणिमात्रांच्या, पाळणा–पालन करण्यासाठी, परी–प्रकारचे, क्षराअक्षरावेगळा–नाशवंत व शाश्वत याच्याहून निराळा, निगमकळा– वेदाचे ज्ञान.

अर्थ – यज्ञाच्यापासून पाऊस पडतो व पावसामुळे सर्व प्राणिमात्रांचे पालनपोषण होते असा हा कारण-कार्याचा संबंध ठीक असला तरी श्रीहरीची उपासना प्राप्त होण्यासाठी ब्रह्मस्थानीच प्रस्थान ठेवायला हवे म्हणजे जीवाने ब्रह्माचेच अनुसंधान राखायला हवे १ एकाच प्रकारचे ईश्वरी स्वरूपाचे बीज निरनिराळ्या भागात पडले तरी त्या बीजाच्या अंगी फळ अव्यक्त रूपात असतेच या फलबीजांच्या आदी अंती असणाऱ्या परमेश्वरास जो सांभाळील तोच या जगात धन्य होईल २ शेवटी श्रीहरीची प्राप्ती होणे याची आवश्यकता विशेष असून त्याच्याशिवाय इतर सर्व खटपट व्यर्थ आहे या श्रीहरीकडे जाणारी वाट चालणारा एखादाच क्वचित भेटतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी या शाश्वत व नाशवत अशा सृष्टीच्या उपाधींहून सर्वस्वी निराळा होऊन राहिलो आहे विठ्ठलाच्या प्रसादाने मी वेदाचे ज्ञान बोलत आहे ४

विवरण –भूतमात्राचे पालनपोषण अन्नामुळे होते, अन्न पर्जन्यापासून उत्पन्न होते, पर्जन्य यज्ञामुळे निर्माण होतो, यज्ञ कर्माने संपादन होतो, कर्म वेदापासून निर्माण होते व वेद अक्षरतत्त्वापासून म्हणजे सच्चिदानंद स्वरूपापासून निर्माण होतात म्हणजेच सर्व चराचर सृष्टीचे पालन पर्यायाने परमेश्वरी तत्त्वामुळेच होत असते असा गीतेमधील सारांश आहे,'अन्नाद् भवति भूतानि पर्जन्यादन्नसंभव' । यज्ञाद् भवति पर्जन्यो यज्ञ कर्मसमुद्भव' ॥ कर्म ब्रह्मोद्भव विद्धि ब्रह्माक्षर-समुद्भव । तस्मात्सर्वगत ब्रह्म नित्य यज्ञे प्रतिष्ठितम् ॥' असा गीताप्रणीत संदेश असला तरी पर्जन्य यज्ञ, वेद यांच्या मुळाशी असलेले चित्तत्त्व विसरून जाऊन पुष्कळ वेळा केवळ ब्रह्मकर्मकांडालाच महत्त्व उरते यज्ञयागादी क्रियांचे वरवरचे रूपच लोकांच्या ध्यानात राहते अशा वेळी तुकाराम महाराज या प्रक्रियेतील कार्यकारणभाव स्पष्ट करून सांगतात की, उपासना अथवा ईश्वराशी अनुसंधान साधावयास ब्रह्मस्थानी असलेला अतूट संबंधच ध्यानी आणा-वयास हवा. शिवाशी जीवाचे असलेले नाते अनुभवास आले तरच सार्थकता आहे.

१३१७ वेदपुरुष तरि नेती का वचन । निवडूनि भिन्न दाखविले ॥ १ ॥
तुझीं कर्मे तूचि दावूनि अनंता । होतोसी नेणता कोण्या गुणे ॥ २ ॥
यज्ञाचा भोक्ता तरि का नव्हे सांग । उणे पडता अंग क्षोभ घडे ॥ ३ ॥
वससी तूं या भूताचे अंतरीं । तरि का भेद हरी दाखियेला ॥ ४ ॥
तपतिर्थाटणें तुझें मूर्तिदान । तरि का अभिमान आड येतो ॥ ५ ॥
आता क्षमा कीजे विनवितो तुका । देऊनिया हाका उभा द्वारीं ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा–नेति–असे नाही, हे नाही असे वर्णन,

झाल्यामुळे यज्ञयागही पूर्ण होत नाही सर्व प्राणीमात्रात परमेश्वराचे निवासस्थान असले तरी एक मोठा, एक लहान, एक चपल, एक मंद बुद्धीचा, एक जवळचा, एक दूरचा असा भेदभाव तरी का दिसतो ? जपतप, तीर्थस्थाने, दान-धर्म ही सर्व त्याचीच रूपे असूनही ही कर्मे करणाऱ्याच्यात वृथा अभिमान का निर्माण होतो ? हे असे प्रश्न तुकोबाच्या मनात निर्माण झाले आहेत ते त्यांनी स्पष्टीकरणासाठी क्षमा प्रार्थूनच ईश्वराजवळ मांडले आहे

## लोहगांवीं स्वामींच्या अंगावर ऊन पाणी घातलें तो अभंग ।। १ ।।

१३१८ जळे[1] माझी काया लागला वोणवा । धाव रे केशवा मायबापा ॥ १ ॥
पेटली सकळ कांति रोमावळी । नावरे हे होळी दहन जाले ॥ २ ॥
फुटोनिया दोन्ही भाग होऊं पाहे । पाहातोसी काय हृदय माझें ॥ ३ ॥
घेऊनि जीवन धावें लवलाहीं । कवणाचें काहीं न चले येथें ॥ ४ ॥
तुका म्हणे माझी तू होसी जननी । आणीक निर्वाणीं कोण राखे ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा –काया–शरीर, वोणवा–आग, जीवन–पाणी, निर्वाणीं–संकटप्रसंगी

अर्थ –देवा, नारायणा, मायबापा, माझे शरीर आता पूर्णपणे आग लागून जळत आहे रे केशवा तू धावून ये १ माझ्या शरीरावरील त्वचेची कांती व केस जळून भस्म होत आहेत हा दाह काही केल्या शांत होत नाही २ माझ्या हृदयाचे फुटून दोन तुकडे होत असूनही तू अजून काय पाहात राहिला आहेस ? ३ आग विझविण्यासाठी पाणी घेऊन तू लवकर धावून ये ना कारण याप्रसंगी कुणाचे काही चालत नाही ४ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तूच माझी आई झाला आहेस, म्हणून तुझ्याशिवाय संकटाच्या प्रसंगी माझे रक्षण करणारा दुसरा कोण आहे ? ५

विवरण –तुकोबासारख्या सत्पुरुषानाही लोकनिंदेचे व कटु प्रसंगाचे आघात सहन करावे लागले तुकोबाच्या चरित्रात असे मानहानीचे प्रसंग अनेक आहेत अशा प्रसंगी लीन वृत्ती ठेवून त्यांनी ईश्वरास आळविले व स्वतःची संकटामधून सुटका करून घेतली लोहगावी असताना एका दुष्ट स्त्रीने तुकोबाची फजिती करण्यासाठी त्यांच्या अंगावर कढत पाणी ओतले त्यांचे अंग भाजून निघाले सर्व अंगाची आगआग होऊन गेली त्यांचे हृदय फुटून निघाले अशा वेळी रक्षण करणारा एकट्या पांडुरंगावाचून दुसरा कोण आहे ? तुकोबांनी या अभंगात त्याच परमेश्वराची आर्त चित्ताने प्रार्थना केली आहे करुणा भाकली आहे संकट प्रसंगी दुबळ्या मुलाने आपल्या आईस साह्यार्थ बोलवावे त्याप्रमाणे तुकोबांनी विश्वाच्या जननीस कळवळून स्वतःचे दुःख निवारण करण्याची विनंती केली आहे

या संबंधीची आख्यायिका अशी आहे की, तुकाराम महाराजांच्या लोहगाव या आजोळच्या गावी त्यांची अनेकदा कीर्तने होत असत आसपासचे अनेक लोक तुकोबांच्या कीर्तनसुखाचा लाभ घेत परंतु या गावचा शिवबा कासार मात्र येत नसे घरी बसून तुकाराम महाराजांची हा टवाळीच करी परंतु टवाळी करण्याच्या निमित्ताने कथेस गेलेला हा शिवबा कीर्तनात रंगून गेला त्याला तुकोबांचा लोभ जडला ' गाढवाचे घोडें । आम्ही करूं दृष्टीपुढें ' ही उक्ती बुवांनी सार्थ केली शिवबा कासाराचा सारा दिवस तुकाराम महाराजांच्या संगतीत व प्रेमात जाऊ लागला त्याचे घरादारावरचे चित्त कमी झाल्याने त्याची बायको संतापली आपल्या नवऱ्यास बिघडविणाऱ्या तुकोबावरच तिने सूड घ्यायचे ठरविले, शिवबाने सत्कारासाठी तुकोबांना घरी आग्रहाने बोलविले तेव्हा त्याच्या बायकोने बुवांच्या अंगावर कढत पाणी घातले बुवांना हे चटके जाणवले त्यांच्या अंगाची आग आग होऊन त्यावर फोड आले तुकोबा मूर्तिमंत करुणेचा व क्षमेचा अवतार असल्याने ते शिवबाच्या बायकोवर रागावले नाहीत त्यांनी विठ्ठलाचा धावा केला.

---

[1] जळो

तु गाथा ।। ५

आपले दुःख विठ्ठलास निवेदन केले. विठ्ठलाने शिवबाच्या बायकोस शासन केले. तिच्या अंगावर फोड उमटले. पुढे रामेश्वरभटाच्या सांगण्यावरून तिने तुकारामांच्या स्नानाच्या जागेवरील चिखल जेव्हा अंगास चोळला तेव्हा ते बरे झाले. तिलाही आपल्या कृत्याचा पश्चात्ताप झाला व तीही तुकारामांची शिष्या बनली.

१३१९ अभक्त ब्राह्मण जळो त्याचे तोंड । काय त्यासी रांड प्रसवली ॥ १ ॥
वैष्णव चांभार धन्य त्याची माता । शुद्ध उभयता कुळ याती ॥ २ ॥
ऐसा हा निवाडा जालासे पुराणीं । नव्हे माझी वाणी पदरींची ॥ ३ ॥
तुका म्हणे आगी लागो थोरपणा । दृष्टि त्या दुर्जना न पडो माझी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :–अभक्त–ईश्वराची भक्ती न करणारा, वैष्णव–विष्णूचा एकनिष्ठ भक्त, निवाडा–निर्णय

अर्थ :–एखादा ब्राह्मण जर ईश्वराची भक्ती न करणारा असेल तर त्याच्या तोंडास आग लागो. त्याच्या रांड आईने त्याला जन्म तरी का दिला ? १ आणि एखादा चांभाराच्या जातीचा का असेना, पण तो विष्णूचा एकनिष्ठ भक्त आहे, तर त्याची आई त्यास जन्म देऊन धन्य झाली असेच म्हणायला हवे. त्याच्या आईबापाचे कूळ शुध्दच समजायला हवे. २ ही काही माझ्या पदरची वाणी नाही. असा हा निर्णय पूर्वीच्याच पुराणांनी केलेला आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा प्रकारे केवळ जन्माने येणाऱ्या व ईश्वरभक्तिविहीन असणाऱ्या थोरपणास आग लागो. अशा दुर्जनाचे मला दर्शनही नको. ४

विवरण :– मराठी साधुसंतांनी जन्मजात जातिकल्पनेविरुद्ध जो विचार सौम्यपणाने मांडण्यास प्रारंभ केला होता, त्याचा अर्थ सावधपणाने ध्यानात घ्यावयास हवा. आजच्या अर्थाने मोठी चळवळ करून, कायद्याचे साह्य घेऊन जातिभेद तोडण्यासाठी संत प्रवृत्त झाले नव्हते. माणसाच्या हृदयात परिवर्तन व्हावे, केवळ कर्मामुळे वा व्यवसायामुळे अमंगलपणा आला असेल तर तो दूर व्हावा, चित्तशुद्धीकडे लक्ष द्यावे, अशा विचारांनी भक्तीच्या क्षेत्रात तरी जातिविचाराला स्थान राहू नये, अशा अर्थाची वचने संतवाङ्मयात सापडतात. एकाच बीजतत्त्वाचा हा सर्व विस्तार असल्यामुळे, ' बीजचि जाहलें तरु ' अशी वस्तुस्थिती असल्यामुळे एक पवित्र, दुसरा अपवित्र असा भेद तरी आला कुठून ? अशा प्रकारच्या धिटाईचा प्रश्नही काही संतांनी विचारलेला आहे. ' नीचाचे संगतीं देवो विटाळला । पाणियें प्रक्षाळोनि सोंवळा केला ॥ मुळींच सोंवळा कोठें तो ओवळा । पाहतां पाहाणें डोळा जयापरी ॥ सोवळयाचे ठाई सोंवळा आहे । ओवळ्या ठाईं ओवळा का न राहे ? ' अशा प्रकारचा प्रश्न चोखोबांनी विचारला आहे.

अशा विचाराचा रोख असा की, जातीचे शुद्धत्व जन्मावरून, वर्णावरून न ठरवता कर्मावरून, चित्तशुद्धीवरून ठरवावे. केवळ जन्माने ब्राह्मण, पण त्याच्या मुखात श्रीहरीचे नाम नाही, तो अभक्त आहे, म्हणून तुकोबांनी त्याचा धिक्कारच केला आहे. उलट एखादा चांभारही शुद्ध चित्ताचा असेल आणि व्यवसाय त्याचा कोणताही असेल पण तो जर वैष्णव असेल, रोज भगवंताची पूजा शुद्ध भावाने करीत असेल तर त्याची जात शुद्ध, पवित्र व मंगल समजावी. त्याचे आईबाप त्याला जन्म देऊन धन्य झाले, असेच मानावयास हवे, हा विचार तुकाराम महाराजांनी येथे स्पष्ट शब्दात व्यक्त केला आहे. पुन्हा स्वतः आपण हा निर्णय स्वमुखाने देत असलो तरी त्याचा निवाडा पूर्वीच पुराणांनीच केला असल्याचेही त्यांनी स्पष्ट केले आहे.

भगवद्गीतेच्या नवव्या अध्यायातील बत्तिसाव्या श्लोकात स्त्रिया, वैश्य, शूद्र यांना भगवंतांनी पश्चात्ताप व चित्तशुद्धी यांच्या साह्याने अभय दिले आहे. ' मां हि पार्थ व्यपाश्रित्य येऽपि स्युः पापयोनयः । स्त्रियो वैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यान्ति परां गतिम् ' या श्लोकाचा अर्थ स्पष्ट आहे, माझा आश्रय केला असेल तर, स्त्रिया, वैश्य, शूद्र इत्यादिकांनाही चांगली गती प्राप्त होईल, असे भगवंताचे आश्वासन आहे. माझा आश्रय करणे म्हणजे काय याचे फार चांगले व सुस्पष्ट विवेचन श्रीज्ञानदेवरांनी केले आहे. ' जयाचिये वाचे माझे आलाप । दृष्टि भोगी माझेंचि रूप । जयाचें मन संकल्प । माझाचि वाहे ॥ माझिया कीर्तीविण । जयाचे रिते नाही श्रवण । जयां सर्वांगीं

भपण । भाजी सेवा ॥' असे जे खऱ्या अर्थाने वैष्णव आहेत 'ते पापयोनीही होतु कां । ते भुतायीनही न होतु कां परि मजसीं तुकितां तुका । तुटी नाहीं ॥' असे स्पष्टपणे भगवतांनी सांगितले आहे 'म्हणोनि कुळ जाति वर्ण । हें आवघेंचि गा अकारण । एय अर्जुना माझेपण । सार्थक एक ॥' अशा प्रकारे कुळ, जाती व वर्ण याची चुकीच्या मार्गाने दृढ होत असणारी प्रतिष्ठा संतानी कमी केली.

केवळ श्रेष्ठ वर्णात जन्म म्हणून तो श्रेष्ठ, असे संताना मान्य नाही ब्राह्मण हा वर्णाने श्रेष्ठ, सर्व वर्णांचा तो गुरु हे खरे, पण केव्हा ? केवळ तो ब्राह्मणकुळात जन्मला म्हणून नव्हे. ब्रह्म जाणून घेण्यासाठी त्याने काय केले? हा प्रश्न महत्त्वाचा आहे. ब्रह्म जाणणारा मग तो इतर वर्णांचा, जातीचा असला तरी तो ब्राह्मणच असा निर्णय पुराणानी दिल्याचे तुकोबा सांगतात ब्रह्म जाणणे, ईश्वराची भक्ती खऱ्या अर्थाने करणे, हे खरे ब्राह्मणत्वाचे लक्षण; मग तो जातीने महार, चांभार का असेना त्याचे कुळ पवित्र मानावे. शृंगीऋषी, जंबुक, वाल्मीकी, व्यास, विश्वामित्र, वसिष्ठ, इत्यादी ब्रह्मनिष्ठांची चरित्रे पुराणातून दिलेली आहेत. तुकोबांनी आपल्या पदरचे काही घातले किंवा नवीन निर्माण केले असे नाही.

ब्रह्म जाणून घेणारा अथवा श्रीविष्णूची भक्ती करणारा भक्त याची फार चांगली व मार्मिक चिकित्सा तुकाराम महाराजांची प्रसिद्ध शिष्या बहिणाबाई हिने केलेली आहे. 'वर्णामाजीं एक ब्राह्मण वरिष्ठ,' 'ब्राह्मण पूजावे आदरें,' 'ब्राह्मणाचे मुखें तृप्त होय देव,' 'ब्राह्मणाची सेवा घडे एक क्षण । इच्छा होत पूर्ण अतरींची,' 'चहूं वर्णांमाजीं वरिष्ठ ब्राह्मण,' अशी वचने तिच्या अभंगातून आहेत हे तर खरेच, पण या वचनातील ब्राह्मण कोण ? ब्राह्मण जातीवरून, जन्मावरून ठरवावा की काय ? असे प्रश्न मोठ्या धिटाईने तिनेच निर्माण केले आहेत. 'ब्राह्मण कोणासी म्हणावें निश्चित । पहावा हा अर्थ विवेकेंची' अशी जाणीव देऊन तिने ब्राह्मण कुणास म्हणावे याचे सविस्तर वर्णन केले आहे. जीवात्मा ब्राह्मण म्हणावे काय ? देहाला ब्राह्मण म्हणावे काय ? वर्ण अथवा जात याना प्रमाण मानून ब्राह्मण समजावा काय ? अशा प्रश्नांची उत्तरे तिने नकारात्मक दिली आहेत, 'ब्राह्मण वेगळा वर्णाही अतीत । पाहता निश्चित भासतसे' तिने अगदी स्पष्ट भाषेत सांगितले आहे की, 'श्वेत तो ब्राह्मण, क्षत्रिय आरक्त । वैश्य वर्ण पीत नाही ऐसे । कृष्णवर्ण शूद्र नाहीं ऐसा भेद' वर्णावरून, जातीवरून, जन्मावरून, श्रेष्ठत्व मापू नये, ब्राह्मण्य मापू नये, असा विचार बहिणाबाईंच्या मनात दृढ झालेला आहे. कुणास काही शंका राहू नये म्हणून 'बहिणा म्हणे याति नव्हेचि ब्राह्मण । ब्राह्मणाची खूण वेगळीच ।'

बहिणाबाईंच्या मते ब्राह्मण्याची खूण वर्ण, जाती, जन्म यापेक्षा वेगळीच मानावयास हवी. पांडित्य, कर्मकांड धर्मप्रवृत्ती, स्वर्गलोकाची प्राप्ती इत्यादि हेतूनी प्रेरित झालेलाही ब्राह्मण नव्हे. ज्याने ब्रह्म जाणले, ज्याला सर्वभूती एक असलेला आत्मा ओळखता आला, तो खरा ब्राह्मण असे तिने म्हटले आहे. 'निर्विकल्प जया समाधि जोडली । चित्तासी अमोली परब्रह्मीं ॥ तोचि एक खरा ब्राह्मण वेदार्थें । आणिक तीं मतें पाखडाचीं ॥ सर्वाभूतीं एक आत्मा देखियेला । शांतीचा बोतिला मूर्तिमंत ॥ बहिणी म्हणे जैसें आकाश सर्वत्र । तैसा तो एकला जगामाजीं" अशा शब्दात बहिणाबाईंनी खरा ब्राह्मण कोण याचा खुलासा केला आहे हाच तुकोबाचा वैष्णव होय.

## नामदेव व पांडुरंग यांनीं स्वप्नांत येऊन स्वामीस आज्ञा केली कीं कवित्व करणें — ते अभंग ॥ २ ॥

१३२० नामदेवें केले स्वप्नामाजी जागें । सवें पांडुरंगें येऊनियां ॥ १ ॥
सांगितले काम करावें कवित्व । वाउगें निमित्य बोलों नको[1] ॥ २ ॥
माप टाकी सळ[2] धरिली विठ्ठलें । थापटोनि केलें सावधान ॥ ३ ॥
प्रमाणाची संख्या सांगे शत कोटी । उरले शेवटीं लावी तुका ॥ ४ ॥

१ नये, २ सळे

शब्दार्थ व टीपा :— सवें- बरोबर, पाउगें–उगाच, व्यर्थ, निमित्य–कारण, साळ–अभिमान, आग्रह, मापण्याचे साधन ?

अर्थ :– पांडुरंगास बरोबर घेऊन नामदेवांनी स्वप्नामध्ये येऊन मला जागे केले. १ तू कवित्व करावेस, उगाच व्यर्थ काही बडबड करू नयेस, असे म्हणून त्यांनी मला कविता करण्याचे काम सांगितले. २ मापण्याचे साधन विठ्ठलाने धरले आहे. तू अभंगाचे माप पुरेपूर टाक, असे त्यांनी मला थापटून सावध केले. ३ तुकाराम महाराज म्हणतात, नामदेव म्हणाले की, मी शंभर कोटी अभंग रचण्याची प्रतिज्ञा केली होती, त्यांपैकी जे उरले ते तू पूर्ण कर. ४

विवरणः–तुकाराम महाराजांच्या कवित्वाच्या प्रेरणेसंबंधी हा एक महत्त्वाचा असा अभंग आहे. नामदेवांची अपुरी राहिलेली शतकोटी अभंग रचण्याची प्रतिज्ञा पूर्ण करण्यासाठी नामदेवांनीच विठ्ठलासहित तुकारामबुवांना स्वप्नात प्रेरणा दिली. वाणी उगाच व्यर्थ खर्च करण्याऐवजी कवित्वाच्या कारणी लागावी म्हणून नामदेवांनी तुकाराम महाराजांना थापटून सावध केले. याप्रमाणे तुकोबांच्या अभंगरचनेत नामदेवांची प्रत्यक्ष प्रेरणा आहे. ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ, तुकाराम यांची परंपरा एकच आहे. भागवत धर्माच्या इमारतीचे कार्य यांच्याच कर्तृत्वाने उभे राहिले. ज्ञानेश्वरांच्या कार्याचा, तत्त्वज्ञानाचा विस्तार पडत्या काळात ज्ञानेश्वरीचा पुनरुद्धार करून एकनाथांनी केला; व नामदेवाच्या भवभक्तीचा आणखी प्रसार तुकोबांनी केला. अशी श्रद्धा वारकरी पंथात आहे ती इतिहासाशीही सुसंगत दिसते. ' नाम्याचा तुका व ज्ञान्याचा एका ' या सांप्रदायिक म्हणीतही हा संकेत स्पष्ट झालेला दिसतो. नामदेव व तुकाराम यांच्या कवित्वातील अनेक बाबतींतील साम्य पाहून या समजास बळकटी येते. दोघांचे प्रापंचिक जीवन, भक्तिप्रवणता, सगुणाचा ओढा, देवाविषयी लडिवाळ तळमळ व हृदयाचा ठाव घेणारी आर्तता पाहून नामदेवांचे कार्य तुकारामबुवांनी पुढे चालविले व तेही नामदेवाच्याच प्रेरणेवरून हे सहज पटण्यासारखे आहे.

या एका अभंगात दोनतीन गोष्टी प्रामुख्याने ध्यानात ठेवण्यासारख्या आहेत. ' माप टाकी सळ धरिली विठ्ठलें ' म्हणजे नेमके काय ? पुष्कळांनी सळ म्हणजे अभिमान, सामर्थ्य असा अर्थ केला आहे. तू कवित्वाचे माप पूर्ण करावेस असा आग्रह किंवा अभिमान श्रीविठ्ठलाने धरला आहे, अशा प्रकारचा अर्थ अनेक ठिकाणी दिलेला दिसतो. परंतु यापेक्षा सळ म्हणजे धान्य मापण्याचे एखादे साधन असा अर्थ अधिक युक्त दिसतो. तू कविता करून नामदेवांची प्रतिज्ञा पूर्ण कर. ते माप पुरे कर. त्या मापाची मापणी करण्याचे काम सळ धरून विठ्ठलाने पत्करले आहे. असा अर्थ जास्त बरोबर वाटतो. दुसरे असे की, शतकोटी अभंगरचना करण्याची प्रतिज्ञा नामदेवांनी केली होती काय? ती अपुरी का राहिली ? त्यांनी किती अभंग रचले ? प्रतिज्ञेपैकी उरले किती ? तुकारामबुवांनी किती अभंग करून प्रतिज्ञा पूर्ण केली ? असे अनेक महत्त्वाचे प्रश्न उपस्थित होतात. एक तर शंभर कोटी अभंग हा आकडा अतिशयोक्तीचा तर नाही ? ईश्वराची संपूर्ण कृपा आणि मानवी मनाचे सामर्थ्य पूर्णपणे जमेस धरूनही शंभर कोटी अभंग पूर्ण होणे एकदोन जन्मात तरी शक्य आहे काय ? अगदी ईश्वरी प्रसादाचा अद्भुत चमत्कार मानला तरी शंभर कोटी अभंगाचा हिशोब कसा लावायचा ? का ही एक आपली बोलण्याची पद्धत आहे ? खूप अभंग नामदेवांनी–तुकारामांनी रचले एवढाच अर्थ यातून काढायचा काय ? नामदेवांचे व तुकोबाचे आठदहा हजारच अभंग उपलब्ध आज असताना त्यांच्या शतकोटी अभंगाचे कोडे कसे उलगडायचे ?

संतचरित्रकार महिपतीबुवा यांनी भक्तीलीलामृताच्या बत्तीसाव्या अध्यायात शतकोटी अभंगाचा हिशोब देताना म्हटले आहे की, नामदेवांनी ९४ कोटी व ४० लक्ष अभंग रचून शेवटी ९ लक्ष लळिताचे अभंग केले आणि बाकीचे ५ कोटी ५१ लक्ष अभंग तुकोबांना रचण्यास सांगितले. या सांप्रदायिक हिशोबाची आणखीही फोड करता येण्यासारखी आहे. ' वेदांचे अभंग केले श्रुतिपर ' या एका अभंगात नामदेवाचे १ कोटी अभंग भक्तिपर, १ कोटी ज्ञानपर, एक कोटी अनुभवपर, ७५ लक्ष वैराग्यपर, ७५ लक्ष नामपर; असा ४॥ कोटी अभंगांचा तपशील त्यात असून ६० हजार उपदेशपर, ६० हजार रूपवर्णनाचे, आणखी काही इतर विषयावरचे. असा सुमारे ५ कोटी ७० लक्षाचा हिशोब लागतो. परंतु या सर्व अतिशयोक्तीच्या उक्तींना फारसे महत्त्व न देता नामदेव–तुकारामांनी पुष्कळच अभंगरचना केली, एवढाच मथितार्थ त्यातून स्पष्ट व्हावा. या संतश्रेष्ठांच्या अभंगांतील श्रेष्ठ अनुभूती, ईश्वराविषयी प्रेम, तळमळ, समाजाविषयी आस्था याना असलेले महत्त्व जाणावे. संख्येचा प्रश्न गौण समजला गेला

तरी हरकत नाही शतकोटी अभंग रचण्याची प्रेरणा नामदेवाना भक्तमंडळीत आत्मचर्चा करीत असताना वाल्मीकींनी शतकोटी ग्रंथरचना केल्याचा उल्लेख झाला त्यातून मिळाली वाल्मीकींनी शभर कोटी ग्रंथरचना करून आपल्या आयुष्याचे सार्थक केले, आपण मात्र आपल आयुष्य उगाच वाया घालवीत आहोत, अशा भावनेच्या जाणिवने नामदेवानी विठ्ठलापाशी करुणा भाकली विठ्ठलाने त्याची समजूत घातली आयुष्य थोडे असल्याने संकल्प कसा काय पूर्ण होणार ? अशी शका विठ्ठलानेच उपस्थित केली त्यावर 'जरी न होती संपूर्ण। जिव्हा उतरून ठेवीन मी' असे रोखठोक उत्तर नामदेवानी दिले मग नामदेवाचे आपल्यावरील भक्तीचे ऋण फेडण्यासाठी सरस्वतीलाच त्याच्या जिव्हेवर निवास करण्यास सांगितले तिची एकदा कृपा झाल्यावर नामदेवाची प्रतिज्ञा पूर्ण होण्यास फारशी अडचण पडणार नाही अशी खात्री, आणि या विश्वासावर गोणाई, राजाई या सासुसुना, दामा नामा हे बापलेक, नारा, म्हादा, गादा, विठा, हे चार पुत्र, लाडाई, गोडाई, येसाई, साकराई या चार सुना, निंबाई लेक, आऊबाई बहीण, वेढीपिशी दासी जनी 'इतुक्यांही जणीं अभंग आरंभिले। देवें पूर्ण केले नामा म्हणे' म्हणजे या सर्वांनी अभंगाची प्रतिज्ञा पूर्ण केली याविषयीचे महत्त्वाचे अभंग खालीलप्रमाणे आहेत

(१) चंद्रभागे तटीं आयकिल्या गोष्टी। वाल्मिके शतकोटी ग्रंथ केला ॥ १ ॥
येऊनिया नामा विठ्ठलासी म्हणे। केलें रामायण वाल्मीकीनें ॥ २ ॥
तेणे माझ्या चित्ता बहु झाले क्लेश। व्यर्थ म्या आयुष्य गमाविलें ॥ ३ ॥
जरी तुझा दास असेन मी देवा। तरी सिद्धी न्यावा पण माझा ॥ ४ ॥
करीन मी तुझे शतकोटी अभंग। बोले पांडुरंग 'ऐकें नाम्या' ॥ ५ ॥
तये वेळीं होती आयुष्याची वृद्धी। आताची अवधी थोडी आहे ॥ ६ ॥
नामा म्हणे, 'जरी न होती संपूर्ण। जिव्हा उतरून ठेवीन मी' ॥ ७ ॥

नामदेवाची ही घोर प्रतिज्ञा ऐकून त्याचे अभंग लिहून घेण्यास प्रत्यक्ष विठ्ठल तयार झाले. प्रत्यक्ष सरस्वतीच त्याच्या जिव्हेवर निवास करून राहिली यासंबधीही नामदेवानी अनुभव निवेदन केला आहे.

(२) निश्चय पाहूनि उपजली दया। स्वामी देवराया पांडुरंगा ॥ १ ॥
सारजेसी सांगे भीमातीरीं हरी। बैस जिव्हेवरी नामयाच्या ॥ २ ॥
लाडके लडिवाळ नामा माझें तान्हे। तयाला मजविण कोण आहे ? ॥ ३ ॥
मजवरी त्याचे फार असे ऋण। होईन उत्तीर्ण एवढ्याने ॥ ४ ॥
नामा म्हणे हातीं साधोनिया वहया। बैसे लिहावया पांडुरंग ॥ ५ ॥

अशा प्रकारे श्रीविठ्ठल व सरस्वतीदेवी यांच्या प्रत्यक्ष साहाय्याने घरातील सर्व लोकांची मदत घेऊन नामदेवानी ८४ कोटी ६० लक्ष अभंग रचून प्रतिज्ञा पूर्ण करण्याचा प्रयत्न केला ( महिपतीबुवा ही संख्या ९४ कोटी ४० लक्ष देतात ) याविषयीही एक अभंग आहे.

खपळलों आता न भियें रे तुज। सांडिली रे लाज लौकिकाची ॥ १ ॥
आम्ही दीन शिंपी इयें यातिहीन। दे माझें ठेवणें केशीराजा ॥ २ ॥
साठ लक्ष संख्या चौऱ्यांसी कोटी। त्यांत मी कवडी सोडूं काय ? ॥ ३ ॥
आणिक याहून असेन वेगळे। घेईन तें बळें जाण आता ॥ ४ ॥
तुझें थोरपण ऐक हें देवा। दुर्बळाचा ठेवा अभिलाषी ॥ ५ ॥
म्हणूनि पोरटा नामा खेचराचा। काया मनें वाचा सत्य करी ॥ ६ ॥

नामदेवाचेच हे अभंग आहेत असे गृहीत धरले तर असे दिसते की, त्यानी आपली प्रतिज्ञा पूर्ण करीत आणली होती उरलेले अभंग तुकोबानी पूर्ण करावेत, अशी परपरागत असलेली समजूत या सर्व प्रकरणातील अतिशयोक्ती ध्यानात घेऊनच या प्रश्नाचा विचार करावयास हवा

याच संदर्भात आणखी एक प्रश्न निर्माण होतो नामदेवांनी स्वप्नात येऊन प्रेरणा दिल्यावर तुकोबांच्या कवितेस प्रारंभ झाला, याचा अर्थ त्यांनी या प्रसंगाच्या आधी काही कविता केलीच नव्हती असा घ्यायचा का ? पुढील एका अभंगात ( क्र १३३३ ) त्यांनी स्वप्नात गुरूचा उपदेश झाल्यावर मनात दृढ विश्वास वाटू लागला असे म्हणून 'यावरिया जाली कवित्वाची स्फूर्ति । पाय धरिले चित्तीं विठोबाचे ' असे हकीगत दिली आहे यावरून गुरुपदेशानंतर कवित्वाची स्फूर्ती तुकाराम महाराजांना झाली हे स्पष्ट आहे विशेष प्रकारचे प्रासादिक कवित्व या नामदेवप्रेरणेतून प्रकट झाले असे असले तरी जाणकार अभ्यासकांचा तर्क असा की, गुरुपदेशाच्या व नामदेवप्रेरणेच्या आधीपासूनच तुकाराम महाराज कविता करीत असावेत त्यांची कीर्तीही आजूबाजूस पसरली असावी 'तुकोबाचीं पदें अद्वैत प्रसिद्ध । त्याचा अनुवाद चित्त मुरवी ॥ ऐसीं ज्यांचीं पदें तो मज भेटतां । जीवास या होता तोष बहू ॥ ' या बहिणाबाईच्या ओळींचा काळ तपासून पाहाता सन १६४० या वर्षी, म्हणजे गुरुपदेशाच्या वर्षीच तुकोबांची कवित्वगंगा प्रवृत्त झाली असे नव्हे, तर त्याही आधी पाचसात वर्षे तरी ते कविता करीत असावेत भक्तविजय व भक्तलीलामृत या ग्रंथात महिपतीबुवांनीही कर्म, उपासना, ज्ञानसाधना चालू असताना तुकोबांच्या कवित्वास आरंभ झाला व मग नामदेवांची प्रेरणा मिळाली असेच स्पष्टपणे सांगितले आहे 'हे शरीरतप करिता निश्चितीं । यावरी आहली कवित्वाची स्फूर्ती । जे श्रुतिशास्त्रांनी वर्णिली कीर्ती । ते प्राकृतमती बोलत ' असे भक्तविजयात म्हटले आहे

अर्थात् गुरुकृपा व नामदेवप्रेरणा याच्यानंतरचे कवित्व व आधीचे कवित्व यात पुष्कळच अंतर असल्याचे स्पष्ट आहे

प्रारंभीच्या काळात मोठ्या विनयाने, सकोचाने, क्षमेच्या याचनेने तुकारामबुवा बोलत 'गाईन ओविया शिष्टाच्या आधारें,' 'संतांचीं उच्छिष्टें बोलतों उत्तरें,' 'करितों कवतुक बोबडा उत्तरीं । झणी मजवरि कोप धरा ' अशी प्रवृत्ती त्यांच्या प्रारंभीच्या कवित्वात होती पण पुढे नामदेवांची प्रेरणा, सद्‌गुरुनाथांची कृपा, विठ्ठलाचे साह्य यांनी त्यांच्या वाणीस तेज चढले त्यांचा आत्मविश्वास वाढला 'प्रसादाची वाणी ' प्रकट होऊ लागताच तिचे दैवी सामर्थ्यही प्रचीतीस येत राहिले आता कवित्व करणे हे आपल्या पदरचे नाही स्वतःच्या युक्तीचा तो प्रकार नसून 'मज विश्वंभर बोलवितो ' असा आत्मविश्वास तुकोबांच्या मनात निर्माण झाला होता 'वदवी गोविंद तेंचि वदे,' 'तुका म्हणे गुरुकृपेचा आधार । पांडुरंगें भार घेतला माझा ' 'तुका म्हणे देवें केला बलात्कार । अगा आलें फार महत्पण ' इत्यादी ओळींवरून तुकोबांच्या श्रेष्ठ कवित्वाची खूण पटण्यासारखी आहे

१३२१ द्याल ठाव तरि राहेन संगती । संतांचे पगती[1] पायापाशीं ॥ १ ॥
आवडीचा ठाव आलोंसे टाकून । आता उदासीन न धरावे ॥ २ ॥
सेवटील स्थळ नीच माझी वृत्ति । आधारें विश्रांती पावईन ॥ ३ ॥
नामदेवापायीं तुक्या स्वप्नीं भेटी । प्रसाद हा पोटीं राहिलासे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – ठाव– आश्रय स्थळ– स्थळ, वृत्ती– धंदा, निर्वाहाचे साधन

अर्थ – वरील अभंगात सांगितल्याप्रमाणे तुकोबांना नामदेवांची व विठ्ठलाची प्रेरणा मिळाल्यावर बुवांनी सांगितले, तुम्ही जर मला आश्रय द्याल तर मी तुमच्याच संगतीने राहीन संतांच्या पंगतीस मी त्यांच्या पायाशी बसूनच राहीन १ केवळ तुमच्या प्रेमासाठीच मी माझे ठिकाण सोडून येथे आलो आहे आता तुम्ही उदासीन असू नये २ माझे स्थान शेवटचे असून माझा धंदाही हलक्या प्रकारचा आहे परंतु आता आपल्या पायांची विश्रांती मला मिळेल ३ तुकाराम महाराज म्हणतात, या नामदेवांची भेट मला तुकारामाला स्वप्नामध्ये झाली असल्यामुळे हा कवित्वाचा प्रसाद माझ्या हृदयात भरून राहिलेला आहे ४

---

१ सगती

१३२२ त्रिपुटीच्या योगें । कांहीं नव्हे कोणा जोगें ।
एक जाता[1] लागें । एक पाठीं लागतें ॥ १ ॥
मागें पुढें अवघा काळ । पळों नये न चले बळ ।
करिता कोल्हाळ । कृपे खादा हरि वाहे ॥ २ ॥
पापपुण्यात्मयाच्या शक्ती । असती योजिल्या श्रीपती ।
यावें काकुलती । तेथें[2] सत्तानापेक्षा ॥ ३ ॥
तुका उभा पैल थडी । तरि हे प्रकाश निवडी ।
घातल्या सागडी । तापे पेटीं हाकारीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – त्रिपुटी–एक नसेल तर उरलेल्या दोहोंचा काही उपयोग होत नसतो अशा तीन गोष्टींचा समुदाय. जीव, जगत व परमेश्वर, ज्ञाता, ज्ञान व ज्ञेय, साध्य, साधक व साधन अशा अनेक त्रिपुटी आहेत कोल्हाळ–गलका, गाधळ, कोलाहल, थडी–तीरावर, सागडी– नाव, नौका, तापे– भोपळे एकत्र बांधून नदी उतरून जाण्याची साधने, हाकारी– हाका मारतो

अर्थ – त्रिपुटी अनेक प्रकारच्या आहेत त्रिपुटीत्मक या जगात एक दुसऱ्याच्या अधिकारात नाही कारण त्रिपुटीमधील एक वस्तू नाहीशी झाली तरी दुसरी पाठीशी लागते १ मागे पुढे सर्वत्र काळानेच आपणास व्यापिले आहे त्याच्यापासून पळून जाण्याचे बळ आपल्यात नाही यासाठी ईश्वराच्या नावाचाच कोलाहल करून जीवित कठावे म्हणजे श्रीहरी आपणास स्वत च्या खाद्यावर घेऊन पैलतीरावर नेईल २ पापपुण्याच्या शक्तीत श्रीपतीने सर्व जग योजिले असल्यामुळे सर्व सत्तात्मक प्रभूपाशी काकुळतीस यावे हाच एक मार्ग येथे आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी पैलतीरावर उभा आहे व सवप्रकारची निवड करतो आहे हरिनामाच्या नौका व इतर तरण्याची साधने तयार ठेवून मी लोकास हाका मारीत आहे ४

१३२३ देखण्याच्या तीन जाती । वेठी वार्ता अत्यर्ती ॥ १ ॥
जैसा भाव तैसे फळ । स्वातीतोय एक जळ ॥ २ ॥
पाहे सागे आणि जेवी । अतर महदतर[3] तेवी ॥ ३ ॥
तुका म्हणे हिरा । पारखिया मूढा गारा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – देखण्याच्या– ईश्वराकडे पाहाण्याच्या, वेठी– बळजबरीने, वार्ता– दुसऱ्याने सांगितले म्हणून, अत्यर्ती–आतरिक तळमळीने, स्वातीतोय–स्वाती नक्षत्राचे पाणी, पारखिया– नीट पारख करणारास

अर्थ – ईश्वराकडे पाहाण्याचे तीन तरी प्रकार आहेत एक बळजबरीने पाहाणे, दुसरे दुसऱ्याने कुणी सांगितले म्हणून पाहाणे व तिसरे म्हणजे स्वत च्या आंतरिक तळमळीने पाहाणे १ जसा आपल्या मनातील भाव असेल तशी फळे आपणास मिळत राहतील स्वाती नक्षत्राचे पाणी एकच असते, पण ते तापलेल्या लोखंडावर नष्ट होते कमळाच्या पानावर मोत्याप्रमाणे चमकते पण शिंपल्यामध्ये पडल्यास प्रत्यक्ष मोतीच होते २ अन्न पाहाणे, त्याची हकीगत सांगणे व प्रत्यक्ष जेवणे यात फार अतर पडणार. तसे जसा भाव तशी प्राप्ती होणार. ३ तुकाराम महाराज म्हणतात, हिरा हा नीट पारख करणाऱ्या माणसाच्या हाती गेला तरच तो हिरा, नाहीतर मूख माणसाच्या दृष्टीने तो गारगोटीसारखाच असतो की ४

१३२४ अनुभवे अनुभव अवघाचि साधिला । तरि स्थिरावला मनु ठायीं ॥ १ ॥
पिटूनियां मुसे आला अळंकार । दग्ध तें असार होऊनिया ॥ २ ॥
एकचि उरले कायावाचामना । आनद भुवनामाजी त्र्यीं ॥ ३ ॥
तुका म्हणे आह्मी जिंकिला ससार । होऊनि किंकर विठोयाचे ॥ ४ ॥

१ याता, २ येथें, ३ महदान्तर

शब्दार्थ व टीपा – स्थिरावला– स्थिर झाला मनु– चित्त, मन, ठायीं– ईश्वराच्या ठिकाणी, पिटूनियां– आटवून, असार–हिणकस भाग, किंकर–दास

अर्थ – अनुभव घेता घेता आम्ही ईश्वरप्राप्तीचा उच्च प्रकारचा अनुभव मिळविला या अनुभवाने आमचे मन त्याच्या पायी आता स्थिर झाले आहे १ मुशीमध्ये सोने घातल्यावर ते आटले व त्यातील हिणकस भाग जळून नष्ट झाला आणि उरलेल्या शुद्ध सोन्याचा अलंकार घडविण्यात आला २ त्याप्रमाणे वापायावेगनेककरून सवत्र एकच आनंद सर्व त्रिभुवनात उरलेला आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, आम्ही या विठोबाचे दास झालो असून त्यायोगे सव ससार जिंकला आहे ४

१३२५ ऐसिया संपत्ती आह्मा सवसारी । भोगाचिया परि पाय सांगों ॥ १ ॥
काम तो कामना भोगीतसे देवा । आळिंगणें हेवा चरण चुंबीं ॥ २ ॥
शांतीच्या संयोगें निरसला ताप । दुसरें तें पाप भेदबुद्धि ॥ ३ ॥
तुका म्हणे पाहें तिकडे सारिखें । आपुलें पारिखें निरसलें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – सवसारी– या संसारामध्ये, परि– प्रकार, काम– इच्छा, हेवा– हावेने, निरसला– नाश झाला, आपुले पारिखे–आपले दुसऱ्याचे असा भेद

अर्थ – या संसारामध्ये ईश्वराच्या भटीच्या सुखसंपत्ती अनेक प्रकारच्या आहेत त्यांचे प्रकार तरी किती म्हणून सांगावेत ? १ आमच्या सव इच्छा व कामना त्या एका देवाचाच भोग भोगीत आहेत देवाच्या आलिंगनाची हाव धरून त्याच्या चरणाचेच चुंबन घेत आहेत २ त्या शांत स्वरूपाच्या ईश्वरप्राप्तीमुळे सव ताप नाहीसा झाला आता यापुढें भेदबुद्धी अथवा द्वैतकल्पना निर्माण होणे हेच मुळी पाप आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात आता जिकडे पाहीन तिकडे सव एकसारखे त्याचेच रूप दिसते आपले व दुसऱ्याचे असा भेदच आता उरलेला नाही ४

१३२६ राम राज्य राम प्रजा लोकपाळ । एकचि सकळ दुजें नाहीं ॥ १ ॥
मगळावाचूनि उमटेना वाणी । अखंडचि खाणी एकी रासी ॥ २ ॥
मोडलें हें स्वामी ठावाठाव[1] सेवा । धाढवावा[2] हेवा कोणा अंगें ॥ ३ ॥
तुका म्हणे अवघें दुमदुमिले देवें । उरलें तें गावें हेंचि आता ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – लोकपाळ– राजा, मगळावाचून– ईश्वराच्या पवित्र नामाशिवाय, ठायाठाव– अशा अवस्थेत, हेवा–हाव

अर्थ – आता राज्य हे रामरूपच बनले आहे प्रजा व राजा ही सुद्धा रामरूपच बनलो असल्यामुळे सवत्र त्याचे एक रूप आहे दुसरे काहीही नाही १ माझी वाणी ही आता सव पावित्र्याची खाणच असल्यामुळे तीमधून मंगल्यावाचून ईश्वराच्या पवित्र नामावाचून दुसरा शब्दच बाहेर पडत नाही २ अशा या अवस्थेत स्वामी–सेवक व ही सेवा असा भावच नाहीसा होत आहे ही हाव आणखी कोणत्या मार्गाने धाडवावी ? ३ तुकाराम महाराज म्हणतात या देवाच्याच नामाने सारे जग दुमदुमून राहिले आहे असे हे जे रूप आता आमच्यापुढे उरले आहे तेच आम्ही आता नित्य गाणार आहोत ४

१३२७ निवडोनि वाण काढिले निराळें । प्रमाण डोहळे यावरि ते ॥ १ ॥
जयाचा विभाग तयासीच फळें । देखणे निराळें कौतुकासी ॥ २ ॥
शूर तो ओळखे घायडायहात । येरां होईल मात सांगायासी ॥ ३ ॥
तुका म्हणे माझी केळवने[3] वाणी । केला निजस्थानीं जाणवसा ॥ ४ ॥

---

[1] ठाया ठाव, [2] वाढवा ता [3] केळवली

शब्दार्थ व टीपा :- वाण-प्रकार, डोहळे- इच्छा, फळे- फलद्रूप होईल, घायडाय- घातपात, केळवती- सुशोभित.

अर्थ :- ईश्वरप्राप्तीचे निरनिराळे प्रकार मी निवडून काढले आहेत, ज्याची जशी इच्छा तसे त्याने यांतून निवडून घ्यावेत. १ ज्याचा जसा अधिकार त्यास तसाच भाग फलद्रूप होईल. केवळ कौतुकाने पाहाणारे निराळेच राहतात. २ जो खरा शूर आहे तोच शत्रूच्या घातपाताचे डाव ओळखतो. त्याला अडचणीत कसे आणावे हे नीट ओळखतो. इतरांना ही हकीगत केवळ सांगण्यापुरतीच वाटते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, माझ्या वाणीने निज-स्वरूपात वास केलेला असल्यामुळे ती सुशोभित दिसते. ४

१३२८ याजसाटीं केला होता अटाहास । शेवटचा[1] दिस गोड व्हावा ॥ १ ॥
आतां निश्चितीनें पावलों विसांवा । खुंटलिया धांवा तृष्णेचिया ॥ २ ॥
कवतुक वाटे जालिया वेचाचें । नांव मंगळाचें तेणें गुणें ॥ ३ ॥
तुका म्हणे मुक्ति परिणिली नोवरी । आतां दिवस चारी खेळीमेळीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- अटाहास-खटपट, खुंटलिया-थांबल्या, धावा-फेऱ्या, वेचाचें- आयुष्य हरिनामात खर्च झाले त्याचे, परिणिली-स्वीकारली.

अर्थ :- आयुष्यामधील शेवटचे दिवस चांगले जावेत, अंतकाळी ईश्वराच्या चिंतनात काळ सुखाने जावा यासाठीच हा सर्व खटाटोप केला होता. १ आता निश्चयाने मी निष्काळजी होऊन विश्रांतीचे सुख घेत आहे. यापुढे तृष्णेची धावाधाव आता होणार नाही २ त्या श्रीहरीच्या नामस्मरणात व चिंतनात आतापर्यंत आयुष्य खर्च झाले याचेच मोठे कौतुक वाटते श्रीहरीच्या मंगल नामस्मरणाचाच हा गुण आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, आता मी मुक्ती हीच नवरी स्वीकारून तिच्याशी लग्न केले आहे. आता यापुढचे चार दिवस, उरलेले थोडे दिवस मी तिच्याशी क्रीडा करण्यात घालविणार आहे ४

विवरण :- हा व याच्या आधीचे तीनचार अभंग तुकोबांच्या तृप्त व संतुष्ट मन स्थितीचे द्योतक असे आहेत. प्रारंभीच्या काळातील सर्व अडचणी निवारण झाल्या. मनाची तगमग थांबली द्वैतभाव नाहीसा झाला शंका संपल्या. वासना निमाल्या. अस्थिरता संपली. सर्व दुःखाचा निरास झाला. शल्ये बोथटली अशा एका तृप्त मन स्थितीत असतानाचा बुवांचा हा एक अतिशय चांगला अभंग आहे. आयुष्याची अखेर हरिचिंतनात, ईश्वराच्या नामस्मरणात यावी यापेक्षा आणखी चांगली गोष्ट कोणती ? जन्मभरच्या चिंताच अखेरपर्यंत मन पोखरीत राहिल्या तर कोणते सुख ? या दृष्टीने तुकारामबुवांच्या प्रारंभीच्या सर्व कटकटी संपल्या, दुःखे निवारण झाली, संकटाचा परिहार झाला, वृत्ती निमाल्या व सर्व खटपटीचा हेतू पूर्ण झाला. शेवटचे दिवस गोड व्हावेत, प्रभुचिंतनात रंगून जावेत म्हणून तर हा सर्व खटाटोप होता. तो हेतू साधला. सर्व तृष्णा थांबल्यामुळे आता त्याचे मन संतुष्ट बनले आहे तुकाराम महा-राजांनी एका बहारदार रूपकाचा येथे आश्रय केला आहे. उतारवयात त्यांनी एक लग्न केले आहे कुणाशी ? तर मुक्तीशी मुक्ती या नोवरीशी लग्न करून उरलेले चार दिवस क्रीडा करणार आहोत, असे त्यांनी या अभंगात म्हटले आहे संतश्रेष्ठ तुकोबांनी 'याचि देहीं याचि डोळां' हा जो मुक्तीचा सोहळा भोगला त्याचे कौतुक, वर्णन तरी किती करावे ? आयुष्याचा शेवट गोड व्हावा याचा अर्थ आणखी एका दृष्टीने समजावून घेण्यासारखा आहे 'अन्तकाले च मामेव स्मरन्मुक्त्वा कलेवरम्' जो अंतकाळी माझेच स्मरण करून देह सोडतो, तो माझ्या स्वरूपाला येऊन पोचतो, असे गीतेच्या तिसऱ्या अध्यायात म्हटले असले तरी पुढच्याच श्लोकात असे हे अंतकाळी ईश्वरस्मरण व्हावे म्हणून जन्मभरच ईश्वरी अनुसंधानात चित्त रंगून गेलेले असावे असे म्हटले आहे. तरच वासनेच्या धावा सुटतात. खर्च झालेल्या आयुष्याचे सार्थक होते तुकाराम महाराजांच्या जीवितात हे ईश्वरप्रेम रोमरोमी भरून गेलेले असल्यामुळे त्यांना आयुष्याचा अखेरचा भाग गोडच गोड वाटला

१ शेवटीचा

१३२९ भक्तीचिया पोटीं रत्नाचिया खाणी । यज्ञीची ठेवणी सकळ वस्तु ॥ १ ॥
माउलीचे मार्गे बाळकाची हरी । एका सूत्रें[1] दोरी ओढतसे ॥ २ ॥
जेयील जें मागे तें रायासमोर । नाहींसे उत्तर येत नाहीं ॥ ३ ॥
सेवेचिये सत्ते धनीच सेवक । आपुलें तें एक न वचो काहीं ॥ ४ ॥
आदिअंताठाव असे मध्यभाग । भोंवतें भासे मग उचासन[2] ॥ ५ ॥
भावारूढ तुका जाला एकाएकीं । देवच लौकिकीं अवघा येला ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा –हरी– आळ, राग, रायासमोर–राजापुढे, न वचो–देत नाहीं असे नाहीं

अर्थ –भक्तीच्या उदरातच यज्ञफल आदीरूप सर्व रत्नांच्या खाणी असतात १ आईच्या पाठीमागेच एकमेकाच्या प्रेमसुखाच्या दोरीच्या नात्याने बालकांची रांग असते २ श्रेष्ठ राजासमोर जाऊन जो कोणी काही मागेल त्यास ती वस्तू राजाकडून मिळणार नाही असे उत्तर कधी येत नाही ३ अनन्य प्रकारची सेवा करून सेवकच धनी होतो कारण सेवेने संतुष्ट झालेला धनी सेवकास सर्व अधिकार देण्यात मागेपुढे पाहात नाही ४ एकदा या धनीपणाच्या उच्च आसनावर स्थान मिळाले की मग या जगाचे आदी, अंत्य, मध्य असे भाग सहज ध्यानात येतात ५ तुकाराम महाराज म्हणतात, अशा प्रकारे एकत्वभावाच्या सिंहासनावर मी आरूढ झालो आहे, व मी सर्व लौकिक गोष्टी देवाच्याच रूपात पाहात आहे ६

१३३० सांगता दुर्लभ ज्ञानाचिया गोष्टी । अनुभव तो पोटीं कैंचा घडे ॥ १ ॥
भजनाचे सोई जगा परिहार[3] । नेणत्यां सादर चित्त व्हावे ॥ २ ॥
नाइकावे कानीं साधन उपाय । ऐकतो गाय हरयें[4] गीत ॥ ३ ॥
नव्हे आराणूक जावयासी वना[5] । वेध कामिमना हरिकथेचा ॥ ४ ॥
काळाच्या साधना कोणा अंगीं बळ । चिंतना मंगळ अष्टप्रहर ॥ ५ ॥
तुका म्हणे आम्ही खेळो भातुकुले । विभागासी मुलें भोळीं येयें ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – हरयें – आनंदाने, आराणूक–समाधान

अर्थ –ज्ञानाच्या गोष्टी सांगण्यास सुद्धा फार कठीण आहेत तर मग त्याचा अनुभव हृदयात येणे किती अवघड असेल ? १ यासाठी जे नेणते आहेत, अज्ञ आहेत त्यांनी हरिभजन व हरिकथा यांच्यांत लक्ष दिल्यास त्यांच्या दुःखाचा परिहार होईल २ त्यांनी या एका साधनाशिवाय इतर साधनांचे वा उपायांचे चिंतन करू नये, ऐकू नये, एका श्रीहरीचे गीतच आनंदाने गावे आणि ऐकावे ३ रानावनात जाऊन काही समाधान होणार नाही कारण कामी मनास सुद्धा हरिकथेचा वेध लागतो ज्या साधनांनी दीर्घ काळानंतर फलप्राप्ती होते, त्या साधनांसाठी कुणाच्या अंगी बळ आहे ? उलट ईश्वराच्या चिंतनासाठी मात्र आठही प्रहर मंगलप्रदच असतात ५ तुकाराम महाराज म्हणतात, आम्ही या प्रकारे हरिचिंतनाची भातुकली खेळत आहोत आणि या भातुकलीच्या सुखाच्या वाट्यासाठी भोळीभाबडी मुले आमच्याजवळ आली आहेत ६

१३३१ जाणपण बरें देवाचिये शिरीं । आम्ही ऐसीं बरीं नेणतींच ॥ १ ॥
देखणियापुढें रुचे कवतुक । उभयतां सुख वाढतसे ॥ २ ॥
आशंकेची बाधा नाहीं लडिवाळा । चित्त वरि खेळा समबुद्धि ॥ ३ ॥
तुका म्हणे दिशा मोकळ्या सकळा । आवकाशीं खेळा ठाव जाला ॥ ४ ॥

१ सूत्र, २ उचासनी, ३ परिवार, ४ हपगीत, ५ ववना

शब्दार्थ व टीपा :- जाणपण-ज्ञानाची जाणीव, वेळणियापुढें-शहाण्यापुढे, ठाव-स्थान.

अर्थ :- ज्ञानाची जाणीव ही देवाच्या शिरावर असणेच बरे. आम्ही आपले असे नेणतेच बरे आहोत. १ जे जाणते व शहाणे आहेत त्यांच्यापुढेच नेणत्यांची क्रीडा कौतुकाची व रचणारी वाटते. त्यामुळे उमपतांनाही सुख वाटते. २ जे लडिवाळ असतात, त्यांना भीतीची बाधा कधीच होत नाही. कारण त्यांचे चित्त नेहमी समबुद्धीने त्यांच्या खेळाकडेच असते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, आम्हास सर्व दिशा मोकळ्या आहेत. आम्हांस सर्व ठिकाणी खेळावयास स्थान निर्माण झाले आहे. ४

१३३२ वचनांचे मांडे दावावे प्रकार । काय त्या साचार कौतुकाचे ॥ १ ॥
जातां घरा मार्गे । उरों नणें खंती । मिळाल्या बहुती फांकलिया ॥ २ ॥
उदयींच अस्त उदय संपादला । कल्पनेचा केला[1] जागेपणें ॥ ३ ॥
जाणवूनि गेला हांडोरियां चोरां । सावध इतरां करुनी तुका ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- साचार-खरोखर, फांकलिया-दूरवर निघून जातात, हांडोरियां-मूर्ख असणाऱ्या.

अर्थ :-लहान मुली भातुकलीचा खेळ खेळू लागल्या की शब्दानेच मांडे वगैरे पदार्थ करून आनंद लुटतात. पण त्या खेळाने खरोखर कौतुक करावे काय ? १ एकदा त्यांचा भातुकलीचा खेळ संपला की त्या मुली आपापल्या घरी दूरवर निघून जातात मग त्यांच्या मनांत मागचो तळमळ काही उरत नाही. २ त्या भर दिवसा कल्पनेनेच रात्र झाली असे मानतात आणि झोपतात व लागलीच उदय झाला असे कल्पनेतच जाणून उठतात. ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा प्रकारे कल्पनेचा भातुकलीचा खेळ खोटा असल्याची जाणीव त्यांना करून देत आहे. ४

## स्वामींस संतांनीं पुसलें कीं तुम्हांस वैराग्य कोणत्या प्रकारें जालें तें सांगा-ते अभंग ॥ ३ ॥

१३३३ याती शूद्र वंश[2] केला वेवसाव । आदि तो हा देव कुळपूज्य ॥ १ ॥
नये बोलों परि पाळिलें वचन । केलियाचा प्रश्न तुम्हीं संतीं ॥ २ ॥
संवसारें जालों अतिदुःखें दुखी । मायबाप सेवटीं क्रमिलिया ॥ ३ ॥
दुष्काळें आटिलें द्रव्यें नेला मान । स्त्री एकी अन्न अन्न करितां[3] मेली ॥ ४ ॥
लज्जा वाटे जीवा त्रासलों या दुःखें । वेवसाव देखें[4] तुटी येतां ॥ ५ ॥
देवाचें देऊळ होतें[5] तें भंगलें । चित्तासी जें आलें करावेंसें ॥ ६ ॥
आरंभीं कीर्तन करीं एकादशी । नव्हतें अभ्यासीं चित्त आधीं ॥ ७ ॥
कांहीं पाठ केलीं संतांचीं उत्तरें । विश्वासें आदरें करोनियां ॥ ८ ॥
गाती पुढें त्यांचें धरावें ध्रुपद । भावें चित्त शुद्ध करोनियां ॥ ९ ॥
संतांचें सेविलें तीर्थ पायवणी । लाज नाहीं मनीं येऊं दिली ॥ १० ॥
टाकला तो कांहीं केला[6] उपकार । केलें हें शरीर कष्टवूनि ॥ ११ ॥
वचन मानिलें नाहीं सुहृदाचें । समूळ प्रपंचें वीट आला ॥ १२ ॥
सत्यअसत्यासी मन केलें ग्वाही । मानियेलें नाहीं बहुमतां ॥ १३ ॥
मानियेला स्वप्नीं गुरुचा उपदेश । धरिला विश्वास दृढ नामीं ॥ १४ ॥

१ जाला, २ वैश्य, ३ करित, ४ देख, ५ होते जें भगले, ६ परउपकार.

यावरि या जाली कवित्वाची स्फूर्ति । पाय धरिले चित्तीं विठोबाचे ॥ १५ ॥
निषेधाचा कांहीं पडिला आघात । तेणें मध्यें चित्त दुखविलें ॥ १६ ॥
बुडविल्या वह्या बैसलो धरणें । केलें नारायणें समाधान ॥ १७ ॥
विस्तारीं सांगतां बहुत प्रकार । होईल उशीर आतां पुरे ॥ १८ ॥
आता आहे तैसा दिसतो विचार । पुढील प्रकार देव जाणे ॥ १९ ॥
भक्ता नारायण नुपेक्षी सर्वथा । कृपावंत ऐसा कळों आलें ॥ २० ॥
तुका म्हणे माझें सर्व भांडवल । बोलविले बोल पांडुरंगें ॥ २१ ॥

शब्दार्थ व टीपा यातो– जात, शूद्र– हलक्या प्रकारची कामे करणारी जात, वेवसाय–व्यवसाय, धंदा, सेखीं–शेवटी, क्रमिल्या–मरण पावल्यावर, आटिलें–संपल, नाहीसे झाले, ध्रुपद–पालुपद, पदाचे अथवा अभंगाचे मुख्यपद, मुख्य ओळ, ठावला–ठावला, प्राप्त झाला, सुहृदांचे–आप्तस्वकीयांच, नुपेक्षी–उपेक्षा करीत नाही

अर्थ — माझी जात शूद्राची असून मी वाण्याचा व्यवसाय केला माझ्या कुळात मूळापासूनच श्रीविठ्ठल हा देव पूज्य मानला गेला होता १ खरे म्हणजे ही गोष्ट बोलण्यासारखी नाही पण तुम्ही संतानी प्रश्न केला म्हणून उत्तर देत आहे २ ससाराच्या दुःखाने मी अतिशय दुःखी झालो अखेरीस माझे आईबापही मरण पावले ३ दुष्काळ पडल्यामुळे द्रव्य नाहीसे झाले, त्यामुळे मान सपला व एक बायको अन्न अन्न करीत मरून गेली ४ या दुःखाने माझा जीव अतिशय त्रासून गेला व मला फारच लाज वाटू लागली तशात धंद्यातही तूट येत राहिली ५ मग जे देवाचे देऊळ पडके झाले होते ते नीट करावे अशी इच्छा मनात निर्माण झाली ६ प्रथम मी एकादशीच्या दिवशी कीर्तन करायला सुरुवात केली, पण कीर्तनाच्या अभ्यासात माझे प्रथम लक्षच नव्हते ७ म्हणून मनात विश्वास धारण करून मी काही संतांची उत्तरे पाठ केली ८ कीर्तनात जे कुणी ईश्वराचे गुणगान करणारे होते, त्यांच्या पाठीमागे उभे राहून मी ध्रुपद मोठ्या शुद्ध चित्ताने म्हणत असे ९ मी संतांच्या पायाचे तीर्थ सेवन करीत असे याबद्दल मनात कसलीही लाज येऊ दिली नाही १० घडेल तेवढे उपकार मी दुसऱ्यावर करीत असे असे करून मी माझे शरीर कष्टविले ११ मी माझ्या आप्तस्वकीयांचे वचन कधी खरे न मानता वागलो मला प्रपंचाचा समूळ वीटच आला होता १२ खऱ्याखोट्याबद्दल मी माझ्या मनालाच साक्षी ठरविले मी याबाबतीत बहुमताचा स्वीकार केला नाही १३ स्वप्नात गुरुन उपदेश केला त्याचा मी स्वीकार करून श्रीहरीच्या नामावर दृढ असा विश्वास ठेविला १४ मग नतर मला कविता करण्याची स्फूर्ती झाली व मी विठ्ठलाचे पाय माझ्या हृदयात घट्ट धरून ठेविले १५ त्यानंतर काही लोकानी माझा निषेध करून माझ्यावर आघात केले त्यामुळे माझे चित्त दुखावले गेले १६ माझ्या अभंगाच्या वह्या नदीच्या पाण्यात बुडविण्यात आल्या तेव्हा मी तेरा दिवसपर्यंत ईश्वराजवळ धरण धरून बसलो त्या वेळी वह्या तारून नारायणान माझे समाधान केले १७ सव विस्ताराने हकीगत सांगितल्यास फार उशीर होईल, व नाना विषय त्यात येतील म्हणून आता पुरे करतो १८ आता जी परिस्थिती आहे ती स्पष्टच दिसत आहे पुढली अवस्था त्या विठ्ठलालाच माहीत १९ नारायण माझ्यासारख्या भक्ताची उपेक्षा कधीच करणार नाही तो पूण कृपावंत आहे असेच मला समजून आले आहे २० तुकाराम महाराज म्हणतात, पांडुरंग हेच माझे सव भांडवल असून त्यानेच हे शब्द माझ्याकडून वदविले २१

विवरण–संताना अनेकदा प्रश्न विचारल्यावरून तुकाराममहाराजानी या आपल्या एका प्रसिद्ध अभंगात स्वत विषयीची गुरुपदेश व कवित्वस्फूर्ती होईपर्यंतची हकीगत सक्षपान सांगितली आह यामुळ तुकारामबुवांच्या आयुष्याचा क्रम स्पष्टपण ध्यानात येण्यासारखा आहे तुकोबा हे एका भगवद्भक्तिसपन्न अशा श्रेष्ठ कुळात जन्माला आले होते ‘ शुद्ध बीजापोटीं । फळें रसाळ गोमटीं ’ निर्माण होतात असे त्यानीच एका अभंगात म्हटले आहे (क्र ६२) आपल्या पवित्र कुळाचा अभिमानपूर्वक उल्लेख तुकाराम महाराज करीत कुळधर्माची महती त्यानी अनेकदा गाइली आहे ‘ कुळधर्म ज्ञान कुळधर्म साधन । कुळधर्म निधान हातीं पडे ’ या एका प्रसिद्ध अभंगात ( क्र १०२६)

बुवानी कुळधर्माचे माहात्म्य वर्णन केले आहे. या आपल्या कुळाचा व भक्तिपरंपरेचा अभिमान त्यांच्या अभंगातून कधी कधी प्रकट झालेला दिसतो 'विठ्ठल कुळींचे दैवत', 'सहज वडिलां होती सेवा। म्हणोनि पूजितों या देवा', 'पंढरीची वारी। आहे माझे घरीं', 'तुका म्हणे सतसेवा, माझ्या पूर्वजांचा ठेवा', 'माझ्या वडिलांची मिराशी देवा। तुझी चरणसेवा पांडुरंगा' इत्यादी ओळीतून तुकाराम महाराज आपल्या वडिलार्जित संपत्तीची कल्पना स्पष्ट करीत असताना दिसतात तुकोबाचे धाकटे बंधू कान्होबा यानाही आपल्या कुळाविषयी व त्यातील हरिभक्तीविषयी स्वाभिमान असे. 'देवा तुजपें माझ्या पूर्वजांचे ऋण। आहे तें का नेदिशी अझून' म्हणून त्यानी देवाला विचारले आहे. 'सांपडले जुनें। आमुच्या वडिलांचे ठेवणें' म्हणून त्यानी एका अभंगात विठ्ठलनामाचे जुने भांडवल मिळाल्याबद्दल समाधान व्यक्त केले आहे. अशा या संस्कारसंपन्न व पांडुरंगभक्तीत रमलेल्या एका श्रेष्ठ कुळात तुकोबाचा जन्म झाला 'शुचि श्रीमत घरांत। योगभ्रष्ट तुका मुक्त' असे त्यानीच आपल्या भगवद्गीतेवरील अभंगटीकेत म्हटले आहे

तुकाराम महाराजानी आत्मकथन करताना प्रथमच आपल्या जातीचा व व्यवसायाचा उल्लेख केला आहे 'याती शूद्र वंश (वैश्य) केला व्यवसाय' असे त्यानी म्हटले आहे आपण जातीने शूद्र व धंद्याने वैश्य म्हणजे वाणी आहोत असे त्यांचे म्हणणे तुकारामबुवा स्वत स शूद्र म्हणवून घेतात व नंतरही कित्येक वर्षे जाणकारानी त्याना शूद्र म्हणूनच संबोधिले आहे परंतु तुकाराम महाराज जातीनें शूद्र की मराठा क्षत्रिय ? अशा प्रश्नावर फार मोठे वाद जुन्या काळापासून होत आहेत. आधुनिक काळात विष्णुशास्त्री चिपळूणकरानी त्याना कौतुकाने 'शूद्रकवि' म्हटले, तर राजारामशास्त्री भागवत यानी त्याना क्षत्रिय बनविले वास्तविक पाहाता तुकारामबुवाची श्रेष्ठता ही काही त्यांच्या जातीवर अवलंबून नाही; किंवा त्याचा व्यवसाय कोणता होता, याही प्रश्नास महत्त्व नाही 'आपणालागें काम वाण्याघरीं गूळ। त्याचे यातिकुळ काय कीजे ?' अशीच वृत्ती आपली हवी खरे म्हणजे 'उंच नीच वर्ण न म्हणावा कोणी। जे का नारायणीं प्रिय झाले' अशीच वृत्ती पाहिजे

स्वत तुकाराम महाराजानी 'याती शूद्र' असाच उल्लेख केला आहे, 'शूद्रवंशीं जन्मलों म्हणोनि दंभें मोकलिलो' असे एका अभंगात त्यानीच म्हटले आहे आपली जात लौकिक दृष्टीने व परंपरागत समजुतीनें हीन असल्याची जाणीवही बुवाना होती 'काय माझी याती नेणा हा विचार', 'यातिमतिहीन रूपें लीन दीन' 'तू श्रीयेचा पती। माझी बहु हीन याती', 'यातीहीन मतिहीन कर्महीन माझें' अशा प्रकारच्या उल्लेखांवरून तुकाराम महाराजाना आपल्या हीन जातीची जाणीव असावी असे वाटते आपली याती म्हणजे जाती हीन असून आपण कुणबी आहात असेही त्यानी म्हटले आहे 'बरा कुणबी केलों। नाहीं तरी दंभेंचि असतों मेलों', 'आळस न करीं या लाभाचा। तुका विनवी कुणबियाचा', 'तुका कुणबियाचा नेणे शास्त्रमत। एक पंढरीनाथ विसंबेना' अशा शब्दात तुकाराम महाराजाना आपण कुणबी असल्याचा उल्लेख केला आहे 'आता निदसुर नसावें। गाठ पडली कुणब्यासवें' असे बंधू कान्होबा यानीही म्हटले आहे तुकारामबुवा हे धंद्याने किंवा व्यवसायाने वाणी होते हेही प्रसिद्ध आहे 'जातीचे वाणी मी पोटेंचि कुडें। नका मजपुढें ठकाठकीं' असे त्यानी म्हटले आहे 'वैश्य केला वेवसाय' हे तर प्रसिद्ध आहे

रामेश्वरभट व बहिणाबाई या दोन समकालीन व्यक्तीनी तुकोबाच्या या आत्मकथनास दुजोरा दिला आहे तुकोबाचे वंशज गोपाळबुवा यानी 'शूद्र यातीप्रती जन्मला तुकया। व्यापार खाणयाचाची करी' असेच म्हटले आहे संतचरित्रकार महीपतीबुवानी 'शूद्र यातीमाजी निश्चित। जन्मला तुकाराम वैष्णवभक्त। जो जगद्गुरु मूर्तिमंत। विश्वोद्धारार्थ अवतरला' या ओवीमधील 'निश्चित' हा शब्द व पुढील चरणातील अर्थगर्भ शब्द याचा मेळ जाणत्याना सहज बसविण्यासारखा आहे

याप्रमाणे तुकारामबुवा स्वत व त्याचे समकालीन यानी जातीचा, व्यवसायाचा निवाडा केला आहे आज या प्रश्नास तसे महत्त्व नाही जुन्या वर्णाश्रमाच्या चौकटीत आपण वरिष्ठ वर्णाचे वा जातीचे नाही, एवढाच अर्थ या ठिकाणी शूद्र या शब्दाचा आहे. तसे पाहिले तर तुकारामबुवा शुद्ध मराठा होते हेच खरे कारण कुणबी, मराठे यांच्यात भेद नसे तुकोबाच्या घराण्याचे नाव मोरे असे होते तुकारामाची आई मोझे नावाच्या मराठे घराण्यातील हिंगे, जाधव, शितोळे, देशमुख, गरुड, इगळे, तापकीर, गाडे इत्यादी प्रसिद्ध मराठे घराण्याशी त्यांच्या कुटुंबीयाचा

संबंध होता 'तुकोबा हे मराठ्यांच्या 'शाहाण्णव कुळीं' पैकी 'मोरे' किंवा मोरे कुळीत जन्मास आले होते. मोरे कुळीची आंबिले ही एक शाखा आहे म्हणूनच या घराण्यातील मंडळी आपले आंबिले हे आडनाव लावीत व तेच नाव वाणदोषाने आढळते' मराठमंडळाच्या 'शाहाण्णव कुळीत क्षत्रिय, वैश्य व शूद्र वर्णांचा समावेश केलेला आहे' मा. वा. सी. वैद्य यांच्या मतात व 'तुकारामाचे घराणे हे मराठा जातीचे होते. ही जात जुन्या क्षत्रिय वर्णातून उद्भवली असावी, परंतु ती शूद्र वर्णाची समजली जात' या डॉ. रा. गा. भांडारकर यांच्या मतात तसा फारसा फरक नाही.

खरे पाहिले असता गुणकर्मांमुळे तुकाराम महाराज हे थोर भगवद्भक्तच होत हे सिद्धच आहे. चरित्रकार व इतिहासलेखक यांना जातीचा, व्यवसायाचा निवाडा करावा लागतो म्हणून चर्चा विस्तारते. नव नवे मुद्दे येतात पण संतत्वाच्या बाबतीत जातीस या व्यवसायास काही महत्त्व उरत नाही. 'भावना भेदाची जाय उठाउठी। तुका म्हणे भेटी गोविंदाची', 'जिहीं म्हणविलें हरीचे अंकित। जातीचे ते होत कोणी तरी। जातीकुळ नाहीं तयासी प्रमाण। अनन्या अनन्य तुका म्हणे' इत्यादी ओळींवरून तुकोबांची जात भक्तीत विरून गेली आहे. 'यातिकुळ माझें गेलें हारपूनि' हीच अवस्था खरी. कै. ल. रा. पांगारकर यांना या संबंधात फार मार्मिक व उद्बोधक असा निर्णय घेतला आहे. 'तुकोबा व्यापकपणाने चारी वर्ण होत, अगर चारू वर्णातीत होते। ते ब्रह्मनिष्ठ होते व 'ब्रह्म जाणे तो ब्राह्मण' या न्यायाने ते खरोखरच ब्राह्मण होत। 'रात्रंदिवस आम्हा युद्धाचा प्रसंग। अंतर्बाह्य जग आणि मन' आत मानसी व बाहेर जनांशी युद्ध करून त्यांनी दोघांवरही जय मिळविला यावरून ते क्षत्रिय होते यातही शंका नाही. 'संतांचा उदीम उपदेशाची पेठ। प्रेमसुख साठ देतों घेतों' याप्रमाणे भक्तिप्रेमाच्या देवघेवीचा व्यापार त्यांनी जन्मभर केला, त्यावरून ते वैश्य होते असे म्हणण्यासही प्रत्यवाय नाही। पांडुरंगाची म्हणजे जनीजनार्दनाची जन्मभर त्यांनी निष्काम सेवा केली म्हणून ते शूद्रही उघडच ठरतात। वरे ते चारू वर्णांच्या पलीकडे गेले होते यात तिळमात्र शंका नाही. 'क्षर अक्षरावेगळा। तुका राहिला सोंवळा' क्षराक्षरापलीकडचे ते असल्यामुळे तेथे कुठली जातकुळी अन कुठला घराण्याचा अभिमान? 'तुका म्हणे आम्ही विठोचे जनिते। स्वयंभू आइते केले न हों' आम्ही ब्रह्मदेवाचे बाप आहोत, स्वयंभू, शुद्ध चैतन्याचे आहोत. घडलेले म्हणजे आल्यागेल्यातले नव्हेत. या त्यांच्या स्वानुभवपूर्वापुढे देहाचे खालचे सारेच विचार तुच्छ ठरतात' असे त्यांनी म्हटले आहे.

या आत्मनिवेदनपर अभंगात 'आदि तो हा देव कुळपूज्य' असे तुकाराम महाराजांनी सांगितले आहे. कुळात प्रथमपासून पूज्य असलेला हा देव म्हणजे पंढरपूरचा पांडुरंगच होय. तुकोबांचे कुलदैवत शिव अथवा हरि-हरेश्वर होते असेही एक मत प्रचलित आहे. परंतु स्वतः तुकोबांनी 'कुळींची कुळदेवी' श्रीविठ्ठल हेच आमचे कुलदैवत असे वारंवार सांगितले आहे. 'सहज पडिला होता सेवा। म्हणूनि पूजितों या देवा' असा त्यांच्या वचनाचा भावार्थ आहे.

'संवसारें जालों अतिदुःखें दुःखी' या वचनाचा अर्थ समजावून घेण्यासारखा आहे. तुकारामबुवांचे घराणे चांगले प्रतिष्ठित होते. घरात महाजनकी होती. व्यापारधंदा नीट चालत असे. प्रथम प्रथम संसारही बरा चालला होता. 'सर्व साहित्य अनुकूळ। उदीम व्यापार होय सफळ। उणें पडों नेदी अळुमाळ। दीनदयाळ तयाचें' अशा कृतार्थ वृत्तीने तुकोबांचे वडील बोल्होबा होते. थोरला पुत्र सावजी वैराग्यशील निघाल्यामुळे त्यांनी तुकारामबुवांच्या माथ्यावर संसाराचा भार सोपविला. दुकान पाहाणे, जमाखर्च ठेवणे, शेताकडे, सावकारीकडे लक्ष देणे, यात तुकारामबुवा तरबेज होते. 'देणें घेणें उदीम हातवटी। तोट्यानफ्यात असावी दृष्टि। जणें स्वहित होईल शेवटीं। तैसी गोष्टी करावी' हा वडिलांचा उपदेश त्यांनी मनात धारण केला होता. मुलाच्या कर्तृत्वाने प्रथम आईबाप संतुष्टही होते. 'ज्येष्ठ कनिष्ठ दोघी भार्या। आणि संसारही बावरी तुक्या। ऐसी स्थिती देखोनिया। मातापितयां संतोष' अशी स्थिती असल्याने आजूबाजूच्या लोकांच्या दृष्टीनेही संसार फार चांगला चालला होता. 'मातापिता बंधु सज्जन। घरीं उदंड धनधान्य। शरीर आरोग्य लोकांत मान्य। एकही उणें असेना' याप्रमाणे उत्तम चित्र त्यांच्या संसाराचे होते.

परंतु 'देव भक्तालागीं करूं नेदी संसार' असे दिसते. चार चौघासारखा लौकिक संसार व वैश्याचा व्यवसाय करण्यासाठी तुकारामबुवा जन्मास आले नव्हते. थोड्याच दिवसात त्यांच्यावर दुःखाचे डोंगर कोसळले

वयाच्या सतराव्या वर्षी त्याचे वडील वारले. सावजीची बायको मरण पावली नंतर सावजी तीर्थयात्रेस निघून गेला त्याच्या वियोगाने तुकोबा थोडे उदास झाले त्याचे चित्त संसारात लागेना अशा अवस्थेत लोकानी त्याचे पैसे बुडविले, देणेकऱ्यांनी तगादा लावले घरातील धनधान्याची विल्हेवाट लागली, दुकान चालेनासे झाले गावात पत राहिली नाही दुष्काळामळे शेतीमधील सर्व पीक बुडाले पैशाची ओढाताण झाल्यावर त्याच्या मनाचा ताप वाढू लागला घरातही फारसे सुख नव्हत पहिली बायको आजारीच असे नेहमी. ती अन्न अन्न करून मरण पावली दुसरी अति भांडखोर म्हणून प्रसिद्ध होती तुकोबाच्या घरात खाणाराची संख्याही मोठी होती या सर्वांचे पोट भरावे तरी कसे? या चिंतने बुवा व्यग्र झाले दुष्काळाने मुले माणसे हैराण होऊन गेली बैल व इतर जनावरे चारा नाही म्हणून मरून गेली गावात तुकोबाना कुणी विचारीना सर्वजण फजिती पाहण्यास तत्पर घरात कटकट व मूर्तिमंत दारिद्य थोरली बायको मरण पावल्यावर तुकोबाचा पहिला व लाडका मुलगा संतोबा हा मरण पावला पुढे तुकाबाची आई मरण पावली वडील गेल्यानंतर चारपाच वर्षातच तुकोबाच्या पुढे धनधान्य, गुरेढोरे, आप्तस्वकीय, व्यापारउदीम, मुलेबाळे, दावणीची जनावरे, पत, अन्न, दुकानदारी याची धूळधाण उडालेली आपल्या भवास रूपाने उभी राहिली

तुकोबाच्या या ससारदु खाचे वर्णन महीपतीबुवानी फारच हृदयद्रावक रीतीने केले आहे ते म्हणतात, " देहूसि तुका वैष्णव । खेद करीत नित्य नित्य । म्हणे मातापिता क्रमिलीं निश्चित । बयूची गत हे झाली ।। पितयाचे धन होते बहुत । तेंही जाहलें वातहत । जैसा शीतकाळ येता अभ्र समस्त । विलया जात आकाशीं ।। जैसे तुकयाचे धनधान्य समस्त । आटोनि गेले जेथील तेथ । यास्तव होऊनि चिंताक्रान्त । म्हणे कैसी मात करावी?।। आपुले द्रव्य दुसऱ्यावर । ते बोला न देती साचार । उदीम न चले अणुमात्र । कैसा विचार करावा ?।। कुटुंबवत्सल खच पदरीं । म्हणूनि धावे हट बाजारीं । द्रव्यासाठीं नानापरी । प्रयत्न करी बहु फार ।। येणे ही नयेची पुरवठा । मग दुकान मांडोनि बैसे चोहटा । वाचेसि हरिनामाचा फाटा । व्यापार खोटा न करवे ।। म्हणे उणे द्यावे कोणास ?। तरी असत्य वर्तता महादोष । गिऱ्हाईक मागतसे जैसे । धारणे विशेष तें द्यावे ।। सर्वांभूतीं दया पूर्ण । असत्य सर्वथा न बोले वचन । वाचेसि अखंड हरिस्मरण । एकही क्षण न विसंबे ।। ऐसी स्थिति देखोनि पाहे । देव कसवटीं लावितहे । याही व्यापारें पुरवठा नये । मग आणिक उपाय करितसे । वैश्यव्यवसाय नानाविध करी । परी कोठेंही साह्य न होचि श्रीहरी । वित्तीं कष्टी होतसे भारी । आटती परी देखोनी ।। आपण कष्टोनि रात्रदिवस । ढोरावरी गोण्या वाहतसे । शीत उष्ण निद्रा आळस । काहींच ध्यानास आणीना ।। आणिक कर्ज घेऊनि फार । सांगुती धंदा केला थोर । परी नफा न होय आणुमात्र । चिंतातुर यासाठीं ।। आणिक ऋण घेऊनि पाहे । काहीं हातवटी करू जाय । तेणेंही न दिसेचि सोय । म्हणे करावे काय विठोबा ?।। बहुत कष्टी होऊनि चित्तीं । स्मरण करीत अहोराती । काहीं ऋण घेऊनि मागुती । वस्तभाव होती तेहि मोडिली ।। वजन करानि हिशोब पाहत । घरीं वाणीं मिळाले समस्त । तव ते अधिकचि आले आंत । कैसी मात करावी ।। सोयरे पिशुन ते वेळे । म्हणती याचे तों निघाले दिवाळें । सावकार येऊनि द्वारीं बैसले । अश्रुपाते भरले नेत्र तेव्हा ।। "

'दुष्काळें आटले द्रव्य नेला मान' या ओळीत तुकोबानी त्यावेळी पडलेल्या दुष्काळाचा उल्लेख केला आहे हा दुष्काळ सन १६२९ च्या सुमाराचा असावा तुकोबाचा जन्म सन १६०८ चा आणि 'एकविसाव्यांत विपरीत काळ' पातला या सन १६२९–३० सालच्या भयानक दुष्काळाची नोद महाराष्ट्राच्या इतिहासात घेतली आहे 'मागील साली बालघाटाकडे पाऊस पडला नाही आणि दौलताबादनगरच्या बाजूस तर पावसान मुळीच टाळा दिला या साली सभोवारच्या प्रातात धान्याची कमतरता झाली आणि दक्षिण प्रातात व गुजरायत तर हाहाकार उडाला येथील रहिवाश्याच्या दुर्दैवाची शिकस्त झाली एका भाकरीच्या तुकड्यासाठी जनावरे व मुल्हेही लोक विकू लागले पण गिऱ्हाईकच मिळना 'मृताची हाडे कुटून पिठात लोक घालू लागले ' असा हा भयानक दुष्काळ समर्थ रामदासानीही या दुष्काळाची चित्तथरारक वर्णने केली आहेत– 'माणसा खावया धान्य नाहीं। आथरुण पांघरुण तेंही नाहीं। घर कराया सामग्री नाहीं। काये करितो ?' असा प्रश्न त्यानी विचारला आहे 'मद झाल्या मेघवृष्टि,' 'अपोक धान्यें दिवसें दिवसें,' 'मेघ पडों भीती' असे उद्गार समकालीन परिस्थितीचे निर्देशक

आहेत 'दर मणी होन थोड जाला', 'पायली ज्वारीस एक दोन अशी धारण वसली' 'उपवासी मरों लागलों' असे उद्गार समकालीन पत्रव्यवहारात दिसू लागले अशा या दुष्काळात तुकोबाच्या व्यापारधंद्यावर परिणाम झाला 'न पडता पुरें', 'बहु पीडिलों संसारें,' 'सहज मरलें होतें बहु तेंही,' 'येवसाय देखें तुटी येतां,' इत्यादी ओळींतून तुकोबाच्या जीवितांची दुःखद स्थिती प्रतीत होण्यासारखी आहे

घरातील व बाहेरील अशा या विविध प्रकारच्या त्रासाला कटाळून तुकोबाचे मन ईश्वराकडे, साधुसंताच्याकडे वळल अर्थात् हे एक निमित्त झाले आधीच त्यांचे मन परमार्थप्रवण होते घराण्यात विठ्ठलभक्तीचा अतूट धागा होता त्या धाग्याचा आधार घेऊन त्यांनी विठ्ठलमंदिर जे मोडकळीस आले होते ते दुरुस्त करण्यास सुरुवात केली तुकोबाचे आठवे पूर्वज विश्वंभरबावा हे मोठे विठ्ठलभक्त होते नामस्मरणाचा, संतसंगतीचा त्यांना नेहमी ध्यास असे एकदा विश्वंभरबावाच्या आईने त्यांना सांगितले, 'तुम्हा वडिलोंवडिलीं निर्धारीं। चालविली पंढरीची वारी। त्यासी अंतर न करीं। तरीच संसारीं सफलपण' आईच्या या उपदेशावरून बावा पंढरपूरच्या वारीस गेले तर्थील अपूर्व सोहळा पाहून संतुष्ट झाले त्यांच्या चित्तास या विठ्ठलमूर्तीची ओढ अखंडपणे लागली त्याच्याच प्रेरणेने विश्वंभरबावा देहूजवळच्या आंब्याच्या वनात गेले जेथे सुवासिक पुष्प, बुका, तुळशी पडल्या होत्या, ते स्थान त्यांनी स्वतःच्या हातांनी उकरून पाहिले तो त्या ठिकाणीं–'पुढें पाहता निजदृष्टीने। तों पांडुरंगमूर्ती सावळी सगुण। वामांगीं ते माता रुक्मिण। सकुमार ठाण साजिरें॥ कासेसी दिव्य पीतांबर। गळां तुळसीमंजुळांचे हार। ऐसी मूर्ति देखोनि सुंदर। जयजयकार मग करिती' या विठ्ठलमूर्तीची स्थापना स्वतःच्या घराशेजारीच इंद्रायणीच्या तीरावर विश्वंभरबावांनी केली व एक लहानसे देऊळ बांधले या देवळाचा भाग पडलेला होता तो तुकारामबुवांनी पुन नीट उभारून दुरुस्त केला

तुकोबाच्या साधनक्रमाचा हा इतिहास अतिशय उद्बोधक व मार्गदर्शक असा आहे 'संसारें जाळों अति दुःखें दुःखीं,' किंवा 'संसाराच्या तापें तापलों मी देवा' येथपासून 'नित्य नवा दीस जागृतीचा' त्यांच्या आयुष्यात कसा उगवला व त शेवटी 'तुका झाला पांडुरंग' या अवस्थेला त कसा पोचले यासबंधी साधकांनी विचार करण्यासारखा आहे केवळ परिस्थिती, संसाराचा वीट, संकटपरंपरा ही कारणे वरवरचीच होत ही सव कारणे देहूच्याच नव्हे, तर सर्व महाराष्ट्रातील लोकांना लागू होतात, पण फक्त देहूचा वाणी तुकाराम हाच तेवढा थोर पदवीवर आरूढ झाला याचा अर्थ असा की, आधी विविधानविधया बीजभूमी तयार होत होती योग्य समय येताच भगवद्भक्तीचा फुलोरा देहूच्या मऊ व सकस मातीत तरारून फुलून आला त्याच्या अलौकिक सौंदर्याने व सुगंधाने सारे लोक मुग्ध होऊन गेले या फुलोऱ्याचा सुवास कधी कमी होणार नाही, कधी याचा रंग विटणार नाही नित्य नूतन व अखंड चैतन्यदायी असे याचे स्वरूप आहे

प्रारंभी एकादशी, सोमवार ही व्रते करणे, नामस्मरणात दंग होऊन जाणे, अवखळ असणाऱ्या चित्ताला अभ्यासात मुरडणे साधुसंताच्या ग्रंथांचे वाचन चिंतन करणे, कुणी कथाकीर्तनास उभे राहिले की, आपण त्याच्या माग मनात लाज न आणता टाळ घेऊन उभे राहून शुध्द चित्ताने ध्रुपद धरणे, कीर्तनकार, प्रवचनकार, हरिभक्त सत्पुरुष यांच्या पायांचे तीर्थ सेवन करणे शरीरकष्ट भोगून होईल तेवढा परोपकार करणे ही तुकोबाच्या साधनेची पूर्वावस्था होती अशातच त्यांचे प्रपंचाकडे लक्ष कमी झाले स्त्रीबंधू व आप्तवर्ग यांनी त्यांना उपदेश करून संसाराकडे त्यांचे लक्ष वळेल असे प्रयत्न केले पण त्यांना 'समूळ प्रपंचाचा वीट' आला असल्याने त्यांनी 'वचन मानिलें नाहीं सुहृदांचें' सत्य व असत्य काय? याचा निवाडा करण्यासाठी आपल्या मनासच साक्षी केले बहुमतानं वागण्यास काही फायदा होईल असे त्यांना वाटले नाही याच अवस्थेत असताना भामनाथ, भंडारा येथील डोंगरावर वृक्षवल्लीच्या व वनचराच्या सहवासात तुकोबांना अद्वितीय सुख प्राप्त झाले श्रीगुरु बाबाजी चैतन्य यांनी त्यांना मंत्रोपदेश दिला 'धरिला विश्वास दृढ नामीं' नामस्मरणावरच आपला विश्वास दृढ केला, असे त्यांनी म्हटले आहे मग त्यांना नामदेवांकडून कवित्वाची स्फूर्ती झाली त्यांच्या मुखावाटे विठ्ठलप्रसादान प्रभावित झालेली प्रसन्न अशी वाक्गंगा अभंगपण स्रवू लागली

चित्तामध्ये विठ्ठलाचे पाय घट्ट धरून तुकोबा कृतार्थ झाले याच आत्मसुखात दंग असताना भोवतीच्या लोकांना तुकोबाचे महत्त्व समजले नाही त्यांच्या कवित्वाचा त्यांना द्वेष वाटू लागला रामेश्वरभटासारख्या पंडिताचा ' निषेधाचा काहीं पडला आघात ' या प्रहारामुळे तुकोबाचे चित्त फारच कष्टी झाले त्यांना आपल्या अभंगाच्या वह्या इंद्रायणीच्या डोहात बुडवाव्या लागल्या. वह्या उदकात टाकल्यानंतर बुवा तेरा दिवसपर्यंत अखंड नामस्मरण करीत धरणे धरून राहिले तेव्हा त्या नारायणास दया आली त्यानी तुकोबास दर्शन दिले व त्यांच्या अभंगाचे रक्षण केले कारण भक्तास नारायण कधीच उपेक्षीत नाही तो त्यांचा सांभाळ नेहमीच करीत असतो

१३३४ ऐका वचन हे संत । मी तों आगळा पतित ।
काय काजें प्रीत । करीतसा आदरें ॥ १ ॥
माझें चित्त मज ग्वाही । सत्य तरलो मी नाहीं ।
एकाचिये वाहीं । एक देखीं मानिती ॥ २ ॥
बहु पीडिलो संसारें । मोडीं पुसे पिटीं ढोरें ।
न पडता पुरें । या विचारें राहिलो ॥ ३ ॥
सहज सरले होतें काहीं । द्रव्य थोडें बहु तें ही ।
त्याग केला नाहीं । दिलें द्विजा याचका ॥ ४ ॥
प्रियापुत्रबंधु । यांचा तोडिला संबंधु ।
सहज जालो मंदु । भाग्यहीन करंटा ॥ ५ ॥
तोंड न दाखवे जना । शिरें सांदी भरे राणा ।
एकांत तो जाणा । तयासाटीं लागला ॥ ६ ॥
पोटें पिटिलों[1] काहारें । दया नाहीं या विचारें ।
बोलाविता बरें । सहज म्हणें यासाटीं ॥ ७ ॥
सहज वडिला होती सेवा । म्हणोनि पूजितो या देवा ।
तुका म्हणे भावा । साटीं क्षणी घ्या कोणी ॥ ८ ॥

शब्दार्थ व टीपा – आगळा–विशेष, काजें–कारणानें, ग्वाही–साक्ष, वाही–रीत, ओघ, मार्ग, पुसे–शेपट्या, मंद–मूढ, पिटिलो–नस्त झालो क्षणी–नकारार्थी

अर्थ –संतहो, मी तर विशेष प्रकारचा पतित अथवा पापी आहे कोणत्या कारणासाठी तुम्ही मजवर एवढी प्रीती आदराने करता ? माझे हे म्हणणे तरी ऐका १ माझे चित्तच मला साक्ष देत आहे की, मी खरोखरच या भवसागरातून तरून गेलो नाही, एक मला मानू लागला की दुसरा त्याच रीतीने मानू लागतो २ संसाराच्या मुळे मी फारच पीडित झालो शेतीच्या कामाच्या वेळी मी गुरांना मारले, त्यांच्या शेपट्या पिरगाळल्या, पण इतकेही करून संसारास मला काही पुरे पडले नाही मग या विचाराने मी स्वस्थच झालो ३ सहजच मग जे थोडे द्रव्य होते तेही संपून गेले मी स्वत होऊन काही त्याचा त्याग ते ब्राह्मणाना देऊन केला नाही ४ बायको, मुले व भाऊ यांना तोंड दाखवावे असे वाटेना मी त्यांचा संबंध सोडला मी भाग्यहीन असा करंटाच झालो ५ कुठेतरी रानावनात–सांदी–कोपऱ्यात शिरून शांतपणे बसावे, लोकांना तोंड दाखवू नये, एकांताचे सेवन करावे असे वाटत राहिले असे तुम्ही समजावे ६ पोटाच्या त्रासान फारच पीडित झालो मनातील दया नाहीशी झाली, कुणी बोलावले तर बरे आहे, असे म्हणत राहिलो ७ तुकाराम महाराज म्हणतात, वाडवडिलांनी सहजच पांडुरंगाची सेवा केली होती, म्हणूनच मी या देवाची पूजा करीत आहे माझ्या केवळ या भावासाठी कुणी मला महत्त्व देऊ नये ८

[1] पडिलो

१३३५　बरें जालें देवा निघालें दिवाळें । बरी या दुष्काळें पीडा केली ॥ १ ॥
अनुतापें तुझें राहिलें चिंतन । जाला हा वमन संवसार ॥ २ ॥
बरें जालें देवा बाईल कर्कशा । बरी हे दुर्दशा जनामध्यें ॥ ३ ॥
बरें जालें जगीं पावलों अपमान । बरें गेलें धन ढोरें गुरें ॥ ४ ॥
बरें जालें नाहीं धरिली लोकलाज । बरा आलों तुज शरण देवा ॥ ५ ॥
बरें जाले तुझें केलें देवाईल । लेंकरें बाईल उपेक्षिलीं ॥ ६ ॥
तुका म्हणे बरें व्रत एकादशी । केलें उपवासीं जागरण ॥ ७ ॥

शब्दार्थ व टीपा :– अनुतापें– पश्चात्तापामुळे, वमन– वांती, ओक, बाईल–बायको, कर्कशा– कजाग, भांडखोर, देवाईल–देऊळ, मंदिर, देवालय.

अर्थ :–देवा, माझ्या दुकानाचे दिवाळे निघाले, हे एका दृष्टीने बरेच झाले की. या दुष्काळामुळे फार त्रास झाला हेही ठीक झाले १ कारण या पश्चात्तापाच्या वृत्तीमुळे तुझे चिंतन सतत होत राहिले, व त्यामुळे सारा संसार वांतीप्रमाणे वाटला. २ देवा, ही बायको भांडखोर मिळाली हेही एक प्रकारे बरे झाले. जगात माझी दुर्दशा होत आहे हेही फार चांगले आहे. ३ या जगात माझा ठायीठायी अपमान झाला हेही फार चांगले झाले. माझे धन, धान्य, गुरेढोरे यांचा नाश झाला हेही चांगलेच झाले. ४ देवा, मी लोकलाज धरली नाही हेही फार चांगले केले. तुला शरण आलो हे फार बरे झाले. ५ देवा, तुझे देऊळ पडायला झाले होते, ते बांधले हे फार बरे झाले. बायको मुलांचा त्याग केला हेही चांगलेच झाले ६ तुकाराम महाराज म्हणतात, एकादशीचे हे व्रत फार चांगले आहे. कारण त्यामुळे जागरण व उपवास यांचा लाभ होऊन तुझे चिंतन घडते. ७

विवरण :–वरील दोन अभंगातून तुकाराम महाराज आपल्या वृत्तीत पालट कसा पडला व आपण कोणत्या साधनेत गुंतून राहिलो हे सांगत आहेत. संसाराने आपण फार त्रस्त झालो. आपली धनसंपत्ती नाहीशी झाली, गुरेढोरे मरण पावली, बायको, मुले, बंधू यांचा व आपला संबंध संपला आणि कुठेतरी रानावनात, सांदीकोपऱ्यात एकांताच्या वासासाठी उत्सुक बनलो असे तुकाराम महाराज सांगत आहेत. तुकोबांना झालेला अनुताप, त्यांच्या मनात निर्माण झालेले वैराग्य व त्यातून सहजपणाने उत्पन्न झालेली ईश्वरसाधना यांचे मोठे हृद्य व उद्बोधक चित्रण या अभंगातून आहे. त्यांना संसाराचा वीट आला, त्यांच्यावर एकामागून एक अशी संकटे कोसळली, दुकानाचे दिवाळे निघाले, बाईल कर्कशा पाठीशी लागली, ही वरवरची निमित्ते होत. संसार हा असार आहे, तो कितीही केला तरी पुरा पडणार नाही. जन्मास येऊन शोधण्यासारखे, मिळविण्यासारखे फार मोठे दुसरे काही आहे या हेतूने बुवा संसाराशी फटकून राहिले. त्यांना तो वमनाप्रमाणे वाटला. संसाराला, संकटांना ते भ्याले असा नाही अर्थ या अभंगाचा ' जिंकावा संसार । येणें नावें तरी शूर ' असेच त्यांना वाटे. त्यांच्या समोर अखंडपणे युद्धप्रसंग होता आत व बाहेर सर्वत्र विरोधाची परिस्थिती होती

याच विरोधी परिस्थितीमधून तुकोबांच्या साधनेचा क्रम आकारास येत राहिला. लोकांना तोंड दाखवायला नको म्हणून ते कुठेतरी सांदीकोपऱ्यात, रानावनात लपून एकांतवास पत्करू लागले. साधकास एकांतवासाचे महत्त्व फार असते. ' अखंड एकांत सेवावा । अभ्यासचि करीत जावा,' ' अखंड येकांत सेवावा । ग्रंथ मात्र धांडोळावा ' या रामदासांच्या वचनाचा हाच अर्थ आहे ' येकांतीं स्मरण करावें । चुकलें निधान पडे ठावें ' असे या एकांताचे फळ असते. आणि यामुळेच तुकारामबुवा एकांतासाठी उत्सुक बनले होते. महीपतीबुवांनी तुकोबांच्या या मनःस्थितीचे वर्णन करताना लिहिले आहे, ' मातें आयुष्य तों किती । तेंही वेंचिलें संसार भ्रांतीं । आतां उरल्या काळीं निश्चिती । रुक्मिणीपती भजावा ॥ ऐसा निश्चय करोनि चित्तीं । जातसे भांवनाथ पर्वतीं. . . .पर्वतावरी जावोनि देखा । अंतरीं आठवूनि वैकुंठनायका । करुणा अनेका भाकित ' याच पर्वतावर तुकोबांनी एकांतवास केला. त्यांना ईश्वराचा साक्षात्कार झाला, ' भावगिरी पाठारी वस्ति जाण केली । वृत्ति स्थिरावली परब्रह्मीं ' अशी अवस्था त्यांच्या मनास प्राप्त झाली.

आपल्या साधनक्रमाच्या वेगवेगळ्या खुणा बुवांनी या अभगातून सांगितल्या आहेत. विश्वंभरबाबाच्या भक्तीने आकृष्ट झालेला श्रीविठ्ठल देहूतच स्थिरावला होता इंद्रायणीकाठी असलेल्या देवळाचे तुकोबांनी पुनरुज्जीवन केले त्यानी स्वत कष्ट करून हे देऊळ दुरुस्त केले 'ऐसा सकल्प करोनि मनीं। देवालय उकलिले तये क्षणीं। आपुल्या हातीं कुदळ घेउनी। चिखलपाणी करीतसे ॥' असे महीपतीबुवांनी वर्णन केले आहे याच देवालयात तुकाबा प्रेमाने विठ्ठलासमोर कीर्तन करू लागले आधी काही कीर्तनकाराच्या मागे उभे राहून, ध्रुपद धरण्याचा त्यानी सराव केला 'बहुत करावें पाठांतर। कंठीं धरावें प्रयतर। भागवतकथा निरंतर। करीत जावी' याच मार्गाने तुकोबा निघाले होते परंतु एवढ्या प्रखर मार्गाची सवय एकदम थोडीच लागते? अनेक वेळा मन हट्टी व अचपळ बने 'नव्हतें अभ्यासीं चित्त आधीं' असे बुवांनीच स्वत म्हटले आहे परंतु 'तुका म्हणे मना पाहिजे अंकुश' या नात्याने चिंतन, मनन, एकांतवास, सतग्रथश्रवणवाचन, नामस्मरण, कथाकीर्तन, भजन इत्यादींच्या साह्याने तुकोबाना रोज नवी जागृती येत राहिली तुकोबांच्या या साधनक्रमाचे फार सुरेख व मार्मिक वर्णन महीपतींनी केले आहे त म्हणतात,

'निजार्थे करावें कीर्तन। ऐसी इच्छा धरिली मनें। संत बोलिले पुरातन। त्यांची वचनें पाठ केली॥ पहिला अभ्यास काहीं नव्हता। आवडी आतां उपजली चित्ता। प्राकृत अभंग शतकोटि कर्ता। नामदेव वार्ता बोलिले की॥ त्या नामयाचे अभंग निश्चित। पाठ करोनि गात नाचत आणिक संतांचे, पहिले ग्रंथ। कबीर भक्त यवन विख्यात। तयाचीं जीं वचनामृतें। तीं पाठ करीत प्रीतीनें। आणिक अध्यात्मग्रंथ थोर। स्वमुखें वदले ज्ञानेश्वर। त्याची शुद्ध प्रती साचार। वैष्णव वीरें मिळविली॥ श्रीविष्णु अवतार एकनाथ देखा। त्यांणी भागवतावरी केली टीका। त्याचा प्रयत्न करोनि निका। ग्रंथ नेटका मिळविला॥ त्या ग्रंथाचें करावया मनन। एकांत स्थळ योजिलें कोण। रमणीय भांडार पर्वत जाण। ते स्थळीं जाऊन बैसले॥ ग्रंथाचे पारायण करोनि। अर्थ अन्वय ध्यानासि आणी। पूर्वाभ्यासी जो शिरोमणी। कैवल्यदानी साह्य जया॥ ग्रंथ व्हावया पाठांतर। तुकयासि श्रम न लागती फार। मनन करितां अहोरात्र। मखीं अक्षरें बैसती। प्रासादिक एकनाथीं वचनें। जे का भावार्थ रामायण। त्याचें हो पाठांतर पूर्ण। निज प्रीतीनें करीतसे॥ श्रीभागवतींच्या कथा सुरस। स्वमुखें वदले महापुरुष। त्याही पाहिल्या सायासें। लीला विशेष श्रीहरीची॥ योगवासिष्ठ अमृतानुभव पूर्ण। श्रीज्ञानेश्वर बोलिले वचन। त्याही ग्रंथाचें करोनि मनन। अर्थ शोधून ठेवितो॥—' असा हा तुकोबाचा ग्रंथवाचनाचा व चिंतनाचा छंद होता त्यातूनच त्याचे भक्तिप्रवण मन आकाराम येत होत

तुकाराम महाराजाच्या या साधनक्रमात परोपकारास फार महत्त्व होते 'पुण्य परोपकार' हीच त्यांची पुण्याची व्याख्या होती 'ठाकला तो काहीं केला उपकार' असे त्यानी म्हटले आहे दुसऱ्याचे दुःख ओळखावे, त्याला मदत करावी, प्राणिमात्राना जवळ करावे, त्यांच्या यातना हळुवार पद्धतीने दूर कराव्यात, कष्टी जीवाना समाधान द्यावे हा बुवांच्या साधनेमधीलच एक महत्त्वाचा भाग होता तुकारामबुवा परोपकार तरी कोणता करीत? त्यांच्या जवळ आता द्रव्य नव्हते, सत्ता नव्हती स्वत केलेले पुण्य तोंडाने वदवून दाखविण्याची रीत साधुसंतांची नसते परंतु महीपतींसारख्या चतुर व सनसेवक चरित्रकारांन या परोपकारी व्रताचे वर्णन मोठ्या बहारदार रीतीने दिले आहे त्यानी म्हटले आहे–

'तुकयाची तो निष्काम वृत्ती। प्राप्त व्हावया रुक्मिणीपती। परोपकारीं वेचितसे शक्ती। कैशा रीतीं ते ऐका॥ कोणी पांतस्थ वाटेवरी। अकस्मात गांठ पडली जरी। त्याचें ओझें घेऊनि शिरीं। विसावा क्षणभरी त्यास द्यावा॥ पंगुल मार्गी लागतां सबळ। पांथस्थ गावांत पाहती स्थळ। तयासि दाखवी चावडी देऊळ। ना तरी तत्काळ नें घरा॥ पंथ क्रमतांचि लवलाहें। यात्रेकऱ्याचे भुजले पाय। मग उष्ण पाणी करोनि पाहे। रगडित देह निजांगें॥ गायी वृषभासी निबळपणीं। मोकलोनि देती निदय मनीं। तयासि हातें कुरवाळोनि। चारापाणी घालीतसे॥ मैदा साकर आणि घृत। एके जागीं करोनि ठेविता। मुंगियांच्या यावीं घालित। ईश्वर प्रीत्यर्थ नित्यकाळीं॥ अणुरेणुपर्यंत जाणा। भूतमात्रीं धरितसे करुणा। हिंसा घडे तें कर्म जाणा। सहसा ही मना नावडे॥ परीं चालतां हालतां दिसे जवळीं। ते रगडेल अवचित पायातळीं। यास्तव जीव कळवळीं। कैसी

मासोळी उदकावीणे ॥ उष्णकाळीं झालिया उबारा । कीर्तनामाजीं घालितसे वारा । अन्न न मिळता क्षुधातुरा । प्रयत्ने मेळवुन दे त्यासीं ॥ उष्णकाळीं जीवन वाटेवर । नमता उपाय करीतसे थोर । भांडार भरोनि सत्वर । मार्गावर ने ॥ पायस्थासि व्याधीं मार्गी होत । जवळीं नसता सुहृदआप्त । तयासि राहवोनि देवळांत । औषध पथ्य करवीतसे । ' असे हे तुकोबाच्या साधनक्रमात परोपकाराचे व्रत होते

साधनमार्गाच्या या प्रवासात जे जे अनुभव आले त्याचे चित्रण तुकारामबुवांनी केले आहे. वैराग्य निर्माण होण्यास काहीशी प्रतिकूल परिस्थिती साहाय्यभूत झाली दुकानाचे दिवाळे निघाले, दुष्काळाने पीडा केली तुकाराम महाराज म्हणतात हे फार बरेच झाले बायको कर्कशा निघाली, गुरेढोरे मरून गेली, लोकात अपमान झाला या सर्व गोष्टी चांगल्याच झाल्या असे बुवांनी म्हटले आहे कारण-' अनुतापें राहिले चिंतन । जाला हा वमन संसार ' या संसाराचे खरे स्वरूप काय आहे, याचा बोध या परिस्थितीने होत राहिला असेच त्याला म्हणावयाचे आहे अशा आपत्तींचा अर्थ थोर महात्मे जो लावतात तो पाहाण्यासारखा असतो. नारदाची आई त्याच्या लहानपणीच मरण पावली त्यावेळी स्थितप्रज्ञ नारदांना विचार स्फुरला तदा तदहमीशस्य भक्तानां शमभीप्सत । अनुग्रहं मन्यमानः प्रातिष्ठं दिशमुत्तरम्-' भक्ताचे कल्याण इच्छिणाऱ्या भगवंताचा हा मजवर अनुग्रहच झाला असे मानून मी उत्तर दिशेची वाट धरली प्रिय वस्तू नाहीशी झाली की कुणाचे मन संतप्त होते ? सतावते ? ज्याचे मन मोहग्रस्त आहे त्यालाच या विपरीत परिस्थितीचा त्रास होणार जो स्थिर बुध्दीचा मनुष्य आहे त्याला याची बाधा कधीही होणार नाही अजाचे सांत्वन करताना वसिष्ठ म्हणाले-' अवगच्छति मूढचेतनः प्रियनाशं हृदि शल्यमर्पितम् । स्थिरधीस्तु तदेव मन्यते कुशलद्वारतया समुध्दृतम्-' मोहाने ज्याचे ज्ञान आवृत झाले आहे, तो प्रिय वस्तू नाहीशी झालेली पाहताच आपल्या हृदयात शल्य खुपसले गेले असे मानतो पण स्थिर बुद्धीचा पुरुष मात्र त्यात हिताहित न मानता इष्टवस्तुवियोगाने आपला मोह तितकाच दूर झाला व आपल्या खऱ्या स्वहिताचे दार उघडले गेले असे तो समजतो-' याच दृष्टीने तुकोबाच्या या अनुतापयुक्त उद्गाराकडे पाहिले पाहिजे या अनुतापातून वैराग्यवृत्ती बळावली व त्याचे चित्त खऱ्या स्वहिताकडे स्थिरावत राहिले

१३३६ बोलावा विठ्ठल पाहावा विठ्ठल । करावा विठ्ठल जीवभाव ॥ १ ॥
येणें सोसें मन जालें हावभरी । परती माघारी घेत नाहीं ॥ २ ॥
बंधनापासूनि उकलली गांठी । देतां आली मिठी सावकाशें ॥ ३ ॥
तुका म्हणे देह भारिला विठ्ठलें । कामक्रोधें केलें घर रितें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :-जीवभाव-जिवाचा जिवलग, सोसें-हावेने, आग्रहाने, रितें-रिकामे

अर्थ :-विठ्ठल बोलावा व विठ्ठल पाहावा, विठ्ठलच जिवाचा जिवलग जिवेभावे करावा १ याच आग्रही वृत्तीने माझे मन हावरे बनले असून ते त्या विठ्ठलाकडून परत कधी फिरत नाही २ संसाराच्या व लौकिकाच्या बंधनापासून सर्व पाश मी सोडिले आहे त्यामुळे सावकाशपणे त्या श्रीहरीला मिठी देण्याची मला संधी मिळाली ३ तुकाराम महाराज म्हणतात, हा देहच सर्व विठ्ठलप्रीतीने भरून गेलेला असल्याने कामक्रोधादी वृत्तींना त्यात स्थानच नाही या सर्व वृत्ती अंतःकरणातून नाहीशा झाल्या आहेत ४

१३३७ मीचि मज व्यालों । पोटा आपुलिया आलों ॥ १ ॥
आतां पुरले नवस । निरसोनी गेली आस ॥ २ ॥
जालों बरा बळी । गेलों मरोनि तेकाळीं ॥ ३ ॥
दोहींकडे पाहे । तुका आहे तैसा आहे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :-व्यालों-जन्म दिला, पुरले-पूर्ण झाले, निरसोनी गेली-नाहीशी झाली, बळी-स्वानुभवाने बळवान,

अर्थ – आत्मरूपाच्या अनुभवाने मीच मला जन्म दिला आहे. मीच आपल्या पोटी जन्म घेतला आहे १ आता माझे सर्व नवस पूर्ण झाले माझी सर्व आशा आता नाहीशी झाली, तृप्त झाली २ स्वानुभवाच्या प्राप्तीने मी जेव्हा बलवान झालो त्याच वेळी मी देहरूपाने अथवा इंद्रियांच्या वृत्तीरूपाने मरून गेलो आहे, ३ तुकाराम महाराज म्हणतात, आता मी प्रपंचरूप व आत्मस्वरूपाचा बोध याच्याकडे पाहात आहे तसाच उभा आहे. ४

विवरण '– एक श्रेष्ठ प्रकारची अनुभूती तुकारामबुवांनी या अभंगात व्यक्त केली आहे. तुकोबांचे संकट-ग्रस्त व लौकिक दृष्ट्या पराभूत जीवन या पार्श्वभूमीवर पाहाताना त्यांच्या मनाचा विकास हा अभ्यासाचा स्वतंत्र विषय आहे 'ससाराच्या तापें तापलों मी देवा' येथपासून त्यांनी प्रारंभ केला त्यांना वैराग्य निर्माण झाले अस्वस्थ असणारे व अभ्यासात लक्ष न देणारे मन त्यांना नीट मार्गाने केंद्रित करावे लागले हरिकीर्तन, नामस्मरण, ग्रंथवाचन, मननचिंतन इत्यादींच्या साह्याने मनाला अंकुश देत देत त्यांना 'नित्य नवा दीस जागृतीचा' वाटू लागला. सद्गुरूंची कृपा, नामदेवांची प्रेरणा याच्याबरोबरच तुकोबा आपल्या मनासही शिस्त लावीत होते तुकोबांच्या या आत्मिक प्रवासाचे चित्र फारच उद्बोधक व मार्गदर्शक असे आहे. बाह्याकारी भक्ती व अंतरी समाधान अशी स्थिती आपली होत नाही ना ? अशी शंका बुवांच्या मनात येत असे सद्गुरुकृपेच्या आधी तर त्यांचे चित्त फारच अस्वस्थ होते अनेक चिंतांनी व्यग्र होते 'मज हे वासना अनिवार' असे त्यांनी एका ठिकाणी म्हटले आहे. आपणास जेथे जेथे 'गोवा' म्हणजे बंधन पडेल तेथे तेथे 'तुम्ही देवा सांभाळावें म्हणून त्यांची विनवणी असे आपण केवळ बाह्याकाराचे त्याग तर संपादन केले नाही?' 'नाहीं जाला त्याग अंतरींचा' हे खरे की काय ? 'प्रपंचाबाहेरी नाहीं आले चित्त' असाही एक अनुभव त्यांनी सांगितला आहे यासाठी तुकारामबुवा आपल्या अधीर व अतृप्त मनास सारखा उपदेश करीत आहेत काम क्रोध याच्या पर्वताच्या पलीकडे असलेला, राहिलेला गोविंद कसा सापडेल ? 'नुलघवे मज न सापडे वाट। दुस्तर हा घाट वैरियाचा' ही अवस्था केव्हा संपेल ? वासनेचा क्षय केव्हा होईल ? इंद्रियाचा जय केव्हा होईल ? देवाची खरी कृपा केव्हा होईल ? त्यांची अनुभूती केव्हा येईल ? आपले डोळे ईश्वराच्या दर्शनाने केव्हा निवतील ? स्वप्नात तरी देव एकदा सगुण सुंदर स्वरूपाने दिसावा म्हणून त्यांची तीव्र इच्छा होती नाना प्रकारची विनवणी चालू होती. त्यासाठी कोरडे ब्रह्मज्ञान आपल्या उपयोगाचे नाही अशी खात्री त्यांच्या मनाची होती पाण्याबाहेर पडलेल्या माशाप्रमाणे तुकोबांचे चित्त तळमळत राही. रात्रंदिवस आत आणि बाहेर असा युद्धप्रसंग सुरू असे संतांचे व त्यांच्या वचनांचे साह्य घेतले जात होते आपल्या तृषाक्रान्त जीवनावर ईश्वराने कृपेचा वर्षाव करावा अशी त्यांची तीव्र मनीषा होती

आणि अशा पार्श्वभूमीवर अवचितपणे सुवर्णाचा दिवस उगवे ईश्वराची प्रत्यक्ष भेट होते केवळ सुखाचेच असे आतलेले त्यांचे शोभिवंत मुख पाहून बुवा सुखी होतात त्यांची मिठी ईश्वराच्या पायावर पडते दृष्टादृष्ट होताच मनस्ताप दूर होतो 'अवघा निवारला शीण' अशी अवस्था प्राप्त होते 'देहभाव पालटली काया। पडली छाया ब्रह्मींची' ब्रह्माची छाया एकदा पडल्यावर–देहाचे व देहभावाचे रूपच पालटून गेले देह तोच, वृत्ती त्याच पण त्यांचे रूप संपूर्णपणे बदलले स्वात्मबोधामुळे, ईश्वराच्या थोर अनुभूतीमुळे तुकोबांचा जणु पुनर्जन्म झाला आपलाच जणु पुन जन्म आपल्याच पोटी झाला पूर्वीच्या सर्व शंका फिटल्या; सर्व वासना निमाल्या सर्व चिंता दूर झाल्या 'दैन्य गेलें हरली चिंता' अशी अवस्था प्राप्त झाली संतांच्या पंगतीत ब्रह्मरसाचे भोजन सुरू झाले अंधार दूर झाल्यामुळे सर्व विश्व धवळून निघाले, प्रकाशित झाले जिकडे तिकडे देवच आपल्या पाठीशी आहे, अशी त्यांची खात्री झाली 'आत हरि बाहेर हरि। हरिनें घरीं कोंडिलें' अशा अवस्थेचा आनंद काय वर्णावा? आपल्या माथ्यावर ईश्वराचा हात आहे व त्यांच्या पायावर आपले मस्तक आहे अशा 'शरीरसंबंधाच्या मिठीचा' स्वानंदसोहळा काय वर्णन करावा ? या अद्वितीय व अलौकिक अनुभूतीमुळे तुकोबांचा जणु पुनर्जन्म झाला पूर्वीचे सर्व दैन्य हरपले, नाहीसे झाले 'बीज भाजुनी केली लाही' असा भाषेत बुवा आपल्या पूर्वानुभवाचे वर्णन करतात

तुकोबांच्या अशा आत्मिक प्रवासात हे जे त्यांच्या व्यक्तित्वाचे स्थित्यंतर आहे त्याचे वर्णन मानसशास्त्राच्या साह्यानेही करता येते आपल्याच सततच्या ध्यासाने आपण आपल्या पोटी येऊन केवळ नव्याने आयुष्य कसे

व्यतीत करतो, याची साक्ष तुकोबाना स्वत च्याच आयुष्यात पटली असावी भगवताचा भक्त आपल्या पूर्वीच्या आयुष्यात अतृप्त असतो, संचित असतो, असमाधानी असतो, अपूर्ण असतो, दु खीकष्टी असतो पापकृत्यांची टोचणी त्याच्या मनास एकसारखी असते अनेक प्रकारानी तो त्रस्त झालेला असतो अशा पार्श्वभूमीवर सततच्या चिंतनामुळे, वैराग्यामुळे साधनक्रमामुळे ईश्वरी कृपा झाली की त्याचा जणु पुन जन्म होतो एकदम नवच रूप त्याला प्राप्त होते त्याचा देह पूर्वीचाच, पण त्याचे तेज व सौंदर्य काही आगळेच असत पूर्वीचो सर्व किल्मिषे नष्ट झाल्ली असतात काही अपवाद सोडल्यास बहुतेक थोर संताच्या या रूपान्तरित अवस्थेचे दर्शन त्याच्या आत्मिक प्रवासात होत असत 'Ye must be born again' असे ख्रिस्ताने म्हटले आहे तुकाराम महाराज 'मीच मज जन्म दिला आहे मीच माझ्या पोटी आलो आहे' या भाषेत आपल्या दिव्य अशा पुनर्जन्माचेच वर्णन करीत आहत विल्यम जेम्स, अडरहिल, जेम्स प्रॅट, सेल्बी इत्यादी पाश्चात्य मानसशास्त्रज्ञानी थोर संत पुरुषाच्या या मानसिक रूपान्तराचे वर्णन वस्तुनिष्ठ दृष्टीने केले आहे अशा या रूपातरित अवस्थेचा व उदात्तीकरणाचा Sublimation चा संबंध नाही उदात्ती करणामध्ये पूर्वीचे गुणविशेष थोडे तरी शिल्लक राहतात पण रूपान्तरात अथवा अवस्थान्तरात अथवा स्थित्यतरात मूळच्या सर्व वासना व कल्पना नष्ट झालेल्या असतात 'निरसोनि गेली आस' अशीच भूमिका निर्माण होते 'वासनेचे बीज टाकिलें भर्जोनि' या ज्ञानदेवाच्या उक्तीप्रमाणे सर्व वासनाची बीजे दग्ध होतात मूळचा हिणकस-पणा नष्ट होऊन शुद्ध स्वरूपाच्या भक्तीच्या मनस्थितीचा नवा अवतार होतो दर्शेंद्रियातून वाया जाणाऱ्या शक्तींचा निरोध करून त्याच्या रूपान्तराने 'ओजस्' वाढविण्याचा मार्ग विवेकानंदानीही सुचविलेला आहे 'ओजस्' ही एक विलक्षण शक्ती आत्मानुभूतीसाठी आत्यावश्यक आहे ही शक्ती अशा रूपान्तरामुळे, Conversion मुळे, किंवा विवेकानंदाच्या भाषेत Transformation मुळे प्राप्त होऊ शकते It is only a question of transformation असे विवेकानंदानी म्हटले आहे या ओज शक्तीच्या प्राप्तीत मागचे सर्व हिणकस असते ते दग्ध होऊन जाते भक्ताचा एका नव्याच दिव्य अशा विश्वात प्रवेश झाल्ला असता साक्षात्कार, आत्मानुभव अथवा समाधिसुख यांची प्राप्ती झाली का मनुष्य पूर्वीचा उरत नाही विवेकानंदाच्या मते तर एखाद्या सामान्य व निर्बुद्ध माणसाने समाधीत प्रवेश केला तर तो बाहेर आल्यानंतर निमळपणाने बोलू लागेल पूर्वी तो आत्मज्ञाच्या वाल्या असल तर समाधानंतर तो ब्रह्म-ज्ञान मागणारा वाल्मीकी होईल विवेकानंदानी राजयोगात म्हटले आहे But when a man goes into Samadhi, if he goes into it a fool, he comes out a sage' ही सर्वसाधारण माणसाची अवस्था! तर मग ज्याच्या घरात पंढरीची वारी आजोपासूनच आहे, ज्याच्या कुळीचे दैवत श्रीविठ्ठल आहे, जे वैराग्याने नटलेले आहेत, ज्याना बाबाजी चैतन्याचा बोध प्राप्त झाला आहे, ज्याना नामदेवानी प्रेरणा दिली आहे अशा तुकोबाना ब्रह्मानुभूती याचि देहीं याचि डोळा' प्राप्त झाली यात नवल काय? स्वानुभवाच्या प्राप्तीने ते बलवान झाले व पूर्वीच्या देहाने व देहाच्या वृत्तीने मरून गेले, यातील भावार्थ आता स्पष्ट होण्यासारखा आहे

१३३८ जग अवघें देव । मुख्य उपदेशाची ठेव ॥ १ ॥
आधीं आपणया नासी । तरि उतरे ये कसीं ॥ २ ॥
ब्रह्मज्ञानाचें कोठार । ते हें निश्चयें उत्तर ॥ ३ ॥
तुका म्हणे ते उन्मनी । नास कारया कारणीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – ठेव–पद्धत रीत, नासी–नाश करावा कसीं–कसोटीस, कोठार–साठा नास–नाश, उन्मनी–मनाचा लय झालेली स्थिती कारयाकारणीं–कार्यकारणभावाचा

अर्थ –सर्व जग हे देवाचे रूपच आहे हीच उपदेशाची मुख्य रीत आहे हाच मुख्य उपदेश आहे १ अगोदर देहभाव, मीपणाची वृत्ती याचा नाश करावा व मगच या कसोटीस उतरता येईल २ याच निश्चयात्मक उत्तरामध्ये ब्रह्मज्ञानाचा साठा आहे ३ अशा प्रकारे कार्यकारणभावाचा नाश झाला तरच मीपणाचा लय झालेली उन्मनी अवस्था प्राप्त होईल कार्यकारण भावाचा नाश हीच उन्मनी अवस्था ४

विवरण – याही अभंगात वरील अभंगाप्रमाणेच तुकारामबुवा 'आधी आपणया नासी' असे मागत आहेत माझा देह, माझ्या वृत्ती, माझा संसार, माझे भोवताचे जग याच्यावरील माझे ममत्व याचा नाश झाल्याखेरीज ऐक्यभावाच्या कसोटीस कोणीही उतरणार नाही हे माझे असे मानण्यातच एक प्रकारचा दुजाभाव आहे हा दुजाभाव नष्ट होऊन हे सर्व त्याचेच आहे असा भाव मनात निर्माण व्हायला हवा 'सर्व जग हे त्या भगवताचेच रूप आहे आपण त्यातच सामावलो आहोत' असा भाव महत्त्वाचा आहे 'वासुदेव सर्वमिति' अशी अनुभूती यणे आवश्यक आहे कारण 'सर्वभूताधिवासश्च वासुदेवस्ततो ह्यहम्' –सर्व भूताच्या ठायी मीच वास करतो म्हणून मला वासुदेव म्हणतात– अशी या वासुदेव शब्दाची व्युत्पत्ती महाभारतातील शातिपर्वात दिलेली आहे सर्व विश्वास भरून राहणाऱ्या या वासुदेवास ओळखणे, मीपणापासून त्याच्याशी एकरूप होणे हे अगत्याचे आहे

भगवद्गीतेच्या सहाव्या अध्यायातील तीसाव्या व वत्तीसाव्या श्लोकात या समत्वबुद्धीचे यथार्थत्वाने वर्णन केले आहे 'यो मा पश्यति सर्वत्र सर्वं च मयि पश्यति–'जो सम दृष्टीने सर्व भूताच्या ठायी आपणास व आपल्या ठायी सर्व भूतास पाहतो, तो मला व मी त्याला असा भावार्थ गीतेच्या या श्लोकात भगवतानी स्पष्ट केला आहे या श्लोकाचेच वर्णन श्रीज्ञानेश्वरमहाराजानी फार बहारीने केले आहे 'ते वेळीं जयाकडे वास पाहे । तेउता मीचि तया एकु आहे' अशी त्याची भावना असते 'तया सवत्र मी वाचूनि नाहीं' अशा अवस्थेत 'हे समस्तही श्रीवासुदेवो । ऐसा प्रतीतिरसाचा वोतला भावो' अशी धारणा होते ता भक्तात व ज्ञानी पुरुषात श्रेष्ठ ठरतो असे भगवताचे सागणे आहे

१३३९ साधनाच्या कळा आकार आकृति । कारण नवनीतीं मथनाचें ॥ १ ॥
पक्षियासी नाहीं मारगीं आडताळा । अंतरिक्षीं फळासीचि पावे ॥ २ ॥
भक्तीची जोडी[1] ते उखत्याचि साटी । उणें पुरें तुटी तेथें[2] नाहीं ॥ ३ ॥
तुका म्हणे आले साचत साचणी । आजि जाली धणी एकसरे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा –कळा–कलाकौशल्य, उखत्याची–एकदम, साचणी–साठा, धणी–तृप्ती

अर्थ –ईश्वरप्राप्तीसाठी अनेक प्रकारची कलाकौशल्ययुक्त साधने केली जातात, त्याचे मथन करून सार काढायचे ते असे की, १ एखाद्या उच्च स्थानावर वृक्षास फळे लगडलेली असतात, त्यांच्याकडे जाण्यास अतरिक्षात पक्ष्याना काहीच अडथळा नसतो एकदम ते पक्षी त्या फळांवर जाऊन बसतात २ त्याचप्रमाणे श्रीहरीची भक्ती केल्यास तो असाच एकदम प्राप्त होतो या ठिकाणी अथवा या मार्गाने कसलीही कमीजास्त अशी तूट कधी येत नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, आजपर्यंत पुण्याचा साठा माझ्याजवळ साचत आला होता, म्हणून तर आज मला तृप्ती होईपर्यंत या ईश्वराचा लाभ झाला ४

१३४० नाहीं येथें वाणी । सकळा वर्णी घ्यावी धणी ॥ १ ॥
जालें दर्पणाचें अंग । ज्याचा त्यासी दावी रंग ॥ २ ॥
एका भावाचा एकांत । पीक पिकला अनंत ॥ ३ ॥
तुका खळे दाणीं । करी बैसोनी वाटणी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा –वाणी–उणीव, कमतरता, तोटा, सकळा वर्णी–सगळ्या वर्णांनी, धणी–तृप्ती, दर्पणाचें–आरशाचे, खळे–खळ्यावर

अर्थ –या भक्तिमार्गात कशाचीच उणीव नाही सर्व वर्णांनी या ईश्वराच्या लाभाची तृप्ती मिळवावी १ हा मार्ग केवळ आरशाप्रमाणे आहे ज्याचा जसा भाव तसे त्याला दर्शन त्यात होईल २ एकनिष्ठ भावाचा एकांत निर्माण झाला म्हणजे त्या ठिकाणी श्रीहरीच्या कृपेचे पीक अनंतत्वाने निर्माण होते ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी या पीकाची रास करून खळ्यावर बसलो आहे ज्याचा जसा भाव तसा त्याला लाभ मी करून देईन तशी वाटणी करीन ४

---

१ गाडी, २ येथें

१३४१ ठेविलें जतन । करूनियां निज धन ॥ १ ॥
जयापासाव उत्पत्ति । तें हें बीज धरिलें हातीं ॥ २ ॥
निवडिले वरळा भूस । सार आइन जिनस ॥ ३ ॥
तुका म्हणे नारायण । भाग संचिताचा गुण ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :–जतन–जपणूक, जयापासाव–ज्याच्यापासून, वरळा–फोलकट, भाग–वाटा, संचिताचा–साठलेल्या पुण्याचा

अर्थ :–श्रीहरीची प्राप्ती हे माझे मोठेंच धन आहे. ते मी नीट जपून ठेविले आहे १ ज्याच्यापासून सर्व जगताची निर्मिती झाली आहे ते बीजच मी हस्तगत करून ठेविले आहे २ या प्राप्तीमधील भूस किंवा फोलकट बाजूला काढून सारभूत अशा मुख्य वस्तू मी निवडून काढल्या आहेत ३ तुकाराम महाराज म्हणतात, हा नारायणाचा वाटा माझ्या वाटणीस आलेला आहे हा माझ्या आजवर साठलेल्या पुण्याचाच परिणाम होय ४

१३४२ भ्रमणा पाउलें वेचिलीं तीं वाव । प्रवेशता ठाव एक द्वार ॥ १ ॥
सार तीं पाउलें विठोबाचीं जीवीं । कोणीं न विसंभावीं क्षणभरि ॥ २ ॥
सुलभ हे केलें सकळा जीवन । फुंकावेचि कान न लगेसे ॥ ३ ॥
तुका म्हणे येथें सकळ ही कोड । पुरे मूळ खोड विस्ताराचें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :–वेचिलीं–खर्च केली, वाव–व्यर्थ ठाव–स्थान, कोड–इच्छा

अर्थ :–इतर साधनाच्या भ्रमणात व्यर्थ पायपिटी करण्यात काय अर्थ आहे ? या श्रीहरीकडे जाण्याचा व त्या स्थानावर स्थिर होण्याचा मार्ग एकच आहे. १ या सर्व साधनाचे सार हे एकच की, विठोबाच्या पावलांचे स्मरण जीवाने धरावे एक क्षणभरही कुणी त्याला सोडू नये २ सर्व लोकांना सुलभ वाटणारे हे एकच साधन आहे उगाच कान फुकून वाटेल त्या माणसाकडून उपदेश घेण्याचीही जरूरी नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, याच ठिकाणी सर्व इच्छा तृप्त होतील कारण सर्व जगाच्या विस्ताराचे मूळ व खोड हे एकच असे आहे ४

१३४३ काही जाणों नये पांडुरंगाविण । पाविजेल सीण संदेहानें ॥ १ ॥
भलतिया नावें आळविला पिता । तरि तो जाणता कळवळा ॥ २ ॥
अळंकार[1] जातो गौरविता वाणी । सर्वगात्रा धणी हरिकथा ॥ ३ ॥
तुका म्हणे उपजे विल्हाळें आवडी । करावा तो घडी घडी लाहो ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :–सीण–त्रास, संदेहानें–संशयामुळे, भलतिया–कोणत्याही, सर्वगात्रा–सर्व शरीरास, धणी–तृप्ती, वेल्हाळ–शोभणारी, लाहो–लाभ

अर्थ :–एका पांडुरंगाशिवाय इतर काहीही जाणू नये याबद्दल मनात संशय येईल तर मात्र विनाकारण त्रास होईल १ सर्वांच्या पित्याप्रमाणे असणाऱ्या या ईश्वरास कोणत्याही नावाने हाक मारली तरी तो आपल्या मनातील कळवळा जाणून घेईल २ याच्या नावाच्या अलंकारामुळे आपली वाणी गौरविली जाते याच्या नामसंकीर्तनामुळे सर्व शरीरास तृप्तता प्राप्त होते ३ तुकाराम महाराज म्हणतात, याची शोभणारी आवड जेणेकरून उत्पन्न होईल, तो तो लाभ प्रत्येक क्षणी जोडीत असावे ४

१३४४ बीजापोटीं पाहे फळ । विघ्न न करिता सकळ ॥ १ ॥
तया मूर्ख म्हणावें वेडें । कैसे तुटेल सांकडें ॥ २ ॥
दावितिया[2] वाट । वेठी धरू पाहे घाट ॥ ३ ॥
पुढिल्या उपाया । तुका म्हणे रासे काया ॥ ४ ॥

---

१ होता, २ दावोनिया

शब्दार्थ व टीपा :–विध–नांगरणे, बी पेरणे यासारखे विधी, सांकडें–संकट, चाट–चावट, काया–शरीर.

अर्थ :–जमीन नांगरणे, बी पेरणे इत्यादी विधी न करताच जो केवळ बीजापासूनच फळाची अपेक्षा करतो १ त्यास मूर्ख अथवा वेडाच समजावे. अशा त्याच्या वागण्याने पुढील संकटे कशी दूर होणार ? २ मार्ग दाखविणाऱ्यासच बिगारीस धरणे हा चावटपणा समजायला हवा ३ तुकाराम महाराज म्हणतात, पुढील चांगल्या कामासाठी हा नरदेह नीट रक्षण करायला हवा ४

१३४५ मातेची जो थानें फाडी । तया जोडी कोण ते ॥ १ ॥
वेदां निंदी तो चांडाळ । भ्रष्ट सुतकीया खळ ॥ २ ॥
आगी लावी घरा । मग वसती कोठें थारा ॥ ३ ॥
तुका म्हणे वर्म । येरा नाचवितो[1] भ्रम ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:–जोडी–लाभ, खळ–दुष्ट, थारा–विश्रांतीला, येरा–इतरांना

अर्थ :–ज्या मातेच्या दुधापासून आपले पोषण झाले, तिचीच थाने फाडणाऱ्यास काय लाभ होणार आहे ? १ वेदांची निंदा करणाऱ्या चांडाळास भ्रष्ट, सुतकी व दुष्टच म्हणायला हवे, २ राहत्या घराला आग लावल्यावर मग विश्रांतीला कुठें बसायचे ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, वेदाचे मर्म जाणून घ्यावे नाही तर इतरांप्रमाणे भ्रमाने नाचावे लागेल. ४

१३४६ वेश वंदाया पुरते । कोण ब्राह्मण निरुते ॥ १ ॥
ऐसें सांगा मजपाशीं । संतां निरवितों येविशीं ॥ २ ॥
असा जी प्रवीण । ग्रंथीं[2] कळे शुद्धहीण ॥ ३ ॥
तुका म्हणे लोपें । सत्याचिया घडती पापें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :–निरुते–खरे, निरविर्तो–विनती करतो.

अर्थ :–ब्राह्मणाचा नुसता वेष असून काय उपयोग ? तो केवळ वंदन करण्यापुरता झाला. पण असा ब्राह्मण खरा कोण मानणार ? १ तुम्ही संत लोकहो, याविषयी मला सांगा. मी तुम्हांला विनंती करीत आहे. २ अहो ब्राह्मणहो, तुम्ही सर्व ग्रंथांत प्रवीण असून तुम्हांस बरेवाईट सर्व काही समजते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, एकदा सत्याचा लोप झाला म्हणजे सर्वत्र पापेच घडत राहतात. ४

१३४७ ज्या ज्या आम्हांपाशीं होतील ज्या शक्ति । तेणें हा श्रीपती अळंकारूं ॥ १ ॥
अवघा पायांपाशीं दिला जीवभाव । जन्ममरणाठाव पुसियेला ॥ २ ॥
ज्याचें देणें त्यासी घातला संकल्प । बंधनाचें पाप चुकविलें ॥ ३ ॥
तुका म्हणे येथें उरला विठ्ठल । खाये बोले बोल गाये[3] नाचे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :–अळंकारू–अलंकार करून घालू.

अर्थ :–ज्या ज्या शक्ती आम्हांपाशी आहेत त्यांचे अलंकार करून आम्ही या श्रीपतीला नटवू १ आम्ही आमचा सर्व जीवभाव याच्याच पायांवर अर्पण केला असून आम्हांस जन्ममरणाचा मुद्दा पत्ता नाहीसा झाला आहे. २ या ईश्वराचे जे देणे होते ते त्याला संकल्पासहित अर्पण करून देहात्मक बुद्धीच्या बंधनाचे पाप मी नाहीसे केले आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, आता आम्हांला यामुळे हा एक विठ्ठलच उरला आहे. आम्ही त्याचेच सेवन करतो, त्याचे गुण बोलतो, त्याचीच स्तुती गातो, त्याच्याच प्रेमसुखात तल्लीन होऊन नाचतो. ४

---

१ जाणवितो, २ ग्रंथ केले, ३ गायनाचे.

१३४८ आम्ही आळीकरें । प्रेमसुखाचीं लेंकुरें ॥ १ ॥
पायीं गोविली वासना । तुच्छ केलें ब्रह्मज्ञाना ॥ २ ॥
येता पाहे मुळा । वाट[1] पंढरीच्या डोळा ॥ ३ ॥
तुका म्हणे स्थळें । मग मी पाहेन सकळें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :–आळीकरें–हट्ट करणारे, मुळा–आमंत्रण

अर्थ :–आम्ही या देवाच्या प्रेमातील लेकुरे आहोत, प्रेमसुखाचा हट्ट धरणारे आहोत १ याच पांडुरंगाच्या पायाशी आमची वासना गुतून राहिली आहे यासाठी आम्ही ब्रह्मज्ञानासही तुच्छ मानले आहे २ या श्रीविठ्ठलाचे आमंत्रण केव्हा येईल, अशीच वाट आम्ही नित्य पाहात असतो, आमचे डोळे नित्य पंढरीच्या वाटेकडेच असतात ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवाचे एकदा असे बोलावणे आले की, मग मी सर्व स्थळे त्याच्याजवळची पाहीन ४

१३४९ आइत्याची राशी । आली पाकसिद्धीपाशीं ॥ १ ॥
आता सांडोनि भोजन । भिके जावें वेडेपण ॥ २ ॥
उसतिली वाट । मागें परतावें फुकट ॥ ३ ॥
तुका म्हणे वाणी । वेचों बैसोन ठाकणीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :–आइत्याची–कष्ट न करता, उसतिली–चालून आलेली, वेचों–खर्च करू

अर्थ :–कष्ट न करता चांगले पक्वान्नाने भरलेले ताट भुकेलेल्यापाशी येऊन मिळाले १ तर त्याचा त्याग करून भिक्षा मागणाऱ्यास वेडेपणा करतो असेच म्हणायला हवे २ जी वाट आधीच चालून झालेली आहे, ती पुन चालून जाण्यात फुकटचे श्रम नव्हेत काय ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, आम्ही आता या एका ठिकाणी बसून हरिचिंतनात आमची वाणी खर्च करू ४

१३५० धन्य शुद्ध जाती । घरीं लौकरी परती ॥ १ ॥
ऐकिलें तेंचि कानीं । होय परिपाक मनीं ॥ २ ॥
पळवळा पोटीं । सावधान हितासाठीं ॥ ३ ॥
तुका म्हणे भाव । त्याचा[2] तोचि जाणा देव ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– परती–वळणे, परतणे

अर्थ :–त्याचीच जात शुद्ध व धन्य समजावी कुणाची ? तर ज्याचे चित्त संसारामधून लौकर मुक्त होऊन श्रीहरीकडे वळते १ ईश्वरविषयक जो विचार कानांवर येतो त्याचा परिपाक त्याच्या मनात स्थिर होतो २ त्याच्या चित्तात श्रीहरीविषयी मोठाच पळवळा असून तो स्वहितासाठी सावध असतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा माणसाचा जो एकनिष्ठेचा भाव असतो तोच त्याचा देव समजावा ४

१३५१ जीवित्व तें किती । हेंचि धरिता वरें चित्तीं ॥ १ ॥
संत सुमनें उत्तरें । मृदु रसाळ मधुरें ॥ २ ॥
विसांवतां कानीं । परिपाक घडे मनीं ॥ ३ ॥
तुका म्हणे जोडी । हाय जतन रोकडी ॥ ४ ॥

---

१ वाम पंढरीचा २ ज्याचा

शब्दार्थ व टीपा :– सुमनें–फुले

अर्थ :–आयुष्य हे असे आहे तरी केवढे ? याचा बोध चित्तात नीटपणे धरावा. १ आणि संतांच्या विचारांची वचने हीच फुले समजून त्याना मृदु, रसाळ व मधुर समजावे २ ती जर आपल्या कानांत स्थिर झाली तर आपल्या मनावरही त्यांचा चांगला परिणाम होईल. ३ तुकाराम महाराज म्हणतात, हा जो रोकड लाभ होतो, तोच नीट जतन करून ठेवावा. ४

१३५२ अभिमानाची स्वामिनी शांति । महत्त्व घेती सकळ ॥ १ ॥
कळोनि ही[1] न कळे वर्म । तरि श्रम पावती ॥ २ ॥
सर्व सत्ता करितां धीर । वीर्या वीर आगळा ॥ ३ ॥
तुका म्हणे तिखट तिखें । मृदसखें आवडी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :–वीर्या–वीर पुरुषांत, तिखें–तीक्ष्णपण्यात.

अर्थ :–अभिमानादी इतर वृत्तींपेक्षा शांत वृत्ती हीच श्रेष्ठ असल्याने तिलाच महत्त्व प्राप्त होते. १ हे वर्म सर्वांना कळते, पण ते न कळल्यासारखे वागतात, म्हणून त्यांना फारच श्रम होतात. २ थोडा धीर धरताच परमार्थामधील सर्व सत्ता हाती येऊन तो वीर पुरुष थोर म्हणून नावाजला जाईल. ३ तुकाराम महाराज म्हणतात, शांत स्वभावाचे हे संत तीक्ष्णपणात फारच तिखट असले तरी ते मृदु मनाचे असल्याने माझे सखे आहेत. ४

१३५३ भोजन तें पाशांतीचें । निचें उंचें उसाळी ॥ १ ॥
जैशी कारंज्याची कळा । तो जिव्हाळा स्वहिता ॥ २ ॥
कल्पना ते देवाविण । न करी भिन्न इतरीं ॥ ३ ॥
तुका म्हणे पावे भूतीं । ते निश्चिती मापली ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :–उसाळी–गतीने, कळा–शोभा.

अर्थ :–भोजन करावयाचे असेल तर लहानमोठ्या गतीने एका शांतीचेच करावे. १ कारंज्यातून पाण्याच्या धारांची शोभा जशी दिसते तशाच प्रकारची जिव्हाळ्याची शोभा स्वहितासाठी असावी २ एका देवाखेरीज इतर वस्तूंची कल्पनाच कधी कुणी करू नये. ३ तुकाराम महाराज म्हणतात, सर्व भूतमात्रात जे शांतीचे दर्शन होत असते, ते मी अनुभव करून सांगितले. ४

१३५४ पोटापुरतें काम । परि अगत्य तो राम ॥ १ ॥
कारण तें हेंचि करीं । चित्तीं पांडुरंग धरीं ॥ २ ॥
प्रारब्धीं हेवा । जोडी देवाची ते सेवा ॥ ३ ॥
तुका म्हणे बळ । बुद्धि वेचूनि सकळ ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :–अगत्य–लोभ, हेवा–हाव.

अर्थ :–पोटापुरते काम करावे. परंतु लोभ असावा, तो श्रीरामाच्या चिंतनाचा व प्राप्तीचा. १ याच कारणासाठी, साध्यासाठी सर्व काही करीत असावे. चित्तामध्ये एका पांडुरंगासच दृढ धारण करून असावे २ प्रारब्धामधील हाव देवाची सेवा जोडण्यासंबंधीच असावी. ३ तुकाराम महाराज म्हणतात, सर्व बुद्धी खर्च करून, सर्व बळ खर्च करून अशा लाभाची प्राप्ती करून घ्यावी ४

---

[1] हे.

१३५५　वहुता जन्मा अंतीं । जोडी लागली[१] हे हातीं ॥ १ ॥
मनुष्यदेहा ऐसा ठाव । धरीं पांडुरंगीं भाव ॥ २ ॥
बहु केला फेरा । येथें सापडला थारा ॥ ३ ॥
तुका म्हणे जाणें । ऐसे भले[२] ते शाहाणे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा –जोडी–प्राप्ती, ठाव–ठिकाण, स्थान, फेर–खेपा

अर्थ –पुष्कळ जन्म घेतल्यानंतर शेवटी या मनुष्यजन्माची प्राप्ती हाताशी आली आहे १ या मनुष्याच्या देहाने जन्म घेण्यासाठी ठिकाण मिळाले, म्हणून या पांडुरंगावर दृढ विश्वास धरून ठेव २ आज पर्यंत अनेक जन्माच्या खेपा फार झाल्या पण आता मात्र या मनुष्यजन्माचा आधार सापडला आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, असे या नरदेहाचे दुर्लभत्व जाणतात तेच शहाणे होत ४

१३५६　रूप नांवे माया बोलावया ठाव । भागा आले भाव तयावरि ॥ १ ॥
सींव वाटे परी न खंडे पृथिवी । शाहाणे ते जीवीं समजती ॥ २ ॥
पोटा आले तिच्या लोळे मांडयांवरि । पारखी न करी खंतीं चित्तीं ॥ ३ ॥
तुका म्हणे भक्तीसाटीं हरिहर । अरूपीचे क्षरविभाग हें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा –सींव–सीमा, खंती–चिंता, अरूप–निर्गुण, निराकार, क्षर–सगुण स्वरूपात

अर्थ – या ईश्वराचे वर्णन रूप, नाव, माया इत्यादी शब्दांनी करता येण्यासारखे नाही हे शब्द केवळ बोलण्यासाठीच असतात पण हे आहेत म्हणून तरी भक्तलोकांना त्यांचा भाव व्यक्त करण्यास आधार झाला १ पृथ्वीवर कोणत्याही ठिकाणी एखाद्या गावाची शीव अथवा सीमा सांगितली तरी तेवढ्याने पृथ्वीचे काही खंडन होत नाही तिचा अखंडपणा भंगत नाही जे सर्व शहाणे जीव आहेत ते हे जाणतातच २ तिच्या पोटातून प्रसवले ते बाळ आपल्या आईच्या मांडीवर लोळणारच त्याच्याबद्दल जे विचारी व खरी परीक्षा करणारे असतात त्यांच्या मनात कधी चिंता उत्पन्न होत नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, लोकांना भक्ती करता यावी म्हणून निर्गुणनिराकार असे हे हरिहर या अशा सगुण स्वरूपात अवतीर्ण होतात ४

१३५८ आर्तभूताप्रति । उत्तम योजाव्या त्या शक्ति ॥ १ ॥
फळ आणि समाधान । तेथें उत्तम कारण ॥ २ ॥
अल्पें तो संतोषी । स्थळीं सापडे उदेसीं ॥ ३ ॥
सहज संगम । तुका म्हणे तो उत्तम ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा —आर्त—कष्टी, दुःखी

अर्थ —जे दुःखी, कष्टी आहेत, त्यांच्या दुःखनिवारणार्थ आपण आपल्या सर्व शक्ती खर्च कराव्यात १ त्यामुळे त्यांना त्यांचे उत्तम फळ व समाधान मिळेल हेच उत्तम असे कारण आहे २ काही थोडे दुःख मान्य करून स्वस्थानी बसेल यामुळे अन्य प्राण्यांनाही संतोषित होईल ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा रीतीने सहज असा उत्तम गोष्टीचा संगम यामुळे होईल ४

१३५५　बहुता जन्मां अंतीं । जोडी लागली[1] हे हातीं ॥ १ ॥
मनुष्यदेहा ऐसा ठाव । धरीं पांडुरंगीं भाव ॥ २ ॥
बहु केला फेरा । येथें सांपडला थारा ॥ ३ ॥
तुका म्हणे जाणें । एसी भले[2] ते शाहाणे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा –जोडी–प्राप्ती, ठाव–ठिकाण, स्थान, फेरे–फेरा

अर्थ –पुष्कळ जन्म घेतल्यानंतर शेवटी या मनुष्यजन्माची प्राप्ती हातांशी आली आहे १ या मनुष्याच्या देहात जन्म घेण्यासाठी ठिकाण मिळाले, म्हणून या पांडुरंगावर दृढ विश्वास धरून ठेव २ आज पर्यंत अनेक जन्मांच्या फेरा फार झाल्या पण आता मात्र या मनुष्यजन्माचा आधार सापडला आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, असे या नरदेहाचे दुर्लभत्व जाणतात तेच शहाणे होत ४

१३५६　रूप नांवें माया बोलावया ठाव । मागा आले भाव तयावरि ॥ १ ॥
सींव वाटे परी न खंडे पृथिवी । शाहाणे ते जीवीं समजती ॥ २ ॥
पोटा आलें तिच्या लाळे मायबापरि । पारखी न करी खंती चित्तीं ॥ ३ ॥
तुका म्हणे भक्तीसाटीं हरिहर । अक्षरीचे क्षरविभाग हे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा –सींव–सीमा खंती–चिंता, अक्षर–निर्गुण, निराकार, क्षर–सगुण स्वरूपात

अर्थ – या ईश्वराचे वर्णन रूप, नाव माया इत्यादी शब्दांनी करता येण्यासारखे नाही हे शब्द केवळ बोलण्यासाठीच असतात पण हे आहेत म्हणून तरी भक्तलोकांना स्वतःचा भाव व्यक्त करण्यास आधार मिळतो १ पृथ्वीवर कोणत्याही ठिकाणी एखाद्या गावाची शीव अथवा सीमा सांगितली तरी तेवढ्याने पृथ्वीचे काही खंडन होत नाही तिचा अखंडपणा भंगत नाही जे खरे शहाणे जीव आहेत ते हे जाणतातच २ तिच्या पोटातून प्रसवले ते बाळ आपल्या आईच्या मांडीवर लोळणारच त्याच्याबद्दल जे विचारी व खरी परीक्षा करणारे असतात त्यांच्या मनात कधी चिंता उत्पन्न होत नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात लोकांना भक्ती करता यावी म्हणून निर्गुणनिराकार असे हे हरिहर या अशा सगुण स्वरूपात अवतीर्ण होतात ४

१३५७　लेकराची आळी न पुरवी कैसी । काय तयापाशीं उणें जालें ॥ १ ॥
आम्हा लडिवाळां नाहीं तें प्रमाण । काहीं ब्रह्मज्ञान आत्मस्थिति ॥ २ ॥
वचनाचा घेईन अनुभव पदरीं । जें हें जनाचारीं मिरवलें ॥ ३ ॥
तुका म्हणे माझी भोळिवेची आटी । दावीन शेवटीं कौतुक हें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा –आळी–हट्ट आटी–खटपट

अर्थ –ही विठ्ठलमाऊली आपल्या बालकाचा हट्ट पुरवणार नाही असे कसे होईल ? तिच्याजवळ कशाचा कमतरता आहे ? १ ब्रह्मज्ञान आत्मस्थितीभाव यांसारख्या गोष्टी आम्हा लडिवाळ मुलांना मान्य नाहीत २ मी पतितांना जवळ करतो हे जे ईश्वराचे वचन सर्व लोकांत प्रसिध्द आहे, त्याचाच अनुभव मी घेईन ३ तुकाराम महाराज म्हणतात माझ्यासारख्या भोळ्याभाबड्याची ही खटपट आहे त्याच्या प्राप्तीचे मी शेवटी कौतुक दाखवीनच ४

---

१ लाधली, २ भल्ले

१३५८ आर्तभूतांप्रति । उत्तम योजाव्या त्या शक्ति ॥ १ ॥
फळ आणि समाधान । तेथें उत्तम कारण ॥ २ ॥
अल्पें तो संतोषी । स्थळीं सांपडे उदेसीं ॥ ३ ॥
सहज संगम । तुका म्हणे तो उत्तम ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :–आर्त–कष्टी, दुःखी

अर्थ :–जे दुःखी, कष्टी आहेत, त्यांच्या दुःखनिवारणार्थ आपण आपल्या सर्व शक्ती खर्च कराव्यात १ त्यामुळे त्यांना त्याचे उत्तम फळ व समाधान मिळेल. हेच उत्तम असे कार्य आहे २ काही एक इच्छा मनात धरुन स्वस्थानी बसलेला यामुळे अल्प प्राप्तीनेही संतोषित होईल ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा रीतीने सहज अशा उत्तम गोष्टीचा संगम यामुळे होईल. ४

१३५९ मुळाचिया मुळें । दुःखें वाढती सकळें ॥ १ ॥
ऐसा योगियाचा धर्म । नव्हे वाढवावा श्रम ॥ २ ॥
न कळे आवडी । कोण आहे' कैसी घडी ॥ ३ ॥
तुका म्हणे यीत । दुःख पावयावे चित्त ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :–यीत–व्यर्थ, विनाकारण

अर्थ –शरीरकष्टदायक अशा योगादी कारणांनी व कार्यांनी सर्वत्र दुःखच वाढत जाते १ असा हा त्रासदायक धर्म योगी लोकांचा कसला ? हा काही खरा धर्म नव्हे, विनाकारण श्रम मात्र त्यामुळे वाढतात २ आणि योगादी प्रक्रियामुळे रिध्दीसिध्दी प्राप्त होतील आणि त्यांच्या विषयी आपल्या मनात कधी कशी आवड निर्माण होईल ते काही सांगता यायचे नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा या कष्टदायक योगामुळे उगाच चित्तास दुःख का द्यावे ? ४

विवरण – ईश्वराच्या प्राप्तीसाठी सगुण-साकाराची उपासनाच श्रेष्ठ असा आग्रह सर्व साधुसंतांचा असतो अव्यक्ताची, निर्गुणाची, निराकाराची उपासना अतिशय कठिण, शरीराला कष्ट देणारी म्हणून तिचा उपदेश साधु-संत कधी करीत नाहीत. या अव्यक्ताच्या उपासनेत योगयागादीमधील प्रक्रियातून देहाला कष्ट पडतात. शिवाय यात धोके व प्रलोभनेही अधिक म्हणून योगी लोकांचा धर्म सर्वसामान्यांना उपयोगी नाही गीतेने हाच विचार बाराव्या अध्यायात स्पष्ट करून सांगताना म्हटले आहे, 'क्लेशोऽधिकतरस्तेषामव्यक्तासक्तचेतसाम् । अव्यक्ता हि गतिर्दुःखं देहवद्भिरवाप्यते–' म्हणजे अव्यक्ताची उपासना करणाऱ्यांना फार क्लेश पडतात, त्यांना मोठ्या कष्टाने मार्ग सापडतो मग अशा या अवघड व धोक्याच्या मार्गाला सर्व लोकांनी कशाला जावे ?

म्हणजे नित्य नव्याने अग्निप्रवेशच समजावा. येथे मरणाबरोबर नित्य नवी लढाई असते. हा योग म्हणजे कडत विष पिणे अथवा डोंगर गिळणे यासारखाच तापदायक असतो. म्हणून या कष्टदायक मार्गाने न जाता नामसंकीर्तनाचा, भक्तिसुखाचा सोपा मार्ग साधुसंतानी सांगितला आहे.

१३६० भाग्यवंतां हेंचि काम । मापी नाम वैखरी ॥ १ ॥
आनंदाची पुष्टि अंगीं । श्रोते संगी उद्धरती ॥ २ ॥
पिकविलें तया खाणें किती । पंगतीस सुकाळ ॥ ३ ॥
तुका करी प्रणिपात । दंडवत आचारियां[1] ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– मापी–मोजतो, मापतो, वैखरी–वाणीने.

अर्थ :– जे कुणी भाग्यवंत आहेत त्याना श्रीहरीच्या नामाचे माप आपल्या वाणीने करीत राहणे हेच एक काम असते. १ त्याच्या अंगी आनंदाची परिपुष्टी झालेली असून त्याच्या संगतीत श्रोत्यांचा उद्धार होत असतो. २ जो धान्य पिकवितो, तो स्वत. कितीसा खातो ? पण उतराईच्या व भक्ताच्या पंगतीस मात्र तो सुकाळ करून सोडतो. ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा प्रकारचे जे आचार्य आहेत, त्यांना माझा नेहमी नमस्कार असो. ४

१३६१ लटिकें तें रुचे । साच कोणां होन पचे ॥ १ ॥
ऐसा माजल्याचा गुण । भोगें कळों येईल सीण ॥ २ ॥
वाढवी ममता । नाही वरपडला तो दूतां ॥ ३ ॥
कांहीं न मनी हेकड । तुका उपदेश माकड ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– लटिकें–खोटे, साच–खरे, माजल्याचा–मस्ती अंगी असल्याचा, सीण–त्रास, दुःख, वरपडला–सापडला, हेकड–हट्टी.

अर्थ :– लोकांना खोटे तेच आवडते. खरे कुणालाही पसंत पडत नाही. १ खरे पाहता अंगात मस्ती असल्याचाच हा गुण म्हणायला हवा. पण त्यांना याबद्दल पुढे प्रारब्धाने दुःख भोगायला लागेल तेव्हा समजून येईल २ जोपर्यंत हे लोक यमदूतांच्या तावडीत सापडले नाहीत, तोपर्यंतच त्याचे ममत्व स्त्री–पुत्रादिकाच्या विषयी वाढलेले असते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा या माकडांना काही उपदेश केला तर ती काही मानीत नाहीत ४

१३६२ कौतुकाची सृष्टी । कौतुकेंचि केलें कष्टी ॥ १ ॥
मोडे तरी भले खेळ । फांके फांकिल्या कोल्हाळ ॥ २ ॥
जाणणियासाटीं । भय सामावलें पोटीं ॥ ३ ॥
तुका म्हणे चेता । होणें तें तूंच आइता ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – कोल्हाळ–गलबला, चेता–आत्मरूपाची जाणीव.

अर्थ – ही सर्व सृष्टी एका कौतुकापोटी निर्माण झाली आहे. याच कौतुकामुळे दुःखही उत्पन्न झाले. १ तेव्हा हा बाह्य स्वरूपाचा मिथ्या खेळ जितक्या लवकर मोडावा तितके चागले. अशा प्रकारे गलबला मोडल्यानेच तो नाहीसा होतो. २ सत्यज्ञानाच्या अभावामुळेच पोटात भय निर्माण होत असते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, आत्मस्वरूपाची जाणीव तू स्वतःच सिद्ध आहेस हे ओळखावे ४

---

[1] आचार्य

१३६३ भोवंडीसरिसें । अवघें भोंवतचि दिसे ॥ १ ॥
ठायीं राहिल्या निश्चळ । आहे अचळीं अचळ ॥ २ ॥
एक हाकेचा कपाटीं । तेथें आणीक नाद उठी ॥ ३ ॥
अभ्रें धांवे शशी । तुका म्हणे दुसरें भासी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- भोवंडीसारखे-फेऱ्या घातल्यामुळे, निश्चळ-स्थिर, अचलीं-स्थिर जागी, अचल-स्थिर वस्तू, स्थिर सृष्टी, कपाटीं-डोंगरकडयाशी, अभ्रें-ढगामुळे, शशी-चंद्र

अर्थ - एकसारख्या फेऱ्या घातल्याने भोवतीचे सर्व जग आपल्यासारखेच फिरत आहे असे वाटते. १ पण तेच जर आपण आपल्याच ठिकाणी स्थिर राहिली तर स्थिर सृष्टी स्थिर जागी कायमच आहे असे दिसेल. २ डोंगरकडयाशी उभे राहून आपण हाक मारली तर त्या हाकेचा प्रतिध्वनी तावडतोब मिळे. ३ आकाशातून ढग धावत असतात, त्यामुळे चंद्र धावतो आहे असे वाटते, पण तुकाराम महाराज म्हणतात, हे सर्व मूळ एक असून भासमान होणारी सृष्टी दुसरी असल्याप्रमाणे आहे. ४

१३६४ नव्हों[1] आम्ही आजिकालीची । काचीं कुचीं चाळवणी ॥ १ ॥
एके ठायीं मूळडाळ । ठावा सकळ आहेसी ॥ २ ॥
तुमचें आमचेंसे कांहीं । भिन्न नाहीं वांटलें ॥ ३ ॥
तुका म्हणे जेथें असे । तेथें दिसें तुमचासा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- अजिकालची-आजकालची, काची-काचाने, त्रासाने, कच्चेपणाने, कुची-वृथा, किंवा काचा कुची-काचकूच, चाळवणी, फसवणूक, मूळडाळ-मूळ स्थान

अर्थ .- देवा, आम्ही काही आजकालचे जन्मास आलेलो नव्होत आम्ही अनादी असून तुमच्याच बरोबरीचे आहोत. त्यामुळे कुठल्याही त्रासाने वा कच्चेपणाने आमची फसवणूक होणार नाही, काचकूच करून आम्ही फसले जाणार नाही १. देवा, तुमचे व आमचे मूळस्थान एकाच चित्तत्त्वात वा ब्रह्मस्वरूपात आहे. त्यामुळे मला तू पूर्णपणे ठाऊक आहेस २ तुमच्यात व आमच्यात तशी भिन्नता आहे असे वाटत नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, मी जेथे जेथे उभा आहे तेथे तेथे तुमच्याच स्वरूपाप्रमाणे भासत आहे ४

तुकोबाच्या अनुभूतीचे हे बोल अद्वैततत्त्वज्ञानाला धरूनच आहेत. एकच चैतन्यतत्त्व निरनिराळ्या नावांनी व रूपांनी व्यक्त झाले, आकाराला आले; एकाच बीजाचा विस्तार झाला, एकाच भागाराचे, सुवर्णाचे नाना अलंकार झाले म्हणून काय मूळ तत्त्व व त्याचा आविष्कार यांच्यात भिन्नता आली? वास्तविक एकाचे अनेक व्हावे ही त्याच मूलस्वरूपाची इच्छा 'बहुस्यां प्रजायेय' अशी बुद्धी त्याला झाल्यावर मग ही सर्व सृष्टी निर्माण झाली. परंतु हे नानात्व खरे नाही. 'नेह नानास्ति किंचन' या सृष्टीत कोणत्याही प्रकारचा अनेकपणा नाही जे काही आहे ते मुळातच सर्व 'एकमेवाद्वितीयम्' आहे, असाच उपनिषदांचा निष्कर्ष आहे. जीव हा माझाच 'अंश' आहे, मीच एका 'अंशाने हे सर्व जग व्यापून राहिलो आहे, अशी जी गीतेची तत्त्वप्रणाली तीच सुसंगत असून ज्ञानेश्वर, तुकारामांच्या अनुभूतींमधून प्रकट झाली आहे.

आपण आजकालचे नव्हेत, फार बाळापासून ईश्वराच्या सवयातील आहोत, याच एका सिद्धान्तातून दुसरा उपसिद्धान्त असा निघाला की, जर 'मूळडाळ' एक असेल तर मग आपल्यात व ईश्वरात फरक कसा? असा फरक उरूच नये. 'तुमचे आमचेसे काहीं। भिन्न नाहीं वाटलें' असे जे तुका या अभंगात सांगतात, त्याला आधार याच सिद्धान्ताचा. याच आधारावर उभे राहून तुकाराम महाराजांसारखे थोर भावद्भक्त कधी ईश्वराशी धिटाईने भांडायलाही प्रवृत्त होतात. या प्रेमकलहात आपण आहात म्हणून देवा तुम्हा आहात, लाडके आहे म्हणून परिसाची किंमत आहे, असे कधी ते सांगतात, तर कधी तुम्ही व आम्ही एकाच ठिकाणचे असताना आम्ही बद्ध, आम्ही पापी असा भेद देवा कसा रे झाला? असा अत्यंत मूलभूत प्रश्नही उपस्थित करतात. तुझे व आमचे मूळ स्थान एकच असल्याने आम्हास तू पूर्णपणे माहीत आहेस, तुझ्यात व आमच्यात भेद नाही, असेच म्हणून हे थोर भक्त थांबत नाहीत, तर कधी ते त्याला मोठ्या ममतेच्या व प्रेमाच्या पेचातही पकडतात. याच तुकोबांच्या एका थोर शिष्यिणीने, बहिणाबाईने श्रीविठ्ठलासच एकदा मोठ्या धिटाईने प्रश्न केला–

> तुम्ही आम्ही सुखें होता एके ठायीं। कोण्ते अन्यायीं सापडलों?
> तुम्याचि हितानें वाढला संसार। आम्ही का रे दूर अंतरलों?
> महत्त्वाचे असे केले आम्हा भक्त। म्हणसी आम्ही मुक्त, बद्ध तुम्ही॥
> बहिणी म्हणे नको आम्हापुढे शब्द। सांगतां हा वाद हारविसी॥

मारंभिला आहे. त्याला त्याचा लाभ होतो. आणि जो देहादी सुखांच्या व तृष्णेच्याच घोंपात घुटमळतो, तो त्रासतो, कष्टी होतो. ३ तुकाराम महाराज म्हणतात, काही कर्तव्यच उरले नाही, अशा भूमिकेवरच मोठा लाभ होतो. अशाच वृत्तीच्या जीवाना ब्रह्मपदाची प्राप्ती होण्यासारखी असते ४

१३६६ मरणा हाती सुटली काया । विचारें या निश्चयें ॥ १ ॥
नासोनियां गेली खंती । सहजस्थिति भोगाचे[1] ॥ २ ॥
न देखें सें जालें श्रम । आलें वर्म हाता हें ॥ ३ ॥
तुका म्हणे कैची कीव । कोठें जीव निराळा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– काया–शरीर, नासोनियां–नाश पावून, नष्ट होऊन, खंती–काळजी, चिंता, श्रम–दुःख वर्म–रहस्य, कीव–करुणा.

अर्थ .– माझे शरीर आता मरणाच्या हातून सुटले आहे. कारण या देहरूपापेक्षा मी सच्चिदानंद स्वरूपाने वेगळाच आहे असा माझा निश्चय झाला आहे. १ आता माझ्या सर्व चिंता नाश पावल्या आहेत. मी आता सहज-स्थितीचा भोग भोगीत आहे २ आता या ईश्वराचे, ब्रह्मपदाचे रहस्यच माझ्या हाती आलेले असल्यामुळे काही दु.ख वा त्रासच वाटेनासा झाला आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, आता मी या देवापाशी करुणा तरी कशी भाकावी ? आता हा जीव त्याच्याहून निराळा आहे तरी कुठे ? ४

१३६७ नव्हे ब्रह्मचर्य बाइलेच्या त्यागें । वैराग्य वाउगें देशत्यागें ॥ १ ॥
काम वाढे भय वासनेच्या द्वारें । सांडावें तें धीरें आचावाचें ॥ २ ॥
कांपवूनि टिरी शूरत्वाची मात । केलें वाताहात उचित काळें ॥ ३ ॥
तुका म्हणे करी जिव्हेसी विटाळ । लटिक्याची मळ स्तुति होतां ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा– वाउगें–व्यर्थ, फुकट, आचावाचे–बडबड, मात–गोष्ट, वाताहात–नाश.

अर्थ :– क्रोधाच्या अथवा भांडणाच्या भरात बायकोचा त्याग केला म्हणजे काही त्या योगाने ब्रह्मचर्याचे पालन होत नाही कुणावर तरी रागावून अथवा संतापून देशाचा त्याग केला, म्हणून काय वैराग्य प्राप्त होते. १ वासनांच्या पोटीच मनात काम, भय या वृत्ती वाढतात, म्हणून उगाच बडबड न करता वासनांचाच त्याग मोठ्या धैर्याने करावा. २ शूरत्वाची नुसती गोष्ट किंवा हकीगत ऐकतानाही टिरी कापते; मग प्रत्यक्ष शौर्य दाखविण्याचा प्रसंग आल्यास काय होईल ? अशी योग्य वेळ येते तेव्हा सर्व नाशच होतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, तेव्हा अंगी अधिकार नसताना वैराग्य, ब्रह्मचर्य, शूरत्व यांच्या गोष्टी करणाऱ्यांची जर कुणी स्तुती करू लागला तर त्याच्या जिभेस विटाळच होतो असे समजावे. ४

१३६८ नको सांडूं अन्न नको सेवूं वन । चिंतीं[2] नारायण सर्व भोगी[3] ॥ १ ॥
मातेचिये खांदी बाळ नेणे सीण । भावना त्या भिन्न मुंडाविया ॥ २ ॥
नको गुंपों भोगीं[4] नको पडों त्यागीं । लावूनि सरें[5] अंगी देवाचिया ॥ ३ ॥
तुका म्हणे नको पुसों वेळोवेळां । उपदेश वेगळा उरला नाही ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा .– सांडूं–टाकू, सेवूं–धारण करू नकोस, जाऊ नकोस, सीण–कष्ट, मुंडाविया–नाहीशा कराव्यात, गुंपो–गुतू नकोस, सरे–नाहीसे कर

---

१ भोगावे, २ चित्ती, ३ भागीं, ४ भार्गी, ५ सर्व.

अर्थ – तू अन्न टाकून उपवासासाठी खटपटीत पडू नकोस अथवा प्रपंच सोडून रानावनातही जाऊन राहू नकोस सर्व भोग घेणारा नारायण मात्र चित्तात सतत असू दे अथवा सर्व प्रकारच्या भोगांत नारायणाचे स्मरण असू दे १ एकदा आईच्या खांद्यावर बसल्यावर लहान मुलास कसला शीण ? आपण ईश्वराहून काही निराळे आहोत व त्याच्या प्राप्तीसाठी विलक्षण साधने करायला हवीत, अशा भावना नाहीशा करावयास हव्यात २ तू भोगातही पडू नकोस व त्यागातही पडू नकोस, सर्व भोग व त्याग त्या एक ईश्वराच्या अंगी लावून नाहीसे कर त्यालाच समर्पण करून मुक्त हो ३ तुकाराम महाराज म्हणतात, आता मला पुन पुन प्रश्न विचारू नकोस माझ्याजवळ याशिवाय दुसरा उपदेश तुम्हासा ी नाही ४

विवरण – या अतिशय साध्या पण महत्त्वाच्या अभंगात तुकाराम महाराजांनी सर्वसाधारण माणसाच्या दृष्टीने आपल्या भागवतधर्मीय मार्गाचे रहस्य स्पष्ट केले आहे ध्रुवाच्या मते ईश्वरप्राप्तीसाठी कुठे घरदार सोडून प्रत्येकाने रानावनात जायला नको यज्ञयाग, जपतपादी साधने करायला नकोत, उपासतापासासारखे उपाय व कर्मठ व्रतवैकल्य याचीही जरूरी नाही 'नलगे सायास जाणे वनांतरा । सुखें येतो घरा नारायण' असा त्यांचा उपदेश आहे अगदी सरळ सोपा व सर्वजनसुलभ असा हा भक्तिमार्गाचा राजरस्ता साधुसंतांनी तयार केलेला आहे. बाह्य खटपटीत न पडताच आपल्याच स्थानी स्वस्थचित्त होऊन प्रभूचे चिंतन करावे, त्याची मनापासून आळवणी करावी, हा एकमेव मार्ग संतांनी सुचविलेला आहे 'तरी आम्हांसी जया मार्गी । तैसाचि असे' असा त्यांचा आग्रह दिसतो आपल्या हृदयस्थ नारायणाला नित्य स्मरावे, आपली प्रत्येक हालचाल त्याच्याकडूनच होत आहे, अशी खात्री बाळगावी. मी-माझे असे न मानता सर्व त्याचेचकडून आहे अशी भावना दृढ व्हावी तर थोर महात्म्यांची वृत्ती खऱ्या अर्थाने अंगी बाणवेल ज्ञानेश्वरांनी स्पष्टपणे निर्वाळा दिला आहे की, 'आणि मी माझें ऐसी आठवण । विसरलें जयाचें अंतःकरण । पार्था तो संन्यासी जाण निरंतर ॥ जो मनें ऐसा जाहला । संगीं तोच सांडिला । म्हणोनि सुखें सुख पावला । अखंडित ॥ आतां गृहादिक आघवें । तें कांहीं नलगे त्यजावें । जें घेतें जाहलें स्वभावें । निःसंग म्हणवुनि ॥'

सारांश, आपल्या सर्व चित्तवृत्ती एकाच ईश्वराच्या ठिकाणी केंद्रित करणे, त्याच्यावर सर्व भार टाकणे हाच एक सोपा व खात्रीचा साधनमार्ग संतांनी सांगितला आहे नाना प्रकारची योगासने करून देहाला कष्ट देणे, यज्ञयागादी कर्मकांड करून इच्छित कामना तृप्त करणे, उपवासतापास, व्रतेवैकल्ये, देहदंडन, नवस, बाह्य जप, इतर काही अघोरी उपाय इत्यादी मार्गांनी जाणारे लोक तुकोबांच्या काळी होतेच या मार्गांचे माहात्म्य सांगून, त्याचे अवडंबर माजवून भोळ्या भाबड्या स्त्रीपुरुषांना फसविणारे होतेच त्यांचा तर तुकोबांनी अनेक वेळा परामर्श घेतला आहे पण त्यांचा मुख्य भर सर्वसामान्य प्रापंचिकासही सहजसुलभ व सरळ भक्तिमार्ग दाखविण्यावरच होता एरव्ही भक्ती ही 'सुळावरची पोळी' वाटत असली तरी संतप्रणीत मार्गाने ती सुलभ होते, अंगवळणी पडते

या भक्तीत सर्व ईश्वरालाच अर्पण करायचे असते आईच्या खांद्यावर एकदा आपण बसलो की आपणास वृथा शीण करण्याचे काय कारण ? भोगही नको आणि त्यागही नको 'लावुनिया सरें अंगीं देवाचिया' सर्वसाक्षी असणाऱ्या देवावर सर्व भार टाकायचा म्हणजे तरी काय करायचे ? योगाभ्यास होत नाही, चंचल मन तर स्वाधीन नाही, ते ईश्वराकडे कसे लावायचे ? यासंबंधी श्रीज्ञानदेवांनी अगदी सोप्या भाषेत यथार्थपणे सुलभ व सुस्पष्ट असा उपाय सुचविला आहे, तो या अभंगास तंतोतंत जुळणारा आहे बाराव्या अध्यायात त्यांनी म्हटले आहे–

'का अभ्यासाही लागीं । कसु नाहीं तुझिया आंगीं । तरी आहासी जया मार्गीं । तैसाचि असे ॥ इंद्रियें न कोंडीं । भोगातें न तोडीं । अभिमानु न सांडीं । स्वजातीचा ॥ कुळधर्मु चाळीं । विधिनिषेध पाळीं । मग सुखें तुज सरळी । दिधली आहे ॥ परि मनें वाचा देहें । जैसा जो व्यापारु होय । तो मी करितु आहें । ऐसें न म्हणे ॥ करणें कां न करणें । हें आघवें तोचि जाणे । विश्व चळतसे जेणें । परमात्मेनि ॥ उणयापुरेयाचें कांहीं । उरों नेदीं आपुलिया ठायीं । स्वजाती करूनि घेईं । जीवित्व आपुलें ॥ माळियें जेउतें नेलें । तेउतें निवांतचि गेलें । तया पाणिया ऐसें केलें । होआवें गा ॥ एऱ्हवीं तरी सुभटा । उजू कां अव्हांटा । रथु कांहीं खटपटा । करितु असे ? ॥ म्हणोनि प्रवृत्ति आणि निवृत्ति ।

इये थोडीं नये मती । अखंड चित्तवृत्ती । आठवीं मातें ॥ आणि जें जें कर्म निपजे । तें थोडें बहु न म्हणिजे । निवांतचि अर्पिजे । माझ्या ठायीं ॥ ऐसिया मद्भावना । तनुत्यागीं अर्जुना । तूं सायुज्यसदना । मातिया येसी ॥ ' असा हा सरळ, सोपा व सुलभ भक्तिमार्गाचा विचार. ' तनुत्यागानंतर सायुज्यसदन ' हेही तुकोबाना फारच दूरचे वाटले. त्यानी ' याचि देहीं याचि डोळां ' मुक्तीचा सोहळा भोगिला त्याच्या थोर अनुभूतीनंतरचा सर्वांना मार्गदर्शक असा हा एक महत्त्वाचा अभंग आहे.

१३६९ अवघी मिथ्या आटी । राम नाहीं तंव कंठीं ॥ १ ॥
सावधान सावधान । उगवीं संकल्पीं हें मन ॥ २ ॥
सांडिलें तें मांडे । आग्रह उरल्या काळें दंडे ॥ ३ ॥
तुका म्हणे आलें भागा । वेंचूनि चिंतीं पांडुरंगा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- आटी-खटपट, उगवीं-सुटका करून घे, सांडिलें-सोडले, मांडे-स्वीकार केल्यास.

अर्थ :- जर मुखामध्ये रामाचे नाव नसेल तर मग सर्व इतर खटपट व्यर्थ आहे, खोटीच आहे. १ यासाठी विविध प्रकारच्या ऐहिक संकल्पांतून मनाची सुटका करून घ्यावी आणि नीट सावध व्हावे. २ ज्याचा एकदा त्याग केला आहे, त्याचा पुन: स्वीकार करणे बरोबर होणार नाही. असा स्वीकाराचा आग्रह झाल्यास काळ थोर शिक्षा करील. ३ म्हणून तुकाराम महाराज म्हणतात, जे जे भोग तुझ्या वाट्याला येतील ते सर्व त्या पांडुरंगाला अर्पण करून त्याचेच एक चिंतन तू करावेस. ४

१३७० न संगावें वर्म । जनीं असों द्यावा भ्रम ॥ १ ॥
उगीच लागतील पाठीं । होती रितींच हिपुटीं ॥ २ ॥
' सिकविल्या गोष्टी । शिकोन न धरिती पोटीं ॥ ३ ॥
तुका म्हणे सीण । होइल अनभवाविण ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- सगावें-सांगावे, स्पष्ट करावे, वर्म-रहस्य, हिंपुटी-कष्टी, सीण-श्रम.

अर्थ – जगाला खरे रहस्य कधी एकदम सांगू नये. काही थोडा भ्रम असू द्यावा. १ नाही तर उगाच लोक पाठीशी लागतात. मनोभावे कुठलाही विचार न करता विनाकारण ते कष्टी होतील. २ त्यांना काही गोष्टी शिकविण्यात येतात, पण त्या ते मनात नीट धारण करीत नाहीत ३ तुकाराम महाराज म्हणतात, त्यामुळे अनुभव दृढ होत नाही; व शीण मात्र वाढतो. त्रासच पदरी येतो ४

१३७१ जातिविजातीची व्हावयासि भेटी । संकल्प तो पोटीं वाहों नये ॥ १ ॥
होणार तें घडो होणाराच्या गुणें । होइल नारायणें निर्मिलें तें ॥ २ ॥
व्याघ्राचिये भुके वधावी ते गाय । याचे नांव काय पुण्य असे ॥ ३ ॥
तुका म्हणे न करी विचार पुरता । गरज्याची माता पिता खर ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- जातिविजातीची-एका जातीची दुसऱ्या भिन्न जातीशी, संकल्प-निश्चय, खर-गाढव

अर्थ :- एखाद्या जातीची दुसऱ्यास अगदी भिन्न जातीशी भेट व्हावी म्हणून आपणच काही निश्चय करण्याची जरूरी नाही १ जे काही घडणारे आहे ते ज्याच्या त्याच्या गुणांमुळे, स्वभावधर्मामुळेच घडते जे नारायणाने निर्मिले असेल तसेच घडून येईल. २ वाघाला भूक लागली म्हणून या जातिपुढे विजातीय गाय बांधून ठेवणे याला आपण कधी पुण्य म्हणू काय ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, गरजू मनुष्यही असा या गोष्टीचा विचारच करीत नसेल तर त्याचे आईबाप गाढवच समजायला हवेत ४

अर्थ :– तू अन्न टाकून उपवासासाठी खटपटीत पडू नकोस अथवा प्रपंच सोडून रानावनातही जाऊन राहू नकोस. सर्व भोग घेणारा नारायण मात्र चित्तात सतत असू दे अथवा सर्व प्रकारच्या भोगांत नारायणाचे स्मरण असू दे १ एकदा आईच्या खांद्यावर बसल्यावर लहान मुलास कसला शीण ? आपण ईश्वराहून काही निराळे आहोत व त्याच्या प्राप्तीसाठी विलक्षण साधने करायला हवीत, अशा भावना नाहीशा करावयास हव्यात २ तू भोगातही पडू नकोस व त्यागातही पडू नकोस, सर्व भोग व त्याग त्या एक ईश्वराच्या अंगी लावून नाहीसे कर त्यालाच समर्पण करून मुक्त हो ३ तुकाराम महाराज म्हणतात, आता मला पुन पुन प्रश्न विचारू नकोस माझ्याजवळ याशिवाय दुसरा उपदेश तुझ्यासाठी नाही ४

विवरण – या अतिशय साध्या पण महत्त्वाच्या अभंगात तुकाराम महाराजांनी सर्वसाधारण माणसाच्या दृष्टीने आपल्या भागवतधर्मीय मार्गाचे रहस्य स्पष्ट केले आहे. युवाच्या मन ईश्वरप्राप्तीसाठी कुठे घरदार सोडून प्रत्येकाने रानावनात जायला नको यज्ञयाग, जपतपादी साधने करायला नकोत, उपासतापासासारखे उपाय व कर्मठ व्रतवैकल्य याचीही जरूरी नाही 'नलगे सायास जाणे वनांतरा । सुखें येतो घरा नारायण ' असा त्यांचा उपदेश आहे अगदी सरळ सोपा व सर्वजनसुलभ असा हा भक्तिमार्गाचा राजरस्ता साधुसंतांनी तयार केलेला आहे. बाह्य खटपटीत न पडताच आपल्याच स्थानी स्वस्थचित्त होऊन प्रभूचे चिंतन करावे, त्याची मनापासून आळवणी करावी, हा एवमेव मार्ग संतांनी सुचविलेला आहे ' तरी आम्हांसी जया भर्गी । तैसाचि असे ' असा त्यांचा आग्रह दिसतो आपल्या हृदयस्थ नारायणाला नित्य स्मरावे, आपली प्रत्येक हालचाल त्याच्याकडूनच होत आहे, अशी खात्री बाळगावी, मी-माझे असे न मानता सर्व त्याचेचकडून आहे अशी भावना दृढ व्हावी तर भार संन्याशाची वृत्ती म्हणजे अर्थाने अशी वाणवेल ज्ञानेश्वरांनी स्पष्टपणे निर्वाळा दिला आहे की, ' आणि मी माझें ऐसी आठवण । विसरले जयाचे अंतःकरण । पार्था तो संन्यासी जाण निरंतर ॥ जो मनें ऐसा जाहला । संगीं तोच सांडिला । म्हणोनि सुखें सुख पावला । अखंडित ॥ आता गृहादिक आघवें । तें काहीं नलगे त्यजावें । जें घेते जाहलें स्वभावें । निःसंगु म्हणवूनि ॥ '

साराश, आपल्या सव चित्तवृत्ती एकाच ईश्वराच्या ठिकाणी केंद्रित करणे, त्याच्यावर सर्व भार टाकणे हाच एक सोपा व खात्रीचा साधनमार्ग संतांनी सांगितला आहे नाना प्रकारची योगासने करून देहाला कष्ट देणे, यज्ञयागादी कर्मकांड करून इच्छित कामना तृप्त करणे, उपवासतापास, व्रतवैकल्ये, दहदंडन, नवस, बाह्य तप, इतर काही अघोरी उपाय इत्यादी मार्गांनी जाणारे लोक तुकोबाच्या काळी होतेच या मार्गांचे माहात्म्य सांगून, त्यांचे अवडंबर माजवून भोळ्या भाबड्या स्त्रीपुरुषांना फसविणारे होतेच त्यांचा तर तुकाबांनी अनेक वेळा परामर्श घेतला आहे पण त्यांचा मुख्य भर सर्वसामान्य प्रापंचिकासही सहजसुलभ व सरळ भक्तिमार्ग दाखविण्यावरच होता एरव्ही भक्ती ही ' सुळावरची पोळी ' वाटत असली तरी संतप्रणीत मार्गाने ती सुलभ होते, अंगवळणी पडते

या भक्तीत सर्व ईश्वरालाच अर्पण करायचे असते आईच्या खांद्यावर एकदा आपण बसल्यावर आपणास वृथा शीण करण्याचे काय कारण ? भोगही नको आणि त्यागही नको ' लावूनिया सरें अंगीं देवाचिया ' सर्वसाक्षी असणाऱ्या देवावर सर्व भार टाकायचा म्हणजे तरी काय करायचे ? यागास्याम होत नाही, चंचल मन तर स्वाधीन नाही, तर ईश्वराकडे कसे लावायचे ? यासंबंधी श्रीज्ञानदेवांनी अगदी साध्या भाषेत यथायथपणे सुलभ व सुस्पष्ट असा उपाय सुचविला आहे, तो या अभंगास तंतोतंत जुळणारा आहे बाराव्या अध्यायात त्यांनी म्हटले आहे–

' ना अभ्यासाही लागीं । कमु नाहीं तुझिया आंगीं । तरी आहासी जया भर्गी । तैसाचि असे ॥ इंद्रियें न कोंडीं । भोगातें न तोडीं । अभिमानु न सडीं । स्वजातीचा ॥ कुळधर्मु चाळीं । विधिनिषेध पाळीं । मग सुखें तुज सरळी । दिधली आहे ॥ परि मनें वाचा देहें । जैसा जो व्यापारु होये । तो मी करितु आहे । ऐसें न म्हणे ॥ करणें कां न करणें । हें आघवें तोचि जाणे । विश्व चळतसे जेणें । परमात्मेनि ॥ उणयापुरेयाचें काहीं । उरों नेदीं आपुलिया ठायीं । स्वजाती करूनि घेईं । जीवित्व आपुलें ॥ माळियें जेउतें नेलें । तेउतें निवांतचि गेलें । तया पाणिया ऐसें केलें । होआवें गा ॥ एऱ्हवीं तरी सुभटा । उजू का अव्हाटा । रथु काहीं खटपटा । करितु असे ? ॥ म्हणोनि प्रवृत्ति आणि निवृत्ति ।

इये दोन्हीं नये मती । अखंड चित्तवृत्ती । आठवीं मातें ॥ आणि जें जें कर्म निपजे । तें थोडें बहु न म्हणिजे । निवांतचि अर्पिजे । माझ्या ठायीं ॥ ऐसिया मद्भावना । तनुत्यागीं अर्जुना । तूं सायुज्यसदना । माझिया येसी ॥ ' असा हा सरळ, सोपा व सुलभ भक्तिमार्गाचा विचार. ' तनुत्यागानंतर सायुज्यसदन ' हेही तुकोबाना फारच दूरचे वाटले. त्यांनी ' याचि देहीं याचि डोळां ' मुक्तीचा सोहळा भोगिला त्यांच्या थोर अनुभूतीनंतरचा सर्वांना मार्गदर्शक असा हा एक महत्त्वाचा अभंग आहे.

१३६९ अवघी मिथ्या आटी । राम नाहीं तंव कंठीं ॥ १ ॥
सावधान सावधान । उगवीं संकल्पीं हें मन ॥ २ ॥
सांडिलें तें मांडे । आग्रह उरल्या काळें दंडे ॥ ३ ॥
तुका म्हणे आलें भागा । देउनि चित्तीं पांडुरंगा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– आटी–खटपट, उगवीं–सुटका करून घे, सांडिलें–सोडले, मांडे–स्वीकार केल्यास

अर्थ :– जर मुखामध्ये रामाचे नाव नसेल तर मग सर्व इतर खटपट व्यर्थ आहे, खोटीच आहे. १ यासाठी विविध प्रकारच्या ऐहिक संकल्पांतून मनाची सुटका करून घ्यावी आणि नीट सावध व्हावे. २ ज्याचा एकदा त्याग केला आहे, त्याचा पुन स्वीकार करणे बरोबर होणार नाही. असा स्वीकाराचा आग्रह झाल्यास काळ थोर शिक्षा करील. ३ म्हणून तुकाराम महाराज म्हणतात, जे जे भोग तुझ्या वाट्याला येतील ते सर्व त्या पांडुरंगाला अर्पण करून त्याचेच एक चिंतन तू करावेस ४

१३७० न संगावें वर्म । जनीं असों द्यावा भ्रम ॥ १ ॥
उगीच लागतील पाठीं । होती रितींच हिंपुटीं ॥ २ ॥
सिकविल्या गोष्टी । शिकोन न धरिती पोटीं ॥ ३ ॥
तुका म्हणे सीण । होईल अनभवाविण ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– सगावें–सागावे, स्पष्ट करावे, वर्म–रहस्य, हिंपुटी–कष्टी, सीण–त्रास.

अर्थ :– जगाला खरे रहस्य कधी एकदम सांगू नये. काही थोडा भ्रम असू द्यावा. १ नाही तर उगाच लोक पाठीशी लागतात. मनोभावे कुठलाही विचार न करता विनाकारण ते कष्टी होतील. २ त्यांना काही गोष्टी शिकविण्यात येतात, पण त्या ते मनात नीट धारण करीत नाहीत ३ तुकाराम महाराज म्हणतात, त्यामुळे अनुभव दृढ होत नाही; व शीण मात्र वाढतो त्रासच पदरी येतो ४

१३७१ जातिविजातीची व्हावयासि भेटी । संकल्प तो पोटीं वाहों नये ॥ १ ॥
होणार तें घडो होणाराच्या गुणें । होईल नारायणें निर्मिलें तें ॥ २ ॥
व्याघ्राचिये भुके वधावी ते गाय । याचें नांव काय पुण्य असे ॥ ३ ॥
तुका म्हणे न करी विचार पुरता । गरज्याची माता पिता खर ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– जातिविजातीची–एका जातीची दुसऱ्या भिन्न जातीशी, संकल्प–निश्चय, खर–गाढव

अर्थ :– एखाद्या जातीची दुसऱ्यास अगदी भिन्न जातीशी भेट व्हावी म्हणून आपणच काही निश्चय करण्याची जरूरी नाही १ जे काही घडणारे आहे ते ज्याच्या त्याच्या गुणांमुळे, स्वभावधर्मामुळेच घडते. जे नारायणाने निर्मिले असेल तसेच घडून येईल २ वाघाला भूक लागली म्हणून या जातिपुढे विजातीय गाय बांधून ठेवणे याला आपण कधी पुण्य म्हणू काय ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, गरजू मनुष्यही अशा या गोष्टींचा विचारच करीत नसेल तर त्याचे आईबाप गाढवच समजायला हवेत ४

१३७२ शाहाणियां पुरे एकचि वचन। विशारतो[1] खुण तेचि त्यासी ॥ १ ॥
उपदेश असे बहुताकारणें। घेतला तो मनें पाहिजे हा ॥ २ ॥
फासावेना तरि दुःख घेतें थाव। मग होतो जीव कासावीस ॥ ३ ॥
तुका म्हणे नको राग धरूं झोडा। नुघडिता पीडा होईल डोळे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – विशारती–इशारत, फासावेना–कापून न काढले तर, झोडा–दांडग्या, नुघडिता–उघडल नाहीस तर

अर्थ –जो मनुष्य शहाणा आहे त्याला एका शब्दाचाही उपदेश पुरतो नुसती इशारत अथवा खूण केली तरी त्याला सर्व समजते १ साधुसंत हे पुष्कळाना उपदेश करतात पण तो नीट मन लावून ग्रहण केला पाहिजे ना २ एखाद्याच्या पायास गळू झाले असेल तर ते कापून काढले पाहिजे, नाहीतर ते वाढून जास्तच दुःखदायक होईल, मग जीव अधिकच कासावीस होईल ३ तुकाराम महाराज म्हणतात, अरे दांडग्या माणसा, उगाच माझ्या उपदेशांचा राग मनात धरू नकोस तू जर नीट डोळे उघडून सावध होणार नाहीस तर यमापासून तुला त्रास मात्र होईल ४

१३७३ अभिनव सुख तरि या विचारें। विचारावे बरें संतजनीं ॥ १ ॥
रूपाच्या आठवे दोन्ही ही आपण। वियोग तो क्षण होत नाहीं ॥ २ ॥
पूजा तरि चित्तें कल्पा[2] तें ब्रह्मांड। आहाच तो खंड एकदेसी ॥ ३ ॥
तुका म्हणे माझा अनुभव यापरि। डोई पायावरि ठेवीतसे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – कल्पा–मानावे, कल्पान, आहाच–उगाच, व्यर्थ

अर्थ – अभिनव अशा प्रकारचे सुख असाच म्हणजे पुढे सांगितलेल्या विचारानेच प्राप्त होईल याचा विचार संतजनानी करावा १ त्या ईश्वराच्या वास्तविक स्वरूपाचा आपण एकदा आठव करू लागलो की आपणही त्याच्याच स्वरूपाचे बनून जातो मग त्याच्यात व आपल्यात एका क्षणाचाही वियोग उरत नाही २ त्याची खरी पूजा हीच की, आपण आपल्या चित्तापुढे त्याचे विश्वरूप, ब्रह्मांडस्वरूप दर्शन आणावे एकदेशीय पूजा व्यर्थच समजायला हवी ३ तुकाराम महाराज म्हणतात, असाच माझा अनुभव असल्याने मी त्या विश्वव्यापी विठ्ठलाच्या पायावर मस्तक ठेवून नम्र होतो ४

१३७४ नटनाट्य तुम्ही केले याच साटीं। कवतुकें दृष्टी निववावी ॥ १ ॥
नाहीं तरि काय कळलेचि आहे। वाघ आणि गाय लांकडाची ॥ २ ॥
अभेदचि असे मांडियेलें खेळा। केल्या दीपकळा बहुएकी ॥ ३ ॥
तुका म्हणे रूप नाहीं दर्पणात। संतोषाची मात दुसरें तें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – नटनाट्य–जग व्यक्त करण्याचे नाटक, एकाचे अनेक होण्याचे कौतुक, दीपकला–दिव्याच्या ज्योती, दर्पणात–आरशामध्ये, मात–गोष्ट

अर्थ – तुमची स्वतःची दृष्टी संतुष्ट व्हावी म्हणून देवा, तुम्ही व्यक्त होण्याचे, जगतरूपाने प्रकट होण्याच्या नाटकाचे कौतुक केले १ नाही तर वाघ आणि गाय ही वरवर पाहाता भिन्न दिसत असली तरी त्याचे मूळचे काष्ठमय शरीर एकच आहे हे समजण्यासारखे आहे २ परंतु तुमच्या सुखासाठीच देवा, तुम्ही व्यक्त झाला आहात एका दिव्यापासून अनेक दिवे अथवा अनेक दिव्याच्या ज्योती प्रज्वलित व्हाव्यात, त्याप्रमाणे तुम्ही आपल्या अभेद रूपाचाच हा जगद्रूपी खेळ व पसारा मांडला आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, आपले खरे रूप दर्पणात नसते हे खरे, पण त्यामुळ आपलीच प्रचीती दुजेपणाने आपणास आली व त्यामुळे संतोष झाला हेही खरे ४

१ इशारती, २ कल्प

विवरण:–अव्यक्त असणारे परब्रह्म व्यक्त झाले, स्वत:च्या सुखासाठी अनेकविध रूपानी नटले तरी त्याचे एकत्व अथवा अभेदत्व कधी सपत नाही. या अभेदाच्या स्वरूपातच दोनपणाची मौज अनुभवणे, हे सगुण भक्तीचे रहस्य आहे. तत्त्वज्ञानाच्या बैठकीवर बोधासाठी निर्गुणनिराकाराचा विचार हाच खरा, पण बोधासाठी, अरूपाच्या प्रचीतीसाठी, प्रचीतीच्या सुखासाठी दुजेपणा, सगुणपणा अत्यावश्यक आहे. वाघ व गाय ही भिन्न रूपे एकाच तत्त्वाची आहेत, हे बुध्दीला समजले तरी प्रचीती थोडी वेगळीच असते. अशा विविधतेनेही नटलेल्या जगाची शोभा आहेच की! दीपतत्त्व एकच, पण एकीपासून अनेक ज्योती प्रज्वलित झाल्या की शोभा वाढते. आरशामधील रूप खरे नव्हे हे खरे, पण स्वत:ची प्रचीती, स्वत:चा अनुभव त्यामुळे आला हेही खरे. तेव्हा स्वसुखाची प्रचीती जेणेकरून येते, त्या दुजेपणाचे, द्वैताचे, सगुणाचे महत्त्व संत नेहमी सागत असतात.

केवळ अरूपाच्या, निराकाराच्या, अद्वैताच्या रूपाचा विचार पुरा पडत नाही भोगाशिवाय, प्रचीतीशिवाय खरे सुख नाही. याच हेतूने तो निराकार परमेश्वरही चार भुजानी मंडित होऊन भक्ताना कवळण्यासाठी उत्सुक बनतो.

स्वत:चीच आवड आपल्या भक्तरूपाने उभी करून तो नटनाटय उभे करीत असतो. दुजेपणातील हे सुख साधु-संताच्या वचनातून व अनुभवातून स्पष्ट झालेले असते. तत्त्वज्ञानाच्या दृष्टीने अद्वैत श्रेष्ठ, पण भक्तीसाठी द्वैताची आवश्यकता. तत्त्वज्ञानाच्या दृष्टीने निर्गुण, निराकार श्रेष्ठ, पण भक्तीसाठी सगुणाची आवश्यकता 'अहं ब्रह्मास्मि' असे जाणले तो कुणाची भक्ती करणार? आणि 'अहम्,' 'ब्रह्म', 'अस्मि' या तीन शब्दांच्या उच्चारातच द्वैताची भावना आहे. मी ब्रह्मच आहे, या शब्दातील मी वेगळा म्हणूनच त्याने ब्रह्माला जाणले ना? आणि हे जे जाणले ते व्यक्त होण्यासाठी पुनः सगुणाचाच आधार घ्यावा लागतो. म्हणून केवळ 'अहं ब्रह्म' म्हणून भागणार नाही. तुकाराममहाराजानी एका अभंगात म्हटले आहे 'अहं म्हणे ब्रह्म । तेणे भक्तीचें तें वर्म' ते समजण्यासाठी अद्वैतावरील द्वैताची अनुभूती हवी. खेळ अथवा नाटक अभेदाचेच आहे; पण त्याची शोभा त्याच्या अनेकत्वामुळे आहे. वीजाशी त्याची प्रचीती त्याच्या सगुणसाकारातील फुलोऱ्यामुळे आली. म्हणूनच तुकाराममहाराजासारखे थोर भगवद्भक्त अद्वैतापेक्षा, निराकारापेक्षा, ब्रह्मभावापेक्षा, मुक्तीपेक्षा सगुणाची, भक्तीची इच्छा धरतात. 'अद्वैतीं तो नाहीं माझें समाधान,' 'देवभक्तपण सुखाचा सोहळा,' 'नको ब्रह्मज्ञान आत्मस्थिती भाव । मी भक्त तूं देव ऐसे करी,' 'काय सायुज्यता मुक्तीसवें चाड । देवभक्त गोड भक्त तेथें नाही' यासारख्या ओळींमधून संताच्या मनाची लालसा ध्यानात येण्यासारखी आहे. सगुण व निर्गुण, व्यक्त व अव्यक्त, साकार व निराकार हे वस्तुत: एक हे बुद्धिगम्य असले तरी सगुणामुळे निर्गुणाला शोभा, व्यक्तामुळे अव्यक्ताची सार्थकता, साकारामुळे निराकाराची प्रतिष्ठा हेही खरेच आहे.

१३७५ रवीचा प्रकाश । तोचि निशी घडे नाश ।
जाल्या बहुवस । तरि त्या काय दीपिका ॥ १ ॥
आतां हाचि वसो जीवीं । माझे अंतरीं गोसावी ।
होऊं येतो ठावीं । काय धर्म याच्यानें ॥ २ ॥
सर्वे असतां धणी । आड येऊं न सके कोणी ।
न लगे विनवणी । पृथकाची करावी ॥ ३ ॥
जन्माचिया गति । येणें अवघ्या खुंटती ।
कारण ते प्रीति । तुका म्हणे जवळी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– निशी–रात्र, बहुवस–पुष्कळ, गोसावी–ईश्वर, धणी–स्वामी, राजा, पृथकाची–इतराची

अर्थ :– एकदा सूर्याचा प्रकाश पडल्याबरोबर रात्रीच्या अंधाराचा नाश होतो. अशी अवस्था घडली पुष्कळ दिवे जरी लावले तरी कधी निर्माण होईल का? १ म्हणून सर्वांत श्रेष्ठ व प्रभावी असणारा हा ईश्वरच माझ्या चित्तामध्ये निवास करो. याच्या निवासामुळे या मार्गामधील अनेक रहस्ये माझ्या ध्यानात येतील. २ एकदा राजा

अथवा स्वामी बरोबर असल्यावर कोणीही आपल्या आड येणार नाहीत; अथवा इतरांची कुणाची विनवणीही मग करावी लागणार नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, मग जन्ममृत्यूपासूनच्या बंधनांवरही मात होतो. कारण या ईश्वराची प्रीती असाधारणच असते ४

१३७६ ऐसे सांडुनियां धुरे । विदिलवाणी दिसां कां रे ।
कामें उर भरे । हातीं नुरे मृत्तिका ॥ १ ॥
उदार हा जगदानी । पांडुरंग अभिमानी ।
तुळसीदळ पाणी । चिंतनाचा भुकेला ॥ २ ॥
न लगे पुसावी चाकरी । कोणी वकील ये घरीं ।
त्याचा तो चाकरी । पारपत्य सकळ ॥ ३ ॥
नाहीं आडकाठी । तुका म्हणे जातां भेटी ।
न बोलतां मिठी । उगीच पायीं घालावी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– धुरे–प्रमुख श्रेष्ठ, कामें–कामनेने, नुरे–उरणार नाही, जगदानी–जगाला हवे ते दान देणारा हा विठ्ठल, चिंतनाचा–नामस्मरणाचा, वकील–मध्यस्थ

अर्थ –अशा या श्रेष्ठ व प्रमुख देवास सोडून तुम्ही असे केविलवाणे का दिसता ? अनेक प्रकारच्या इच्छांनी, वासनांनी हृदय भरून गेले की मग अखेर हातात माती देखील राहणार नाही. १ सर्व जगास इच्छिलेल्या गोष्टी देणारा हा गोविंद, हा पांडुरंग शरण आलेल्यांविषयी पूर्ण अभिमानी असतो त्याला फक्त तुळशीदळ व पाणी अर्पण करून नुसते त्याचे चिंतन केले तरी चालते याचाच तो भुकेलेला आहे २ या देवाची तुम्ही सेवाचाकरी किती केली आहे ? असे विचारण्यासाठी कुणी मध्यस्थ तुमच्या घरी येणार नाही त्याचा तोच सर्वांचे दुःख निवारण करीत असतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, या देवाच्या भेटीला जाताना कसलीही आडकाठी नसते काही एक न बोलता मुकाटपणे त्याच्या पायाशी मिठी घालावी हे बरे ४

विवरण :–या एका सुंदर व अर्थघन अशा अभंगात तुकारामबुवा भक्तीची सुलभता स्पष्ट करून सांगत आहेत इतर महत्तर व कष्टदायक अशा मार्गांनी जाण्यापेक्षा या ईश्वरास प्राप्त करून घेण्यासाठी नामस्मरणाचा, चिंतनाचा, त्याच्या पायाशी मिठी घालण्याचा मार्ग लोकांनी स्वीकारावा असे त्यांनी म्हटले आहे या मार्गाने गेल्यास ईश्वराच्या प्राप्तीसाठी फार मोठ्या देणगीची, त्यागाची, नवसाची जरूरी नाही केवळ अंतःकरण त्याच्या पायी जडवावे, भक्तिभावाने त्याला, 'तुळशीदळ पाणी' अर्पण करणे की भागते पत्रं पुष्पं फलं तोयं यो मे भक्त्या प्रयच्छति । तदहं भक्त्युपहृतमश्नामि प्रयतात्मनः– मला एखादे पान फूल, फळ, किंवा यथाशक्ती पाण्याचा थेंबही जो अर्पण करील, भक्तीने भरलेली त्याची ती भेट मी मोठ्या आनंदाने स्वीकारतो अशी ग्वाही श्रीकृष्णाने गीतेमध्ये दिली असल्याचे प्रसिद्ध आहे जपतपादी साधन, यज्ञयागादी कर्मकाण्ड, तीर्थयात्रा यांच्यापेक्षा सहजसुलभ व सुगम असा हा नामचिंतनाचा मार्ग साधुसंतांनी वर्णन केला आहे

शास्त्रकारांनीही नवविधा भक्तीत नामस्मरणाला महत्त्व दिलेले आहे समर्थ रामदासांनी या नामस्मरणाचे गुणगान करताना म्हटले आहे– ' स्मरण देवाचें करावें । अखंड नाम जपत जावें । नामस्मरणें पावावें । समाधान ॥ नित्य नेम प्रातःकाळीं । माध्यान्हकाळीं सायंकाळीं । नामस्मरण सर्वकाळीं । करीत जावें ॥ .. काहींच न करूनि प्राणी । रामनाम जपे वाणी । संतुष्ट चक्रपाणी । भक्तालागीं सांभाळी ॥ नाम स्मरे निरंतर । तें जाणावें पुण्य शरीर । महादोषांचे गिरिवर । रामनामें नासती ॥ '

१३७७ उपकारी असे आरोणि उरला । आपुलें तयाला पर नाहीं ॥ १ ॥
लाभावरि घ्यावे सापडलें काम । आपला तो श्रम न विचारी ॥ २ ॥

जीवा ऐसें देखे आणिकां जीवांसी । निखळचि रासि गुणांचीच ॥ ३ ॥
तुका म्हणे देव तयांचा पांगिला । न भंगे संचला धीर सदा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – आरोणि – उत्कंठित, पर– दुसरा, निखळ– केवळ, पांगिला–अंकित, संचला–साठलेले.

अर्थ:– जो दुसऱ्यावर उपकार करण्यात सुख मानतो त्यास परोपकार करण्याची उत्सुकता मोठीच असते. त्याचे ठिकाणी आपपरभाव कधीही नसतो. १ ज्यात परोपकार आहे असे काम करण्यास त्यास मोठाच लाभ वाटतो अशा वेळी स्वतःस किती श्रम होतात याची पर्वा तो कधी करीत नाही. २ असा उपकारी मनुष्य स्वतःच्या जिवाप्रमाणेच इतराच्या जीवाची काळजी वाहतो असा हा मनुष्य म्हणजे गुणाची केवळ रासच होय. ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा पुरुषाचाच देव अंकीत झालेला असतो याचे साठलेले धैर्य कधीच सपत नाही, खचत नाही. ४

१३७८ कोणा[1] पुण्यें यांचा होईन सेवक । जींहीं द्वंद्वादिक दुराविलें ॥ १ ॥
ऐसें वर्म मज दावीं नारायणा । अंतरींच खुणा प्रकटोनि ॥ २ ॥
बहु अवघड असे संतभेटी । तरि जगजेठी करुणा केली ॥ ३ ॥
तुका म्हणे मग[2] नयें वृत्तीवरी । सुखाचे शेजारीं पहुडईन ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– द्वंद्वादिक– सुखदु:ख, आशानिराशा इत्यादी द्वद्वाच्या पलिकडे, निर्द्वंद्व.

अर्थ – सुखदु:खादी द्वद्वाचा निरास करून जे निर्द्वंद्व बनले आहेत अशा महात्म्याच्या मी कोणत्या पुण्याईमुळे सेवक होईन बरे ? १ नारायणा, या गोष्टीचे रहस्य मला अंतरगातील खुणा प्रकट करुन दाखवा ना. २ अशा संताची भेट होणे ही फार अवघड गोष्ट असल्याने देवा, मी याविषयी तुमच्याजवळ करुणा भाकली आहे एकदा तुमची कृपा झाली, या साधुसताची गाठ पडली की मग मीही सुखदुःखाच्या वृत्तींत रमणार नाही अखंड सुखाच्या शेजारी पडून राहीन ४

१३७९ क्षणक्षणां सांभाळितो । साक्षी होतो आपुला ॥ १ ॥
न घडावी पायीं तुटी । मन[3] मुठी घातलें ॥ २ ॥
विचारतो वचनां आधीं । धरूनि शुद्धी ठेविली ॥ ३ ॥
तुका म्हणे मागें भ्यालों । तरी जालों जागृत ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा'– तुटी–वियोग

अर्थ.– क्षणाक्षणाला सावध होऊन, साक्षी होऊन मी माझ्या वृत्ती सांभाळीत असतो १ या प्रभूच्या पायाशी माझ्या मनाने जी मिठी घातली आहे ती सुटू नये व या पायांचा वियोग होऊ नये यासाठी मन दक्ष असते २ देवा, आपण काही वचन बोलण्याआधीच मी याचा विचार करुन सावध झालेलो असतो ३ मागे कित्येक भक्ताना तुझ्या चरणांचा वियोग झाल्याचे ऐकून मी भ्यालो होतो, पण आता मात्र मी सावध झालो आहे ४

१३८० आणूनिया मना । आवघ्या धांडोळिल्या खुणा । देखिला तो राणा । पंढरपुरनिवासी ॥ १ ॥
यासी अनुसरल्या काय । घडे ऐसें वांयां जाय । देखिले[4] ते पाय । समजीवीं राहाती ॥ २ ॥
तो देखावा हा विध । चिंतनें ते कार्य सिध्द । आणिकां संबंध । नाहीं पर्वकाळासी ॥ ३ ॥
तुका म्हणे खळ । होती क्षणेंचि निर्मळ । जाऊनियां मळ । वाळवंटीं नाचती ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – धांडोळिल्या–शोधून काढल्या, विध– विधी, खळ–दुष्ट

अर्थ– सर्व खुणा शोधून काढून, मनाने त्या शोधून मी हा पंढरपुर येथील राणा पाहिला, १ यास एकदा शरण गेल्यावर कोणाचे आयुष्य वाया जाणार आहे ? एकदा याचे समचरण दृष्टीने पाहिले की ते कायमचेच चितात

१ कोण्या, २ मन, ३ मन मिठी घातली, ४ धरिले.

राहतात. २ याला पाहाणे हाच एक महत्त्वाचा विधी होय. याचे चिंतन केल्यावरच सर्व कार्यसिद्धी होत असते. याच्या दर्शनाशिवाय आणखी दुसरा कुठला पर्वकाळ पाहाण्याची जरूरी नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, फार मोठे पातकी असलेले सुध्दा एकदा याच्या सान्निध्य घेऊन वाळवटात नाचू लागले की त्यांचे पाप नष्ट होऊन ते अं.तकरणाने निर्मल होतात ४

१३८१ धरितां ये पंढरीची वाट । नाहीं संकट मुक्तीचें ॥ १ ॥
वंदूं येती देव पदें । त्या आनंदें उत्साहें ॥ २ ॥
नृत्यछंदें उडती रज । जे सहज चालतां ॥ ३ ॥
तुका म्हणे गरुड टके । वैष्णव निके संभ्रम ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:- संकट- अडचण, रज- धुलिकण, निके- बरोबर

अर्थ – एकदा या पंढरपुरची, संतांची वाट धरली की मग मुक्ती प्राप्त होण्यासंबंधी फारशी अडचण उरत नाही १ या संतांची पावले वंदन करण्यासाठी स्वर्गातील देवही मोठ्या आनंदाने व उत्साहाने येथे येऊन उतरतात. २ त्यांच्या नृत्याच्या दंग अवस्थेत त्यांच्या चरणांचे जे धुलिकण उडतात ते देवाना प्रिय असतात. ३ तुकाराम महाराज म्हणतात, असे हे वैष्णव संत बरोबर मोठ्या उत्साहाने गरुडचिन्हांकित पताका खांद्यावर घेऊन पंढरपुरच्या वाळवंटात नाचत असतात ४

१३८२ नाम घेतां मन निवे । जिव्हे अमृतचि स्रवे । होताती बरवे । ऐसे शकुन लाभाचे ॥ १ ॥
मन रंगलें रंगलें । तुझ्या चरणीं स्थिरावलें । केलिया विठ्ठलें । ऐसी कृपा जाणावी ॥ २ ॥
जालें भोजनसे दिसे । चिरा पडोनि ठेला इच्छे । धालियाच्या ऐसे । अंगा येती उद्गार ॥३॥
सुख भेटों आलें सुखा । निध सांपडला मुखा । तुका म्हणे लेखा । आतां नाहीं आनंदा ॥४॥

शब्दार्थ व टीपा – निवे–तृप्त होते, धालियाच्या– तृप्त झालेल्या, निध– निधी, साठा.

अर्थ– या श्रीहरीचे नाम घेताच मन त्रिविध तापापासून शांत होते, तृप्त होते कारण जिभेने एकसारखे नामामृतच स्रवत असते या नामस्मरणामुळे अनेक प्रकारचे उत्तमोत्तम लाभ व शकुन प्राप्त होतात. १ देवा, माझे चित्त तुझ्या चरणी स्थिर झाले. हे सर्व तुझ्या कृपेचेच नि संशय फळ आहे असे समजावे २ भरपूर जेवण झाल्याने तृप्ती झालेल्या माणसास मग कसलीच इच्छा उरत नाही. त्याच्या सर्व इच्छा नष्ट होतात, त्याच्यावर तृप्तीचा चिराच पडतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, श्रीविठ्ठलच्या नामाचा साठा आमच्या वाणीत सापडल्यामुळे सुखास सुख येऊन मिळाल्यासारखे झाले आहे. आता या आनंदास सीमा नाही ४

१३८३ रुची रुची घेऊं गोडी । प्रेमसुखें जाली जोडी ॥ १ ॥
काळ जाऊं नेदूं वायां । चिंतूं विठोबाच्या पायां ॥ २ ॥
करूं भजन भोजन । धणी घेऊं नारायण ॥ ३ ॥
तुका म्हणे जीव धाला । होय तुझ्यानें विठ्ठला ॥ ४ ॥

तुकारामबुवांनी या अभंगात आपल्या या दैवताचे व तीर्थाचे गुह्यज्ञान श्रीशंकरांनी गिरिजेला सांगितले असल्याचे म्हटले आहे. याचाही संबंध परंपरेस धरूनच आहे. वारकरी पंथ अथवा भागवत संप्रदाय श्रीकृष्णाचा, श्रीविष्णूचा अथवा श्रीविठ्ठलाचा उपासक असला तरी त्याने शिवविष्णूत अभेद मानला आहे. शिवाय या वारकरी पंथाचा प्रारंभी नाथ संप्रदायाशी निकटचा संबंध आहे. या पंथाचे संघटक श्रीज्ञानेश्वरमहाराज हे नाथपंथी होते. आदिनाथ-मत्सेन्द्रनाथ-गोरक्षनाथ-गैनीनाथ-निवृत्तिनाथ-ज्ञाननाथ अशी ही परंपरा आहे. या नाथपंथातील गुप्तज्ञान शिवानी पार्वतीला सांगितले आहे. नाथ संप्रदायाचे ग्रंथ व ज्ञानेश्वरादी संतांचे ग्रंथ यांत शिव-पार्वतीचा हा संदर्भ अनेकदा आलेला आहे. शिवाने पार्वतीला जे गुह्यज्ञान सांगितले ते मत्स्येंद्रियांनी ऐकले, असे उल्लेख सर्वत्र येतात!

हठयोगप्रदीपिकेवरील आपल्या टीकेत ब्रह्मानंदाने म्हटले आहे, 'एकदा केव्हा तरी कोणत्या तरी एका द्वीपावर बसून एकान्तात आदिनाथ शिवगिरिजेला योगाचा उपदेश करीत होते. तीराजवळच्या पाण्यात असलेल्या एका माशाने तो उपदेश ऐकला आणि त्यायोगे त्याच्या मनाची एकाग्रता झाली. तो निश्चल झाला. त्याची ती धारणा पाहून त्या कृपाघन आदिनाथाने त्याच्यावर जलप्रोक्षण केल्याने तो मत्स्य मत्स्येंद्रनाथ बनला.' श्रीज्ञानदेवांनी आपल्या गुरुपरंपरेचा उल्लेख करताना याच संदर्भाचा दाखला देताना म्हटले आहे, 'क्षीरसिंधुपरिसरीं। शक्तीच्या कर्णकुहरीं। नेणों कें श्रीत्रिपुरारीं। सांगितलें जें॥ तें क्षीरकल्लोळाआंत। मकरोदरीं गुप्त। होता तयाचा हात। पैठें जालें॥' श्रीतुकाराम महाराजांनी याच कथेचा सूचक उल्लेख या अभंगात केला आहे. अशा प्रकारे या तत्त्वज्ञानाचा उगम शिवाच्या उपदेशात आहे.

१३८६ पुराणींचा इतिहास। गोड रस सेविला[१]॥ १॥
नव्हती हे आहाच बोल। मोकळें फोल कवित्व॥ २॥
भावें घ्या रे भावें घ्या रे। एकदा जा रे पंढरिये॥ ३॥
भाग्यें आलेति मनुष्यदेहा। तो हा पाहा विठ्ठल॥ ४॥
पापपुण्या करील झाडा। जाइल पीडा जन्माची॥ ५॥
घ्यावी हातीं टाळदिंडी। गावे तोंडीं गुणवाद॥ ६॥
तुका म्हणे घटापटा। न लगे वाटा शोधाव्या॥ ७॥

केला आहे आपण पुराणीचा इतिहास व त्याचा गोड रस सेवन करून श्रीहरीभक्तीचे तत्त्व कवितेतून मांडतो अशी त्याची भूमिका आहे 'पाहिलीं पुराणें। धुंडोळिलीं दरुषणें।' असे त्यांनी एका अभंगात म्हटले आहे 'भावेंविण नाहीं तयाचिये प्राप्ती। पुराणें बोलतीं ऐसी मात', 'नामें असंख्यात तारिले अपार। पुराणीं हें सार प्रसिद्ध हो, कृपाळु म्हणोनि बोलती पुराणें। निर्धार वचनें याची मज' अशासारख्या वचनावरून तुकोबांनी पुराणाच्या इतिहासाचा रस किती चविष्टपणे सेविला होता हे स्पष्ट होईल

१३८७ कर्म धर्म नव्हती सांग। उण्या अंगें पतन ॥ १ ॥
भलत्या काळें[1] नामावळी। सुलभ भोळी भाविकां ॥ २ ॥
प्रायश्चित्तें पडती पायां। गाती तया वैष्णवां ॥ ३ ॥
तुका म्हणे नुपजे दोष। करा घोष आनंदें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा -सांग-शास्त्रात सांगितल्याप्रमाणे पूर्ण, यथासांग, उण्या अंगें-काही कमतरता झाल्यास नुपजे-उपजत नाही

अर्थ -नाना कर्मे व धार्मिक आचार यांचे आचरण शास्त्रात सांगितल्याप्रमाणे यथासांग जर झाले नाही तर त्यात कमतरता उत्पन्न होऊन कर्ता पतित होतो १ असे ईश्वराच्या नामासंबंधी काही नाही कोणत्याही वेळी भोळ्या भाविकांनी नामावळीचा उच्चार केला तरी चालतो, असे हे नाम फार सुलभ आहे २ जे वैष्णववीर या नामस्मरणात तल्लीन होतात त्यांच्या पायांशी अनेक प्रायश्चित्तें लीन होतात अनेक प्रायश्चित्तांनी जें कार्य होणार नाही ते प्रभूच्या नामस्मरणाने होते ३ तुकाराम महाराज म्हणतात, या श्रीहरीच्या नामस्मरणाने कसलाच दोष उपजत नाही म्हणून याच नामाचा घोष मोठ्या आनंदाने करा ४

१३८८ पाहा रे हें दैवत कैसें। भक्तिपिसें भाविक[2] ॥ १ ॥
पाचारिल्या सरिसें पावे। ऐसें सवे बराडी ॥ २ ॥
शुष्ककाष्ठीं गुरगुरी। लाज हरि न धरी ॥ ३ ॥
तुका म्हणे अर्धनारी। ऐसीं धरी रूपडीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा - भक्तिपिसें-भक्तीचे वेड असलेले, सवे-सवय, बराडी-खादाड, आधाशी, शुष्क-वाळक्या, काष्ठीं-खांबात, रूपडीं-रूपे

अर्थ-अहो हे विठ्ठल दैवत पाहा कसे आहे ते ! हे मोठे भाविक असून त्याला भक्तीचे फार वेड आहे १ कुणीही भक्तीने, प्रेमाने बोलाविले की हा आधाश्यासारखा धावतो तशीच त्याला सवय आहे २ प्रल्हादाने आर्ततेने हाक मारताच याने शुष्क झालेल्या, वाळलेल्या, खांबातूनही प्रकट होण्याची लाज मनात धरली नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, हा देव अर्धनारीनटेश्वराप्रमाणे आपल्या भक्तासाठी अनेक रूपे धारण करतो ४

विवरण - ईश्वर हाच भक्तिभुकाम, प्रेमभुकास कसा लालचावलेला असतो हे अनेक पौराणिक कथांतून व्यक्त झालेले असते तुकारामबुवांनी या अभंगात प्रल्हादाच्या प्रेमामुळे ईश्वर नरसिंहाच्या रूपाने खांबातून प्रकट झाल्याचा उल्लेख केला आहे प्रल्हाद हा हिरण्यकशिपू व कयाधू यांचा मुलगा याची लहानपणापासूनची भगवद्भक्ती हिरण्यकशिपूस पसंत नव्हती त्याने प्रल्हादाचा अतोनात छळ केला हत्तीच्याकडून तुडविणे, कड्यावरून लोटून देणे, सर्प डसविणे, विष पाजणे, नागपाशाने बांधणे, शस्त्रप्रहार करणे, जाळणे, अग्नीत लोटणे इत्यादी विविध प्रकारांनीही या प्रल्हादाची भगवद्भक्ती बंद झाली नाही पित्याच्या छळाने प्रल्हादास कसलाही त्रास झाला नाही त्याने भगवंताची मनोमय भक्ती केली शेवटी प्रल्हादाची भक्ती पाहून परमेश्वर नरसिंहाच्या रूपाने 'शुष्क काष्ठीं' गुरगुरू लागला या विक्राळ रूपाने प्रकट होऊन त्याने हिरण्यकश्यपूचा वध करून प्रल्हादाचे रक्षण केले शेवटी प्रल्हादाने परम भक्तीचीच व पित्याच्या उद्धाराची मागणी केली

१ काळीं, २ भाविका

१३८९ बहुत सोसिले मागें न कळता । पुढती काय आता अंध व्हावें ॥ १ ॥
एकाचिये अंगीं हें ठेवावें लावून । नये भिन्न भिन्न वाचपडों ॥ २ ॥
कोण होईल तो ब्रह्मांडचाळक । आपणचि हाक देइल हाके ॥ ३ ॥
तुका म्हणे दिलीं चेतवूनि सुनीं । कौतुकावाचूनि नाहीं छळ ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा-एकाचिये-एकाच्या, सुनी-कुत्री

अर्थ-यापूर्वी अज्ञानामुळे अनेक दुःखांचे आघात सहन केले पण आता तरी येथून पुढे अज्ञानाच्या अंधःकारातच दिवस कंठावेत काय १ आता जो काय सुखदुःखे वाट्यास येतील तो त्या परमेश्वराच्याच अंगी समर्पण करून आपण मोकळे व्हावे यापेक्षा इतर काही खटपट करण्याची जरूरीच नाही २ या सृष्टीचा जो कुणी चालक आहे त्याला मनामध्ये हाक मारावी ! तो आपल्या हाकेस खात्रीने ओ देईल ३ तुकाराम महाराज म्हणतात, आमच्या मागे कामक्रोधादिकांची कुत्री चेतवून देण्याचे काम हाच करीत असतो या देवाच्या कौतुकाशिवाय काहीच होणार नाही ४

१३९० आश्चर्य या वाटे नसत्या छंदाचें । कैसें दिलें साचें करोनिया ॥ १ ॥
दुजियासी तव अकळ हा भाव । करावा तो जीव साक्षी येथें ॥ २ ॥
एकीं अनेकत्व अनेकीं एकत्व । प्रकृतिस्वभाव प्रमाणेंचि ॥ ३ ॥
तुका म्हणे करूं उगवूं जाणसी । कुशळ येविशीं तुम्ही देवा ॥ ४ ॥

केवळ कल्पनामात्र आहे पारमार्थिक दृष्टीने त्याला मुळीच सत्यता वाटत नाही परंतु ईश्वराच्या अलौकिक छंदाचं कौशल्य असं की 'कैसे दिले साचे करोनिया' हे जग खरेच असल्याचा भास त्याने निर्माण केला पण हा भासच आहे हे विचारी माणसाने जाणावे आधुनिक भौतिक शास्त्रेही अलीकडच्या काळात दृश्य सृष्टीच्या स्वरूपाविषयी कसून संशोधन करीत असून त्यांनाही या जगाच्या फसव्या रूपाविषयी अनेकदा संशय आल्यासारखा दिसतो मानवी मनाची अमर्याद सीमा व ब्रह्मांडाची अथांग विस्तृतता आणि आपली तुटपुंजी ज्ञानेंद्रिये मर्यादित साधनं इत्यादींचा विचार करताना भौतिकशास्त्रेही दृश्य दृष्टीचं स्वरूप तपासताना फारच सावधपणे निष्कर्ष काढू लागली आहेत

१३९१ अस्त नाहीं आता एकचि मोहोरा[1] । पासूनि अंधारा दुरि जालों ॥ १ ॥
साक्षत्वें या जालों गुणाचा देखणा । करी नारायणा तरी खरें ॥ २ ॥
आठवे विसर पडियेला मागें । आलें तेंचि भागें यत्न केले ॥ ३ ॥
तुका म्हणे माझा विनोद देवासी । आम्ही तुम्हा ऐसीं दोन्ही नव्हों ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – मोहोरा–प्रकाश, जाणीव, देखणा–पाहाणारा, आठव–आठवण, स्मरण विसरु–विस्मरण

अर्थ – आता आमच्या अंतःकरणात प्रकाशाचा जो उदय झाला आहे त्याचा अस्त कधीच होणार नाही आता आम्ही अज्ञानाच्या अंधःकारापासून कायमचेच दूर झालो आहोत १ त्यामुळे या दृश्य जगाच्या विविध गुणांचा मी केवळ साक्षी बनलो आहे, पाहाणारा आहे देवा, नारायणा ही साक्षीत्वाचीच भूमिका तू माझी कायम कर २ आता देवा, तुझे स्मरण व विस्मरण या दोनही अवस्था मागे पडून मी निर्द्वंद्व अशा अवस्थेस आलो आहे देहादी व्यापार जे वाट्याला आले ते मोठ्या निर्लेपत्वाने करू ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, आम्ही आता जीवाप्रमाणे बद्ध व तुमच्याप्रमाणे मुक्त नाही या दोनही अवस्थांच्या पलीकडेच आमची स्थिती आहे वरवरचे द्वैत दिसले ते केवळ भक्तीच्या सुखासाठी आहे ४

विवरण – एका विशिष्ट अशा पारमार्थिक भूमिकेवरून तुकाराममहाराज आपल्या स्थितीचा, अवस्थेचा उल्लेख या अभंगात करीत आहेत आत्मज्ञानाच्या प्राप्तीनंतर देहादी क्रिया होत असल्या तरी त्यात आपले मन नाही आपण केवळ साक्षीरूपानं आहात, असे बुवांनी येथ सांगितले आहे सुख दुःख बंध मोक्ष ज्ञान अज्ञान, स्मरण विस्मरण या द्वंद्वाच्या पलीकडची अवस्था त्यांना प्राप्त झाली आहे जो थोडा द्वैताचा भास दिसतो तो भक्तिसुखासाठीच आहे देहभोगाप्रमाणे जी जी कर्मे आवश्यक ती ते करतीलच, पण त्यात रुचिता, आसक्ती कुठे राहाणार नाही ईश्वराचा म्हणजेच आत्मतत्त्वाचा आठव व विसर याही अवस्था मागे पडल्या सर्व एकच अशी अनुभूती आल्यावर कुणी कुणास विसरायचे ? कुणी कुणाचं स्मरण करायचे ? एकाने दुसऱ्याचं स्मरण करण्यात द्वैताची अवस्था असते ती कशी सहन होणार ? भक्तिसुखासाठी असेल तेवढीच ती उरणार एऱ्हवी एका विशिष्ट पातळीवर आठवण व स्मरण या दोहोंच्या पलीकडंच सिद्ध उभा असतो

या आठव विसरासही तात्त्विक दृष्टीने फारच महत्त्व आहे एका उच्चतम अशा अवस्थेत आठव विसरात फरक उरत नाही स्मरण विस्मरण हे ज्या मनाचे धर्म ते मन कोण आहे ? 'इंद्रियाणां मनश्चास्मि' हे जर खरे असेल तर याच मनाचा आठव हा धर्म परमात्मपर व विसर हा तदितर असा भावच संभवत नाही स्मरणात तेवढा परमेश्वर, मग विस्मरणात कोण असतो ? विस्मरण कोणाचे ? कुणास विसरायचे ? या प्रश्नातच ज्याला विसरायचे त्याविषयी ध्यान पक्के होत असते वस्तुस्थिती अशी आहे की ज्या तत्त्वावर स्मरण उठते, त्याच तत्त्वावर विस्मरणही उमलते स्मरणाचं काय जसे प्रभुसत्तेतून, तसेच विस्मरणाचेही त्याच्याच सत्तेतून याच तत्त्वाचा विचार 'आठऊ आणि विसरु । तयातेंही घेऊ नेदी पसरु । दशेचा वेव्हार । असाधारणु' या अनुभवामृतातील ओवीत आला आहे यावर भाष्य करताना शिवकल्याणांनी 'येणें विसरोनि जें कांहीं केलें । तें यचि पसरें गिळिलें । एवं विसराचियें वेळे । पसरुचि असे' असे स्पष्टीकरण केले आहे विसरातही स्मरण असते, म्हणजच थोर भक्त

---

१ माहरा

१३८९ बहुत सोसिले मागें न कळतां । पुढती काय आतां अध व्हावें ॥ १ ॥
एकाचिये अंगीं हें ठेवावें लावून । नये भिन्न भिन्न चांचपडों ॥ २ ॥
कोण होईल तो ब्रह्मांडवाळक । आपणचि हाक देईल हाके ॥ ३ ॥
तुका म्हणे विलों चेतवूनि सुनीं । कौतुकावांचूनि नाहीं छळ ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा–एकाचिये–एकाच्या, सुनी–कुत्री

अर्थ–पापूर्वी अज्ञानामुळे अनेक दु:खाचे आघात सहन केले पण आता तरी येथून पुढे अज्ञानाच्या अंधकारातच दिवस कठावेत काय १ आता जी काय सुखदु:खे वाटयास यतील ती त्या परमेश्वराच्याच अंगी समर्पण करून आपण मोकळे व्हावे याखेरीज इतर काही खटपट करण्याची जरूरीच नाही २ या सृष्टीचा जो कुणी चालक आहे त्याला मनाभावे हाक मारावी । तो आपल्या हाकेस तात्काळ ओ देईल ३ तुकाराम महाराज म्हणतात, आमच्या मागे कामक्रोधादिकांचा कुत्री चेतवून देण्याचे काम हाच करीत असतो या देवाच्या कौतुकाशिवाय काहीच होणार नाही ४

१३९० आश्चर्य या वाटे नसत्या छंदाचें । कैसें दिलें साचें करोनिया ॥ १ ॥
दुजियासी तंव अकळ हा भाव । करावा तो जीव साक्षी येथें ॥ २ ॥
एकीं अनेकत्व अनेकीं एकत्व । प्रकृतिस्वभाव प्रमाणेंचि ॥ ३ ॥
तुका म्हणे करूं उगवूं जाणसी । कुशळ येविशीं तुम्ही देवा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– साचें–सत्य, खरे, दुजियासी–दुसऱ्यास, अकळ–न समजण्यासारखा, कुशळ–कुशल कौशल्यवान

अर्थ –या प्रभूच्या कौतुकाच्या छंदाचे मोठे आश्चर्य वाटते कारण देहादी प्रपंच हा मिथ्या असूनही तो खरा असल्याचा भास याने निर्माण केला आहे १ हा सर्व प्रकार दुसऱ्यास न समजण्यासारखा आहे या मिथ्या सृष्टीचा लोभ न धरता जीवाने येथे केवळ साक्षीच्या रूपानेच असावे २ एकाच परमेश्वराच्या ठिकाणी अनेकत्वाचा भास होतो व अनेक रूपांत आणि नामांत तोच एकत्वाच्या रूपाने असतो हा सर्व प्रकार प्रकृतिस्वभावानुसारच होतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, अशा प्रकारे या सृष्टीच्या बाह्य देखाव्याचा गुंता निर्माण करावा व त्याची सोडवणूकही करावी हा तुझा एक छंद आहे या कामी तू फारच कौशल्यवान आहेस ४

विवरण – या एका तत्त्वसुंदर अभंगात तुकारामबुवांनी ईश्वराच्या एका छंदाचा फार समर्पक असा उल्लेख केला आहे हे बाह्य जगत, सृष्टीचा हा स्थिरचरात्मक पसारा मिथ्या असूनही तो खरा असल्याचा भास तो निर्माण करतो कधी हा परमेश्वर अनंत रूप धारण करतो कधी अनेकत्वात एकत्वाने स्थिर असतो सर्व सृष्टीची अशी गुंतागुंत निर्माण करावी, ती सोडवावी हीच या ईश्वराची आवडती क्रीडा होय तत्त्वज्ञानाने ईश्वराच्या या विलक्षण छंदाची विस्ताराने चर्चा केली आहे जडचेतनात्मक सृष्टीचा हा पसारा म्हणजे चिद्रूप अशा परब्रह्माचा विलास आहे हे परब्रह्मच मायेच्या रूपाने सर्व शक्तिमान ईश्वर बनून जगाची क्रीडा करीत आहे या क्रीडेपूर्वी या एकाकी ब्रह्माच्या ठिकाणी 'बहु स्यां प्रजायेय' अशी वासना निर्माण झाली या वासनेच्या पोटी एकाच ब्रह्मापासून सर्व जीव निर्माण झाले असे हे व्यक्त झालेले जगत खरे की खोटे ? हा तत्त्वज्ञानातील एक मोठा विवाद्य प्रश्न होय व्यक्त जगत डोळ्यांना आणि इतर ज्ञानेंद्रियांना भासमान होते, त्याचे स्वरूप समजते म्हणून ते सत्य मानण्याकडे कल होता परंतु तत्त्वज्ञानाच्या दृष्टीने हे सर्व भासमान जग जसे दिसते तसे नाही ते मिथ्या आहे त्याचे वास्तव स्वरूप वेगळेच आहे या विचाराच्या पोटी हे सर्व दृश्य जग मुळीच निर्माण झाले नाही असा अजातवाद, हे सर्व जग ब्रह्मरूपच आहे असा सर्वब्रह्मवाद, हे सर्व जग म्हणजे मायाच आहे असा मायावाद, आणि हे सर्व जग मुळी भ्रमच आहे असा विवर्तवाद, यांचा निर्मिती झाली या सर्व तत्त्वप्रणालींचा सारांश शास्त्रकार असा काढतात की, हे सर्व जगत

केवळ कल्पनामात्र आहे पारमार्थिक दृष्टीने त्याला मुळीच सत्यता वाटत नाही परंतु ईश्वराच्या अलौकिक छंदाच कौशल्य असे की ' कैसे दिले साचे करोनिया ' हे जग खरेच असल्याचा भास त्याने निर्माण केला पण हा भासच आहे हे विचारी माणसाने जाणावे आधुनिक भौतिक शास्त्रेही अलीकडच्या काळात दृश्य सृष्टीच्या स्वरूपाविषयी वसून संशोधन करीत असून त्यानाही या जगाच्या फसव्या रूपाविषयी अनेकदा संशय आल्यासारखा दिसतो मानवी मनाचा अमर्याद सीमा व ब्रह्मांडाची अथांग विस्तृतता आणि आपला तुटपुंजी ज्ञानेंद्रिये, मर्यादित साधने इत्यादींचा विचार करताना भौतिकशास्त्रेही दृश्य दृष्टीच स्वरूप तपासताना फारच सावधपणे निष्कर्ष काढू लागली आहेत

१३९१ अस्त नाहीं आता एकचि मोहोरा[1] । पासूनि अधारा दुरि जालो ॥ १ ॥
साक्षत्वे या जालो गुणाचा देखणा । करीं नारायणा तरी खरे ॥ २ ॥
आठवे विसरु पडियेला मागें । आले तेंचि भागें यत्न केले ॥ ३ ॥
तुका म्हणे माझा विनोद देवासी । आम्ही तुम्हा ऐसीं दोन्ही नव्हो ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – मोहोरा–प्रकाश, जागेव, देखणा–पाहाणारा, आठवे–आठव, स्मरण, विसरु–विस्मरण

अर्थ – आता आमच्या अंतःकरणात प्रकाशाचा जो उदय झाला आहे त्याचा अस्त कधीच होणार नाही आता आम्ही अज्ञानाच्या अंधःकारापासून कायमचेच दूर झालो आहोत १ त्यामुळे या दृश्य जगाच्या विविध गुणाचा मी केवळ साक्षी बनलो आहे, पाहाणारा आहे देवा, नारायणा, ही साक्षीत्वाचीच भूमिका तू माझी कायम कर २ आता देवा, तुझे स्मरण व विस्मरण या दोनही अवस्था मागे पडून मी निर्द्वंद्व अशा अवस्थेत आलो आहे देहादी व्यापार जे वाट्याला आले ते मोठ्या निर्लेपत्वाने करू ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, आम्ही आता जीवाप्रमाणे बद्ध व तुमच्याप्रमाणे मुक्त नाही या दोनही अवस्थाच्या पलीकडेच आमची स्थिती आहे वरवरचे द्वैत दिसले ते केवळ मस्तीच्या सुखासाठी आहे ४

विवरण – एका विशिष्ट अशा पारमार्थिक भूमिकेवरून तुकारामबुवा आपल्या स्थितीचा, अवस्थेचा उल्लेख या अभंगात करीत आहेत आत्मज्ञानाच्या प्राप्तीनंतर देहादी क्रिया होत असल्या तरी त्यात आपले मन नाही, आपण केवळ साक्षीरूपाने आहोत, असे बुवानी येथे सांगितले आहे सुख दुःख, बंध मोक्ष, ज्ञान अज्ञान, स्मरण-विस्मरण या द्वंद्वाच्या पलीकडची अवस्था त्याना प्राप्त झाली आहे जो थोडा द्वैताचा भास दिसतो तो भक्तिसुखासाठीच आहे देहभोगाप्रमाणे जी जी कर्मे आवश्यक ती ते करतीलच, पण त्यात लिप्तता, आसक्ती कुठे राहाणार नाही ईश्वराचा म्हणजेच आत्मतत्त्वाचा आठव व विसर याही अवस्था मागे पडल्या सर्व एकच अशी अनुभूती आल्यावर कुणी कुणास विसरायचे ? कुणी कुणाचे स्मरण करायचे ? एकाने दुसऱ्याचे स्मरण करण्यात द्वैताची अवस्था असते ती कशी सहन होणार ? भक्तिसुखासाठी असेल तेवढीच ती उरणार एऱ्हवी एका विशिष्ट पातळीवर आठवण व स्मरण या दोहोंच्या पलीकडेच सिद्ध उभा असतो

या आठव विसरासही तात्त्विक दृष्टीने फारच महत्त्व आहे एका उच्चतम अशा अवस्थेत आठव विसरास फारच उरत नाही स्मरण विस्मरण हे ज्या मनाचे धर्म ते मन काय आहे ? ' इंद्रियाणां मनश्चास्मि ' हे जर खरे असेल तर मग मनाचा आठव हा धर्म परमात्मपर व विसर हा तदितर असा भाव संभवत नाही स्मरणात तेवढा परमेश्वर, मग विस्मरणात कोण असतो ? विस्मरण कोणाचे ? कुणास विसरायचे ? या प्रश्नातच ज्यास विसरायचे त्याविषयी ध्यान पक्के होत असते वस्तुस्थिती अशी आहे की, ज्या तत्त्वावर स्मरण उठते, त्याच तत्त्वावर विस्मरणही उमटते स्मरणाचे कार्य जसे प्रभुसत्तेतून, तसेच विस्मरणाचेही त्याच्याच सत्तेतून याच तत्त्वाचा विचार ' आठऊ आणि विसरु । तयातेंही घेऊं नेदी पसरु । दशेचा वेव्हारु । असाधारणु ' या अनुभवामृतातील ओवीत झाला आहे यावर भाष्य करताना शिवकल्याणानी ' येथें विसरोनि जें कांहीं केलें । तें एकचि पसरें गिळिलें । एव विसराचिये वेळे । पसरचि असे ' असे स्पष्टीकरण केले आहे विसरातही स्मरण असते, म्हणजच थोर भक्त

१ मोहरा.

१३८९ बहुत सोसिले मागें न कळता । पुढतो पाय आतां अध व्हावें ॥ १ ॥
एकाचिये अगीं हें ठेवावें लावून । नये भिन्न भिन्ना चाचपडों ॥ २ ॥
कोण होईल तो ब्रह्मांडचाळक । आपणचि हाक देईल हाने ॥ ३ ॥
तुका म्हणे दिलों चेतवूनि सुनों । कौतुकावाचूनि नाहीं छळ ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा-एकाचिये-दवाच्या, सुनी-कुत्रा

अर्थ-पापूर्वी अज्ञानामुळे अनेक दुःखांचे आघात सहन केले पण आता तरी यापुढे अज्ञानाच्या अध बाजारात दिवस काढावेत काय १ आता जी पाय सुखदुःख वाटणार असों ती त्या परमेश्वराच्याच अंगी समर्पण करून आपण मोकळे व्हावे याबरीज इतर काही चाचपडण्याची जरूरच नाही २ या सृष्टीचा जो धुनी चालक आहे त्याला मनापासून हाक मारावी । तो आपल्या हाकेस प्रत्युत्तर ओ देईल ३ तुकाराम महाराज म्हणतात, आमच्या मागे कामक्रोधादिकांचा कुत्री चेतवून देण्याचे काम हाच करीत असतो या देवाच्या कौतुकाशिवाय काहीच होणार नाही ४

१३९० आश्चर्य या वाटे नसत्या छंदाचें । कसें दिलें साचें करोनिया ॥ १ ॥
दुजियासी तव अकळ हा भाव । करावा तो जीव साक्षी येथें ॥ २ ॥
एकीं अनेकत्व अनेकीं एकत्व । प्रकृतिस्वभाव प्रमाणेंचि ॥ ३ ॥
तुका म्हणे करूं उगयू जाणसी । कुशळ येविशीं तुम्ही देवा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा - साच-सत्य, खरे दुजियासी-दुसऱ्यास, अकळ-न समजण्यासारखा कुशळ-कुशल कौशल्यवान

अर्थ -या प्रभूच्या कौतुकाच्या छंदाचे मोठे आश्चर्य वाटते कारण देहादी प्रपंच हा मिथ्या असूनही तो खरा असत्याचा भास मान निर्माण केला आहे १ हा सर्व प्रकार दुसऱ्यास न समजण्यासारखा आहे या मिथ्या सृष्टीचा लोभ न धरता जीवाने येथे केवळ साक्षीच्या रूपानेच असावे २ एकाच परमेश्वराच्या ठिकाणी अनेक त्वाचा भास होतो व अनेक स्थान अनेक नामांनी ताच एकत्वाच्या स्थान असतो हा सर्व प्रकार प्रकृतिस्वभावानुसारच होतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, अशा प्रकारे या सृष्टीच्या बाह्य देखाव्याचा गुंता निर्माण करावा व त्याची मोडतोडही करावी हा तुमचा एक छंद आहे या कामी तू फारच कौशल्यवान आहेस ४

विवरण या गूढ तत्त्वसुंदर अभंगात तुकारामबुवांनी ईश्वराच्या एका छंदाचा फार समर्पक असा उल्लेख केला आहे हे बाह्य जगत, सृष्टीचा हा स्थिरचरात्मक पसारा मिथ्या असूनही तो खरा असत्याचा भास तो निर्माण करतो कधी हा परमेश्वर अनेक रूपे धारण करतो कधी अनेकत्वात एकत्वाने स्थिर असतो सर्व सृष्टीची अशी गुंतागुंत निर्माण करावी ती मोडावी हाच या ईश्वराची आवडती क्रीडा होय तत्त्वज्ञानात ईश्वराच्या या विलक्षण छंदाची विस्ताराने चर्चा केली आहे जडचेतनात्मक सृष्टीचा हा पसारा म्हणजे चिद्रूप अशा परब्रह्माचा विलास आहे हे परब्रह्मच मायेच्या स्थानी सर्व शक्तिमान ईश्वर बनून जगाची क्रीडा करीत आहे या क्रीडेपूर्वी या एकाकी ब्रह्माच्या ठिकाणी 'बहु स्यां प्रजायेय' अशी वासना निर्माण झाली या वासनेच्या पोटी एकाच ब्रह्मापासून सर्व जीव निर्माण झाले असे हे व्यक्त झालेले जगत खरे का खोटे ? हा तत्त्वज्ञानातील एक मोठा विवाद्य प्रश्न होय व्यक्त जगत डोळ्यांना आणि इतर ज्ञानेंद्रियांना भासमान होते त्याचे स्वरूप समजते म्हणून ते सत्य मानण्याकडे कल होतो परंतु तत्त्वज्ञानाच्या दृष्टीने हे सर्व भासमान जग जसे दिसते तसे नाही ते मिथ्या आहे त्याचे वास्तव स्वरूप वेगळेच आहे या विचाराच्या पोटी हे सर्व दृश्य जग मुळीच निर्माण झाले नाही असा अजातवाद हे सर्व जग ब्रह्मरूपच आहे असा सर्वब्रह्मवाद हे सर्व जग म्हणजे मायाच आहे असा मायावाद आणि हे सर्व जग मुळात भ्रमच आहे असा विवर्तवाद, यांची निर्मिती झाली या सर्व तत्त्वप्रणालींचा सारांश शास्त्रकार असा काढतात की, हे सर्व जगत

केवळ कल्पनामात्र आहे. पारमार्थिक दृष्टीने त्याला मुळीच सत्यता वाटत नाही. परंतु ईश्वराच्या अलौकिक छंदाचे कौशल्य असे की ' कैसें दिलें साचें करोनियां '. हे जग खरेच असल्याचा भास त्याने निर्माण केला पण हा भासच आहे हे विचारी माणसाने जाणावे आधुनिक भौतिक शास्त्रेही अलीकडच्या काळात दृश्य सृष्टीच्या स्वरूपाविषयी कसून संशोधन करीत असून त्यानाही या जगाच्या फसव्या रूपादिपयी अनेकदा सशय आल्यासारखा दिसतो. मानवी मनाची अमर्याद सीमा व ब्रह्माडाची अथाग विस्तृतता आणि आपली तुटपुंजी ज्ञानेंद्रिये, मर्यादित साधने इत्यादींचा विचार करताना भौतिकशास्त्रेही दृश्य दृष्टीचे स्वरूप तपासताना फारच सावधपणे निष्कर्ष काढू लागली आहेत.

१३९१ अस्त नाहीं आतां एकचि मोहोरा[1] । पासूनि अंधारा दुरि जालों ॥ १ ॥
साक्षत्वें या जालों गुणाचा देखणा । करीं नारायणा तरी खरें ॥ २ ॥
आठवें विसरु पडियेला मागें । आलें तेंचि भागें यत्न केलें ॥ ३ ॥
तुका म्हणे माझा विनोद देवासी । आम्ही तुम्हां ऐसीं दोन्ही नव्हों ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीप :– मोहोरा–प्रकाश, जाणीव, देखणा–पाहाणारा, आठवें–आठव, स्मरण, विसरु–विस्मरण.

अर्थ :– आता आमच्या अंतःकरणात प्रकाशाचा जो उदय झाला आहे त्याचा अस्त कधीच होणार नाही. आता आम्ही अज्ञानाच्या अंधःकारापासून कायमचेच दूर झालो आहोत. १ त्यामुळे या दृश्य जगाच्या विविध गुणांचा मी केवळ साक्षी बनलो आहे, पाहाणारा आहे. देवा, नारायणा, ही साक्षीत्वाचीच भूमिका तू माझी कायम कर. २ आता देवा, तुझे स्मरण व विस्मरण या दोन्ही अवस्था मागे पडून मी निर्द्वंद्व अशा अवस्थेस आलो आहे देहादी व्यापार जे वाट्याला आले ते मोठ्या निर्लेपत्वाने करू. ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, आम्ही आता जीवाप्रमाणे बद्ध व तुमच्याप्रमाणे मुक्त नाही. या दोन्ही अवस्थांच्या पलीकडेच आमची स्थिती आहे. वरवरचे द्वैत दिसले ते केवळ भक्तीच्या सुखासाठी आहे ४

विवरण :– एका विशिष्ट अशा पारमार्थिक भूमिकेवरून तुकारामबुवा आपल्या स्थितीचा, अवस्थेचा उल्लेख या अभंगात करीत आहेत. आत्मज्ञानाच्या प्राप्तीनंतर देहादी क्रिया होत असल्या तरी त्यात आपले मन नाही, आपण केवळ साक्षीरूपाने आहोत, असे बुवानी येथे सांगितले आहे. सुख-दुःख, बंध-मोक्ष, ज्ञान-अज्ञान, स्मरण-विस्मरण या द्वंद्वाच्या पलीकडची अवस्था त्याना प्राप्त झाली आहे. जो थोडा द्वैताचा भास दिसतो तो भक्तिसुखासाठीच आहे. देहभोगाप्रमाणे जी जी कर्मे आवश्यक ती ते करतीलच; पण त्यात लिप्तता, आसक्ती कुठे राहाणार नाही. ईश्वराचा म्हणजेच आत्मतत्त्वाचा आठव व विसर याही अवस्था मागे पडल्या. सर्व एकच अशी अनुभूती आल्यानंतर कुणी कुणास विसरायचे ? कुणी कुणाचे स्मरण करायचे ? एकाने दुसऱ्याचे स्मरण करण्यात द्वैताची अवस्था असते ती कशी सहन होणार ? भक्तिसुखासाठी असेल तेवढीच ती उरणार. एऱ्हवी एका विशिष्ट पातळीवर आठवण व *स्मरण या दोहोंच्या पलीकडेच सिद्ध उभा असतो.*

या आठव-विसरासही तात्त्विक दृष्टीने फारच महत्त्व आहे. एका उच्चतम अशा अवस्थेत आठव-विसराचा फरक उरत नाही स्मरण-विस्मरण हे ज्या मनाचे धर्म ते मन कोण आहे ? ' इंद्रियाणां मनश्चास्मि ' हे जर खरे असेल तर याच मनाचा आठव हा धर्म परमात्मपर व विसर हा तदेतर असा भावच संभवत नाही स्मरणात तेवढा परमेश्वर; मग विस्मरणात कोण असतो ? विस्मरण कोणाचे ? कुणास विसरायचे ? या प्रश्नातच ज्याला विसरायचे त्याविषयी ध्यान पक्के होत असते. वस्तुस्थिती अशी आहे की, ज्या तत्त्वावर स्मरण उठते, त्याच तत्त्वावर विस्मरणही उमलते. स्मरणाचे कार्य जसे प्रभुसत्तेतून, तसेच विस्मरणाचेही त्याच्याच सत्तेतून. याच तत्त्वाचा विचार ' आठऊ आणि विसरू । तयातेंही प्रेऊ नेदी पसरू । दशेचा वेव्हारू । असाधारणु ' या अनुभवामृतातील ओवीत आला आहे यावर भाष्य करताना शिवकल्याणानी ' येणें विसरोनि जें कांहीं केलें । तें मचि पसरें गिळिलें । एवं विसराचिये वेळे । पसरूचि असे ' असे स्पष्टीकरण केले आहे. विसरातही स्मरण असते; म्हणजेच थोर भक्त

---

१ मोहरा.

१३८९ बहुत सोसिले मार्गे न कळतां । पुढती काय आता अंध व्हावें ॥ १ ॥
एकाचिये अंगीं हें ठेवावें लावून । नये भिन्न भिन्ना चाचपडों ॥ २ ॥
कोण होईल तो ब्रह्मांडचाळक । आपणचि हाक देइल हाके ॥ ३ ॥
तुका म्हणे दिलीं चेतवूनि सुनीं । कौतुकावाचूनि नाहीं छळ ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा-एकाचिये-देवाच्या, सुनी-कुत्री

अर्थ-यापूर्वी अज्ञानामुळे अनेक दुःखाचे आघात सहन केले पण आता तरी येथून पुढे अज्ञानाच्या अंधकारातच दिवस कठावेत काय १ आता जी काय सुखदुःखे वाटयास येतील ती त्या परमेश्वराच्याच अंगी समर्पण करून आपण मोकळे व्हावे याखेरीज इतर काही खटपट करण्याची जरूरीच नाही २ या सृष्टीचा जो कुणी चालक आहे त्याला मनोभावे हाक मारावी ! तो आपल्या हाकेस खात्रीने ओ देईल. ३ तुकाराम महाराज म्हणतात, आमच्या मागे कामक्रोधादिकांची कुत्री चेतवून देण्याचे काम हाच करीत असतो या देवाच्या कौतुकाशिवाय काहीच होणार नाही ४

१३९० आश्चर्य या वाटे नसत्या छंदाचें । कैसें दिलें साचें करोनिया ॥ १ ॥
दुजियासी तव अकळ हा भाव । करावा तो जीव साक्षी येथें ॥ २ ॥
एकीं अनेकत्व अनेकीं एकत्व । प्रकृतिस्वभाव प्रमाणेंचि ॥ ३ ॥
तुका म्हणे कर्रू उगवूं जाणसी । कुशळ येविशीं तुम्ही देवा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- साचे-सत्य, खरे, दुजियासी-दुसऱ्यास, अकळ-न समजण्यासारखा, कुशळ-कुशल कौशल्यवान

अर्थ :-या प्रभूच्या कौतुकाच्या छंदाचे मोठे आश्चर्य वाटते कारण देहादी प्रपंच हा मिथ्या असूनही तो खरा असल्याचा भास याने निर्माण केला आहे १ हा सर्व प्रकार दुसऱ्यास न समजण्यासारखा आहे या मिथ्या सृष्टीचा लोभ न धरता जीवाने येथे केवळ साक्षीच्या रूपानेच असावे २ एकाच परमेश्वराच्या ठिकाणी अनेकत्वाचा भास होतो व अनेक रूपात आणि नामात तोच एकत्वाच्या रूपाने असतो हा सर्व प्रकार प्रकृतिस्वभावानुसारच होतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, अशा प्रकारे या सृष्टीच्या बाह्य देखाव्याचा गुंता निर्माण करावा व त्याची सोडवणूकही करावी हा तुझा एक छंद आहे या कामी तू फारच कौशल्यवान आहेस ४

विवरण - या एका तत्त्वसुंदर अभंगात तुकारामबुवांनी ईश्वराच्या एका छंदाचा फार समर्पक असा उल्लेख केला आहे हे बाह्य जगत, सृष्टीचा हा स्थिरचरात्मक पसारा मिथ्या असूनही तो खरा असल्याचा भास तो निर्माण करतो कधी हा परमेश्वर अनेक रूपे धारण करतो, कधी अनेकत्वात एकत्वाने स्थिर असतो सर्व सृष्टीची अशी गुंतागुंत निर्माण करावी, ती सोडवावी हीच या ईश्वराची आवडती क्रीडा होय तत्त्वज्ञानाने ईश्वराच्या या विलक्षण छंदाची विस्ताराने चर्चा केली आहे जडचेतनात्मक सृष्टीचा हा पसारा म्हणजे चिद्रूप अशा परब्रह्माचा विलास आहे हे परब्रह्मच मायेच्या रूपाने सर्व शक्तिमान ईश्वर बनून जगाची क्रीडा करीत आहे या क्रीडेपूर्वी या एकाकी ब्रह्माच्या ठिकाणी ' बहु स्यां प्रजायेय ' अशी वासना निर्माण झाली या वासनेच्या पोटी एकाच ब्रह्मापासून सर्व जीव निर्माण झाले असे हे व्यक्त झालेले जगत खरे की खोटे ? हा तत्त्वज्ञानातील एक मोठा विवाद्य प्रश्न होय व्यक्त जगत डोळ्यांना आणि इतर ज्ञानेंद्रियांना भासमान होते, त्याचे रंगरूप समजते म्हणून ते सत्य मानण्याकडे कल होतो परंतु तत्त्वज्ञानाच्या दृष्टीने हे सर्व भासमान जग जसे दिसते तसे नाही ते मिथ्या आहे त्याचे वास्तव स्वरूप वेगळेच आहे या विचाराच्या पोटी हे सर्व दृश्य जग मुळीच निर्माण झाले नाही असा अजातवाद, हे सर्व जग ब्रह्मरूपच आहे असा सर्वब्रह्मवाद, हे सर्व जग म्हणजे मायाच आहे असा मायावाद, आणि हे सर्व जग मुळी भ्रमच आहे असा विवर्तवाद, यांचा निर्मिती झाली या सर्व तत्त्वप्रणालींचा सारांश थोडक्यात असा सांगतात की, हे सर्व जगत

नसूनही आपणास मीत्वाच्या जाणिवेचे, निराळेपणाचे उल्लंघन होत नाही २ अज्ञानाच्या अंधाराने आत्मस्वरूपाचे तेज नाहीसे होते, त्यामुळे दृष्टीत अंतर पडत असते ३ तुकाराम महाराज म्हणतात, पण देवाची संगत करून त्याचे साह्य घेतल्यावर मात्र मीत्व हे निजस्वरूपाहून वेगळे नाही अशी जाणीव तोच निर्माण करील ४

१३९५ कवीश्वराचा तो आम्हासी विटाळ । प्रसाद वोंगळ चिवडिती ॥ १ ॥
दंभाचे आवडी बहिराट अंधळे । सेवटासि काळें होइल तोंड ॥ २ ॥
सोन्यासेजारीं तो लाखेची जतन । सतत ते गुण जैसेतैसे ॥ ३ ॥
सेव्यसेवकता न पडता ठावी । तुका म्हणे गोवी पावती हीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – कवीश्वराचा–अनुकरण करणारे कवी, प्रसाद–सहजसुलभ अर्थ प्रकट करण्याचा गुण, ईश्वरी कृपा, गोवी–बंधन

अर्थ –ईश्वरी कृपेने ज्यांचे काव्य प्रासादिक बनले आहे त्यांच्या कवितांतील निवडक शब्द चिवडून ओंगळपणे जे स्वतःचे काव्य करतात अशा अनुकरणात्मक कवीश्वराचा आम्हाला विटाळच होतो १ यांना दंभाची आवड असल्याने खऱ्या तत्त्वस्पर्शी काव्याविषयी ते बहिरे व आंधळेच असल्याने शेवटी त्यांचे तोंड अपकीर्तीने काळेच होईल २ सोन्याचा दागिना लाखेत जडवलेला असल्याने सोन्यासाठी लाखेचे जतन होत असते पण सोन्याच्या सहवासात राहूनही लाखेचे गुण काही जात नाहीत, ती जशीच्या तशीच सतत राहते त्याप्रमाणेच सत्कवींच्या सहवासानेही अनुकरणप्रिय कवीश्वर कधी भक्तिज्ञानाने संपन्न होत नाहीत ३ जोपर्यंत परमेश्वराविषयीचा सेव्यसेवकतेचा भाव नीटपणे ज्ञात झाला नाही तोपर्यंत त्यांना अशा अनुकरणप्रिय काव्याचे बंधनच होते त्यातून ते बाहेर पडू शकत नाहीत ४

स्मरण-विस्मरण याच्या पलीकडे असतो आत्मसुखाची गोडी स्मरणाने अथवा विस्मरणाने बाधलेली नाही तिच विसरही असू शकत नाही व स्मरणही असू शकत नाही 'आत्मसुखाचिया सुरवाडे । विसरता विसरीं न पडे । आठवताही न घडे । आठवु तयाते ' असा प्रकाश शिवकल्याणानी टाकला आहे मला स्मरण असेल तरच परमात्मा आहे, मी विसरलो तर तो नाही, असा भाव एका विशिष्ट पातळीवर असू शकत नाही 'एव आठवाविसराहून । दशा बाणली असाधारण । तें आठवें विसरें करून । कुठित नव्हे ' म्हणून, आठवण व विस्मरण या दोन्ही अवस्थात प्रभू पूर्ण सत्तावत आहे स्मरण व विस्मरण यातून तोच चमकत आहे

१३९२ क्षर अक्षर हे तुमचे विभाग । कासयानें जग दुरी धरा ॥ १ ॥
तैसे आम्ही नेणो पालटेंच कांहीं । त्यागिल्याची नाहीं मागें चाड ॥ २ ॥
प्रतिपादिता तूं समविषमाचा । प्रसाद तो याचा पापपुण्य ॥ ३ ॥
तुका म्हणे तुम्हा नाना अवगणीं । लागे सपादणी लटिकियाची ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा ·--क्षर-नाशवत जग, अक्षर-शाश्वत सत्य तत्त्व, चाड-इच्छा, अवगणी-सोंग, लटिकियाची-खोट्याची

अर्थ ·--देवा, हे नाशवत दिसणारे जग व शाश्वत स्वरूपाचे तत्त्व या दोन्ही रूपांनी तुम्हीच असताना मग या व्यक्त व नाशवत जगास वेगळे का ठेवता ? १ आम्ही मात्र शाश्वत जगाचा पालट नाशवत जगात मानीत नाही या दोहोंत फरकच करीत नाही जे आम्ही टाकून दिले त्याची इच्छाही आम्ही करणार नाही, आम्ही आमच्या स्थितीत फरक होऊ देणार नाही २ क्षर, अक्षर, व्यक्त, अव्यक्त इत्यादींबद्दल समत्वाने तू प्रतिपादन कर हाच पापपुण्याविषयीचा प्रसाद मानावा लागेल ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तुम्हास नाना प्रकारची सोंगे धारण करून खोट्याची खरी बतावणी करावी लागते ४

१३९३ सर्वरसीं मीनलें चित्त । अखडित आनदु ॥ १ ॥
गोत पति विश्वभरीं । जाला हरि सोयरा ॥ २ ॥
वोळखी ते एका नावे । इतरभावे खंडणा ॥ ३ ॥
तुका म्हणे नावें रूपें । दुसरीं पापें हारपलीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा -मीनलें-समरस झाले, तल्लीन बनले, गोत-नातेवाईक, खडणा-नाश, अभाव

अर्थ · विविध रूपांनी असणाऱ्या हरिरसाच्या ठायी माझे चित्त समरस झाले आहे त्यामुळे चित्तात अखंड रूपाचा आनंद भरून राहिला आहे १ माझे सर्व नातेवाईक, धनी हे सर्व या विश्वंभरामध्येच सामावलेले आहेत. हा श्रीहरीच आमचा सोयरा बनलेला आहे २ आता आम्हांस सर्वांची ओळख आहे ती या विठ्ठलाच्याच नावाची आहे इतर सर्व भावनांचा या नात्यांचा अभावच आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तुमच्या नावाच्या व रूपाच्या चिंतनाने इतर सर्व पापे नष्ट झाली आहेत ४

१३९४ मीं हें ऐसे काय जातो । अवघड कित्ती पाहाता ॥ १ ॥
नाहीं होत उल्लघन । नसता भिन्न दुसरें ॥ २ ॥
अंधारानें तेज नेलें । दृष्टीखालें अतर ॥ ३ ॥
तुका म्हणे सर्वे देव । घेता ठाव दावील ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा - जाती-प्रकार, सर्वे-बाह्य, सगळीत, ठाव-निजस्वरूप

अर्थ – मीपणाचे खरे स्वरूप काय आहे ? त्याचा प्रकार तरी कसला आहे ? याचा विचार करून पाहाता तो फारच कठिण आहे असे दिसून येईल १ वास्तविक पाहाता सर्वव्यापक अशा आनंदघन प्रभूपेक्षा मी निराळा

नसूनही आपणास मोठेपणाच्या जाणिवेचे, निराळेपणाचे उल्लंघन होत नाही २ अज्ञानाच्या अंधाराने आत्मस्वरूपाचे तेज नाहीसे होते, त्यामुळे दृष्टीत अंतर पडत असते ३ तुकाराम महाराज म्हणतात, पण देवाची संगत करून त्याचे साह्य घेतल्यावर मात्र मीपण हे निजस्वरूपाहून वेगळे नाही अशी जाणीव तोच निर्माण करील ४

१३९५ कवीश्वराचा तो आम्हांसी विटाळ । प्रसाद वोंगळ चिवडिती ॥ १ ॥
दंभाचे आवडी बहिराट अंधळे । सेवटासि काळें होइल तोंड ॥ २ ॥
सोन्यासेजारीं तो लाखेची जतन । सतत ते गुण जैसेतैसे ॥ ३ ॥
सेव्यसेवकता न पडता ठावी । तुका म्हणे गोवी पावती हीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – कवीश्वराचा–अनुकरण करणारे कवी, प्रसाद–सहजसुलभ अर्थ प्रकट करण्याचा गुण, ईश्वरी कृपा, गोवी–बंधन

अर्थ –ईश्वरी कृपेने ज्यांचे काव्य प्रासादिक बनले आहे त्यांच्या कवितांतील निवडक शब्द चिवडून ओंगळपणे जे स्वतःचे काव्य करतात अशा अनुकरणात्मक कवीश्वराचा आम्हाला विटाळच होतो १ यांना दंभाची आवड असल्याने खऱ्या तत्त्वस्पर्शी काव्याविषयी ते बहिरे व आंधळेच असल्याने शेवटी त्यांचे तोंड अपकीर्तीने काळेच होईल २ सोन्याचा दागिना लाखेत जडवलेला असल्याने सोन्यासाठी लाखेचे जतन होत असते पण सोन्याच्या सहवासात राहूनही लाखेचे गुण काही जात नाहीत, ती जशीच्या तशीच सतत राहते त्याप्रमाणेच सत्कवींच्या सहवासानेही अनुकरणप्रिय कवीश्वर कधी भक्तिज्ञानाने संपन्न होत नाहीत ३ जोपर्यंत परमेश्वराविषयीचा सेव्यसेवकतेचा भाव नीटपणे ज्ञात झाला नाही तोपर्यंत त्यांना अशा अनुकरणप्रिय काव्याचे बंधनच होते त्यातून ते बाहेर पडू शकत नाहीत ४

विवरण – संस्कृत साहित्यशास्त्रकारांनी रस, ध्वनी, रीती इत्यादी काव्याची लक्षणे मानली आहेत परंतु मराठी संतांनी कवितेतील रसाबरोबर, ध्वनीबरोबर, जर ईश्वरभक्तीचा वा परतत्त्वाचा स्पर्श नसेल तर त्या काव्यास सत्काव्य मानले नाही, ईश्वराची कृपा, आत्मतत्त्वाचा स्पर्श ही खऱ्या कवितेची लक्षणे त्यांनी मानली आहेत ज्ञानदेवांनीही ' बाचे बरवें कवित्व । कवित्वीं बरवें रसिकत्व । रसिकत्वीं परतत्त्व– । स्पर्शु जैसा ' असं म्हणून काव्याच्या परतत्त्वस्पर्शाचा गौरव केला आहे रामदासांनी तर दासबोधाच्या चौदाव्या दशकामधील तिसऱ्या समासात कवित्व कळा निरूपण ' स्पष्टपणे करताना म्हटले आहे, ' जेणें घडे भगवद्भक्ती । जेणें घडे विरक्ती । ऐसी कवित्वाची युक्ती । आधीं पाहावी ॥ जेणें अनुताप उपजे । जेणें लौकिक लाजे । जेणें ज्ञान उमजे या नाव कवित्व ॥ जेणें ज्ञान हें प्रबळे । जेणें वृत्ती हे मावळे । जेणें भक्तिमार्ग कळे ॥ या नाव कवित्व । जेणें देहबुद्धी तुटे । जेणें भवसिंधु आटे जेणें भगवंत प्रकटे । या नाव कवित्व ' या स्वरूपाची कविता करणारे संतांच्या मते खरे कवी इतर यांच्या कवितांतून शब्द निवडून आपले काव्य सजवतात, त्यात भक्तिप्रेमाचा ओलावा कोठून येणार ? अशा कवीश्वरांचा तुकोबांना विटाळच मानला आहे ' नव्हे हें कवित्व टाकसाळीं नाणें ' कवितेमधील शब्द टाकसाळातील नाण्याप्रमाणे हवे तसे पाडता येत नाहीत, ते भक्तियुक्त अंतःकरणातूनच आपोआप स्फुरावे लागतात असे त्यांनी म्हटले आहे स्वतः तुकांची कविता अशी ईश्वरी कृपेने भरून राहिलेली आहे नुसती कविता कितीही चांगली असली तरी ती काही सायुज्याची या सतरतेची खूण तुकोबांनी मानली नाही एका अभंगात त्यांनी म्हटले आहे, ' नव्हतो ते संत करितां कवित्व । काय कवित्वाची घालुनिया रूढी । करू जोडा जोडी अक्षरांची ' केवळ बुद्धिचातुर्याने कवित्व रचले तरी त्यात ईश्वरी कृपेचा रस कसा येणार ? तुकोबांनीच आणखी एका अभंगात म्हटले आहे ' चातुर्याच्या योगें कवित्व करितो । प्रासादिक रस आणतां नये ' सारांश, भक्तिज्ञान, परतत्त्व, ईश्वरी कृपा यांशिवाय संतांच्या मते कवित्व वृथा आहे

१३९६　वाढलियां मान न मनावी निश्चिती । भूतांचिये प्रीती भूतपण ॥ १ ॥
म्हणऊनि मना लावावी कांचणी । इंद्रियांचे झणी ओढी भरे ॥ २ ॥
एका एकपणें एकाचिये अंगीं । लागे रंग रंगीं मिळलिया ॥ ३ ॥
तुका म्हणे देव निष्काम निराळा । जीवदशे चाळा चळणांचा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– मान–मानमान्यता, भूतांचिये–लोकांच्या.

अर्थ :– लोकांत कितीही मानसन्मान वाढला तरी आपण संतुष्ट होऊन निश्चित राहू नये लोकांच्या प्रीतीमुळे आपलीही अवस्था लोकांच्या प्रमाणे सर्वसामान्य अशी होईल. १ यासाठी आपल्या मनास नेहमी सद्‌विचारांची वा भक्तिप्रेमाची काचणी लावावी, नाही तर ते इंद्रियांच्या ओढीने विविध विषयांनी व्याप्त होईल. २ म्हणून आपले मन फक्त त्या एका परमेश्वराकडे एकत्वाने लावावे म्हणजे त्याचाच रंग त्यावर चढेल. कारण जो रंग त्यास चढवावा तशा रंगाचे ते बनते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, देव हा खरा म्हणजे निष्काम असाच आहे. पण जीवदशेला मात्र नाना कर्मे करण्याचा चाळाच लागलेला असतो. ४

१३९७　माया साक्षी आम्ही नेणों भीड भार । आप आणि पर नाहीं दोन्ही ॥ १ ॥
सत्याचिये साटीं अवघाचि भरे । नावडे व्यापार तुटीचा तो ॥ २ ॥
पोभाळितां[1] चरे अंतरींचें दुःख । लांसें फांसें मुख उघडावें ॥ ३ ॥
तुका म्हणे नव्हे स्फीतीचा हा ठाव । निवाड्यासी देव साक्षी केला ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– आप–आपला, पर–दुसऱ्याचा, पोभाळितां–गोंजारले तर, चरे–जास्त होते, लासें–डाग देऊन, स्फीतीचा–लौकिकाचा, कीर्तीसाठी, ठाव–ठिकाण.

अर्थ :– या भासमान होणाऱ्या मायावी प्रपंचाचे आम्ही साक्षी आहोत. आम्हांला त्याची भीड नाही की कसला भारही वाटत नाही, आणि हा आपला, हा दुसरा असा भेदभावही आम्ही मानीत नाही. १ आम्ही त्या सत्यस्वरूप परमेश्वराचे रूप सर्वत्र भरून असलेले पाहातो, आम्हाला यासेरोज तुटीचा व्यापारच आवडत नाही. २ गळू झाले असता त्यास वरवर गोंजारले तरी आत ते चरून जास्तच होते, म्हणून चायला डाग देऊन, फासण्या टाकून जखमेचे मुख उघडे करावे ३ तुकाराम महाराज म्हणतात, हे ठिकाण काही लौकिक कीर्ती देणारे नाही. वर जो निवाडा मी दिलेला आहे त्यास देव साक्षी आहे. ४

१३९८　संतां आवडे तो काळाचा ही काळ । समर्थाचे बाळ जेवीं समर्थ ॥ १ ॥
परिसतां तेयें नाहीं एकविणे । मोहें न पवे सीण ऐसें राखे ॥ २ ॥
केले अन्याय ते सांडवी उपचारें । न देखें दुसरें नाशा मूळ ॥ ३ ॥
तुका म्हणे मुख्य कल्पतरुछाया । काय नाहीं दया तये ठायीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – काळ–मृत्यू, सीण–त्रास.

अर्थ – जो मनुष्य संताना प्रिय झाला तो प्रत्यक्ष मृत्यूचाही काळ आहे असे समजावे. समर्थ असणाऱ्या राजाचे बालक समर्थच असते की १ या बालकावर त्या एका समर्थ राजाचीच सत्ता असते, त्याला त्रास होणार नाही अशा रीतीने तो त्या बालकाचे रक्षण करीत असतो २ अशा बालकाने जर काही अपराध केला तर मोठ्या सावधगिरीने सौम्य उपचार करून पुन: बालक अपराध करणार नाही, अशी वर्तणूक पिताच करीत असतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, कल्पतरूची छाया मिळणे ही मुख्य गोष्ट श्रेष्ठ प्रकारची आहे. अशा ठिकाणी काय दया वसत नसते ? ४

---

[1] पोभाळिता.

१३९९ संतांच्या धिक्कारें अमंगळ जिणें । विश्वशत्रु तेणें सांडो परि ॥ १ ॥
कुळ आणि रूप यांचा संवसार । गेला भरतार मोकलितां ॥ २ ॥
मूळ राखे तया फळा काय उणें । चतुर लक्षणें राखों जाणे ॥ ३ ॥
तुका म्हणे सायास तो एके ठायीं । दीप हातीं तई अवघें बरें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा.– जिणें–जगणे, सांडो–सोडतो, भरतार–पती, मोकलिता–सोडल्यावर.

अर्थ – संतश्रेष्ठांनी ज्याचा धिक्कार केला आहे त्याचे जगणे ओंगळच मानावे. तो जगाचा शत्रू समजून त्याचा त्याग करावा १ एखाद्या स्त्रीचा तिच्या पतीने त्याग केला असेल तर तिचे रूप आणि कुळ इत्यादी सांसारिक गोष्टी व्यर्थच होत २ झाडाच्या मुळीचेच एकदा रक्षण केल्यावर मग फळांना काय तोटा ? यासाठी कल्याणकारक गोष्टींचे रक्षण करणे हेच चातुर्य आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, जो प्रयत्न करायचा तो योग्य अशा ठिकाणीच करावा अंधारात हातात दिवा असेल तर चांगलेच.४

१४०० ओलें मूळ भेदी खडकाचें अंग । आभ्यासासी सांग कार्यसिद्धि ॥ १ ॥
नव्हे ऐसें कांहीं नाहीं अवघड । नाहीं कईवाड तोंच वरि ॥ २ ॥
दोरें चिरा कापे पडिला कांचणी । अभ्यासें सेवनीं विष पचे ॥ ३ ॥
तुका म्हणे कैंचा बैसण्यासी ठाव । जठरीं बाळा वाव एकाएकीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – कईवाड–मोठा प्रयत्न, कांचणी–भेग, रेघ, जठरीं–गर्भाशयात, वाव–अवसर, जागा, एकाएकी–हळूहळू

अर्थ – झाडाचे मूळ ओलसर असले तरी ते खडकाचे अंतरंग भेदीत जात असते. त्याप्रमाणे सततच्या अभ्यासाने सर्व प्रकारची कार्यसिद्धी होत असते. १ अभ्यास केल्यानंतर अमुक एक गोष्ट अवघड आहे असे काही नाही. जोपर्यंत अभ्यासाचा निश्चय नाही तोपर्यंत गोष्ट कठीण वाटते. २ दोर घासला असताना मोठ्या दगडासही भेग पडू शकते. हळूहळू विष जरी खाल्ले तरी ते सवयीने पचनी पडते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, मातेच्या गर्भाशयात बसण्यास प्रथम जागाही नसते, पण नऊ महिन्यात हळूहळू पूर्ण विकसित बालक राहण्याइतकी जागा निर्माण होत असते ४.

१४०१ अमर आहां अमर आहां । खरें कीं पाहा खोटें हें ॥ १ ॥
न म्हणां देह माझा ऐसा । मग भरवसा कळेल ॥ २ ॥
कैंचा धाक कैंचा धाक । सकळिक हें आपुलें ॥ ३ ॥
देवचि बरे देवचि बरे । तुका म्हणे खरे तुम्ही ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा –धाक–भीती

अर्थ – लोकहो, तुम्ही अमर आहात हे खरे की खोटे याचा पुढीलप्रमाणे नीट विचार करा. १ हा पंचमहाभूतांचा देह माझा आहे असे मात्र कधी म्हणू नका. तरच तुमची अमरत्वाबद्दल खात्री होईल. २ हे सर्व जग आपणच आहोत अशी अनुभूती असेल तर भीती कसली आली आहे ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, तुमचे स्वरूप हे देवाचेच खरे म्हणजे आहे, हे नीट ध्यानात आणा ४

१४०२ काम नाहीं काम नाहीं । जालों पाहीं रिकामा ॥ १ ॥
कायल्या या करूं चेष्टा । निश्चळ द्रष्टा बैसोनि ॥ २ ॥

नसत्या छंदें नसत्या छंदें । जग विनोदें विन्हडतसे[1] ॥ ३ ॥
एकाएकीं एकाएकीं । तुका लोकीं[2] निराळा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – काम-कर्तव्य, चेष्टा-कर्म

अर्थ – मला आता कोणतेही कर्तव्यकर्म करायचे असे राहिले नाही सर्व कर्तव्यकर्मे करून मी आता रिकामा झालो आहे १ आता आत्मस्वरूपी दृष्टी लावून जे काही कर्म दैवयोगाने वाट्यास येईल ते करू २ देहात्मभावाच्या व बाह्य प्रपंचाच्या नसत्या छंदामुळे सर्व जग विनाकारण दुःखानें विव्हळत राहाते ३ तुकाराम महाराज म्हणतात मी मात्र अशा लोकांहून भिन्न व एकटा असा आहे ४

१४०३ हातीं घेऊनिया काठी । तुका लागला कळिवरा पाठी ॥ १ ॥
नेऊनि निजविले स्मशानीं । माणसे जाळी तें ठाकणीं ॥ २ ॥
काढिले तें ओढें । मागील उपचाराचे पुढें ॥ ३ ॥
नाहीं वाटों आला भेव । सुख दुःख भोगिता देव ॥ ४ ॥
याजसाटीं हे निर्वाण । केले कसियेले मन ॥ ५ ॥
तुका म्हणे अनुभव बरा । नाहीं तरी शास्त्र होय चोरा ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – कळिवरा-पंचमहाभूतात्मक देह, ठाकणीं-ठिकाणीं

अर्थ – हातात काठी घेऊन हा तुकाराम पंचमहाभूतात्मक स्थूल देहाच्या पाठीमागे लागला आहे १ ज्या ठिकाणी माणसाना नेऊन जाळतात अशा स्मशानात या देहाला नेऊन निजविले आहे २ या देहाने मागे अनेक प्रकारचा त्रास दिला होता त्याचाच जणू मी आता सूड घेतला आहे ३ याबद्दल मला कसलीही भीती वाटत नाही, कारण सर्व सुखदुःखाचा भोक्ता एक परमेश्वरच आहे ४ याचसाठी मनाचा निग्रह करून या देहाला मी मृत्यू आणला आहे ५ तुकाराम महाराज म्हणतात, या बाबतीत अनुभव घेतलेलाच बरा, नाहीतर हा देह इंद्रियांचा व त्यांच्या विषयांचाच ताबेदार राहील ६

१४०४ कीर्तन चांग कीर्तन चांग । होय अंग हरिरूप ॥ १ ॥
प्रेमाछंदें नाचे डोले । हारपला देहभाव ॥ २ ॥
एकदेशीं जीवकळा । हा सकळा सोयरा ॥ ३ ॥
तुका म्हणे उरला देव । गेला भेव त्या काळें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – चांग-चांगले, भेव-भीती

अर्थ – श्रीहरीचे मनोभावे कीर्तन करणे हीच फार चांगली गोष्ट आहे कारण या कीर्तनाने सर्व देह श्रीहरी-रूप होतो १ यासाठी या श्रीहरीच्याच छंदाने नाचावे डोलावे त्यामुळे देहभाव नाहीसा होईल २ जीवकला ही एकदेशीय असून श्रीहरी मात्र सर्वांचा व्यापकत्वाने सोयरा आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, एकदा हृदयातील भीती नष्ट झाली की एक ईश्वरच उरतो ४

१४०५ न बोलेसी करा वाचा । उपाधीचा संबंध ॥ १ ॥
एका तुमच्या नामाविण । अवघा सीण फळतसे ॥ २ ॥
संकल्पाचे ओढी मन । पापपुण्य संमचि[3] ॥ ३ ॥
तुका म्हणे नारायणा । पावो वाणी विसांवा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – वाचा-वाणी सीण-श्रम

१ विव्हळतसे, २ लोकिकीं, ३ मवे

अर्थ – देवा, माझी वाणी कुणाशीही कधी बोलणार नाही असे करा कारण इतराशी बोलण्याने उपाधी मात्र वाढते १ देवा, तुमच्या एका नामावाचून सर्वत्र त्रासच आहे असे मला कळून आले आहे २ नाना विषयाचे सकल्प मनात निर्माण होतात व त्याच्या ओढीने त्याच्याबरोबरच पापपुण्य तयार होते ३ तुकाराम महाराज म्हणतात, म्हणून माझी वाणी त्या नारायणाच्याच ठिकाणी विसावा घेवो ४

१४०६ प्रारब्धा हातो जन । सुख सीण पावनसे ॥ १ ॥
करिता घायाळाचा सग । अगे अग माखावे ॥ २ ॥
आविसा अगें पीडा वसे । त्यागें असे बहु सुख ॥ ३ ॥
तुका म्हणे जीव भ्याला । अवघ्या आला बाहेरी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – सीण–त्रास, घायाळाचा–जखमी माणसाचा, आविसा–आमिषाच्या

अर्थ –प्रारब्धाच्यामुळेच लोकाना अनेक प्रकारची सुखदु खे भोगावी लागतात १ जखमी माणसास आलिंगन दिले तर त्याच्या रक्ताळलेल्या अगाच्या स्पर्शाने आपलेही अग माखून जाईल २ आमिषाच्या आशेने प्राण्याना दु खच भोगावे लागते त्याच्या त्यागातच माणसास सुख आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, या सर्व प्रकारानी माझा जीव भयभीत झाला, म्हणून मी या जजाळातून बाहेर येण्याचा प्रयत्न केला ४

१४०७ आशा ते करविते बुद्धीचा लोप । सदेह ते पाप कैसे नव्हे ॥ १ ॥
आपला आपण करावा विचार । प्रसन्न ते सार मन ग्वाही[1] ॥ २ ॥
नावे रूपें अगीं लाविला विटाळ । होते त्या निर्मळ शुद्ध बुद्ध ॥ ३ ॥
अधळयाने नये देखण्याची चाली । चाली ऐसी बोली तुका बोले ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – सदेह–सशय

अर्थ – विचारी असणाऱ्या बुद्धीचा लोप आशाबद्ध मन करून टाकते बुद्धीत सशय निर्माण होणे हे पाप नव्हे काय ? १ यासाठी आपल्या उद्धाराचा विचार आपणच करावा मनाची प्रसन्नता हे सार आहे अशी खात्री असावी २ वस्तुत आत्मस्वरूप हे शुद्ध, निर्मळ आणि बुद्ध असे होते परंतु अविवेकाच्या नामरूपाचा व देहात्मबुद्धीचा त्याला विटाळ झाल्याने ते मलीन झाले ३ आधळ्या माणसाना डोळस माणसाप्रमाणे चाल करता येत नाही, म्हणून तुकाराम महाराज म्हणतात, आम्ही त्याना मार्ग दिसेल असे बोलणे करीत असतो ४

१४०८ जळो आता नाव रूप । माझें पाप गाठींचे ॥ १ ॥
सताचिया चरणरजें । उतरू ओझें मातीचे ॥ २ ॥
लटिकियाचा अभिमान । होता सीण पाववित ॥ ३ ॥
तुका म्हणे अरूपींचे । सुख साचे निनावे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – चरणरजें–चरणावरील धुळीने, मातीचे–देहात्मबुद्धीचे, साचे–सत्य स्वरूपाचे

अर्थ – नामरूपाच्या देहाचा अभिमान मला आहे, पण हे माझ्या बुद्धीतील पाप जळून जावो १ सत श्रेष्ठांच्या चरणावरील धुळीने माझ्यावरील देहबुद्धीचे हे ओझे कमी होईल २ खोट्या देहाचा अभिमान फारच त्रासदायक वाटत होता ३ तुकाराम महाराज म्हणतात नामरूपरहित असणाऱ्या परमेश्वराचे सुख हेच खरे सुख होय ४

१४०९ निंदा स्तुती करवी पोट । सोंग दाखवी योमाट ॥ १ ॥
जटा राख विटवना । घोर नाहीं क्षमा मना ॥ २ ॥

[1] माही

शृंगारिले मढें । जीवेंविण जैसें कुडें ॥ ३ ॥
तुका म्हणे रागें । मलतें चावळे वाउगें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – कुडें–वाईट

अर्थ – नित्य कुणाची तरी निंदा अथवा स्तुती करावी, काहीतरी सोंग आणावे, स्वतःच्या कीर्तीचा बडेजाव माजवावा, हे सर्व पोटासाठी लोक करतात १ ज्याच्या मनात धीर नाही, क्षमा नाही, त्याच्या शरीरावर भरपूर राख फासलेली असली आणि त्याने जटा वाढविल्या असल्या तरी ती सर्व विटंबनाच होय २ प्राण नसलेले शरीर अथवा प्रेत जरी दागदागिन्यांनी कितीही शृंगारले तरी ते वाईटच दिसते ३ तुकाराम महाराज म्हणतात, जो नेहमी रागाने मलमलते बोलतो ते व्यर्थच होय ४

१४१० भिक्षापात्र अवलंबणे । जळो जिणे लाजिरवाणे । ऐसियासी नारायणे । उपेक्षीजे सर्वथा ॥१॥
देवा पायीं नाहीं भाव । भक्ति वरी वरी वाव । समर्पिला जीव । नाहीं तो हा व्यभिचार ॥२॥
जगा घालावें साकडें । दीन होऊनि बापुडें । हेंचि अभाग्य रोकडें । मूळ आणि विश्वास ॥३॥
काय न करी विश्वंभर । सत्य करिता निर्धार । तुका म्हणे सार । दृढ पाय धरावे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – उपेक्षिजे–उपेक्षा करतो, दुर्लक्ष करतो, वाव–व्यर्थ, साकडें–संकट

अर्थ – देवाच्या नावावर जे इतरांकडून भिक्षा मागत हिंडतात त्यांचे जिणे अत्यंत लाजिरवाण्या स्वरूपाचे असते. त्याला आग लागो अशा प्राण्याची नारायण नेहमीच उपेक्षा करतो १ कारण यांचा देवाच्या पायाशी कधीच भाव नसतो वरवर कर्मे ते व्यर्थच करीत असतात, पण जोपर्यंत आपला जीव श्रीहरीला समर्पित झालेला नाही तोपर्यंत असे वागणे एक प्रकारचा व्यभिचारच नव्हे काय ? २ आपण दीन बुद्धीने देवाच्या नावाने जगाला संकट घालावे हे फार मोठे दुर्भाग्यच आहे कारण याचे मूळ देवावरचा अविश्वास हेच होय ३ तुकाराम महाराज म्हणतात, या विश्वंभराचे पाय दृढ भावाने धरल्यावर निर्धाराने त्याची भक्ती केल्यावर काय होणार नाही ? म्हणून त्याचे पाय दृढ भावनेने धरावेत हेच सर्व साधनाचे सार आहे ४

१४११ भावबळें विष्णुदास । नाहीं नाश पावत ॥ १ ॥
योगभाग्यें घरा येती । सर्व शक्ति चालत ॥ २ ॥
पित्याचें जें काय[1] धन । पुत्रा कोण वचील ॥ ३ ॥
तुका म्हणे कडे बैसों । तेणे असों निर्भर ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – वचील–फसवील, निर्भर–तृप्त

अर्थ – भक्तीच्या बळावर हरिभक्ताचा नाश कधीच होत नाही १ सर्व प्रकारचे योग व भाग्य आणि सर्व शक्ती आपण होऊन चालत घरी येतात २ पित्याचे जे काय धन असेल ते त्याच्या मुलासच मिळणार त्याला या बाबतीत कोण फसवील ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, आम्ही श्रीहरीच्या कडेवर बसून तृप्त होऊ ४

१४१२ कोरड्या गोष्टी चटक्या बोल । शिकल्या मागें नाहीं ओल ॥ १ ॥
कोण याचें मना आणि । एकों कानीं नाइकोनि ॥ २ ॥
घरोघरीं सांगती ज्ञान । भूत सिणे कांडिती ॥ ३ ॥
तुका म्हणे आपुल्या मति । काय रितीं पोकळें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – ओल–श्रीहरीविषयी प्रेम, सिणे–शिणतात, त्रास घेतात

१ का

अर्थ :– श्रीहरीविषयी मनात प्रेम नसताना हा मनुष्य जे काही थोडेफार शिकला आहे त्याच्या आधारावर काही गोष्टी व चावटपणाचे काही बोल लोकांना उगाच सांगत असतो. १ असल्या या मूढ माणसाचे सांगणे कोण मनावर घेईल ? कानांनी ऐकले न ऐकले असेच लोक करतील. २ असे हे लोक घरोघर जाऊन ब्रह्मज्ञान सांगतात, पण त्याचे सांगणे हे भुसा काढल्याच्या परिश्रमाप्रमाणेच व्यर्थ आहे. ते उगाचच श्रम घेतात. ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा अल्प मतीच्या लोकाकडून त्यांच्या बुद्धीतून जे ज्ञान बाहेर येते ते निरर्थक व पोकळच असते. ४

१४१३ नव्हतियाचा सोस होता । झडो आतां पदर ॥ १ ॥
देखणें तें देखियेलें । आतां भलें साक्षित्वें ॥ २ ॥
लाभें कळो आली हानि । राहों दोन्हीं निराळीं ॥ ३ ॥
तुका म्हणे एकाएकीं । हा कां लोकीं पसारा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– पदर–संबंध.

अर्थ :– अस्तित्वातच नसणाऱ्या बाह्य लौकिकाचा, देहबुद्धीचा, प्रपंचाचा सोस आजपर्यंत होता, पण आता मात्र त्याचा सर्व संबंध तुटला आहे १ जे सत्य स्वरूपाचे ब्रह्मतत्त्व पाहायचे होते ते आता मी नीट साक्षित्वाने पाहिले आहे, अनुभवले आहे २ या अलौकिक लाभामुळे आजवरच्या हानीचे स्वरूप नीटपणे ध्यानी आले. मी आता लाभहानीच्या पेक्षा निराळाच राहणार आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी आता या चित्स्वरूपाच्या अनुसंधानात एकाएकीच आहे. हानिलाभाचा हा बाह्य पसारा व्यर्थ का मांडू ? ४

१४१४ सोसें वाढे दोष । जाला न पालटे कस ॥ १ ॥
ऐसें बरवें वचन । करितां[1] तें नारायण ॥ २ ॥
असे[2] प्रारब्ध नेमें । श्रमचि उरे श्रमें ॥ ३ ॥
सुख देतें शांती । तुका म्हणे धरितां चित्तीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– सोसें–हव्यासाने, कस–गुण, रंग.

अर्थ :– बाह्य लौकिकाच्या व प्रपंचाच्या हव्यासाने मनोविकारांचे दोषच वाढतात आणि एकदा चित्तात दोष निर्माण झाला म्हणजे त्याचा रंग काही बदलत नाही. १ म्हणून कर्तृत्वाचा अभिमान स्वतः न धरता सर्व काही नारायणच करीत असतो, असे म्हणणे बरे २ प्रारब्धाच्यामुळेच सर्व सुखदुःखे प्राप्त होतात, त्यामुळे त्याच्या प्राप्तीसाठी श्रम केले तरी शेवटी कष्टच तेवढे उरतात ३ तुकाराम महाराज म्हणतात, चित्तामध्ये शांती धारण केली की मग सर्व सुखाची प्राप्ती होत असते. ४

१४१५ काय शरीरापें काम । कृपा साधावया प्रेम । उचिताचे धर्म । भागा आले ते करूं ॥ १ ॥
देईन हाक नारायणा । तें तों नाकळे बंधना । पंढरीचा राणा । आइकोन धांवेल ॥ २ ॥
सातांपांचांचे गोठलें । प्रारब्धें आकारलें । आतां हें संचलें । असो भोगा सांभाळीं ॥ ३ ॥
फावली[3] ते बरवी संधि । सावधान करूं बुद्धी । तुका म्हणे मधीं । कोठें नेघें विसावा ॥४॥

शब्दार्थ व टीपा :– सातांपांचांचे–सप्त धातूंचे व पंच महाभूतांचे; रस, रक्त, मांस, मेद, अस्थि, मज्जा आणि शुक्र हे सात धातू आणि पृथ्वी, आप, तेज वायू आणि आकाश ही पाच महाभूते.

अर्थ :– श्रीहरीची कृपा साधण्यासाठी या शरीराचे एवढे काय काम आहे ? आमच्या दैवयोगे या कृपेचे धर्म जे वाट्यास आले ते आम्ही नेहमी करू १ त्या नारायणाला मोठ्या प्रेमाने हाक मारीन, मग ही संसारबंधनें मोकळी होतील आणि तो पंढरीचा राणा श्रीहरी माझी हाक ऐकून वत्सलतेने धावत येईल. २ सप्तधातू व

[1] करितो, [2] असो, [3] पावली

धावून येतो व भक्ताचा निवास आपल्या वास्तव्यान व्यापून टाकतो चिंतनाने, भक्तीने ज्याचे शरीर शुद्ध व पवित्र झाले आहे, तेच त्याचे अधिष्ठान असते तेथेच त्याची वस्ती असते २ आपल्या भक्ताच्या मनात ज्या कल्पना निर्माण होतात त्यांचा साक्षी तो श्रीहरीच आहे तो आपल्या भक्ताकडे मोठ्या आदराने पाहात असतो व त्यानी दिलेले जाडेभरडे व कोरडे धान्य मोठ्या आवडीने मटामटा खात असतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, हा श्रीहरी आपल्या भक्ताच्या मनातील भाव ओळखून विविध उपायानी त्याचे रक्षण करतो व त्याना आपल्या स्वरूपात मिळवून घेतो ४

१४१७ नाहीं आले भक्तिसुख अनुभवा । तो मी ज्ञान देवा काय करूं ।। १ ।।
नसावें जी तुम्ही काहीं निश्चिंतीनें । माझिया वचनें अभेदाच्या ।। २ ।।
एकाएकी मन नेदी समाधान । देखिल्या चरण वांचूनिया ।। ३ ।।
तुका म्हणे वाचा गुणीं लाचावली । न राहे उगली मौन्य मज ।। ४ ।।

शब्दार्थ व टीपा – नेदी–देत नाही उगली–उगी

अर्थ – देवा, जोपर्यंत भक्तिसुखाची गोडी माझ्या वाट्यास आलेली नाही तोपर्यंत ब्रह्मज्ञान घेऊन मी काय करू ? १ देवा माझे हे अभेदाचे वचन ऐकून तुम्ही कधी निश्चिंत होऊ नये २ देवा, तुमचे चरण पाहिल्यावाचून माझ्या या एकाकी मनास काही समाधान होणार नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, माझी ही वाणी तुमचे गुण वर्णन करण्यासाठी लालचावलेली आहे तो काही उगी राहाणार नाही, तो मला मौन राहू देणार नाही ४

१४१८ मागतां विभाग । कोठें लपाल जी मग ।। १ ।।
संत साक्षी या वचना । त्यासी ठाउकिया खुणा ।। २ ।।
होइन धरणेकरी । मग मी रिघों नेदीं बाहेरी ।। ३ ।।
तुका म्हणे मी अक्षर । तुज देवपणाचा भार ।। ४ ।।

शब्दार्थ व टीपा – विभाग–वाटा

अर्थ – देवा मी निजबोधाचा वाटा तुमच्याजवळ जर मागितला तर मग तुम्ही कुठे लपून बसाल ?तुम्हाला तो द्यावाच लागेल १ तुमच्याकडे आमचा वाटा आहे यास संतवचनांची साक्ष आहे त्याना या सर्व खुणा माहीत आहेत २ देवा मी तुमच्या दारातच धरणे धरीन व मग मात्र तुम्हाला बाहेर जाऊ देणार नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात देवा, मी अक्षरस्वरूप आहे आणि तुमच्यावर देवपणाचा भार आहे तेव्हा माझ्यापुढे तुमचे काही चालणार नाही ४

१४१९ मिटवण्याचे[1] धनी । तुम्ही व्यवसाय जनीं ।। १ ।।
कोण पडे ये लिगाडीं । केली तसीं उगवा कोडीं ।। २ ।।
केले सांगितलें काम । दिलें पाळूनिया धर्म ।। ३ ।।
तुका म्हणे आतां । असो तुमचे आमचे माथां ।। ४ ।।

शब्दार्थ व टीपा – लिगाड–भानगड, उगवा–सोडवा

अर्थ – देवा, भक्ताच्या पाठीमागे दु खमय प्रपचादिकाचा जो त्रास लागला आहे तो मिटविण्याचे सामर्थ्य तुमच्यातच आहे १ तुमच्या या भानगडीत कुणी पडावे ? अथवा या ससाराच्या दु खाच्या भानगडीत कोण पडेल? देवा तुम्हीच या ससाराचा गुता निर्माण केला आहे तो सोडवा आता २ तुम्ही जे धर्मनीतीचे नियम पाळण्याचे काम सागितले होते ते मी नीटपणे केले आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, आता तुमची जबाबदारी तुमच्याच माथ्यावर असू द्या ४

१ मी ठवण्याच धणी

अर्थ – या श्रीहरीचे पाय हे ठिकाणच असे आहे की, येथून सर्व जगताचे भाव दिसतात १ या देवाच्या चरणाचे स्थान उचावर असून माझ्या भावाचे अधिष्ठान तेच झाले आहे २ विविध प्रकारच्या आघातापासून निराळे व निर्भय असे हे स्थान आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, असे हे अढळ स्थान मी मनात धरून राहिलो आहे ४

१४२४ भरला दिसे हाट । अवघी वाढली खटपट । सचिताचे वाट । वाटाऊनि फाकती ॥ १ ॥
भोगा ऐसे ठायाठाव । कर्मा त्रिविधाचे भाव । द्रष्टा येथें देव । विरहित संकल्पा ॥ २ ॥
दिला पाडूनिया धडा । पापपुण्यांचा निवाडा । आचरती गोडा । आचरणें आपुलाल्या ॥३॥
तुका म्हणे पराधीनें । जालीं ओढलिया ऋणें । तुटती बंधनें । जरि देवा आळविते ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – हाट–बाजार, कर्मा त्रिविधाचे–यज्ञ, दान व तप या तीन कर्मांचे

अर्थ – हे जग म्हणजे सर्व प्रकारच्या जीवांनी भरलेला एक बाजार आहे त्यात अनेक प्रकारच्या क्रियांची खटपट नित्य होत राहते ज्याच्या त्याच्या सचितप्रमाणे जो तो आपल्या गतीला प्राप्त होतो १ ज्याचा जसा भोग व पूर्वजन्मीचे त्रिविध कर्मात्मक पापपुण्य असेल त्याप्रमाणे त्याला स्थान प्राप्त होते संकल्पविरहित असणारा परमेश्वर याला साक्षी आहे. २ याच देवाने माणसाच्या मागे पापपुण्याचा मार्ग लावून दिला आहे ज्याला ज्या कर्माची गोडी असेल त्याप्रमाणे तो आचरण करीत असतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, याप्रमाणे लोक आपल्या प्रारब्धाच्या ओढीने पराधीन झालेले असतात, पण ते जर ईश्वरास आळवतील तर ते सर्व बंधनातून मुक्त होतील ४

१४२५ आला भागासी तो करीं वेवसाव । परि राहो भाव तुझ्या पायीं ॥ १ ॥
काय चाले तुम्ही बांधले दातारा । वाहिलिया भारा उसतितो ॥ २ ॥
शरीर तें करी शरीराचे धर्म । नको देऊं वर्म चुको मना[1] ॥ ३ ॥
चळण फिरवी ठाव वहुवस । न घडो[2] आळस चिंतनाचा ॥ ४ ॥
इंद्रियें करोत आपुले व्यापार । आवडीसी थार देईं पायीं ॥ ५ ॥
तुका म्हणे नको देऊं काळा हातीं । येतो काकुलती म्हणऊनि ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – उसतितो–माग चालतो, भोगतो, चळण–चलनवलन, हालचाल, क्रिया, ठाव–स्थान ठिकाण, थार–आश्रय

अर्थ –देवा, माझ्या वाटपाला जें जें कर्म आले आहे, जो व्यवसाय आला आहे तो मी मनोभावे करीनच, पण माझा भाव मात्र तुझ्या पायीच दृढ होऊन राहो १ अहो दातारा, तुम्ही आमच्या कर्मसूत्रांनी आम्हांस बांधले असल्यामुळे आमचे काय चालणार आहे ? आम्ही आमच्या कर्मांचा भार डोक्यावर घेऊन आमचा मार्ग चालीत असतो सर्व कर्मफळे भोगतो २ आमचे शरीर शरीरधर्माप्रमाणे आपले कर्म करो, पण देवा, तुझ्या चिंतनाचे मर्म मात्र चुकू देऊ नकोस ३ देहाची इंद्रिये आपापल्या स्वभावानुसार शरीर अनेक ठिकाणी फिरवतात, पण तुमच्या चिंतनात मात्र यामुळे आळस निर्माण होऊ नये ४ कर्मेंद्रिये आपापल्या स्वभावाप्रमाणे आपापले व्यापार करोत, पण देवा, तुझ्याबद्दल मला जी प्रीती वाटते तिला मात्र तुझ्या पायांसीच आश्रय मिळावा ५ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तू मला काळाच्या स्वाधीन करू नकोस मी यासाठी तुझी करुणा भाकीत आहे ६

१४२६ आम्हां अवघें भांडवल । येथें[3] विठ्ठल एकला ॥ १ ॥
कायावाचामनोभावें । येथें जीवें वेचलों ॥ २ ॥
परतें काहीं नेणें दुजें । तत्त्ववीजें पाउलें ॥ ३ ॥
तुका म्हणे सतसंगें । येणें रंगें रंगलों ॥ ४ ॥

१ मज, २ पडो, ३ एक

१४२० समर्पिली वाणी । पांडुरंगीं घेते धणी ॥ १ ॥
पूजा होते मुक्ताफळीं । रस ओविया मंगळीं ॥ २ ॥
धार अखंडित । ओघ चालियेला नित्य ॥ ३ ॥
पूर्णाहुति[1] जीवें[2] । तुका घेऊनि ठेला भावें[3] ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – धणी–तृप्ती, ठेला–राहिला

अर्थ – मी माझी वाणी या पांडुरंगालाच समर्पण केली आहे ती त्याच्याच गुणगानात तृप्त होते, १ या रसयुक्त ओव्यानी मी त्याचे गुण गातो या ओव्या म्हणजेच मोती असून त्याच्या योगानें श्रीहरीची मंगल पूजा होत असते २ अशा प्रकारच्या चिंतनाची धार अखंडित असून तिचा ओघ एकसारखा चाललेला आहे ३ तुकाराम-महाराज म्हणतात, अशा या भजनरूपी यज्ञात मी माझ्या जीवाची आहुती देऊन मोठ्या भक्तीने आत्मस्वरूपाच्या जाणिवेचा प्रसाद घेऊन मी तृप्त होऊन राहिलो आहे ४

१४२१ अवघाचि आकार ग्रासियेला काळें । एकचि निराळें हरिचे नाम ॥ १ ॥
धरूनि राहिलों अविनाश कंठीं । जीवन हें पोटीं सांटविलें ॥ २ ॥
शरीरसंपत्ति मृगजळभान । जाईल नासोन खरें नव्हे ॥ ३ ॥
तुका म्हणे आतां उपाधीच्या नावें । आणियेला देवें वीट मज ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – अविनाश–नष्ट न होणारे, मृगजळभान–मृगजळाच्या भासाप्रमाणे.

अर्थ – या देहाचा व जगाचा जेवढा म्हणून दिसणारा आकार आहे तो सर्व काळाने ग्रासून टाकलेला आहे एक श्रीहरीचे नाम तेवढ निराळे आहे १ म्हणून मी ते कधीही नष्ट न होणारे श्रीहरीचे नामच कंठी धारण केले आहे असेच जीवन मी माझ्या हृदयात साठविले आहे २ ही शरीरसंपत्ती मृगजळाच्या भासाप्रमाणे आहे क्षणात ती नाहीशी होईल तिचे रूप हे काही खरे नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, आता देहादी विषय व प्रपंच याच्या उपाधींचा देवाने मला वीटच आणला आहे ४

१४२२ बोलणेंचि नाहीं । आतां देवाविण कांहीं ॥ १ ॥
एकसरें केला नेम । देवा दिले क्रोध काम ॥ २ ॥
पाहेन ते पाय । जोवरि हे दृष्टि धाय ॥ ३ ॥
तुका म्हण मनें । हेचि संकल्प याहाणे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – एकसरे–एकसारखा, धाय–तृप्त होईल.

अर्थ – आता या एका देवाशिवाय आम्हांला दुसरे काही बोलायचेच नाही १ असाच मी एकसारखा नियम करून देवालाच कामक्रोध अर्पण केले आहेत २ जोपर्यंत माझी दृष्टी तृप्त होईल तोपर्यंत मी या देवाचे पाय पाहात राहीन ३ तुकाराम महाराज म्हणतात, माझ्या मनातही हाच संकल्प नित्य होत असतो ४

१४२३ येयूनिया ठाव । अनघे लक्षायाचे भाव ॥ १ ॥
उंची देवाचे चरण । तेथें जाले अधिष्ठान ॥ २ ॥
आयातायेगळा । असे ठाव हा निराळा ॥ ३ ॥
तुका म्हणे स्थळ । धरूनि राहिलो अचळ ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – ठाव–ठिकाण, अचळ–अढळ

---

१ हाउनि, २ जीव, ३ भाव

शब्दार्थ व टीपा – वेचलों–खर्च झालो, अर्पण झालो, परतें–दुसरे, दुजें–दुसरे.

अर्थ – एक श्रीविठ्ठल हेच आमचे भांडवल आहे १ कायावाचामनेकरून आम्ही आमचा जीव त्याच्या ठिकाणी अर्पण केला आहे जीवभावाने आम्ही अर्पण झालो आहोत २ ब्रह्मतत्त्वाचे बीज म्हणजे या विठ्ठलाची पाऊले होत त्याच्या खेरीज मी दुसरे काहीही जाणीत नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, सताच्या सहवासामुळे मी श्रीविठ्ठलाच्या चरणाच्या प्रेमभावात रगून गेलो आहे ४

१४२७ साहोनिया टोले उरवावे सार । मग अंगीकार खऱ्या मोलें ॥ १ ॥
भोगाचे सांभाळीं द्यावे कळिवर । संचिताची थार मोडूनिया ॥ २ ॥
महत्त्वाचे ठायीं भोगावी अप्रतिष्ठा । विटवावे नष्टा पचभूता ॥ ३ ॥
तुका म्हणे मग कैचा सवसार । जयाचा आदर तेंचि व्हावें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – टोलें–आघात, भोगाचे–प्रारब्धाच्या, कळिवर–देह, थार–स्थान, आश्रय

अर्थ – जगाचे नाना आघात सहन करून सारतत्त्वाला जपावे, मगच खरे मोल ध्यानात घेऊन देव त्याचा अगिकार करतो १ आपला देह प्रारब्धाच्या स्वाधीन करावा, त्यामुळेच सचित कर्माचे स्थान मोडले जाते २ ज्या ठिकाणी आपणास महत्त्व आहे, त्या ठिकाणी अप्रतिष्ठा करवून घ्यावी व आपल्या पचमहाभूतात्मक नष्ट होणाऱ्या देहाची विटवना करावी ३ तुकाराम महाराज म्हणतात, मग असे केल्याने कुठला आला आहे लौकिक ससार ? यामुळे ज्या श्रीहरीविषयी आपणास आदर वाटतो, त्याच्याच रूपाशी आपण एकरूप होऊन जातो ४

१४२८ निर्वैर होणे साधनाचे मूळ । येर ते विल्हाळ साडीमाडी ॥ १ ॥
नाहीं चालो येत सोंगसपादणी । निवडे अवसानीं शुद्धाशुद्ध ॥ २ ॥
त्यागा नाव तरी निर्विषयवासना । कार्यकारणापुरते विधि ॥ ३ ॥
तुका म्हणे राहे चिंतनीं आवडी । येणे नावे जोडी सत्यत्वेंशीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – निर्वैर–शत्रुत्वरहित अवस्था, साडीमाडी–प्रयत्न, खटाटोप, विल्हाळ–उगाच, व्यर्थ, अवसानीं–आयुष्याच्या शेवटी

*अर्थ – सर्व प्राणिमात्राच्या विषयी शत्रुत्वरहित अवस्था प्राप्त होणे, हेच सर्व साधनाचे मूळ आहे याखेरीज इतर सर्व खटाटोप व्यर्थ होत १ या बाबतीत कसल्याही प्रकारची सोंगसंपादणी चालत नाही आयुष्याच्या शेवटी शुद्ध कोणते, अशुद्ध कोणते, याचा निवाडा होतोच २ विविध विषयातून वासनामुक्त होणे व केवळ कार्यकारणापुरतेच विधींचे सेवन आहे, यासच खरा त्याग म्हणतात ३ तुकाराम महाराज म्हणतात त्या प्रभूच्या चिंतनाविषयी आवड निर्माण व्हावी, यावमुळेच खरा लाभ होत असतो ४*

१४२९ पशु ऐसे होती ज्ञानी । चर्वणीं या विषयाचे ॥ १ ॥
ठेवूनिया लोभीं लोभ । जाला क्षोभ आत्मायीं ॥ २ ॥
केला आणिका वाढी पाक । खाणें ताक मूर्खांसी ॥ ३ ॥
तुका म्हणे मोठा घात । वाताहात हा देह ॥ ४

शब्दार्थ व टीपा – चर्वणीं–वारवार सेवन केल्यामुळे, आत्मायीं–आत्मतत्त्वाच्या जाणिवेत, पाक–स्वयपाक.

अर्थ – इंद्रियाच्या विषयाचे वारवार सेवन केल्यामुळे ज्ञानी माणसेसुद्धा पशूसारखे वर्तन करू लागतात १ इंद्रियांच्या विषयांवर लोभ जडविला की आत्मतत्त्वाच्या जाणिवेत कमतरता येते, क्षोभ निर्माण होतो २ मूर्ख मनुष्य चांगला सुग्रास स्वयपाक करतो व दुसऱ्यांना वाढून आपण मात्र ताक पिऊन भूक भागवतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा प्रकारच्या ज्ञानी माणसांनी मोठाच घात केलेला आहे यांच्यामुळे देहाची वाताहत होत असते ४

विवरण–इंद्रियसुखाचे सतत चिंतन करून त्याचा लोभ संपादन करण्याने ज्ञानी माणसाची बुद्धी कशी नष्ट होते, त्याचा सर्वस्वी घात कसा होतो याचे मोठे समर्पक वर्णन भगवद्गीतेच्या दुसऱ्या अध्यायात केले आहे खरा ज्ञानी, खरा स्थितप्रज्ञ आपल्या इंद्रियांच्या वृत्ती पूर्ण ताब्यात ठेवीत असतो, उलट खोटा ज्ञानी पुरुष इंद्रियसुखाच्या आहारी गेल्याने त्याची वाताहतच होत असते गीतेमध्ये ही शृंखला मांडताना म्हटले आहे– ' ध्यायतो विषयान्पुंस सगस्तेषूपजायते । संगात्संजायते कामः कामात्क्रोधोऽभिजायते ॥ क्रोधाद्भवति सम्मोहः सम्मोहात्स्मृतिविभ्रमः । स्मृतिभ्रंशाद् बुद्धिनाशो बुद्धिनाशात्प्रणश्यति ' विषयाचे एकसारखे चिंतन करणाऱ्या पुरुषाचा या विषयाच्या ठिकाणी संग म्हणजे सलगी वाढते व या संगापासून या विषयाच्या प्राप्तीबद्दलची वासना निर्माण होते आणि ही वासना पूर्ण होण्यात अडथळा उत्पन्न झाला की, क्रोध येतो क्रोधापासून संमोह म्हणजे अविवेक, अविवेकापासून स्मृतिभ्रंश, स्मृतिभ्रंशापासून बुद्धिनाश व बुद्धिनाशापासून पुरुषाचा सर्वस्वी घात होतो, असा गीतेचा निष्कर्ष आहे

१४३० का जी धरिले नाम । तुम्ही असोनि निष्काम ॥ १ ॥
कोणा सांगतसा ज्ञान । ठकाठकीचे लक्षण ॥ २ ॥
आवडीने नाचे । आहे तरी पुढें साचे ॥ ३ ॥
तुका म्हणे प्रेम । नाहीं भंगायाचे काम ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – ठकाठकीचे–फसविण्याचे, साचे–खरे, काम–कारण

अर्थ,– देवा, निर्गुणनिराकार व कामनारहित जर तुम्ही आहात तर नामावा तरी स्वीकार का केला आहे ? १ आपण नामरूपाशिवाय आहोत असे ज्ञान तुम्ही कुणाला सांगता ? हे सर्व फसविण्याचेच लक्षण नव्हे काय ? २ आमच्यापुढे मात्र तुमचे हे जे नामरूपसंपन्न असे सगुण व खरे रूप आहे, त्याच्या पुढेच मी नित्य प्रेमाने नाचेन ३ तुकाराम महाराज म्हणतात, तुमच्या या कोरड्या निर्गुणनिराकाराच्या ज्ञानाने माझे सगुण प्रेम भंग पावण्याचे काहीच कारण नाही ४

१४३१ खरें बोले तरी । फुकासाठीं जोडे हरी ॥ १ ॥
ऐसे फुकाचे उपाय । सांडूनिया वाया जाय ॥ २ ॥
परउपकार । एका वचनाचा फार ॥ ३ ॥
तुका म्हणे मळ । मने सांडिता शीतळ ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा– फुकासाठी–फुकट, सहजासहजी, सांडूनिया–सोडून

अर्थ– नुसते खरे बोलण्यातही श्रीहरीची प्राप्ती सहजासहजी होते. १ असे हे फुकटचे उपाय सोडून लोक आपले आयुष्य व्यर्थ दवडतात २ एका सत्य वचनामुळे पुष्कळ परोपकार होतात ३ तुकाराम महाराज म्हणतात, वाईट वासनेचा मळ सोडून दिल्यास चित्त नेहमी शांत व शीतल राहील ४

१४३२ दया क्षमा शांति । तेथें देवाची वसति ॥ १ ॥
पावे धावोनिया घरा । राहे धरोनिया थारा ॥ २ ॥
कीर्तनाचे दाटे । वराडिया ऐसा लोटे ॥ ३ ॥
तुका म्हणे घडे । पूजा नामें देव जोडे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा– थारा–आश्रयाचे स्थान, वराडिया–क्षुधेने, दुष्काळात भुकेलेल्याप्रमाणे

अर्थ– जेथे दया, क्षमा, शांती या वृत्ती आहेत, तेथेच देवाची वस्ती असते १ अशा ठिकाणी व घरी देव येतो आणि अशाच्या हृदयात आश्रयाचे स्थान करून तो राहतो २ कीर्तनसुखाच्या मार्गाने हा देव दुष्काळात अन्न

न मिळाल्यामुळे भुकेलेल्या क्षुधार्ताप्रमाणे धावत येतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, या देवाचे नाव घेतल्याने त्याची पूजा होऊन तो आपणांस भेटतो ४

विवरण – अतिशय प्रसिद्ध असलेल्या या एका अभंगात दया, क्षमा व शांती या तीन दैवी गुणांची महती वर्णन केली आहे हे तीन गुण ज्या ठिकाणी असतात तेथे प्रत्यक्ष देवाचीच वस्ती असते. माणसामाणसांतील प्रेमभाव व बंधुभाव वाढण्यासाठी याच गुणांची जोपासना व्हावयास हवी मत्सर, कलह, द्वेष, अरेरावी, हिंसाचार इत्यादी दुर्गुणांनी बरबटलेल्या मानवी इतिहासात डंका गाजत राहिला आहे तो याच तीन सद्गुणांचा श्रीज्ञानेश्वरतुकारामांसारख्या साधुसंतांनी दया, क्षमा व शांती याच दैवी गुणांचा वारंवार पुरस्कार करून ईश्वराची भक्ती सार्थ केली आहे, एवढेच नव्हे तर अशा साधुसंतांच्या चरित्रातही या गुणांचे दर्शन होत असते सर्व भूतमात्रांचे पालनपोषण करणे म्हणजे दया, अशीच अर्थी व्याख्या तुकोबांना केलेली नाही, त्यात 'नाशीक निर्दळण कंटकाचें' अशी पुस्ती जोडली आहे प्राणिमात्रांचे पालनपोषण दुष्टांचे निर्दलन केल्याशिवाय होऊ शकत नाही तुकारामबुवांच्या दयेचा हा असा व्यापक असणारा अर्थ गीतेतील 'परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृताम्' या वचनास अनुसरून आहे. (अभंग-क्र २६४) क्षमेचीही महती साधुसंत नेहमी गातात पश्चात्तापदग्ध माणसास क्षमा करणे हे थोर वृत्तीचे लक्षण होय. अन्यांनी क्षमा होत नाही ना ? एवढे पाहिल्यावर क्षमा हे सुद्धा एखाद्या शस्त्राप्रमाणेच प्रभावी होणारे साधन वाटते दुष्टांचेही क्षमेपुढे काही चालत नाही *'क्षमा शस्त्र जया नराचिया हातीं। दुष्ट तयाप्रति काय करी ?'* असे तुकोबांनी दुसऱ्या एका अभंगात म्हटले आहे (अभंग ३९९५) चित्ताची शांत वृत्ती हाही एक मोठा प्रभावी सद्गुण मानला गेला आहे. अशान्त चित्ताचे समाधान कसे होणार ? त्याला सुख तरी कसे लाभणार ? 'शांतीपरतें नाहीं सुख' असा आग्रह यासाठीच तुकारामबुवा धरतात

भगवद्गीतेच्या तेराव्या अध्यायात भगवंतांनी ज्ञानी पुरुषाची जी लक्षणे सांगितली आहेत, त्यातही अहिंसेच्या रूपाने दया, शांती म्हणजे क्षमा आणि विरक्तीच्या रूपातील शांती या गुणांची महती आलेली आहे. हात, पाय, वाचा, डोळे इत्यादी इंद्रियांकडून भूतमात्रावर दयेचा वर्षाव कसा करता येतो, याचे फारच श्रेष्ठ दर्जाचे विवेचन ज्ञानदेवांनी 'अहिंसा' या गुणावरील निरूपणात केले आहे त्याच क्षमेवरील भाष्यही महत्त्वाचे आहे. क्षमेत खेदाचा अथवा दुःखाचा अंशही नसतो खोल डोहात जशा कमळाच्या वेली, सुदैवी पुरुषाच्या घरी जशी संपत्ती, तशी ज्ञानी पुरुषाच्या ठिकाणी क्षमा नांदून दिसते हा क्षमावंत कसा असतो ? त्रिविध तापांचे डोंगर जरी अंगावर कोसळले तरी क्षमावान मनुष्य डळमळत नाही हा पुरुष मानापमान सारख्याच वृत्तीने सहन करतो सुखदुःख, निंदास्तुती यांना समान मानतो तो उन्हाने तापत नाही थंडीने कापत नाही. कसल्याही संकटास तो कधी जुमानीत नाही दया आणि क्षमा या गुणांप्रमाणेच शांतीचेही महत्त्व सर्व संतश्रेष्ठांनी गाइले आहे या तीन दैवी गुणांच्या आश्रयाने प्रत्यक्ष देवच वावरत असतो देवाची उपासना म्हणजे या गुणांची जोपासना होय

१४३३ शिष्याची जो नेघे सेवा। मानी देवासारिखें ॥ १ ॥
त्याचा फळे[1] उपदेश। आणिका[2] दोष उफराटे ॥ २ ॥
त्याचे खरें ब्रह्मज्ञान। उदासीन देहभावीं ॥ ३ ॥
तुका म्हणे सत्य सांगें। येोत[3] रागें येती ते ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – नघे–घेत नाही, फळे–उपयोगी होतो

अर्थ – आपल्या शिष्याकडून सेवेची अपेक्षा न करता सेवा न घेता उलट त्यालाच जो गुरू आपला देव मानतो, १ त्याचाच उपदेश शिष्याला उपयोगी होत असतो इतर गुरूंना मात्र उलट दोष तेवढा लागतो २ जो स्वतःच्या देहभावाविषयी उदास आहे, त्यालाच खरे ब्रह्मज्ञान झाले आहे असे समजावे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी हे सर्व सत्य सांगत आहे मग याचा कुणाला राग आला तर खुशाल येवो ४

१ खरा, २ येरा, ३ यवत

१४३४ माझीं मेलीं बहुवरि । तूं का जैसा तैसा हरी ॥ १ ॥
विठो कैसा वाचलासि । आता सांग मजपाशीं ॥ २ ॥
तुज देखताचि माझा । बाप गेला आजा पणजा ॥ ३ ॥
आम्हा लागलेसे पाठी । बालत्व तारुण्य काठी ॥ ४ ॥
तुज फावले ते मागें । कोणी नसता वादिलागें ॥ ५ ॥
तुका म्हणे तुझ्या अंगीं । मज देखिल लागलीं अवघीं ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – वादिलागें–वाद करणारा

अर्थ – देवा आजपर्यंत माझे निकटचे नातेवाईक पुष्कळच मरण पावले, पण हरी, तू मात्र जसाचा तसा आहेस १ विठ्ठला, तू आजपर्यन्त कसा वाचलास ते तरी मला सांग आता २ तुझ्या देखतच माझा बाप, आजा, पणजा ही सर्व माणसे मरून गेली ३ आणि माझ्याही पाठीमागे बाल्य, तारुण्य या अवस्थांची काठी लागली आहे ४ देवा, यापूर्वी तुझ्याशी वाद घालणारा कुणी नव्हता, म्हणून तुला चांगलेच फावलेले दिसते ! ५ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तुझ्या अंगी सामर्थ्य असताना मला बाल्य तारुण्य, जरा या सर्व उपाधी लागल्या आहेत ६

१४३५ आणीक कोणाचा न करीं मी संग । जेणें होय भंग माझ्या चित्ता ॥ १ ॥
विठ्ठलावांचूनि आणीक जे वाणी । नाईके मी कानीं आपुलिया ॥ २ ॥
समाधानासाटीं बोलावी हे मात । परि माझें चित्त नाहीं कोठें ॥ ३ ॥
जिवाहूनि मज तेचि आवडती । आवडे ज्या चित्तीं पांडुरंग ॥ ४ ॥
तुका म्हणे माझें तोचि जाणे हित । आणिकांच्या चित्त नेदीं[1] बोला ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – संग–संगत, सोबत, मात–गोष्ट, हकीकत, नेदी–देत नाही.

अर्थ – ज्यायोगे माझ्या चित्ताची एकाग्रता भंग पावते, असे या देवाखेरीज दुसरे कुणी असतील तर मी त्यांची संगत कधीच धरणार नाही १ या एका विठ्ठलाखेरीज इतर कुणाची स्तुती मी माझ्या कानांनी कधीच ऐकणार नाही २ मी हे सर्व इतरांच्या समाधानासाठी बोलत असलो तरी माझे चित्त मात्र कुठेच गुंतून राहिलेले नाही ३ ज्यांच्या अंतःकरणात पांडुरंगाविषयीचे प्रेम आहे तेच मला माझ्या जीवापेक्षा अधिक आवडतात ४ तुकाराम महाराज म्हणतात, अशा प्रकारे देवास आवडणारे हे संतच माझे हित जाणणारे आहेत त्यांच्याशिवाय इतरांच्या बोलण्याकडे मी लक्षच देत नाही ५

१४३६ आशा हे समूळ खाणोनि काढावी । तेव्हांचि गोसावी व्हावें तेणें ॥ १ ॥
नाहीं तरि सुखें असावें संसारीं । फजितो दुसरी करूं नये ॥ २ ॥
आशा मारूनिया जयवंत व्हावें । तेव्हांचि निघावें सर्वांतूनि ॥ ३ ॥
तुका म्हणे जरी योगाची तांतडी । आशेची बोंबुडी करीं आधीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – बोंबुडी–निर्बीज

अर्थ – चित्तामधील आशा अथवा वासना ही समूळ खणून काढावी आणि मगच सर्वस्वाचा त्याग करून गोसावी व्हावे १ नाही तर मग सुखाने संसारात असावे उगाच स्वतःची खोट्या वैराग्याने फजिती होऊ देऊ नये २ चित्तामधील सर्व आशाआकांक्षा मारून विजयी व्हावे आणि मगच संसारातून बाहेर पडावे ३ तुकाराम महाराज म्हणतात, तुला जर योग साधण्याची तांतडी असेल तर आशेचे बीज आधी नष्ट करून टाक आशा निर्बीज कर. आशा–आकांक्षा व वासना यांचा त्याग कर ४

---

[1] नाहीं

१४३७ निष्ठायुक्त भाव भक्तांचा स्वधर्म । निर्धार हें वर्म चुकों नये ॥ १ ॥
निष्काम निश्चळ विठ्ठलीं विश्वास । पाहों नये वास आणिकाची ॥ २ ॥
तुका म्हणे ऐसा कोणें उपेक्षिला । नाहीं ऐकिला ऐसा कोणीं ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा – वास–वाट

अर्थ – श्रीहरीच्या ठिकाणी निष्ठेने भावभक्ती अर्पण करणे हाच भक्तांचा स्वधर्म होय. या निर्धाराचे रहस्य त्यांनी कधी चुकवू नये. १. निष्काम असणाऱ्या विठ्ठलाच्या ठिकाणी स्थिर असा विश्वास ठेवावा. दुसऱ्या कुणाचीही वाट पाहू नये. २. तुकाराम महाराज म्हणतात, अशा भक्तांना कोण त्यागणार? कोण त्यांची उपेक्षा करणार? असा उपेक्षिलेला तर माझ्या कधी ऐकण्यात नाही. ३.

१४३८ नामाचें चिंतन प्रगट पसारा । असाल तें करा जेथें तेथें ॥ १ ॥
सोडवील माझा स्वामी निश्चयेंसीं । प्रतिज्ञा हे वाचीं केली आम्हीं ॥ २ ॥
गुण दोष नाहीं पाहात कीर्तनीं । प्रेमें चक्रपाणी वश्य होय ॥ ३ ॥
तुका म्हणे कडु वाटतो प्रपंच । रोकडे रोमांच कंठ दाटे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – वश्य–वश, अनुकूल

अर्थ – लोकहो, तुम्ही जेथे असाल तेथे नामाच्या चिंतनाचा प्रकटपणे प्रसार करा. १. त्यामुळे माझा स्वामी श्रीपांडुरंग तुम्हास खात्रीने बंधनातून सोडवील, असे मी हा सेवक तुम्हास प्रतिज्ञेने सांगत आहे. २. भक्त कथा-कीर्तनात रंगला की हा चक्रपाणी त्याचे गुणदोष न पाहाता मोठ्या प्रेमाने लोच त्याला वश होतो. ३. तुकाराम महाराज म्हणतात, अशा प्रकारे श्रीहरीचे चिंतन केले तर वरवर कडवट वाटणारा प्रपंच गोडच गोड होऊन जातो, आणि अंगावर रोमांच उभे राहाणे, कंठ दाटून येणे असा प्रकारचे अष्ट सात्त्विक भाव प्रकट होतात. ४.

१४३९ नाम म्हणतां मोक्ष नाहीं । ऐसा उपदेश करिती काहीं ।
बधिर व्हावें त्याचे ठायीं । दुष्ट वचन वाक्य तें ॥ १ ॥
जयाचे राहिले मानसीं । तेचि पावले तयासी ।
चाचपडतां मेलीं पिसीं । भलतेंसीं वाचाळें ॥ २ ॥
नवविधीचा निषेध । जेणें मुखें करिती वाद ।
जन्मा आले निंद्य । शूकरयाती संसारा ॥ ३ ॥
काय सांगों वेळोवेळां । आठव नाहीं चांडाळां ।
नामासाठीं बाळा । क्षीरसागरीं कोंडिलें ॥ ४ ॥
आपुलिया नामासाठीं । लागे शंखासुरापाठीं ।
फोडोनियां पोटीं । वेद चारी काढिले ॥ ५ ॥
जगीं प्रसिद्ध हे बोली । नामें गणिका तारिली ।
आणिके ही उद्धरिलीं । पातकी महादोषी ॥ ६ ॥
जे हे पवाडे गर्जती । नाम प्रल्हादाच्या चित्तीं ।
जळतां बुडतां घातीं । राखे हातीं विषाचे ॥ ७ ॥
काय सांगों ऐशीं किती[1] । तुका म्हणे नामख्याती ।
नरकाप्रती जाती । निषेधिती तीं एके ॥ ८ ॥

---

१ कीर्ती

शब्दार्थ व टीपा.– पिसें–वेडी माणसे, मूर्ख लोक, वाचाळें–वडबड करणारे, नवविधीवा–नवविधा भक्तीचा–श्रवण, कीर्तन, स्मरण, पादसेवन, अर्चन, वंदन, दास्य, सख्य आणि आत्मनिवेदन अशी नऊ प्रकारची भक्ती भागवतात सांगितली आहे. शूकरयाती–डुकराच्या जातीत, आठव–स्मृती, आठवण, बाळा–उपमन्यूस, शंखासुरापाठीं–शखासूर नावाच्या राक्षसाच्या पाठीमागें, गणिका–वेश्या.

अर्थ –देवाचे नाम घेतले तर मोक्ष मिळणार नाही असा उपदेश काही लोक करू लागले तर त्यांच्या सांगण्याकडे आपले कान बधिर करून द्यावेत, त्यांचा उपदेश ऐकू नये. त्याचे वाक्य दुष्टपणाचेच असते १ ज्याच्या मनात जी गोष्ट असते, ती त्याला या नामस्मरणामुळेच प्राप्त होत असते पण नामाच्या बाबतीत उदास राहणारे मात्र उगाच व्यर्थपणे इकडेतिकडे चाचपडत राहून, भलभलते बडबडून मूर्खासारखे मरून गेले. २ श्रवण–कीर्तनादी नवविधा भक्तीचा निषेध करून जे स्वमुखाने उगाच वाद करतात, ते या ससारात जन्मास येऊनही डुकराच्या जातीचेच समजावेत, ३ अशा लोकाना अनेक वेळा किती आणि काय काय सागावे ? या चांडाळांना आठवण कशी राहात नाही ? श्रीहरीनें आपल्या नामासाठीच उपमन्यूला दुधाच्या समुद्रात कोंडून ठेविलें ना ? ४ ब्रह्मदेवाचे वेद चोरून नेणाऱ्या शखासुरापाठीमागे देव स्वतःच्या नामासाठीच लागले होते, त्यांनी त्याचे पोट फाडून चार वेद बाहेर काढले ते स्वतःच्या नामासाठीच. ५ गणिका वेश्या तरून गेली ती देवाच्या नामाच्याच बळावर, हेंही जगात प्रसिद्धच आहे आणखीही काही पातकी व महादोषी नामाच्या बळावर तरले हेंही प्रसिद्धच आहे. ६ ज्याचे असे पवाडे गाइले जातात, त्याच नामाने प्रल्हादास, त्याने ते चित्ती सदैव धारण केल्यामुळे, तारले याच नामाने प्रल्हादास अग्नीपासून, पाण्यापासून आणि विषापासून रक्षिले. अशी या नामाची कीर्ती अनेक पुराणांनी गाइली आहे. ७ तुकाराम महाराज म्हणतात, अशा प्रकारच्या नामाच्या किती प्रसिद्ध कथा सागू ? या नामाचा जे निषेध करतात ते नरकाला पोचतील ८

विवरण.– कलियुगात नामसकीर्तन अथवा नामस्मरण हेच एक संसार तरून जाण्याचे सहजसुलभ असे साधन असल्याचा निर्वाळा सर्वच साधुसतानी दिलेला आहे, 'नामापरता मंत्र नाहीं त्रिभुवनीं । ऐसी बोले वाणी वेदशास्त्रीं', 'सकल साधनाचे सार । रामकृष्ण हा उच्चार', 'नाम वाचें उच्चारितां । हरे संसाराची व्यथा', 'साधनांत सोपें नाम हें केवळ । यायीण सकळ सीण वाया', 'नामें तारिले अपार पुराणीं वर्णिलें । नामचि केवळ आत्मसत्ता' अशा भाषेत सगुण भक्तीचे मुकुटमणी श्रीनामदेव यानी नामाचे महत्त्व वर्णन केले आहे. 'दोषी पापराशी नामाचे धारक । होतां तिन्ही लोक वंदिती मायां','जगासी तारक हरि हा उच्चार । सर्व वेरझार खुंटे जेणें','नाम तारक हें क्षितीं । तरले आणि पुढें तारती', 'नाम पावन तिन्ही लोकीं । मुक्त जहाले महापातकीं','नामें पाषाण तरले । महापापी उद्धरले','हरिचे नामें हरीचे भक्त । उद्धरले असख्यात' अशा शब्दानी एकनाथ नामाचे माहात्म्य वर्णन करतात. समुद्रवलयाविन पृथ्वीचे दान केले तरी एका नामाची बरोबरी होणार नाही, असे तुकारामबुवानी म्हटले आहे. 'नाम पावन पावन । त्याहूनि पवित्र आहे कोण ?', 'मुखीं नाम हातीं मोक्ष । ऐसी साक्ष बहुतांची', 'नाम घेतां नलगे मोल । नामंमत्र नाहीं खोल', 'नामाच्या चिंतनें बाटा वांटा पळतीं विघ्नें' म्हणून तुकारामबुवानीही नाममहिमा गाइला आहे. या नामस्मरणाच्या मार्गाने व्यासवाल्मीकीपासून अजामिळ-गणिकेपर्यंत असंख्य लोक तरल्याच्या साक्षी पुराणानी दिल्या आहेत.

या अभगात उपमन्यू, शखासूर, गणिका, प्रल्हाद इत्यादींचे दाखले तुकारामबुवानी दिले आहेत उपमन्यू हा व्याघ्रपादाचा मुलगा. घरची फार गरिबी. हा एकदा मुनींच्या आश्रमात खेळायला गेला असताना याने गाईचे दूध काढताना पाहिले. त्याला दुधाची इच्छा झाली घरी येऊन त्याने आईजवळ दुधासाठी हट्ट धरला, घरी दूध नसल्यामुळे आईने पाण्यात पीठ कालवून दिले, व खऱ्या दुधासाठी शकराची आराधना करण्यास सुचविले याने शकराचे नामस्मरण करून दुधाचा सागरच प्राप्त करून घेतला. दुसरा शंखासुर हा समुद्राचा पुत्र असून याने आपल्या पराक्रमाने सर्व देवाना सुवर्णपर्वताच्या गुहेत हाकलून दिले आणि देवाचे चारही वेद समुद्रात बुडवून टाकले. वेद नाहीसे झाल्यामुळे धार्मिक कृत्ये बंद पडली, प्रजा त्रस्त झाली, ब्रह्मदेव श्रीविष्णूस शरण गेले. विष्णूनी मत्स्यरूप धारण करून शखासुराचा वध केला व चारही वेदाचा तपास करून धर्माची प्रतिष्ठापना केली. पिंगला गणिका नामानेच तरली आणि प्रल्हादाच्या नामस्मरणानेच सर्व सकटे नाहीशी झाली. या कथा प्रसिद्धच आहेत. शखासुराच्या

कथेचा उल्लेख बुवांनी आणखी एका अभंगात 'ब्रह्मयाचे वेद शंखासुरें नेले। त्यासाठी धरिलें मत्स्यरूप' या शब्दांनी केला आहे (अभंग क्र. ३०८८)

१४४० किती या काळाचा सोसावा वळसा[1] । लागला सरिसा पाठोवाठीं ॥ १ ॥
लक्ष चौऱ्याशीची करा सोडवण । रिघा या शरण पांडुरंगा ॥ २ ॥
उपजल्या पिंडा[2] मरण सागातें । मरतें उपजतें सवेंचि तें ॥ ३ ॥
तुका म्हणे माळ गुंतली राहाटीं । गाडग्याची सुटी फुटलिया ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा– वळसा-चक्र, पिंडा-शरीराम, सुटी-सुटका

अर्थ – या काळाच्या चक्राचा त्रास किती सहन करावा ? ते एकसारखे पाठीमागे लागले आहे १ म्हणून या पांडुरंगास शरण जाऊन चौऱ्यांशी लक्ष योनींतून आपली सुटका आपण करून घ्यावी २ जन्मास आलेल्या देहाच्या मागे मरण हे लागलेच आहे; आणि मेल्यावर लागलीच जन्मही आहेच ३ तुकाराम महाराज म्हणतात, हा जन्ममृत्यू रहाटगाडग्याच्या माळेप्रमाणे आहे या चक्रातून सुटका हवी असेल तर एखादे गाडगे फोडून विठोबास शरण जावे ४

१४४१ गासी तरि एक विठ्ठलचि गाईं । नाहीं तरि ठायीं राहें उगा ॥ १ ॥
अद्वैतीं तो नाहीं बोलाचे कारण । जाणीवेचा श्रम[3] करिसी वांया ॥ २ ॥
तुका म्हणे किती करावी फजिती । लाज नाहीं चित्तीं निलाजिरा ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा – ठायीं-आपल्याच ठिकाणी सीण-श्रम

अर्थ :– तुला जर गायचेच असेल तर तू त्या एकाच विठ्ठलाचे नाम गावेस नाही तर आपल्याच ठिकाणी उगाच स्वस्थ रहा १ ईश्वराच्या अद्वैती स्वरूपाविषयी बोलण्याचे काहीच कारण नाही त्याला या स्वरूपात जाणण्याचे श्रम वृथाच होत २ तुकाराम महाराज म्हणतात, या शब्दज्ञान्याची फजिती तरी किती करावी ? हा खरेच निलाजरा आहे याला यत्किंचीतही लाज नाही ३

१४४२ जयाचिये वाचे नये हा विठ्ठल । त्याचे मज बोल नावडती ॥ १ ॥
शत्रु तो म्यां केला न म्हणें आपुला । जो विन्मुख विठ्ठला सर्वभावें ॥ २ ॥
जयासी नावडे विठोबाचे नाम । तो जाणा अधम तुका म्हणे ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा – वाचे-वाणीने

अर्थ – ज्याच्या वाणीत या विठ्ठलाचे नाम नाही, त्याचे बोलणेच मला कधी आवडत नाही १ जो सर्व भावाने या विठ्ठलापासून विन्मुख झाला, तो मला आपला वाटत नाही, तो माझा नेहमीच शत्रू मला वाटतो २ ज्याला या विठ्ठलाचे नाम आवडत नाही, तो तुकाराम महाराज म्हणतात, अधमच समजावा ३

१४४३ आम्हासी तो नाहीं आणीक प्रमाण । नामासी कारण विठोबाच्या ॥ १ ॥
घालूनिया कास करितो कैवाड । वागो नेदीं आड कळिकाळासी ॥ २ ॥
अबद्ध वाकडें जैशातैशा परी । वाचे हरि हरि उच्चारावे ॥ ३ ॥
तुका म्हणे आम्हा सापडले निज । सकळा हे बीज पुराणांचे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – कैवाड-निश्चय

---

१ वोळसा, २ पीडा, ३ सीण

अर्थ – आम्हाला दुसरे तिसरे आणखी काहीही नको आम्हास या विठ्ठलाच्या नामाचीच गरज आहे १ भक्तांची कास धरून आम्ही निश्चय करतो की, या नामाच्या बळावर आम्ही या कळिकाळास आमच्या दृष्टीसमोर यायूच देणार नाही २ या श्रीहरीचे हे नाम, अवद्ध, वेडेवाकुडे, जसे येईल तसे घ्यावे वाणीने त्याचा उच्चार करावा ३ तुकाराम महाराज म्हणतात, सर्व पुराणाचे हे नामरूपी बीज आम्हाला सापडले आहे ४

१४४४ जीव तोचि देव भोजन ते भक्ति । मरण तेचि मुक्ति पापाड्याची ॥ १ ॥
पिंडाच्या पोषकीं नागविले जन । लटिके पुराण केले वेद ॥ २ ॥
मना आला तैसा करिती विचार । म्हणती संसार नाही पुन्हा ॥ ३ ॥
तुका म्हणे पाठी उठती यमदंड । पापपुण्य लंड न विचारिती ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – पापाड्याची–नास्तिकाची, पिंडाच्या–देहाच्या, पोषकी–पोसणारानी, लंड–नास्तिक, अधम लोक

अर्थ –हे नास्तिक लोक जीव हाच कुणी एक देव मानतात नाना प्रकारची भोजने हीच याची भक्ती आणि मरण ही याना मुक्तीची पर्वणी वाटते १ अशा प्रकारे केवळ देहाचीच पोषणा करणारानी लोकाना लुबाडले आहे त्यानी आपल्या वर्तनाने वेद आणि पुराणे याना खोटे ठरविले आहे २ आपल्या मनास पटेल असाच विचार करतात व पुन म्हणून जन्मच नाही असे हे मानतात ३ तुकाराम महाराज म्हणतात, पापपुण्याचा विचार न करणाऱ्या अशा या नास्तिक लोकांच्या पाठीवर यमाचे दडच सर्वेच उमटत असतात ४

१४४५. भक्ताचा[1] महिमा भक्तचि जाणती । दुर्लभ या गति आणिकासी ॥ १ ॥
जाणोनि नेणते जाले तेणें सुखें । न बोलोनि मुखें बोलताती ॥ २ ॥
अभेदूनि भेद राखियेला अंगीं । वाढावया जगीं प्रेमसुख ॥ ३ ॥
टाळ घोष[2] कथा प्रेमाचा सुकाळ । मूढ लोकपाळ तरावया ॥ ४ ॥
तुका म्हणे हें तो आहे तया ठावें । जिहीं एक्या भावें जाणीतलें ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा –घोळ–घोष, मूढ–मूर्ख

अर्थ –भक्ताचे महत्त्व जातीच्या भक्तानाच समजायचे इतराना त्याची अवस्था काय कळणार ? १ असे हे भक्त ईश्वरास जाणून, जाणतेपणाचा अभिमान टाकून दिल्यामुळे नेणते झाले आहेत हे जे बोलतात ते न बोलण्यासारखेच असते २ देवाचा व आपला भेद यानी जाणलाच आहे पण या जगात प्रेमसुख वाढावे म्हणून देव व भक्त हा भेद त्यानी राखला आहे ३ मूढ लोकाना तारण्यासाठी टाळ व त्याचा घोष याच्या साहाय्याने यानी ईश्वरप्रेमाचा सुकाळ निर्माण केला आहे ४ तुकाराम महाराज म्हणतात, ज्यानी ऐक्यभावाने त्या श्रीहरीस जाणले आहे त्यासच हा प्रकार समजेल ५

१४४६ आशा तृष्णा माया अपमानाचें बीज । नासिलिया[3] पूज्य होइजेते ॥ १ ॥
अधीरासी नाहीं चालो जाता मान । दुर्लभ दर्शन धीर त्याचे ॥ २ ॥
तुका म्हणे नाहीं आणिकासी बोल । वाया जाय मोल बुद्धीपाशीं ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा –नासिलिया–नाश केल्यानतर

अर्थ – आशा, तृष्णा, माया या वृत्ती म्हणज अपमानाचीच बीजे होत. यांचा नाश केल्यानेच लोकात पूज्य भाव निर्माण होतो १ जो याविषयी अधीर आहे म्हणजे ज्याला या त्यागाविषयी धीर नाही, त्याला कुठेही मान मिळणार नाही व ज्यांच्या मनात धीर आहे त्याचे दर्शन दुर्लभच असते २ तुकाराम महाराज म्हणतात, आशा,

१ भक्तीचा, २ घोष, ३ नासील या

तृष्णा, माया यांनी बद्ध झालेल्यांसाठी मात्र हे बोलणे नाही. त्यांच्यापुढे बोलणे वायाच जाते. जे विवेकी आहेत, बुद्धिमान आहेत, त्यांना त्याचे मोल विशेष वाटते. ३

१४४७ चिंतनें सरे तो धन्य जाणा काळ । सकळ मंगळ मंगळांचें ॥ १ ॥
संवसारसिंधु नाहीं हरिदासां । गर्भवास कैसा नेणती ते ॥ २ ॥
जनवन ऐसें कृपेच्या सागरें । दाटला आभारें पांडुरंग ॥ ३ ॥
तुका म्हणे देवा भक्तांचें बंधन । दाखविलें भिन्न परी एक ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:–आभारें–उपकाराने.

अर्थ :–श्रीहरीच्या चिंतनात जो काळ जातो तो धन्य धन्य होय. सर्व मंगलांचे मंगल स्वरूप त्यात प्राप्त झालेले असते. १ श्रीहरीचे जे भक्त आहेत त्यांना कधी संसारसागराची भीती नसते; गर्भवासाची दुःखे कशी असतात हेही त्यांना माहीत नसते. २ या कृपासागराच्या कृपेमुळे जन आणि वन यांचा एकच अनुभव यांना येतो. यांच्याच उपकाराने पांडुरंग भारावलेला असतो. ३ तुकाराम महाराज म्हणतात, असा या भक्तांचेच देवास बंधन असते. देव व भक्त यांच्यांतील भिन्नता जरी वरवर दाखविली गेली तरी वास्तविक पाहाता दोनही तत्त्वे एकरूपच आहेत. ४

१४४८ मोक्षाचें आम्हांसी नाहीं अवघड । तो असे उघड गांठोळीस ॥ १ ॥
भक्तीचे सोहळे होतील जीवासी । नवल तेविशीं पुरवितां ॥ २ ॥
ज्याचें त्यासी देणें कोण तें उचित । मानूनियां हित घेतों सुखें[1] ॥ ३ ॥
तुका म्हणे सुखें देई[2] संवसार । आवडीसी थार करीं माझे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:–उघड–सुलभ स्पष्ट, थार–आश्रय.

अर्थ :–मोक्षाची प्राप्तीही काही आम्हांस मोठी अवघड गोष्ट वाटत नाही. तो तर आमच्या गाठोड्यातील वस्तूप्रमाणे सुलभ व सहजप्राप्त आहे. १ देवा, भक्तीचे सोहाळे होऊन जेणेकरून जीवास सुख होईल, ते तुम्ही पुरविता हे नवल आहे. २ ज्याचे त्यास देणे यात काय उचित आहे ? मोक्ष हे आमचेच स्वरूप होय. ते तू दिलेस तर त्याचा सुखाने स्वीकार करू. ३ तुकाराम महाराज म्हणतात, पण देवा, मोक्षापेक्षा तुझ्या भक्तीच्या सुखाची अवीट गोडी चाखण्यासाठी पुनः पुन जन्म मला यावा. या माझ्या आवडीला तू आश्रय द्यावास. ४

किमत ? परमार्थसाधक या मुक्तीच्या नादात गर्भवासाची दुःखे भोगायला, पुन पुन जन्मास येण्यास उत्सुक नसतात. पण भक्तिसुखास लालचावलेले भक्त मात्र या गर्भवासाचेही स्वागत करतील. 'तुका म्हणे सुखें देईं संवसार' असे याच अभगात तुकोबानी म्हटले आहे. 'गर्भवासा भीती ते आंधळे जन। मुक्तिसी कारण नाहीं आम्हां॥ गर्भवास झालिया संतसेवा घडती। मुक्त झालिया न कळे भगवद्‌भक्ती' म्हणून एकनाथ महाराज म्हणतात, 'आम्ही सुखें गर्भवास घेऊं देखा। मुक्तीचिया मस्तका पाय देऊं। एकाजनार्दनी गर्भवास सोसूं। संतांचा सौरसू हातीं लागे।' साधुसताना गर्भवासाचे, जन्ममरणाचे दुःख वाटत नाही. या जन्मानतर, मृत्यूनतर मोक्ष मिळतो हेही त्याना मान्य नाही. श्रीज्ञानदेवानी यासबंधात निवाडा देताना म्हटले आहे, 'मोक्ष मेल्यापाठी आम्हांसी होईल। ऐसे जे म्हणतील अति मूर्ख॥ १॥ दीप गेल्यावरी कैचा जी प्रकाश। झाका झाकी त्यास कासयाची॥ २॥ जववरी देह आहे तववरी साधन। करूनिया ज्ञान सिद्ध करा' याच देहाने साधने करून अत्युच्च सुख जे भक्ती ते साधावयाचे असते. वारवार जन्म घ्यावे लागले तरी घेऊ, पण भक्तिसुखास आम्ही दूर करणार नाही. असे संत आग्रहाने सागतात 'वारवार जन्म घेऊं। परी पाहूं पंढरपूर। दुजे मागणें नाहीं देवा। करूं सेवा वैष्णवांची' असे म्हणून एकनाथानी कीर्तनरगाचा गौरव केला आहे. तुकाराम महाराजानीही 'मोक्षपदें तुच्छ केलीं या कारणें॥ आम्हां जन्म घेणे युगायुगीं', 'सांडुनि सुखाचा वाटा। मुक्ति मागे तो करंटा' अशा भाषेत मोक्षाऐवजी भक्तीचे माहात्म्य वर्णन केले आहे

आणि तात्त्विक दृष्टीने पाहावा सताचेच म्हणणे बरोबर आहे असे दिसते. 'जीवो ब्रह्मैव नापरः' हे जर खरे असेल तर, सर्व जीव एकाच तत्त्वाच्या विस्ताराचे असतील तर, एकाच सागराच्या या लहरी असतील तर, एकाच बीजाचा हा विस्तार असेल तर, एकाच भांडाराचे-सुवर्णाचे हे दागिने असतील तर, त्यात व मूळ वस्तूत फरक कसा असणार ? खरे पाहाता बद्धता व मुक्तता हे दोनही भाव जीवाकडे नाहीत. 'मुक्त कासया म्हणावे। बंधनचि नाहीं ठावे' ( अभग क्र ७४२ ) ज्याला बधनच नाही त्याने मुक्त होण्याची खटपट तरी का करायची ? खरे पाहाता बधमोक्षाची कल्पना अज्ञानजन्य आहे. अशा या मोक्षाची पर्वा साधुसताना नसते. त्याना काही अवघड वाटत नाही.

१४४९ चिंतनासी न लगे वेळ। सर्व काळ करावें॥ १॥
सदा वाचें नारायण। तें वदन मंगळ॥ २॥
पढियें सर्वोत्तम भाव। येथें वाव पसारा॥ ३॥
ऐसें उपदेशी तुका। अवघ्या लोकां सकळां॥ ४॥

शब्दार्थ व टीपा .– चिंतनासी–नामस्मरणास, वदन–तोंड, मुख, पढियें–प्रियत्व, वाव–व्यर्थ.

अर्थ :–श्रीहरीचे नामस्मरण करण्यास वेळकाळाची काही जरूरी असते असे नाही ते सर्वकाळीही करता येते. १ ज्याच्या वाणीत नेहमीच भगवंताचे नाम असते ते मुख, मगल आहे असेच समजावे. २ त्याच्या ठिकाणी श्रीहरीचा भावच नेहमी प्रियत्वाने असतो. येथे इतर सर्व पसारा व्यर्थ असतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, याप्रमाणे मी सर्वांना उपदेश करीत आहे ४

१४५० अंतराय पडे गोविंदीं अंतर। जो जो घ्यावा भार तोचि बाधी॥ १॥
बैसलिये ठायीं आठवीन पाय। पाहीन तो ठाय तुझा देवा॥ २॥
अखंड तें खंडे संकल्पीं विकल्प। मनोजन्य पाप रज्जुसर्प॥ ३॥
तुका म्हणे विश्वीं विश्वंभर वसे। राहों ऐसे दशे सुखरूप॥ ४॥

शब्दार्थ व टीपा :–अंतराय–वियोग, अतर, भार–व्यापार, व्यवहार, ठाय–स्थान, मनोजन्य–मनातून जन्मलेला, कल्पिलेला, रज्जुसर्प–दोर हा सर्प आहे असा भास, विश्वीं–या जगतात

अर्थ :–श्रीगोविंदाच्या ठिकाणी वियोग होईल असे व्यवहार जो जो होतील तो तो बाधाच अधिक होत राहील. १ म्हणून मी या बसल्या ठिकाणी देवा, तुझे पाय आठवीन, आणि जेथे पाहीन तेथे तुमचे चरण आठवीन २

ईश्वराचे अखंड स्वरूप संकल्पविकल्पामुळे खंडल्यासारखे होते, मनातील हार हाच सर्पाप्रमाणे वाटू लागतो. ३ तुकाराम महाराज म्हणतात, हा विश्वंभर हा सर्व विश्वाला भरून राहिलेला असून स्वरूपातच सुखरूप असो. आम्हीही याच अवस्थेत राहू ४

१४५१ एकाचिया घाटद्या टोके । एक फिके उपचार ॥ १ ॥
ऐसी सवे गोवळिया । भाव तया पढियंता ॥ २ ॥
एकाचें[1] तें उच्छिष्ट खाय । एका जाय ठकवूनि ॥ ३ ॥
तुका म्हणे बहु सोपें । बहु रूपें अनंत ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :–घाटद्या–घाटलेल्या कण्या, टोके–टक लावून पाहातो, फिके–व्यर्थ, सवे–सवय, गोवळिया –श्रीकृष्णास, पढियंता–प्रिय.

अर्थ :–हा देव पाहा कसा आहे. भक्ताने राधलेल्या, घाटलेल्या कण्यांकडे हा आशाळभूतपणाने पाहात बसतो, त्यापुढे त्याला इतरांनी अनेक उपचार केले तरी व्यर्थ वाटतात १ अशी ही सवय या श्रीकृष्णास आहे. त्याला भावभक्ती प्रिय आहे. २ तो आपल्या भक्तांचे उष्टेही खातो, पण इतरांना मात्र फसवतो. ३ तुकाराम महाराज म्हणतात, हा नाना वेषधारी अनंत भविकांना मात्र फार सुलभ आहे. ४

१४५२ कोठें नाहीं अधिकार । गेले नर वांयां ते ॥ १ ॥
ऐका हें सोपें वर्म । न लगे श्रम चिंतना ॥ २ ॥
मृत्याचिये अंगीं छाये । उपायेंचि खुंटतां ॥ ३ ॥
तुका म्हणे अवघे जन । येथें मन असों द्या ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :–वर्म–रहस्य, चिंतना–नामस्मरणाम.

अर्थ :–ज्यांना कसलाच अधिकार नाही, असे लोक जन्मास येऊन वायाच जातात १ म्हणून अशा लोकांनी एवढे साधे रहस्य ऐकावे, नामस्मरणास कसलेही श्रम करावे लागत नाहीत. २ मृत्यूचा प्रसंग जवळ येऊन ठेपताच सर्व उपाय खुंटतात. ३ तुकाराम महाराज म्हणतात, सर्व लोकहो, तुम्ही श्रीहरीच्या नामस्मरणात तुमचे मन गुंतवून

शब्दार्थ व टीपा – काळे-सर्वकाळ

अर्थ –यथाकाळ विधिवत नाना कर्मे करणाऱ्या कर्मठाबद्दल या श्रीहरीला प्रेम नसते १ तो गवळ्याच्या पोरांबरोबरच खेळत राहातो ते जे जे करतील, ते ते हा सहन करीत असतो २ यज्ञयाग करणाऱ्या याज्ञिकाकडून यज्ञमुखाने सुग्रास घास जरी याला मिळाला व मंत्रासहित याची पूजा जरी केली, तरी तो या भावरहित उपचारांविषयी उदास असतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, हा श्रीहरी योगी लोकानाही फसवितो, तो त्याच्या हृदयात कधीच वास करीत नाही ४

विवरण – मनात भाव नसेल तर नाना व्रते, नाना यज्ञयाग, नाना तीर्थयात्रा व्यर्थ होत वरवर शास्त्रशुद्ध दिसणाऱ्या कर्मांमागे जर मनातील शुद्ध प्रेम नसेल तर काय उपयोग ? मोठमोठे यज्ञयाग केले, हविर्भाग अर्पण केला, कर्मकांड विधियुक्त पद्धतीने केले, परंतु त्यात भगवताविषयी प्रीती नसेल तर त्याचा काहीच उपयोग नाही यज्ञयागातील सुग्रास अन्न सोडून हा भगवत गवळ्याच्या पोराचा साधा काला गोड मानतो. कारण त्या काल्यामागे अवीट प्रेम असते उलट यज्ञ करणारे दीक्षित 'पुण्याचेनि नामें पाप' जोडीत असतात कारण परमेश्वराला चुकवून त्याना स्वर्ग गाठायचा असतो अशा दीक्षिताना व योगी लोकाना भगवत दुरावतोच भगवताला अशा कर्मकांडात वा यज्ञयागात सुख वाटत नाही खरे म्हणजे या भगवतास वैकुंठही आवडत नाही 'तो मी वैकुंठीं नसें। वेळ एक भानुबिंबींही न दिसें। वरी योगियांचीही मानसें। उमरडोनि जाय ॥ परी तयांपाशीं पाडवा। मी हारपला गिवसावा। जेथ नामघोष बरवा। करिती माझा ॥ कैसे माझ्या गुणीं धाले। देशकालातें विसरले। कीर्तनें सुखी झाले। आपणपांचि ॥ कृष्ण विष्णु हरि गोविंद। या नामाचे निखळ प्रबंध। माजी आत्मचर्चा विशद। उदंड गाती।' अशा ठिकाणी हा श्रीहरी रमून जातो. तो भावाचा भुकेला असतो भक्तिभावाने त्याला दिलेले पान, फूल, फल अथवा पाण्याचा थेंबही मोठा वाटतो या अल्पभेटीपुढे त्याला योग्याची वा कर्मठाची महती वाटत नाही. जगदीश्वर श्रीकृष्णाचे प्रेम पार्थापाशी जडलेले होते जे रहस्य पिता वसुदेव अथवा माता देवकी यांच्याजवळ त्याने सांगितले नाही, बंधू बळिभद्रासही सांगितले नाही 'तें गुह्य अर्जुनेंशीं बोलत' कारण अर्जुनाची श्रीकृष्णावर नितान्त श्रद्धा होती, भक्ती होती. या दोघांच्या प्रेमाचे सुख प्रत्यक्ष देवी लक्ष्मीलाही लाभले नाही 'एऱ्हवीं हा योगियां नाडळे। वेदार्थासी नाकळे। जेथ ध्यानाचेही डोळे पावती न' असा हा श्रीकृष्ण परमात्मा अर्जुनासारख्या प्रिय सख्यासाठी या भोळ्याभाबड्या गवळ्यासाठी कृपावंत होतो

यज्ञयाग करणाऱ्या कर्मठ दीक्षिताच्या अथवा योगात समाधी लावणाऱ्या योगी पुरुषाच्या ध्यानात न येणारा हा परमेश्वर भक्तिवश कसा आहे, याचे वर्णन साधुसंतानी अनेक ठिकाणी केलेले आहे जसे 'वेदांसीही हेत हारपला। तें रूप सानुलें यशोदे तान्हुलें। भोगिती निमोलें भक्तजन' असे याच गुण आहेत 'न साधे तें योगी न सांपडे जगीं। तो नंदाच्या वोसंगीं उत्संगीं खेळे,' 'योगियांचे धन तें ब्रह्म सनातन। तो हा जनार्दन नंदाघरीं' असा भाषेत निवृत्तिनाथानी याचे लाघव वर्णन केले आहे योगयाग, यज्ञादी कर्मे, तपादी क्रिया, अनुष्ठानादी कर्मकांडे यांच्या भरीस न पडता एका नामस्मरणाने युक्त होऊन प्रभूस आळवावे, याच मार्गाने तो वश होता, असा सर्व संतांच्या वचनाचा निष्कर्ष आहे भानुदासानी एका अभंगात म्हटले आहे, 'योगाचिया आटी नको घेऊं पोटीं। वाया शीण तळवटीं तुज होय ॥ यज्ञाचिया आटी नको घेऊं पोटीं। वाया शीण तळवटीं तुज होय ॥ तपाचिया आटी नको घेऊं पोटीं। वाया शीण तळवटीं तुज होय ॥ अनुष्ठानाचिया आटी नको घेऊं पोटीं। वाया शीण तळवटीं तुज होय ॥ भानुदास म्हणे रामनामें मोक्ष। धन्य तू सृष्टीमाजी होई' मनोभावे केलेल्या चिंतनाने हा श्रीहरी भक्ताच्या स्वाधीन होतो त्याला योग्याच्या समाधीत वा याज्ञिकाच्या यज्ञकर्मात सुख वाटत नाही याग्यानी व कर्मठानी याचा कितीही शोध केला तरी त्याच्यात खरा भाव नसल्याने तो त्याना गवसत नाही 'योगी शिणतातीं साधन करितीं। तया नोहे भेटी कांहीं केल्या ॥ तो श्रीहरी गोकुळीं बाळवेषें खेळे।' म्हणून या श्रीहरीचे भक्तवात्सल्य एकनाथांनी वर्णन केले आहे

१४५५ नामाचे पवाडे बोलती पुराणें । होऊनि कीर्तन तोचि ठेला ॥ १ ॥
आदिनाथा कंठीं आगळा हा मंत्र । आवडीचे स्तोत्र सदा घोकी ॥ २ ॥
आगळें हें सार उत्तमा उत्तम । ब्रह्मकर्मा नाम एक तुझें ॥ ३ ॥
तिहीं त्रिभुवनीं गमन नारदा । हातीं विणा सदा नाम मुखीं ॥ ४ ॥
परिक्षिती मृत्यु सातां दिवसांचा । मुक्त जाला[1] याचा उच्चरिता ॥ ५ ॥
कोळियाची कीर्ति वाढली गहन । केलें रामायण रामा आधीं ॥ ६ ॥
सगुण निर्गुण तुज म्हणे वेद । तुका म्हणे भेद नाहीं नामीं[2] ॥ ७ ॥

शब्दार्थ व टीपा .– पवाडे–कीर्ती, लौकिक, आदिनाथा–शिवशंकराला, त्रिभुवनीं–स्वर्ग, मृत्यू पाताळ या तीनही लोकांत, गमन–जाणेयेणे, परिक्षिती–अर्जुनाचा पौत्र, उत्तराअभिमन्यूचा मुलगा कोळियाची–वाल्या कोळ्याची

अर्थ –या श्रीहरीच्या नामाची कीर्ती शास्त्र पुराणांनी मुक्त कंठाने वर्णन केली आहे याचे कीर्तन मनोभावे करणारा याच्या स्वरूपात येऊन मिळतो तो श्रीहरिरूपच होतो १ कवीच्या मुखात याच श्रीहरीचे नाम सतत असते याचेच नाम तो सदासर्वकाळ घोकीत असतो २ हा श्रेष्ठ व अलौकिक मंत्र सर्व उत्तम साधनांचे सार आहे सारी ब्रह्मकर्मे देवा, तुझ्या नामामुळे सार्थ होतात ३ महर्षी नारदांचे येणेजाणे त्रिभुवनात असते ते हातात ब्रह्मवीणा घेऊन तुझेच नाम गात असतात ४ परीक्षित राजाला सात दिवसात येणारा मृत्यू केवळ तुझ्याच नामाच्या उच्चाराने टळला ५ वाल्या कोळ्याची मोठी कीर्ती झाली ती याच नामाच्या बळावर त्याने अखंड नामस्मरण करून रामावताराच्या आधीच रामायणाची निर्मिती केली ६ देवा, तुला वेद सगुण व निर्गुण म्हणतात, परंतु तुझ्या नामामध्ये मात्र तसा फरक नाही ७

विवरण – या एका अभंगात तुकोबांनी नामस्मरणाची महती वर्णन करून नामस्मरणामुळे आदिनाथ, नारद, परिक्षिती, वाल्मीकी इत्यादींनी स्वत चा व त्याबरोबर इतरांचा उद्धार कसा केला, यासंबंधी उल्लेख समर्पक रीतीने केले आहेत या नामस्मरणरूपी साधनाचा प्रसार साधुसंतांनी मनोभावे केलेला आहे 'नाम मुखीं सदा तोची पैं भाग्याचा । तयासी यमाचा धाक नाहीं,' 'अखंड जपतु नाममंत्र वाचे । त्याहूनि दैवाचे कोण भूमी ?', 'नामाचेनि बळें तरिजे संसार। आणिक विचार करू नको' अशा रीतीने निवृत्तिनाथांनी भगवंतांच्या नामाचे महत्त्व विशद केले आहे 'नाम पवित्र आणि परिकर। कल्पतरूहूनी उदार । तें तू धरीं वारे साधार। तेणे तरसी भव दुस्तर ', 'प्रेमाचा जिव्हाळा नाम मुखासी आले। सार्थक पैं जाले संसाराचें' 'सार सार सार विठोबा नाम तुझें सार । म्हणोनि शूळपाणी जपताहे वारवार ' अशा शब्दांत श्रीज्ञानदेव नाममहिमा वर्णन करतात नामदेव तर नामस्मरणाचे श्रेष्ठ पुरस्कर्ते त्याच्या मते नाम हेच कर्म, हेच धर्म एका नामातच स्नानसंध्या यते ' विठ्ठलाचे नाम जे माउलींचे ओठीं । विठो तिचे पोटीं गर्भवासीं', 'नामापरता मंत्र नाहीं त्रिभुवनी । ऐसे बोले वाणी वेदशास्त्री ' अशासारख्या कित्येक वचनांनी नामदेवांनी नामस्मरणाचे महत्त्व स्वानुभवाने कथन केले आहे

या अभंगात जे दोनतीन पौराणिक उल्लेख आहेत ते सर्वप्रसिद्ध असून थोरामोठ्यांनीही नामाचा आश्रय कसा घेतला व त्यामुळे त्यांचा लौकिक कसा वाढला हे सांगणारे आहेत समुद्रमंथनामधून जें हालाहल विष निघाले ते जगताच्या कल्याणासाठी शिवाने प्राशन केले तव्हा त्याच्या मुखाचा दाह रामनामाने शांत झाला अशी कथा आहे परीक्षितीला शमीक ऋषीच्या शृंगी नावाच्या पुत्राकडून सातव्या दिवशी सर्पदंश होईल असा शाप मिळाला होता. परंतु गंगातटाकी भगवन्नामाचे श्रवण केल्याने त्याची भीती नष्ट झाली वाटमाऱ्या करणारा वाल्या रामनामाच्या बळावर रामायणकर्ता वाल्मीकी बनला वाल्मीकीस ब्रह्मदेवाच्या वरामुळे रामजन्मापूर्वीच रामचरित्र लिहिता आले असल्याची समजूत प्रसिद्धच आहे

---

१ जाली २ नामीं

१४५६ भूतदयापरत्वे जया तया परी । संत नमस्कारी सर्वभावे ॥ १ ॥
शिकल्या बोलाचा धरीसोल[1] ताठा । तरी जासी[2] वाटा यमपंथें ॥ २ ॥
हिरा परिस मोहरा आणीक पाषाण । नव्हे परी जन संता तैसी ॥ ३ ॥
सरिता वाहाळा[3] गंगे सागरा समान । लेखी त्याहून अधम नाहीं ॥ ४ ॥
आणीक अमुप होती तारागणें । रविशशिमानें लेखू[4] नये ॥ ५ ॥
तुका म्हणे नाहीं नरमता[5] अंगीं । नव्हे तें फिरंगी कठिण लोह ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा –ताठा-अभिमान, लेखी–मानतो, अधम–दुष्ट, अमुप–अमर्याद रविशशिमानें–सूर्य, चंद्राच्या किंमतीने, फिरंगी–तरवार, तिखे.

अर्थ –ज्याच्या त्याच्या योग्यतेप्रमाणे दया दाखवावी हे खरे असले तरी संतांना मात्र सवभावाने नमस्कार करावा १ जें काही तू शिकला आहेस त्याचा अभिमान धरशील तर यमाच्या मार्गानें मरण पावशील असे समज २ हिरा, परिस, मोहरा यांची तुलना इतर दगडाशी कशी होऊ शकेल ? तसेच संत लोक हे इतरासारखे मानू नयेत ३ नद्या ओढे याना गंगाप्रमाणे अथवा सागराप्रमाणे जो मानतो त्याच्या इतका दुष्ट या जगात कुणी नाही ४ आकाशात असंख्य तारका असतील, पण त्याचे मापन काय चंद्र सूर्याच्या किंमतीनें करायचे असते ? ५ तुकाराम महाराज म्हणतात, तिच्या अंगात नरमता नाही ती काही तरवार नसते ते नुसते लोखंड असते कठिण लोखंड व नरम तरवार यांत फरक आहेच ६

१४५७ आणीक काहीं मज नावडे मात । एका पंढरिनाथावाचुनिया ॥ १ ॥
त्याचीच कथा आवडे कीर्तन । ते मज श्रवण गोड लागे ॥ २ ॥
तुका म्हणे संत म्हणोत भलतें । विठ्ठलापरतें न मनी काहीं ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा –आणीक–दुसरे मात–गोष्ट

अर्थ –मला एका पंढरीनाथाशिवाय दुसरी कुठली गोष्ट कधी आवडतच नाही १ त्याचीच कथा अथवा त्याचेच कीर्तन मला आवडते तेच ऐकणे मला गोड लागते २ तुकाराम महाराज म्हणतात, संत काहीही म्हणोत मी त्या विठ्ठलाखेरीज दुसरे काही मानणार नाही ३

१४५८ ठेवा जाणीव गुडून । येथें भावचि प्रमाण ॥ १ ॥
एका अनुसरल्या काज । अवघें जाणे पंढरिराज ॥ २ ॥
तर्कवितर्कासी । ठाव न लगे सायासीं ॥ ३ ॥
तुका म्हणे भावेविण । अवघा बोलती तो सीण ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा -जाणीव–ज्ञानाचा ताठा, गुडून–गुंडाळून, काज–कार्य होण्यासाठी

अर्थ –ज्ञानी लोकहो, तुम्ही तुमच्या ज्ञानाचा ताठा गुंडाळून ठेवा या देवाची प्राप्ती होण्यासाठी एका भावाचीच फक्त जरूरी असते १ एकचित्त श्रद्धा भावाने या पंढरीराजाला शरण गेले म्हणजे तो सर्व करील २ याविषयी उगाच तर्कवितर्क करून परिश्रम करू नयेत ३ तुकाराम महाराज म्हणतात, या श्रीहरीवरील भावाशिवाय जे कोणी बोलतात तो नुसता शीण मात्र आहे ४

१४५९ येथें दुसरी न सरे आटी । देवा भेटी जावया ॥ १ ॥
तोचि ध्यावा एका चित्तें । करूनि रितें कळिवर ॥ २ ॥
षडउर्मी हृदयात । याचा अंत पुरवूनि ॥ ३ ॥
तुका म्हणे खुंटे आस । तेथें वास करी तो ॥ ४ ॥

१ धरितील २ जाती ३ ओहळ ४ मोजू ५ नम्रता

शब्दार्थ व टीपा –न सरे–चालणार नाही, आटी–खटपट, प्रयत्न, रितें–मोकळे, कलिवर–देह, हृदय, षडउर्मी–काम, क्रोध, मोह इत्यादी वासना, अंत–शेवट, फुटे–नष्ट झाली.

अर्थ –या देवाच्या प्राप्तीसाठी दुसऱ्या कुठल्याही खटपटीचे काही चालणार नाही १ याचीच प्रार्थना एकचित्ताने हृदय मोकळे करून मनोभावे करावी २ मनातील काम, क्रोध, मोह इत्यादी वासनांचा शेवट करावा ३ तुकाराम महाराज म्हणतात, ज्याच्या हृदयातील वासना नष्ट झाली तेथेच देव वास करीत असतो ४

१४६० मुक्त तो आशंका नाहीं जया अंगीं । बद्ध मोहोलागीं लज्जा चिंता[1] ॥ १ ॥
सुख पावे शांती धरूनि एकांत । दुःखी तो लोकांत दंभ करी ॥ २ ॥
तुका म्हणे लागे थोडाच विचार । परी हे प्रकार नागविती ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा –आशंका–संशय.

अर्थ –ज्याच्या चित्तामध्ये कसलाच संशय नाही तो मुक्त समजावा, ज्याच्या चित्तात लज्जा, मोह, चिंता इत्यादी विकार आहेत तो बद्ध जाणावा १ एकान्ताचा वास पत्करून राहिल्यास मनास शांतता लाभेल, आणि लोकांत राहून उगाच दंभ केला तर मात्र दुःख होईल २ तुकाराम महाराज म्हणतात, सुखाच्या प्राप्तीचा उपाय फार थोडासा आहे, पण नाना प्रकार करून लोक फसवितात ४

१४६१ कानीं धरी बोल बहुतांचीं मतें । चाट त्यापरतें आणीक नाहीं ॥ १ ॥
पावेल गौरव बोढाळाचे परी । दंड पाठीवरी यमदूतां ॥ २ ॥
शब्दज्ञानी एक आपुल्याला मतें । सांगती वेदांत भिन्नभावें ॥ ३ ॥

**विवरण** :-- हा एक अतिशय सोपा, पण तत्त्वस्पर्शी व मार्मिक असा अभंग आहे कलियुगात नामस्मरणाचे, हरिकीर्तनाचे महत्त्व विशेष प्रकारचे असून वैकुंठ, स्वर्ग, मोक्ष, ऋद्धिसिद्धींचे ऐश्वर्य यांच्यापेक्षाही भगवताच्या नामाला महत्त्व विशेष प्रकारचे आहे यज्ञयागादी क्रियापासून मिळणारे स्वर्गसुख भक्तानी तुच्छ मानले आहे वैकुंठ हे परमेश्वराचे निवासस्थान, परतु तेही साधुसतांना नको असते कारण याच भूमीवर साधुसंतांच्या मेळाव्यात, कीर्तनसुखात त्यांच्यापुढे प्रत्यक्ष वैकुंठ उभे राहते येथे केवळ नामचिंतनात वैकुंठसुख हाताशी येते तुकारामानीच एके ठिकाणी म्हटले आहे, '**वैकुंठा जावया तपाचे सायास**' 'वैकुंठप्राप्तीसाठी नाना प्रकारचे तप करावे लागते, पण पुंडलीकाने उपकार करून '**पंढरी भूवैकुंठ नगरी**' निर्माण करून '**केली सोपी पायवाट**' अशा स्थितीत वैकुंठाचा लोभ कुणाला वाटणार ? याच कारणासाठी नामदेवराय परमेश्वराला आळवतात, '**वैकुंठवासी आम्हा नको धाडू हरी। वास दे पंढरी सर्वकाळ ॥ वैकुंठ चोपट जुनाट झोपडी। नको आडाआडी घालू आम्हा। वैकुंठ जाऊनि काय मी करावे। उगेचि बैसावे मौन रूप॥**' उगाच मौनरूपाने बसण्यापेक्षा कीर्तनसुखात व नामसंकीर्तनात मग्न होणे युक्त नव्हे काय ? याच भूमिकेवरून सत मतत वैकुंठसुखासाही मोह कधी धरीत नाहीत मोक्ष तर त्याना मुळीच प्रिय वाटत नाही नामस्मरण करण्यात, हरिनाम घेण्यातच त्याना वैकुंठाची व मोक्षाची प्राप्ती होत असते वैकुंठवासी होण्यासाठी, मुक्तिपदाच्या प्राप्तीसाठी आधी मरावे लागते, परतु नामसंकीर्तनात केवळ श्रवणानेच मोक्षाची प्राप्ती असते ज्ञानेश्वरानी यासबधी फार मार्मिक पद्धतीने निर्णय देताना म्हटले आहे, '**मोक्ष देऊनि उदार। काशी होय कीर। परि वेचणे लागे शरीर। निये गावीं ॥ हिमवन्तु दोष खाये। परि जीवःघाचो हानि होये। तैसे शुचित्व नोहे। सज्ज नाचे ॥ शुचित्वें शुचि गांग होये। आणि पापतापही जाये। परि तेथें आहे। बुडणें एक ॥ खोलिये पाण नेणिजे। तरी भक्तीं न बुडिजे। रोकडाचि लाहिजे। न मरता मोक्षु ॥**' या मोक्षासाठी देहास कष्ट नकोत, तीर्थयात्रांचा ताप नको, तपादी साधनात होणारे मनाचे हाल नकोत येथे नुसत्या श्रवणातच मोक्ष आयता आहे ज्ञानेश्वरानीच म्हटले आहे, '**तैसा मनाचा मारु न करिता। आणि इंद्रिया दुःख न देता। एथ मोक्षु असे आयता। श्रवणाचिमाजि ॥**'

श्रवणातून, नामसंकीर्तनातून नामस्मरणाच्या घोषातून जो मोक्ष साधुसंताना प्रतीत होतो त्याच्यापुढे सारे जग त्याना फिके वाटते नाना प्रकारचे ऐश्वर्य व चमत्कारादी प्रकार षडैश्वर्या या सिद्धी त्याना नकोशा वाटतात रिद्धी व सिद्धी या त्यांच्याचपुढे दासीप्रमाणे हात जोडून उभ्या असतात या रिद्धीसिद्धीचा सपूर्ण तपशील, त्याचे सामर्थ्य व भक्तिमार्गातील त्याचे शून्य अमरली किंमत एकनाथी भागवताच्या पधराव्या अध्यायात विस्ताराने वर्णन केलली आहे या रिद्धीसिद्धीच्या व चमत्काराच्या मागे लागून अथवा त्याच्या प्राप्तीनेच सर्वसुखाची परमावधी मानून सर्व लोक फसतात अलौकिक चमत्कार दिसला की लोक भुलतात, तथे ईश्वराचे अस्तित्व त्याना भासते चमत्काराला नमस्कार मुक्त होऊन खराखुरा ईश्वर फार दूर राहातो म्हणून एकनाथानी या रिद्धीसिद्धी भक्तिमार्गात कशा आड येतात याचे फार विस्ताराने वर्णन केले आहे साधुसंताच्या दारात भाव या दासीप्रमाणे हात जोडून असतात पण याच्या माग जे कुणी लागतील ते फसतील, ईश्वर त्याच्यापासून फार दूर राहील हे निश्चित या-सबधीचा निर्णय देताना एकनाथांनी म्हटले आहे, '**या परी गा साधकासी। धारणा धरोनि मानसीं। मी एक ध्याता अहर्निशीं। सकळ सिद्धी दासी त्यासी होती ॥ सांडूनि सकळ उपाये। मी एक ध्यानीं धरिल्या पाहे। साधकासी काय उणें आहे। दुर्लभ काये सिद्धींचे ॥ माझे भजनें साधकाशीं। सिद्धी प्रकटती साधकासी। त्या सेव्य नव्हती त्यासी। तैंचि हृषीकेशी सागत ॥**" भजनमार्ग सोडून जो या रिद्धीसिद्धीच्याच पाठीमागे लागतो त्याची फार मोठी हानी कशी होते हे सांगताना एकनाथ म्हणतात, '**एकाग्र भजने माझी प्राप्ती। होता ते सधीसी सिद्धी येती। त्या भुलवोनि भोगासक्ती। नागविती साधकां ॥ जें नेणतीं माझें निजसुख। ऐसे जे का केवळ मूर्ख। त्यासींच सिद्धीचे कौतुक। अलौकिक भोगलिप्सा**' ॥ रिद्धीसिद्धीचे साधन म्हणजे ईश्वराला सोडून अतिरिक्त असे भोग भोगण्याचाच प्रयत्न होय वास्तविक पाहाता या रिद्धीसिद्धीचे रूप कसे आहे ? एकनाथ स्पष्ट भाषेत सागतात, '**जैसे वेश्येचे हावभाव। तैसे सिद्धींचे वैभव**' अशा या रिद्धीसिद्धींना धिक्कारून सत त्याना दासीपणाची पदवी प्राप्त करून देतात

रिद्धीसिद्धी, वैकुंठवास, मोक्षपद याना अशा प्रकारे दूर लोटून साधुसंत कीर्तनाच्या वेळी निर्माण होणाऱ्या नामरसाचा आस्वाद घेतात व सतुष्ट होतात या संताना ईश्वराच्या नामाचा एवढा विश्वास की प्रत्यक्ष ईश्वरालाही

स्वतःच्या नामाचे जे महत्त्व माहीत नसते ते या भक्तांना ठाऊक असते ईश्वराच्या नामाचा घोष ईश्वरासच कसा करता येईल ? त्यासाठी भक्त ही दुजेपणाची अवस्था हवी भक्तपणाचा जन्म यासाठीच गोड वाटतो संतांना कारण या निःसीम भक्तांच्याच भूमिकेवरून ते ईश्वराला त्याच्या नामाच्या महिम्याची आठवण करून देतात खरे पाहाता या ईश्वरास प्राप्त झालेले नामाभिधान, त्याचे रंग–रूप, त्याची गुणकीर्ती याचा सारा डौल या भक्तानेच वाढवलेला असतो ना ? देवास देवपण या भक्तामुळेच ना ? मग त्याच्या नामाचा महिमा जसा देवाला माहीत नसतो तसा तो वेदशास्त्रास, ब्रह्मदेवास, योग्यानाही माहीत नसतो 'नामाचा महिमा नेणेचि पै ब्रह्मा। म्हणोनिया कर्मा अनुसरला,' 'नामाचा प्रताप जाणवेना कोणा। समुद्रीं पाषाण तारियेले।', 'नामाचे सामर्थ्य नेणती वेदशास्त्र। शेषाची वक्त्रें मौनावली' असे नामदेवानी सांगितले आहे गंगा, गणपती, चंद्र, सूर्य, शंकर, वसिष्ठ, भीष्म, पराशर, उद्धव, अंगद, ब्रह्मा, मुचकुंद यानासुद्धा नामाचा महिमा समजला नाही, पण नामदेवानी मात्र आपल्या भावबलाने 'दाटोनि श्रीपति उभा केला' अशी साक्ष आहे

१४६३ न पूजीं आणिका देवा न करीं त्याची सेवा। न मनीं या केशवाविण दुजें ॥ १ ॥
काय उणे जाले मज तयापायीं। ते मी मागो काई कवणासी ॥ २ ॥
आणिकाची कीर्ती नाइके न बोले। चाड या विठ्ठलेविण नाहीं ॥ ३ ॥
न पाहे लोचनीं श्रीमुखावाचूनि। पंढरी सांडूनि न वजें कोठें ॥ ४ ॥
न करीं काहीं आस मुक्तीचे सायास। न भें संसारास येता जाता ॥ ५ ॥
तुका म्हणे काहीं व्हावे ऐसे जीवा। नाहीं या केशवाविण दुजें ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा –आणिका–इतर, मनीं–मनामध्ये अथवा मानणार नाही, उणे–कमी, चाड–इच्छा, न वजें–जाणार नाही, आस–इच्छा, सायास–प्रयत्न, न भें–भीत नाही, दुजें–दुसरे

अर्थ –मी दुसऱ्या कुठल्या देवाची पूजा करणार नाही, की त्याची सेवाही करणार नाही या एका केशवावाचून मी कुणालाच मानणार नाही, *अथवा याच्याशिवाय माझ्या मनात दुसरे कुणी नाही १ या देवाच्या ठिकाणी* मला काय कमी आहे ? मग मी इतरापाशी काय म्हणून मागावे ? २ मी याच्याशिवाय इतरांची कीर्ती ऐकणार नाही तोंडाने गाणार नाही एका विठ्ठलाशिवाय मला दुसरी कसलीच इच्छा नाही ३ मी याच्या मुखाखेरीज इतरत्र पाहाणार नाही, आणि पंढरपूर सोडून कुठे जाणार नाही ४ मी कधी मुक्तीची इच्छा वा ती मिळावी म्हणून काही प्रयत्नही करणार नाही जन्ममरणाच्या खेपाची भीतीही मला वाटणार नाही ५ तुकाराम महाराज म्हणतात, या केशवावाचून दुसरे काही या जीवास प्राप्त व्हावे असे वाटत नाही ६

विवरण – या अभंगात भक्ताची अनन्यता किती तीव्रतेची असते याचे वर्णन करण्यात आले आहे एकदा जे उपास्यदैवत ठरले, ज्यावर जीव जडून राहिला, ज्याच्या पायी प्रीती मुरून राहिली, त्याच्याशिवाय इतरत्र वेगवेगळ्या निमित्तानी जाणे खऱ्या भक्तास मानवत नाही भक्तीत ही अनन्यता महत्त्वाची आहे गीतेत भगवतानी स्पष्टपणे सांगितले आहे की जो भक्त नेहमी माझे स्मरण अनन्यभावाने करतो त्यास माझी प्राप्ती सुलभ रीतीने होते 'अनन्यचेताः सततं यो मां स्मरति नित्यशः। तस्याहं सुलभः पार्थ नित्ययुक्तस्य योगिनः' जे लोक अनन्यनिष्ठ राहून माझे चिंतन करतात त्याचा योगक्षेम मी चालवितो 'अनन्याश्चिन्तयन्तो मां ये जनाः पर्युपासते। *तेषां नित्याभियुक्तानां योगक्षेमं वहाम्यहम्* एवढी ग्वाही परमेश्वर आपल्या अनन्यभक्तांना देत असल्याने भागवत संप्रदायातील साधुसंतानी या एकनिष्ठेची, अनन्यत्वाची महती पुनःपुन वर्णन केली आहे

ईश्वराच्या अखंड अनुसंधानाला ही अनन्यभक्ती आवश्यक खरीच, पण तुकोबानी आणखी एका हेतूने श्रीविठ्ठल या दैवताचा वारंवार एकनिष्ठेने पुरस्कार केला असावा महाराष्ट्राच्या पहिल्या काळात देवधर्म व परमार्थविचार याची मोठीच पडझड होऊन क्षुद्र देवाचे व देवतांचे माहात्म्य माजले होते हिंसाचारास, वेडगळ कल्पनांना

नवसाना, इष्टकामनार्थ सिद्धीना, अघोरी मार्गांना ऊत आला होता या सर्व कुटिर वृत्तीना व अधोगामी प्रवृत्तीना बाध घालून वात्सल्य, करुणा, एकनिष्ठा, इत्यादी भावावर पुष्ट झालेली भक्ती संताना वाढवावयाची होती या दृष्टीने त्यांनी श्रीविठ्ठलाच्या एकनिष्ठ भक्तीचा पुरस्कार वारंवार केला आहे अनेक देवदेवताच्या वा क्षुद्र उपायाच्या पाठी-मागे, कधी चमत्कारामुळे, कधी कामनातृप्तीसाठी लागणाऱ्या जनतेस शुद्ध, सात्त्विक व प्रेममय उपासनेचा मार्ग साधुसतानी दाखविला. हा बदल ज्ञानदेवाच्या काळापासूनच अभिप्रेत आहे नाना देवदेवताचा बुजबुजाट व त्याची लौकिक हेतूसाठी पूजा या गोष्टी खऱ्या भक्तीस मारक असल्याचा पुरावा भगवताच्या मुखातूनच ज्ञानेश्वरानी केला आहे. 'आणि माझ्या ठायीं भक्ती । फळाचार्गी जया आर्ती । धनोद्देशे विरक्ती । नटणे जैसी ' भक्ती एकावर जडली आहे असे दाखवावयाचे व लौकिक फळासाठी नाना देवाचे उंबरठे झिजवायचे ' या चचल वृत्तीचे वर्णन करताना ज्ञानेश्वरानी लिहिले आहे, 'ना तरी कांतच्या मानसीं । रिगोनी स्वैरिणी जैशी । राहाटे जारेंसी । जावयालागी । तैसी भाते किरीटी । भजनी गा पाउटी । करूनि जो दिठी विषो सूये ॥ ' वरवर भजन देवाचे व मनात हेतू ऐहिक विषयाचा, अशी अवस्था या प्रकाराने होत असते ज्ञानेश्वरानी श्रीकृष्णाच्या तोंडाने वदविले आहे, 'एकादशीच्या दिवसीं । जेतुला पाडू आम्हासि । तेतुलाचि नागासी । पचमीच्या दिवशीं ' अशा प्रकारे हा भक्त 'अखंड भजन करी । उगा नोहे क्षणभरी । अरवेन गावद्वारीं । आहेव जैसी ' एखादी अखडसौभाग्यवती सबध गावाचे उंबरे झिजवून आपल्या सौभाग्याचा टेंभा मिरविते, तसेच अशा अज्ञानी भक्ताची तऱ्हा असते अशा अडाणी भक्तानी व त्याच्या सकाम भक्तीने सर्वसामान्याची फार दिशाभूल केलेली होती, म्हणून तुकोबासारख्या सतानी भगवद्-गीताप्रणीत अनन्यभक्तीचा प्रसार केला स्वत त्यासरशीचे आचरण घालून दिले एका श्रीविठ्ठलावाचून याना दुसरे काही दिसत नसे

१४६४ नव्हे खळवादी मताच पुरता । सत्याची हे सत्ता उपदेश ॥ १ ॥
साक्षत्वेसी मना आणावीं उत्तरें । परिपाकीं खरे खोटें कळे ॥ २ ॥
नव्हे एकदेशी शब्द हा उखता । ब्रह्मांडापुरता घेईल त्यासी ॥ ३ ॥
तुका विनवणी करी जाणतियां । बहुमतें वाया श्रमो नये ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा –खळवादी–दुष्ट मताचा प्रसार करणारे, परिपाकीं–शेवटी, परिणामी, एकदेशी–एकमार्गी, उखता–मोजका

अर्थ–जे कुणी दुष्ट मताचा पुरस्कार करणारे आहेत, ते आपल्या मताच्या सिध्दीसाठीच खटाटोप करतात, पण मी मात्र तसा नाही माझा उपदेश खरेपणाच्या सत्तेवरचा असतो १ खळवादी लोकाचा उपदेश व माझा उपदेश या दोहींची मनाची साक्ष ठेवून परीक्षा करावी, म्हणजे शेवटी खरे कोणते, खोटे कोणते; याचा निवाडा सहज होईल. २ माझा हा शब्द काही एकमार्गी नाही, किंवा सकुचित म्हणजे मोजकाही नाही; जो त्याचा अर्थ मनापासून पाहील त्याला तो सारे ब्रह्मांड व्यापून राहिला आहे असे समजेल ३ तुकाराम महाराज म्हणतात, म्हणून माझी जाणत्यांना विनती आहे की, अनेक खलमतवाद्याच्या नादी लागून लोकांनी विनाकारण श्रम करू नयेत ४

१४६५ याचि नावे दोष । राहे अंतरीं किल्मिष ॥ १ ॥
मना अंगीं पुण्य पाप । शुभ[1] उत्तम संकल्प ॥ २ ॥
बिजाऐसीं फळें । उत्तम कां अमंगळें ॥ ३ ॥
तुका म्हणे चित्त । शुद्ध करावें हे नित[2] ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– किल्मिष–सशय, शका, विकल्प, नित–नित्य, नेहमी अथवा नीती

१ अशुभ, २ हित

विवरण –कीर्तन हे प्रभूच्या गुणकीर्तिगायनाचे प्रमुख साधन भागवत सम्प्रदायात या कीर्तनाला वा नामस्मरणाला मोठेच महत्त्व अशा या एका सर्वोत्तम साधनाची परंपरा नारदापासून सुरू झालेली महाराष्ट्रात नामदेवरायानी तिचा प्रारभ केला परमार्थविचार, कथानिरूपण, नृत्य, वाद्य, संगीत, भजन इत्यादींचा सुरेख मेळ असलेले हे एक प्रभुकृपासपादनाचे वा त्याच्या प्रेमात तल्लीन होण्याचे प्रमुख साधन परतु याही साधनाचा दुरुपयोग धंदेवाईक व भादू कथाकार करीत राहिले पोटासाठी कीर्तन करणा याची सख्या वाढत राहिल्याकारणाने साधु-सताना कीर्तनाच्या मर्यादा सागणे अगत्याचे झाले कीर्तनाच्या श्रोत्यापेक्षा कीर्तनकारावर बंधने अधिक आली मुख्य म्हणजे कीर्तनकाराने आपल्या कथेचे मोल कधी मागू नये जो मोल मागेल त्याची गती काय होईल हे तुकोबानी या अभगात आपल्या नेहमीच्या परखड पद्धतीने सागितल आहे 'भाते परीस थोरी कथा। भाड घेता न लाजे' म्हणून दुम या एका ठिकाणी त्यानी धिक्कार केला आहे 'कथा करोनिया मोल ज्यार्प घेती। तेही दोघे जाती नरकामध्ये' असे त्यानी आणखी एका अभगात स्पष्टपणे सागितल आहे 'जेथें कीर्तन करावें। तेथें अन्न न सेवावें' असा कडक दडक साप्रदायिकाना घालून दिल्ला आहे 'तट्टा वृषभासी दाणा। तृण मागो नये जाणा' हाही वारवावा ध्यानात ठेवण्यासारखा आहे

१४७१ नाइकावे कानीं तयाचे ते बोल। भक्तीविण फोल ज्ञान सागे ॥ १ ॥
वाखाणी अद्वैत भक्तिभावेविण। दुःख पावे सीण श्रोता वक्ता ॥ २ ॥
अहं ब्रह्म ह्मणोनि पाळीतसे पिंडा। नो बोलावे भाडा तया सवे ॥ ३ ॥
वेदबाह्य लंड बोले जो[1] पाषाड। त्याचे काळें तोंड सतामध्यें ॥ ४ ॥
तुका म्हणे खडी देवभक्तपण। वरिष्ठ त्याहून श्वपच तो ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा– –सीण–कष्ट, पिंडा–शरीरास, भाडा–भाडखारावरावर, लंड–नास्तिक, खडी–खंडण करता श्वपच–मास खाणारे अत्यज

अर्थ –श्रीहरीच्या भक्तीशिवाय जो ज्ञानाचे फोलपणे विवरण करतो, त्याचे शब्द कानानी ऐकूसुद्धा नयेत १ मनात भक्तिभाव नसताना जो अद्वैताचे तत्त्वज्ञान सागतो तो दुःखी होतो, त्याचा श्रोताही कष्टी होतो २ 'अहं ब्रह्मास्मि' म्हणतो, पण स्वतः च्या शरीराची मात्र आवडीने जोपासना करतो अशा या भाडखोर माणसाशी बोलूसुद्धा नाही ३ हा नास्तिक मनुष्य वेदबाह्य असलेले विचार बोलतो तो सतामध्ये काळतोंडचा म्हणूनच ओळखला जातो ४ तुकाराम महाराज म्हणतात, हा ब्रह्मनिरूपण करतो, पण देवभक्ताचे नाते खडण करतो, त्यामुळे ह्या मनुष्याहून कुत्र्याचे मास खाणारा अत्यजच श्रेष्ठ मानणे भाग आहे ५

१४७२ वेदविहित तुम्ही आइका हो कर्मे। बोलतो तीं वर्मे सतापुढे ॥ १ ॥
चारी वर्ण जाले एकाचिये अगीं। पापपुण्य मार्गी[2] विभागिले ॥ २ ॥
प्रथम पाउलीं पावविला पय। आदि मध्य अत भेद नाहीं ॥ ३ ॥
आवे बोरी वड[3] बामुळा चदन। गुणागुणे भिन्न अग्नि एक ॥ ४ ॥
तुका म्हणे मन उन्मन जों होय। तोवरि हे सोय विधि पाळीं ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा –उन्मन–स्वरूपानुभवाची अवस्था

अर्थ– वेदानी सागितलेली कर्मे जी आहेत ती तुम्ही ऐका त्याचे रहस्य मी सर्व सतांसमक्ष सांगत आहे १ एकाच परब्रह्मापासून, तत्त्वापासून चारही वर्ण निर्माण झाले आणि ते आपापल्या गुणांप्रमाणे वाटले गेले २ पहिल्या प्रथम सर्वांचा दर्जा सारखाच असून त्या श्रीहरीच्या ठिकाणी आदी, मध्य व अत असा फरक नसतो ३ आंबे, बोरी, वड, बाभूळ, चदन या वृक्षांत गुणावगुणांचे भेद असले तरी त्यांचा अग्नीशी सबध येताच ते सब एकच होतात ४ तुकाराम महाराज म्हणतात, जोपर्यंत आपले मन उन्मनीच्या अवस्थेपर्यंत पोचले नाही, तोपर्यंत शास्त्रसमत अशा मार्गानेच गेले पाहिजे ५

[1] तो, [2] जगीं, [3] वन

• **विवरण:–** परमार्थ व भक्ती याच्या क्षेत्रात साधुसतानी वर्ण व जाती याची बधने थोडी शिथिल केली असे दिसते तरी परपरागत वेदविहित आचारधर्मच ते प्रधान मानीत होते. या अभगात तुकोबानी वेदप्रणीत वर्णविचार सागितला आहे. जोपर्यंत मनाची अतिशय उच्च अवस्था निर्माण झालेला नाही, तोपर्यंत वेदप्रणीत वर्णाश्रम धर्माचाच मार्ग स्वीकारायला हवा, असे त्यानी आग्रहाने सागितले आहे अगदी प्रारभी वर्णविशेषरहित असेच जग ब्रह्मदेवाने एकाच अद्यापासून निर्माण केले. महाभारतातील शातिपर्वात, भृगुभारद्वाज याच्या सवादात या विचाराचा चागला खुलासा केलेला आहे. **'चारी वर्ण जाले एकाचिये अंगीं । पापपुण्य भागीं विभागले'** या तुकारामबुवाच्या वचनाचे मूळ कदाचित याच स्थानात असावे. प्रथम वर्णविरहित असलेल्या जगाचे विभाग पापपुण्यात्मक कर्मांमुळे होत राहिले. ज्याना भोग आवडत, सताप येत असे, धाडसाची कामे करण्याची इच्छा ज्याना होई व ज्याचा वर्ण ताबुस होता ते क्षत्रिय झाले गुरेढोरे पाळून शेती करणारे पीत वर्णाचे लोक वैश्य झाले आणि हिंसाचार व सेवावृत्तीत समाधान मानणारे शूद्र बनले या तीन अवस्था निर्माण होण्याच्या आधी प्रारभी सर्व ब्राह्मणच मानले जात असत. या चारही वर्णांच्या उदयाचा क्रम वादग्रस्त असला तरी हे चारही वर्ण एकातूनच पुढे समाजाच्या गरजेनुसार निर्माण झाले हे मात्र खरे **'चातुर्वर्ण्यं मया सृष्टं गुणकर्मविभागशः.'** या गीतेच्या वचनाचा अर्थ असा की, पूर्वी वर्ण जन्मावरून ठरत नसून गुणकर्मावरून ठरत असे पुढे गीतेने प्रत्येक वर्णाचे गुणधर्मही विस्तारपूर्वक सागितले आहेत. त्याच्या कर्तव्याची मीमासा केली आहे

ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र याची कामे त्याच्या स्वभावजन्य म्हणजे प्रकृतिसिद्ध गुणाप्रमाणे विभागलेली आहेत. शम, दम, तप, शुचिर्भूतपणा, क्षाती, सरळपणा, अध्यात्मज्ञानाची आवड, आस्तिक्यबुद्धी इत्यादी स्वभावधर्माचे ब्राह्मण झाले. शौर्य, तेजस्विता, धैर्य, दक्षता, युद्धातून पलायन न करणे, दातृत्व, प्रजेवर सत्ता चालविणे ही क्षत्रियाची कर्मे होत कृषी म्हणजे शेती, गुरेढोरे पाळण्याचा धदा व्यापार ही कामे वैश्याची. सेवा करणे हे शूद्राचे काम. या चार वर्णाचा प्रारभ एकच होता. त्याच्यात प्रथम प्रथम भेद नव्हता पण पुढे पापपुण्यात्मक भेदाचा विस्तार झाल्यावर त्याच्यात फरक पडला. असे असले तरी परमेश्वराच्या दृष्टीने त्याच्यात अभेदच मानावा; जसा विविध प्रकारच्या लाकडाना अग्नी लागल्यावर त्याचे स्वरूप एकच तसा. चातुर्वर्ण्यप्रणीत विविध कर्मे प्रत्येकाने पाळावीत; पण ज्याच्या मनाची फार उच्च अवस्था झाली आहे त्याला यातून सुटका मिळावी असा तुकोबाच्या विवेचनाचा रोख दिसतो याच वर्णाश्रमाच्या आधाराने लोकानी स्वसुखार्थ कर्मे करीत जावीत. ज्ञानेश्वरानी या सदर्भात सागितले आहे, **'कर्मेंद्रियें सुखें । करिती कर्में अशेखें । जियें का वर्णविशेखें । भागा आलीं.'**

१४७३ तीर्थांचें जें मूळ व्रतांचें जें फळ । ब्रह्म तें केवळ पंढरिये ॥ १ ॥
तें आम्हीं देखिलें आपुल्या नयनीं । फिटलीं पारणीं डोळियांचीं ॥ २ ॥
जीवाचें जीवन सुखाचें सेजार । उभें कटीं कर ठेवूनियां ॥ ३ ॥
जनाचा[1] जनिता कृपेचा सागर । दीनां लोभापर दुष्टां[2] काळ ॥ ४ ॥
सुरवरां चिंतनीं मुनिवरां ध्यानीं । आकार निर्गुणीं तेचि असे ॥ ५ ॥
तुका म्हणे नाहीं श्रुतीं आतुडलें । आम्हा सांपडलें गीतीं गातां ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – श्रुतीं–वेदाना, आतुडलें–सापडले

अर्थ –सर्व तीर्थांचे मूळ व सर्व व्रताचे फळ असे जे परब्रह्म तेच पंढरपुरास विटेवर उभे राहिले आहे १ ते आम्ही आपल्या डोळ्यानी प्रत्यक्ष पाहिले आहे त्याला पाहून आमच्या डोळ्याचे पारणे फिटले आहे. २ जे सर्व जीवांचे जीवन असून सर्वांना सुखाची जवळीक अथवा शय्याच होय, ते येथे विटेवर हात कमरेवर ठेवून उभे आहे. ३ हा सर्व जगाला जन्म देणारा असून केवळ कृपेचा सागर आहे. हा दीनांना लोभ करणारा असून दुष्टाना कालाप्रमाणे नष्ट करणारा आहे. ४ देवादिकाच्या चिंतनात व मुनिश्रेष्ठांच्या ध्यानात हाच एकमेव असतो. निर्गुणात

[1] जगाचा, [2] दुष्टा.

अर्थ –मनामध्ये कोणत्याही प्रकारचा विकल्प अथवा संशय राहाणे हाच दोष आहे १ पाप व पुण्य ही मनाच्या बऱ्यावाईट प्रवृत्तीमुळेच निर्माण होतात शुभ अथवा अशुभ संकल्प मनामुळेच उत्पन्न होतात, अथवा उत्तम संकल्प करणे म्हणून उत्तम होय. २ जसे बीज असेल तशी त्यास चांगलीवाईट फळे येतात ३ तुकाराम महाराज म्हणतात, म्हणून आपले चित्त नेहमी शुद्ध करून ठेवावे हे चांगले, अथवा चित्त शुद्ध करावे यातच हित आहे, अथवा चित्त शुद्ध असावे हीच खरी नीती आहे ४

१४६६ कुशळ वक्ता नव्हे जाणीव श्रोता । राहे भाव चित्ता धरूनियां ॥ १ ॥
धन्य तो जगीं धन्य तो जगीं । ब्रह्म तया अंगीं वसतसे ॥ २ ॥
न धोवी तोंड न करी अघोळी । जपे सदाकाळीं रामराम[1] ॥ ३ ॥
जप तप ध्यान नेणे योग[2] युक्ती । कृपाळु जो भूतीं दयावंत ॥ ४ ॥
तुका म्हणे होय जाणोनि नेणता । आवडे अनंता जीवाहूनि ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा –कुशळ–कुशल, चतुर, जाणीव–जाणणारा

अर्थ –तू उगाच चतुर वक्ताही होऊ नकोस अथवा जाणणारा श्रोताही बनू नकोस चित्तामध्ये ईश्वराविषयी एक भाव मात्र धरून राहा १ ज्याच्या अंगी परब्रह्माची प्रभा फाकली आहे, ब्रह्माची वस्ती ज्याच्यात झाली आहे तो या जगात धन्य धन्य होय २ सदासर्वकाळ रामनामाचा जप करावा, याशिवाय तोंड धुणे अथवा अघोळ करणे याही क्रिया करू नयेत ३ सर्व भूतमात्राच्या ठिकाणी जो कृपाळू व दयावंत आहे त्यास जपजाप्य, तप, ध्यान, योगयाग, मुक्ती इत्यादींची पर्वा नसते ४ तुकाराम महाराज म्हणतात, जो सर्व काही जाणतो, पण मी जाणले आहे, असा गर्व ज्याच्यात उद्‌भवत नाही तोच परमेश्वराला जीवाहून प्रिय वाटतो ५

विवरण –जो 'जाणोनि नेणता' असतो तोच ईश्वराला आवडतो, यातील मर्म समजावून घेण्यासारखे आहे. सर्व काही जाणावे, समजून घ्यावे, पण मी जाणले आहे असे दर्शवू नये जाणणारा कोण आहे याचाही विचार व्हावा ईश्वराशी मन निगडित करण्याच्या, त्याला अर्पण करण्याच्या पद्धतीही भगवद्‌गीतेत वर्णन केल्या आहेत. आपले मन हे भगवंताच्या चरणी त्याच्या वृत्तीसहित घालावे, 'आठा पाहारामाझारीं' एक क्षण तरी परमेश्वरास द्यावा, तसा अभ्यास वाढवावा, पण हाही अभ्यास अवघड वाटत असेल तर 'मनें वाचा देहें । जैसा जो व्यापारु होये । तो मी करितु आहे । ऐसे न म्हणें' सर्व काही त्याच्याच प्रेरणेने होत असल्याची दृढ श्रद्धा असावी 'करणें का न करणे । हे आघवें तोचि जाणे । विश्व चळतसे जेणे । परमात्मेनि' अशा या परमात्मसत्तेतून जर सर्व व्यापार होत असतील तर मग सर्व जाणून नेणतेपणा न करणे हेच उचित नव्हे काय ? ईश्वराला जाणणे, त्याच्यामधील व आपल्यामधील एकत्व प्रचीतीस येणेच हेच खरे जाणणे पण हेही नेणत्याच्या भूमिकेवरून कारण 'मी जाणले' यात मी, जाणण्याची क्रिया व ज्याला जाणले तो असा फरक आलाच, तेव्हा जाणायचे, पण जाणवले कुणी याचे भान ठेवायचे, असा भावार्थ यामागे इतर कितीही शास्त्रे जाणली व एका परमेश्वरास ओळखले नाही तर ते जाणणेही व्यर्थच होय 'वेदविद जरी जाहला । तरी मातें नेणतां वाया गेला' असाच निष्कर्ष काढून ज्ञानदेवांनी म्हटले आहे, 'म्हणऊनि मज एकेंविण । हे वयीधर्म अकारण । आतां मातें जाणोनि काहीं नेण । तू सुखिया होसी ।'

१४६७ काळाचिया सत्ता ते नाहीं घटिका । पंढरीनायका आठविता ॥ १ ॥
सदाकाळ गणना करी आयुष्याची । क्षयेंचे वेळेची आज्ञा नाहीं ॥ २ ॥
याकारणें माझ्या विठोबाची कीर्ति । आहे हे त्रिजगतीं थोर वाट[3] ॥ ३ ॥
तुका म्हणे जन्मा आलियाचे फळ । स्मरावा गोपाळ तेंचि खरें ॥ ४ ॥

शब्दार्थ टीपा – घटिका–क्षण

---

१ रामनाम, २ याग, ३ वाट

अर्थ–ज्या क्षणात पांडुरंगाचे चिंतन होते त्या क्षणावर काळाची सत्ता चालत नाही. १. काळपुरुष हा क्षणाक्षणाने आयुष्याचा हिशेब करीत असतो, परंतु कथा चालू असताना जो वेळ जातो त्याची गणना करण्यास मात्र त्यास अनुज्ञा नाही. २ याचसाठी माझ्या विठोबाच्या कीर्तीची वाट तीनही जगांत फार थोर आहे. ३ तुका- तुकाराम महाराज म्हणतात, मनुष्याच्या जन्मास येऊन गोपाळाचे स्मरण करणे हेच खरे जन्मास आल्याचे फळ आहे. ४.

१४६८ घरोघरीं बहु जाले कवि । नेणे प्रसादाची चवी ॥ १ ॥
लंडा भूषणांची चाड । पुढें न विचारी नाड ॥ २ ॥
काढावें आइतें । तेंचि जोडावें स्वहितें ॥ ३ ॥
तुका म्हणे कळे । परि होताती अंधळे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– लंड–ढोंगी, खोटया. चाड–इच्छा. नाड–फसवणूक.

अर्थ–घरोघर कविता करणारे कवी पुष्कळच झाले आहेत; परंतु त्यांच्या कवितेत प्रसाद मुळीच नसतो. १ अशा या ढोंगी व खोटया कवींना जगामध्ये भूषण मिरविण्याची इच्छा असते. पण यापासून अखेर फसगत होते याचा विचारच ते कधी करीत नाहीत. २ या कवींचा उद्योग, म्हणजे दुसऱ्या चांगल्या कवींच्या कृतींतील आयते समर्पक शब्द काढावेत आणि आपल्या हितासाठी आपल्या कवितेत जोडून द्यावेत एवढेच त्यांना माहीत असते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, या त्यांच्या करण्याचा परिणाम त्यांचा त्यांना माहीत असून ते मुद्दाम तिकडे डोळेझाक करतात ४

१४६९ नये पाहों मुख मात्रागमन्याचें । तैसें अभक्ताचें गुरुपुत्रा ॥ १ ॥
ह्मणऊनि वरें धरितां एकांत । तेणें नव्हे घात भजनासी ॥ २ ॥
नये होऊं कदा निंदकाची भेटी । जया द्वैत पोटीं चांडाळाच्या ॥ ३ ॥
तुका म्हणे नका बोलों त्यासी गोष्टी । जयाचिये दृष्टी पाप वाढे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – घात–विघ्न, द्वैत–विषमता.

अर्थ :– आईशी गमन करणाराचे कधी तोंडसुध्दा पाहू नये. त्याचप्रमाणें सद्गुरुची कृपा ज्यांच्यावर झाली त्यांनी अभक्तांचे तोंड बघू नये. १ यासाठी एकांतवासाचे सेवन करणेंच अधिक चांगले. त्यायोगें ईश्वराच्या भजनात विघ्न येणार नाही २. निंदा करणाराची भेट कधीच घेऊ नये, कारण त्या चांडाळाच्या पोटात विषमतेचा विचार असतो ३. तुकाराम महाराज म्हणतात, ज्यास पाहिल्याबरोबर पाप घडते, अशांच्याबरोबर भाषणसुद्धा करू नये. ४

१४७० कथा करोनियां द्रव्य घेती देती । तयां अधोगति नरकवास ॥ १ ॥
रवरव कुंभपाक भोगिती[1] यातना । नये नारायणा करुणा त्यांची ॥ २ ॥
असिखड्गधारा छेदिती सर्वांग । तप्तभूमी अंग लोळविती ॥ ३ ॥
तुका म्हणे तया नरक न चुकती । सांपडले हातीं यमाचिया ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– कुंभपाक–एक प्रकारचा भयानक नरक, असिखड्गधारा–तरवारीच्या पात्याची धार.

अर्थ :– श्रीहरीची कथा करून जे द्रव्य घेतात, मोबदला मागतात, किंवा घेतात त्या दोघानाही नरकाची प्राप्ती होऊन ते अधोगतीस जातात. १ रौरव कुंभपाकाच्या नरकाच्या यातना त्यांना भोगाव्या लागतात यातून सोडविण्यासाठी भगवंतालाही दया येत नसते. २ अशा लोकांचे अंग तरवारीच्या पात्याने छेदले जाते, आणि ते तप्त अशा भूमीवर लोळविले जाते ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा लोकांच्या वाटयास आलेल्या नरकयातना कधी चुकत नाहीत. ते प्रत्यक्ष यमाच्याच हाती अडकलेले असतात. ४

१ करिती.

या सगुणात हाच एकमेव असतो ५ तुकाराम महाराज म्हणतात, या देवाचे मर्म वेदांनाही समजलेले नाही; पण आम्हांला मात्र याचे गुणगान नामसंकीर्तनात करीत असताना हा सापडलेला आहे. ६

१४७४ माझे मनोरथ पावविले सिद्धी । तई पायीं बुद्धि स्थिरावली ।। १ ।।
समाधान जीव राहिला निश्चळ । गेली हळहळ स्मरणें हे ।। २ ।।
त्रिविध तापाचें जालेंसे दहन । सुखावले मन प्रेमसुखें ।। ३ ।।
महालाभ वाचें वसे पांडुरंग । अंगाअंगीं संग अखंडित ।। ४ ।।
जीवनाचा जाला ओलावा अंतरीं । विश्व विश्वंभरीं सामावलें[1] ।। ५ ।।
तुका म्हणे माप भरी आलें सिगें । धारबोळ गंगे पूर वाहे ।। ६ ।।

शब्दार्थ व टीपा : अंतरीं–मनात, सिगें–परिपूर्ण, पुरेपुर. धारबोळ–पाण्याचे ल्हानमोठे प्रवाह

अर्थ देवा, तुझ्या पावलावर माझी बुद्धी स्थिर झाली व त्यायोगे माझे सर्व मनोरथ परिपूर्ण झाले आहेत. माझ्या जीवास समाधान झाल्याने तो आता निश्चल होऊन राहिलेला आहे या श्रीहरीच्या स्मरणामुळे माझ्या मनातील हळहळ दूर झाली. २ याच्या कृपेमुळे त्रिविध ताप जळून नष्ट झाले व मन प्रेमभराने सुखावून गेले ३ माझ्या वाणीत या पांडुरंगाचेच नाम वसत असल्यामुळे मला मोठा लाभ झाल्यासारखा वाटतो. याची अखंड संगत अंगसंगाच्या रूपाने आहे. ४ माझ्या मनात या ईश्वराच्या कृपेचा ओलावा निर्माण झाला असून या विश्वंभराच्या पोटात सर्व विश्व भरून राहिल्याची अनुभूती मला आलेली आहे ५ तुकाराम महाराज म्हणतात, अनेक ल्हानमोठे पाण्याचे प्रवाह ज्याप्रमाणे गंगेस येऊन मिळतात, त्याप्रमाणे या ईश्वराच्या कृपेचे माप शिगोशीग भरून आले आहे ६

१४७५ कृपेचें उत्तर देवाचा प्रसाद । आनंदी आनंद वाढवावा ।। १ ।।
बहुताच्या भाग्यें लागलें जाहाज । येथें आता काज लवलाहे ।। २ ।।
अलभ्य तें आलें दारावरी फुका । येथें आता चुका न पाहिजे ।। ३ ।।
तुका म्हणे जिव्हाश्रवणाच्या द्वारें । माप भरा बरें सिगेवरि ।। ४ ।।

शब्दार्थ व टीपा काज–कार्य

अर्थ – देवाच्या कृपेने मी बोलतो आहे, हाच देवाचा प्रसाद समजा आणि याचा आनंद सर्वत्र वाढवावा १ पुष्कळ लोकांच्या भाग्याने परमार्थाचे हे जहाज आपल्या जवळ आले आहे आता आपले कार्य साधून घेण्याची तुम्ही त्वरा करावी २ जे मिळण्यास कठीण आहे, ते फुकटाफुकटी दारावर आले आहे, आता त्याचे सेवन न करण्याची चूक तुम्ही करू नका ३ तुकाराम महाराज म्हणतात, आता वाणी व कान यांच्या साहाय्याने भक्तीचे माप शिगोशीग भरून घ्या ४

१४७६ पापपुण्यसुखदु:खाचीं मंडळें । एक एकाबळें वाव[2] घेतो ।। १ ।।
कवतुक डोळां पाहिलें सकळ । नाचवितो काळ जीवासी[3] तो ।। २ ।।
स्वर्गाचिया भोगें सरतां नरक । मागें पुढें एक एक दोन्हीं ।। ३ ।।
तुका म्हणे भय उपजलें मना । घेईं नारायणा कडिये मज ।। ४ ।।

शब्दार्थ व टीपा मंडळें–फेरे, वाव–विसावा

अर्थ :– पापपुण्य, सुखदु:ख इत्यादींचे फेरे एकमेकांच्या बळाने विसावतात, दृढ होतात १ असे हे सर्व कौतुक डोळ्यांनी पाहिले आहे सर्व जीवांना हा काळच नाचवीत आहे २ स्वर्गामधील दिव्य भोग भोगून पुण्याचा साठा संपला की मग नरकवासाचा भोग सुरू होतो असे एकामागून एकसारखे चक्र चालू असते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, हा सर्व प्रकार पाहून माझ्या मनात भय उत्पन्न झाले असल्यामुळे नारायणा, मला प्रेमाने उचलून तुम्ही कडेवर घ्यावे ४

१ मावळले, २ वाव, ३ भूतांसी

१४७७ वचना फिरती अधम जन । नारायण तो नव्हे ॥ १ ॥
केला आतां अंगीकार । न मनी भार समर्थ ॥ २ ॥
संसाराचा नाहीं पांग । देव सांग सकळ ॥ ३ ॥
तुका म्हणे कीर्त वाणूं । मध्यें नाणूं संकल्प ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा : अंगीकार–स्वीकार, पांग – उणीव, कीर्त–कीर्ती, वाणूं–वर्णन करू, नाणूं – आणणार नाही.

अर्थ –दिलेले वचन फिरवितात ते अधमच होत नारायण मात्र तसा नाही. १ त्यानेच माझा आता स्वीकार केलेला आहे. आणि याविषयी त्याने काही ओझे मानलेले नाही. २ आता समाराला काही उणीव राहिलेली नाही देव सर्व काही परिपूर्ण करणार आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, आम्ही त्याची कीर्ती वर्णन करू. मध्येच कोणत्याही प्रकारचा संशय मनात आणणार नाही ४

१४७८ कथा करोनियां मोल ज्यापें घेती । ते ही दोघे जाती नरकामध्यें ॥ १ ॥
ब्रह्म पूर्ण करा ब्रह्म पूर्ण करा । अखंड स्मरा रामराम ॥ २ ॥
मधुरवाणीच्या नका पडों भरी । जाल यमपुरी भोगावया ॥ ३ ॥
तुका म्हणे करीं ब्रह्मांड[1] ठेंगणे । हात पसरी जिणे धिग त्याचें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा : ब्रह्मांड–सर्व जगत्

अर्थ –श्रीहरीची कथा करून जे लोक त्याबद्दल मोबदला घेतात ते व त्यांना मोल देणारे असे दोघेही नरकास जातात १ अखंड राम राम असे स्मरण करून पूर्ण ब्रह्माचा अनुभव घ्यावा. २ या रामनामाखेरीज इतर मधुर वाणीच्या भरीस पडू नका. नाही तर यमलोकाची दारुण शिक्षा भोगावी लागेल. ३ तुकाराम महाराज म्हणतात, रामनामाच्या घोषाने सर्व जगत् ठेंगणे करून सोडावे. जो उगाच पोटासाठी हात पसरतो त्याचे जगणे धिक्कार करण्याजोगेच होय ४

१४७९ गोड नांवे क्षीर । परी साकरेचा धीर ॥ १ ॥
तैसें जाणा ब्रह्मज्ञान । बापुडें तें भक्तीविण ॥ २ ॥
रुची नेदी अन्न । ज्यांत नसतां लवण ॥ ३ ॥
अंधळ्याचे श्रम । शिकविल्याचेची नाम[2] ॥ ४ ॥
तुका म्हणे तारा । नावें तंबुऱ्याच्या सारा ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा : क्षीर–खीर, धीर–साह्य, लवण–मीठ.

अर्थ : दुधाची खीर ही फार गोड लागते, पण तिला साखरेचे साहाय्य असते. १ त्याचप्रमाणे नुसते कोरडे ब्रह्मज्ञान भक्तिशिवाय दीनवाणे आहे. २ अन्नात मीठ नसले तर त्याला कधीच चांगली चव येणार नाही ३ आंधळ्याला कितीही शिकविले तरी काय उपयोग ? त्याला शिकविण्याचे श्रम, एवढेच काम होऊन बसते ४ तुकाराम महाराज म्हणतात, तंबोऱ्याच्या नीटपणे लागलेल्या तारा हाच सारभूत अर्थ धारणाऱ्या आहेत. ५

१४८० नत्र जाला भूतां । तेणे कोंडिले अनंता ॥ १ ॥
हेंचि शूरत्वाचें अंग । हरी आणिला श्रीरंग ॥ २ ॥
अवघा जाला पण । लवण सकळां कारण ॥ ३ ॥
तुका म्हणे पाणी । पाताळ[3] तें परी खणी ॥ ४ ॥

१ कलिकाल २ काम ३ पातळपणें तळा आणि

शब्दार्थ व टीपा -हरी-पराभूत अशा अवस्थेला पण-सार्थक

अर्थ :-सर्व भूतमात्रापुढे जो विनम्र झाला त्यानेच आपल्या नम्रत्वाने अनंत स्वरूपाच्या परमात्म्यास आप ल्यात सामावून घेतले आहे १ ज्याने नम्रत्वाच्या भूमिकेवरून श्रीहरीस पराभूताच्या अवस्थेला आणले आहे तोच खरा शूर होय २ सर्व रुचीला जसे मीठ कारणीभूत असते, सार्थकी येते, त्याचप्रमाणे नम्रत्वामुळे हा प्रभू स्वाधीन होतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, पाणी पातळ असले तरी याच गुणाने ते दगडही खणून जाण्यास समर्थ असते ४

विवरण - भक्तिमार्गात लीनपणाला, नम्रत्वाला फारच महत्त्व असते मान लवणे, चरणी मस्तक ठेवणे, अहंकार सोडणे, शरण जाणे अशाच मार्गाने प्रभू आपलासा करता येतो 'शिष्यस्तेऽहं शाधि मां त्वां प्रपन्नम्-' 'मी तुमचा शिष्य तुम्हास शरण आलो आहे मला बोध करा,' या अर्जुनाच्या भूमिकेमुळे त्याला गीतार्थाचा बोध झाला आहे दुसऱ्या एका अभंगात तुकाराम महाराजांनी 'महापुरें झाडें जातीं । तेथ लव्हाळें वाचती' असे म्हटले आहे महापुरात झाडे वाहून जातात, पण लव्हाळे मात्र वाचतात. का ? तर ते नम्र होतात म्हणून म्हणूनच तुकारामबुवा लहानपण मागतात नम्रत्वाची भूमिका घेतात 'शरणागत झालों । तेणें मीपणा मुकलों' असे त्यांनी एका ठिकाणी म्हटले आहे आणखी एका अभंगात काही दृष्टान्त देऊन त्यांनी 'लीन दीन हेंचि सार । भव उतरावया पार' असा निष्कर्ष काढला आहे याही ठिकाणी त्यांनी 'पुरें मातलिया नदी । लव्हा नादे जीवन सधी । वृक्ष उन्मळोनि भेदी । परि जो कधी भंगेना' असा आपला नेहमीचा आवडता दृष्टान्त दिला आहे

१४८१ आपुल्या महिमानें । धातु परिसे केले सोनें ॥ १ ॥
तैसें न मनीं माझें आता । गुणदोष पंढरीनाथा ॥ २ ॥
गावाखालील[१] वाहाळ । गंगा न मनी अमंगळ ॥ ३ ॥
तुका म्हणे माती । केली कस्तुरीनें सरती ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा -न मनी-मानू नकोस, सरती-मान्य

अर्थ - लोखंड धातू हीन असली तरी परिसाने आपल्या स्पर्शाने त्याचे सोने बनवून टाकले १ त्याप्रमाणे देवा, पंढरीनाथा, माझे गुणदोष न पाहाता माझ्यावर कृपा कर २ गावातील नद्यानाले गंगेला मिळतात, तेव्हा ती काही त्यांना अमंगल म्हणून दूर करीत नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, कस्तुरीच्या सहवासाने मातीसही मान्यता मिळते ४

१४८२ आशाबद्ध वक्ता । भय श्रोतियाच्या चित्ता ॥ १ ॥
गातो तेंचि[२] नाहीं ठावे । तोंड वासी काहीं द्यावें ॥ २ ॥
जाले लोभाचे मांजर । भीक मागे दारोदार ॥ ३ ॥
माप आणि गोणी । तुका म्हणे रितीं दोन्ही ॥ ४ ॥

१४८३ तक्र शिष्या मान। दुग्धा म्हणे नारायण ॥ १ ॥
ऐशीं ज्ञानाचीं डोबडें। आशा विटंबिलीं मूढें ॥ २ ॥
उपदेश तो जगा। आपण सोवळा इतका मागा ॥ ३ ॥
रसनाशिश्नाचे अंकित। तुका म्हणे वरदळ स्फीत[1] ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा.– तक्र–ताक, डोंबडे–टोणगे, वरदळ–वरवरच्या, स्फीत–कीर्तीसाठी

अर्थ :– कुणी ताक दिले तर काही गुरु ते आपल्या शिष्याना देतात, आणि दूध मिळाले तर ते नारायण-स्वरूप समजून स्वत च घेतात १ असे हे ज्ञानाने मारावलेले टोणगे असून या मूर्खांनी विषयवासनांनी आपली विटंबना करून घेतली आहे २ हे आपण स्वत मागाइतके सोवळे असून लोकाना मात्र परमार्थाचा उपदेश करायला तत्पर असतात ३ तुकाराम महाराज म्हणतात, रसनेच्या आणि विषयाच्या स्वाधीन असलेले हे लोक वरवरच्या कीर्तीसाठी लोभावलेले असतात ४

१४८४ ब्रह्मचारी धर्म घोकावे अक्षर। आश्रमी विचार षटकर्में ॥ १ ॥
वानप्रस्थ तरी संयोगीं वियोग। संन्यास तो त्याग संकल्पाचा ॥ २ ॥
परमहंस तरी जाणे सहज धर्म। तेथें याती धर्म कुळ नाहीं ॥ ३ ॥
बोले धर्म जो चाले भाविरहीत। तो जाणा पतित श्रुती बोले ॥ ४ ॥
तुका म्हणे कांहीं नाहीं नेमाविण। मोकळा तो सीण दुःख पावे ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :–अक्षर–वेद, आश्रमी–गृहस्थाश्रमात, षट्कर्में–स्नान, सध्योपासना, दान, देवपूजा, अतिथिसत्कार, वैश्वदेव अथवा अध्ययन, अध्यापन, यजन, याजन, दान, परिग्रह अशी सहा कर्में, सीण–दुःख

अर्थ – ब्रह्मचर्याश्रमाचा मुख्य धर्म वेदाचे पठण करावे हा असून गृहस्थाश्रमी माणसानें यजनयाजनादी षट्कर्में करावीत १ वानप्रस्थ आश्रमात स्त्रीपुरुषानी एकत्र असले तरी वियोग्याप्रमाणे राहावे आणि सन्यासधर्मामध्ये सर्व सकल्पाचाच त्याग करावयास हवा २ परमहसस्थितीमध्ये धर्माचे, परमार्थाचे रहस्य सहजतेने ध्यानात येते या ठिकाणी जात, कुळ, धर्म याचा सबध उरत नाही ३ असा विचार सागूनही जो भाविरहित वागतो तो पापीच समजावा, असे वेदाचेच सांगणे आहे. ४ तुकाराम महाराज म्हणतात, विधिनियमाखेरीज काही उपयोग होणार नाही जो कुठलेच नियम न पाळता मोकळा राहील तो शेवटी दुःख पावेल हे निश्चित ५

विवरण –मागे अभगक्रमाक १४७२ मध्ये तुकाराममहाराजानी वेदविहित अशा चार वर्णांचे जे दर्शन घडविले, त्यास अनुलक्षून या अभगात त्यानी आश्रमधर्माची महती निवेदन केली आहे वर्णाश्रमधर्माची कल्पना वेद व उपनिषदे यातून साकार झालेली असून तुकोबानी त्यास मान्यता दिली आहे समाजाच्या व्यवस्थेसाठी जशी वर्णकल्पना गुणकर्माधरून रूढ झाली तशीच व्यक्तीच्या हितासाठी आश्रमव्यवस्था दृढ झाली सर्वसामान्यपणे शभर वर्षांची आयुर्मर्यादा धरून व एकदर मानवी कर्तव्याचा विचार करून विद्यासपादन, प्रापचिक कर्तव्ये, सामाजिक ऋण, वैयक्तिक साधना इत्यादी बाबीचा विचार करून आश्रमधर्माची कल्पना साकारलेली आहे ब्रह्मचर्याश्रम, गृहस्थाश्रम, वानप्रस्थाश्रम आणि सन्यासाश्रम अशा चार आश्रमातून मानवी जीवन परिपूर्णतेकडे वा विकासाकडे धाव घेत राहाते आपल्या प्रवृत्तिधर्मानुसार या चारही आश्रमाची जोपासना नीटपणे व्हावी असा सनातन धर्माचा आदेश होता. कोणत्याही एकाच वृत्तीचा परिपोष होऊन जीवन एकागी होण्यापेक्षा विद्यासाधना, प्रापचिक कर्तव्ये, वैयक्तिक परमार्थविचार, सामाजिक ऋण इत्यादी विविध अगांनी वैयक्तिक जीवन परिपुष्ट होऊन त्याचा यथाक्रम विकास व्हावा अशी योजना त्यात होती. चातुर्वर्ण्याप्रमाणे वाटणीस आलेली कर्में आश्रमव्यवस्थेप्रमाणे करण्यातच मानवी जीवनाचे सार्थक मानले जात असे. या आश्रमव्यवस्थेत एकापेक्षा दुसरा आश्रम अधिक प्रगतीचा,

१ स्थित

उन्नत अवस्थेचा असे; हे सूचित झालेले दिसते महाभारतातील शांतिपर्वात म्हटले आहे, 'चतुष्पदी हि निःश्रेणी ब्रह्मण्येषा प्रतिष्ठिता। एतामारुह्य निःश्रेणी ब्रह्मलोके महीयते।' या चार आश्रमरूपी पायऱ्यांचा हा जिना शेवटी ब्रह्मपदास गेलेला आहे. या जिन्याने एका आश्रमातून दुसऱ्या आश्रमात जाऊन प्रगती साधत येत अखेर ब्रह्मलोकात मनुष्य यामुळे मोठेपणा मिळवितो. संन्यासाश्रमातील आकर्षक ध्येयाची भूल पडून सर्वसामान्य लोकांनी स्वतःची कुवत लक्षात न घेता एकदम या आश्रमाकडे वळण्याची घाई न करता आधीच्या आश्रमातील कर्तव्याकडेही त्यांनी लक्ष द्यावे, असे सांगण्याचा सावधपणाही स्मृतिकार पाळतात 'गृहस्थस्तु यदा पश्येद्वलीपलितमात्मनः। अपत्यस्यैव चापत्यं तदारण्यं समाश्रयेत्' अंगाला वळ्या पडून नातवंडे दृष्टीस पडली म्हणजे गृहस्थाने वानप्रस्थ होऊन संन्यास घ्यावा, अशी सूचना देण्याचेही कारण हेच की, मनुष्य आपल्या शिरावर ऋषी, पितर, देव अशी ऋणे घेऊन जन्माला आला असल्याने वेदाध्ययनाने ऋषींचे, पुत्रोत्पादनाने पितरांचे व यज्ञादी धर्मांनी देवांचे ऋण फेडण्याचीही जबाबदारी माणसाची आहे याचा विसर पडू नये

सबंध मानवी जीवनातील कर्तव्यबुद्धीचे चित्र या आश्रमधर्माच्या व्यवस्थेने उभे राहाते संन्यास कुणी घ्यावा? याचेही व्यावहारिक दृष्टीने उत्तर देण्याचा प्रयत्न विदुरनीतीत दिसतो विदुराने धृतराष्ट्रास सांगितले आहे, 'उत्पाद्य पुत्राननृणांश्च कृत्वा वृत्तिं च तेभ्योऽनुविधाय कांचित्। स्थाने कुमारीः प्रतिपाद्य सर्वा अरण्यसंस्थोऽथ मुनिर्बुभूषेत्' गृहस्थाश्रमात असताना पुत्र होऊन त्यांना ऋण न ठेवता त्यांच्या पोटापाण्याची थोडी व्यवस्था करून आणि सर्व मुलींना योग्य अशी स्थळे पाहून दिल्यावर मग वानप्रस्थ होऊन संन्यास घेण्याची इच्छा करावी वर्णधर्मानुसार कर्मे करून जीविताचे सार्थक करून दाखविण्याची ही एक आश्रमधर्माची व्यवस्था होती कुणीही केवळ संसारात न रमता आयुष्यात एक उच्चतम ध्येय असू शकतं, त्याकडे रोख धरून मार्ग आक्रमण करण्याचे मार्गदर्शन या आश्रमव्यवस्थेत होते ईश्वरप्राप्ती हे अखेरचे साध्य हे तर खरेच, पण सर्वसामान्य लोकांनी गृहस्थधर्माकडे दुर्लक्ष करावे असा स्मृतिकारांचा उद्देश नाही उलट अनेक ठिकाणी गृहस्थाश्रमाची महतीच त्यांनी वर्णन केलेली आहे 'यथा मातरमाश्रित्य सर्वे जीवन्ति जन्तवः। एवं गार्हस्थ्यमाश्रित्य वर्तन्त इतराश्रमाः' पृथ्वीमातेच्या आश्रयाने ज्याप्रमाणे सर्व जंतू जिवंत राहातात, त्याप्रमाणे गृहस्थाश्रमाचा आश्रय करून इतर आश्रम आहेत, असाच निर्वाळा महाभारतकार व मनू देत असतात इतर आश्रम नद्या, तर गृहस्थाश्रम सागर असे मनूने म्हटले आहे

वेदप्रणीत अशा या आश्रमधर्माचा पुरस्कार साधुसंतांनी केलेला दिसतो 'वर्णाश्रम करिसी चोख। तरि तू पावसी उत्तम लोक' असा स्पष्ट आदेश तुकोबांचा आहे एकनाथांनी तर आपल्या भागवतात दोन स्वतंत्र अध्याय वर्णाश्रमधर्माच्या विवरणासाठी दिले आहेत एकाच विराट पुरुषापासून जसे वर्ण निर्माण झाले, तसेच आश्रमही याच पुरुषतत्त्वापासून निर्माण झाले स्नान, आसन, वमन, मौन, गुरुसेवा, स्वाध्याय इत्यादी ब्रह्मचारिव्रताचे विशेष एकनाथांनी स्पष्ट केले आहेत त्यानंतर गृहस्थधर्मातील षट्कर्मांची व पंचमहायज्ञांचा महत्त्वाची चर्चा करून एकनाथांनी संन्यासधर्माची महती वर्णन केली आहे वर्णव्यवस्थेप्रमाणे आश्रमाचा विचारही जुन्या समाजरचनेत महत्त्वाचा होता ऐहिक व पारलौकिक उत्कर्षाची कल्पना या वर्णाश्रमधर्मकल्पनेत होती या व्यवस्थेतून जो सुटला, मुक्त राहिला त्याला शीणच होणार असा तुकोबांचा निष्कर्ष आहे

१४८५ आम्ही क्षेत्रींचे संन्यासी। देहभरित हृषीकेशी। नाहीं केली ऐसी। आशाकामबोहरी॥ १॥
आलें टायाचित अंगा। सहज तें आम्हां मागा। दाता पांडुरंगा। ऐसा करिला निश्चिती॥२॥
दंड धरिला दंडायमान। मुळीं मुंडिलें मुंडण। बदी[1] बंद कौपीन। बहिरवास औंडर्के॥ ३॥
काळें साधियेला काळ। मन करूनि निश्चळ। लौकिकीं विटाळ। धरूनि असों एकांत॥ ४॥
कार्यकारणाची चाली। वाचावाचस्वें नेमिली। एका नेमें चाली। स्वरूपींच राहाणें॥ ५॥
नव्हे वेषधारी। तुका आहाच वरवरी। आहे तैसीं घरीं। खडें निवडिलीं वेदाचीं॥ ६॥

शब्दार्थ व टीपा क्षेत्रींचे–देहरूपी क्षेत्रातील, अयाचित–याचना न करता मिळेल तेवढ्यावर संतुष्ट राहण्याची वृत्ती, बंद–वस्त्रत्रय, औंडके–साडेतीन हातांचा दंड, आहाच–वरवर, खडें–विभाग

[1] वस्त्रदाचा कौपीन

अर्थ – आम्ही देहरूपी क्षेत्रातील सन्यासी आहोत आमच्या देहात श्रीहरी बोधरूपाने भरून राहिलेला आहे आशा व कामना याना आम्ही आमच्या मनातून बाहेर काढून टाकले आहे. १ या दात्या पाडुरगाने कृपा केल्यामुळे आम्ही निश्चित झालो आहोत, आमच्या अगी सहजच अयाचित वृत्ती आलेली आहे २ श्रीहरीच्या अनुसधानाचा दड आम्ही अखड स्वरूपाचा धारण केलेला आहे अज्ञानादी वृत्तींचे मळ आम्ही मुडून टाकले आहेत वधप्याची लगोटी नेसून साडेतीन हाताच्या देहाचा विचार बाहेर काढून टाकला आहे ३ आमचे मन निश्चल झाले असल्याने त्याने स्वरूपाच्या ठिकाणी एकरूप होण्याचा काळ साधला आहे आम्हास लौकिकाचा विटाळ असल्याने आम्ही एकान्तातच निवास करीत असतो ४ माझी वाणी ही वाच्यस्वरूपाच्या श्रीहरीशी एकरूप झाली आहे तिची कार्यकारणस्वरूपाची चाल आता वरवरचीच राहिली आहे आम्ही स्वरूपीच निवास केला असल्याने त्याच एवा निश्चयाने आमची चाल होत आहे ५ तुकाराम महाराज म्हणतात, मी हा तुकाराम वरवरचा वेष धारण करणारा सन्यासी नाही जे वेदाचे विभाग आहेत त्यातीलच काही निवडून मी त्याचे विवरण करीत असतो ६

विवरण –अभग क्रमाक १४७२ व १४८४ यात वर्णाश्रमधर्माची महती तुकारामबुवानी सागितली सकल्पाचा त्याग म्हणजे सन्यास असे स्पष्ट केले परमहसाचा सहजधर्म विवरून सागितला आता या अभगात तुकाराम महाराज स्वत च्या सन्यस्त वृत्तीचे वर्णन मोठ्या अधिकारवाणीने करीत आहेत एकदा सकल्पाचा, आशावासनाचा त्याग झाला म्हणजे अगी सन्यस्त वृत्ती बाणते परमहसाचे सहज गुण अगी उमटतात 'तेथें याती धर्म कुळ नाहीं' असे सागण्यास बुवा विसरत नाहीत तुकारामबुवाची जात त्याच्या सन्यस्तवृत्तीला आड येणार नाही वेदाचा खरा अर्थ आम्हासच माहीत असल्याचा यथाय अभिमान त्यानी एके ठिकाणी प्रकट केला आहे विधिशास्त्रप्रमाणे तुकारामानी सन्यास घेतलेला नव्हता, परतु अगा सन्यस्त वृत्ती पुरेपूर बाणली असल्यामुळे आपण 'क्षेत्रींचे सन्यासी' कसे आहोत याचे रूपकाच्या आश्रयाने त्यानी वर्णन केले आहे तुकाराम महाराज देह क्षेत्राचे राहाणारे म्हणून 'क्षेत्रींचे सन्यासी' खरेच, पण येथे क्षेत्र शब्दाचा आणखी एक महत्त्वाचा अर्थ अभिप्रेत आहे भगवद्गीतेतील तेराव्या अध्यायात पहिल्याच श्लोकात 'इदं शरीरं कौन्तेय क्षेत्रमित्यभिधीयते '–अर्जुना, या शरीरासच क्षेत्र असे म्हटले आहे, असे स्पष्ट केले आहे पचमहाभूताचे जे शरीर त्यासच क्षेत्र अशी पारिभाषिक सज्ञा आहे पचमहाभूते, अहकार, बुद्धी, अव्यक्त प्रकृती, दहा सूक्ष्म इद्रिय, एक मन, पाच इद्रियाचे पाच विषय, इच्छा, द्वेष, सुख, दुःख, सघात, चेतना व धैर्य अशा एकतीस तत्त्वाचा समुदाय म्हणजे क्षेत्र होय या क्षेत्रीचे आपण सन्यासी आहोत असे तुकाराम महाराज म्हणतात, त्याचाही अर्थ समजावून घेण्यासारखा आहे हे क्षेत्र अथवा शरीर ज्या गुणधर्मांचे व तत्त्वाचे बनले आहे त्यात पचविषय, अहकार, द्वेष, इच्छा, सुखदु खादी विकार, इत्यादींचा प्रभाव मोठा असतो याना अनुसरून सकल्प उभे राहतात या सकल्पाचा त्याग म्हणजे सन्यास असे तुकारामबुवानी म्हटले आहे आपल्या अगातील कणाकणांतून व रोमरोमातून प्रभुकृपा भरून राहिल्याने आणि आशा व कामना याचे महत्त्वच नाहीसे झाले असल्याने आपण खऱ्या अर्थाने सन्यासी आहोत असे बुवा म्हणतात बुवाच्या मनाची ही धारणा परपरेस धरून आहे 'ज्ञेयः स नित्यसन्यासी यो न द्वेष्टि न काङ्क्षति। निर्द्वंद्वो हि महाबाहो सुखं बन्धात्प्रमुच्यते '–जो कशाचाही द्वेष करीत नाही आणि कशाचीही इच्छा करीत नाही, तोच पुरुष नित्य सन्यासी समजावा जो सुखदु खादी द्वद्वापासून मुक्त झाला तो आपोआपच इतर सर्व बधनापासून मुक्त होतो तुकारामबुवा या अर्थाने मुक्त झाले होते त्यानी प्रत्यक्ष सन्यासधर्म स्वीकारला नसला तरी त्याची वृत्ती खऱ्या अर्थाने सन्याशाची होती वरवर ते प्रापचिक असले, तरी ते वास्तविक दृष्टीने सन्यस्त वृत्तीचे होते या सन्यस्त वृत्तीचे वर्णन श्रीज्ञानदेवानी फारच समर्पक रीतीने केले आहे ते म्हणतात, 'तरी गेलियाची से न करी। न पवता चाड न धरी। जो सुमेरुचळु अतरीं। मेरु जैसा ॥ आणि मी माझें ऐसी आठवण। विसरलें जयाचें अंतःकरण। पार्था तो सन्यासी जाण। निरतर ॥ जो मनें ऐसा जाहला। सगी तोचि सांडिला। म्हणोनि सुखें सुख पावला। अखडित ॥ आतां गृहादिक आघवें। तें कांहीं नलगे त्यजावें। जें घेतें जाहलें स्वभावें। निःसगु म्हणऊनि ॥ देखें अग्नि विझोनि जाये। मग ते राखोंडी केवळ होये। तें ते कापुसें गिवसूं ये जियापरी ॥ तैसा असतेनि उपाधी। नाकळिजे तो कर्मबंधीं। जयाचिये बुद्धी। सकल्पु नाहीं ॥ म्हणोनि कल्पना जें सांडे। तेंचि गा सन्यास

घडे । या कारणें दोन्ही सामडे । सन्यासयोगु ॥' ज्ञानेश्वराच्या या वर्णनाप्रमाणे तुकाराम महाराज 'क्षेत्रींचे सन्यासी' खरोखरीच आहेत देहभाव विसरला, कुणास काही मागण्याचे कारण उरले नाही. मी, माझे हे भाव नाहीसे झाले यापेक्षा सन्यास धर्म कोणता ? तुकाराम महाराजानी या अभगात आपण अयाचित म्हणजे जे मिळेल त्यावर सतुष्ट कसे आहोत, आपल्या हातात दड कोणता आहे, आपण सन्यासाप्रमाणे मुडण कसे केले आहे, आपण कोपीन कोणती नेसली आहे, इत्यादी बाबींचे रूपकात्मक वर्णन फारच समर्पक रीतीने केलेले आहे अशा वृत्तीवर आल्यावर लौकिकाचा विटाळ धरून एकान्ताचे सेवन करणे अगत्याचे आहे असे त्यानी येथे सागितले आहे जनसमुदायाचा वीट ह ज्ञानी माणसाचे एक लक्षणच गीतेने सागितले आहे एकान्तवासाशिवाय प्रभुचिंतनही नीट घडत नाही म्हणूनच तुकारामबुवा भामनाथ अथवा भडारा डोगरावर स्थिरावले. तेथील वृक्षवेलीच्या व वनचराच्या सहवासात रममाण झाले पृथ्वीचे आसन, आकाशाचे पाघरूण, वथाकमडलूचा परिवार, हरिकथेच्या भोजनाचे विविध प्रकार आणि आपल्याच मनाशी आपला सवाद असा थाट या 'सन्यासी' तुकाराम-बुवाचा होता 'येणे सुखें रुचे एकान्ताचा वास' असा त्यानी आपल्या एकान्तवासाचा हेतु स्पष्ट केला आहे

१४८६ निर्वाहापुरतें अन्न आच्छादन । आश्रमासी स्थान कोपी गुहा ॥ १ ॥
कोठें ही चित्तासी नसावें बंधन । हृदयीं नारायण साटवावा[१] ॥ २ ॥
नये बोलो फार बैसों जनामधीं । सावधान बुद्धी इंद्रियें दमी ॥ ३ ॥
तुका म्हणे घडी घडीने साधावी । त्रिगुणाची गोवी उगवूनि ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा –दमी–दमन करावीत, दडपून टाकावीत, त्रिगुणाची–सत्त्व, रज, तम या तीन गुणाची, गोवी–गुतागुत, उगवूनी–सोडवून

अर्थ –उदरनिर्वाह होईल एवढे अन्न व शरीररक्षण होईल एवढे आच्छादन आपणास असावे गुहेत अगर खोपटात निवास करावा १ कुठल्याही विषयासबधी आपल्या चित्तास मोह नसावा आपल्या हृदयात नेहमी नारायण साठवावा. २ लोकात फार बोलू नये, त्याच्यात फार बसू नये बुद्धी सावधान ठेवून इंद्रियांचे दमन करावे ३ तुकाराम महाराज म्हणतात, सत्त्व, रज, तम या त्रिगुणाच्या गुतागुतीची सोडवणूक करून एकएक क्षण ईश्वरचरणी अर्पण करून साधावा ४

जरूरीपेक्षा अधिक संग्रह न करणे, उपाधी लावून न घेणे, निर्धनता, अकिंचनत्व जाणूनबुजून पत्करणे इत्यादी तत्त्वाचा विकास होत राहिला. पंचमहाव्रताची कल्पना निर्माण झाली. धन मिळवून त्याचा चांगला विनियोग करणे फार कठिण काम, म्हणून गरजा अगदीच कमी करून उपाधीरहित मन करून ईश्वरचिंतनास मोकळे राहाणे साधुसंताना युक्त वाटले. म्हणूनच अपरिग्रहतेला महत्त्वाचे स्थान साधुसंताच्या चरित्रात मिळाले आहे. 'निर्वाहापुरतें अन्न आच्छादन.' एवढे असले की मग इतर वस्तूंची त्याना जरूरीच वाटत नाही. 'साधकाची दशा उदास असावी। उपाधि नसावी अंतर्बाही' अशी त्याची शिकवण आहे. प्रसंग पडला तर 'झाडें वोरपोनि खाउनियां पाला। आठवी विठ्ठला वेळोवेळां' अशी त्याच्या मनाची वृत्ती होती. 'नको देऊं देवा द्रव्य आणि मान्य। तो एक उद्वेग होय जीवा' असे तुकाराममुवांनी कळवळून म्हटले आहे. कारण 'तुका म्हणे करी फकिराचे परी। रात्रंदिवस हरि येईल वाचे' फकिरी पत्करल्यानंतरच श्रीहरीची जवळीक वाढते असा त्याचा अनुभव आहे. या फकिरी वृत्तीचे वर्णन व अपरिग्रही वृत्तीचे दर्शन या अभंगात आहे. 'कोठेंही चित्तासी नसावें बंधन' अशी अवस्था असेल तरच नारायणाला हृदयात साठविणे सुलभ होईल. आणि अशी बंधनरहित अवस्था निर्वाहापुरत्या अन्नवस्त्रापुरतीच इच्छा असेल तर निर्माण होईल. लोकांत फार बसू नये, बोलू नये, एकान्ताचे सेवन करावे हाही मोलाचा विचार या अभंगात आहे. अशा वृत्तीचा मनुष्यच नेहमी योगी माणसासारखा संतुष्ट राहतो 'वार्षियेवीण सागरु। जैसे जळें नित्य निर्भरु। तैसा निरुपचारु। संतोषी जो' असा ज्ञानदेवांनी या वृत्तीच्या माणसाचा संतोष निवेदन केला आहे 'जो यथालाभें न तोखे। अलाभें न पाखे' अशी त्याची वृत्ती बनते.

१४८७ जैसीं तैसीं तरी। शरणागतें तुझीं हरी॥ १॥
आतां न पाहिजे केलें। ब्रीद लटिकें आपुलें॥ २॥
शुद्ध नाहीं चित्त। परी म्हणवितो भक्त॥ ३॥
मज कोण पुसे रंका। नाम सांगे तुझें तुका॥ ४॥

शब्दार्थ व टीपा :–शरणागतें–शरण आलेला, रंका–गरिबाला.

अर्थ :–श्रीहरी, मी कसाही असलो तरी तुलाच शरण आलेलो आहे. १ आता तू भक्तवत्सल, पतितपावन हे ब्रीद खोटे ठरवू नकोस. २ माझे चित्त कदाचित शुद्ध नसेल, पण मी तुझा भक्त आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, मला गरिबाला कोण विचारतो ? म्हणून तर देवा, मी तुझे नाव सांगतो. ४

१४८८ नाशवंत देह नासेल हा जाणा। कां रे उच्चाराना वाचें नाम॥ १॥
नामेंचि तारिले कोटयान हें कोटी। नामें हे[१] वैकुंठीं बैसविले॥ २॥
नामापरतें सार नाहीं त्रिभुवनीं। तें कां तुम्ही मनीं आठवाना॥ ३॥
तुका म्हणे नाम वेदांसी आगळें। तें दिलें गोपाळें फुकासाटीं॥ ४॥

शब्दार्थ व टीपा :–नाशवंत–नाश होणारा, न टिकणारा, आगळें–श्रेष्ठ.

अर्थ :–लोकहो, हा देह नाहीसा होणारा आहे, नाशवंत आहे असे समजून तुम्ही तुमच्या वाणीने सतत रामनामाचा उच्चार का करीत नाही ? १ या नामस्मरणाने कोट्यवधी लोक तरले आहे, कित्येकांना वैकुंठाचा लाभ झालेला आहे. २ यामुळे नामासारखे सारभूत असे दुसरे चांगले साधन त्रिभुवनात नाही. मग तुम्ही त्याची आठवण तुमच्या हृदयात वारंवार का नाही करीत ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा प्रकारचे रामनाम वेदांपेक्षाही श्रेष्ठ आहे. श्रीहरीने आम्हांला हे फुकटचे प्राप्त करून दिले आहे. ४

१४८९ आळवितां वाळें। मातेतें सुख आगळें॥ १॥
धावें आवडी प्रातुकें। पाहे निवे कवतुकें॥ २॥

---

[१] थी

त्यास पैसे फर्जाऊ धावेत, अथवा घ्यावेत. त्यात सुखच असते. हे पैसे जरी बुडाले तरी उभयतांना चिंता वाटण्याचे कारण नाही. ४ तुकाराम महाराज म्हणतात, मी जे हे सांगत आहे त्यातील वर्म जाणून बरोबर आचरण करावे, एकाच्या ऐवजी दुसरे करू नये. ५

१४९२ अग्नीमाजी पडे धातु । लीन होऊनि राहे आंतु ।। होय शुद्ध न पवे घातु । पटतंतुप्रमाणें।। १।।
बाह्यरंगाचें कारण । मिथ्या अवघेंचि भापण[1]। गर्व ताठा हें अज्ञान । मरण सवें वाहातसे ।।२।।
पुरें मातलिया नदी । लव्हा नांदे जीवनसंधी । वृक्ष उन्मळोनि मेदी । परि तो कधीं भंगेना ।।३।।
हस्ती परदळा जो भंगी । तया पायीं न मरे मुंगी । कोण जाय संगी । पाणोवाणी तयेंच्या ।।४।।
पिटितां घणें वरि सरा । तया पोटीं राहे हिरा । तैशा काय तगती गारा । तया थोरा होऊनि ।।५।।
लीन दीन हेंचि सार । भव उतरावया पार । बुडे माथां भार । तुका म्हणे वाहोनि[2] ।। ६ ।।

शब्दार्थ व टीपा :–पुरें– महापुराने, मातलिया–माजलेली असताना, हस्ती–हत्ती, परदळा– शत्रूच्या सैन्यास भंगी–मोडतो, नष्ट करतो, पाणोवाणी–पाठोपाठ, घणें–घणाच्या आघाताने, सरा–हवे तसे, तगती–टिकतात, भव–संसारसमुद्र, पार–तरून जाण्यात.

अर्थ :–अग्नीत पडलेली धातू वस्त्रातील ततू जसा लीन भावाने असतो त्याप्रमाणे आत राहून शुद्ध होत जाते, जळून तर जातच नाही. १ बहिरंगाचे भूषण अथवा भाषण हे सर्व खोटेच आहे. गर्व अथवा ताठा करणे अज्ञानच आहे. ते त्याच्या मरणापर्यंत टिकून राहते. २ नदीला महापूर आला असताना पुष्कळच पाणी येते; त्यात लव्हाळे नम्र झाल्याने टिकून राहतात, पण मोठमोठे वृक्ष मात्र उन्मळून जातात; पण लव्हाळे मात्र भंगत नाहीत. ३ हत्ती शत्रूच्या सैन्याचा भंग करतो, पण त्याच्याच पायाखालची मुंगी मात्र मरत नाही. अशा हत्तीच्या पाठोपाठ कुणी जावे ? ४ घणाच्या आघाताने वाटेल तसे ठोकले तरी हिरा टिकून राहतो; पण त्याऐवजी हिऱ्यापेक्षा गारगोट्या म्हणून घणाच्या आघाताने ठोकल्या तर त्या टिकतील काय ? ५ तुकाराम महाराज म्हणतात, लीन दीन होणे हेच संसारसागर तरून जाण्याचे एकमेव सारभूत साधन आहे. उगाच थोरपणाचा भार डोक्यावर घेतल्यास भवसागरात वाहून जाण्याचा मात्र प्रसंग येईल. ६

१४९३ आम्ही वीर जुंझार । करूं जमदाढे मार । तापटिले भार । मोड जाला दोषांचा ।। १ ।।
जाला हाहाकार । आले हांकीत जुंझार । शंखचक्रांचे शृंगार । कंठीं हार तुळसीचे ।। २ ।।
रामनामांकित बाण । गोपी लाविला चंदन । झळकती निशाणें । गरुडटके पताका ।। ३ ।।
तुका म्हणे काळ । जालो जिंकोनी निश्चळ । पावला सकळ । भोग आम्हां आमचा ।। ४ ।।

शब्दार्थ व टीपा – जमदाढे–यमाच्या दाढेवर, भोग–ऐश्वर्य.

अर्थ – आम्ही फार मोठे योद्धे आहोत, यमावर हल्ला करून आम्ही त्याचे दात पाडू. अनेक दोषांवर मारा करून त्यांचा आम्ही मोड करू. १ यामुळे फारच मोठा हाहा कार जिकडे तिकडे उडाला. सर्व योद्धे आमच्यामोवती जमा झाले. त्यांच्या अंगांवर शंखचक्राचे शृंगार होते. त्यांच्या गळ्यात तुळशीच्या माळा दिसत होत्या. २ त्यांचे बाण रामनामाने चिन्हांकित झाले होते. त्यांच्या मुद्रेवर गोपीचंदनाचे टिळे आहेत. त्यांची निशाणे झळकत असून गरुड-टक्याच्या पताका सर्वत्र विराजत आहेत ३ तुकाराम महाराज म्हणतात, याप्रमाणे आम्ही काळासही जिंकून निश्चळ झालो आहोत. आमचे सर्व ऐश्वर्य आम्हास मिळाले आहे. ४

विवरण :– या एका अभगात तुकोबानी आपण भक्तीच्या क्षेत्रातील फार मोठे वीर पुरुष आहोत असे रूपकाच्या आश्रयाने वर्णन केले आहे या भक्तवीराचा हल्ला प्रत्यक्ष यमावरच असतो. शंखचक्र, तुळशीची माळ, रामनामाचे बाण, गोपीचंदनाचे विलेपन ही यांची आयुधे होत. यांची निशाणे गरुडांकित आहेत. असे हे विठ्ठलाचे

[1] भूषण, [2] राहोनि.

वीर पुरुष यमालाही नमवायला लावतात. दुसऱ्या एका अभंगात तुकोबांनी म्हटले आहे, 'धीर विठ्ठलाचे गाढे। कळिकाळ पायां पडे।' या वीरांचे दया, क्षमा, शांती हे आभरणच शत्रूचा पराभव करण्यास समर्थ असतात. धर्माचे पालन करण्यासाठी या भक्तवीरांना अशा प्रकारचे युद्ध रात्रंदिवस करावे लागते. 'तीक्ष्ण उत्तरें। हातीं घेऊनि बाण फिरे' असा स्वतःचा उद्योग तुकोबांनी वर्णन केला आहे.

१४९४ आशाबद्ध तो जगाचा दास। पूज्य तो उदास सर्वजना ॥ १ ॥
आहे तें अधीन आपुले हातीं। आणिका ठेविती काय बोल ॥ २ ॥
जाणतिया पाठीं लागला उपाध। नेणता[1] तो सिद्ध भोजनासी ॥ ३ ॥
तुका म्हणे भय बांधलेंसे गांठी। चोर लागे पाठी दुम तया ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:- आणिका-इतरांना, उपाध-उपाधी, अडचणी, दुम-धाऊन.

अर्थ :-नाना प्रकारच्या आशांनी जो बद्ध झाला आहे तो जगाचा दास आहे, असे समजावे आणि जो उदास आहे तोच सर्व लोकांना पूज्य होतो. १ हे दोनही मार्ग पत्करायचे की नाही हे आपल्याच हातांत असते. इतरांना उगाच दोष देऊन काय उपयोग? २ जो ज्ञानी आहे, जाणता आहे त्याच्या मागे अनेक प्रकारच्या उपाधी लागतात; आणि जो नेणताच असतो त्याच्यासाठी आयते तयार झालेले भोजन असते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, ज्याच्यामागे कामक्रोधादी चोर धावू लागले आहेत त्याला फार मोठी भीती आहे असे समजावे. ४

विवरण :- परमार्थमार्गात असताना भगवद्प्राप्तीसाठी नाना प्रकारच्या लौकिक इच्छा, वासना व आशा यांचा त्याग करणे अगत्याचे आहे. कारण 'आशापाशशतैर्बद्धाः' शेकडो आशापाशांनी बद्ध असलेले लोक या मार्गात टिकत नाहीत. म्हणूनच तुकोबांनी दुसऱ्या एका अभंगात 'आशा हे समूळ खाणोनि काढावी। तेव्हांचि गोसावी व्हावें तेणें' असे म्हटले आहे. आशा मुळासकट उपटून टाकावी. कारण आपली इच्छा-वासना तृप्त झाली नाही की दुःखाला प्रारंभ होतो. म्हणून मन वासनारहित करणे हाच एक उत्तम उपाय होय. 'तस्मात्वांछां परित्यज' सर्व इच्छाच सोड, हा वसिष्ठांनी केलेला उपदेश महत्त्वाचा आहे कोणत्याही इच्छेचा उदय हेच दुःख आहे. म्हणून उदास असणे, निरिच्छ असणे, निराश राहणे हेच थोर सुखाचे साधन आहे. 'आशा हि परमं दुःखं नैराश्यं परमं सुखम्' आशा हेच श्रेष्ठ दुःख असून नैराश्य हेच मोठे सुख आहे असे भागवतकारांनी म्हटले आहे. 'अपि राज्यादपि स्वर्गादपींदोरपि माधवात्। अपि कांतासमासंगान्नैराश्य परमं सुखम्' राज्य, स्वर्ग, चंद्रमंडळ, वैकुंठाधिपती विष्णू अथवा सुंदर कांता यांच्या समागमापासूनही जे सुख कधीच मिळणार नाही ते परम नैराश्यापासून प्राप्त होते. असा निष्कर्ष योगवासिष्ठाने दिला आहे. असा हा निराश मनुष्यच जगाला पूज्य वाटतो. कारण तो कधी कुणापासून काही मागत नाही तो निरिच्छ निराशच असतो. उलट आशाबद्ध मनुष्य मात्र जगाचे दास्यत्व पत्करतो, कारण तसे केल्याशिवाय त्याच्या आशा कधी पूर्ण होणारच नाहीत.

१४९५ आणिकांसी तारी ऐसा नाहीं कोणी। धड तें नासोनि भलता टाकी ॥ १ ॥
सोनें शुद्ध होतें अवीट तें घरीं। नासिलें सोनारीं अळंकारीं ॥ २ ॥
ओल शुद्ध काळी काळें जिरें बीज। कैचें लागे निज होता तेथें ॥ ३ ॥
एक गहू करिती अनेक प्रकार। सांजा दिवसीं क्षीर घुगरिया ॥ ४ ॥
तुका म्हणे विषा रुचि एका हातीं। पाधानी नासिती नवनीत ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :- आणिकासी-सर्वांना, धड-चांगला, अविट-चांगले, शुद्ध, काळी-पेरणीच्या दिवसात निज-हवे असलेले, दिवसीं-गव्हाचा एक खाद्यपदार्थ, पाधानी-अडाणी, मूर्ख बाई.

---

१ नेणता तो सावध भजनासी.

अर्थ :-या संसारसागरातून सर्वांना तारील असा कुणीही नाही उलट चांगला माणूस मात्र अर्धवट व ढोंगी साधुपुरुष बिघडवून टाकतात. १ सोने आपल्या घरी आहे तोपर्यंतच ते चांगलें शुद्ध स्वरूपात राहते, पण ते सोनाराकडे अलंकार घडविण्यासाठी गेले की त्यात हीनता निर्माण होते. २ चांगल्या सुपीक जमिनीत ओल उत्तम आहे, पेरणीचे बियाहही आहेत, पण अशा प्रसंगी काळचा जिव्याचे बी पेरून हवे असलेले चांगले धान्य कसे प्राप्त होणार? ३ गहू एकच असला तरी त्याचे अनेक प्रकार करता येतात कुणी त्याचा सांजा करतील, कुणी त्याच्यापासून खीर करील, कुणी आणखी एखादा पदार्थ करतील, तर एखादी सामान्य स्त्री त्यापासून घुगऱ्याच बनवील.४ तुकाराम महाराज म्हणतात, एखाद्या भाग्यवान माणसाच्या हातून विषालाही चव येईल तर एखादी अडाणी व मूर्ख बाई लोण्यासारखा पदार्थही नासवून टाकील. ५

१४९६ वाटे या जनाचें थोर वा आश्चर्य । न करिती विचार कां हिताचा ॥ १ ॥
कोण दम ऐसा आहे यांचे पोटीं । येईल शेवटीं कोण कामा ॥ २ ॥
काय मानुनियां राहिले निश्चिती । काय जाब देती यमदूतां ॥ ३ ॥
कां हीं विसरलीं मरण बापुडीं । काय यांसी गोडी लागलीसे ॥ ४ ॥
काय हातीं नाहीं करील तयासी । काय जालें यांसी काय जाणों ॥ ५ ॥
कां हीं नाठविती देवकीनंदना । सुटाया बंधनापासूनियां ॥ ६ ॥
काय मोल यासी लागे धन वित्त । कां हें यांचें चित्त घेत नाहीं ॥ ७ ॥
तुका म्हणे कां हीं भोगितील खाणी । कां त्या चक्रपाणी विसरलीं ॥ ८ ॥

शब्दार्थ व टीपाः- जाब-उत्तर, खाणी- अनेक जन्म, योनी

अर्थ :-या लोकांचे मला फार आश्चर्य वाटते; हे आपल्या स्वतःच्या उद्धाराचा विचार, हिताचा विचार काहीच कसा करीत नाहीत ? १ यांच्या अंतःकरणात असा कोणता विश्वास आहे ? आयुष्याच्या अखेरीस यांच्या मदतीस कोण येणार आहे ? २ हे लोक कुणाच्या निश्चयाने निष्काळजी राहिले आहेत ? अंतकाळी हे यमदूतापुढे काय जाब देतील ? ३. याना अशी कोणती गोडी लागली आहे ? यांना मरणाचा विसर का पडला आहे ? ४ यांना कोणती गोष्ट करता येणार नाही अशी आहे ? याना सर्व काही शक्य असूनही हे स्वहिताची चिंता करीत नाहीत; याना काय झाले आहे, कुणास माहीत ? ५ हे लोक देवकीनंदन श्रीकृष्णास का आठवत नाहीत ? त्याला आठवून संसारबंधनापासून सुटण्याचा प्रयत्न हे का करीत नाहीत ? ६ प्रभूच्या चिंतनास याना काय किंमत पडते ? धनाची व संपत्तीची यास काय आवश्यकता असते ? यांच्या चित्तात हे कधीच कसे येत नाही ? ७ तुकाराम महाराज म्हणतात, त्या चक्रपाणी प्रभूला विसरून अनेक जन्मांची खाण हे का भोगतात ? ८

१४९७ काय एकां जालें तें कां नाहीं ठावें । काय हें सांगावें काय म्हूण ॥ १ ॥
देखतील डोळां ऐकतील कानीं । बोलिलें पुराणीं तें ही ठावें ॥ २ ॥
काय हे शरीर साच कीं जाणार । सकळ विचार जाणती हा ॥ ३ ॥
कां हें कळों नये आपुलें आपणा । बाळत्व तारुण्य वृद्धदशा ॥ ४ ॥
कां हें आवडलें प्रियापुत्रधन । काय कामा कोण कोणा आलें ॥ ५ ॥
कां हें जन्म यांचां घातलें उत्तम । कां हे रामराम न म्हणती ॥ ६ ॥
काय भुली यांसी पडली जाणतां । देखती मरतां आणिकांसी ॥ ७ ॥
काय करिती हे बांधलिया काळें । तुका म्हणे बळें यमपाशीं ॥ ८ ॥

शब्दार्थ व टीपा :- साच-खरोखर, भुली-विसर, काळें-यमदूतानी

अर्थ – विवेक संसारी लोकांची अमर्यादिपणे काय स्थिती झाली, याची आठवण काय यांना येत नाही ? यांना या गोष्टी किती म्हणून सांगाव्यात ? १ केवळ प्रपंचलोभाने जीवाची अवस्था कशी होते हे त्यांनी डोळ्यांनी पाहिले आहे, कानांनी ऐकले आहे पुराणांत जे सांगितले आहे तेही यांना माहीत आहे २ हे शरीर सरोगरचे आहे, म्हणजे टिकणारे आहे की नाशणारे आहे हेही हे पूर्ण जाणतात ३ आपल्या जीवितात बाळपण, तारुण्य व वृद्धत्व येणार हे यांचे याना स्वत ला कसे कळत नाही ? ४ यांना प्रिय पत्नी, पुत्र, धनसंपत्ती यांची आवड एवढी निर्माण कशी झाली ? अखेरच्या घटकेस यांच्यापैकी कोण कोण उपयोगास येणार आहे ? ५ हा उत्तम असा नरजन्म, हे लोक असा वाया का घालवीत आहेत ? हे रामनामाचा उच्चार मुखांनी का करीत नाहीत ? ६ इतर माणसे मरण पावताना पाहून यांना सावधपणा कसा येत नाही ? याना स्वत च्या मरणाचा विसर कसा पडला आहे ?७ तुकाराम महाराज म्हणतात, यांना यमदूतांनी वज्रपाशी बांधल्यावर हे काय करणार आहेत ? ८

१४९८ जुझार ते एक विष्णुदास जगीं । पापपुण्य अंगीं नातळे त्या ॥ १ ॥
गोविंद आसनीं गोविंद शयनीं । गोविंद त्या मनीं वसलासे ॥ २ ॥
ऊर्ध्व पुंड्र भाळीं कंठीं शोभे माळ । कांपिजे कळिकाळ तया भेणें ॥ ३ ॥
तुका म्हणे शंखचक्राचे शृंगार । नामामृतसार मुखामाजी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा . नातळे– स्पर्श करीत नाहीत ऊर्ध्व–उभा, पुंड्र–कपाळावरील गंधाची रेघ

अर्थ –या जगात प्रपंचाशी युद्ध खेळणारे एकमेव झुजार पुरुष म्हणजे विष्णुदासच होत यांच्या अंगास पाप-पुण्याचा स्पर्शही होत नाही १ आसनावर, अंथरुणावर सर्वत्र ज्यांच्या मनी एका गोविंदाचेच नाम असते, त्यांच्या मनात सतत गोविंदाचीच वसती झालेली असते २ यांच्या भाळावर उभे गंधाचे पुंड्र व गळ्यात तुळशीच्या माळा शोभून दिसतात यांना पाहून कळिकाळही भयाने कंपित होतात ३ तुकाराम महाराज म्हणतात, शंखचक्र हे यांच्या मुद्रेवरील शृंगार होत आणि यांच्या मुखातून नामामृताचे सार सतत स्रवत असते यामुळेच हे झुजार बनले आहेत ४

१४९९ जेणें नाहीं केलें आपुलें स्वहित । पुढिलाचा घात इच्छीतसे ॥ १ ॥
संचितासी जाय मिळोनिया खोडी । पतनाचे ओढीवरी[1] हाव ॥ २ ॥
बांधले गांठी ते लागले[2] भोगावें । ऐसियासी देवें काय कीजे ॥ ३ ॥
तुका म्हणे जया गांवा जाणें जया । पुसोनियां तया वाट चाले ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – खोडी–सवय

अर्थ – जो आपले स्वहीत स्वत च न साधता दुसऱ्याच्या घाताची इच्छा करतो १ त्याच्यापाशी ही वाईट सवय त्याच्या प्रारब्धानुसारच आली आहे असे समजावे त्याची हाव नेहमी पतनाकडच असते २ याच्या प्रारब्धाच्या गाठोड्यावर ज बांधलेले असेल ते त्याना भोगावे लागणारच अशाना देव काय करणार ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, ज्याला ज्या गावास जायचे असेल त्याने त्या गावाच्या वाटेचा शोध घेऊन मार्ग काढावा ४

१५०० मानी भक्ताचे उपकार । ऋणीया म्हणवी निरंतर ।
केला निर्गुणीं आकार । कीर्त मुखें[3] वर्णितां ॥ १ ॥
म्हणोनि जया जे वासना । ते पुरवितो पंढरिराणा ।
जाला भक्तांचा आंदणा । ते उपकार फेडावया ॥ २ ॥
अवतारपीकारणे । जन्म घेतले नारायणें ।
एवढें भक्तीचें लहणें[4] । दास्य करी हा दासाचें ॥ ३ ॥

1 जोडीवरि 2 लागतें, 3 कीर्ति मुखें गर्जता, 4 लाहाणे

म्हणियें[1] करितां शंका न धरी । रक्षपाळ बळिच्या द्वारीं ।
भक्तीचा आभारी । रीग न पुरे जावया ॥ ४ ॥
अर्जुनाचे रथवारु । ते वागवी सर्वेश्वरु ।
एवढे भक्तीचे उपकारु । मागें मागें हिंडतसे ॥ ५ ॥
पुंडलिकाचे द्वारीं । सम पाउलीं[2] विटेवरी ।
न वजे कट करीं । धरूनि तेथें राहिला ॥ ६ ॥
भावभक्तीचा अंकित । नाम साजे दिनानाथ ।
म्हणोनि राहिला निवांत । तुका चरण धरोनि ॥ ७ ॥

शब्दार्थ व टीपा–कीर्त–कीर्ती, आदणा–स्वाधीन, लहणे–प्रेम, लोभ रीग–प्रवेश, शिरकाव, रथवारु–रथाचे घोडे, न वजे–कुठेही जात नाही.

अर्थ–हा ईश्वर किती भक्तवत्सल आहे पाहा हा आपल्या भक्तांचेच उपकार मानतो या भक्तांनी याची कीर्ती वारवार मुखानी गाऊन याला निर्गुणाचा सगुण केला, म्हणून हा आपल्या भक्तांचे ऋण मानतो १ याप्रमाणे ज्या भक्ताची जी जशी वासना असेल ती तशी तो पुरवितो हा पढरीराणा त्याच्या उपकाराची फेड करण्यासाठी आपल्या भक्ताच्या स्वाधीनच झालेला असतो २ अबरऋषीसाठी या नारायणाने दहा वेळा गर्भवास पत्करले आपल्या दासाचे दासत्व पत्करून याने भक्तिविषयी प्रेम प्रकट केले आहे ३ अशा प्रकारचे काम करताना याला कसली शका मनात येत नाही हा बळीराजाच्या द्वारात द्वारपाल होऊन राहिला आहे अशा रीतीने हा आपल्या भक्ताचा आभारी झाला आहे त्यामुळे यास बाहेर कुठे जाण्यास शिरकावच मिळत नाही, सवडच सापडत नाही ४ हा अर्जुनाच्या रथावर बसून त्याचे घोडे हाकण्याचे काम करीत असतो याला भक्तीचे एवढे उपकार वाटतात की, तो सारखा त्याच्या मागून हिंडत असतो ५ हा पुडलिकाच्या दारात समचरण विटेवर ठेवून, कमरेवर हात ठेवून उभा राहिला आहे ६ असा हा ईश्वर भावभक्तीच्या स्वाधीन झालेला आहे यास दीनानाथ हे नाव चागले शोभून दिसते म्हणूनच तुकाराम त्याचे चरण धरून निवान्तपणे राहिला आहे ७

विवरण – या अभगात ईश्वराचे भक्तवात्सल्य तुकारामबुवानी वर्णन केले आहे स्वत ईश्वरच आपल्या भक्तासाठी कासावीस होतो, त्याच्या भेटीसाठी तळमळत असतो, त्याच्या उद्धारासाठी उत्सुक असतो अशी अनेक उदाहरणे पुराणातून मिळतात. येथे अबरीष, बळीराजा, अर्जुन, पुडलीक इत्यादीचा उल्लेख तुकाराम महाराजानी केला आहे पुराणग्रथातून अबरीष राजाची कथा दिलेली आहे कार्तिक महिन्यामधील एकादशीचे त्रिदिनात्मक व्रत करून द्वादशीच्या दिवशी हा उपोषण सोडावयास प्रवृत्त होत असताना दुर्वास ऋषी त्याच्याकडे आला स्नान करण्यासाठी तो जो नदीवर गेला तो परत लौकर आलाच नाही इकडे द्वादशी सपण्याच्या अगोदर उपवास सोडणे जरूरीचे म्हणून याने नैवेद्य समर्पण करून तीर्थ घेतले, अबरीषाच्या या कृत्याचा दुर्वासास फार राग आला त्याने आपल्या जटेपासून एक कृत्या निर्माण केली व ती अबरीष राजाच्या पाठीमागे लावली एवढ्यात विष्णूच्या सुदर्शनाने कृत्येचा नाश केला विष्णूने ती कृत्या दुर्वासाच्याच पाठीमागे लावली. विष्णूच्या सागण्यावरून अबरीषाकडे दुर्वास आला एवढ्या एक वर्षाच्या काळापर्यंत अबरीष उपाशीच होता दुर्वासाचे त्याने चागले स्वागत केले सुदर्शनाची स्तुती करून त्याने ते परत फिरवून दुर्वासास उत्तम प्रकारचे भोजन दिले अशा प्रकारे श्रीविष्णूने या आपल्या भक्ताचे रक्षण केले

बळीराजाची कथा ही पुराणातून अनेकदा आलेली आहे बळी हा प्रल्हादाचा मुलगा विरोचन याच्या देवी नावाच्या भार्येपासून झालेला मुलगा हा दैत्याचा राजा असून मोठा विष्णुभक्त होता. परतु पुढे याच्या राज्यात देव, ब्राह्मण व भूमी याना फार त्रास होत राहिला. तेव्हा भगवान विष्णूने वामन बटूचे रूप धारण करून यास पाताळात हाकून द्यावे म्हणून देवाचा आग्रह सुरू झाला. कधी कधी याच्याकडून विष्णुनिंदाही घडत राहिली. प्रल्हादाने

[1] मनीं ये, [2] पाउले

१५०२ ठाकलोसें द्वारीं । उभे याचक भीकारी ॥ १ ॥
मज भीक कांहीं देवा । प्रेमभातुकें[1] पाठवा ॥ २ ॥
याचकाचा भार । नये घेऊं येरझार ॥ ३ ॥
तुका म्हणे दान । सेवा घेतल्यावांचून ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- याचक-याचना करणारा, प्रेमभातुकें,-प्रेमाचा खाऊ.

अर्थः- देवा, तुमच्या दारात मी याचना करणारा असून, भिकारी उभा असून कृपेची भीक मागत आहे. १ देवा, मला तुमच्या प्रेमाच्या खाऊची थोडी भिक्षा घाला ना. २ भीक मागण्यास जो येतो त्याला हेलपाटे घालायला लावून त्याचे ओझे दात्याने आपल्या शिरावर उगाच घेऊ नये. ३ तुकाराम महाराज म्हणतात, कोणत्याही प्रकारची सेवा न घेता दात्याने दान दिले तर ते श्रेष्ठ दान होय. ४

## सदाशिवावर अभंग ॥ २ ॥

१५०३ काय धर्म नीत । तुम्हां[2] शिकवावें हित ॥ १ ॥
अवघें रचियेलें हेळा । लीळा ब्रह्मांड सकळा ॥ २ ॥
नाम महादेव । येथें निवडला भाव ॥ ३ ॥
तुका म्हणे वेळे । माझें तुम्हां कां न कळे ॥ ४ ॥

शब्दार्थ टीपा :- हेळा-क्षण.

अर्थः देवा, तुम्हाला धर्म, नीती शिकवून आम्ही काय हिताच्या गोष्टी सांगाव्यात ? १ तुम्ही तर सहज गमतीने, लीलेने एका क्षणात सारे ब्रह्मांड निर्माण केले आहे. २ यावरून तुमचे नाव महादेव आहे हा भाव स्पष्टच झाला. ३ तुकाराम महाराज म्हणतात, पण माझी उद्धाराची वेळ मात्र तुम्हांस का समजत नाही हो ? ४

१५०४ भांडावें तें[3] गोड । पुरे सकळ ही कोड ॥ १ ॥
ऐसा घरींचा या मोळा । ठावा निकटां जवळां ॥ २ ॥
हाक देतां वारीं । येतो जवळी सामोरीं ॥ ३ ॥
तुका म्हणे शिवें । मागितलें हातीं द्यावें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- कोड-इच्छा, मोळा-रीत.

अर्थ -देवा, तुमच्याशी जो जो भांडण करावे तो तो तुम्ही गोड होत जाता व आमची इच्छा पूर्ण करता. १ अशी तुमच्या घरची रीत आहे. ती मला मी तुमच्या अगदी जवळचा म्हणूनच समजली. २ दारात उभे राहून तुम्हांस हाका मारल्या की तुम्ही धांवून आमच्याजवळ येता. ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तू शिव, म्हणजे कल्याणकारक आहेस. आम्ही जे मागीत आहोत ते तू आमच्या हाती द्यावेस ४

१५०५ ऐसें कां जालें तें मज ही न कळे। कीर्तनाचे रळेपळे अगीं ॥ १ ॥
कैसें तुम्हां देवा वाटतसे बरें । संतांचीं उत्तरें लाजविलीं ॥ २ ॥
भाविकां कंटक करिताती पीडा । हा तंव रोकडा अनुभव ॥ ३ ॥
तुका म्हणे नाम निर्वाणीचा बाण । याचा अभिमान नाहीं तुम्हां ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- रळेपळे-गोंधळ, निकृष्ट अवस्था, अव्यवस्थित रूप, कंटक-दुष्ट लोक.

---

१ प्रेम वाहेरी, २ तुज, ३ तो.

यास ' तुझे राज्य नष्ट होईल तू विष्णूस शरण जा ' असे सांगितले पुढे नर्मदातीरावर भृगुकच्छ प्रदेशात अश्वमेध यज्ञ याने चालू केला असता विष्णू वामनबटूच्या रूपाने तेथे प्रकट झाला वामनाने त्रिपादभूमी मागितली बळीने ती देताच श्रीविष्णूने आपले ब्रह्माडव्यापी रूप प्रकट केले बळीने त्याला राज्याचे सर्वस्वी दान दिले श्रीविष्णू त्याच्यावर प्रसन्न होऊन म्हणाले, ' तुझ्या विंध्याचलावरील प्रार्थनेने मी संतुष्ट झालो आहे तू सावर्णि मन्वंतरात इंद्र होशील, सध्या तू सुतलात राहा तेथे मी तुझा द्वारपाल होईन, माझे चक्र तुझे रक्षण करील ' वामनाने या-नंतर या आपल्या भक्ताला बंधपाशातून मुक्त केले बळीने ब्रह्मा, विष्णू, महेश यांची स्तुती करून तो विष्णूच्या आज्ञेने सुखाने पाताळात राहू लागला. आपल्या एकनिष्ठ भक्ताची सर्व जबाबदारी भगवंत याप्रमाणे नेहमी घेत असतो साधुसंतानी या त्याच्या गुणाची कीर्ती वर्णन करून त्याला निर्गुणाचा सगुण केला

१५०१ सांगों जाणती शकुन । भूत भविष्य वर्तमान ॥ १ ॥
त्यांचा आम्हासी कंटाळा । पाहों नावडती डोळां ॥ २ ॥
रिद्धिसिद्धींचे साधक । वाचासिद्ध होती एक ॥ ३ ॥
तुका म्हणे जाती । पुण्यक्षयें अधोगती ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा– वाचासिद्ध– वाणीची सिद्धी असलेला, पुण्यक्षयें–पुण्याच्या नाशामुळे

अर्थ –जे कुणी शकुन सांगणारे आहेत आणि भूत, भविष्य व वर्तमानकाळ यांतील घटना सांगणारे आहेत १ अशा लोकांचा आम्हांस मोठाच कंटाळा आलेला असतो त्यांना डोळ्यानी पाहणे सुद्धा आम्हांस नको वाटते २ काही लोक रिद्धीसिद्धींचे साधक असतात, काही लोक वाणीची सिद्धी प्राप्त झालेले असतात ३ तुकाराम महाराज म्हणतात अशा लोकांनी जी पुण्ये केलेली असतात त्यांच्या क्षयामुळे, नाशामुळे असे लोक अधोगतीलाच जातात ४

१५०८ अवघीं भूतें साम्या आलीं । देखिलीं म्यां कें होतीं ॥ १ ॥
विश्वास तो खरा मग । पांडुरंगकृपेचा ॥ २ ॥
माझी कोणी न धरो शंका । हो¹ कां लोकां निर्द्वंद्व ॥ ३ ॥
तुका म्हणे जें जें भेटे । तें तें वाटे मी ऐसें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – भूतें–प्राणीमात्र, सर्व जीव, निर्द्वंद्व–सुखदुःख, यशापयश, आशानिराशा इत्यादी द्वंद्वाच्या पलीकडे.

अर्थः–सर्व जीवाच्या ठिकाणी एकाच हरीच्या रूपाची प्रचीती साम्यत्वाने मला कधी येईल काय ? १ अशी अवस्था जेव्हा निर्माण होईल तेव्हाच पांडुरंगाची खरी कृपा झाली असे मानता येईल २ माझी भीती कुणालाही वाटू नये माझ्याविषयी सर्व विश्वाने सुखदुःख, भीती, आशानिराशा इत्यादी बाबतीत निर्द्वंद्व व्हावे ३ तुकाराम महाराज म्हणतात, जो जो प्राणी मला भेटेल ते ते माझेच रूप आहे असे मला वाटते ४

विवरण.– तुकारामबुवाच्या आत्मानुभूतीचा एक सर्वोत्तम आविष्कार या तत्त्वदर्शी अभंगात झालेला दिसतो सर्वत्र एकच चैतन्यतत्त्व व्यापकपणे भरून राहिल्याचा अनुभव आपणास यावा अशी तीव्र उत्कंठाही या अभंगात आहे. या अभंगामागे तुकोबाच्या आयुष्यातील एक लहानसा पण महत्त्वाचा प्रसंग सांगितला जातो. एकदा एकादशीच्या निमित्ताने तुकाराम महाराज आळंदीस श्रीज्ञानेश्वराच्या दर्शनास गेले होते दर्शन झाल्यावर त्यांनी प्रदक्षिणेस प्रारंभ केला वाटेतील शेतात कणसे डौलाने डुलत होती. त्यावर पाखरांचा थवा मनसोक्तपणे दाणे टिपीत होता तुकोबांना पाहाताच पक्षी उडून गेले एक अगदी साधी घटना. पण आपल्या जाणिवेने पक्षी उडाल्याचे पाहून तुकोबा मनात चरकले त्यांच्या मनात शंका चाटून गेली या पाखरांना आपले भय वाटले ? ते तसे का वाटावे ? आपण चैतन्यमय, पाखरे चैतन्याचा नाजुक व सहजसुंदर आविष्कार ! जोंधळ्याची ताटेही एका बीजाच्या पोटीच फुलून आलेली ! असे असताना चैतन्याची ओळख चैतन्याला वाटावी ? की परस्पराबद्दल भय निर्माण व्हावे ? की आपल्या चैतन्यप्रतीतीमध्येच काही कमतरता आहे ? या प्रश्नांनी बुवांचे अंतःकरण हेलावून गेले. साऱ्या विश्वातील चराचर सृष्टीत एकाच चैतन्याचा धागा अनुभविणारा हा सत्पुरुष कळवळून गेला. या साम्यत्वाची वा चैतन्यानुभूतीची प्रचीती त्वरेने यावी म्हणून तुकोबा पांडुरंगाचा धावा करू लागले. ' अवघीं भूतें साम्या आलीं । देखिलीं म्यां कें होतीं ' अशी एक तत्त्वदर्शी ओळ त्यांच्या मुखातून स्रवली आपली भीती कुणासच वाटू नये, एकच चैतन्यस्वरूप असणारे सर्व भूतमात्र साम्यत्वाने आपणांस अनुभवास यावेत, जे जे आपणास भेटेल ते ते स्वतःप्रमाणेच भासावे, अशी फार मोठी झेप तुकोबांच्या मनाने या अभंगात घेतली आहे पांडुरंगाची पूर्ण कृपा झाली चैतन्यानुभूतीचा आविष्कार रोमरोमात थथथवून गेला निर्भयता प्रगटली मग पूर्वी भीतीने उडून गेलेली पाखरे बुवांच्या अंगाखांद्यावर निर्भयपणे खेळू लागली ! तुकोबांच्या नामस्मरणात सामील झाली द्वंद्वातीत अवस्थेत तुकोबा रमून गेले

तुकोबांसारख्यांच्या अनुभूतीत येणारी ही साम्यावस्था उपनिषदे व गीता यांच्यातून विकसित होत राहिलेली आहे ईशोपनिषदात म्हटले आहे, ' यस्तु सर्वाणि भूतान्यात्मन्येवानुपश्यति । सर्वभूतेषु चात्मानं ततो न विजुगुप्सते ॥ यस्मिन् सर्वाणि भूतानि आत्मैवाभूद्विजानतः । तत्र को मोहः कः शोक एकत्वमनुपश्यतः ' जो विद्वान पुरुष सर्व भूतांना–जीवांना आत्मतत्त्वातच पाहातो व आत्मतत्त्वास सर्व भूतमात्रात पाहातो तो कधी इतर प्राण्यांची घृणा करणार नाही. तत्त्वरेत्या पुरुषास सर्व जीवमात्र आत्मस्वरूपी वाटतात, तो सर्वात आत्मरूपाचाच अनुभव घेतो. अशा या एकत्वाच्या वा साम्यत्वाच्या भूमिकेवर तत्त्वदर्शी अनुभवात शोक, मोह, दुःख, भीती यांना स्थान कसे असणार ? गीतेने याच साम्यवादी वृत्तीचा अनुवाद अनेक ठिकाणी केलेला आहे ' सर्वभूतस्थमात्मानं सर्वभूतानि चात्मनि । ईक्षते योगयुक्तात्मा सर्वत्र समदर्शनः ' योगयुक्त चित्त असलेला व सर्वांभूती एकसारखे आत्मतत्त्व पाहाणारा स्थितप्रज्ञ पुरुष सर्व प्राणिमात्रात आपल्याला व आत्म्याच्या ठिकाणी सर्व भूतमात्रांना पाहातो परमश्रेष्ठ

१ ऐसे हो का निर्द्वंद्व

तु गाथा ॥ १७

अर्थ– देवा, या जगतामध्ये कीर्तनाविषयी एवढा गोंधळ का माजला आहे, असे हे का घडत राहिले हे काही समजत नाही १ पूर्वीच्या संतांनी कीर्तनाचे महत्त्व सांगताना जी वचने उच्चारली, त्यांना लाज वाटेल अशी स्थिती देवा तुम्ही कशी निर्माण केली हो ? २ भाविक लोकांना दुष्ट लोक पीडा देतात हा अनुभव आम्हास भरपूर आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, खरे म्हणजे तुमचे नाव अंबरच्या बाणाप्रमाणे असून त्याचा तुम्हांस अभिमान कसा नाही हो ? ४

१५०६ तुम्ही बैसलेती निर्गुणाचे खोळे। आम्हां कां हे डोळे कान दिले ॥ १ ॥
नाइकवे तुम्ही अपकीर्ति देवा। अव्हेरली सेवा न देखवे ॥ २ ॥
आपुले पोटीं तो राखियेला वाव। आम्हांसी का भाव अल्प दिला ॥ ३ ॥
तुका म्हणे दु खी असे हें कळो द्या। पुढिलिया धंद्या मन नेघे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :–खोळें–खोळेत, तोंडावरून घेतलेल्या पांघरुणात, अव्हेरली–सोडून दिली, वाव–अवकाश.

अर्थ – देवा, तुम्ही मात्र निर्गुणपणाचे पांघरुण डोक्यावर घेऊन स्वस्थ आहात मग आम्हांसच डोळे, कान इत्यादी इंद्रिये देऊन सगुण का केले ? १ अशी अपकीर्ती, देवा, तुमची होते हे कानांनी आता ऐकवत नाही तुमची सेवा सोडून द्यायला लोक उत्सुक होतात हेही पाहावत नाही. २ तुमच्या पोटात खरे पहाता आमच्या विषयीच्या भावास मोठाच अवकाश असूनही आम्हांस मात्र तो थोडाच वाटयास का आला आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, मी याविषयी दु खी आहे हे ध्यानात असू द्या तुमच्या आता या ईश्वरभक्तीच्या धंद्यात माझे मन फारसे लक्ष घालेनासे झाले आहे ४

विवरण – निर्गुण निराकार ब्रह्मतत्त्व स्वत च्याच इच्छेने पुष्कळ अंशांनी प्रकटले एकाच बीजाचा विस्तार झाला. खरे पाहाता सगुणनिर्गुणांत भेद नाही एकच दुसऱ्या अवस्थेला आले पण पुढे परमार्थविचारात जीव बद्ध, पापी व ईश्वर मुक्त, पावन, निर्गुण, निराकार म्हणून निराळा अशी कल्पना दृढ झाली ईश्वराच्या प्राप्तीसाठी जीवाने अनंत साधने करावीत आणि त्यास मिळवावे अशा तत्त्वज्ञानास बळ प्राप्त झाले परंतु तुकारामबुवासारखे श्रेष्ठ पदवीस चढलेले महात्मे सत्पुरुष प्रेमकलहाच्या भूमिकेवरून ईश्वरासच दटावून विचारू शकतात 'तुम्ही मात्र निर्गुण नि कराराच्या पांघरुणात स्तब्ध आहात आणि आम्हास इंद्रियांचे सगुणपण कुठून आले ? मग या इंद्रियांच्या विषयात गुरफटण्याची पाळी तरी का आली ? जीवाच्याच वाटयास हे कुठून आले ? असे धिटाईचे प्रश्न साधुसंत विचारू शकतात ईश्वर निर्गुणनिराकाराच्या अवगुंठनाखाली दडला असल्याने त्यास त्याची दूषणे लोकांकडून ऐकू येत नाहीत, पण आम्हास डोळे कान दिले असल्याने ही अपकीर्ती ऐकवत नाही, अशी बुवांची येथे एक तक्रार आहे

१५०७ सोंगें छंदें काहीं। देव जोडे ऐसे नाहीं ॥ १ ॥
सारा अवघें गाबाळ। डोळ्यां आडील पडळ ॥ २ ॥
शुद्ध भावाविण। जो जो केला तो तो सीण ॥ ३ ॥
तुका म्हणे फळे। परि होताती अंधळे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा –गाबाळ–केरकचरा, पडळ–पडदा

अर्थ :– अनेक प्रकारचे वेष धारण करून नाना प्रकारचे छंद करणारे लोक आहेत, पण त्यांच्या या करण्यापासून देवाची प्राप्ती होते असे नाही १ अज्ञानाचा सर्व पडदा तुमच्या डोळ्यावरील काढून टाका सारा देहबुद्धीचा केरकचरा दूर करा २ एका शुद्ध भावाशिवाय जे जे कराल त्याचा नुसता त्रासच होत राहील ३ तुकाराम महाराज म्हणतात, हे सर्व लोकांना कळते, पण ते मुद्दामच आंधळ्याप्रमाणे वागतात ४

एक । सेव्य जैसें उदक । तैसें जयातें तिन्ही लोक । आकांक्षिती । जो सबाह्यच संत । साडोनियां लाग । एकाकी असे आंग । आंगीं सूनी ॥ . .. जो निंदेतें नेघे । स्तुति न श्लाघे । आकाशा न लगे । लेपु जैसा ॥ तैसें निंदे आणि स्तुती । मानु करूनी एके पांतीं । विचरे प्राणवृत्ति । जनीं वनीं ॥ साच लटिके दोन्ही । न बोले जाहला, मौनी । जो भोगितां उन्मनी । आरायेना ॥ जो यथा लाभें न तोखे । अलाभें न पारखे । पाउसेंवण न सुखे । समुद्र जैसा ॥ आणि वायूसि एके ठायीं । बिढार जैसें नाहीं । तैसा न धरीच कहीं । आश्रयो जो ॥ आघवीचो आकाश स्थिती । जेंवि वायूसि नित्यवस्ती । तेंवि जगचि विश्रांति– । स्थान जया ॥ '

साम्यवृत्ती अंगी बाणलेल्या योगी पुरुषाच्या मनाची द्वंद्वातीत अवस्था कशी होती. याचे यापेक्षा अधिक चांगले वर्णन इतरत्र मिळणार नाही· तुकारामबुवा या अवस्थेला पोचले होते. जोवळयाच्या ताटावर बसलेली पाखरे इतकी धीट व्हावीत, की त्यांनी आपल्याही अंगावर बसावे अशी त्यांची मनीषा होती; ती सफल झाली. आपली थोडीसुद्धा भीती कुणास वाटू नये, असा त्यांचा आग्रह होता. तुकारामबुवांच्या अंगाखांद्यावर चिमण्या अथवा पाखरे खेळू लागली, या प्रसंगात अतिशयोक्ति आहे असेही मानण्याचे कारण नाही. योगी पुरुषाच्या वा संतश्रेष्ठाच्या आयुष्यात इतकी निर्भयता येतेच. त्यांच्या समत्ववृत्तीचा मोठा आधार चराचर सृष्टीस वाटत असतो. या संबंधीचे एक आधुनिक काळातील उदाहरण देण्यासारखे आहे.

लो. टिळक मंडाले येथे तुरुंगवास भोगत असताना, भगवद्‌गीतेचे चिंतन करीत होते. गीतारहस्याचे लेखन चालू होते. अनेक संदर्भग्रंथांनी कपाटे भरलेली होती. पहाटे उठून स्नानसंध्या करावी, जपजाप्य उरकावे व गीतेच्या चिंतनात रमावे अशी त्यांची दिनचर्या होती. त्यांच्या संपूर्ण हालचालीत पूर्णत्वास गेलेल्या, साम्यवृत्तीच्या योगी पुरुषाचे प्रतिबिंब उमटत राहिले होते. त्या वेळचा त्यांचा एक आचारी कुलकर्णी या नावाचा होता. त्याने लोकमान्यांच्या समत्ववृत्तीचे वर्णन करताना लिहिले आहे, ' कित्येक दिवसाच्या या परिपाठामुळे येथील चिमण्या फार धीट झाल्या. इतक्या की, त्या खोलीत येत, बुकटेबलावर बसत व महाराज जेवण्यास बसले की त्यांच्या ताटा-पाटा भोवती जमत. फार काय पण त्या चिंव चिंव करीत माश्याप्रमाणे त्यांच्या अंगावरही बसत. ' इंग्रज पहारे-कऱ्यांना या दृश्याचा मोठा विस्मय वाटे. सर्व प्राणिमात्र हे एकाच ईश्वराचे अवयव आहेत, त्यांचे सुखदुःख एकच आहे, याच वृत्तीतून खरी निर्भयता प्रकट होत असते.

१५०९ सत्यसंकल्पाचा दाता नारायण । सर्व करी पूर्ण मनोरथ ॥ १ ॥
येथें अळंकार शोभती सकळ । भावबळें फळ इच्छेचें तें ॥ २ ॥
अंतरींचें बीज जाणे फळवळा । व्यापक सकळां ब्रह्मांडाचा ॥ ३ ॥
तुका म्हणे नाहीं चालत तांतडी । प्राप्तकाळघडी आल्याविण ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:– घडी–वेळ, समय.

अर्थ–:ईश्वरावर विश्वास टाकून जे खरेखुरे संकल्प करतात त्यांचे सर्व मनोरथ नारायण पूर्ण करीत असतो. १ अशाच ठिकाणी सर्व प्रकारचे अलंकार शोभून दिसतात. आपल्या इच्छेचे फळ आपल्या भावबळाने आपणांस मिळते. २ सर्व ब्रह्मांडास व्यापून राहिलेला हा परमेश्वर आपल्या भक्तांच्या अंतःकरणातील खऱ्या कळवळ्याचे बीज जाणीत असतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, उगाच कोणत्याही गोष्टीची घाई करून चालत नाही, लाभ होण्याची वेळ आल्याशिवाय उतावळेपणाचा उपयोग होणार नाही. ४

१५१० काय वाणूं आतां न पुरे हे वाणी । मस्तक चरणीं ठेवीतसें ॥ १ ॥
थोरीव सांडिली आपुली परिसें । नेणे सिवों कैसें लोखंडासी ॥ २ ॥
जगाच्या कल्याणा संतांच्या विभूति । देह कष्टविती उपकारें[1] ॥ ३ ॥

१ पर उपकारें.

योगी पुरुषाचे लक्षण सांगताना गीतेच्या सहाव्या अध्यायात म्हटले आहे, 'आत्मौपम्येन सर्वत्र समं पश्यति योऽर्जुन। सुखं वा यदि वा दुःखं स योगी परमो मतः' अर्जुना, जो योगी पुरुष आपल्याप्रमाणे सर्व भूतमात्राना पाहतो, सुख-दुःखानाही समान मानतो तोच श्रेष्ठ योगी होय. याला सुहृद, मित्र, वैरी, उदासीन, मध्यम, द्वेषी, बंधुगण, धर्मात्मा, पापी यांच्यात नेहमीच समत्व प्रतीत होते 'सुहृन्मित्रार्युदासीनमध्यस्थद्वेष्यबन्धुषु। साधुष्वपि च पापेषु समबुद्धिर्विशिष्यते' ज्ञानी पुरुष विद्याविनययुक्त ब्राह्मण, गाय, हत्ती, कुत्रा, चांडाल या सर्वांना समत्वाने पाहतो 'विद्याविनयसम्पन्ने ब्राह्मणे गवि हस्तिनि। शुनि चैव श्वपाके च पण्डिताः समदर्शिनः' अशा रीतीने साम्यवृत्तीत राहणाऱ्या श्रेष्ठ पुरुषाची अवस्था निर्द्वंद्वस्वरूपाची होते. सुखदुःख, शत्रुमित्र, मानापमान, शीतोष्ण यातील अभेद त्याना प्रतीत झाल्यामुळे त्याना कसलीही आसक्ती या जगात उरत नाही 'समः शत्रौ च मित्रे च तथा मानापमानयोः। शीतोष्णसुखदुःखेषु समः सङ्गविवर्जितः' अशा साम्यवृत्तीस परमार्थसाधनेत फारच महत्त्व आहे. या समभावाच्या आश्रयामुळे जगातील कित्येक दुःखे दूर होतील. माणसामाणसातील भीती नष्ट होईल.

गीतेवर आधारलेल्या भागवतधर्मांत या साम्य वृत्तीचा फारच मोठा गौरव साधुसंतानी केला आहे. 'भूताचेनि अनेकपणें। अनेक नोव्हे अंतःकरणें। केवळ एकत्वचि माझें जाणे। सर्वत्र जो॥ जैसा उदकाचेनि आपुल्यें रसु। का गगनाचेनि मानें अवकाशु। तैसा मातेंनि रूपें रूपसु। पुरुषु तो गा' असे या योगी पुरुषाचे वर्णन श्रीज्ञानेश्वरानी केले आहे. 'जैसा पटीं तंतु एकु' सर्वत्र दिसतो तसाच प्रकार आत्मत्वाने चराचर सृष्टीकडे पाहणाऱ्याचा असतो. पान निराळ्या आकाराचे, त्याची संख्याही मोठी, पण रोप एकच असते 'ना तरी वृक्षाचीं पानें जेतुलीं। तेतुलीं रोपें नाहीं लाविलीं। ऐसी अद्वैत दिवसे पाहली। रात्री जया' अशा रीतीने अद्वैताची पहाट होऊन सर्वत्र साम्याची प्रभा फाकत राहते. हा योगी पुरुष 'आपणपेंया सारिसें। तो चराचर देखे। अखंडित' या वृत्तीचा असतो 'सुखदुःखादि वर्में। का शुभाशुभें कर्में। दोनी ऐसी मनोधर्में। नेणेचि जो॥ हे एकैक काय सांगावें। जया त्रैलोक्यचि आघवें। मी ऐसे स्वभावें बोधें आलें॥ म्हणोनि आपणपां विश्व देखिजे। आणि आपण विश्व होइजे। ऐसें साम्यचि एक उपासिजे। पांडवा गा' अशी याच्या मनाची अवस्था बनलेली असते.

१५१३ असें येथीचिया दीनें । भाग्यहीन सकळां ॥ १ ॥
मांडवल एवढें गांठीं । नाम कंठीं धरियेलें ॥ २ ॥
आणिक तें दुजें कांहीं । मज नाहीं यावरी ॥ ३ ॥
तुका म्हणे केला फोणें । एवढा नेणें लौकिक ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा– गांठीं–स्वाधीन, जवळ

अर्थ– मी या भूमीवर एक भाग्यहीन व सर्वांत दीन असा मनुष्य आहे. १ मी माझ्या वाणीत सतत नामस्मरणाचा अलकार धारण केला आहे हेच माझें एकमेव मांडवल आहे. २ यालेरीज मी दुसरे कसलेही साधन जाणीत नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, माझा एवढा लौकिक कुणी वाढविला हे काही मला समजत नाही ४

१५१४ गायें नाचें वायें[1] टाळी । साधन कळीं उत्तम हे ॥ १ ॥
काय जाणों तरले किती । नाव ऐती या बैसा ॥ २ ॥
सायासाचें नाहीं काम । घेतां नाम विठोबाचें ॥ ३ ॥
तुका म्हणे निर्वाणीचें । शस्त्र साचें हें एक ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– वायें–वाजविणे, कळीं–कलियुगात, सायासाचें–प्रयत्नाचे, निर्वाणीचें–संकटकाळाचे, अंतकाळचे.

अर्थ –या कलीयुगात श्रीहरीचे नाम गाणे, त्याच्या नामस्मरणात नाचणे, टाळी वाजविणे हीच साधने फार उत्तम आहेत. १ या साधनामुळे भवसागरातून कितीजण तरले हे काही समजत नाही; पण ही नाव चांगली तयार आहे आयती. हीत सुखाने बसा. २ या नामाच्या साधनामुळे इतर काही प्रयत्नाचे कारण उरणार नाही; एक विठ्ठलाचे नाव घेतले की पुरे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, संकटकाळचे किंवा अंतकाळचे एक खरे शस्त्र रक्षणासाठी जर कोणते असेल तर ते श्रीहरीचे नामच होय. ४

१५१५ सर्वकाळ माझे चित्तीं । हेचि खंती राहिली ॥ १ ॥
बैसलें तें रूप डोळां । वेळोवेळां आठवे ॥ २ ॥
वेव्हाराची सरली मात । अखंडित अनुसंधान ॥ ३ ॥
तुका म्हणे वेध जाला । अंगा आला श्रीरंग ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – खंती–चिंता, मात–वात, गोष्ट, वेध—तद्रुपता.

अर्थ –आता माझ्या चित्तास सतत ही एक चिंताच लागली आहे १ या श्रीहरीचे रूप माझ्या डोळ्यात जे एकदा बसले आहे, त्याचीच आठवण मला पुनः पुन होते. २ आता मला लौकिक अथवा प्रापंचिक व्यवहाराची गोष्ट आठवत नाही. ती संपून गेली आहे. आता अखंड अनुसंधान याचेच केवळ आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, या श्रीरंगाचे रूप माझ्या मनात ठसल्यामुळे मी त्याच्याशीच तद्रूपता पावलो आहे. ४

१५१६ जेसें[2] दावी तैसा राहे । तरि कां देव दुरी आहे ॥ १ ॥
दु:ख पावावायाचें मूळ । रहणी ठाव नाहीं ताळ ॥ २ ॥
माळामुद्रांवरी । कैंचा सोपें जोडे हरि ॥ ३ ॥
तुका म्हणे देखें । ऐसे परीचीं बहुतेकें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– ताळ—ताळमेळ, हिशेब

---

१ वाहें. २ जैसा.

अर्थ —जसा वरवरून भक्तपणाचा आव आणतोस तसा जर खरोखरीच आतून असशील तर देव काय मग दूर आहे ? १ पण खऱ्या भक्ताच्या राहणीचा ताळमेळ तेथे नसल्यामुळे हा बाह्य डामडौल दुरावाच कारण होतो २ वरवर माळा, मुद्रा वगैरे घालून नाना प्रकारची सोंगे आणल्यास श्रीहरीची प्राप्ती कशी होईल ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा प्रकारची सोंगे आणणारेच भक्त नेहमी आढळतात असे समज ४

१५१७ अवघा तो शकुन । हृदयीं देवाचे चरण[1] ॥ १ ॥
येथें नसतां वियोग । लाभा उणे काय मग ॥ २ ॥
संग हरिच्या नामाचा । शुचिर्भूत सदा वाचा ॥ ३ ॥
तुका म्हणे हरिच्या दासां । शुभकाळ अवघ्या दिशा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – उणें–कमतरता, संग–सोबत

अर्थ – आपल्या हृदयात सतत श्रीहरीचे चरण अथवा चिंतन धारण करून वर्तन करणे हाच खरा शुभ संकल्प आहे १ यात जर कधी वियोग होणार नाही तर मग येथे लाभाची काय उणीव राहाणार आहे ? २ वाणीस नेहमी श्रीहरीच्या नामाचीच सोबत असल्यामुळे ती शुचिर्भूत होऊन जाते ३ तुकाराम महाराज म्हणतात, हरीच्या दासांना सर्व दिशा व सर्वकाळ हे शुभकारकच असतात ४

१५१८ ब्रह्मरूपाचीं कर्मे ब्रह्मरूप । विरहित संकल्प होतीं जातीं ॥ १ ॥
ठेविलिया दिसे[2] रंगाऐसी शिळा । उपाधि निराळा स्फटिक मणि ॥ २ ॥
नानाभाषामतें आळविती बाळा । प्रबोध[3] तो मूळा जननीठायीं ॥ ३ ॥
तुका म्हणे माझें नमन जाणतियां । लागतसें पायां वेळोवेळां ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – शिळा—दगड, प्रबोध–ज्ञान, ओळख

अर्थ – जो ब्रह्मरूप झालेला असतो त्याची कर्मेही ती कुठल्याही संकल्पानुसार होत नसल्याने ब्रह्मरूपच असतात १ स्फटिकाच्या शेजारी ज्या रंगाचा दगड ठेवला असेल त्या रंगाचा स्फटिक दिसतो पण मूळ स्वरूपात निराळाच असतो २ लहान मुलास अनेक शब्दांनी हाक मारतात, पण ते त्या सर्वांना न ओळखता फक्त आईच्या शब्दांचीच ओळख ठेवते ३ तुकाराम महाराज म्हणतात माझे नमन आत्मज्ञानी लोकांना असून मी त्यांच्या पायांस वारंवार स्पर्श करीत आहे ४

१५१९ नाहीं सुगंधाची लागत लावणी । लावावी ते मनीं शुद्ध होता ॥ १ ॥
वाऱ्या हातीं माप चालें सज्जनाचे । कीर्ति मुख त्याचे नारायण ॥ २ ॥
प्रभा आणि रवि काय असे आन । उदयीं तव[4] जन सकळ साक्षी ॥ ३ ॥
तुका म्हणे बरा सत्याचा सायास । नवनीता नाश नाहीं पुन्हा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – आन–दुसरे निराळे नवनीता–अमृतास

अर्थ –सद्गुणाच्या सुगंधाची पेरणी कधी करावी लागत नाही मनाच्या शुद्धतेनेच त्या सुगंधाचे बीजारोपण होत असते १ सुगंधाचा प्रसार जसा वाऱ्यामुळे होतो त्याचप्रमाणे सज्जनाच्या गुणसुगंधाचा प्रसार नारायणाच्या मुखातून होतो २ सूर्य व प्रकाश हे काय निरनिराळे आहेत ? त्याच्या उदयाची साक्ष सर्व लोकाना पटत असते ३ तुकाराम महाराज म्हणतात, सत्याच्या प्राप्तीविषयी प्रयत्न करणे चांगले अमृताचा जसा नाश होत नाही तसेच सत्यही कधी मरण पावत नाही ४

१ चिंतन, २ दावी, ३ प्रबोधी तो मूळ जननी, ४ ते

१५२० तीर्थाटणें एकें तपें हुंबरती । नाथिले धरिती अभिमान ॥ १ ॥
तैसे विष्णुदास नव्हती सावडे । एकाचिया पडे पायां एक ॥ २ ॥
अक्षरें आणिती अंगासी जाणीव । इच्छा ते गौरव पूज्य व्हावें ॥ ३ ॥
तुका म्हणे विधिनिषधाचे डोहीं । पडिले[1] त्यां नाहीं देव कधीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :–हुंबरती–गुरकावतात, नाथिले–खोटा, सावडे—भोळेभावडे, अक्षरें–वेदाच्या अध्ययनाने ज्ञानाने, जाणीव–महत्त्व.

अर्थ.– काही लोक तीर्थयात्रा करून वा नाना प्रकारची तपे करून गर्वाने गुरकावतात आणि विनाकारण खोटा अभिमान धरतात. १ त्यांच्याप्रमाणे भोळेभावडे विष्णुदास नाहीत; ते एकमेकांच्या पायाच पडतात. २ काही लोक वेदाच्या अध्ययनामुळे आपणांस ज्ञाते समजून, महत्त्व देऊन आपला महिमा लोकांत वाढावा अशी इच्छा करतात. ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा प्रकारे जे कर्मकांडात व विधिनिषेधांच्या डोहात बुडतात, त्यांना देवाची प्राप्ती कधीच होत नाही. ४

१५२१ पटे ढाळूं आम्ही विष्णुदास जगीं । लागों नेदूं अंगीं पापपुण्य ॥ १ ॥
निर्भर अंतरीं सदा सर्वकाळ । घेतला सकळ भार देवें ॥ २ ॥
बळिवंत जेणें रचिलें सकळ । आम्हां त्याचें बळ अंकितांसी ॥ ३ ॥
तुका म्हणे आम्ही देखतचि नाहीं । देवाविण कांहीं दुसरें तें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– पटे–पट्टयाचा खेळ, निर्भर–आनंदित, सुखाने.

अर्थ :– या जगतात आम्ही विष्णुदास पट्टे खेळणारे शूरवीर आहोत, त्यामुळे आमच्या अंगास पापपुण्य आम्ही लागू देत नाही. १ आम्ही सदासर्वकाळ मनाने आनंदित असून आमच्या चरितार्थाचा सर्व भार देवाने घेतलेला आहे २ सर्वांत बलवान असणाऱ्या या देवाने या सृष्टीची रचना केली आहे, आम्ही त्याचाच आधार घेऊन त्याच्या स्वाधीन झालो आहोत. ३ तुकाराम महाराज म्हणतात, आम्ही या देवाशिवाय दुसरे काही पाहातच नाही. ४

१५२२ कथेचा उलंघ तो अधमां अधम । नावडे ज्या नाम ओळखा तो ॥ १ ॥
कासया जीऊन जाला भूमी भार । अनउपकार माते कुसीं ॥ २ ॥
निद्रेचा आदर जागरणीं वीट । त्याचे पोटीं कीट कुपथ्याचें ॥ ३ ॥
तुका म्हणे दोन्ही बुडविलीं कुळें । ज्याचे[2] तोंड काळें कथेमाजी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा –उलंघ–मर्यादा मोडणे, अधम–नीच, दुष्ट, जीऊन–जगून, अनउपकार–कृतघ्न, कीट–पुट, भार.

अर्थ.– जो कथेस येऊन कथेची मर्यादा मोडतो व ज्यास श्रीहरीचे नाम आवडत नाही तो अधमाहून अधम समजावा. १ तो जन्मास येऊन या भूमीस भारभूत का झाला आहे ? आईच्या कुशीत जन्म घेऊन हा एवढा कृतघ्न का होतो ? २ त्याला कीर्तनामुळे होणाऱ्या जागरणाचा वीट असून झोप मात्र फार प्रिय असते. त्याच्या पोटात असे कुपथ्याचे पुट मोठेच साचलेले असते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, जो श्रीहरीच्या कथेत काळे तोंड करून बसतो; हरीकथेस विन्मुख होतो, त्याने आपल्या आईचे व बापाचे अशी दोनही कुळे साफ बुडविली आहेत, असे समजावे. ४

---

१ बुडाले, २ त्याचे.

१५२३ सांडोनियां दो अक्षरां । काय करूं हा पसारा ।
विधिनिषेधाचा भारा । तेणें दातारा नातुडसी ॥ १ ॥
म्हणोनि थोवडया उत्तरीं । याचे जपें निरंतरीं ।
नाम तुझें हरी । भवसागरीं तारूं तें ॥ २ ॥
सर्वमय ऐसें वेदाचें वचन । श्रुति गर्जती पुराणें ।
नाहीं आणीक ध्यान । रे साधन मज चाड ॥ ३ ॥
शेवटीं ब्रह्मार्पण । याचि मंत्राचें कारण ।
काना मात्रा यांवांचिण । तुका म्हणे विठुलीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा –दो अक्षरां–रा म या दोन अक्षरांना, नातुडसी–सापडत नाहीस, तारू–नाव होडी, चाड–आवड, इच्छा, विठुली–अखेर

अर्थ –रा म ही दोन अक्षरे सोडून इतर सर्व यावींचा पसारा घेऊन मी काय करू ? हा विधिनिषेधांचा भारा काय उपयोगाचा ? यामुळे काही परमेश्वर हाती येणार नाही १ म्हणून मी थोवडया शब्दांनी त्याचा जप वारंवार करीत असतो श्रीहरी तुझे नाम हे भवसागर तरून जाण्याचे एक चांगले साधन आहे २ वेद, श्रुती, पुराणें यांची गर्जना तू सर्वव्यापी आहेस अशीच आहे म्हणून तुझ्यावाचून मला कुठलेच ध्यान नाही व मी इतर साधनांची इच्छा करीत नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, आयुष्याची अखेर ब्रह्मार्पण याच शब्दाने व्हायची असते हेच सार्थक आयुष्याचे हे या रामनामाच्या मंत्रानेच साध्य होते याशिवाय कानामात्रा वगैरे सगळे व्यर्थ आहेत त्यावर शून्य पडो त्यांची अखेर होवो ४

१५२४ हरिनामाचें करूनि तारूं । भवसिंधुपार उतरलों ॥ १ ॥
फावलें फावलें आतां । पायीं संतां विनटलों ॥ २ ॥
हरिनामाचा शस्त्र घोडा । संसार गाढा छेदिला ॥ ३ ॥
हरिनामाचीं धनुष्यकाडें । विन्मुख तोंडें कळिकाळ ॥ ४ ॥
येणेंचि बळें सरते आम्ही । हरिचे नामीं लोकीं तिहीं ॥ ५ ॥
तुका म्हणे जालों साचे । श्रीविठ्ठलाचे डिंगर ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – तारू–नाव होडी विनटलों,–लागलो, दृढ झालो, छेदिला–नष्ट केला, सरते–श्रेष्ठ डिंगर–सेवक

अर्थ – हरिनामाची नाव तयार करून मी या संसारसागरातून तरून गेलो १ आता या संतांच्या पायांशी लागून मी तृप्त झालो आहे २ श्रीहरीनामाचा घोडा व शस्त्र यांच्या साहाय्याने मी जबरदस्त संसारास नष्ट करून टाकले ३ हरिनामाच्या धनुष्यबाणांनी मी कळिकाळाचे तोंड विन्मुख करून टाकले त्यांना घालवून दिले ४ या हरिनामाच्या बळानेच आम्ही त्रैलोक्यात श्रेष्ठ पदवीस पोचलो आहोत ५ तुकाराम महाराज म्हणतात, आम्ही या श्रीविठ्ठलाचे निश्चयाने लाडके सेवक झालो आहोत ६

१५२५ नव्हें हे गुरुत्व मेघवृष्टि वाणी । ऐकावी कानीं संतजनीं ॥ १ ॥
आरध हा शब्द देवाचा प्रसाद । करविला वाद तैसा केला ॥ २ ॥
देहपिंड दान दिला एकसरें । मुळिचे तें खरे टांकसाळ ॥ ३ ॥
तुका म्हणे झरा लागला नवनीत । सेविलिया हित पोट धाय ॥ ४ ॥

शब्दार्थ टीपा – गुरुत्व–मोठेपणा, आरुष–बोबडा, धाय–तृप्त

अर्थ – काही एक मोठेपणा अंगी घेऊन आम्ही हा उपदेश करीत आहोत असे नव्हे आमचा हा उपदेश मेघवृष्टीप्रमाणे सहजच सर्वांना समान असा आहे तो तुम्ही संतसज्जनानी ऐकावा. १ माझा हा शब्द बोबडा असला तरी तो देवाचा प्रसाद आहे असे समजावे. त्याने जसे बोलते केले तसे मी बोलतो. २ मी आपल्या देहाचे दान एकदाच त्या श्रीहरीस केले. या मूळ श्रीहरीच्या टंकसाळीमधून माझ्या शब्दाचे खरे नाणे आता बाहेर पडत आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, श्रीहरिनामामृताचा एक जिवंत झराच माझ्या हाती लागला असून त्याचे सेवन केल्याने लोक तृप्त होतील ४

१५२६ घटीं अलिप्त असे रवि । अग्नि काष्ठामाजी जेवी[1] ।
तैसा नारायण जीवीं । जीवसाक्षीवर्त्तनें ॥ १ ॥
भोग ज्याचे तया अंगीं । भिन्न प्रारब्ध जगीं ।
विचित्र ये रंगीं । रंगे रंगला गोसावी ॥ २ ॥
देह संकल्पासारिखें । एक एकांसी पारिखें ।
सुख आणि दुःखें । अंगीं कर्मे त्रिविध ॥ ३ ॥
तुका म्हणे कोडें । न कळे तयासी सांकडें ।
त्याचिया निवाडें । उगवे केलें विदान ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपाः– पारिखे–निराळे, त्रिविध कर्मे–पाप, पुण्य, पापपुण्यमिश्रित अशी कर्मे, उगवे–सोडवावे. विदान–कौशल्य, शिताफी.

अर्थः–पाण्याने भरलेल्या घटात सूर्याचे प्रतिबिंब दिसते, पण सूर्य त्याहून भिन्न असतो. सर्वसामान्य काष्ठात अग्नी असतो, तो प्रत्यक्ष अग्नीपेक्षा निराळा असतो. त्याप्रमाणे सर्व प्राणिमात्रात नारायण वास करीत असला तरी तो साक्षित्वाने त्यापेक्षा भिन्न आहे. १ भिन्नभिन्न प्रारब्धकर्मामुळे नाना भोग प्राप्त होतात, त्यांचा भोक्ता जीव आहे या भिन्नत्वाच्या रंगाने माझा स्वामी रंगलेला आहे. २ अंतकाळी जसा ज्याचा संकल्प असतो तसा देह त्यास प्राप्त होतो म्हणून एका देहापेक्षा दुसरा भिन्न असतो. पाप-पुण्य व पापपुण्यमिश्रीत कर्मे अशा त्रिविध कर्मानुसार या देहाला सुख अथवा दुःख प्राप्त होते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, असे हे कोडे ज्याला समजत नाही त्याला मात्र जन्ममरणाचे व देहदुःखाचे मोठेच संकट आहे. पण परमेश्वर सर्वत्र असून साक्षित्वाने भिन्न आहे, हे ज्याने कौशल्याने कोडे सोडवून घेतले तो मात्र यातून मुक्त होईल. ४

१५२७ सद्‌गदित कंठ दाटो[2] । येणें फुटो[3] हृदय ॥ १ ॥
चिंतनाचा एक लाहो । तुमच्या अहो विठ्ठला ॥ २ ॥
नेत्रीं जळ वाहो[4] सदा । आनंदाचे रोमांच ॥ ३ ॥
तुका म्हणे कृपादान । इच्छी मन हे जोडी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपाः– लाहो–लाभ.

अर्थ –देवा, तुमच्या स्मृतीने माझा कंठ नेहमी दाटून येवो आणि याच प्रेमभराने माझे हृदय फुटून जावो. १ अहो विठ्ठला, तुमच्या एका चिंतनाचा हाच लाभ मला होवो. २ तुमच्या स्मरणाने माझ्या डोळ्यांतून सतत अश्रुधारा वाहोत व आनंदाचे रोमांच अंगावर उमटोत ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, असे हे कृपादान मला मिळावे एवढीच माझ्या मनाची इच्छा आहे. ४

१ तेवी, २ दाटे, ३ फुटे, ४ वाहे

विवरण – आपणास भक्तीचा, ईश्वरभेटीचा अनुभव कसा यावा याचे फार मार्मिक वर्णन तुकाराम बुवांनी या अभंगात केले आहे नुसत्या स्मरणाने, चिंतनाने कंठ सद्गदीत व्हावा, अंगावर रोमांच उभे राहावेत, छाती फुटून निदान डोळ्यांतून अश्रुधारा झराव्यात, अशी त्याची एकमेव इच्छा आहे बुवांची ही इच्छा भक्ति शास्त्रामधील रोमांच, स्वेद, अश्रू, कंप, स्तंभ अथवा तटस्थपणा, मानसिक शांती, आणि आनंद अथवा स्तंभ गति-निरोधन, स्वेद रोमांच, वैरस्य, कंप, वर्ण पालटणें (वैवर्ण्य), अश्रुपात आणि प्रलय चेष्टानिरोध या अष्ट सात्त्विक भावना धरूनच नारदभक्तिसूत्रात भक्तगौरव करताना भक्त देवासंबंधीच सतत वार्तालाप करताना त्यांची ' कंठावरोधरोमांचाश्रुभिः अशी अवस्था होत असल्याचे नारदांनी सांगितले आहे भक्ताच्या मनाची अवस्था या अष्टसात्त्विक भावांनी कशी होते याचे मोठे हृद्य वर्णन एकनाथांनी भागवतात केले आहे ते म्हणतात, 'चित्तचैतन्या होता भेटी। हर्षे बाष्प दाटे कंठीं। पुलकांकित रोमांच उठी। उन्मीलित दृष्टि पुंजाळे॥ करितां अच्युतचिंतन। सप्रेम गहिंवरे मन। अट्टहासें करी रुदन। अनिवार स्फुंदन ऊर्ध्वं श्वासे॥ परस्परें निज संवादू। करितां जाला स्वरूपाव बोधू। नेत्रीं जळ अंगी स्वेदू। प्राणस्पंदु पांगुळे॥'

१५२८ जेथें देखें तेथें उभा। अवघ्या गगनाचा गाभा॥ १॥
डोळा बैसले बैसले। ध्यान राहोनि सचले॥ २॥
सरसावलें मन। केलें सोज्वळ लोचन॥ ३॥
तुका म्हणे सवें। आतां असिजेत देवें॥ ४॥

शब्दार्थ व टीपा – गगनाचा–आकाशाचा, गाभा–सारभूत आत्मा, सचले–साठून राहिले, लोचन–डोळे सवें–बरोबर

१५३० पाणिपात्र दिगंबरा । हस्त करा सारिखे ॥ १ ॥
आवश्यक देव मनीं । चिंतनींच सादर ॥ २ ॥
भिक्षा कामधेनुऐशी । अवकाशीं शयन ॥ ३ ॥
पांघरोनि तुका दिशा । केला वास अलक्षीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – दिगंबरा–दिशा हेच वस्त्र पांघरून मुक्तपणे हिंडणाऱ्या, वैराग्यशील पुरुषाचे, सादर–तत्पर, अलक्षीं–लक्षात न येणारा

अर्थ – जे कुणी दिगंबर आहेत अशा पुरुषाचे हात हेच पात्राप्रमाणे असतात १ त्याच्या मनात सतत परमेश्वराचेच चिंतन चालू असून ते त्याविषयी तत्पर असतात २ भिक्षा ही त्यांना कामधेनूसारखी वाटते त्याचे झोपणेही अगदी मोकळ्या जागी असते ३ तुकाराम महाराज म्हणतात अशा लोकांनी दशदिशांचे पांघरूण करून अलक्षणीय अशा परमेश्वरापाशीच निवास केला आहे ४

१५३१ विषयीं विसर पडिला निःशेष । अंगीं ब्रह्मरस ठसावला ॥ १ ॥
माझी मज झाली अनावर वाचा । छंद या नामाचा घेतलासे ॥ २ ॥
लाभाचिया सोसें पुढें चाली मना । धनाचा कृपणा लोभ जैसा ॥ ३ ॥
तुका म्हणे गंगासागरसंगमीं । अवघ्या जाल्या ऊर्मि एकमय ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – निःशेष–समूळ सोस–हौस

अर्थ –माझ्या अंगी ब्रह्मरसाचे तत्त्व पूर्णत्वाने ठसले असल्यामुळे मला सर्व विषयाचा समूळ विसर पडलेला आहे १ मी या नामाचा छंद घेतला असल्यामुळे ही वाणी माझी मलाच आवरेनाशी झाली आहे २ धनाचा कृपण मनुष्य जसा लोभी असतो तशीच माझ्या मनाची चाल मोठ्या हौसेने या नामासाठी उत्सुक बनली आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, ज्याप्रमाणे गंगा नदी सागराशी पूर्णपणे संगमात समरस होते, त्याप्रमाणे माझ्या सर्व वृत्ती या श्रीहरीच्या रूपात एकवटून गेल्या आहेत ४

१५३२ कृष्णरामनाम मांडीं पावोळी[1] । तेणे होईल होळी पापा धुनी ॥ १ ॥
ऐसा मना छंद लावी रे अभ्यास । जया नाहीं नास ब्रह्मरसा ॥ २ ॥
जोडी तरी ऐसी करावी न सरे । पुढें आस नुरे[2] मागुताली ॥ ३ ॥
तुका म्हणे ऐसे धरा काहीं मनीं । यातायाती खाणीं चुकतील ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – पावोळी–पा आळी, रांगा, धुनी–नाश, जोडी–लाभ, खाणी–जन्ममरणाच्या योनी

अर्थ –रामकृष्ण रामकृष्ण अशा नामाच्या तू ओळी मांड, यांचा उच्चार कर त्यामुळे पापाची होळी होऊन त्याचा नाश होईल १ अभ्यासपूर्वक असाच छंद तू तुझ्या मनास लावून घे यामुळे ज्या ब्रह्मसुखास नाश नाही असे ते तुला प्राप्त होईल २ असा लाभ जोडावा की जो कधी संपणार नाही त्याची प्राप्ती झाल्यावर मग कोणत्याही विषयाची इच्छा उरत नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, ज्यायोगे जन्ममरणांच्या अनेक योनींचे फेरे चुकतील असे काही तरी मनात धरावे ४

१५३३ परमार्थी तो न म्हणावा आपुला । सलगी धाकुला हेळूं नये ॥ १ ॥
थोडाचि स्फुलिंग बहुत दावाग्नि । वाढता इंधनीं वाढविला ॥ २ ॥
पितियानें तैसा वंदावा कुमर । जयाचे अंतर देवें[3] वसे ॥ ३ ॥
तुका म्हणे शिरीं वाहावें खापर । माजी असे सार नवनीत ॥ ४ ॥

---

[1] मांडी पारे वोळी, मांडी रे पांवोळी, [2] उरे, [3] देवबाजी

शब्दार्थ व टीपाः– हेळू नये–अवहेलना करू नये, दावाग्नी–अरण्यातील अग्नी, कुमर–पुत्र, नवनीत–लोणी.

अर्थः– जर एखादा परमार्थी लहान असला तरी तो आपले मूल आहे समजून त्याची अवहेलना कधी करू नये. १ अग्नीची ठिणगी लहान असली तरी अरण्यातील वणव्यात तिचेच स्वरूप इंधनाची वाढ होऊन मोठे होते २ ज्याच्या अंतःकरणात देवाची वस्ती झाली आहे तो आपला पुत्र असला तरी पित्याने त्याला वंदन करावे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, ज्या भांड्यात सारभूत असे लोणी आहे, त्या भांड्याचे खापरही आपल्या शिरी वाहून त्याविषयीचा आपला आदर व्यक्त करावा. ४

१५३४　ज्याचा ऐसा अनुभव । विश्व देव सत्यत्वें ॥ १ ॥
देव तया जवळी असे । पाप नासे दर्शनें ॥ २ ॥
कामक्रोधा नाहीं चाली । भूतीं जाली समता ॥ ३ ॥
तुका म्हणे भेदाभेद । गेले[1] वाद खंडोनि ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – चाली–अवसर, स्थान.

अर्थः–सर्व जग हे खरोखर देवच आहे असा अनुभव ज्यास आला आहे, १ त्याच्याजवळ देवाची वस्ती असते. त्याच्या दर्शनानेच पाप नाहीसे होते २ त्याच्याजवळ कधी कामक्रोधादी वृत्तींना स्थान नसते सर्व भूतमात्रांविषयी त्याची बुद्धी समत्वाची असते ३ तुकाराम महाराज म्हणतात, भेद–अभेद असे मतवाद त्याच्या ठिकाणी खंडित होऊन गेलेले असतात ४

१५३५　सेवा ते आवडी उच्चारावें नाम । भेदाभेदकाम निवारूनि ॥ १ ॥
न लगे हालावें चालावें बाहेरी । अवघेंचि घरीं बैसलिया ॥ २ ॥
देवाचींच नामें देवाचिये शिरीं । सर्व अळंकारीं समर्पावीं ॥ ३ ॥
तुका म्हणे आहे[2] भावेचि संतोषी । वसे नामापाशीं आपुलिया ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा– आवडी–प्रेमाने.

अर्थ – भेदाभेदाविषयीची शुष्क चर्चा सोडून देऊन परमेश्वराचे नाम प्रेमाने उच्चारावे, हीच खरी त्याची सेवा होय. १ त्यासाठी आपल्या जागेवरून हालावे लागत नाही, की घरातून बाहेर जावे लागत नाही. घरच्या घरीच सर्व लाभ आपणास होतात २ देवाची विविध नामेच अलंकार समजून देवाच्या शिरावर मनोभावे अर्पण करावीत ३ तुकाराम महाराज म्हणतात, देव हा केवळ एकनिष्ठ भावानेच संतुष्ट होणारा आहे, तो आपल्या नामधारकापाशीच नित्य असतो ४

विवरणः–कलियुगात सर्व साधनामध्ये अतिशय सोपे असे साधन नामसंकीर्तनाचे मानले जाते. रानावनात जाणे, तपश्चर्या करणे, यज्ञयागादी क्रिया करणे या गोष्टींना नामापुढे किंमत नाही. आपल्या स्थानावर बसूनच त्याची एकनिष्ठतेने आठवण करावी 'नलगे सायास जावें वनान्तरा । सुखें येतो घरा नारायण' अशी त्याची ख्याती आहे घरदार सोडण्याची जरूरी नाही. 'आतां गृहादिक आघवें । तें काहीं नलगे त्यजावें' म्हणून ज्ञानेश्वरांनी या मार्गाची सुलभता स्पष्ट केली आहे एका महत्त्वाच्या अभंगात ज्ञानदेवांनी म्हटले आहे 'कां सांडिसी गृहाश्रम । कां सांडिसी क्रियाकर्म । कासया सांडिसी कुळींचे धर्म । आहे तें वर्म वेगळेंचि' हे वेगळे वर्म म्हणजे परमेश्वराच्या नामस्मरणाचा मार्ग होय या अभंगातील दुसरा एक विचार म्हणजे परमेश्वर हा एकनिष्ठ भावामुळे संतोषतो. त्याला कर्मकांडाचा डामडौल नको, श्रीमंतीचे ऐश्वर्य नको, यज्ञयागादी व तपादी क्रियांचे अवडंबर नको. निःसीम भावाच्या उल्हासाने ईश्वरास एखादे पान, एखादे फूल अथवा पाण्याचा एखादा थेंब जरी अर्पण केला तरी तो संतुष्ट होतो भक्तिभावाने अर्पण केलेली शबरीची बोरे त्याला प्रिय वाटतात, द्रौपदीने दिलेले भाजीचे पान त्याला तृप्त करते, सुदाम्याच्या पोह्यांनी तो संतुष्ट होतो. कारण 'दं भक्ति एकी मी जाणें । तेथ सानें थोर न म्हणें । आम्ही भावाचे पाहुणे । भलतेया' अशी त्याची एकमेव इच्छा असते. यासाठीच तो अशा नामधारकास स्वतःजवळ करीत असतो

१ गेला, २ होय.

१५३६ ज्ञानियाचे घरीं चोजविता देव । तेथें अहंभाव पाठी लागे ॥ १ ॥
म्हणोनिया ऐसे सांडिले उपाय । धरियेले पाय दृढ तुझे ॥ २ ॥
वेदपरायण पंडित वाचक । न मिळती एक एकामधीं[1] ॥ ३ ॥
पाहों गेलो भाव कैसी आत्मनिष्ठा । तेथें देखें चेष्टा विपरीत ॥ ४ ॥
आपुलिया नाहीं निवाले जे अंगें । योगी करती रागें गुरगुरु ॥ ५ ॥
तुका म्हणे मज कोणाचा पांगिला । नको बा विठ्ठला करूं आतां ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – चोजविता–शोध घेता, सांडिले–सोडले, पांगिला–स्वाधीन, अंकित

अर्थ – जे ज्ञानी पुरुष आहेत त्यांच्या घरी देवाचा शोध केला तर तेथे देवाऐवजी ज्ञानाचा अभिमानच पाठीमागे लागलेला दिसला १ देवा, म्हणून मी इतर सर्व उपाय सोडून तुझे पाय दृढतेने धरले आहेत २ वेदात पारंगत असलेले पंडित, वाचक यांची मते एकमेकांना कधीच मिळत नाहीत ३ जे आत्मनिष्ठ आहेत त्यांच्या भावाबद्दल मी चौकशी केली तेव्हां त्यांचा व्यवहार विपरीतच वाटला मला ४ योगी पुरुष आत्मसाधनेने शांत झालेले दिसावेत, पण तेही एकमेकांवर रागाने गुरगुरणारे दिसतात ५ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, मला अशापैकी कुणाच्याही स्वाधीन करू नकोस ६

१५३७ पंढरीची वाट पाहे निरंतर । निडळावरी कर ठेवूनिया ॥ १ ॥
जातिया निरोप पाठवीं माहेरा । कां मज सासुरा सांडियेलें ॥ २ ॥
पैल कोण दिसे गरुडाचे वारिकें । विठ्ठलासारिके चतुर्भुज ॥ ३ ॥
तुका म्हणे धीर नाहीं माझ्या जीवा । भेटसी केधवां पांडुरंगा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – निरंतर–सर्दैव, निडळावरी–कपाळावर, सांडियेलें–सोडले, वारिकें–वाहन

अर्थ – कपाळावर हात ठेवून मी एकसारखी पंढरपूरची वाट पाहात आहे १ जे कुणी पंढरपूर या माझ्या माहेरास जातात, त्यांच्याकडे मला या सासरी असे एकाकी का सोडले असा निरोप मी पाठविला आहे २ पलीकडच्या बाजूस गरुडाच्या वाहनावर विठ्ठलासारखे बसलेले कोण बरे दिसत आहे ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, पांडुरंगा, तू मला कधी भेटशील रे ? आता माझ्या मनास धीर नाही ४

विवरण – तुकारामबुवांच्या अधीर मनाचे दर्शन या अभंगात तीव्रतेने झालेले दिसते पंढरपूर हे त्यांचे माहेर होते मायबाप पांडुरंगाने फार दिवसात भेट दिली नाही, स्वतःस निरोप पाठवून पंढरपुराच्या माहेरास नेले नाही म्हणून तुकोबा तळमळून वारकऱ्यांबरोबर निरोप पाठवितात, आणि विठ्ठलाचा परत निरोप किंवा तो स्वतः येईल या आशेने कपाळावर हात ठेवून मनोभावे त्याची वाट पाहातात एवढ्यात कुणी आले की काय अशी शंका त्यांच्या मनास येते गरुडाचे वाहन दिसे विष्णूचे चतुर्भुज रूप दिसू लागते तुकोबांच्या मनाची उलघाल अशा वळी कशी होत असे याचे मोठे हृद्य चित्रण या अभंगात आहे.

१५३८ ऐसी जोडी करा राम[2] कंठीं धरा । जेणें चुके फेरा गर्भवास ॥ १ ॥
नासिवंत आटी प्रियापुत्रधन । बीज ज्याचा सीण तेंचि फळ ॥ २ ॥
नाव धड करा सहस्रा नामाची । जे भवसिंधूची थडी पावे ॥ ३ ॥
तुका म्हणे काळा हाणा तोंडावरी । माता मरा हरिरामवाणीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – नासिवंत–नाश पावणारे, आटी–प्रयत्न, खटपट, थडी–पैलतीर

[1] एकामतीं [2] नाम

अर्थ – रामनामाच्या लाभाची अशी प्राप्ती करुन घ्यावी ते निरंतर कंठात राहील व त्यामुळे गर्भवासाचे फेरे चुकतील १ स्त्री, पुत्र, धनवैभव यांच्या रक्षणाचा प्रयत्न शेवटी नाशवंतच आहे ज्याचे बीज दु:खाचे त्यास फळेही कष्टदायकच येणार २ तेव्हा तुम्ही विष्णुसहस्रनामाची एक चांगली नाव तयार करा, हिच्याच साहाय्याने भवसिंधूचा पैलतीर तुम्ही गाठाल ३ तुकाराम महाराज म्हणतात, तुमच्या हृदयाचा भाता हरिनामाच्या बाणाने भरा व काळाच्या तोंडावर त्याचा भरपूर मारा करा ४

विवरण – येथे रामनामाची महती सांगताना तुकाराम महाराजांनी विष्णुसहस्रनामाचा उल्लेख करून रामनामाची सांगड श्रीविष्णूशी, पर्यायाने श्रीविठ्ठलाशी घालून दिलेली आहे श्रीविष्णूचे राम, कृष्ण, विठ्ठल हे अवतार असल्यामुळे विष्णुसहस्रनामाची आठवण तुकोबांना होणे स्वाभाविक आहे भागवतधर्मीयांना हे विष्णुसहस्रनाम पूर्वीपासूनच प्रिय वाटे आणि त्याचा पाठही वारंवार होत असता हे विष्णुसहस्रनाम महाभारताच्या अनुशासन पर्वात एकोणचाळीसावा अध्याय म्हणून आले असून नामस्मरणाचे एक सर्वोत्तम साधन म्हणून याचा उल्लेख अनेकांनी केलेला आहे 'नामाचे या सहस्रावरी। नावा इया अवधारी। सजूनिया ससारीं तारू जाहलों' असा या सहस्रनामाचा उल्लेख ज्ञानेश्वरांनी स्पष्टपणे केला आहे 'सहस्रनामाचे वाटगें। खांदीं घेतलें नेटगें।' अशी नामदेवांनी याची स्तुती केली आहे तुकोबांना या विष्णुसहस्रनामाचा चांगलाच परिचय असावा असे त्यांच्या इतर अभंगावरूनही वाटते 'सावळें रूप त्यावें डोळा। साचो अठरांचा गोळा। पदर लागो नेदी खळा। नाममंत्रमाळा विष्णुसहस्र' 'सहस्रनामाची आरोळी। एक एकाहूनि बळी रे,' 'सहस्रनामाचे रूपडें। भक्तकैवारी चोखडें,' 'भांडवल माझें मिरविसी जनीं। सहस्रवोघणी नाममाळा,' 'एक नामा नाहीं ताळ। केली सहस्राची माळ', 'कळस वाहियेला शिरीं। सहस्रनाम पूजा करी।' अशा प्रकारचे उल्लेख त्यांनी विष्णुसहस्रनामाचे मोठ्या गौरवाने केले आहेत

या विष्णुसहस्रनामाचा परिणाम तुकोबांच्या मनावर झालेला पाहाण्याचे आणखी एक साधन म्हणजे या सहस्रनामामधील अनेक नामे तुकोबांच्या अभंगातून वापरलेली दिसतात केशव, पुरुषोत्तम, गोविंद, माधव, अच्युत देवकीनंदन, वासुदेव, गरुडध्वज, नारायण, दामोदर, मुकुंद, हरी, भक्तवत्सल, पापनाशन इत्यादी नावे तुकाराम-बुवांच्या अभंगातून अनेकदा आलेली दिसतील भागवत संप्रदायात विष्णूला म्हणजेच विठ्ठलाला असलेले महत्त्व अनन्यसाधारण असल्याने वारकरी संतांना विष्णुसहस्रनाम प्रिय वाटावे यात नवल नाही नित्य पाठात असणाऱ्या या सुंदर व अर्थपूर्ण स्तोत्राने भक्तजनांच्या मनावर चांगलाच परिणाम केलेला दिसेल

१५३९ पाहें मजकडे भरोनिया दृष्टी। बहुत हिंपुटी जालों माते ॥ १ ॥
करावेसे वाटे जीवा स्तनपान। नव्हे हे वचन शृंगारिक ॥ २ ॥
सत्यासाटीं माझी शब्दविवंचना। जोडिल्या वचनाचे तें नव्हे ॥ ३ ॥
*तुका म्हणे माझी कळवळ्याची कींव। मागलासे जीव कर्तव्यानें ॥ ४ ॥*

शब्दार्थ व टीपा – हिंपुटी–कष्टी, उदास शृंगारिक–वरवरच्या भूषणाचे

अर्थ – माते, विठाबाई, माझ्याकडे कृपेने भरलेल्या दृष्टीने पाहा ना मी फारच कष्टी झालो आहे १ माझ्या जीवास माते तुझे स्तनपान करावेसे वाटते हे माझे बोलणे केवळ वरवरच्या भूषणाचे नसून अंतरंगाचे आहे २ माझ्या शब्दांतील विचार हे सत्याच्या प्राप्तीसाठीच आहेत इतर कवींप्रमाणे केवळ शब्दाला शब्द जोडून मी काव्य करीत नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी मोठ्या कळवळ्याने तुला हाक मारीत आहे माझी कींव तुला यावी माझा जीव या प्रकाराने फार शिणून गेला आहे ४

*विवरण – या व यासारख्या इतर अनेक अभंगातून तुकाराम महाराज विठ्ठलास आई समजून हाक मारताना* दिसतात श्रीविठ्ठल हा पिता, बंधु, सखा, मित्र तर आहेच, पण अधिक सलगी निर्भयपणे करता येईल असे नाते बाळ आणि माता यांचे असल्याने मानुभवतीच्या अनुभवाग संतांच्या साहित्यातून महत्त्वाचे स्थान मिळालेले आहे

उसळून वर येते ' अधिक कोंडितां चरफडी । मलतीकडे पाली उडी ' अशा विपरीत अनुभवात ते गुरफटून गेलेले होते या अवस्थेतून तुकारामबुवा हळुहळू बाहेर पडत होते नामस्मरण, कीर्तन, एकादशीव्रत, सत्संगवास, वैराग्य इत्यादी उपायानी ते आपल्या मनास नित्य अंकुश टोचत होते पुऊन पुन्हा मन स्वच्छ, निर्मळ ठेवण्याचा प्रयत्न करीत होते म्हणूनच ' नित्य नवा दीस जागृतीचा ' असा अनुभव त्याना येत राहिला

अवखळ व चंचल अशा या मनाच्या स्वरूपामुळे भक्ती ही वाटते तितकी सोपी नाही, असे तुकोबानी स्पष्ट केले आहे फार सोपी असलेली वस्तू आपणास महत्त्वाची वाटतच नाही यामुळे या सोप्या वस्तूचा भावार्थ समजावून सागणे अगत्याचे होऊन बसते भक्तिसाधनेतील नामस्मरणादी मार्ग सोपे तर खरेच, पण मन व त्याच्या वृत्ती याचा निग्रह करणे, त्याना भगवंताच्या चरणी समर्पित करणे, हे फार अवघड असल्यामुळेच तुकाराम महाराजानी भक्तीस ' सुळावरची पोळी ' म्हटल आहे. या मार्गाने जो यशस्वी होईल तोच खरा शूर वीर असे त्याना वाटते याचप्रमाणे जनाबाईच्या एका अभगातही तिने भक्तीची कठिणता नाना दृष्टान्त देऊन वर्णन करताना म्हटले आहे, ' भक्ति ते इगळाची खाई । रिघण्या त्या होत कठिण असे ॥ भक्ति ते कठीण विषप्राश घेणे । उदास पैं होणें जीवें भावें ॥ भक्ति तें कठीण भक्ति कठीण । खड्गाची धार बाण न सोसी तया । भक्ति ते कठिण विचारुनि पाहे जनी । भक्ति-योगें संतसमागमीं सर्व सिद्धी ' या महत्त्वाच्या अभगात जनाबाईने भक्तीचे कठिणपण वर्णन केले आहेच, पण ते काठिण्य दूर कसे होईल तेही सुचविले आहे

१५४२ पापी म्हणों तरी आठवितो पाय । दोष बळी काय तयाहूनी ॥ १ ॥
ऐशा विचाराचे[1] घालूनि कोंडणी । काय चक्रपाणी निजलेती[2] ॥ २ ॥
एकवेळ जेणे पुत्राच्या उद्देशें । घेतल्याचे कैसें नेलें दु ख ॥ ३ ॥
तुका म्हणे अहो वैकुंठनायका । चिंता का सेवका तुमचिया ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – बळी–बलवान, कोंडणी–कोंडल्याची अवस्था

अर्थ –देवा, मी पातकी आहे असे समजावे तर मला तुमचे पाय आठवतात, पण त्यामुळे माझ्या पापाचा मात्र नाश होत नाही तेव्हा तुमच्या पायापेक्षा माझे पाप बलवान समजावे की काय ? १ या विचाराने माझ्या मनाची अवस्था कोंडल्यासारखी होत आहे, चक्रपाणी, तुम्ही अशा प्रसंगी झोपलात की काय ? २ एकदा अजामिळाने आपल्या नारायण नावाच्या पुत्राच्या निमित्ताने अंतकाळी देवा, तुमचे नाव घेतले, पण त्यामुळे तुम्ही त्याचे सर्व दु ख निवारण केले ३ तुकाराम महाराज म्हणतात, अहो वैकुंठनायका, मी तुमचा सेवक असूनही मला चिंता असली तर बरे दिसते का ? ४

१५४३ उगविल्या गुंती । ऐशा मागें नेणो किती ॥ १ ॥
ख्याती केली अजामेळें । होतें निघाले दिवाळें ॥ २ ॥
मोकलिला प्रायश्चित्तीं । कोणी न धरिती हातीं ॥ ३ ॥
तुका म्हणे मुक्त वाट । वैकुंठीची घडघडाट ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – गुंती–गुंते, प्रश्न, अडचणी, मोकलिला–सोडून दिला

अर्थ – पुढे दिल्याप्रमाणे देवा, तुम्ही किती तरी गुंते आतापर्यंत सोडविले आहेत, त्याची गणनाही करता येणार नाही १ अजामिळाच्या पुण्याईचे दिवाळे निघाले होते, म्हणजे त्याने पुण्याचे संपादन अगदीच केले नव्हते, त्याने एका नामाच्या जोरावर मुक्ती मिळवून मोठाच पराक्रम केला मोठेच नाव मिळविले २ खरे म्हणजे सर्व प्रायश्चित्तांनी त्याला टाकून दिले होते, सोडले होते, त्याचा स्वीकार कुणीच करत नव्हते ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा प्रकाराने नामाच्या साहाय्याने वैकुंठाची वाट मोकळी व सर्वांना सुलभ अशी होते ४

विवरण - वरील दोनही अभंगातून ज्याचा उल्लेख आला आहे, त्या अजामिळाची कथा भागवतात आली आहे अनेक संतानी या अजामिळाचा संदर्भ दिलेला आहे कान्यकुब्ज देशातील हा एक ब्राह्मण सदाचारी होता पण पुढे एका वेश्येच्या नादी लागून याने आपल्या पत्नीचा व मुलांचाही त्याग केला. वाटसरू लोकांना लुटणे, द्यूत खेळणे, दुसऱ्यांना फसविणे, चोऱ्या करणे, अशा पापकर्मांनी तो धनार्जन करी वेश्येपासून त्याला बहा मुले झाली त्यातील धाकटा नारायण हा त्याचा फार आवडता मुलगा होता पुढे मरणाच्या वेळी याने आपल्या पुत्रास, नारायणास हाक मारली अंतकाळी 'नारायणा' चे स्मरण अजामिळास झाले, म्हणून यमदूताच्या हातून ईश्वराने याला सोडविले यमदूत व विष्णुदूत यांच्यातील संवाद ऐकून त्याने भागवतधर्माचे महत्त्व समजावून घेतले त्याला कृतकर्मांचा पश्चाताप झाला व तो शेवटी श्रीहरीचा एकनिष्ठ भक्त बनला आणि हा विरक्त होऊन हरिद्वारला गेला व तेथेच त्याने गंगेस देह समर्पण केला

१५४४ सरळीं हीं नामें उच्चारावीं सदा । हरि बा गोविंदा रामकृष्णा ॥ १ ॥
पुण्य पर्वकाळ तीर्थें ही सकळ । कथा सिंधुजळ न्हाऊ येती ॥ २ ॥
अवघेचि लाभ बैसलिया घरा । येती भाव धरा एके ठायीं ॥ ३ ॥
सेळ्या मेंढ्या गाई सेवा घेती ह्मैसी । कामधेनु तैसी नव्हे एक ॥ ४ ॥
तुका म्हणे सुखें पाविजे अनंता । हें वर्म जाणता सुलभचि ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा - सरळीं–सरळ, स्वच्छ, सोपी.

अर्थ - लोकहो, हरी, गोविंद, रामकृष्ण, या सोप्या व सरळ नामाचा उच्चार नेहमी करावा १ या हरिनामाच्या सागरात स्नान करण्यासाठी सर्व पुण्य काळ, सर्व तीर्थे येत असतात २ या एका देवाच्या ठिकाणी दृढभाव धारण केल्यास सर्व प्रकारचे लाभ घरच्या घरी होत असतात ३ शेळ्या, मेंढ्या, गाई, यांच्याप्रमाणे कामधेनूची सेवा करण्याची जरूरी नसते, ती आपोआपच इच्छा तृप्त करणारी असते तशाच प्रकारे नामाचे माहात्म्य आहे ४ तुकाराम महाराज म्हणतात, देवाच्या नामाचे महत्त्व व रहस्य जाणणे सोपे आहे हे जाणल्याने त्या अनंताची प्राप्ती सहजासहजी होते ५

१५४५ पवित्र तो देह वाणी पुण्यवंत । जो वदे अच्युत सर्व काळ ॥ १ ॥
तयाच्या चिंतनें तरतील दोषी । जळतील रासी पातकांच्या ॥ २ ॥
देव इच्छी रज चरणींची माती । धावत चालती मागें मागें ॥ ३ ॥
काय त्या उरलें वेगळें आणीक । वैकुंठनायक जया कंठीं ॥ ४ ॥
तुका म्हणे देवभक्तांचा संगम । तेथें ओघ नाम त्रिवेणीचा ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा —रासी–राशी, ढीग, रज–धूळ, धुळीचे कण

अर्थ —जो नेहमी अच्युताच्या नामाचा घोष करीत असतो, त्याचा देह पवित्र समजावा, त्याची वाणी पुण्यवान मानावी १ अशा भक्ताच्या चिंतनाने अनेक दोषी लोकांचा उद्धार होईल त्यांच्या पापांच्या ढिगांचा जळून नाश होईल २ अशा वैष्णवांच्या पायांवरील धूलिकणांसाठी देवसुद्धा इच्छा करतात, यांच्या पायांची माती कपाळाला लावतात त्यासाठी ते यांच्या मागोमाग धावतही जातात ३ ज्याच्या कंठात वैकुंठनायकाची वस्ती झालेली आहे त्यास आणखी काय उरले आहे ? ४ तुकाराम महाराज म्हणतात, जेथे देव व भक्त यांचा संगम झाला आहे, तेथे नामस्मरणाचा तिसरा ओघ असतोच, व अशा प्रकारे गंगायमुनासरस्वती या त्रिवेणीसंगमाचे महत्त्व येथेही आले असते ५

विवरण– वरीलप्रमाणेच याही अभंगात ईश्वरास आई समजून तुकाराम महाराजांनी करुण वाणीने आळविले आहे ईश्वर कृपेचा सागर आहे असे साधुसंत म्हणतात, तर मग आपला उद्धार होण्यास एवढा उशीर का? अशी शंका त्यांच्या मनात आली आहे या विठ्ठलमाऊलीने आपणास प्रेमरसाचा पान्हा पाजावा म्हणून मुक्तकंठाने व आर्त स्वराने विठ्ठलमातेची तुकोबा नाना प्रकारांनी आळवणी करतात कारण या पांडुरंगाखेरीज त्यांच्या मनाला तृप्ती नाही

१५४१ भक्ति तों कठिण शुळावरील पोळी । निवडे तो बळी विरळा शूर ॥ १ ॥
जेथें पाहें तेथें देखीचा पर्वत । पायाविण भिंत[1] तातडीची ॥ २ ॥
कामावलें तरी पाका[2] ओज घडे । रुचि आणि जोडे श्लाघ्यता हे ॥ ३ ॥
तुका म्हणे मना पाहिजे अंकुश । नित्य नवा दिस जागृतीचा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – देखीच्या–वरवरचा, कामावलें–कमावले, लक्ष देऊन तयार केले, पाका–स्वयंपाकास, ओज–तेज, चव, श्लाघ्यता–श्रेष्ठत्व

अर्थ – सुळावर चढलेल्या माणसास दिलेल्या पोळीप्रमाणे ईश्वराची भक्ती अतिशय कठिण आहे तिचा स्वीकार करणारा एखादाच बलवान व शूर निपजतो १ चांगला, खोल पाया जर नसेल तर त्यावरची तातडीने बांधलेली भिंत जशी पोकळ असते तशीच ही भक्ती वरवरची, दुरून दिसणाऱ्या पर्वतासारखी असते २ सामग्री नीट जमवून चांगले लक्ष देऊन जर स्वयंपाक केला तरच पदार्थांना चांगली चव येते, रुची येते, आणि करणारास श्रेष्ठत्व प्राप्त होते ३ तुकाराम महाराज म्हणतात आपल्या मनास हत्तीला ताळ्यावर आणण्यास वापरतात तसा अंकुश नेहमी हवा भक्ती करणाऱ्याने हा अंकुश मनास लावावा म्हणजे नवी जागृती निश्चयाने येईल ४

विवरण – ईश्वरप्राप्तीचे ज्ञानमार्ग, कर्ममार्ग, भक्तिमार्ग असे तीन मार्ग असून त्यातील भक्तिमार्ग हा अतिशय सोपा म्हणून सांगितला असताना तुकाराम महाराज या अभंगात भक्ती ही सुळावरील पोळीप्रमाणे कठिण आहे असे म्हणतात यातील मर्म समजावून घ्यावयास हवे गीताभागवतातील एकूण शिकवण अशी की भक्तिमार्ग अतिशय सुलभ, विनाकष्टाचा 'क्लेशोऽधिकतरस्तेषां अव्यक्तासक्तचेतसाम । अव्यक्ता हि गतिर्दुःखं देहवद्भिरवाप्यते' अव्यक्ताच्या ठिकाणी मनाची एकाग्रता होण्यास फार कष्ट असून देहेंद्रियधारी माणसास अव्यक्ताची ही प्राप्ती कष्टमयच आहे, असे गीतेचे सांगणे आहे अव्यक्ताची, निराकारनिर्गुणाची उपासना सर्वसामान्य लोकांनाच नव्हे तर अर्जुनासारख्या एकनिष्ठ श्रीकृष्णशिष्यासही कठिण वाटली श्रीकृष्णाचे विश्वरूपदर्शन त्याला झाल्यावरोबर तो चकित झाला, त्याने त्याला भयमिश्रित भावनेने वंदन केले, पण शेवटी तो म्हणाला, 'तदेव मे दर्शय देव रूप प्रसीद देवेश जगन्निवास,' जगन्निवासा देवा प्रसन्न व्हा आणि मला ते आपले पूर्वीचेच रूप दाखवा अशी त्याची मागणी होती हे पूर्वीचे रूप कोणते होते ? तर 'किरीटिनं गदिनं चक्रहस्तमिच्छामि त्वां द्रष्टुमहं तथैव । तेनैव रूपेण चतुर्भुजेन सहस्रबाहो भव विश्वमूर्ते' किरीट व गदा धारण करणारे, हातात चक्र घेतलेले, पूर्वीप्रमाणेच मी तुम्हांला पाहू इच्छितो सहस्रबाहो विश्वमूर्ते त्याच चतुर्भुजरूपाने तुम्ही प्रकट व्हा ईश्वराचे हे सगुणरूप म्हणजे भक्तीचे एकमेव अधिष्ठान

या सगुणरूपाची उपासना अतिशय सोपी असा प्रचार सर्व संतपुरुषांचा आहे 'भक्तिपंथ बहु सोपा' असेच तुकाराम महाराजांनी इतरत्र म्हटले आहे 'तुका म्हणे सुगम वाट । वैकुंठीची घडघडाट' असे म्हणून या सुगम वाटेची त्यांनी स्तुति केली आहे या भक्तीमार्गाने गेल्यास 'कुडासाठी ओढे हरी' असे त्यांनी वारंवार म्हटले आहे 'तरी तुम्ह व्हावा देव । तरी हा सुलभ उपाय' म्हणून भक्तीचा गौरव मुखानी अनेकदा केला आहे या सुलभ व विनाशोक भक्तीच्या मार्गात कुणीही यावे व आपला उद्धार करवून घ्यावा नामस्मरण, संकीर्तन, भजन, सत्समागम

१ भींत, २ शिजा

इत्यादी साधनांनी भक्तिमार्ग लहानथोरांना नव्हे तर पापी व चांडाळांनाही सुलभ झाला आहे 'या रे या रे लहान-थोर । याती भलते नारी नर । करावा विचार । न लगे चिंता कोणासी' अशी त्याची ग्वाही आहे या भक्तिमार्गात तीर्थयात्राची, यज्ञयागाची, शरीरकष्टाची, व्रततपाची जरूरीच नाही घरदार सोडून रानावनात जायला नको. 'न लगे हालावें चालावें बाहेरी । अवघेंचि घरीं बैसलिया' घरच्या घरी बसून आपल्याच स्थानावर राहून ईश्वरास भक्तीच्या मार्गाने जवळ करता येते, असा या मार्गाचा लौकिक आहे 'मुखीं नाम हातीं मोक्ष' अशी याची प्रतिज्ञा आहे

असा रीतीने सोपा, सुलभ, विनाकष्टाचा भक्तिमार्ग असून तुकारामबुवा या अभंगात भक्तीला सुळावरची पोळी म्हणतात. 'देखीचा पर्वत,' 'पायाविण भिंत' याबद्दल जसा सावधगिरीने विचार व्हावा, तसाच तो भक्तीच्या स्वरूपाविषयीही व्हावा असे तर त्यांना म्हणावयाचे नाही? फार सुलभ, फारच सुलभ भक्तिमार्ग याचा विपरीत अर्थ लोकांनी घेऊ नये, अशी सावधगिरीची सूचना त्यांना द्यावयाची आहे भक्तीमध्ये आपले मन सर्व वासनाविकारांसहित भगवंताला अर्पण करावयाचे असते, फळाशा सोडावी लागते कर्मे मी करणारा असा अभिमान सोडावा लागतो, आपले सर्व चलनवलन त्याच्या सत्तेने होत असते, असा विश्वास दृढ व्हावा लागतो भक्तिमार्गात एक क्षण जरी परमेश्वराकडे लावला तरी तो सर्व संकल्पविकल्प, इच्छाआशा, विविध वृत्ती यांच्या सहित समर्पित व्हावा लागतो असा प्रकारे एकाग्र मन करून ते सर्व वृत्तींच्या बरोबर ईश्वराकडे वळविणे किती अवघड आहे, हे ज्याचे त्यासच समजण्यासारखे आहे म्हणूनच बाराव्या अध्यायात गीतेच्या आधाराने श्रीज्ञानेश्वरांनी हे शक्य नसल तर ते असे एकामागून एक पर्याय सांगितले आहेत मलाच सर्व कर्मे अर्पण कर, आपले मन माझ्या ठिकाणी अर्पण कर आपली बुद्धी मजकडेच केंद्रित कर, किंवा हे शक्य नसेल तर अभ्यास वाढवून माझी प्राप्ती करून घे, अभ्यासालाही असमर्थ असशील तर जी कर्मे करशील ती मजसाठीच आहेत असे समज, आणि हेही अशक्य झाले तर कर्मफळाचा तू त्याग करावास, अशी उपाययोजना भगवंत एकसारखी सांगतात, याचाच अर्थ असा की, मन ताब्यात येणे, ते सर्व वृत्तींसहित भगवंताकडे वळविणे. कर्मफळाचा त्याग करणे या गोष्टी वाटतात तेवढ्या सोप्या नाहीत कारण माग-

उसळून वर येते ' अधिक कोंडिता चरफडी। भलतीकडे घाली उडी ' अशा विपरीत अनुभवात ते गुरफटून गेलेले होते या अवस्थेतून तुकारामबुवा हळूहळू बाहेर पडत होते नामस्मरण, कीर्तन, एकादशीव्रत, सतसहवास, वैराग्य इत्यादी उपायांनी ते आपल्या मनास नित्य अंकुश टावत होते पुसून पुसून मन स्वच्छ, निर्मळ ठेवण्याचा प्रयत्न करीत होते म्हणूनच ' नित्य नवा दीस जागृतीचा ' असा अनुभव त्यांना येत राहिला

अवखळ व चचल अशा या मनाच्या स्वरूपामुळे भक्ती ही वाटते तितकी सोपी नाही, असे तुकोबांनी स्पष्ट केले आहे फार सोपी असलेली वस्तू आपणास महत्त्वाची वाटतच नाही यामुळे या सोप्या वस्तूचा भावार्थ समजावून सागणे अगत्याचे होऊन बसते भक्तिसाधनेतील नामस्मरणादी मार्ग सोपे तर खरेच, पण मन व त्याच्या वृत्ती याचा निग्रह करणे, त्याना भगवताच्या चरणी समर्पित करणे, हे फार अवघड असल्यामुळेच तुकाराम महाराजांनी भक्तीस ' सुळावरची पोळी ' म्हटले आहे या मार्गाने जो यशस्वी होईल तोच खरा शूर वीर असे त्यांना वाटते याचप्रमाणे जनाबाईच्या एका अभगानही तिने भक्तीची कठिणता नाना दृष्टान्त देऊन वर्णन करताना म्हटले आहे, ' भक्ति ते इंगळाची खाई। रिघण्या त्या होत कठिण असे ॥ भक्ति ते कठीण विषप्राश घेणे। उदास पै होणे जीवें भावें॥ भक्ति तें कठीण भक्ति कठीण। खड्गाची धार बाण न सोसी तथा। भक्ति ते कठिण विचारूनि पाह जनी। भक्तियोगे सतसमागमी सर्व सिद्धी ' या महत्त्वाच्या अभगात जनाबाईने भक्तीचे कठिणपण वर्णन केले आहेच, पण त काठिण्य दूर कसे होईल तेही सुचविले आहे

१५४२ पापी म्हणों तरी आठवितो पाय। दोष बळी काय तयाहूनी ॥ १ ॥
ऐशा विचाराचे[1] घालूनि कोंडणी। काय चक्रपाणी निजलेती[2] ॥ २ ॥
एकवेळ जेणे पुत्राच्या उद्देशे। घेतल्याचे कैसे नेले दुःख ॥ ३ ॥
तुका म्हणे अहो वैकुंठनायका। चिंता का सेवका तुमचिया ॥ ४ ॥

*शब्दार्थ व टीपा – बळी–बलवान, कोंडणी–कोंडल्याची अवस्था*

अर्थ –देवा, मी पातकी आहे असे समजावे तर मला तुमचे पाय आठवतात, पण त्यामुळे माझ्या पापाचा मात्र नाश होत नाही तेव्हा तुमच्या पायापेक्षा माझे पाप बलवान समजावे की काय ? १ या विचाराने माझ्या मनाची अवस्था कोंडल्यासारखी होत आहे, चक्रपाणी, तुम्ही अशा प्रसगी झोपलात की काय ? २ एकदा अजामिळाने आपल्या नारायण नावाच्या पुत्राच्या निमित्ताने अतकाळी देवा, तुमचे नाव घेतले, पण त्यामुळे तुम्ही त्याचे सर्व दुःख निवारण केले ३ तुकाराम महाराज म्हणतात, अहो वैकुंठनायका, मी तुमचा सेवक असूनही मला चिंता असली तर बरे दिसते का ? ४

विवरण :- वरील दोनही अभंगातून ज्याचा उल्लेख आला आहे, त्या अजामिळाची कथा भागवतात आली आहे. अनेक संतानी या अजामिळाचा संदर्भ दिलेला आहे. कान्यकुब्ज देशातील हा एक ब्राह्मण सदाचारी होता. पण पुढे एका वेश्येच्या नादी लागून याने आपल्या पत्नीचा व मुलाचाही त्याग केला. वाटसरू लोकाना लुटणे, द्यूत खेळणे, दुसऱ्याना फसविणे, चोऱ्या करणे, अशा पापकर्मांनी तो धनार्जन करी. वेश्येपासून त्याला दहा मुले झाली. त्यातील धाकटा नारायण हा त्याचा फार आवडता मुलगा होता. पुढे मरणाच्या वेळी याने आपल्या पुत्रास, नारायणास हाक मारली. अंतकाळी 'नारायणा' चे स्मरण अजामिळास झाले; म्हणून यमदूताच्या हातून ईश्वराने याला सोडविले. यमदूत व विष्णुदूत यांच्यातील संवाद ऐकून त्याने भागवतधर्माचे महत्त्व समजावून घेतले. त्याला कृतकर्मांचा पश्चात्ताप झाला व तो शेवटी श्रीहरीचा एकनिष्ठ भक्त बनला. आणि हा विरक्त होऊन हरिद्वारला गेला व तेथेच त्याने गंगेस देह समर्पण केला

१५४४ सरळीं हीं नामें उच्चारावीं सदा । हरि बा गोविंदा रामकृष्णा ॥ १ ॥
पुण्य पर्वकाळ तीर्थें ही सकळ । कथा सिंधुजळ न्हाऊं येती ॥ २ ॥
अवघेचि लाभ बैसलिया घरा । येती भाव धरा एके ठायीं ॥ ३ ॥
सेळ्या मेंढ्या गाई सेवा घेती हांसी । कामधेनु तैसी नव्हे एक ॥ ४ ॥
तुका म्हणे सुखें पाविजे अनंता । हें वर्म जाणतां सुलभचि ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा - सरळीं-सरळ, स्वच्छ, सोपी.

अर्थः- लोकहो, हरी, गोविंद, रामकृष्ण, या सोप्या व सरळ नामाचा उच्चार नेहमी करावा १ या हरिनामाच्या सागरात स्नान करण्यासाठी सर्व पुण्य काळ, सर्व तीर्थें येत असतात. २ या एका देवाच्या ठिकाणी दृढभाव धारण केल्यास सर्व प्रकारचे लाभ घरच्या घरी होत असतात. ३ शेळ्या, मेंढ्या, गाई, यांच्याप्रमाणे कामधेनूची सेवा करण्याची जरूरी नसते, ती आपोआपच इच्छा तृप्त करणारी असते. तशाच प्रकारे नामाचे माहात्म्य आहे. ४ तुकाराम महाराज म्हणतात, देवाच्या नामाचे महत्त्व व रहस्य जाणणे सोपे आहे. हे जाणल्याने त्या अनंताची प्राप्ती सहजासहजी होते ५

१५४५ पवित्र तो देह वाणी पुण्यवंत । जो वदे अच्युत सर्व काळ ॥ १ ॥
तयाच्या चिंतनें तरतील दोषी । जळतील रासी पातकाच्या ॥ २ ॥
देव इच्छी रज चरणींची माती । धांवत चालती मागें मागें ॥ ३ ॥
काय त्यां उरलें वेगळें आणीक । वैकुंठनायक जयां कंठीं ॥ ४ ॥
तुका म्हणे देवभक्तांचा संगम । तेथें ओघ नाम त्रिवेणीचा ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपाः—रासी-राशी, ढीग, रज-धूळ, धुळीचे कण.

अर्थ –जो नेहमी अच्युताच्या नामाचा घोष करीत असतो, त्याचा देह पवित्र समजावा, त्याची वाणी पुण्यवान मानावी १ अशा भक्ताच्या चिंतनाने अनेक दोषी लोकांचा उद्धार होईल. त्याच्या पापांच्या ढिगांचा जळून नाश होईल २ अशा वैष्णवांच्या पायांवरील धूलिकणासाठी देवसुद्धा इच्छा करतात, यांच्या पायांची माती कपाळाला लावतात. त्यासाठी ते यांच्या मागोमाग धावतही जातात. ३ ज्याच्या कंठात वैकुंठनायकाची वस्ती झालेली आहे, त्यास आणखी काय उरले आहे ? ४ तुकाराम महाराज म्हणतात, जेथे देव व भक्त यांचा संगम झाला आहे, तेथे नामस्मरणाचा तिसरा ओघ असतोच; व अशा प्रकारे गंगायमुनासरस्वती या त्रिवेणीसंगमाचे महत्त्व येथेही आले असते ५

१५५१ सकळिकांचे समाधान । नव्हे देखिल्यावाचून ॥ १ ॥
रूप दाखवीं[1] रे आतां । सहस्रभुजांच्या मंडिता ॥ २ ॥
शंखचक्रपद्मगदा । गरुडासहित ये गोविंदा ॥ ३ ॥
तुका म्हणे कान्हा । भूक लागली नयनां ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा –सकळिकांचे–सर्व इंद्रियांचे, मंडिता–शोभिवंत

अर्थ –देवा, तुम्हा आता पाहिल्याशिवाय माझ्या सर्व इंद्रियांचे समाधान होणार नाही १ सहस्र हातांनी शोभिवंत असणाऱ्या देवा, तुमचे हे गौरवशाली रूप मला दाखवा २ पण ते दीर्घकाळ डोळ्यांत व हृदयात सामावणारे नसल्याने तुमचे आपले शंख, चक्र, गदा, पद्म यांनी युक्त असणारे व गरुडासहित असणारे रूप मला दाखवा याच रूपाने तुम्ही मजकडे यावे ३ तुकाराम महाराज म्हणतात, कान्होबा, तुझे हे सगुणसुंदर रूप पाहाण्याची माझ्या डोळ्यांना फार भूक लागली आहे रे ४

विवरण – या एका लहानशा अभंगात सहस्र हातांनी शोभायमान असणाऱ्या सर्वव्यापी परमेश्वराचा फार चांगला उल्लेख आहे भगवंत सर्व चराचर जगात भरून राहिला आहे, त्याला अनेक बाहू आहेत, अनेक पाय आहेत अनेक उदरे, अनेक तोंडे, अनेक डोळे असणाऱ्या या विराट परमेश्वरास ना आदी, ना मध्य, ना अंत याची प्रभा चोहोकडे फाकली यांचे तेज खरखरीत अग्निसूर्याप्रमाणे याला अनंत बाहू, चंद्रसूर्य हे याचे डोळे, पेटलेला अग्नी हे याचे तोंड अशा या विराट विश्वरूपाचा मोह कितीही झाला तरी तो मनावर दीर्घ काळ स्थिर राहू शकत नाही श्रीकृष्णाने अर्जुनास आपले विश्वरूप भरून राहिलेले रूप दाखविले, पण शेवटी अर्जुनानेच त्याला पुन मूळचे किरीट, गदा, शंख, चक्र, यांना धारण करणारे आपले रूप दाखवा अशी विनंती केली सहस्रबाहूचा हा परमेश्वर त्याच्या भक्ताला चतुर्भुज होऊन हवा होता सहस्रभुजांनी मंडित असणाऱ्या या परमेश्वरास तुकाराम महाराज विनंती करतात, ' शंखचक्रपद्मगदा । गरुडासहित ये गोविंदा ' या सगुण व सुंदर रूपाची भूक व तहान त्यांना लागली होती ' तैसे चतुर्भुज रूप तुझें । तो विसांवा आम्हां ' असे श्रीज्ञानेश्वरांनीही म्हटले आहे

१५५२ पतितपावना । दिनानाथा नारायणा ॥ १ ॥
तुझें रूप माझे मनीं । राहो नाम जपो वाणी ॥ २ ॥
ब्रह्मांडनायका । भक्तजनांच्या पाळका ॥ ३ ॥
जीवांचिया जीवा । तुका म्हणे देवदेवा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – पाळका–पालन करणाऱ्या देवा

अर्थ – नारायणा, तू पतितांचा उद्धार करणारा व दीनांचा सांभाळ करणारा आहेस म्हणूनच तुला पतितपावन व दीनानाथ अशी नावे आहेत १ तुमचे रूप माझ्या मनात नित्य स्थिर व्हावे आणि माझ्या वाणीने नेहमी तुमच्याच नामाचा जप व्हावा २ देवा, तू सर्व ब्रह्मांडाचा धनी आहेस तू भक्तांचे पालन करणारा आहेस ३ तुकाराम महाराज म्हणतात देवा, तुम्ही सर्व जीवांचे जीव व देवांचे देव आहात ४

१५५३ करीं हेंचि काम । मना जपें राम राम ॥ १ ॥
लागो हाचि छंद । मना गोविंद गोविंद ॥ २ ॥
तुका म्हणे मना । मज भीक द्यावी दीना ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा –दीना–गरिबास

[1] दावीं रे अनंता

अर्थ :-मना, रामनामाचा अखंड जप करण्याचेच तू काम करावेस १ मना, तुला गोविंद, गोविंद हाच छंद एकसारखा लागू दे. २ तुकाराम महाराज म्हणतात, मना, मला परिबाला तू हीच भीक द्यावीस ३

१५५४ आपुलिया लाजा । धांवे भक्तांचिया काजा ॥ १ ॥
नाम धरिलें दिनानाथ । सत्य करावया व्रत ॥ २ ॥
आघात निवारी । छाया पीतांबरें करीं ॥ ३ ॥
उभा कर कटीं । तुका म्हणे याजसाठीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:-लाजा-लाज राखली जावी म्हणून, काजा-काम करण्यासाठी, आघात-संकट.

अर्थ:-हा देव आपल्या ब्रीदाची व नामाची लाज राखण्यासाठी भक्तांचे काम करण्यास धावून येतो. १ अनाथाचे रक्षण करणाऱ्या या देवाने म्हणूनच दीनानाथ असे नाव धारण केले आहे. तो हे व्रत खरे करीत असतो. २ भक्तावरील कोणतेही संकट हाच निवारीत असतो, आणि त्यांच्यावर आपल्या पीतांबराची छाया करीत असतो. ३ तुकाराम महाराज म्हणतात, हा विठ्ठल याच कामासाठी कमरेवर हात ठेवून उभा राहिलेला आहे. ४

१५५५ साधावया भक्तिकाज । नाहीं लाज हा धरीत ॥ १ ॥
ऐसियासी शरण जावें । शक्ती जीवें न वंची ॥ २ ॥
भीष्मपण केला खरा । धनुर्धरा रक्षीलें ॥ ३ ॥
तुका म्हणे साक्ष[1] हातीं । तो म्यां चित्तीं धरियेला ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:-भक्तिकाज-भक्ती करणाऱ्याचे काम, न वंची-फसवत नाही, धनुर्धरा-अर्जुनास.

अर्थ :-आपल्या भक्ताचे काम साधण्यासाठी या श्रीहरीला कधी लाज वाटत नाही १ हा आपल्या जीवाने व शक्तीने कधी फसवीत नसल्यामुळे यासच आपण शरण जावे. २ यानेच भारती युद्धाच्या वेळी भीष्मांची प्रतिज्ञा खरी करून आपल्या भक्ताचे, अर्जुनाचेही रक्षण केले. ३ तुकाराम महाराज म्हणतात, याची साक्ष माझ्या जवळ असल्यानेच मी याला माझ्या चित्तात धारण केला आहे. ४

१५५६ धेनु चरे वनांतरीं । चित्त बाळकापें घरीं ॥ १ ॥
तैसें करीं वो माझे आई । ठाव देउनि राखें पायीं ॥ २ ॥
काढितां तळमळी । जिवनाबाहेर मासोळी ॥ ३ ॥
तुका म्हणे कुडी । जीवाप्राणांची आवडी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:-ठाव-आश्रय, जीवनाबाहेर-पाण्याबाहेर, मासोळी-मासा, कुडी-देह.

अर्थ:-गाय वनात चरत असते; पण तिचे चित्त घरी असलेल्या तिच्या वासरावर असते. १ त्याप्रमाणे विठाई माऊली, मला तुझ्याजवळ आश्रय देऊन मला तुझ्या पायीच राखावे. २ पाण्याबाहेर काढलेला मासा जसा तळमळतो, तशीच माझी अवस्था झालेली आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, देहाला जीवाची, प्राणाची मोठीच आवड असते. ४

१५५७ हरिजनाची कोणां न घडावी निंदा । साहात गोविंदा नाहीं त्याचें ॥ १ ॥
रुपा येऊनियां धरी अवतार । भक्तां अभयंकर खळां कष्ट ॥ २ ॥
दुर्वास हा छळों आला अंबऋषी । सुदर्शन त्यासी जाळित फिरे ॥ ३ ॥
द्रौपदीच्या क्षोमें कौरवांची शांति । होऊनि श्रीपति साह्य केलें ॥ ४ ॥

---

[1] साक्षी.

१५४६ पाप ताप दैन्य जाय उठाउठीं । जालिया भेटी हरिदासांची ॥ १ ॥
ऐसें बळ नाहीं आणिकांचे अंगीं । तपें तिर्थें जगीं दानें व्रतें ॥ २ ॥
चरणीचें रज वंदी शूळपाणी । नाचतो कीर्तनीं त्यांचे माथां ॥ ३ ॥
भव तरावया उत्तम हे नाव । भिजों नेदी पाव हात कांहीं ॥ ४ ॥
तुका म्हणे मन जालें समाधान । देखिले चरण वैष्णवांचे ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– उठाउठी–तावडतोब, त्वरित, शूळपाणी–शंकर, महादेव, भव–संसार, नाव–होडी, पाव–पाय.

अर्थ.–हरिदासांची भेट झाल्याबरोबर सर्व प्रकारचे पाप, ताप व दैन्य त्वरित नाहीसे होते. १ या जगात अनेक तपे, तीर्थे, दाने, व्रते यांची साधने असली तरी वैष्णवांच्या अंगी असणारे बळ इतराच्या ठिकाणी दिसून येणार नाही २ जे हरिकीर्तनात नाचतात त्यांच्या चरणांस वंदन करून, त्यांची पायधूळ प्रत्यक्ष महादेवही मस्तकावर धारण करतात ३ भवसागर तरून जाण्यास, संसारसमुद्र ओलांडण्यास ही वैष्णवरूपी नाव फारच चांगली असून हिच्या आश्रयामुळे कुणाचे हात, पाय, ओले होणार नाहीत. ४ तुकाराम महाराज म्हणतात, या वैष्णवांचे पाय पाहून माझ्या मनास फारच समाधान झाले आहे. ५

१५४७ येणें बोधें आह्मी असों सर्वकाळ । करूनि निर्मळ हरिकथा ॥ १ ॥
आम्ही भूमीवरी एक दइवांचे । निधान हें वाचे सांपडलें ॥ २ ॥
तरतील कुळें दोन्ही उभयतां । गातां आइकतां सुखरूप ॥ ३ ॥
न चळे हा मंत्र न ह्मणों यातीकुळ । न लगे काळ वेळ विचारावी ॥ ४ ॥
तुका म्हणे माझा विठ्ठल विसांवा । सांटवीन हांवा हृदयांत ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा.– दइवांचे–सुदैवी, भाग्यवंत, निधान–साठा, हावा—हौसेने.

अर्थ.–आम्ही निर्मळ अंतःकरणाने श्रीहरीची कथा करून त्याच बोधाने सर्वकाळ राहू. १ या भूमीवर आम्हीच एक सुदैवी आहोत, कारण आमच्या वाणीस श्रीहरीच्या नामाचा हा मोठाच साठा सापडला आहे २ ही हरिकथा जे कुणी गातात व ती जे कुणी ऐकतात अशा दोघांचीही दोनही कुळे (आईकडून व बापाकडून असलेली) उद्धरून जातील, ते सुखरूप होतील. ३ हा नाममंत्र कधीही न चळणारा आहे, अचल आहे, याच्या उच्चारास जाती काळ, वेळ याच्या विचाराची जरूरी नाही ४ तुकाराम महाराज म्हणतात, हा विठ्ठल म्हणजे माझा एक विसावाच आहे, मी मोठ्या हौसेने म्हणून त्यास हृदयात साठवीत आहे ५

१५४८ बहुतां जन्मींचें संचित । सबळ होय जरि बहुत । तरिचि होय हरिभक्त । कृपावंत मानसीं[1] ॥१॥
म्हणवी म्हणियारा तयांचा । दास आपुल्या दासांचा । अनुसरले वाचा । काया मनें विठ्ठलीं ॥२॥
तसे भूतदया मानसीं । अवघा देखे हृषीकेशी । जीवें न विसंबे त्यासी । मागें मागें हिंडतसे ॥ ३ ॥
तुका म्हणे निर्विकार । शरणागतां वज्रपंजर । जे जे अनुसरले नर । तयां जन्म चुकलें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– संचित–साठलेले पुण्यकर्म, वज्रपंजर–वज्राचा पिंजरा.

अर्थ.– पुष्कळ जन्मांचे साठलेले पुण्यकर्म जर फार बलवान झाले तरच मनात कृपेची भावना निर्माण होते व तो मनुष्य हरिभक्त बनतो. १ ज्यांनी विठ्ठलाच्या ठिकाणी आपला देह, आपली वाचा, आपले मन इत्यादी सर्वस्व अर्पण केले व त्याचेच केवळ अनुकरण केले आहे, त्यांचे दास्यत्व देव करतो आणि त्यांच्या दासांचा मी म्हणणारा

[1] अनरीं.

सेवक आहे असे तो म्हणवून घेतो. २ ज्यांच्या मनात नेहमी भूतमात्रांविषयी दया असते, जे सर्वत्र त्या हृषीकेशाचे रूप पहातात त्यांना देव एक क्षणभरही विसंबत नाही. नेहमी तो त्यांच्या मागेमागेच असतो. ३ तुकाराम महाराज म्हणतात, जे निर्विकार झाले असून शरण आले आहेत, अशांना तो वज्राच्या पिंजऱ्याप्रमाणे संरक्षण देतो अशा या देवास जे जे लोक शरण गेले, त्यांच्या जन्ममरणांचे फेरे चुकतात. ४

१५४९ तारूं लागलें बंदरीं । चंद्रभागेचिये तिरीं ॥ १ ॥
लुटा लुटा संतजन । अमुप हे रासी धन ॥ २ ॥
जाला हरिनामाचा तारा । सीड लागलें फरारा ॥ ३ ॥
तुका जवळी हमाल । भार घालवी विठ्ठल ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – तारू–नाव, जहाज, तारा–नाव, जहाज, भार–ओझें.

अर्थ – या चंद्रभागा नदीच्या काठावर, पंढरपूर या बंदरास हे विठ्ठलरूपी जहाज लागले आहे. १ संत लोकहो, या जहाजावरील पारमार्थिक व भक्तिविषयक धनाच्या अनेक राशी लुटून घ्या. २ या हरिनामाच्या जहाजाचे शीड डौलाने फरारत आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी त्याच्या जवळच हमाल म्हणून विठ्ठलरूपी मालाचे ओझे वाहाण्यासाठी उभाच आहे. ४

विवरण :– तुकाराम महाराजांचा हा एक अति उत्कृष्ट असा रूपकात्मक अभंग आहे. तुकोबांचा व्यवसाय दुकानदारीचा होता. व्यापाराच्या निमित्ताने त्यांना ठिकठिकाणी हिंडावे लागे. या अभंगात विठ्ठलनामाचे जहाज पंढरपूर बंदरात चंद्रभागेच्या तीरावर लागले आहे, अशी मोठी हृद्य कल्पना बुवांनी केली आहे. या जहाजावरील धनाचा साठा साधुसंतांनी लुटावा अशी त्यांनी विनंती केली आहे. मी स्वतः हमाल होऊन संतांना यासाठी मदत करण्यास तयार आहेच, असे त्यांनी सुचविले आहे विठ्ठलनामाच्या व्यापारात आपण भारवाही हमाल आहोत, अशी तुकोबांची भूमिका अनेकदा प्रगट झाली आहे. ' फोडिले भांडार धन्याचा हा माल । मी तंव हमाल भारवाही ' असे त्यांनी दुसऱ्या एका अभंगात म्हटले आहे तुकारामबुवांनी आपल्या धंद्यातील, व्यवसायातील शब्द वा रूपके यांचा वापर अनेक वेळा केलेला आहे. ' येच हाटीं येच हाटीं । बांधा गाठीं पारखून ' म्हणून कधी ते आपल्या ग्राहकांना विचारतात. कधी ' उतरला कसीं खरा माल ' म्हणून समाधान पावतात. कधी ' सवंग झालें सवंग झालें । घरा आलें पंढरीचें ' म्हणून त्वरा करतात कधी ' बाहे खवर द्वारका । पेंठ आली पुंडलीका ' अशा शब्दात त्यांनी विठ्ठलनामाच्या व्यापाराचे कौतुक केले आहे. ' पंढरी चोहोटा घातला दुकान ', ' जवळी हाट पंढरीचा ' इत्यादी वचनातून पंढरपूरच्या बाजाराचे मोठे समर्पक वर्णन त्यांनी केले आहे. या बाजाराचे रूप कसे आहे, येथे काय स्वस्तात मिळते ? बुवांनी सांगितले आहे; ' प्रेम विकलें अपार । नाहीं साठवावया थार ' अशी स्थिती पंढरपूर या बंदरात असलेल्या व्यापाराची तुकोबांनी वर्णन केली आहे.

१५५० आळवीन स्वरें । कैशा मधुरा उत्तरें ॥ १ ॥
यें वो यें वो पांडुरंगे । प्रेमपान्हा मज दें गे ॥ २ ॥
पसरूनि चोंची । वचनें हीं करुणेचीं ॥ ३ ॥
तुका म्हणे बळी । आम्ही लडिवाळें आळीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – बळी–बलवान, आळी—हट्ट.

अर्थ .– देवा, मी तुम्हांला मधुर अशा शब्दांनी आळवीन. १ पांडुरंगा, ये ये तू. मला तू प्रेमाचा पान्हा पाज. २ पक्षी ज्याप्रमाणे करुणेने चोच पसरून याचना करतात तशी माझी ही करुणेची वचने आहेत. ३ तुकाराम महाराज म्हणतात, आम्ही असा लडिवाळपणाचा हट्ट करीत असल्यामुळेच बलवान झालो आहोत. ४

न साहेचि बभ्रु पांडवां पारिखा । धुडाविला सखा बळिभद्र ॥ ५ ॥
तुका म्हणे अंगीं राखिली दुर्गंधि । अश्वत्थामा वधी पांडवपुत्रां ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – साहात–सहन, अभयकर–अभय देणारा, बभ्रु–बभ्रुवाहन, अर्जुनाचा पुत्र बलिभद्र–श्रीकृष्णाचा वडिल बंधू बळिराम, अश्वत्थामा–द्रोणाचार्यांचा पुत्र

अर्थ – हरिभक्तांची जर कुणी निंदा केली तर ती या गोविंदास कधी सहन होणार नाही १ त्यांच्या रक्षणासाठी हा सगुणरूपाने अवतार धारण करतो व भक्तांना अभय देणारा व दुष्टांना कष्ट देणारा होतो २ अंबरीषी राजास छळण्यासाठी दुर्वास आला तेव्हा भगवंताने त्याच्या पाठीमागे सुदर्शन चक्र पाठवून त्यास भयंकर ताप दिला ३ द्रौपदीची विटंबना झाल्यावर ती अत्यंत संतप्त झाली त्यायोगे कौरवांची शांती संपली अशा वेळी याच श्रीपतीने तिला मदत करून कौरवांचा नाश केला ४ पांडवांच्या विरुद्ध वागणारा बभ्रू परमेश्वरास सहन झाला नाही व आपला थोरला बंधू बळिराम पांडवांच्या विरुद्ध झाल्यामुळे त्यास त्याने पृथ्विप्रदक्षणेस पाठवून दिले ५ तुकाराम महाराज म्हणतात, द्रोणपुत्र अश्वत्थामाने अंधाऱ्या रात्री छापा घालून पांडवांचे पाच पुत्र मारले, म्हणून भगवंताने त्याच्या अंगात नेहमीच दुर्गंधी ठेवली ६

विवरण – परमेश्वर आपल्या भक्तांचे रक्षण कसे करतो, सगुण रूप धारण करून भक्तांची संकटे दूर कशी करतो, याचे वर्णन अनेक उदाहरणांनी तुकोबांनी या अभंगात केले आहे दुष्टांचा नाश करून सज्जनांचे रक्षण करण्याचे कार्य भगवंत करीत असतो अंबरीष राजाला छळल्यावरून भगवंताने दुर्वासाच्या मागे सुदर्शन चक्र लावल्याची कथा आपण मागे पाहिलीच आहे द्रौपदीच्या क्षोभामुळे कौरवांचा नाश कसा झाला व या कामी श्रीकृष्णाची प्रथमपासून पांडवांना मदत कशी होत राहिली, हेही प्रसिद्धच आहे बभ्रु म्हणजे बभ्रुवाहन हा अर्जुनाचा व चित्रांगदेचा मुलगा हा मणिपूरचा राजा झाल्यावर पांडवांच्या अश्वमेध यज्ञाच्या वेळी अर्जुनाचा घोडा याच्या राज्यात गेल्यावर याचे व अर्जुनाचे घनघोर युद्ध झाले अर्जुन युद्धात मरण पावला. पण पुढे मृतसंजीवक मणी पराक्रमाने आणून बभ्रुवाहनाने अर्जुनास जिवंत करण्याचा प्रयत्न केला दरम्यान अर्जुनाचे शीरच कुणी चोरून नेले होते श्रीकृष्णाने ते आपल्या पुण्यप्रभावाने परत मिळविले व अर्जुनास सजीव केले भारतीय युद्धाच्या वेळी ज्या ज्या वेळी बळीराम पांडवांच्या विरोधी होई त्या त्या वेळी श्रीकृष्णाने पांडवांना सावध केले याच शिष्य भीम व दुर्योधन यापैकी कुणासच मदत करण्याचा प्रसंग नको म्हणून हा काही काळ तीर्थयात्रेमध्ये गेला होता अश्वत्थामा हा द्रोणपुत्र सप्तचिरंजीवांपैकी एक होय भारती युद्धाच्या अखेरीस याने मध्यरात्री शिबिरात शिरून द्रौपदीची पाचही मुले ठार केली द्रौपदीस अतिशय शोक झाला तिने त्याच्या डोक्यातील मण्याचा हट्ट धरला तेव्हा भीम व अर्जुन यांना तो मणी मिळविण्यासाठी श्रीकृष्णाने मदत केली या युद्धात अश्वत्थाम्याने आपला डोक्यातील मणी काढून पांडवांस दिला परंतु पांडवांच्या उत्तरेच्या पोटी असणाऱ्या वंशाचा नाश होईल असा अश्वत्थाम्याने शाप दिल्यामुळे श्रीकृष्णानेही याचे शरीर रक्त व पू यांनी दूषित होईल असा शाप दिला म्हणूनच याचा उल्लेख ' अंगीं राहिली दुर्गंधी ' असा उल्लेख तुकारामांनी केला आहे

विवरण :- सर्व वर्णांमध्ये ब्राह्मण वर्ण तुकोबानी श्रेष्ठ मानला हे खरे. पण तो केवळ जन्माने ब्राह्मण ठरतो असे त्यांना वाटत नाही. जो हरिनामाचे बीज जाणतो तोच खरा ब्राह्मण असे त्यानी स्पष्ट केले आहे. तुकाराम महाराजांच्या मताने तर सर्व धर्म व सर्व वर्ण एकाच ब्रह्मापासून निर्माण झाले असल्यामुळे ते समानच आहेत. हरिकथा ज्यास आवडत नाही व वैष्णवाचा सहवास ज्यास नकोसा होतो, तो ब्राह्मण नव्हेच असे त्याना वाटे. उलट एखादा अत्यजाच्या जातीत जन्माला आला व तो जर रामकृष्णाचे नाम मुखाने उच्चारून सावळ्या विठ्ठलाचे रूप मनात साठवीत असला तर तो ब्राह्मणच समजावा असे, त्यानी म्हटले आहे. ' ब्राह्मण तो याती अंत्यज असतां । मानावा तत्त्वतां निश्चयेंसी । रामकृष्ण नामें उच्चारी सरळें । आठवी सांवळें रूप मनीं ' खरे म्हणजे विष्णुदासाना याती, धर्म, वर्ण याचे बधन नसते. ' वर्णअभिमाने कोण झाले पावन ? ' असा प्रश्न त्यानी केला आहे आणि ' अंत्यजादि योनि तरल्या हरिभजनें ' असा निर्वाळा दिला आहे; आणि 'याति धर्म नाही विष्णुदासा ' हे आपले मत त्यानी स्थिर केले आहे. ' तुका म्हणे नाहीं जातीसवें काम । ज्याचे मुखीं नाम तोचि धन्य ' असा त्याचा विश्वास आहे खरे म्हणजे चारही वर्ण एकाच ब्रह्माच्या अगापासून झाले असे त्याना वाटे. मागे ' वेदविहित तुम्ही आइका हो कर्मे ' ( क्रमाक १४७२ ) या अभंगात तुकोबानी आपली वर्णविभागाबद्दलची कल्पना स्पष्ट केली आहे.

१५५९ विठ्ठल हा चित्तीं । गोड लागे गातां गीतीं ॥ १ ॥
आम्हां विठ्ठल जीवन । टाळ चिपळिया धन ॥ २ ॥
विठ्ठल हे वाणी । अमृत हे संजिवनी ॥ ३ ॥
रंगला या रंगें । तुका विठ्ठल सर्वांगें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :-संजीवनी :-जीवदान देणारी विद्या.

अर्थ :-श्रीविठ्ठलाचे नाव गीतात गाइले असता चित्तास फारच गोड लागते १ आम्हांस श्रीविठ्ठल हेच जीवन वाटते. टाळ व चिपळ्या हेच आमचे धन आहे २ विठ्ठलाचे नाम वाणीत आहे ते अमृताप्रमाणे जीवदान देणारे आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी या विठ्ठलरंगानेच सर्वांगांनी रंगून गेलो आहे ४

१५६० विठ्ठल विठ्ठल मंत्र सोपा । करी पापा निर्मूळ ॥ १ ॥
भाग्यवंता छंदा मनीं । कोडें कानीं ऐकती ॥ २ ॥
विठ्ठल हे दैवत भोळें । चाड काळें न धरावी ॥ ३ ॥
तुका म्हणे भलते याती । विठ्ठल चित्ती ते शुद्ध ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- कोडें-कौतुकाने, चाड-इच्छा.

अर्थ :- विठ्ठल हा मंत्र फार सोपा असून त्यामुळे पापाचा समूळ नाश होत असतो. १ जे भाग्यवंत आहेत त्यांच्याच मनात हा छंद असतो व त्यांचेच कोडकौतुक कानांनी ते ऐकीत असतात २ विठ्ठल हे दैवत फार भोळे असून त्यासंबंधी कोणतीही इच्छा काळ धरू शकत नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, कोणत्याही जातीचा मनुष्य असला तरी त्याच्या चित्तात जर विठ्ठल असेल तर तो शुद्ध म्हणावा लागेल ४

१५६१ म्हणे विठ्ठल ब्रह्म नव्हे । त्याचे बोल नाइकावे ॥ १ ॥
मग तो हो का कोणी एक । आदि करोनि ब्रह्मादिक ॥ २ ॥
नाहीं विठ्ठल जया ठावा । तोही डोळां न पाहावा ॥ ३ ॥
तुका म्हणे नाहीं । त्याची भीड मज कांहीं ॥ ४ ॥

*अर्थ :–श्रीविठ्ठल हा ब्रह्म नाही असे जे कुणी म्हणतात, त्यांचे शब्द आपण ऐकू नयेत. १ मग कुणीही असे* ना, अगदी ब्रह्मदेव जरी असला तरी त्याचे म्हणणे ऐकू नये. २ ज्याला श्रीविठ्ठल माहीत नाही त्याचे मुख डोळ्यांनी कधी पाहू नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, असे जे कुणी असतील त्याची मला मुळीच पर्वा नाही. ४

१५६२ एक पाहातसां एकांचीं दहनें । सावध त्या गुणें कां रे नव्हा[1] ॥ १ ॥
मारा हाक देवा भय अट्टाहासें । जंव काळाऐसें जालें नाहीं ॥ २ ॥
मरणांची तंव गांठोडी पदरीं । जिणें तोंचि वरि माप भरी ॥ ३ ॥
तुका म्हणे धिग वाहाती मारग । अंगा आलें मग हालों नेदी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :–दहने–दहनक्रिया, प्रेत जळण्याचे दृश्य.

*अर्थ :–एका माणसाचे प्रेत चितेमध्ये जळत असल्याचे लोक पाहातात, पण त्या दृश्याने ते सावध का होत नाहीत ? १ जोपर्यंत काळामुळे चितेत जाण्याची वेळ आली नाही तोपर्यंत भयाने व आग्रहाने देवास हाका मारा. २* मरणाचे गाठोडे प्रत्येकाजवळच असते, त्याचे भय असावे. मरण आले नाही तोपर्यंतच आयुष्याचे माप श्रीहरीच्या चिंतनाने भरून घ्यावे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, हे प्रपंचाचे सर्व मार्ग धिक्कार करण्यासारखेच आहेत, एकदा का शेवटी मरणप्रसंग आला म्हणजे ते आपणास हलू देखील देणार नाहीत ४

विवरण :– परमार्थसाधनात मृत्यूची भीती सतत बाळगण्याचे महत्त्व फार सांगितले आहे जिवनपणी संसार करीत असताना मरणाचे भय कशासाठी सांगितले आहे ? दुसऱ्याची प्रेते जळताना पाहून आपण सावध व्हावे असे तुकाराममहाराज का म्हणतात ? ' जन्ममृत्युजराव्याधि दुःखदोषानुदर्शनम् ' जन्म, मृत्यू, जरा, व्याधी व दुःख यांना दोष मानण्याची बुद्धी असावी असे गीतेत का म्हटले आहे ? या प्रश्नाची उत्तरे साधुसंतांनी शोधण्याचा प्रयत्न केलेला आहे एक तर असे की इतराप्रमाणेच आपल्या आयुष्याचा शेवट केव्हा ना केव्हा तरी होणार याची जाणीव सतत असली की आपल्या हातून वाईट कर्मे सहसा होणार नाहीत. दुसरे असे की, मरण जवळच येऊन ठेपले आहे, या जाणिवेने आहे या आयुष्याचा जास्तीत जास्त चांगला उपयोग करण्याकडे मग प्रवृत्ति होत राहाते. यासाठीच मृत्यूकडे लक्ष देऊन असावे, असा साधुसंताच्या उपदेशाचा सारांश आहे. नाथांनी आपल्या प्रसिद्ध अशा चिरंजीवपदात साधकाने ' नित्य मरण जाण समीप ' अशा अवस्थेत असावे असाच आग्रह धरलेला आहे. ज्ञानी माणसाने नेहमीच जरा, व्याधी व मृत्यू यांचे भय बाळगावे, असे संतांनी वारंवार सांगितले आहे. ' आणि जन्म मृत्यू दुःखें । व्याधी वार्धक्य कलुषें । तियें आंगा न येतां देखे । दुरूनि जो ' साधकाने याप्रमाणे जन्म, मृत्यू, जरा, व्याधी यांच्याविषयी सावध असावे 'आणि मृत्यू पुढां आहे । तो करतलीं कां पाहे । परी जाणीव होये । सावधू जो ' या श्रीज्ञानेश्वरांच्या वचनाप्रमाणे मृत्यू आज घडो या कल्पांती घडो, पण तो केव्हा तरी घडणार आहे, असे समजून साधक प्रथमपासूनच सावध असतो

याप्रमाणे मृत्यू हा मनात भीती व दरारा निर्माण करून माणसास सन्मार्गास प्रवृत्त करणारा आहे; पण तो सर्वांना केव्हा ना केव्हा तरी येणारा असल्याने समत्वाचा निदर्शकही आहे. ' मृत्यू न म्हणे थोर थोर । मृत्यू न म्हणे हरिहर । मृत्यू न म्हणे अवतार । भगवताचे ' म्हणून रामदासांनी मृत्यूची महती वर्णन केली आहे तो एवढ्या मोठ्या की, मोठमोठ्या अवतारी पुरुषानाही मृत्यू टळत नाही, तर मग सर्वसामान्य माणसांनी यापासून किती सावध असावे ? आणि मृत्यूचे हे भय पोटी कशासाठी ? दुसऱ्या चिता जळताना पाहून सावध का व्हायचे ? रामदासांनी समर्पक शब्दात उत्तर केले आहे – ' ऐसे जाणोनियां जावें । येचि सार्थकचि करावें । जनीं मरोनि उरवावें । कीर्तिरूपें ' मृत्यूची भीती एकदा मनात बाळगल्यास मरणानंतरही अमरत्वाची कीर्ती आपणास मिळत राहील. सर्वजण शेवटी नाश पावतात, मृत्युवश होतात. राजे मरतात, पंडित मरतात, धनवान मरतात; मग जगते कोण ? रामदासांनी उत्तर दिले आहे. ' असो ऐसे सकळही गेले । परंतु येकचि राहिले । जे स्वरूपाकार जाले । आत्मज्ञानी '

[1] व्हा ना.

जे आत्मज्ञानी झाले ते मरणालाही मारून अमर झाले तुकाराम महाराज याच कोटीतील सत्पुरुष होते त्यानी तर मरणाचा सोहळा आपल्या डोळ्यानी पाहिला होता 'मरणाही आधी राहिलों मरोनी' म्हणून त्यानी स्वतःची अनुभूती सांगितली आहे 'झाला प्रेतरूप शरीराचा भाव। लक्षियेला ठाव स्मशानीचा' (अभंगक्र १६६८) हा एक तुकोबाचा या दृष्टीने चिंतनीय अभंग आहे अशा प्रकारे जन्ममरणाच्या चक्राचा अर्थ मनात आणून माणसाने आपले वर्तन ठेवावे. दुसऱ्याचे मरण पाहून सावध व्हावे मरणामधील अमरता ओळखावी यासंबंधीचा एकनाथाचा एक अभंग येथे द्यावासा वाटतो एकनाथ म्हणतात –

फूल झडे तंव फळ सोसें। तया पाठीं तेंही नासे १
एक मागें एक पुढें। मरण विसरले बापुडे २
शेजारी निमाले कोणाचे वार्दी। लयीं गेला सापें खादली मादी ३
मरण ऐकतां परता पळे। पळे तोही गसणीं जळे ४
प्रेत देखोनी बोंबाच्या जाती। योंर्ते म्हणती तेंही मरती ५
मरण म्हणता थू थू म्हणती। थुकते तोंडें मसणीं जळती ६
पळेना पळे तोचि सापडे। जन्मतां जाणतां होताती वेडे ७
एका जनार्दनी शरण। काळ वेळ तेथें न रिघे मरण ८

१५६३ *सतासी तो नाहीं सन्मानाची चाड। परि पडे द्वाड अव्हेरितो ॥ १ ॥*
म्हणऊनि तया न वजावे ठाया। होतसे घात या दुर्बळाचा ॥ २ ॥
भावहीना आड येतसे आशका। उचितासी चुका घालावया ॥ ३ ॥
तुका म्हणे जया सकोच दर्शनें। तया ठाया जाणे अनुचित ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – चाड–इच्छा, न वजावें–जाऊ नये

अर्थ –आपला मानसन्मान वाढावा अशी इच्छा कधी सतांना होत नसते पण त्याचा जे कुणी अव्हेर करतील, त्याना दूर लोटून त्यांचा अपमान करतील, त्याचे मात्र फार वाईट होईल १ म्हणून सतानी अशा लोकांच्या घरी जाऊ नये त्यामुळे अशा दुबळ्या लोकाचा घातच होईल २ जे कुणी भावहीन आहेत त्याच्या आड अनेक शका येतात, सतांविषयी त्याना शकाच येते अशी शका सताना मान देण्याविषयी चूक घडवून आणण्यातच येते ३ तुकाराम महाराज म्हणतात, सताना पाहिल्याबरोबर ज्याना शका मते अशा लोकाच्या घरी सतांनी जाणे अनुचितच होय ४

१५६४ ससारसगें परमार्थ जोडे। ऐसे काय घडे जाणतेनो ॥ १ ॥
हेंडग्याच्या आळों अवघीं चिपाडें। काय तेथें गोडें निवडावीं ॥ २ ॥
ढेकणाचे बाजे सुखाची कल्पना। मूर्खत्व वचना येऊ पाहे ॥ ३ ॥
तुका म्हणे मद्य साडवी लगोटी। सांगितला सेटीं[1] विचार त्या ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – जोडे–लाभ होईल, हेंडग्याच्या–पशूनी चघळलेल्या चिपाडांचा भारा, आळा–भाऱ्यात सेटी –पैसाप्रमाणे तुच्छ

अर्थ – ससार करीत असतानाच परमार्थाचा लाभ होईल, असे कधी जाणते लोकहो, घडेल काय? १ पशूनी चघळून उरलेल्या चिपाडांच्या भाऱ्यात सर्व शुष्क असी चिपाडेच असायची त्यात गोड ताटे कशी सापडणार? २ खाज ढेकणांनी भरून गेलेली असताना तीवर सुखाने निद्रा येईल असे कुणी म्हटले तर त्याची गणना

१ सवटीं

आपण मूर्खातच करू. ३ तुकाराम महाराज म्हणतात, दारूचे सेवन केल्यावर ते इतके धुंद करते की नेसलेल्या लंगोटीचेही स्मरण राहू देत नाही; कुणी आठवण करून दिली तर तो दारुडा त्या विचारास केसाप्रमाणेच तुच्छ मानतो. ४

१५६५ जातीचें तें चढे प्रेम । पक्षी स्मरे राम राम ॥ १ ॥
ते काय गुण लागती येरा । कागा[1] पिंजरा शोभेना ॥ २ ॥
शिकविलें तें सुजात सोसी । मग तयासी मोल चढे ॥ ३
तुका म्हणे वेषधारी । हिजड्या नारी नव्हेति ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:– पक्षी–राघू, पोपट, कागा–कावळ्यास.

अर्थ:– जो जातिवंत आहे त्याच्याच ठिकाणी प्रेम उत्पन्न होते. पोपटाला राम राम म्हणायला शिकविले तर तो तसे शब्द उच्चारितो. १ हा गुण काय कधी कमी प्रतीच्या पक्ष्यास मिळेल काय? कावळ्यास कितीही पिंजऱ्यात ठेवले तरी त्यास काही शोभा येणार नाही; त्याला पिंजरा शोभणार नाही. २ जी जात गुणवान आहे तीच शिकविलेले ग्रहण करते व चांगल्या किमतीस चढते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, हिजड्यांनी जरी बायकांचा वेष धारण केला तरी काही ते बायका बनू शकत नाहीत. ४

१५६६ बसोनि थिल्लरीं । बेडुक सागरा धिक्कारी ॥ १ ॥
नाहीं देखिला ना ठावा । तोंड पिटी करी हांवा ॥ २ ॥
फुगतें काउळें । म्हणे मी राजहंसा आगळें ॥ ३ ॥
गजाहूनि खर । म्हणे चांगला मी फार ॥ ४ ॥
मुलाम्याचें नाणें । तुका म्हणे नव्हे सोनें ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा:– थिल्लरीं–डबक्यात, हांवा–हेवा, आगळें–श्रेष्ठ, खर–गाढव, मुलाम्याचे–सोन्याचे पाणी वरवर चढवलेले.

अर्थ:– उथळ अशा डबक्यात बसून बेडूक सागराचा धिक्कार करीत असतो. १ जे कधी पाहिले नाही, जे कधीच माहीत नाही, त्या संबंधी उगाच तो वटवट करून हेवा करीत असतो. २ क्षुद्र कावळा गर्वाने फुगतो आणि वेडेपणाने म्हणतो, मी राजहंसापेक्षा श्रेष्ठ आहे. ३ हत्तीपेक्षा मी किती चांगला आहे असे एखादे गाढव म्हणत असते ४ तुकाराम महाराज म्हणतात, ज्या नाण्यास सोन्याचा मुलामा दिला आहे, ते काही खरे सोने होऊ शकत नाही. ५

१५६७ मुक्त होता परी बळें जाला बद्ध । घेउनिया छंद माझें माझें ॥ १ ॥
पाप पुण्य अंगीं घेतलें जडून । वर्म नेणे कोण करिता[2] तो ॥ २ ॥
तुका म्हणे वांयां गेलें वांयां विण । जैसा मृगशीण मृगजळीं ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा – मृग–हरीण.

अर्थ – जीवात्मा हा मुळासापासूनच मुक्त होता, [पण पंचमहाभूतात्मक देहाचा, इंद्रियांचा लोभ त्याला वाटून, माझा देह, माझी इंद्रिये असा त्यास भ्रम होऊन तो बद्ध झाला. १ पाप व पुण्य यांचा कर्ता खरे म्हणजे कोण आहे, हे न जाणूनच त्याचे कर्तृत्व त्याने आपणाकडे घेतले. पापपुण्यात्मक कर्मांचा कर्ता कोण आहे यातील मर्म तो

१ कागा न शोभे पिंजरा, २ करिता.

जाणतच नव्हता २ तुकाराम महाराज म्हणतात, हरीण जसे मृगजळा पाठीमागे धावून व्यर्थ शिणते, त्याचप्रमाणे सांसारिक बंधनांत सापडून जीव विनाकारण शिणतात ३

विवरण – या एका अभंगात तुकोबांनी बद्धता व मुक्तता याच्या कल्पना स्पष्ट केल्या आहेत. मी कर्मे करणार, मी देह, माझे इंद्रियादिकांचे विषय, माझा प्रपंच, माझी धनदौलत, अशा विचारातून वास्तविक मुक्त असणारा जीवात्मा बद्ध होत राहतो. खरे पाहता जीवास बद्धता व मोक्ष या दोनही अवस्था नाहीत. केवळ अज्ञानामुळे, देहात्म-बुद्धीमुळे, खोट्या अहंकारामुळे त्याला कर्मांबद्दल ममत्व निर्माण होऊन तो त्याचे कर्तृत्व स्वतःकडे घेतो पापपुण्ये आपल्याचमुळे होतात असे वृथा मानतो कौरवाकडील श्रेष्ठ व ज्येष्ठ आप्तस्वकीयांना, आचार्यांना 'आपण' मारणार, ते पाप आपल्या हातून होणार असा मोह झाल्याबरोबर अर्जुन बद्ध झाला त्याचा भ्रमनिरास करणे श्रीकृष्णाला अगत्याचे वाटले. मारणारा अर्जुन नव्हता, मारणारे कौरव नव्हते, पण अज्ञानाने, मोहाने मुक्त असणाऱ्या जीवास हे सर्व कर्तृत्व स्वतःकडे असावे असे वाटते म्हणजे मुळात नसलेली बंधनाची कल्पना करायची व मग त्यातून मुक्तता मिळविण्यासाठी खटपट करायची, हा सर्वच व्याप वृथा आहे आत्मस्थितीचे ज्ञान म्हणजेच मोक्ष, *मुक्ती ही अवस्था कुठून दुसरीकडून कष्टाने प्राप्त करून घ्यायची आहे असे नाही; तर जीव स्वत.च मुक्त आहे असे* जाणायचे. म्हणूनच तुकारामबुवांनी एका अभंगात म्हटले आहे, 'मुक्त का सया म्हणावें । बंधन तें नाहीं ठावें' बंधनच ज्यास माहीत नाही, त्यास मुक्तीची काय चर्चा ?

१५६८ पंढरियें माझें माहेर साजणी । ओवियें काढणीं गाऊं गीत[१] ॥ १ ॥
राही रखुमाई सत्यभामा माता । पांडुरंग पिता[२] माहियेर ॥ २ ॥
उद्धव अक्रूर व्यास आंबऋषि । भाई नारदासी गौरवीन ॥ ३ ॥
गरुड बंधु लडिवाळ पुंडलीक । यांचें कवतुक वाटे मज ॥ ४ ॥
मज बहु गोत संत आणि महंत । नित्य आठवीत ओवियेसी ॥ ५ ॥
निवृत्ति ज्ञानदेव सोपान चांगया । जिवलगा माझिया नामदेवा ॥ ६ ॥
नागोजन मित्रा नरहरि सोनारा । रोहिदास कबिरा सोईरिया ॥ ७ ॥
परसो भागवता सुरदास सांवता । गाईन नेणता सकळांसी ॥ ८ ॥
चोखामेळा संत जिवाचे सोइरे । न पडे विसर यांचा घडी ॥ ९ ॥
जीवींच्या जीवना एका जनार्दना । पाटका कान्हया मिराबाई ॥ १० ॥
आणीक ही[३] संत महानुभाव मुनि । सकळां चरणीं जीव माझा ॥ ११ ॥
आनंदें ओविया गाईन मी त्यांसी । जाती पंढरीसी वारकरी ॥ १२ ॥
तुका म्हणे माझा बळिया बापमाय । हर्षे नांदों सये घराचारी ॥ १३ ॥

अर्थ – हे सखे, मैत्रिणी, पंढरपूर हे माझे माहेरघर आहे त्याच्या विषयीचे गाणे दळणकांडण करताना नित्य गात राहू १ राही, रखुमाई, सत्यभामा या माझ्या माता असून पिता पांडुरंग हे माझे माहेरस्थान आहे २ उद्धव, अक्रूर, व्यास, अंबऋषी व नारद हे माझे बंधू आहेत मी त्यांचा उल्लेख गौरवाने करीन ३ गरुड व लाडिवाळ पुंडलीक महामुनी यांचे भारी कौतुक मला वाटते ४ संत व महंत हे माझे नातेवाईक फार आहेत मी त्यांचे गुणगान नेहमी ओव्यातून करीत असते ५ निवृत्तिनाथ, ज्ञानदेव, सोपानदेव, चांगदेव व नामदेव हे माझ्या जीवलगाप्रमाणेच आहेत ६ जगमित्र नागा, नरहरी सोनार, रोहिदास, कबीर हे माझ्या नातेवाईकांप्रमाणेच आहेत ७ परिसा भागवत, सूरदास, सावता माळी इत्यादींचे गुणगान मी नेहमीच मेणतेपणाने करीन ८ चोखामेळा संत तर माझ्या जीवाचा जीवलग असल्याने मला त्यांचा विसर एक क्षणभरही पडणार नाही ९ जनार्दन स्वामी, त्यांचे एकनाथ हे माझ्या जीवाचे जीवन आहेत कान्हू पाठक, मीराबाई यांच्याविषयीही मला जिव्हाळा आहे १० याणखीही अनेक महानुभावी संत थोर थोर आहेत, त्या सर्वांच्या चरणावर माझा जीव जडून राहिला आहे ११ जे थोर वारकरी पंढरपुरला विठ्ठलाच्या दर्शनास नित्य नेमाने जातात त्यांना मी गौरवाच्या ओव्या मोठ्या आनंदाने गाईन १२ तुकाराम महाराज म्हणतात, हे माझे मायबाप मोठे बलवान आहेत त्यांचा गौरव मी आनंदाने करीन व घरीदारी मोठ्या सुखाने राहीन १३

विवरण – या एका गोड अभंगात तुकारामबुवा स्वतःचे मन कुणाच्या संगतीत परिपुष्ट झाले आहे व स्वतःचे नातेवाईक कोण आहेत, याचा खुलासा आपल्या परम मैत्रिणीजवळ स्त्रीच्या भूमिकेवरून करीत आहेत. जिव्हाळा, ममत्व, जवळीक इत्यादी भावासाठी ही स्त्रीची भूमिका फार उपयुक्त होते आपल्या मैत्रिणीजवळ ही एक स्त्री आपल्या नातलगाच्या गोष्टी हळूवारपणे करीत आहे कुणाकुणाच्या गुणगानात स्वतःस धन्यता वाटते, याचाही उच्चार करीत आहे तुकारामबुवांना गणगोताप्रमाणे वाटणारे अनेक पौराणिक व ऐतिहासिक सत्पुरुष अतिशय प्रसिद्ध असे आहेत राही, रखुमाई, सत्यभामा, पांडुरंग, उद्धव, अक्रूर, व्यास, आंबऋषी, नारद, पुंडलीक, निवृत्तीनाथ, ज्ञानेश्वर, सोपानदेव, चांगदेव, नामदेव, जगमित्र नागा नरहरी सोनार, रोहीदास, कबीर, परिसा भागवत, सूरदास, सावता माळी, चोखा महार इत्यादी साधुपुरुषांची एक तेजस्वी प्रभावळ तुकाराम महाराजांनी या अभंगात निर्माण केली आहे तुकारामबुवांचे खरेखुरे नातेवाईक ते हेच हेच जिवलग यांचाच आधार तुकाराम महाराजांना वाटतो 'काहीं पाठ केलीं संतांचीं उत्तरें' अथवा 'संतांचें सेविलें तीर्थ पायवणी' यासारख्या ओळींमधून बुवा आपले मन भक्तिप्रवण कसे बनत राहिले याचाच निर्देश करतात व या अभंगात आपला संपूर्ण परिवार उभा करून दाखवितात पौराणिक व ऐतिहासिक अशा अनेक श्रेष्ठ भक्तांचे येथे उल्लेख आहेत या परिवारात रोहीदास, कबीर, सूरदास, मीराबाई यासारख्या उत्तर भारतीय संतांचा जसा उल्लेख आहे तसाच त्यांनी रोहीदास, चोखामेळा यासारख्या अस्पृश्य संतांनाही गौरविले आहे, हेही लक्षणीय आहे चोखोबाविषयी तुकोबांना अपार प्रेम दिसते त्यांचा विसर एक क्षणभरही बुवांना सहन होत नाही प्रत्यक्ष ज्यांचा नावानिशी उल्लेख आहे त्यांच्याखेरीज आणखीही काही महानुभावी, म्हणजे ज्यांना थोर आध्यात्मिक अनुभव आहे अशांचा सूचकतेने बुवांनी निर्देश केला आहे हे महानुभाव संत श्रीचक्रधरप्रणीत महानुभव पंथातील साधुसंत की काय ? महानुभाव पंथीयांविषयी अनेकदा गैरसमज असले तरी अलीकडे ते आता निवळत चालले आहेत. चक्रधरांच्या पंथांमधील काही सत्पुरुषांच्या वा साधुसंतांच्या गाठीभेटी बुवांशी होत असाव्यात या सर्व गणगोतांचे चिंतन निरपाच्या संसारातील दळणकांडणादी कामे करीत असतानाच, ओव्या गाता गाता करता येण्यासारखे आहे, असेच तुकारामबुवांना येथे सुचवावयाचे आहे स्त्रीमनास सहजसुलभ वाटणारा जिव्हाळा व आप्तवर्गाविषयी प्रेम यांचे मोठे विलासनीय दर्शन बुवांनी या अभंगात घडविले आहे

१५६९ पोट लागलें पाठीशीं । हिंडवितें देशोदेशीं ॥ १ ॥
पोटाभेणें जिकडे जावें । तिकडे पोट येतें सवें ॥ २ ॥

जप तप अनुष्ठान । पोटासाठीं जाले दीन ।। ३ ।।
पोटें सांडियेली चवी । नीचापुढें तें नाचवी ।। ४ ।।
पोट काशियानें भरे । तुका म्हणे झुरझुरूं मरे ।। ५ ।।

शब्दार्थ व टीपाः– पोटामेणें–पोटाच्या भीतीनें, सवें–बरोबर.

अर्थ –पोट एकदा पाठीशी लागले की ते अनेक देशात आपणास हिंडविते १ या पोटाला सोडून त्याच्या भीतीने दुसरीकडेही जाता येत नाही; जिकडे आपण जावे तिकडे आपल्याबरोबर पोटाची चिंता येत असतेच. २ जप, तप, अनुष्ठान करणाऱ्यांनाही ही चिंता आहेच पोटासाठी तेही दीन झालेले दिसतात ३ पोटाच्या चिंतेने जीवनाची रुचीच संपून जाते. कारण नीच माणसापुढे या पोटासाठी नाचावे लागते ४ तुकाराम महाराज म्हणतात, असे हे पोट कसे भरावे ? या चिंतेनेच माणसे झुरून झुरुन मरणाच्या पथास लागतात. ५

## आरत्या ।। १३ ।।

१५७० जगदीश जगदीश तुज म्हणती । परि या जनामाजी असशील युक्ति ।
पुण्यपापविरहित सकळां अधिपति । दृष्टा परि नळणी अलिप्त गति ।। १ ।।
जय देव जय देव जय पंढरिनाथा । श्रीपंढरिनाथा ।
नुरे पाप विठ्ठल म्हणतां सर्वथा ।। २ ।।
आगम निगम तुज नेणती कोणी । परि तू भाव भक्ति जवळीच दोन्ही ।
नेणतां विधियुक्त राते पूजेनी । न मायें ब्रह्मांडीं संपुष्टशयनीं ।। ३ ।।
असुरां काळ भासे विक्राळ पुढें । पसरी मुख एक चावितो धुडें ।
भक्ता शरणागता चाले तो पुढें । दावी वाट जाऊं नेदी वाकडें ।। ४ ।।
एकाएकीं बहु विस्तरला सुखें । खेळे त्याची लीळा तोचि कवतुकें ।
तेथें नरनारी कवण बाळकें । काय पापपुण्य सुखदुःखें ।। ५ ।।
सकळां वर्मां तूंचि जाणशी एक । बद्ध मोक्ष प्राप्त आणि सुखदुःख ।
जाणों म्हणतां तुज ठकलीं बहुतेकें । तुका म्हणे शरण आलों मज राखें ।। ६ ।।

शब्दार्थ व टीपा –जगदीश–जगाचा स्वामी, धनी, नलिनी–कमळ, आगम निगम–वेद व शास्त्रे, धुडें–मोठमोठे देह

अर्थ – देवा, तू जगाचा स्वामी म्हणून सर्वजण तुला जगदीश, जगदीश म्हणतात, पण तू मोठ्या युक्तीने या जगापेक्षा वेगळाही आहेस पाण्यात राहूनही कमल जसे वर, पाण्यापासून अलिप्त असते, तशाच प्रकारे तू सर्व पापपुण्यांचा अधिपती असूनही सर्व प्रकारच्या पापपुण्यापासून अलिप्त आहेस १ देवा, पंढरीनाथा, श्रीपंढरीनाथा, तुला त्रिवार जयजयकार असो तुझे 'विठ्ठल' असे नाव घेताच कोणतेही पाप मग शिल्लक राहात नाही २ वेद अथवा शास्त्रे तुझे स्वरूप काहीच जाणू शकत नाहीत पण तू मात्र भाव व भक्ती ज्याच्या जवळ आहेस त्यांच्या जवळ मोठ्या प्रेमाने असतोस ईश्वराची पूजा शास्त्रशुद्ध माहीत नसलेल्यांच्या मायासाठी सर्व ब्रह्मांडात न मावणारा हा परमेश्वर आपल्या भक्तांच्या हृदय संपुष्टात सुखाने राहतो ३ दुष्ट असुरांना विठ्ठला, तू भयंकर स्वरूपाचा काळ भासतोस अकाळविकाळ मुख पसरुन महादुष्ट दैत्यांची प्रचंड शरीरे तू चावीत असतोस, पण शरण

महिमा वर्णू तरि पांगलिया श्रुति । सिणला शेष चिरल्या जिव्हा करितां स्तुती ।
भावेंविण कांहीं न चलेचि युक्ति । राखें शरण तुकयाबंधु करी विनंती ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – कंसरायें-कंसराजानें, देहदीपें–देहाच्या दीपानें, सानें–लहान, पांगलीं–श्रमली, थकली, साही–सहा शास्त्रे, अठरा–अठरा पुराणे, खिल्लार–गाईंचा समूह, गोधन.

अर्थ – कंसराजाने देवकीचे सात गर्भ नष्ट केले म्हणूनच हा अनंत गोकुळात श्रीकृष्णरूपाने जन्मास आला. कंसाचे हे दुष्ट कृत्यच देवाच्या या अवतारास खरे निमित्त झाले. असुरांचा संहार करून आता याने आपल्या भक्ताचे रक्षण करावे १ सर्व विश्वास भरून राहिलेल्या देवा, तुझा निवार जयजयकार असो हे बापा, मी माझ्या देहाच्या दीपाने तुझी आरती करीत आहे २ वस्तुत हा स्थूल रूपाचा असूनही भक्ताच्यासाठी हे असे लहान रूप धारण करीत असतो. ज्याचा जसा भाव असेल तसे हा स्वतःचे रूप धारण करतो. जे क्रूर दैत्य आहेत, त्यांना हा भयानक सिंहाप्रमाणे अथवा हत्तीप्रमाणे भासतो. हा काळास महाकाळ असतो. पण यशोदेच्या मांडीवर मात्र तान्हे रूप घेऊन विराजतो. ३ याचे रूप अनंत प्रकारांनी वर्णन केले तरी त्याचा अंत लागत नाही. हा सगुण आहे की निर्गुण आहे याचाही निर्णय नीट होत नाही. सहा शास्त्रे व अठरा पुराणे याचे वर्णन करता करता थकून गेली. पण हा देव कौतुकाने गोकुळातील गौळियांची गाईवासरे सांभाळीत असतो. ४ तेहतीस कोटी देवांच्यापेक्षा हा श्रेष्ठच आहे याच्या पावलांखाली पाताळ असून याच्या मुकुटावर स्वर्ग आहे. चौदा भुवने याने गिळून टाकली तरी याचे पोट भरत नाही. पण गोपाळांचे उष्टे खाऊन मात्र हा देव संतुष्ट होतो. ५ याचा महिमा वर्णन करता करता वेद थकून गेले याची स्तुती करता करता शेषाची जीभ फाटून दुभंग झाली. तुकयाबंधू अशी विनंती करीत आहे की, एका भावाशिवाय दुसऱ्या कोणत्याही साधनाने हा वश होत नाही. शरण आलेल्या या तुकयाबंधूचे देवा, तू रक्षण करतोस. ६

१५७४ परमानंदा परमपुरुषोत्तमराया । अच्युता अनंता हरि मेघश्यामा ।
अविनाशा अलक्षा परता परब्रह्मा । अकळकळा कमळापती न कळे महिमा ॥ १ ॥
जय देव जय देव जय जी श्रीपती । मंगळशुभदायका करीन आरती ॥ २ ॥
गोविंदा गोपाळा गोकुळरक्षणा । गिरिधरकर भवसागरतारक दधिमथना ।
मधुसूदन मुनिजीवन धरणीश्रमहरणा । दीनवत्सळ सकळां मूळ जय जयनिधाना ॥ ३ ॥
विश्वंभरा सर्वेश्वर जगदाधारा । चक्रधर करुणाकर पावन गजेंद्रा ।
सुखसागर गुणआगर मुगुटमणी शूरा । कल्याणकैवल्यमूर्ति मनोहरा ॥ ४ ॥
गरुडासना शेषशयना नरहरी । नारायणा ध्याना सुरवरहरगौरी ।
नंदा नंदनवंदन त्रिभुवनांभीतरी । अनंतनामीं ठसा अवतारांवरी ॥ ५ ॥
सगुणनिर्गुणसाक्ष श्रीमंत संतां । भगवाना भगवंता कालकृतांता ।
उत्पत्तिपाळणपासुन संहारणसत्ता । शरण तुकयाबंधु तारीं रिति बहुतां ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – परमानंदा–श्रेष्ठ प्रकारच्या आनंदरूपा, अलक्षा–अदृश्य असणारा ईश्वर, परता–दृष्टीच्या पलीकडे, अकळकळा–ज्याची शोभा समजून येत नाही असा, गिरिधरकर–हातावर पर्वत धारण करणारा, धरणीश्रमहरणा–पृथ्वीवरचा भार दूर करणारा, गुणआगर–गुणांचा साठा, खाण, सुरवरहरगौरी–अनेक देवांत श्रेष्ठ असलेले शंकर पार्वती, कालकृतांता–काळालाही काळ असणारा, रिति–प्रकारांनी

अर्थः– देवा, तू श्रेष्ठ प्रकारच्या आनंदरूपात व्यक्त होतोस. परम पुरुषोत्तम राम तूच आहेस अच्युता, अनंता, श्रीहरी, मेघश्यामा, ही तुझीच नावे आहेत. तू अविनाशी, अदृश्य, दृष्टीच्या पलीकडे असणाऱ्या परब्रह्माचे

स्वरूप आहेस. तुझ्या सौंदर्याची शोभा समजून येण्यासारखी नाही; कमळापती, तुझा महिमा ध्यानात येण्यासारखा नाही. १ हे श्रीपती, तुझा त्रिवार जयजयकार असो. सर्वांना शुभमंगलाचे दान करणाऱ्या देवा, मी तुझी मनोभावे आरती करीन २ गोविंदा, गोपाळा, गोकुळाचे रक्षण करणाऱ्या देवा, तू आपल्या हातावर पर्वत धारण केला आहेस, भवसागरातून तू भक्तांना तारून नेतोस, दधिमथनात तुला गोडी वाटते. मधुसूदना, सर्व मुनींचे तू जीवनच आहेस पृथ्वीचे सारे श्रम तू दूर करतोस सर्वांना तूच दीनवत्सल होऊन सांभाळतोस. सर्वांना जयाची प्राप्ती तुझ्यामुळेच होते. ३ देवा, तू विश्वंभर आहेस, सर्वेश्वर आहेस, सर्व जगाचा आधार आहेस. तू चक्रधर आहेस, तू करुणेचा सागर आहेस गजेंद्राला पावन करणारा आहेस. तू सुखाचा सागर, गुणांची खाण असून शूरांचा मुकुटमणी आहेस. तुझी कल्याण व कैवल्य प्राप्त करून देणारी मूर्ती अतिशय मनोहर अशी आहे. ४ हे गरुडासना, शेषशयना, नरहरी, नारायणा, सर्व देवांत श्रेष्ठ असणारे शिवपार्वती तुझेच स्मरण करतात. सर्व त्रिभुवनांत तूच नंदराजाला नंदनवनाप्रमाणे सुखदायी वाटतोस तू अनेक अवतार अनेक नावांनी घेऊन आपला ठसा उमटविला आहेस ५ तू सगुण का निर्गुण याची साक्ष तुझे श्रीमंत संतभक्त देतात. हे भगवाना, भगवंता, तू प्रत्यक्ष काळाचाही संहार करणारा काळ आहेस या जगाची निर्मिती, रक्षण व संहार यांची सर्व सत्ता तुझ्याजवळ आहे. अशा सर्व-समर्थ देवा, हा तुझ्यावंधू तुला शरण आला आहे. त्याचे रक्षण अनेक प्रकारांनी तू कर. ६

१५७५ पंढरि पुण्यभूमी भीमादक्षिणवाहिनी । तीर्थ हें चंद्रभागा महा पातकां धुनी ।
उतरलें वैकुंठमहासुख मेदिनी ॥ १ ॥
जय देवा पांडुरंगा जय अनाथनाथा । आरती ओंवाळीन तुम्हां लक्ष्मीकांता ॥ २ ॥
नित्य नवा सोहळा हो महावाद्यांचा गजर । सन्मुख गरुड पारीं उभा जोडुनि कर ।
मंडितचतुर्भुजा कटीं मिरवती कर ॥ ३ ॥
हरिनाम कीर्तन' हो आनंद महाद्वारीं । नाचती प्रेमसुखें नर तेथिच्या नारी ।
जीवनन्मुक्त लोक नित्य पाहाती हरी ॥ ४ ॥
आषाढी कार्तिकी हो गरुडटक्यां भार । गर्जती नामघोषें महावैष्णववीर ।
पापासी रीग नाहीं असुर कांपती सुर ॥ ५ ॥
हें सुख पुंडलिकें कसें आणिलें वापें । निर्गुण साकारलें आम्हांलागीं हें सोपें ।

आलेल्या भक्तापुढे मात्र दास होऊन तो पुढे पुढे चालतो त्याना सरळ वाट दाखवितो त्याना वेड्यावाकड्या वाटेने जाऊ देत नाही ४ हा ईश्वर खरे म्हणजे एकत्वानेच सर्वत्र विस्तारलेला असला तरी त्याने स्वसुखासाठी अनेक रूपे धारण केली आहेत तो स्वत च आपला खेळ व्यक्त होण्याची क्रीडा कौतुकाने करीत असतो त्याच्यापुढे स्त्री-पुरुष, लहानथोर, पाप-पुण्य, सुखदु ख असा भेद कुठून उरणार? ५ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, सर्व रहस्याना जाणणारा तूच एक या जगतात आहेस बद्धता, मोक्ष, कृतकृत्य, सुखदु ख या सर्व याची तुलाच एकट्याला समजतात. तुला जाणले,असे म्हणणारे बहुतेक फसलेले असतात. पण देवा, हा अभिमान मला नाही मी तुला शरण आलो आहे. मला तुझ्या पायाशी राख ६

१५७१ दैत्यभारे पीडिली पृथ्वी बाळा। म्हणोनि तूज येणें जाले गोपाळा।
भक्तिप्रतिपाळक उत्सव सोहळा। मंगळें तुज गाती आवळ बाळा॥ १॥
जय देव जय देव जय गरुडध्वजा। श्रीगरुडध्वजा।
आरती ओवाळूं तुज भक्तीकाजा॥ २॥
गुण रूप नाम नाहीं जयासी। चिंतिता तैसाचि [होसी तयांसी।
मत्स्य कूर्म वराह नरसिंह जालासी। असुरां काळ म्हूण ठाके ध्यानासी॥ ३॥
सहस्र रूपें नाम सांवळा ना गोरा। श्रुति नेती म्हणती तुज विश्वंभरा।
जीवनां जीवन तूचि होसी दातारा। न कळे पार ब्रह्मादिकां सुरवरां॥ ४॥
संतां महंतां घरीं म्हणवी म्हणियारा। शंखचक्रगदाआयुधांचा भारा।
सुदर्शन घरटी फिरे अवस्वरां। सकुमार ना स्थूळ होसी गोजिरा॥ ५॥
भावेविण तुझें न घडे पूजन। सकळ ही गंगा जाल्या तुजपासून।
उत्पत्ति प्रळय तूचि करिसी पाळण। धरूनि राहिला तुका निश्चयें चरण॥ ६॥

शब्दार्थ व टीपा –दैत्यभारें–दानवाच्या ओझ्यामुळें, मंगळें–मंगल गीते, भक्तिकाजा–भक्तीच्या साठी, पार–अंत, सीमा, मर्यादा, अवस्वरां–संकटप्रसंगी

अर्थ – देवा, गोपाळा, बाळा, दानवाच्या ओझ्यामुळे ही पृथ्वी पीडून गेली होती, त्यावेळेस तुला या पृथ्वी वर अवतार घ्यावा लागला देवा, तू भक्ताचा सांभाळ करणारा आहेस तुझ्या जन्माच्या वेळी सुवासिनींनी मंगलगीते गाऊन तुझे गुणगाण केले १ गरुडध्वजा, तुझा त्रिवार जयजयकार असो भक्तीच्या साठी अवतीर्ण झालेल्या देवा, मी तुला आरती ओवाळीत आहे २ खरे पाहाता तुला गुण, रूप, नाम नाही, पण भक्ताने जसे चिंतन करावे तसे रूप तू धारण करतोस त्याच्यासाठीच तू मत्स्य, कूर्म, वराह, नृसिंह याचे अवतार घेतलेस देवा, तू दैत्यांसाठी प्रत्यक्ष काळ आहेस अनेक ऋषिमुनी तुझे ध्यान करण्यासाठी तत्पर झालेले दिसतात ३ देवा, तुला हजार रूपे व नावे धारण करतोस, परंतु तत्वत तू काळा नाहीस, सावळा नाहीस, की गोराही नाहीस सर्व विश्वाला भरून राहणाऱ्या देवा श्रुती तुझे वर्णन नेति नेति अशाच शब्दांत करतात पण सर्व जगाचे जीवन दातारा, तूच आहेस, ब्रह्मादिक देवांनाही तुझ्या कर्तृत्वाचा अंत लागत नाही ४ तू साधुसंताच्या घरी वास करून त्यांचा दास म्हणवून घेतोस शंख, चक्र, गदा इत्यादी आयुधांचे ओझे धारण करतोस भक्ताच्या संकटप्रसंगी तुझे सुदर्शनचक्र त्यांच्या रक्षणार्थ फिरत असते देवा, मूळातच तू स्थूल नाहीस, सुकुमार वा सूक्ष्म नाहीस, साजिरा गोजिरा आहेस ५ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, खऱ्या भक्तीशिवाय तुझे नीट पूजन होणार नाही सर्व पवित्र नद्या तुझ्याच चरणांपासून निर्माण झाल्या आहेत सर्व जगाची निर्मिती, सांभाळ व विनाश तूच करतोस, म्हणून मोठ्या निश्चयाने मी तुझे चरण दृढ भावाने धरून ठेविले आहेत ६

१५७२ काय तुझा महिमा वर्णूं मी किती । नाममात्रें भवपाश तुटती ।
पाहाता पाउले हे विष्णुमूर्ती । कोटिकुळा सहित जे[1] उद्धरती ॥ १ ॥
जय देव जय देव जय पंढरिराया । श्रीपंढरिराया ।
करुनिया कुरवंडी । साडीन काया ॥ २ ॥
मंगळ आरतीचा थोर महिमा । आणीक द्यावया नाही उपमा ।
श्रीमुखासहित देखे जो कर्मा । पासुन सुटे जैसा रवि नासी तमा ॥ ३ ॥
धन्य व्रतकाळ हे एकादशी । जागरण उपवास घडे जयासी ।
विष्णूचे पूजन एकाभावेसी । नित्यमुक्त पूज्य तिहीं लोकासी ॥ ४ ॥
न वजे वाया काळ जे तुज ध्याती । असे तुझा वास तयाच्या चित्ती ।
धाले सुखें सदा प्रेमें डुल्लती । तीर्थे मळिण वास तयाचा पाहाती ॥ ५ ॥
देव भक्त तूचि जालासी दोन्ही । वाढावया सुख भक्ति हे जनीं ।
जड जीवा उद्धार होय लागोनि । शरण तुका वंदी पाउले दोन्ही ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – नाममात्रें–केवळ नामस्मरणाने, भवपाश–संसाराची बंधने, साडीन–ओवाळून टाकीन, तमा–अंधारास, नवजे–घालवीत नाहीत, धाले–संतुष्ट झाले

अर्थ – देवा, मी तुझा महिमा किती म्हणून वर्णन करावा ? केवळ तुझ्या नामस्मरणाने संसाराची बंधने तुटून जातात हे विष्णुमूर्ती देवा, तुझी पावले पाहाताच जडमूढ जीवाचा कोटिकुळासहित उद्धार होतो १ श्रीपंढरीराया, तुझा त्रिवार जयजयकार असो मी देहाची कुरवंडी करून तो तुझ्यावरून ओवाळून टाकीन २ देवा, तुझ्या मंगल आरतीचा महिमा फार मोठा आहे त्याला दुसरी उपमाच योग्य असी नाही ज्याप्रमाणे सूर्यप्रकाशामुळे अंधारास नष्ट व्हावे लागते, त्याप्रमाणे तुझ्या श्रीमुखाचे दर्शन होताच साऱ्या बऱ्यावाईट कर्मांपासून मुक्तता मिळते ३ एकादशीचा व्रतकाळ हा मोठा धन्य होय या दिवशी प्रभुचिंतनात जागरण, उपवास आणि एकनिष्ठेने श्रीविष्णुचे पूजन घडते आणि असा भक्त नित्य मुक्त असून त्रिभुवनातील लोकाना पूज्य होतो ४ काळ विनाकारण वाया न घालविता जे लोक तुझेंच ध्यान मनोभावे करतात त्यांच्या चित्तात तुझा वास अखंडपणे असतो असे भक्त तुझ्या प्राप्तीने संतुष्ट झालेले असून नेहमी प्रेमानंदाने डुलत असतात मलीन झालेली तीर्थे अशा वैष्णव भक्तांचाच आसरा घेतात, वाट पाहातात ५ तुकाराम महाराज म्हणतात, देवा या लोकात भक्तिसुख वाढावे म्हणून तूच देव व भक्त या दोन्ही रूपांत व्यक्त झालास जडमूढ जीवाचा उद्धार व्हावा म्हणून देवा तू अवतार घेतोस अशा तुला मी शरण आलो आहे मनोभावे मी तुझे दोन्ही पाय धरून त्याना वंदन करीत आहे ६

१५७३ कंसरायें गर्भ वधियेले सात । म्हणोनि गोकुळासी आले अनंत ।
ध्यावया अवतार जाले हेंचि निमित्त । असुर संहारूनि तारावे भक्त ॥ १ ॥
जय देव जय देव जय जय विश्वरूपा । श्रीविश्वरूपा । ओवाळीन तुज देहदीपें बापा ॥ २ ॥
स्थूळरूप होऊनि धरितसे सानें । जैसा भाव तैसा तयाकारणें ।
दैत्यासी भासला सिंह गजानें । काळासी महाकाळ यशोदेसी तान्हें ॥ ३ ॥
अनंत वर्णी कवणा न कळेचि पार । सगुण कीं निर्गुण हा ही निर्धार ।
पांगलीं साही अठरा करिता वेव्हार । तो वळितसे गौळियाचे खिल्लार ॥ ४ ॥
तेहतिस कोटि तिहीं देवांसी श्रेष्ठ । पाउले पाताळी[2] नेणती स्वर्गं मुगुट ।
गिळिलीं चौदा भुवनें तरि न भरेचि पोट । तो खाउन धाला गोपाळाचे उच्छिष्ट ॥ ५ ॥

१ जय, २ पाउलं पाताळीं स्वर्गी मुगुट

१५७६ अवतार गोकुळीं हो जन तारावयासी । लावण्यरूपडें हें तेजपुंजाळरासी ।
उगवता कोटि बिंबें रवि लोपले शशी । उत्साव[1] सुरवरा महा थोर मानसीं ॥ १ ॥
जय देवा कृष्णनाथा जय रखुमाईकांता । आरती ओवाळीन तुम्हा देवकीसुता ।
जय देवा कृष्णनाथा ॥ २ ॥
वसुदेवदेवकीची बंद फोडुनी[2] शाळ । होउनि विश्वजनिता तया पोटिंचा बाळ ।
दैत्य हे त्रासियेले समूळ कंसासी[3] काळ । राजया उग्रसेना केला मथुरापाळ ॥ ३ ॥
राखता गोधनें हो इंद्र कोपला भारी[4] । मेघ जो कडाडिला शिळा वर्षता धारीं ।
राखिले गोकुळ हे नखीं धरिला गिरी । निर्भय लोकपाळ अवतरले हरी ॥ ४ ॥
कौतुक पाहावया माव ब्रह्मयानें केली । वत्सें ही चोरुनिया सत्यलोकासि नेलीं ।
गोपाळ गाईवत्सें दोहीं ठायीं राखीलीं । सुखाचा प्रेमसिंधु अनाथाची माउली ॥ ५ ॥
तारिले भक्तजना दैत्य निर्दाळूनि । पाडवा साहकारी आडल्या निर्वाणी ।
गुण मी काय वर्णूं मति केवढी वाणी[5] । विनवितो दास तुका ठाव देईं[6] चरणीं ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा –महा–पृथ्वी, बंद शाल–बंदिशाळा, कारागृह, तुरुंग, माव–माया, कपट, निर्दाळूनि–नाश करून, साहाकारी–मदत करणारा, निर्वाणीं–संकटाच्या प्रसंगी, ठाव–आश्रय

अर्थ –लोकांचे रक्षण करण्यासाठी या श्रीकृष्ण भगवानाने गोकुळात अवतार घेतला आहे या श्रीकृष्णाचे रूप अतिशय लावण्यसंपन्न असून ते पुंजाळलेल्या तेजाची जणु रासच आहे कोट्यवधी सूर्य व चंद्र जरी आकाशात उगवले तरी याच्या तेजापुढे ते फिके पडतात, त्यांचे तेज लोपून जाते कृष्णाच्या या अवतारामुळे देवांना व पृथ्वीवरील लोकांना मोठाच उत्साह व आनंद वाटू लागला आहे १ देवा, कृष्णनाथा, रुक्मिणीकांता, तुझा मी जयजयकार करतो देवकीसुता, देवा, मी तुझी आरती मनोभावे करून तुला ओवाळीत आहे २ या श्रीकृष्णाने जन्मास येताच कारागृह फोडून वसुदेव व देवकी यांची बंधने तोडली हा देव सर्व विश्वास जन्म देणारा असूनही त्यांचा बालक म्हणून त्यांच्या पोटी जन्मास आला या कृष्णाने दैत्यांचा पराभव केला कंसास तर प्रत्यक्ष काळ ठरला हा याने उग्रसेनाला राज्य देऊन मथुरेचे रक्षण केले ३ गोवर्धनयाग करून याने गोधनाचे रक्षण केले असता इंद्रदेव रागावला व त्याने रागा यून मेघांमधून शिळावर्षावाप्रमाणे पर्जन्यवृष्टी चालू केली सर्वत्र प्रलयच झाला अशा प्रसंगी श्रीकृष्णाने आपल्या नखावर गोवर्धन पर्वत धारण करून गोकुळाचे रक्षण केले सर्व लोक यामुळे निर्भय झाले कारण गोकुळात हा एक थोर लोकपालक अवतीर्ण झाला होता ४ एके प्रसंगी या कृष्णाचे कौतुक पाहण्यासाठी ब्रह्मदेवाने कपट केले त्याने सर्व गाई व वासरे चोरून सत्यलोकास नेली त्यावेळी या कृष्णाने गोकुळातील लोकांनाही सांभाळले व सत्य लोकांतील गाईवासरांचेही रक्षण केले असा हा श्रीकृष्ण प्रेमाचा सागर आहे अनाथांची ही प्रत्यक्ष माताच आहे ५ तुकाराम महाराज म्हणतात, हा देव दैत्यांचा नाश करून आपल्या भक्तांचे रक्षण करीत असतो पांडवांना त्यांच्या संकटप्रसंगी याने साहाय्य केले असा या देवाचे गुणवर्णन मी काय करू? त्यासाठी लागणारी वाणी व बुद्धी मला आहे काय? मी तर त्याचा दास असून मला आपल्या चरणांवर आश्रय द्यावा अशीच विनंती मी त्याला करीत आहे ६

१५७७ सुंदर अंगकांती मुख माळ सुरेख । याणली उटी अंगीं टिळा साजिरी रेख ।
मस्तकीं मुगुट कानीं कुंडलां[7] तेज फांके । आरक्त दंत हिरे कैसे शोभले निके ॥ १ ॥
जय देवा चतुर्भुजा जय लावण्यतेजा । आरती ओवाळीन भवतारिया हा बोजा । जय० ॥२॥

१ उत्साह, २ फोडिली, ३ कंसादि, ४ थोर, ५ वाणू ६ मागे, ७ कुंडलें

उदार जुंझार हा जया वाणिती श्रुति । परतल्या नेति म्हणती तया न कळे गति ।
भाट हा चतुर्मुखें अनुवाद करिती । पांगलीं साही अठरा रूप न गति ॥ ३ ॥
ऐकोनि रूप ऐसें तुजलागीं धुंडिती । बोडके नग्न एक निराहार यति ।
साधने योग नाना तपें दारुण किती[1] । सांडिलें सुख दिली संसारा शांती ॥ ४ ॥
भरूनि माजी लोकां तिहीं नांदसि एक । कामिनी मनमोहना रूप नाम अनेक ।
नासति नाममात्रें भवपातकें शोक । पाउलें वंदिताती सिद्ध आणि साधक ॥ ५ ॥
उपमा द्यावयासी दुजें काय हे तुज । तत्त्वासि तत्त्वसार मूळ जालासी बीज ।
खेळसि बाळलीळा अवतार सहज । विनविती दास तुका कर जोडोनि तुज ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा-भाळ-कपाळ रेख-रेखीव, आरक्त-तांबूस, निके-खरोखर, चोजा-सुंदर रूपाच्या देवा निराहार-उपवास करणारे

अर्थ- या श्रीहरीची अंगकांती अतिशय सुंदर असून याचा भालप्रदेश व याची मुखशोभा अतिशय रेखीव अशीच आहे याने अंगाला सुगंधित उटी लावली असून कपाळावर सुंदर व रेखीव असा कस्तुरीचा टिळा लावलेला आहे याच्या मस्तकावर रत्नजडित असा मुकुट असून याच्या कानातील मकरकुंडलाचे तेज सर्वत्र पसरत आहे याचे ओष्ठद्वय तांबूस रंगाचे असून याचे दात हिऱ्याप्रमाणे शोभून दिसतात याच्या मस्तकावरील केस तर भारी खुलून दिसतात १ चतुर्भुजा, देवा, लावण्याच्या तेजाने शोभणाऱ्या देवा, तुझा जयजयकार असो भवतारका, सुंदरा, मी तुला मोठ्या भक्तीने आरती ओवाळीत आहे २ हा देव मोठा उदार व शूर आहे याचे वर्णन करण्यासाठी मोठ्या तत्परतेने वेद सिद्ध झाले पण 'नेति नेति' म्हणतच त्यांना परतावे लागले त्यांना याची गती समजली नाही प्रत्यक्ष ब्रह्मदेव भाट होऊन आपल्या चारही मुखांनी याचे गुणगान करू लागला पण याचा अंत लागला नाही याचे वर्णन करता करता सहा शास्त्रे व अठरा पुराणे थकून गेली ३ तुझ्या रूपासंबंधी काही ऐकून ऐकून तुझ्या शोधात अनेक साधक तुला धुंडू लागले तुझ्या प्राप्तीसाठी लोक उघडे बोडके नग्न, संन्यासी होऊन उपासतापास करीत राहिले नाना प्रकारची योगसाधना लोक करतात नाना प्रकारची दारुण तपे आचरतात कित्येकांनी तुझ्यासाठी आपली संसारसुख व वरवरची शांतीही टाकून दिली ४ देवा, तू सर्व त्रिलोकांत भरून राहिला आहेस कामिनीमनमोहना तुला अनेक नामे आहेत, अनेक रूपे आहेत, तुझ्या केवळ नामाच्या उच्चारानेच संसारातील पातके नष्ट होतात, शोक दूर होतो सिद्ध व साधक तुझीच पावले वंदन करतात ५ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तुला उपमा द्यावयास दुसरी वस्तूच कोणती नाही तू सर्व तत्त्वांचे सारभूत असे तत्त्व असून सर्व व्यक्तींचे मूळ बीज आहेस अवतार धारण करून सहजासहजी तू नाना प्रकारच्या बाळलीला खेळतोस, मी हा दास तुला हात जोडून विनंती करीत आहे ६

१५७८ सकुमार मुखकमळ निजसारनिर्मळ । सांवळी सुनीळ तनु भ्रमराग कुरळ ।
झळकति दिव्य तेजें दंत माज पातळ । मिरविलि मयूरपत्रें मुगुट कुंडलें माळ ॥ १ ॥
जय देवा जगदीश्वरा । धन्य रखुमाईवरा ।
रती करीन काया । ओंवाळिन सुंदरा । जय० ॥ २ ॥
गोजिरें ठाणमान भुजा मंडित चारी । शोभति शंखचक्रगदापद्म मोहरी ।
हृदयीं ब्रह्मपद बाणलें शृंगारीं । गर्जति चरणीं वांकी कंठ कोकिळास्वरीं ॥ ३ ॥
घवघवित उटी अंगीं चावन चंदनाची । ललाटीं कस्तुरिचा कास पितांबराची ।
कटिसूत्र वरि साजिरें प्रभा वर मोतियांची । संगीत सकळ मुद्रा पाउलें कुंकुमाचीं ॥ ४ ॥

[1] तपना

सौभाग्यसुख सागर गुणलावण्यखाणी। लाघवी दीनवत्सळ विश्व लाविलें ध्यानीं।
आश्चर्य देव करिती ऋषि राहिले मुनि। धन्य ते प्रसवली ऐसिया नंदपत्नी ॥ ५ ॥
वर्णितां ध्यान महिमा श्रुति राहिल्या नेति। रविकोटि चंद्र तारा प्रकाशा न तुळती।
उदार सुर गंभीर पूर्ण आनंदमूर्ति। तुकयाबंधु म्हणे स्तवूं मी काय किती ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा.— तनु–शरीर, भ्रमरांग–भ्रमराप्रमाणे निळे सावळे अंग असलेला, मोहरी– वासरी, बावन चंदनांची– एक प्रकारच्या श्रेष्ठ चंदनाची, ललाटीं– कपाळावर, न तुळती–तुलनेस येत नाहीत.

अर्थः– या श्रीहरीचे रूप सुकुमार असून मुख कमळाप्रमाणे सुंदर आहे. याचे शरीर भ्रमराप्रमाणे निळेसावळे असून याचे केस कुरळे आहेत याचे दात दिव्य तेजाने चकाकत आहेत याच्या मुकुटातील मयूरपिसे मोठी शोभून दिसतात. याच्या कानांतील कुंडले व गळ्यातील माळ यांची शोभा अवीट आहे. १ जगदीश्वरा, देवा, तुझा जयजयकार असो. रखुमाईवरा, तुझी धन्यता असो सुंदरा, मी तुझ्यावरून माझी काया ओवाळून टाकून आरती करीन. तुझा जयजयकार असो. २ तुझे आसन मोठे शोभून दिसणारे आहे. तू चारी भुजांनी शोभणारा आहेस. शंख, चक्र, गदा, पद्म व वासरी यांनी तू सुशोभित दिसतोस. तुझ्या हृदयात ब्रह्मपदाचा निवास असून तोच तुझा शृंगार आहे. तुझ्या चरणातील वाळयांचा आवाज कोकिळांच्या स्वराप्रमाणे मधुर आहे ३ बावनीच्या चंदनाची उटी धवधवीतपणे तुझ्या अंगास देवा, माखलेली आहे तुझ्या कपाळावर कस्तुरीचा रेखीव टिळा आहे. तू पीतांबराची सुरेख कास कसलेली आहेस. तुझ्या कटीचे सूत्र शोभून दिसणारे असून त्यावर मोत्याची प्रभा पडलेली दिसते तुझी मुद्रा सकल संगीताची असून तुझी पावले जणु कुंकुमाची आहेत. ४ देवा, तू सौभाग्यसुखाचा सागरच आहेस. गुणलावण्याची तू खाण आहेस. तू मोठा लाघवी असून दीनवत्सल आहेस. तू आपल्या ध्यानी साऱ्या विश्वाला लावले आहेस. देव तुझ्या रूपाचे आश्चर्य करतात, तर ऋषीमुनी तुझे रूपवर्णन करता करता मूक झाले आहेत. अशा रूपगुणसंपन्नाला प्रसवून नंदपत्नी यशोदा धन्य झाली आहे ५ तुकयाबंधू म्हणतात की, याचे ध्यान व याचा महिमा वर्णन करता करता श्रुती थकून गेल्या 'नेति नेति' असे त्याना म्हणावे लागले. याच्या लावण्याची शोभा वर्णन करण्यासाठी कोटी सूर्य-चंद्र यांचा प्रकाशही तुलनेस येणार नाही. हा मोठा उदार, गंभीर, पूर्ण रूपाचा, आनंदमूर्ती असणारा देव आहे मी त्याचे वर्णन किती व कसे करू ? ६

१५७९ महा जी महादेवा महाकाळमर्दना। मांडियेलें उग्रतप महादीप्त दारुणा।
परिधान व्याघ्राबर चिताभस्मलेपना। स्मशान क्रीडास्थळ तुझा जी त्रिनयना ॥ १ ॥
जय देवा हरेश्वरा जय पार्वतीवरा। आरती ओवाळिन कैवल्यदातारा। जय ॥ २ ॥
रुद्र हें नाम तुम्हां उग्र संहारासी[1]। शंकर शिव भोळा उदार सर्वस्वी।
उदक बेलपत्र टाळी वाहिल्या देसी। आपुलें पद दासां ठाच देईं[2] कैलासीं ॥ ३ ॥
त्रैलोक्यव्यापका हो जन आणि[3] विजन। विराटस्वरूप हें तुझें साजिरें ध्यान।
करिती वेद स्तुती कीर्ती मुखें आपण। जाणतां नेणवे हो तुमचें महिमान ॥ ४ ॥
बोलतां नाम महिमा असे आश्चर्य जगीं। उपदेश केल्यानंतरें पापें पळती वेगीं।
हरहर वाणी गर्जे प्रेम संचरे अंगीं। राहिलि दृष्टी चरणीं रंग मीनला रंगीं ॥ ५ ॥
पुजूनि लिंग उमा मुका जोडोनी हात। करिती विज्ञापन परिसावी हे मात।
अखंड राहूं द्यावे माझें चरणीं चित्त। घातले साष्टांग मागें[4] मस्तकीं हात ॥ ६ ॥

१ सहाररासी, २ देसी, ३ वन, ४ माझे

शब्दार्थ व टीपा :- महाकालमर्दना- महाकाळाचा नाश करणाऱ्या महादेवा, महादीप्त- महा तेजस्वी, व्याघ्रांबर- वाघाचे कातडे, त्रिनयना-तीन डोळ्याच्या शंकरा, कैवल्यदातारा- मोक्ष देणाऱ्या, मिनला- भिनला, मिसळून गेला, विज्ञापना- नम्र विनंती, मात- गोष्ट, हकीगत.

अर्थ - महाकाळाचा नाश करणाऱ्या महान महादेवा, तुम्ही उग्र असे तप आरंभिले असून तुमचे रूप भयंकर व महातेजस्वी असे आहे. तुम्ही व्याघ्रांबर धारण केले असून चितेतील भस्म साऱ्या अंगास लावले आहे. तीन डोळ्यांच्या देवा, महादेवा, स्मशान हेच तुमचे क्रीडास्थान आहे. १ हरेश्वरा, पार्वतीवरा, तुझा जयजयकार असो. मोक्षसुखाचे दान देणाऱ्या दातारा, मी तुला मनोभावे आरती ओवाळीत आहे २ तुम्ही उग्र भावाने जगाचा संहार करता म्हणून तुमचे नाव रुद्र आहे. देवा, शंकरा, तुम्ही फारच भोळे आहात भक्तावर उदार होऊन सर्वस्व देता तुम्ही. केवळ पाणी, बेलाचे पान, अथवा नुसती टाळी, यांनी तुम्ही संतुष्ट होता व भक्तांना आपले कैलासाचे स्थान देता ३ देवा, तुम्ही साऱ्या त्रैलोक्याला भरून आहात. जन, वन, विजन; यांत तुम्हीच भरून राहिले आहात तुम्ही विराट स्वरूपाचे असलात तरी हे तुमचे ध्यान मात्र शोभून दिसणारे आहे. आपल्या मुखाने तुमची स्तुती करावी म्हणून वेद प्रयत्न करतात, पण शेवटी तुमचा महिमा जाणता येणार नाही, असेच ज्ञान त्यांना होते ४ देवा, तुमच्या नामाचा महिमा सांगितला तर लोकांना या जगात भारी आश्चर्य वाटेल. तुमच्या नामाचा उपदेश घेतल्याबरोबर सर्व पापे वेगाने पळून जातात. 'हरहर महादेव' अशा वाणीचो गर्जना होताच अंगात प्रेम संचारते देवा, तुमच्या चरणीच माझी दृष्टी स्थिरावून राहिली आहे तुमच्याच रंगात मी मिसळून गेलो आहे. ५ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, मी आपल्या लिंगाचे पूजन करून हात जोडून उभा आहे. मी एक विनंती करून काही सांगत आहे ते ऐकावे तुमच्या चरणी माझे चित्त अखंडपणे राहू द्या. मी तुम्हास साष्टांग नमस्कार घातलेला आहे, तुमचा वरदहस्त माझ्या मस्तकी असावा. ६

१५८० अवतारनामभेद गणा आदि अगाद[1] । जयासि पार नाहीं पुढें खुंटला वाद ।
एकचि दंत शोभे मुख विक्राळ दोंद । ब्रह्मांडामाजि दावी अनंत हे छंद ।। १ ।।
जय जया गणपती ओंवळित आरती । साजिऱ्या सरळ भुजा फरशकमळ शोभती ।। २ ।।
हे मही ठेंगणी हो तुज नृत्यनायका । भोंवरि फेर देतां असुर मर्दिले एकां ।
घातले तोडरीं हो भक्तजनपाळका । सहस्र नाम तुज मुक्तिमुक्तिदायका ।। ३ ।।
सुंदर शोभला हो रूपें लोपलीं तेजें । उपमा काय देऊं असे आणिक दुजें ।
रविशशितारांगणें जयामाजी सहजें । उदरीं सामावलीं जया ब्रह्मांडबीजें ।। ४ ।।
वर्णिता शेष लीळा तया भागलीं मुखें । पांगुळले वेद चारी कैसे राहिले सुखें ।
अवतार जन्मला यो लिंगनाभी या मुखें । अमूर्त मूर्तिमंत होय भक्तीच्या सुखें ।। ५ ।।
विश्व हें रूप तुझें हस्त पाद मुखडें । ऐसाचि भाव देईं तया नाचतां पुढें ।
धूप दीप पंचारति ओंवाळिन निवाडें । राखें या शरणागता तुका खेळतां लाडें ।। ६ ।।

शब्दार्थ व टीपा:- अगाद-अगाध, दंत- दात, विक्राळ- मोठे, दोंदे-पोट, भुजा- हात, फरश- परशू, कुऱ्हाड, मही-पृथ्वी, भोंवति- पृथ्वीवर, भोवती, निवाडें-अखेरीस, खरोखर.

अर्थ - या देवाच्या अवतारांत व नामांत नाना भेद असले तरी हा आदीस्वरूपाचा असून अगाध आहे याचा अंत काही केल्या लागत नाही या शोधाचा वादच पुढे खुंटून जातो. या देवाचा एकच दात शोभून दिसतो याचे पोट मोठे आहे. हा सर्व ब्रह्मांडात आपले अनंत छंद दाखवीत असतो. १ हे गणपती, तुझा जयजयकार असो. मी तुला आरती ओवाळीत आहे तुझे सर्व हात सरळ असून शोभिवंत आहेत. त्यांतील एकात असणारा परशूही फार

[1] अगाध.

शोभून दिसतो २ नृत्यात पुढारी या प्रमुख असणाऱ्या देवा, तुला नृत्य करायला ही पृथ्वी अपुरी झाली आहे या पृथ्वीवर तू फेर धरताच अनेक दुष्ट असुरांचा नाश झाला भक्तजनपालका देवा, तुझ्या पायींच्या तोडरात, पाळपात काहीजण नष्ट झाले भक्तिमुक्तिदायका, देवा, तुला सहस्र नामे आहेत ३ देवा, तुझ्या सुंदर रूपाने तू शोभून दिसतोस तुझ्या रूपाच्या प्रभावाने सारी तेजे लोपून गेली आहेत. तुझ्या रूपतेजाचे वर्णन करण्यासाठी आणखी समर्थ अशी दुसरी कोणती उपमा आहे ? तुझ्या रूपतेजात सहजासहजी रविशशींचे तारागण समाविष्ट झाले आहे अनेक ब्रह्मांडाची बीजे तुझ्या विशाल उदरात साठवलेली आहेत ४ देवा, तुझी लीला वर्णन करताना शेषही थकून गेले त्याचे मुख थकून गेले चारी वेद थकून, मागून ' नेति नेति ' म्हणून गुप्तात राहिले आहेत लिंग, नाभी, मुख अशा विशिष्ट अवयवांच्या रूपाने या गणपतीचा अवतार झालेला आहे भक्तांच्या सुखासाठी अमूर्त असणारा हा देव मूर्तिमंत झाला आहे ५ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, हे विश्व तुझे हात, पाय व मुख यांच्या रूपानेच शोभते याच्या पुढे नाचताना असाच भाव मनात निर्माण होतो अखेरीस मी धूप, दीप यांनी युक्त अशा पचारतीने याला ओवाळीन मोठ्या प्रेमाने खेळत असणाऱ्या व शरण आलेल्या मला देवा, तू जवळ करावेस ६

१५८१ कनकाच्या परियळीं उजळूनि आरती । रत्नदीपशोभा कैशा पाजळल्या ज्योती ॥ १ ॥
ओंवाळू गे माये सबाह्य साजिरा । राहिरखुमाईसत्यभामेच्या वरा ॥ २ ॥
मंडितचतुर्भुज दिव्य कानीं कुंडलें । श्रीमुखाची शोभा पाहतां तेज फाकलें ॥ ३ ॥
वैजयंती माळ गळां शोभे श्रीमंत । शंखचक्रगदापद्म आयुधें शोभत ॥ ४ ॥
सांवळा सुकुमार जैसा कर्दळीगाभा । चरणींचीं नेपुरें वांकी गर्जती नभा ॥ ५ ॥
ओवाळितां मन हें उमें ठाकलें ठायीं । समदृष्टि समाधि तुकया लागली पायीं ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – कनकाच्या– सोन्याच्या, परियेळीं– तबकात, वरा– पतीस,

अर्थ – सोन्याच्या तबकात मी ही आरती उजळून लावली आहे रत्नदीपाच्या प्रकाशाप्रमाणे या आरतीच्या सर्व ज्योती कशा प्रकाशमान झाल्या आहेत १ आतून बाहेरून सुंदर असणाऱ्या व राही, रखुमाई व सत्यभामा यांच्या पतीस मी आरती ओवाळीत आहे २ याचे चारी हात वस्त्रालंकारांनी सुशोभित झाले आहेत याच्या कानांत दिव्य कुंडले तळपत आहेत याच्या मुखाची शोभा पाहात असताना सर्वत्र तेजच फाकले असल्याचा अनुभव येतो ३ याच्या गळ्यातील वैजयंतीमाळ शोभून दिसते हा मोठा श्रीमंत आहे शंख, चक्र, गदा, पद्म ही आयुधे याला फारच शोभतात ४ हा सावळा सुकुमार इतका कोवळा आहे की, जणु कर्दळीचा गाभाच याच्या चरणातील नूपुरे व वाक्या यांची गर्जना मेघगर्जनेप्रमाणे होत असते ५ तुकाराम महाराज म्हणतात याला ओवाळीत असताना माझे चित्त याच्या ठिकाणी स्थिर झाले आहे याच्या समदृष्टीवर व समचरणावर माझे मन स्थिर झाले आहे मी या समचरणांवर मस्तक ठेवीत आहे ६

१५८२ भक्तीचिया पोटीं बोध काकडा ज्योती । पंचप्राण जीवें भावें ओंवाळू आरती ॥ १ ॥
ओंवाळू आरती माझ्या पंढरीनाथा । दोन्ही कर जोडोनि चरणीं ठेवीन माथा ॥ २ ॥
काय महिमा वर्णूं आतां सांगणें तें किती । कोटि ब्रह्महत्या मुख पाहतां जाती ॥ ३ ॥
राही रखुमाई दोही दों बाहीं । मयूर पिच्छचामरें ढाळिति ठायीं ठायीं ॥ ४ ॥
तुका म्हणे दीप घेऊनि उन्मनति शोभा । विटेवरी उभा लावण्यगाभा ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – कांकडा– काडीची ज्योत दोबाहीं– दोनही बाजूस

अर्थ – भक्तीच्या पोटी जन्मलेल्या बोधरूपी काकड्याच्या ज्योतीने व पंचप्राणांनी जीवेभावे या देवाची आरती करू १ माझ्या पंढरीनाथाला आरती ओवाळू याला दोन हात जोडून याच्या चरणावर मी माथा ठेवितो

२ या माझ्या पंढरीनाथाचा महिमा किती वर्णन करू ? आणि सांगू तरी काय व किती ? याचे श्रीमुख पाहाताच कोट्यावधी ब्रह्महत्या व त्यांची पातके नष्ट होतात. ३ याच्या दोन्ही बाजूंना राही व रखुमाई उभ्या असून मयूर-पिसाच्या चवऱ्यांनी त्या याला पुन पुन वारा घालीत आहेत. ४ तुकाराम महाराज म्हणतात, या काकड्याची ज्योत म्हणजे उन्मनीची शोभाच आहे. या पंढरीनाथांच्या रूपाने विटेवर लावण्याचा गाभाच जणू उभा आहे ५

विवरण.– आपले आराध्यदैवत श्रीपंढरीनाथ यांच्या रूपवर्णनाच्या व गुणवर्णनाच्या या बहारदार अशा तेरा आरत्या तुकोबांच्या अभंगात शोभून दिसणाऱ्या आहेत. या सर्व आरत्यांतून श्रीकृष्णाचे, श्रीविठ्ठलाचे अतिशय मनोहर असे रूप तर वर्णन केले आहेच; पण तत्त्वबोधाच्या दृष्टीनेही या आरतीच्या अभंगाचे महत्त्व विशेष आहे. आरती ओवाळण्याचा विधी आपल्या भक्तिपरंपरेत फार वैशिष्टचपूर्ण असाच असतो. आराध्यदैवताची मनोभावे पूजा झाली आहे; गंध, अक्षदा, फुले, धूप, नैवेद्य यांनी देवाची पूजा केल्यानंतर तवकात निरांजन घेऊन ईश्वरास आरती ओवाळण्यातील पवित्रता व उदात्तता अनुभवून घेण्यासारखी आहे. या ओवाळल्या जाणाऱ्या दीपावरोबर, ज्योतिवरोबर जणु आपला देहच इष्ट देवतेवरून ओवाळून टाकण्याचा भाव आपल्या मनात निर्माण झालेला असतो देवघरात ईश्वर व भक्त यांच्या सान्निध्यातील आरतीचा सोहळा डोळ्यांना, कानांना व मनाला तृप्त करणारा असतो वाद्यवृंदाच्या नादात आरतीच्या शब्दांतील अर्थघन विचार मनात घुमत असतात आरतीमधील गुणवर्णनाने व ईश्वराच्या वात्सल्ययुक्त आविष्काराने ऐकणाऱ्याचे व म्हणणाऱ्याचे मन पुलकित होऊन जाते.

वरील तेरा आरतीअभंगातील तीन आरत्या ( क्रमांक १५७३, १५७४, १५७८) या तुकयाबंधूच्या असाव्यात असे वाटते. तुकोबाचे आराध्य दैवत पंढरपूरचे श्रीविठ्ठल वा श्रीकृष्ण. परंतु या आरत्यांत एक आरती महादेवाची ( क्रमांक १५७९ ) व एक आरती गणपतीची (क्रमांक १५८० ) आहे, हे ध्यानात घ्यावयास हवे तुकोबांचा भक्तिमार्ग सर्वांचा समावेश करणारा होता. शिव, गणपती, श्रीराम, ही सर्व एकाच पांडुरंगाची रूपे त्यांनी मानली होती

१५८३ धन्य दिवस आजि दर्शन संतांचें । नांदे तया घरीं दैवत पंढरीचें ॥ १ ॥
धन्य पुण्य रूप कैसा जाला संसार । देव आणि भक्त दुजा नाहीं विचार ॥ २ ॥
धन्य पूर्व पुण्य वोडवलें निरुतें । संतांचें दर्शन जाले भाग्यें बहुतें ॥ ३ ॥
तुका म्हणे धन्य आह्मां जोडली जोडी । संतांचें चरण आतां[1] जीवे न सोडीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – दुजा– दुसरा, वेगळा, निरुतें– खरे,

अर्थ – ज्यांच्या घरी पंढरीचा विठ्ठल हे दैवत नांदत आहे असा संतांचे दर्शन झाल्यामुळे आजचा दिवस धन्य झाला आहे. १ हा माझा संसार कसा पुण्यरूप होऊन धन्य झाला आहे देव व भक्त यांच्यांत वेगळेपण नाही, असेच मला आज प्रचीतीस आलो आहे. २ माझे खरोखर पूर्वपुण्यच फळास आलेले दिसते म्हणूनच मोठ्या भाग्याने मला या संतांचे दर्शन झालेले आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, आम्हांला या संतांची प्राप्ती झाली आहे, म्हणून आम्ही धन्य आहोत. आता या संतांचे चरण जीव गेला तरी सोडणार नाही. ४

१५८४ गाऊं वाणूं[2] तुज विठो तुझा करूं अनुवाद । जिकडे पाहें तिकडे सर्वमय गोविंद ॥ १ ॥
आनंद रे विठोबा जाला माझे मनीं । देखिलें लोचनीं विटेसहित पाउलें ॥ २ ॥
न करीं तपसाधनें रे मुक्तीचे सायास । हाचि जन्मोजन्मीं गोड भक्तीचा रस ॥ ३ ॥
तुका ह्मणे आह्मां प्रेमा उणें तें काई । पंढरीचा राणा सांटविला हृदयीं ॥ ४ ॥

---

१ आता न विसंबे घडी, २ गाऊ नाचू विठु तुझा.

शब्दार्थ व टीपा – लोचनीं– डोळ्यांनी, सायास– प्रयत्न, उणें– कमी

अर्थ – देवा, विठ्ठला, आम्ही आता तुमचेच गुण गाऊ त्यात तल्लीन होऊन नाचू तुमच्याच गुणाचा अनुवाद करू जिकडे पाहावे तिकडे मला सर्वत्र गोविंदच दिसत आहे १ विठ्ठला, माझ्या मनात आता आनंदी आनंद भरून राहिला आहे. कारण मी माझ्या डोळ्यांनी तुमची विटेवरील पावले पाहिली आहेत २ मी आता यापुढे जपतपादी साधने किंवा मुक्तीचे प्रयत्न करणार नाही त्यांची गरजच मला काही उरलेली नाही जन्मोजन्मी भक्तीचा हा गोड रसच मी सेवन करीन ३ तुकाराम महाराज म्हणतात, आम्हाला आता प्रेमात काय कमी आहे ? कारण आता आम्ही हा पंढरीचा राणा आमच्या हृदयात साठविलेला आहे ४

१५८५ मागणें तें एक तुजप्रति आहे । देसी तरि पाहें पांडुरंगा ॥ १ ॥
या संतांसी निरवीं हें मज देईं । आणिक तुज कांहीं न मगें[1] तुज ॥ २ ॥
*तुका ह्मणे आतां उदार होईं । मज ठेवीं पायीं संतांचिया ॥ ३ ॥*

शब्दार्थ व टीपा – तुजप्रति– तुझ्याजवळ, निरवीं– स्वाधीन कर

अर्थ – पांडुरंगा, मी तुला आता एक मागणे मागणार आहे तू देणार असशील तर हेच एक दे १ तू आता या संतांच्या स्वाधीन मला कर याशिवाय मला तुझे दुसरे काहीही नको २ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, पांडुरंगा, तू मला एवढेच देण्यासाठी उदार व्हावेस, मला संतांच्या चरणांशी ठेव ३

विवरण – वरील तीन अभंगाना वारकरी पंथात फारच महत्त्व आहे या अभंगाच्या आधीच्या तेरा आरत्यानंतर हे अभंग आले आहेत, यातील औचित्य ध्यानात घेण्यासारखे आहे मनास सनुष्टता देणारी आरती झाली, विठ्ठलाचे रूप व गुण वर्णन करून मन तृप्त झाले, वाद्यांच्या गजरात ते तल्लीन होऊन विठ्ठलाच्या चरणाशी स्थिरावले डोळ्यांत पाणी साचले कंठ सदगदीत झाला धूपदीपाच्या पवित्र वातावरणात बाह्य जगाचा विसर पडला की शेवटी ईश्वराला काय मागायचे ? कशाची इच्छा करायची ? धन दे, रूप दे यौवन दे, मोक्ष दे, स्वर्ग दे, अशी मागणी थोर संत कधीच करीत नाहीत आरतीच्या निमित्ताने संतांचा सहवास झाला, त्याचे दर्शन झाले. याहून दुसरा श्रेष्ठ लाभ कोणता ? म्हणूनच तुकोबा ठरवतात, 'संतांचे चरण आता जीवें न सोडी ' संतसहवासाची निरंतर भूक त्यांच्या पोटात असते एकदा पंढरीचा राणा हृदयात साठवला की मग संतसहवासाखेरीज दुसरी कसलीच अपेक्षा तुकोबाना नाही शेवटी तुकारामबुवा मागतात ते हेच की, मला या संतांच्या स्वाधीन कर, संतांच्या पायाशी मला वास हवा अशीच एकमेव मागणी तुकोबाची आहे, कारण या संतांच्या सहवासातच ईश्वराच्या प्राप्तीचा मार्ग खुला होत असतो 'संतचरण लागतां सहज । वासनेचें बीज जळूनी जाय ' संतांच्या पायांवरील धूलिकणांच्या स्पर्शाने सर्व वासना नष्ट होतात व मग हृदयस्थ नारायणाची जाणीव होऊ लागते

या संतांची ओढ तुकोबाना फारच मोठी आहे कारण हे संत लाभाशिवाय प्रेम करणारे असतात लेकराचे हित आई ज्या कनवाळूपणाने जाणते, त्याच वृत्तीने संत जीवाची काळजी घेतात यांच्या कृपेने तुकोबा भक्तिमार्गास लागले 'ठेविली हो काया कृपेच्या वोरसें ' असा अनुभव त्यांनी सांगितला आहे म्हणून संत पाहताच 'वंदीन पाउलें लोळेन चरणीं ', 'आजि इच्छाधणी फिटईल ' अशा वृत्तीने तुकोबा कासावीस होतात संत दर्शनाने 'प्रेमामृत पान । होईल चरणरजें स्नान असा लाभ होईल म्हणून तें सुखावतात, हे संत आपणास वारंवार जागे करतात यांचे सहज बोलणे हाच थोर उपदेश असतो, असे तुकोबानी म्हटले आहे त्याना संत हेच सोयरे वाटतात, कारण हेच की, 'सदा देव आठविती ' म्हणून अशा संतांचा सहवास आपणास मिळावा अशी त्यांची विठ्ठलाजवळ शेवटची मागणी आहे.

[1] माग.

# स्वामींनीं काया ब्रह्म केली ते अभंग ॥ २४ ॥

१५८६ शोधितांचि नये । ह्मणोनि वोळगतों पायें ॥ १ ॥
आतां दिसों नये जना । ऐसें करा नारायणा ॥ २ ॥
परतोनि मन । गेलें ठायींचि मुरोन ॥ ३ ॥
विसरला तुका । बोलों चालों जाला मुका ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:- वोळगतो- आश्रय घेतो, सेवा करतो.

अर्थ।- देवा, तुमचा शोध आता कोणत्याही प्रकारे घेता येत नाही, म्हणून मी तुमच्याच पायांचा आश्रय घेत आहे १ नारायणा, आता मी लोकाच्या दृष्टीस पडू नये असेच तुम्ही करा. २ माझे मन देहादी विचार व प्रापंचिक गोष्टी यांतून परतून स्वस्वरूपाच्याच ठिकाणी मुरून राहिले आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी आता व्यावहारिक गोष्टी बोलण्याचालण्याचे विसरून गेलो असून जणू मुकाच बनलो आहे. ४

१५८७ रज्जुसर्पाकार । भासयेलें जगडंबर ॥ १ ॥
ह्मणोनि आठवती[1] पाय । घेतों आलाय बलाय ॥ २ ॥
दृश्य द्रुमाकार लाणी । केलों सर्वस्वासी धणी ॥ ३ ॥
तुकीं तुकला तुका । विश्वीं भरोनि उरला लोकां[2] ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:- सर्परज्जूकार:- दोर हा सर्पाप्रमाणे असल्याचा भास, जगडवर- जगाचा पसारा, आलाय वलाय- ताटात दिवे ठेवून ओवाळणे, दृष्ट काढणे, दृश्य- दिसणारे जग, द्रुमाकार- झाडाचा आकार, लाणी- शेवट, तुकीं- तुलनेत, तुकला- तुळला गेला, उतरला गेला.

अर्थ:- दोरी ही सर्पाप्रमाणे भासल्यावर जसा भ्रम होतो, त्याचप्रमाणे स्वस्वरूपावर हा जगाचा पसारा भासत आहे. १ म्हणूनच श्रीहरीचे सत्य स्वरूपाचे पाय मी आठवितो आणि मोठ्या प्रेमाने व कौतुकाने त्याची दृष्ट काढतो. २ हे जे दिसणारे जग आहे तेच झाडाच्या आकाराच्या शेवटच्या स्वरूपाचे रूप होय. पण मी त्याचे मूळ अनुभविल्यामुळे सर्व अर्थांनी तृप्त झालो आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी परब्रह्माच्या तुलनेस उतरलो गेलो असल्यामुळे सर्व विश्वाला भरून राहून लोकांवर उपकार करण्यासाठी उरलो आहे. ४

१५८८ ह्मणवितों दास । परि मी असें उदास ॥ १ ॥
हाचि निश्चय माझा । परि मी निश्चयाहुनि दुजा ॥ २ ॥
सरतें कर्तृत्व माझ्यानें । परि मी त्याही हून भिन्न ॥ ३ ॥
तुका तुकासी तुकला । तुका तुकाहुनि निराळा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा.- दुजा- निराळा, सरतें- पूर्ण होते.

अर्थ.- मी स्वतःला श्रीहरीचा दास म्हणवितो; पण खरोखर मी तसा फारच उदास आहे. १ असाच माझा निश्चय झाला आहे. परंतु मी या निश्चयाहून निराळा आहे. २ माझ्या योगाने सर्व कर्तृत्व पूर्ण होत असेल, पण मी त्या कर्तृत्याहून निराळा आहे. ३. तुकाराम महाराज म्हणतात, मी परब्रह्माच्या तुलनेस उतरलो. परंतु खरे पाहाता मी त्या तुलनेच्या स्थितीहूनही निराळा आहे. ४

१५८९ घोंटवीन लाळ ब्रह्मज्ञान्या हातीं । मुक्तां आत्मस्थिती सांडवीन ॥ १ ॥
ब्रह्मभूत होते कायाच कीर्तनीं । भाग्य तरी ऋणी देवा ऐसा ॥ २ ॥

---

[1] आठवितो, [2] जो का.

तीर्थभ्रामकासी आणीन आळस । कडू स्वर्गवास करिन भोग ॥ ३ ॥
साडवीन तपोनिधा अभिमान । यज्ञ आणि दान लाजवीन ॥ ४ ॥
भक्तिभाग्यप्रेमा[1] साधीन पुरुषार्थ । ब्रह्मींचा जो अर्थ निजठेवा ॥ ५ ॥
धन्य ह्मणवीन यह लोकीं लोका । भाग्य आह्मीं तुका देखियला ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – साडवीन– सोडण्यास लावीन, ब्रह्मभूत– ब्रह्मस्वरूप, तीर्थभ्रामकासी– तीर्थयात्रेसाठी भ्रमण करणाऱ्यांना

अर्थ – मी ब्रह्मज्ञानी माणसास वाट चोखायला लावीन आणि आत्मस्थिती ज्यांना प्राप्त झाली आहे अशा मुक्तांना ती स्थिती सोडायला लावीन १ कारण श्रीहरीच्या या कीर्तनातच शरीर ब्रह्मरूप होते व देवास ऋणी करण्याचे भाग्य भोगायला मिळते २ तीर्थयात्रा करणारे जे कुणी आहेत त्यांना मी आळस आणीन, स्वर्गवास व तेथील नाना प्रकारचे भोग यांना मी कडवट करून दाखवीन ३ जे कुणी तपोनिधी आहेत, त्यांचा अभिमान मी दूर करीन यज्ञ आणि दान करणाऱ्यांना मी लाजवीन ४ भक्तीच्या प्रेमाने व भाग्याने मी परमेश्वरास जाऊन मिळण्याचा पुरुषार्थ साधीन परब्रह्माचा जो अर्थ आहे तो स्वतःचा ठेवा असल्यासारखे करीन ५ तुकाराम महाराज म्हणतात, या लोकातील लोकांकडून मी असे म्हणवून घेईन की आम्ही भाग्यवान व धन्य आहोत, आम्ही तुकाराम महाराजांना पाहिले ६

१५९० संसाराचे अंगीं अवघींच व्यसनें । आह्मी या कीर्तनें शुद्ध जालों ॥ १ ॥
आतां हें सोंवळें जालें त्रिभुवन । विषम धोऊन सांडियेलें ॥ २ ॥
ब्रह्मपुरीं वास करणें अखंड । न देखिजे तोंड विटाळाचें ॥ ३ ॥
तुका ह्मणे आह्मा एकांताचा वास । ब्रह्मीं ब्रह्मरस सेवूं सदा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा –व्यसनें–संकटे, विषम–अशुद्ध, हीन,

अर्थ – या संसाराच्या ठिकाणी सर्व संकटच उपाधीच आहेत, पण आम्ही मात्र या कीर्तनभक्तीच्या मार्गाने शुद्ध स्वरूपास येऊन पोचलो १ आता हे त्रिभुवन आम्हास शुद्ध स्वरूपाचे झाले आहे आम्ही त्यातील अशुद्ध भावच धुऊन टाकला आहे सोडून दिला आहे २ आता ब्रह्मस्वरूपात अखंडपणाने निवास करीत आहे त्यामुळे देहात्मबुद्धी प्रपंचवृत्ती, सुखदुःखादी भावना यांच्या विटाळाचे तोंडही दिसत नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात आता आमचे वास्तव्य एकांतात असून नेहमी ब्रह्मस्वरूपात राहून आम्ही ब्रह्मरसाचेच सेवन करू ४

१५९१ तुह्मी सनकादिक संत । ह्मणविता कृपावंत ॥ १ ॥
एवढा करा उपकार । देवा सांगा नमस्कार ॥ २ ॥
भाकूनि करुणा । विनवा वैकुंठींचा राणा ॥ ३ ॥
तुका म्हणे मज आठवा । मूळ लवकरी पाठवा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – भाकूनि– विनवणी करून मूळ–निमंत्रण बोलावणे

अर्थ – अहो सनकादिक संत लोकहो तुम्ही कृपावंत आहात ना ? १ मग एवढा एक उपकार माझ्यावर करा ना तुम्ही माझा नमस्कार व निरोप देवाला सांगा ना २ माझ्यासाठी त्याला विनवणी करून करुणापूर्वक शब्दात त्या वैकुंठीच्या राण्यास सांगा ३ तुकाराम महाराज म्हणतात त्या देवाला असे सांगा की माझी आठवण करा व मला घेऊन जाण्यासाठी बोलावणे पाठवा ४

१ भक्ति भाग्य सीमा ।

१५९२ आपुल्या माहेरा जाईन मी आता । निरोप या सता हातीं आला ॥ १ ॥
सुख दु ख माझें ऐकिले कानीं । कळवळा मनीं करुणेचा ॥ २ ॥
करुनी सिद्ध मूळ साउले भातुके । येती दिसे एके न्यावयासी ॥ ३ ॥
त्याचि पयें माझें लागलेसे चित्त । वाट पाहे नित्य माहेराची ॥ ४ ॥
तुका म्हणें आता येतील न्यावया । अगें आपुलिया मायबाप ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – मूळ–बोलवणे, निमत्रण, साउलें–वस्त्र, भातुके–खाऊ

अर्थ – मी आता माझ्या माहेरास जाईन, कारण या सताच्या हाती तिकडून मला निरोप आला आहे १ माझ्या सुखदुखाची हकीगत माझ्या आईबापानी कानानी ऐकली असेल, आणि त्यांच्या मनात करुणेचा कळवळा आला असेल २ त्यानी मला बोलावणे पाठविण्याची तयारी वस्त्र व खाऊ पाठवून केलेली दिसते ते मला नेण्यासाठीच येत आहेत असे दिसते ३ त्याच्याच मार्गाकडे माझे चित्त एकसारखे लागले आहे मी आता रोज माहेराचीच वाट पाहात आहे ४ तुकाराम महाराज म्हणतात, आता मला ते न्यायला लौकरच येतील ५

१५९३ चिन्हे उमटतीं अगीं । शकुना जोगी उत्तम ॥ १ ॥
आठवला बापमाय । येइल काय मूळ नेणो ॥ २ ॥
उत्कठित जाले मन । तेचि खुण तेथीचि ॥ ३ ॥
तुका म्हणे काम वारीं । आळस घरीं करमेना ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा –मूळ–बोलावणे, निमत्रण, काम वारीं–लौकिक कामासबधी

अर्थ –आज माझ्या अगावर शुभशकुनाची चिन्हे उमटत आहेत १ ती अशी की, मला आज माझ्या आई-बापाचे स्मरण झाले आहे त्याचे बोलावणे बहुधा आज माझ्याकडे येईल २ माझे मन त्याच्याविषयी अतिशय उत्कठित झाले आहे हीच खूण त्याच्या येण्याची होय ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा परिस्थितीत माझे मन रमत नाही लौकिक कामासबधी आळस येतो घरी करमेनासे झाले आहे ४

१५९४ आरोनिया पाहे वाट । कटकट सोसेना ॥ १ ॥
आलिपास पुसे मात । तेथें चित्त लागले ॥ २ ॥
दळीं कांडीं लोकाऐसें । परि मी नसे ते ठायीं ॥ ३ ॥
तुका म्हणे येथें पिसे । तेथें तैसे असेल ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – आरोनियां–अत्यत उत्सुक होऊन, मात–हकीगत, वार्ता पिसे–वेड

अर्थ –मी मोठ्या उत्सुकतेने माझ्या आईबापाची वाट पाहात आहे मला आता ही लौकिक गोष्टींची कटकट सोसवत नाही १ माहेराच्या वाटेने जे कुणी येणारे दिसते त्यास मी आईबापाची वार्ता विचारीत आहे माझे सर्व चित्त तिकडेच गुतले आहे २ दळणकाडणादी व्यवहार मी इतर लोकासारखे करीत असतानाही माझें चित्त त्या कामांत बिल्कुल नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, मला माझ्या माहेरच्या माणसाचे वेड लागले आहे व त्यानाही माझे असेच वेड लागले असणार ४

१५९५ येथीलिया अनुभवे । कळों जीवें हें येतसे ॥ १ ॥
दोहीं ठायीं एक जीव । माझी कींव त्या अगीं ॥ २ ॥

भूक भुकेचि खाउनि धाय । नाहीं हाय अन्नाची ॥ ३ ॥
तुका म्हणे सुख जालें । अंतर धालें त्यागुणे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा– धाय–सतुष्ट होते, हाय–हाव, अतर–मन, अंत करण, धालें–तृप्त झाले

अर्थ –येथील अनुभवावरून असे वाटते की, १ माझ्या व माझ्या आईबापांच्या ठिकाणी असणारा जीव एकच आहे यामुळे त्याच्या चित्तात माझ्याविषयी कीव वा कणव असलीच पाहिजे २ आता भूकच भुकेला खाऊन तृप्त झाली आहे आता अन्नाविषयी हाव माझ्या मनात मुळीच उरलेली नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, आज माझे अंत करण यामुळे फारच तृप्त झाले असल्याने मला फारच सुख झाले आहे. ४

१५९६ पैल आले हरि । शंख चक्र शोभे करीं ॥ १ ॥
गरुड येतो फडत्कारें । ना मी ना मी म्हणे त्वरे ॥ २ ॥
मुगुटकुंडलांच्या दीप्ति । तेजें लोपला गभस्ति ॥ ३ ॥
मेघश्यामवर्ण हरि । मूर्ति डोळस साजिरी ॥ ४ ॥
चतुर्भुज वैजयंती । गळां माळ हे रुळती ॥ ५ ॥
पीतांबर झळके कैसा । उजळल्या दाही दिशा ॥ ६ ॥
तुका जालासे संतुष्ट । घरा आले वैकुंठपीठ ॥ ७ ॥

शब्दार्थ व टीपा – पैल–पलीकडून, दीप्ति–तेजाने, गभस्ति–सूर्य

अर्थ –ज्याच्या हातांत शंख, चक्र, गदा, पद्म इत्यादी आयुधे शोभत आहेत, असे श्रीहरी पलीकडून येत आहेत. १ त्याच्या गरुडवाहनाचा फडत्कार ऐकू येत असून ' तू भिऊ नकोस, भिऊ नकोस ' असेच जणु तो त्वरेने म्हणत आहे २ त्याच्या मस्तकावरील मुकुटाच्या व कानांतील कुंडलाच्या तेजाने आकाशातील सूर्य निस्तेज झाल्यासारखा दिसतो ३ या श्रीहरीचा वर्ण मेघासारखा सावळा असून याची मूर्ती चांगली साजरी व सुंदर दिसत आहे ४ यास चार हात असून याच्या गळ्यात वैजयंती माळ रुळत आहे ५ याचा पीतांबर असा झळकत आहे की, जणु त्यामुळे दाही दिशा उजळून गेल्या आहेत ६ तुकाराम महाराज म्हणतात, माझ्या घरी आज वैकुंठपीठ आले असल्यामुळे मी अगदी संतुष्ट झालो आहे ७

१५९७ शंखचक्रगदापद्म । पैल आला पुरुषोत्तम ॥ १ ॥
ना भी ना भी भक्तराया । वेगीं पावलों सखया ॥ २ ॥
दुरुनि येतां दिसे दृष्टी । धाकें दोष पळती सृष्टी ॥ ३ ॥
तुका देखोनि एकला । वैकुंठींहूनि हरि आला ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा –पैल–पलीकडे, ना भी–भिऊ नकोस, वेगीं–त्वरेने, लगबगीने.

अर्थ –शंख, चक्र, गदा, पद्म या आयुधांनी शोभणारा हा श्रीहरी पुरुषोत्तम पलीकडच्या तीरावर आलेला दिसतो १ 'भक्तश्रेष्ठा, तू भिऊ नकोस, भिऊ नकोस मी तुझ्यासाठी लगबगीने येत आहे ' असेच जणु तो म्हणत आहे. २ तो दुरून येतानाच दृष्टीस पडतो व त्याच्या धाकाने सृष्टीमधील सर्व दोष पळून जातात ३ तुकाराम महाराज म्हणतात, मला एकटयाला पाहून वैकुंठाहून हा श्रीहरी माझ्यासाठी आलेला आहे ४

१५९८ पैल दिसतील भार । दिंडी पताका अपार ॥ १ ॥
आला पंढरीचा राणा । दिसतील त्याच्या खुणा ।
सुख वाटे मना । डोळे बाह्या स्फुरती ॥ २ ॥
उठिले गजर नामाचे । दळभार वैष्णवांचे ॥ ३ ॥
तुका करी रिता ठाव । त्यांसी बैसावया वाव ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपाः- भार-समुदाय, अपार-असंख्य, बाह्या-बाहू, हात, दळभार-समुदाय, रिता-रिकामा, ठाव-जागा. वाव-जागा.

अर्थ -पलीकडे असंख्य दिंड्या, पताका यांचे समुदाय दिसत आहेत. १ आज खरोखर पंढरीचा राणा आलेला दिसतोय. त्याच्या येण्याच्या खुणाच सर्वत्र दिसतात. २ त्याच्या येण्याने मला केवढे सुख वाटत आहे! त्यामुळें माझे डोळे व बाहू स्फुरण पावतात. ३ वैष्णवांच्या समुदायांतून श्रीहरीच्या नामाचे गजर एकसारखे होत आहेत ४ तुकाराम महाराज म्हणतात, त्यांना बसण्यासाठी मी उठून जागा रिकामी करीत आहे ५

१५९९ चला जाऊं रे सामोरे । पुढें भेटों विठ्ठल धुरे ॥ १ ॥
तुका आनंदला मनीं । कैसा जातो लोटांगणीं ।
फेडावया धणी प्रेमसुखाची आजि ॥ २ ॥
पुढें आले कृपावंत । मायबाप साधुसंत ॥ ३ ॥
तुका आळंगिला बाहीं । ठेविला विठोबाचे पायीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा - धुरे-श्रेष्ठ, धणी-तृप्ती, बाहीं-हातानी.

अर्थः-चला, आपण सर्वजण संतांना व विठ्ठलाला सामोरे जाऊ, त्या श्रेष्ठ विठ्ठलाला जाऊन भेटू. १ मला तुकारामाला आज फार मोठा आनंद मनात झालेला आहे. आज मनाची तृप्ती व्हावी म्हणून मोठ्या प्रेमाने मी त्याला लोटांगण घालीन. २ मायबाप असलेले कृपावंत साधुसंत हे पुढे आले आहेतच. ३. तुकाराम महाराज म्हणतात, मला त्या साधुसंतांनी आपल्या हातानी कवटाळून आलिंगन देऊन विठ्ठलाच्या पायावर ठेविले ४

१६०० पाहुणे घरासी । आजि आले हृषीकेशी ॥ १ ॥
काय करूं उपचार । कोंप मोडकी जर्जर ॥ २ ॥
कण्या दरदर । पाण्यामाजी रांधिल्या ॥ ३ ॥
घरीं मोडकिया बाजा । वरि वाकळांच्या शेजा ॥ ४ ॥
मुखशुद्धि तुळसी दळ । तुका म्हणे मी दुर्बळ ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा.- उपचार-आदरसत्कार, कोंप-झोपडी, जर्जर-जीर्ण, जुनी, शेजा-अंथरूण.

अर्थ -आज त्रिखंडाचा धनी हृषीकेश माझ्या घरी पाहुणा आलेला आहे. १ त्याचा आदरसत्कार मी करू तरी कसा ? माझी झोपडी जुनी असून मोडकळीस आलेली आहे. २ पाण्यामध्ये मी नुसत्या कण्या दरडून शिज-विल्या आहेत. ३ माझ्या घरी त्या विश्वाच्या धन्याला बसायला द्यायलाही नीटसे आसन नाही. घरीं मोडकी बाज असून त्यावर फाटक्या वाकळांचे अंथरूण मी कसेतरी केले आहे. ४ तुकाराम महाराज म्हणतात, मी फारच दुर्बळ व गरीब असल्यामुळे त्याच्या मुखशुद्धीस केवळ तुळशीचे पानच मी देऊ शकतो. ५

१६०१ सतीं केला अंगीकार । त्यासी अभिमान थोर ॥ १ ॥
काहीं ठेविले चरणीं । घेती तेंचि पुरवूनि ।
तुका पायवणी । घेऊनिया निराळा ॥ २ ॥
नसता काहीं संचित । भेटी जाली अवचित ॥ ३ ॥
देव मिळोनिया भक्त । तुका केलासे सनाथ ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – अंगीकार–स्वीकार, पायवणी–पायाचे तीर्थ संचित–पूर्वपुण्याईचा ठेवा

अर्थ –संतानी माझा स्वीकार केला असल्याने त्याना माझा मोठाच अभिमान वाटतो १ त्याच्या पायावर जे काही ठेवावे ते पुरवून घेतात, मानून राहातात मी तुकारामाने त्याच्या पायाचे तीर्थ घेऊन मी निराळाच राहिलो आहे २ माझ्या पूर्वपुण्याईचा साठा काही विशेष प्रकारचा नसताना त्याची भेट अकस्मात रीतीने झाली ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवाने आणि भक्तानी मिळून मला सनाथ केले आहे ४

१६०२ अवघियाच्या आलों मुळें । एका वेळे न्यावया ॥ १ ॥
सिद्ध व्हावें सिद्ध व्हावे । आधीं ठावें करितो ॥ २ ॥
जोंवरि ते घटिका दुरी । आहे उरी तो काळ ॥ ३ ॥
मंगळाचे वेळे उभे । असों शोभे सावध ॥ ४ ॥
अवघियाचा योग घडे । तरी जोडे श्लाघ्यता ॥ ५ ॥
तुका म्हणे पाहे वाट । बहु आट करूनि ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – मुळें–बोलावणे करण्यासाठी, श्लाघ्यता–संतोष, आनंद, आट–यत्न, प्रयत्न

अर्थ –मी तुम्हा सर्वांनाच बोलावणे करण्यासाठी आलो आहे तुम्हा सर्वांना मला पोचविण्यासाठी न्यायला आलो आहे १ तुम्ही सर्वांनी आता तयार व्हावे आधीच अशी सूचना मी दोनदा करीत आहे २ जोपर्यंत जाण्याचा क्षण दूर आहे तोपर्यंतच उरलेल्या काळात सर्वांनी तयारी करावी ३ मंगलकार्याच्या वेळी सावधपणे व शोभेल अशा रीतीने उभे राहून वेळ साधावी ४ अशा वेळी सर्वांची भेट होण्यानेच मोठा आनंद होतो ५ तुकाराम महाराज म्हणतात, पुष्कळ प्रयत्न करून मी त्या क्षणाची आता वाट पाहात आहे ६

१६०३ सकळ ही माझी बोळवण करा । परतोनि घरा जावें तुम्हीं ॥ १ ॥
कर्मधर्मे तुम्हा असावें कल्याण । घ्या माझें वचन आशीर्वाद ॥ २ ॥
वाढवूनि दिलों एकाचिये हातीं । सकळ निश्चिंती जाली तेथें ॥ ३ ॥
आता मज जाणें प्राणेश्वरासवें । माझिया भावें अनुसरलों ॥ ४ ॥
वाढविता लोभ होईल उशीर । अवघींच स्थिर करा ठायीं ॥ ५ ॥
धर्म अर्थ काम जाला एके ठायीं । मेळविला जिहीं हाता हात ॥ ६ ॥
तुका म्हणे आता जाली हेचि भेटी । उरल्या त्या गोष्टी बोलावया ॥ ७ ॥

शब्दार्थ व टीपा – बोळवण–पाठवणी, पोचविणे

अर्थ–लोकहो तुम्ही सर्व आता मला पोचवून परतून आपापल्या घरी जावे १ कर्मधर्माच्या योगाने यापुढे तुमचे कल्याणच होईल असा माझा आशीर्वाद तुम्ही घ्यावा २ तुम्हीच माझे पालनपोषण केले व मला वाढविले आणि ईश्वराच्या स्वाधीन केल्यामुळें माझ्या मनातील सर्व चिंता दूर झाली ३ आता मला माझ्या प्राणाच्या धन्याबरोबर जायचे आहे मी माझ्या भावनेनेच त्याला अनुसरलो आहे ४ आता तुम्ही लोभ वाढवाल तर मात्र

फार उशीर होईल, म्हणून तुम्ही तुमचे मन व सर्व इंद्रियें आता आपल्याच ठिकाणी स्वस्थ करा. ५ ज्यांनी माझ्या हातात हात दिला आहे, त्यांच्या बाबतीत धर्म, अर्थ, काम हे तीनही पुरुषार्थ एकदमच प्राप्त झाले आहेत. ६ तुकाराम महाराज म्हणतात, आता झाली हीच शेवटची भेट होय असे तुम्ही समजावे. यानंतर आमची हकीकत केवळ बोलण्यापुरती मात्र उरणार आहे. ७

१६०४ बोलिलों तें आतां पाळावें वचन। ऐसें पुण्य कोण माझे गांठीं ॥ १ ॥
जातों आतां आज्ञा घेऊनियां स्वामी। काळक्षेप आम्ही करूं कोठें ॥ २ ॥
न घडे यावरि न धरवे धीर। पीडतां राष्ट्र देखोनि जग ॥ ३ ॥
तुका म्हणे तुम्ही दिसे मोकलिलें। काय आतां आलें जीवित्वाचें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा.– गांठीं–जवळ, मोकलिलें–सोडलेले.

अर्थः–बोलल्याप्रमाणे वचन पाळावे, असे पुण्य आता माझ्याजवळ कुठे आहे? १ अहो स्वामी, मी आता आपली आज्ञा घेऊन जातो. आम्ही कुठेतरी कालक्षेप करू, दिवस कठू. २ राष्ट्रातील सर्व लोक पीडलेले आहेत, कष्टी झालेले आहेत, हे पाहून आमच्याने येथे राहावणार नाही, आम्हांस धीर धरवणार नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, तुम्ही आता मला सोडलेले दिसते, आता जीवित्वास धारण करून उपयोग तरी काय? ४

१६०५ करावें तें काम। उगाच वाढवावा श्रम ॥ १ ॥
अवघें एकमय। राज्य बोलों चालों नये ॥ २ ॥
दुजयाची सत्ता। न चलेसी जाली आतां ॥ ३ ॥
आतां नाहीं तुका। पुन्हा हारपला लोकां ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – दुजयाची–दुसऱ्याची

अर्थः–आता काही लौकिक काम करणे हे उगाच श्रम वाढविण्यासारखे आहे. १ आता सर्व एकमय राज्य झाले असल्याने निराळे बोलणे, चालणे काहीं उरलेच नाहीं. २ आता येथे कुणाची दुसऱ्याची सत्ता चालणार नाही. अशी स्थिती येथे निर्माण झाली आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, आता मी तुकाराम पुन. दिसणार नाही. लोकांच्या दृष्टीने तो आता हरवल्यासारखाच आहे. त्याना मी नाहीसा झालो आहे. ४

१६०६ आम्ही जातों तुम्ही कृपा असों द्यावी। सकळा सांगावी विनंती माझी ॥ १ ॥
वाढवेळ जाला उभा पांडुरंग। वैकुंठा श्रीरंग बोलावितो ॥ २ ॥
अंतकाळीं विठो आम्हांसी पावला। कुडीसहित जाला गुप्त तुका ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपाः– वाढवेळ– उशीर, फार वेळ, कुडीसहित–शरीरासहित.

अर्थः–आम्ही आता जातो. माझ्यावर तुमची कृपा असावी अशी विनंती तुम्ही सर्वांना सांगावी १ श्रीहरी मला वैकुंठाला बोलावीत आहेत फार वेळ झाला असून पांडुरंग तिष्ठत उभे आहेत २ तुकाराम महाराज म्हणतात, हा विठोबा आम्हांस अंतकाळी पावला आहे, प्रसन्न झाला आहे. इतके बोलून देहासहित तुकोबा गुप्त झाले. ३

१६०७ तुका उतरला तुकीं। नवल जाले तिहीं लोकीं ॥ १ ॥
नित्य करितों कीर्तन। हेंचि माझें अनुष्ठान ॥ २ ॥
तुका बैसला विमानीं। संत पाहती लोचनीं ॥ ३ ॥
देव भावाचा भुकेला। तुका वैकुंठासी नेला ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – तुकीं–तुलनेत, लोचनीं–डोळयांनी

अर्थ–मी तुकाराम परब्रह्माच्या तुलनेत पूर्णपणे उतरलो आहे. तीनही लोकांत या गोष्टीचे नवल वाटते १ मी नित्य कीर्तनभक्ती करीत असतो हेच माझे अनुष्ठान आहे २ तुकाराम विमानात बसला असून त्याचे वैकुंठगमन सतलोक डोळयांनी पाहात आहेत ३ देव हा भक्तीचा भुकेला असल्यामुळे त्याने तुकारामास वैकुंठाला नेले असे तुकाराम महाराज म्हणतात ४

१६०८ न देखिजे ऐसे केले । या विठ्ठले दु खासी ॥ १ ॥
कृपेचिये सिंहासनीं । अधिष्ठानीं बैसविलें ॥ २ ॥
वाजता तो नलगे वारा । क्षीरसागरा शयनीं[1] ॥ ३ ॥
तुका म्हणे अवघे ठायीं । मज पायीं राखिले ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा –वाजता–कटाळण्याचा, त्रासण्याचा.

अर्थ–पुन. प्रपंचातील दु खे दिसणार नाहीत असे या विठ्ठलाने केले १ याने आपल्या कृपेच्या सिंहासनाच्या अधिष्ठानावर मला नेऊन बसविले २ क्षीरसागराच्या शयनावर आता त्रासण्याचा अथवा कटाळण्याचा वाराही लागत नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, या श्रीहरीने मला सर्व ठिकाणी रक्षण देऊन आपल्या पायाशी राखले ४

१६०९ वाराणसीपर्यंत असो सुखरूप । सांगावा निरोप संतांसी हा ॥ १ ॥
येथूनिया आम्हा जाणे निजधामा । सवे असे आम्हा गरुड हा ॥ २ ॥
कृपा असों द्यावी मज दीनावरी । जातसो माहेरी तुका म्हणे ॥ ३ ॥

शके १५७१ एकाहत्तरीं विरोधिनामसंवत्सरीं फाल्गुनवद्य द्वितीया ॥ २४ ॥
सोमवासरीं प्रथमप्रहरीं तुकोबा गुप्त जाले ॥ १ ॥

शब्दार्थ व टीपा –वारणसी–कासी, वारणा व असि या नद्यावरील क्षेत्र, निजधामा–वैकुंठाला, सवें–बरोबर

अर्थ–येथून काशीपर्यंत सुखरूप आहोत, असा माझा निरोप सर्व संतांना सांगा १ आता आम्हाला या मृत्युलोकाहून वैकुंठलोकाला जाणे आहे आमच्या बरोबर हा गरुड आहेच २ तुकाराम महाराज म्हणतात, आता मजसारख्या गरिबावर तुमची सर्वांची कृपा असू द्यावी मी माझ्या माहेरी जात आहे ३

विवरण – वरील चौवीस अभंग ' स्वामींनी काया ब्रह्म केली ' त्या वेळेचे आहेत, असे स्पष्ट दिसत नाही गाथ्यातून यांच अभंगाना निर्याणाचे अभंग ' असे म्हटले आहे निरनिराळया गाथ्यात या अभंगाच्या संख्येतही थोडाफार भेद आहे तुकोबाचे निर्याण कोणत्या वर्षी झाले ? शके १५७१ की १५७३ साली ? तुकाराम महाराज वैकुंठलोकी कसे गेले ? ते कुडीसहित म्हणजे सदेह वैकुंठाला गेले काय ? तुकोबानी कीर्तनात आपली काया ब्रह्म केली म्हणजे काय केले ? असे अनेक महत्त्वाचे प्रश्न यामधून निर्माण होतात तुकोबाचे वैकुंठगमन हा एक वादग्रस्त मुद्दा आजही झालेला आहे तुकारामानी जलसमाधी घेतली, तुकोबा हिमालयाच्या यात्रेस निघून गेले, तुकोबा चारचौघासारखेच आपल्या घरीच दिवंगत झाले तुकोबानी विमानातून वैकुंठास प्रयाण केले, असे विविध मतप्रवाह विद्वानानी चर्चा करून रूढ केले आहेत तुकोबानी आपला देह पंचमहाभूतात विलीन केला, असाही एक मत प्रवाह आहे 'तुकोबाचा निर्जीव देह नंतर कुणासच सापडला नाही, म्हणून त्यांच्या अखेरच्या अवस्थेबद्दल मोठेच मतमतांतर दिसून येते

या वादाचे आणखी एक कारण असे की त्यांच्या अंतकाळामध्ये तुकोबानी जे काही तीसबत्तीस अभंग लिहिलेले दिसतात, त्यांच्या खरेपणाविषयीही विद्वानांना शंका वाटते. कारण ' कुडीसहित जाला गुप्त तुका ',' तुका

[1] नयनीं.

वैकुंठासी नेला ' अशी भक्तकाळी विश्वाने वैकुंठवासी झालेले तुकारामबुवा कशी करतील ? या शंकेला उत्तर देणारे आहेतच जे तुकाराम सदेह वैकुंठाला जातात, त्याना नजीकच्या काळातील आपला निर्याणकाल दिसणे काही अशक्य नाही त्यानी जे दिसले तेच स्वमुखाने आधी वर्णन केले व त्यानुसार वैकुंठाचा मार्ग सुधारला, किंवा वैकुंठपीठच त्याना नेण्यासाठी भल्ोवावर अवतरले

असा या मतमतान्तराच्या जजाळात काही तात्त्विक प्रश्नाचीही चर्चा झालेली दिसते तुकोबाच्या वैकुंठाचे स्वरूप तरी कोणते ? त्यानी आपला देह ब्रह्मीभूत केला म्हणजे काय केले ? पचमहाभूतात देहाम समर्पण करण्यातील रहस्य काय ? इत्यादी प्रश्नाचा तात्त्विक खल करणारे लेख विद्वानानी व सशोधकानी लिहिलेले आहेत कुणी पुराणकाळापासून समकालीन पिढीपर्यंत कोणकोण सदेह स्वर्गास वा वैकुंठास गेले याची यादीच तयार केलेली दिसते कुणी योगमार्गाने देह अदृश्य करता येतो, त्याचे रूपान्तर साधता येते असा मुद्दा उपस्थित केला मगेश रामचद्र टाकी याचे या सदर्भात ' श्रीतुकाराम महाराजाचे सदेह श्रीवैकुंठगमन ' या नावाचे एक पुस्तक पाहाण्यासारखे आहे. श्रीतुकाराम महाराज सदेह म्हणजे लिंगदेहाने स्वधामास म्हणजेच अनादि-श्रीवैकुंठास कसे गेले व त्यानी आपला स्थूल देह 'आपोनारायण' कसा केला याचे विस्तृत वर्णन त्यानी केले आहे महाराजाचा स्थूल देह ' आपोनारायण ' झाला हे सिद्ध करण्यासाठी या लेखकाना ' निजधाम निर्याणाचे अभग ' सागली येथील ' कैवल्य धामा ' तील श्रीबापुरावजी कोटनीस याच्याकडून मिळाले हे अभग श्रीमहिपतीबावाच्या ' भक्तलीलामृत ' ग्रथात वर्णन केल्याप्रमाणे महाराज पुष्पक विमानात बसून चार कोस दूर गल्यानतर विमान थाबवून भक्तवृन्दास पाठविले अशी श्री टाकी याची विचारसरणी आहे रा कोटनीस याच्या वहीतील अभगावरून तुकोबाचा स्थूल देह जलरूप झाल्याचा निर्णय ग्रथकर्त्यानि काढलेला आहे

मंगेश रामचद्र टाकी याच्याही आधी डॉ रा ग. हर्षे यानी ' तुकाराम ' या नावाचे एक विवेचक पुस्तक लिहिले असून त्यातही तुकोबाच्या अखेरीविषयी फार चागली व समर्पक अशी चर्चा केलेली आहे श्री हर्षे याना नगर जिल्ह्यातील दोवगाव येथील विठ्ठलाचे पुजारी पुरुषोत्तमबुवा याच्या जीर्ण वाड्यात ' तुकाराम महाराजाच्या निर्णयाचे अभग असल्याची नाद सापडली, त्या अभगातील ' जाले परब्रह्म घोट्याखालीं शून्य ' ' गुढघाइतका गेला पाण्यात विठनि ', ' माड्या वर्ते पाणी जाले तें शरीर ', ' कठ आणि उर तें जोवन ' इत्यादी ओळीवरून तुकोबानी जलसमाधी घेतली असावी, असा निष्कर्ष रा हर्षे यानी काढला आहे फार तर ही जलसमाधी लोकाना चुकवून त्यानी घेतली असावी असे त्याना वाटते परतु रा टाकी याच्या मते जलसमाधी घेणे निराळे आणि देह ' आपोनारायण ' करणे निराळे

तुकाराम महाराजाचे वैकुंठगमन हा एक अति वादग्रस्त मुद्दा झालेला आहे ज्या अभगावरून काही तपास करावा त्या अभगाच्या अस्सल स्वरूपाबद्दल मतभेद आहेत वरील स्थूल स्वरूपाच्या विवेचनावरून जिज्ञासूनी यासबधी आणखी विचार करावा तूर्त तुकोबाच्याच समजल्या जाणाऱ्या काही अभगावरून त्याच्या वैकुंठगमनाचे स्वरूप समजावून घेण्याचा प्रयत्न करू

ससाराच्या तापाने तप्त होऊन तुकोबा परमार्थाकडे वळले घरी असलेली विठ्ठलभक्ती त्यानी पुन निष्ठेने चालू केली भागनाथ, भडाऱ्याच्या डोंगरावर नामस्मरण, सद्ग्रथाचे वाचन-चिंतन-मनन याच्या साह्याने बुवाचा साधनक्रम सुरू झाला सद्गुरूची कृपा झाली नामदेवाचा उपदेश झाला आणि हळूहळू तुकोबाच्या आयुष्यक्रमात बदल झाला मनाला नित्य अकुश लावून रोज नवी जागृती त्याना येऊ लागली ' तुका झाला पाडुरंग ' या अवस्थेला तुकाराम महाराज पोचले ज्यासाठी साऱ्या जीविताचा अट्टहास झाला ते प्राप्त झाले ' सुटलीया धावा सुर्णेसिया ' अशी अवस्था प्राप्त जाली ' सर्व सुखें पायीं चोळगती ' याहून दुसरे श्रेष्ठ भाग्य कोणते ? ' पुसिलें पडळ तिमिर विठ्ठें । जगचि भरलें ब्रह्मानदें ' असा अनुभव येत राहिला. ' तुका म्हणे पोट भरे ' इतकी तृप्तता आली ' वृत्तिसहित मन रिघे प्रेमडोहीं । नाठवती देहीं देहभाव ' या वचनानुसार सर्वत्र विठ्ठल भरून राहिल्याची प्रचीती आली ' हांसो रसों आता वाडू आवडी । अतरींची गोडी अबोट ते ॥ सेवा सुखें करू विनोद वचन । आम्ही नारायण एकाएकीं ' असा थोर भूमिकेवर त्र सुसवाद करू लागले. ' तुका म्हणे आतां बोलों अबोलणें ।

काया वाचा मनें उरलों नाहीं ' अशा मनःस्थितीने तुकोबा तृप्त होऊन गेले 'लवण मेळविता जळें। काय उरलें निराळें ? । तैसा समरस झालों। तुजमाजी सामावलों ' अशी स्थिती ज्यानी अनुभवली त्याना या जगात आता दुसरे काय हवे होते ? ' तुका म्हणे आता आनंदी आनंदु। गोविंदें गोविंदु विस्तारला ' अशा स्वानंदात ते रममाण झाले.

तुकोबासारखे भगवद्भक्त स्वतःच्या साक्षात्कारात, स्वसुखात इतर जगाला कसे विसरतील ? त्याच्या स्वसुखात अवघ्या जगाची चिंता असते सर्वसामान्याना सन्मार्गास लावणे हा त्याच्या स्वसुखाचाच एक भाग असतो *जे रंजले, गांजले आहेत त्याना ते जवळ करतात*, त्याचे अश्रू पुसतात, त्याच्या मनाचे कष्ट दूर करतात 'तुका म्हणे आता उरलों उपकारापुरता ' अशाही भूमिकेवरील कार्य पूर्ण होत आले. ' आपण जेवुनि जेववी लोका। सतर्पण करी तुका ' असे स्वतः बुवानीच आपल्या याही कार्याचे वर्णन केले आहे स्वतःच्या उद्धाराबरोबरच इतराचाही उद्धार होऊन कृतार्थ झाल्यावर मग या जगात काय कार्य उरते ? ' तुका म्हणे केला अवघियाचा उद्धार। आता नमस्कार शेवटीचा ' या अखेरच्या भूमिकेवर तुकाराम महाराज उभे राहिले.

संतश्रेष्ठ तुकोबाना आपली अखेर जवळ आल्याचे समजले, त्या अवस्थेमधील काही भाग त्यानी पाहिलाही असावा. ' आपुलें मरण पाहिलें मी डोळा ', ' बोळविला देह आपुलिये हातें ', ' जाला प्रेतरूप शरीराचा भाव ', ' जरा कर्णमूळीं सांगो आली गोष्टी। मृत्यूचिये भेटी जवळी आली ' इत्यादी वचनावरून तुकोबाना आपल्या अखेरची चाहूल उमगली होती असे वाटते. तुकाराम महाराजाच्या अखेरच्या दिवसाचे सूक्ष्म मनोरेखाटन करणे अतिशय अवघड असे काम आहे फाल्गुन वद्य २ या दिवशी तुकोबानी वैकुंठास प्रयाण केले याच्या आधीचे काही दिवस तपशीलाने उपलब्ध नाहीत. परंतु कार्तिक वद्य एकादशीस ते आळंदी येथे श्रीज्ञानेश्वर महाराजाच्या यात्रेस आले असावेत. तेथे समाधीपुढे त्यानी अखेरचे कीर्तन केले. ' भक्ति तें नमन वैराग्य तो त्याग ' हा अभंग कीर्तनाचा असावा सर्व भूतमात्र व पंढरीनाथ यातील अभेद त्यानी वर्णन केला ' जें जें भेटे भूत। तें तें मानिजे भगवंत ' या ज्ञानेश्वराच्या उक्तीप्रमाणे सर्व भूतमात्रात भगवताची प्रचीती आपणास यावी असा त्याचाही उपदेश होता. त्याचा भर कीर्तनभक्तीवर होता. या जड देहाने आपणास ब्रह्मरूप कसे प्राप्त होणार ? या प्रश्नाचा विचार करीत असतानाच त्यानी उपायही एका अभगात सांगितला ' घोटवीन लाळ ब्रह्मज्ञान्या हातीं ' हा त्याचा प्रसिद्ध अभग या संदर्भात फारच महत्त्वाचा आहे ' ब्रह्मभूत काया होतसे कीर्तनीं ' असे त्यांनी आग्रहाने प्रतिपादन केले ब्रह्मज्ञान, मुक्ती, तीर्थयात्रा, स्वर्गवास, तपश्चर्या, यज्ञ, दान इत्यादी मार्गापेक्षा कीर्तनभक्तीच श्रेष्ठ, असे त्यानी पुन पुन प्रतिपादन केले याच कीर्तनरसात आपला देह ब्रह्मस्वरूपाचा करता येतो, हा त्याच्या निरूपणाचा भावार्थ. कीर्तनात मानवी देह ब्रह्मस्वरूपाचा होतो म्हणजे काय ? याचा साधा अर्थ असा की, कीर्तनाच्या आरंभी आपण देहाच्या इंद्रियवृत्तीवर असतो. आपली सुखदुःखे लौकिक स्वरूपाची असतात पण पुढे कीर्तनात जसजसा रंग भरत जातो तसतसा आपला देहरूप भाव पालटतो वृत्तींतून अंतर पडते *मनबुद्धीचे तादात्म्य ईश्वराशी होते निजानंदाची* आपणासच आपल्या ठिकाणी अनुभूती येते. हेच खऱ्या अर्थाने संतानी वैकुंठपीठ मानले आहे याचा अनुभव घेणे म्हणजेच काया ब्रह्मरूप करणे होय.

एकनाथ महाराजानी या विषयाचे विवेचन बहारदार पद्धतीने केले आहे भक्त प्रेमळपणाने कीर्तन करतो तेव्हा त्याच्या हृदयात श्रीहरीचे ध्यान साकारते त्याचीच सर्व चिन्हे भक्ताच्याही अंगावर उमटतात ' भक्त कीर्तन करी जेणें ध्यानें। तें ध्यान दृढ ठसावें मनें। तेव्हा देवाचीं निज चिन्हें। भक्तें पावणे सपूर्ण ॥ श्याम चतुर्भुज पीतांबरधारी। शंखचक्रादि आयुधें करीं। हें स्वरूपता भक्तातें धरी। कौस्तुभ गळां भाळीं ॥ तेव्हां देव भक्त समसमान। समान अवयव सम चिन्ह। भावें करितां हरिकीर्तन। एवढें महिमान हरिभक्ताचें ॥ भावें करितां हरिकीर्तन। तेणें सतोषे जनार्दन। उभयता पडे आलिंगन। मिठी परतोन सुटेना ॥ तेव्हां सबाह्यांतरा। देवो प्रगटे घराघरीं। दुसरे देखावया ससारीं। सर्वथा उरी उरेना ' अशा प्रकारच्या कीर्तनातील तादात्म्यातूनच वैकुंठ उभे राहते, व भक्ताची काया ब्रह्मरूप होऊन जाते

आळंदीस कीर्तन केल्यानंतर तुकोबांना या बाह्य जगाविषयी पूर्ण उदासीनताच वाटू लागली 'तुका म्हणे नाहीं आघाताचा वारा। ते स्थळीं दातारा ठाव माग ' म्हणून तुकोबांच्या मनास ध्यास लागला आता आपणास या मृत्युलोकाचा निवास नको अशीच विनवणी ते करू लागले ' तरी तुज भक्ताची आण देवा। जरी तुका येथें ठेवा ' अशा निकरावरही मधून मधून ते भेत असत आपल्या आयुष्याच्या शेवटची वेळ आली असल्याचे त्यानी ओळखून आपल्या कुलदेवतेचेही स्मरण केले ' शेवटील घडी बुडतो न वेळ। साधावा तो काळ जवळी आला। तुका म्हणे चिंति कुळींची देवता। बारावा भोंवती मिथ्या शब्द ' मग त्यानी आपल्या मनातील व्यथा नारायणास कळविली ' आता दिसों नये जना। ऐसें करा नारायणा ' अशी त्यानी विनंती केली सनकादिकाना विनंती करून ' मूळ लौकरी पाठवा ' असा देवास त्यानी निरोप दिला आता आपण आपल्या माहेरास जाणार याचेच सुख त्यांच्या मनास फार झाले स्वत मायबाप नारायण आपणास न्यायला येणार, हा सताचा निरोप ऐकून तुकोबा मुखावले त्याना शुभशकुन होऊ लागले आल्यागेल्याना ते पंढरीरायाची हकीगत विचारू लागले रोजच्या व्यवहारातील त्याचे लक्ष उडून गेले

एवढ्यात तुकोबा ज्यासाठी उत्सुक होते, तेच सुख समोर अवतरले शखचक्राने शोभणारे श्रीहरी नदीच्या पलीकडच्या तीरावर त्याना दिसू लागले ' भिऊ नकोस, भिऊ नकोस 'असे शब्द आपल्या पखाच्या फडत्काराने गरुड करीत असल्याचे त्यानी ऐकले श्रीहरीच्या मुकुटाच्या तेजाने आकाशातील सूर्य लोपून गला ' मेघश्यामवर्ण हरि। मूर्ती डोळस साजिरी। चतुर्भुज वैजयंती। गळां माळ हे रुळती ' हे सगुणसुंदर रूप पाहून बुवाचे मन सतुष्ट झाले श्रीहरीच्या पीतांबराच्या तेजाने दाही दिशा उजळून गल्या तुकोबा तृप्त झाले कारण ' घरा आले वैकुंठपीठ ' हा अनुभव काही लहानसहान नव्हता श्रीहरीबरोबरच अनेक साधुसत आले दिंड्यापताकाची एकच गर्दी उसळली नामस्मरणाचा एकच गजर झाला तुकोबा श्रीहरीस भेटण्यासाठी सामोरे गेले पांडुरगाने तुकोबांना दोन्ही हातानी आलिंगन देऊन सताच्या चरणावर ठेविले देवानी भक्ताला भेट देऊन ' तुका केलासे सनाथ '

या त्रिखंडाच्या धन्याचा पाहुणचार कसा करावा ? तुकोबाच्या मनाची फारच धांदल उडाली त्याची झोपडी मोडकळीस आली होती पाण्यात कशा तरी कण्या शिजत टाकल्या मोडक्या बाजेवर फाटकी वाकळ टाकून पांडुरगास त्यानी त्यावर बसविले तुळशीदळाची मुखशुद्धी त्यानी पांडुरगास दिली हा दिवस फाल्गुन नु १० मीचा होता ही ' कण्याची दशमी ' आजही वारकरीपंथात प्रसिद्ध आहे येथून पुढचे पाचसहा दिवस नामसंकीर्तनात व देवाच्या सहवासात मोठ्या सुखाचे गेले प्रतिपदेच्या दिवशी तुकारामानी अखेरची निरवानिरव केली 'माहेरींचा मज आल्यासे मुराळी। उद्यां प्रात काळीं जाणें मज म्हणून त्यानी लगबग केली द्वितीयेच्या दिवशी त्यानी आपल्या पत्नीचा निरोप घेतला ' सडासमार्जन तुळशी वृंदावन। देवाचें पूजन करीत जावें ' असा तिला उपदेश केला आपल्या प्रेमळ भक्ताना आलिंगन दिले रामेश्वरभट्ट, कोंडभट, गगाधरपत मवाळ, सताजी जगनाडे, नावजी माळी, शिवजी कासार, लोहगावचे बाळाजी जोशी, कोंडबा पाटील, तुकारामाचे पुत्र महादेव, विठोबा हा सर्व मळावा महाराजाच्या नित्य परिवारातील त्याना काही कळून चुकले असाव महाराजानी प्रत्येकाचा प्रमाने निरोप घेतला बधु कान्होबास प्रेमाने आलिंगन दिले ' आम्ही जातों आमच्या गावा। आमचा राम राम घ्यावा ' या शब्दात तुकोबानी सर्व लोकाना प्रसगाची जाणीव करून दिली ' सकळही माझी बोळवण करा ' म्हणून त्यानी सर्वाना विनती केली ' वाढवेळ झाला उभा पांडुरंग। वैकुंठा श्रीरंग बोलावितो। अतकाळीं विठो आम्हांसी पावला। कुडीसहित जाला गुप्त तुका ' तुकाराम महाराज नामस्मरणाच्या गजरात एकाएकी अदृश्य झाले ' देव भावाचा भुकेला। तुका वैकुंठासी नेला ' देहूस निर्माण झालेले चैतन्य अशा रीतीने ब्रह्मस्वरूपात विलीन झाले

तुकोबाची काया याप्रमाणे कीर्तनाने व नामस्मरणाने ब्रह्मरूप झाली त्याचे शरीर सापडले नाही ते सदेह वैकुंठास गेले असेच जो तो म्हणू लागला ' कीर्तन करितां अदृश्य झाले ' ( तुकारामसुत नारायणबाबा ) ' म्हणे रामेश्वर सकळां पुसोनि। गेला तो विमानीं बैसोनियां ' ( रामेश्वरभट ) मानवदेहे घेऊनि निजधामा गेले ' ( निळोबा ) ' नरदेहा घेऊनि प्राणी गेला तो ऐसा प्राणी ' ( रगनाथस्वामी निगडीकर ) ' तुका बसोनी विमानाप्रती। वैकुंठाप्रती चालिला ' ( महीपती ) ' सतांनि कीर्ति केली। कुडी सायोजी नेली ' ( बहेणेश्वर )

' कीं सतनु मुक्त झाला योगाची सिद्धी हे तुकारामीं ' ( मारोपंत ) ' विमानीं बैसविला जडदेह ' ( राजाराम प्रासादी ) ' जडदेह कसा घेऊनि गेला तुकाराम वाणी ' ( विठ्ठलराव आजरेकर ) इत्यादी समकालीन व नंतरच्या संतांच्या वचनातून तुकोबा सदेह वैकुंठाला गेल्याची गाथा प्रसिद्ध आहे

तुकोबाचा सदेह वैकुंठप्रयास हा सतत चर्चेचा विषय होत आहे योगप्रक्रियेने तुकोबानी आपले शरीर जळल्प केले,अदृश्य केले ते कसे, याचा उलगडा आजपर्यंत तज्ञ करीन राहिले आहेत यापूर्वी अनेकानी सशरीर स्वर्गारोहण वा वैकुंठगमन केल्याच दाखलेही पुराणातून मिळतात कौशिकाची भगिनी सत्यवती, त्रिशकू याच्यासारखी उदाहरणे घोघडी जातात ज्यानी मृत्युलोकाची थारवी अनेकदा मुक्तकठाने गाइली, साधुसंताच्या समागमास, नामसकीर्तनास महत्त्व दिले मुक्तीला तुच्छ मानले, ते तुकाराम महाराज वैकुंठाला जाताना सशरीर का गेले ? योगमायेने त्यानी हे घडय का केले ? योगयाग, रिद्धीसिद्धी याचा तर त्याना मनस्वी कटाक्ष मग आयुष्याच्या अखेरीस सदेह वैकुंठास जाण्याचा चमत्कार त्यानी का करावा ? की त्याच्या अखेरीच्या प्रसंगाचे ज्ञान नीट न झाल्याने भक्तानी ही चमत्कारपरपरा चालू केली ? यासारख्या प्रश्नाची उत्तरे शोधण्यासाठी तज्ज्ञ व व्यासगी तत्पर आहेतच तुकाराम महाराज कशा रीतीने अदृश्य झाले हा एक सशोधनाचा व तत्त्वचर्चेचा विषय असला तरी त्यायोगे त्याचे परम भक्तीने नटलेले जीवन दृष्टिआड होणार नाही, ईश्वरी प्रेमात एवढा रगलेला दुसरा सतपुरुष नामदेवाखेरीज नाही

तुकोबाच्या प्रयाणकाळचा दिवस सोमवार की शनिवार ? हाही वादाचा मुद्दा आहे शके १५७१ की १५७३ यासबधीही एकमत नाही परपरा असे मानते की ' शके १५७१ फाल्गुन व २ सोमवासरी प्रथम प्रहरी तुकोबा गुप्त जाले ' पण त्या वर्षीचे पचाग असे सागते की, या दिवशी शनिवार होता तेव्हा शके १५७१ मानायचा तर वार शनिवार कायम करायला हवा आणि वार सोमवार कायम समजायचा असेल तर तो शके १५७३ च्या फाल्गुन व २ ला येतो

१६१० जाती पढरीस । म्हणे जाईन तयास ॥ १ ॥
तया आहे सवसार । ऐसे बोले तो माहार ॥ २ ॥
असो नसो भाव । जो हा देखे पढरिराव ॥ ३ ॥
चद्रभागे न्हाती । तुका म्हणे भलते याती ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा –माहार–महार, भलते–कोणत्याही पाहिजे त्या

अर्थ –जे पढरीस जातात वा न जाता जाऊ जाऊ असे म्हणतात १ त्याना ससार आहे असे जे म्हणतील ते महार आहेत २ भाव असो अगर नसो परतु जो पाडुरगास पाहतो त्यास ससार नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, चद्रभागेमध्ये पाहिजे त्या जातीचे लोक स्नान करतात, त्यास ससार नाही ४

१६११ धरियेलीं सोंगें । येणें अवघीं पाडुरगें ॥ १ ॥
तें हें ब्रह्म विटेवरी । उमें चद्रभागे तिरीं ॥ २ ॥
अतर्व्यापी आहे । धाडोळिता कोठें नाहे ॥ ३ ॥
योगयागतपें । ज्याकारणें दानजपें[१] ॥ ४ ॥
दिलें नेंदी जति । भोग सकळ ज्या होती ॥ ५ ॥
अवघी लीळा पाहे । तुका म्हणे दासा साहे ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा –सोंगें–नाना प्रकारचे अवतार धाडोळितां–शोधता, साहे–साह्य

अर्थ –या पाडुरगाने नाना प्रकारचे अवतार घतले आहेत १ तेच ब्रह्म चद्रभागेच्या तीरावर विटेवर उभे आहे २ तेच सर्वांच्या अतर्यामीच भरलेले असून शोधू लागले की मुळीच कोठेही सापडत नाही ३

१ दान जपें

योग, यज्ञ, तप, ज्ञान व जप इत्यादी साधने त्याच्या प्राप्तीकरिता आहेत ४ कोणी अर्पण केलेले व न केलेले सर्व भोग तोच भोगीत आहे. ५ तुकाराम महाराज म्हणतात, आपल्या दासांना मदत करणे, हीच त्याची संपूर्ण लीला आहे असे समज. ६

१६१२ ज्याचे गर्जतां पवाडे । कळिकाळ पायां पडे ॥ १ ॥
तो हा पंढरीचा राणा । पुसा सा चौं अठरां जणां ॥ २ ॥
चिंतितां जयासी । भुक्तिमुक्ति[1] कामारी दासी ॥ ३ ॥
वैकुंठासी जावें । तुका म्हणे ज्याच्या नांवें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :–सा–सहा शास्त्रे, चौ–चार वेद, अठरा–अठरा पुराणे, कामारी–काम करणाऱ्या.

अर्थ.–ज्या श्रीहरीच्या कीर्तीची गर्जना केली तर त्याच्या पाया यम सुद्धा पडेल. १ असा हा पंढरीचा राजा आहे|हे तुम्ही सहा शास्त्रे, अठरा पुराणे व चारी वेद यांस विचारा. २ याचे चिंतन केले असता भुक्ती-मुक्ती काम करणाऱ्या दासी बनतात. ३ तुकाराम महाराज म्हणतात, याचे नाव घेतल्याने वैकुंठ प्राप्त होतो. ४

१६१३ ज्याचे गर्जतां पवाडे । श्रुतिशास्त्रां मौन्य पडे ॥ १ ॥
तेथें माझी वाचा किती । पुरे करावया स्तुती ॥ २ ॥
सिणलीं सहस्र तोंडें । शेषफणीऐसें धेंडें ॥ ३ ॥
तुका म्हणे मही । पत्र सिंधु न पुरे शाही ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :–मौन्य–न बोलण्याची अवस्था, मौन, मही–पृथ्वी, सिंधू–सागर, शाही–शाई.

अर्थः– या श्रीहरीचे वर्णन करतांना वेदशास्त्रेसुद्धा मुकी झाली आहेत १ अशा ठिकाणी माझ्यासारख्या दुर्बळाची वाणी स्तुती करायला किती पुरी पडणार ? २ शेषाच्या फणीची हजार तोंडेही याचा गौरव करता करता थकून गेली. ३ तुकाराम महाराज म्हणतात, या श्रीहरीचे वर्णन करताना, त्याचे यश लिहू पाहाताना पृथ्वीचा कागद व समुद्राची शाईसुद्धा पुरणार नाही. ४

१६१४ देव राखे तया मारील कोण । न मोडे कांटा हिंडतां वन ॥ १ ॥
न जळे न बुडे नव्हे कांहीं । विष तें ही अमृत पाहीं ॥ २ ॥
न चुके वाट न पडे फंदीं । नव्हे कधीं यमबाधा ॥ ३ ॥
तुका म्हणे नारायण । येतां[2] गोळ्या वारी बाण ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:– फंदी– भानगडीत.

अर्थ – ज्याचे रक्षण देवच करणारा आहे त्याला कोण मारणार ? तो जरी घनदाट रानावनातून हिंडत असला तरी त्याच्या पायात काटासुद्धा मोडणार नाही. १ तो कधी आगीत जळणार नाही, पाण्यात बुडणार नाही, त्याला कुणी विष दिले तरी त्याचे अमृत होऊन जाईल. २ तो कधी वाट चुकत नाही, तो कधी कुणाच्या भानगडीत सापडत नाही, त्याला कधीही यमाची बाधा होत नसते ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा प्रकारे हा नारायण त्याच्यावर येणारे बाण व गोळ्या यांच्यापासून रक्षण करीत असतो. ४

१६१५ कोठें गुंतलासी द्वारकेच्या राया । वेळ कां सखया लावियेला ॥ १ ॥
दिनानाथ ब्रीद सांभाळीं आपुलें । नको पाहों केलें पापपुण्य ॥ २ ॥
पतितपावन ब्रीदें चराचर । पातकी अपार उद्धरिले ॥ ३ ॥
तुकयाबंधु म्हणे द्रौपदीचा धांवा । केला तैसा मला पावें आतां ॥ ४ ॥

१ सिद्धिसिद्धी होती दासी २ ऊन

शब्दार्थ व टीपा – दिनानाथ – दीनांचे, गरिबांचे रक्षण करणारा, अपार–अगम्य

अर्थ – अरे द्वारकेच्या राजा, कृपाळा, तू कुठे गुतला आहेस ? तुला येण्यास एवढा वेळ सरी का लागला आहे ? १ दीनांचे रक्षण करणारा दीनानाथ हे तुझे ब्रीद आहे ते तू सांभाळ आमचे पापपुण्य किती आहे हे तू पाहू नकोस २ पतितांना पावन करण्याचे तुझे ब्रीद चराचर जगतात प्रसिद्ध आहे त्याला अनुसरून तू आजपर्यंत असंख्य पातकी लोकांचा उद्धार केला आहेस ३ तुकाराम महाराजांचे बंधू कान्होबा म्हणतात, देवा, ज्याप्रमाणे तुम्ही द्रौपदीच्या धाव्याच्या वेळी धावून गेलात, त्याप्रमाणे माझे रक्षण करून मला आता तुम्ही कृतार्थ करावे ४

१६१६ कोठें गुंतलासी कोणाच्या धांवया । आली देवराया निद्रा तुज ॥ १ ॥
कोठें गुतलासी भक्तिप्रेमसुखें । न सुटती मुखें गोपिकांचीं ॥ २ ॥
काय पडिलें तुज कोणाचें संकट । दुरी पंथ वाट न चालवे ॥ ३ ॥
काय माझे तुज गुण दोष दिसती । म्हणोनि श्रीपती कोपलासी ॥ ४ ॥
*काय जालें सांग माझिया कपाळा । उरला जीव डोळां तुका म्हणे ॥ ५ ॥*

शब्दार्थ व टीपा – धांवया–रक्षणाला, धावा ऐकून त्यात, दुरी– लांब, कोपलासी– रागावलास, कपाळा–नशिबात

अर्थ – देवराया, तू कुणाच्या रक्षणात गुतलास ? कुणाचा धावा ऐकून त्यात गुरफटलास ? की तुला झोप आली रे ? १ कुणाच्या भक्तिप्रेमसुखात तर तू गुंतलेला नाहीस ना ? गोपिकांची मुखें पाहाण्यातील आनंद तुला सोडवत नाही ? २ की देवा, तू कुणावरचे तरी संकट दूर करण्यात गुतला आहेस ? किंवा माझ्याकडे येण्याची *वाट फारच लांब असल्याने ती तुला चालवत नाही काय ? ३ श्रीपती, माझे गुणदोष पाहून तू माझ्यावर रागाव*लास की काय ? ४ तुकाराम महाराज म्हणतात, माझ्या नशिबात तू मला भेट देऊ नयेस, असेच आहे की काय ? ते सांग ना एकदा, तुझी वाट पाहाता पाहाता माझा सारा जीव डोळ्यांत येऊन भिडला आहे ५

१६१७ परस्त्रीतें म्हणतां माता । चित्त लाजवितें चित्ता ॥ १ ॥
काय बोलोनिया तोंडें । मनामाजी कानकोंडें ॥ २ ॥
धर्मधारिष्टगोष्टी सांगे । उष्टया हातें नुडवी काग ॥ ३ ॥
जें जें कर्म वसे अंगीं । तें तें आठवे प्रसंगीं ॥ ४ ॥
बोले तैसा चाले । तुका म्हणे तो अमोल ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – कानकोंडें– चोरटे, फसवे, नुडवी– उडवीत नाही, काग–कावळा

अर्थ – दुसऱ्याच्या बायकोस आपली माता म्हणताना आपले मनच मनास लाजवीत असते १ मनात चोरटा भाव असताना परस्त्रीस नुसते माता म्हटल्याने काय होणार ? २ तोंडाने धर्म, धैर्य इत्यादीविषयी गोष्टी सांगतो, पण प्रसंग पडल्यास हाताचे शीत पडेल या भीतीने हा उष्ट्या हाताने कावळाही उडवीत नाही ३ अंगी प्रसंगी आपण जे कर्म केलेले ~~असते ते ते~~ अठवत असते ४ तुकाराम महाराज म्हणतात, म्हणून बोलल्याप्रमाणे जो आपले वर्तन ठेवितो तो पुरुष अमोलच म्हणावा लागेल ५

१६१८ असत्य वचन होतां सर्व[१] जोडी । जरी लग्नघडी परउपकार ॥ १ ॥
जाईल पतना यासि संदेह नाहीं । साक्ष आहे काहीं सांगतों ते ॥ २ ॥
वदविलें मुखें नारायणें धर्मा । अंगुष्ठ त्या कर्मासाटीं गेला ॥ ३ ॥
तुका म्हणे आतां सांभाळा रे पुढें । अंतरिंचें कुडें देईल दुःख ॥ ४ ॥

---

१ कोटि

शब्दार्थ व टीपा – जोडी– लाभ, फायदा, धर्मा– युधिष्ठिराकडून, अंगुष्ठ–अंगठा, कुडें– असत्याचा भाव

अर्थ – सर्व प्रकारचे लाभ होत असले, आणि डोंगरासारखा परोपकार जरी होत असला तरी खोटे कधी बोलू नये १ अशा प्रसंगीही जरी असत्य भाषण केले तरी ती पुरुष पतनाच्या अवस्थेला जाईल, याविषयी एक साक्ष पुराणात आहे ती सांगतो २ स्वतः नारायणाने ' नरो वा कुंजरो ' म्हणवून युधिष्ठिराच्या मुखातून असत्य वदविले, पण त्यामुळे धर्मराज स्वर्गलोकास जात असताना त्याचा एक अंगठा तुटून पडला ३ तुकाराम महाराज म्हणतात, आता यापुढे तरी सत्यास सांभाळ. अंतःकरणातील असत्याचा भाव तुम्हांस शेवटी दुःखच देईल. ४

विवरण – आपल्या धर्मशास्त्रात सत्यधर्माला फार मोठे स्थान दिले आहे जगाचे सारे व्यवहार सत्याने होणाऱ्या कर्मावरच नीटपणे होतील सत्याची महती सर्व शास्त्रांनी, पुराणांनी व साधुसंतांनी गौरवून वर्णन केली आहे सृष्टी उत्पन्न होण्यापूर्वी ' ऋत व सत्य ' ही तत्त्वे उत्पन्न झाली असून त्या सत्यानेच आकाश, पृथ्वी, वायू इत्यादी पंचमहाभूते आवरून धरलेली आहेत, असा सत्याचा गौरव वेदांतून केला आहे. सत्य या शब्दाचा अर्थच असणारे, कधीही नाहीसे न होणारे, असा असल्यामुळेच 'सत्यापरता नाहीं धर्म । सत्य तेंचि परब्रह्म ।' असा निर्णय साधुसंत घेतात 'नास्ति सत्यात्परो धर्मः' असा महाभारताचा उपदेश आहे हजार अश्वमेध आणि सत्य याची तागडीत घालून तुलना केली तर सत्यच अधिक भरेल अशी खात्री महाभारतकाराची आहे मनुष्यमात्राचे सर्व व्यवहारांना आश्रयीभूत असणारी वाणी ही सत्यावरच उभारलेली असली पाहिजे, असा मनूचा आदर्श आहे ' सत्यपूतां वदेद्वाचम् ' जे बोलायचे ते सत्यच बोलावे असा त्याचा उपदेश आहे

'सत्यं वद । धर्मं चर ' असा उपनिषदाचा धर्म आहे भीष्मांनी प्राण सोडण्यापूर्वी युधिष्ठिरास जो उपदेश केला आहे त्यातही शेवटी, ' सत्येषु यातितव्यं वः सत्यं हि परमं बलम् ' असाच निष्कर्ष काढला आहे ' सत्यं स्वर्गस्य सोपानं पारावारस्य नौरिव ' अशी महती सत्याची महाभारतकारांनी वर्णन केलेली आहे ' सत्यमेव जयते नानृतम् ' असे आपल्या धर्माचे ब्रीदवाक्यच आहे

याच सत्याचा पुरस्कार सर्व साधुसंतांनी केलेला आहे ' सत्य असत्यासी मन केलें ग्वाही ' असे म्हणूनच तुकोबांनी आपली साधना आरंभिली परंतु अनेक वेळी मानवी व्यवहारात सत्यास मुरड घालावी लागते सारासार विवेक करावा लागतो पुष्कळांच्या अथवा सज्जनाच्या कल्याणार्थ सत्य बोलण्यास मुरड घालावी असे विचारी लोकांनी अनुभवावरून ठरविले हातात धारदार खड्ग घेऊन एखादा मारेकरी दीनदुबळ्या गाईच्या पाठीमागे लागला आहे, ती गाय आपल्यापुढून गेली आहे, आणि तो मारेकरी ' गाय येथून गेली का हो ?' असा प्रश्न विचारीत आहे या प्रश्नास आपण काय उत्तर द्यायचे ? छातीवर बसून दरोडेखोर 'घरातील द्रव्य कुठे आहे ?' असा प्रश्न विचारीत असताना खरे बोलायचे काय ? महाभारतकारांनी या प्रश्नाचा विचार करताना म्हटले आहे ' अकूजनेन चेन्मोक्षो नावकूजेत्कथञ्चन । अवश्यं कूजितव्ये वा शंकेरन्वाप्यकूजनात् । श्रेयस्तत्रानृतं वक्तुं सत्यादिति विचारितम्–' न बोलता मोक्ष म्हणजे सुटका होणार असेल तर काही झाले तरी बोलूच नये, आणि बोलणेच अगत्याचे असेल तर त्यावेळी सत्यापेक्षा खोटे बोलणे अधिक प्रशस्त, असे विचारी लोकांनी ठरविले आहे कारण सत्याचे वचन केवळ शब्दाच्या उच्चारासाठी नसून मानवी व्यवहाराच्या सौकर्यासाठी, कल्याणासाठी आहे म्हणूनच महाभारतात म्हटले आहे– ' सत्यस्य वचनं श्रेयः सत्यादपि हितं वदेत् । यद्भूतहितमत्यन्तं एतत्सत्यं मतं मम–' सत्य बोलणे हेच प्रशस्त, पण सत्यापेक्षाही सर्व भूतांचे ज्यात हित असेल ते बोलावे कारण सर्व भूतांचे ज्यात अत्यंत हित तेच माझ्या मते खरे सत्य होय अर्थात्‌च अशी वचने अपवादभूत असा व्यावहारिक अडचणीतून मार्ग काढण्यासाठीच असतात हे ध्यानात घ्यायला हवे

प्रस्तुतच्या अभंगात लाभासाठी, लग्न जमविण्यासाठी खोटे बोलण्याचा जो उल्लेख तुकोबांनी पहिल्याच ओळीत केला आहे, त्यालाही आधार महाभारत व मनुस्मृती यांचा आहे ' न नर्मयुक्तं वचनं हिनस्ति न स्त्रीषु राजन्‌ विवाहकाले । प्राणात्यये सर्वधनापहारे पञ्चानृतान्याहुरपातकानि ' थट्टा, बायकाजवळ, विवाहाच्या वेळी, प्राणावर संकट बेतले असताना आणि मिळकत बचावण्यासाठी खोटे बोलणे पातक नाही असे धर्मशास्त्र जरी सांगत असले

तरी तो काही नित्याच्या वागण्याचा नियम नाही सर्वत्र सर्व प्रसंगी सत्याचाच आधार माणसाने घ्यावा, असाच सिद्धान्त आहे युधिष्ठिराने 'नरो वा कुंजरो वा' असे द्रोणाचार्यास अडचणीच्या प्रसंगी सांगितले, ते असत्यच भाषण झाले म्हणूनच एरवी जमिनीवर चार अंगुळे चालणारा त्याचा रथ इतराच्या प्रमाणेच जमिनीवर आला व घटकाभर का होईना, पण त्यास नरकवास पत्करावा लागला स्वर्गास जात असताना त्याचा अंगठा गळून पडला भीष्माचा वध क्षात्रधर्माप्रमाणे पण शिखंडीला पुढे करून केल्यामुळे अर्जुनास स्वतःचा मुलगा बभ्रुवाहन याच्याकडून पराभूत व्हावे लागले या उदाहरणावरून हेच सिद्ध होते की अपवादभूत परिस्थितीत जे वागण्याचे नियम सांगितले ते सिद्धान्त नव्हेत अनुशासन पर्वात महादेव पार्वतीस सांगतात, 'आत्महेतोः परार्थे वा नर्महास्याश्रयात्तथा। ये मृषा न वदन्तीह ते नराः स्वर्गगामिनः – स्वार्थाकरिता, दुसऱ्याच्या हितासाठी किंवा थट्टेनेही जे पुरुष या जगात कधीही असत्य बोलत नाहीत, त्यानाच स्वर्गप्राप्ती होते–सत्याचा हाच गौरव तुकोबाच्या या अभंगात प्रकट झाला आहे

१६१९ जळो त्याचे तोंड । ऐसी का ते व्याली रांड ॥ १ ॥
सदा भोवयासी गांठी । क्रोध धडधडीत पोटीं ॥ २ ॥
फोडिली गोवरी । ऐसी दिसे तोंडावरी ॥ ३ ॥
तुका म्हणे नाहीं । चित्ता समाधान कांहीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा –व्याली–प्रसवली, जन्म दिला, भोवयासी–डोळ्यावरील भुवयास

अर्थ –अशा या दुष्टास प्रसवणाऱ्या त्या रांडेच्या तोंडास आग लागो १ त्याच्या डोळ्यांवरील भुवयास नेहमीच गाठी असतात, त्याच्या अंतःकरणात नेहमीच क्रोध उफाळलेला असतो २ एखादी गोवरी फोडावी तशी त्याच्या तोंडास कळा प्राप्त झालेली असते ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा दुष्ट माणसाच्या चित्तास कधीही समाधान मिळत नाही ४

१६२० तोंडें खाये फार । पादे बोचा करी मार ॥ १ ॥
एक ऐसे ते शाहाणे । आपुलें अधीन तें नेणे ॥ २ ॥
कुले घालूनि उघडे । रागें पाहे लोकांकडे ॥ ३ ॥
खेळे द्यूतकर्म । मग बोंबली जुलूम ॥ ४ ॥
निजता आला मोहो । वीता म्हणे मेला गोहो ॥ ५ ॥
तुका म्हणे त्यानीं । मनुष्यपणा केली हानी ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा–एक–दुसरे कुणी, वीता–प्रसूत होता, गोहो–पती

अर्थ –तोंडाने आपल्या अदमासाबाहेर खातो त्याचे ढुंगण पादाचा मारा सतत करीत असते १ दुसरे कुणी असे शहाणे असतात की स्वतःची इंद्रिये स्वतःच्या स्वाधीन ते कधीच ठेवीत नाहीत २ आपलेच कुल्ले आपण कुणी उघडे टाकतात आणि मग लोक हसायला लागले की ते रागावतात ३ द्यूतकर्म खेळून पैसा गमावल्यावर अन्याय फार झाला म्हणून ते बोंबलत सुटतात ४ पतीजवळ निजताना एखादीला मोह आवरत नाही, पण प्रत्यक्ष प्रसूतीचा समय येताच मग नवऱ्याला शिव्या देऊ लागते ५ तुकाराम महाराज म्हणतात, अशाच लोकांनी माणसाच्या जन्माची हानी केलेली आहे ६

१६२१ पतिव्रता नेणे आणिकाची स्तुती । सर्वभावें पति ध्यानीं मनीं ॥ १ ॥
तैसें माझें मन एकविध जालें । नावडे विठ्ठलेंविण दुजें ॥ २ ॥
सूर्यविकासिनी नेघे चंद्रकळा । गाय ते कोकिळा वसंतेंसी ॥ ३ ॥
तुका म्हणे बाळ मातेपुढें नाचे । बोल आणिकाचे नावडती ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा –आणिकांचे-इतरांची, नेघे-घेत नाही, स्वीकारीत नाही.

अर्थः-पतिव्रता स्त्रीस इतरांची स्तुती कधीच आवडत नाही. तिच्या ध्यानीमनी सर्वसाधाने एक पतीच असतो. १ त्याप्रमाणे माझे मन ईश्वराविषयी अनन्य झाले असून मला आता विठ्ठलाशिवाय दुसरे काहीही आवडत नाही. २ सूर्यविकासी कमल चंद्राच्या प्रकाशानें कधी उमलत नाही. कोकिळ पक्षी फक्त वसंत ऋतूतच गायन करतो. ३ तुकाराम महाराज म्हणतात, बालक हे आपल्या आईपुढेच प्रेमाने नाचते; इतरांचे शब्द त्याला कधीच आवडत नाहीत. ४

१६२२ पंडित म्हणतां थोर सुख । परि तो पाहातां अवघा मूर्ख ॥ १ ॥
काय करावें घोकिलें । वेदपठण वांयां गेलें ॥ २ ॥
वेदीं सांगितलें तें न करी । सम ब्रह्म नेणे दुराचारी ॥ ३ ॥
तुका वेले जीवीं शिव । हाचि तेथींचा अनुभव ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा-सम-समत्वाने असणारे

अर्थः-सर्व जाणणारा पंडित असे म्हटले असता यास फार सुख वाटते. पण थोडा विचार करून पाहि-ल्यास तो मूर्खच आहे असे दिसते. १ त्याने सर्व वेद घोकून पाठ केले असतील, पण त्यांतील अर्थ वा रहस्य त्याला न समजल्यामुळे त्याचे ते घोकणे वायाच गेले असे समजावे. २ कारण वेदांत जे काही सांगितले आहे, ते तो कधी आचरीतच नसतो सर्वत्र समत्वाने असणारे ब्रह्मतत्व हा कधीच अनुभवीत नाही, म्हणून हा दुराचारीच समजावा. ३ तुकाराम महाराज म्हणतात, वेदांतील मुख्य अनुभव हाच की, जीव व शिव एकच आहे. हा अनुभव मी घेतला आहे. ४

१६२३ पंडित तोचि एक भला । नित्य भजे जो विठ्ठला ॥ १ ॥
अवघें सम ब्रह्म पाहे । सर्वां भूतीं विठ्ठल आहे ॥ २ ॥
रिता नाहीं कोणी ठाव । सर्वां भूतीं वासुदेव ॥ ३ ॥
तुका म्हणे तोचि दास । त्या देखिल्या जाती दोष ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपाः-भला—श्रेष्ठ, चागला, रिता-रिकामा, ठाव-स्थान

अर्थः-रोज विठ्ठलाला मनोभावे भजतो तोच श्रेष्ठ पंडित मानावा १ तो सर्वत्र असलेले ब्रम्हतत्त्व ओळखतो, सर्व भूतकाळात असलेले विठ्ठलतत्त्व जाणतो. २ त्याला ईश्वराशिवाय रिकामे असे कोणतेच स्थान दिसत नाही सर्व प्राणिमात्राच्या ठिकाणी त्याला वासुदेवतत्त्वच अनुभवास येते ३ तुकाराम महाराज म्हणतात, असा हा मनुष्यच खरा विठ्ठलाचा दास आहे. त्याचे दर्शन होताच सर्व दोष निघून जातात. ४

१६२४ ऐका पंडितजन । तुमचे वंदितों चरण ॥ १ ॥
नका करूं नरस्तुति । माझी परिसा हे विनंती ॥ २ ॥
अन्न आच्छादन । हे तों प्रारब्धा अधीन ॥ ३ ॥
तुका म्हणे वाणी । सुखें वेंचा नारायणीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – नरस्तुती-माणसाची स्तुती, परिसा–ऐका, वेंचा-खर्च करा

अर्थः-अहो पंडितजन, ऐका, मी तुमचे पाय धरून विनंती करीत आहे ती ऐका १ तुम्ही ईश्वरास सोडून कधीही माणसाची स्तुती करू नका, अशी माझी नम्र विनंती आहे तुम्हास, ती तुम्ही ऐका २ अन्न आणि वस्त्र याची प्राप्ती प्रारब्धानुसार होत असते ३ तुकाराम महाराज म्हणतात, तुम्ही आपली वाणी नारायणाच्याच गुणवर्णनात खर्च करा. ४

१६२५ विठ्ठल टाळ विठ्ठल दिंडी । विठ्ठल तोंडीं उच्चारा ॥ १ ॥
विठ्ठल अवघ्या भांडवला । विठ्ठल बोला विठ्ठल ॥ २ ॥
विठ्ठल नाद विठ्ठल भेद । विठ्ठल छंद विठ्ठल ॥ ३ ॥
विठ्ठल सुखा विठ्ठल दु:खा । तुकया मुखा विठ्ठल ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा –नाद–ध्वनी, भेद–ध्वनीचे प्रकार, नादभेद म्हणजे नादरूपाने अवतरलेले ब्रह्म, सुस्वर गायन, भजन.

अर्थ –लोकहो तोंडाने एका विठ्ठलाचाच उच्चार करा तुमच्या हातांतील टाळ व वीणा विठ्ठलरूप समजा १ तुमचे सर्व भांडवल विठ्ठलरूपच आहे असे माना मुखाने विठ्ठल विठ्ठल असे सतत म्हणा २ नादाचे, ध्वनींचे सर्व प्रकार विठ्ठलस्वरूपच आहेत सर्व छंदही विठ्ठलच मानावेत ३ तुकाराम महाराज म्हणतात, माझे सुख विठ्ठलच, दु:ख विठ्ठलच असून नेहमी माझ्या मुखात विठ्ठलनामच असते ४

१६२६ काय तुझें वेंचे मज भेटी देतां । वचन बोलतां एक दोन ॥ १ ॥
काय तुझें रूप घेतों मी चोरोनि । त्या भेणें लपोनि राहिलासी ॥ २ ॥
काय तुझें आम्हां करावें वैकुंठ । भिऊं नको भेट आतां मज ॥ ३ ॥
तुका म्हणे तुझी नलगे दसोडी । परि आहे आवडी दर्शनाची ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – वेंचे–खर्च होणे, भेणें–भीतीने, भियो–भिऊ, दसोडी–दशी, आवडी–आवड, प्रेम, लोभ

अर्थ –देवा, तू मला भेट दिलीस तर तुझे काय खर्च होते रे ? माझ्याशी एकदोन वचनें बोललास तर तुला काय खर्च येईल ? १ मी तुझे रूप डोळ्यांनी पाहिले तर ते काय चोरून ठेवितो की काय ? या भीतीनें तू लपून राहिला आहेस ? २ तुझ्या वैकुंठाला मला काय करायचेय ? मी काही ते मागत नाही तू भिऊ नकोस आता मला लौकर भेट ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, मला तुझी एक दशीसुद्धा नको पण तुझ्या दर्शनाची आवड मात्र माझ्या मनात फार आहे रे ४

१६२७ संतनिंदा ज्याचे घरीं । नव्हे घर ते यमपुरी ॥ १ ॥
त्याच्या पापा नाहीं जोडा । संगें जना होय पीडा ॥ २ ॥
संतनिंदा आवडे ज्यासी । तो जिता चि नर्कवासी ॥ ३ ॥
तुका म्हणे तो नष्ट । जाणा गाढव तो स्पष्ट ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – जोडा–तुलना, जोडीदार

अर्थ – ज्याच्या घरी सतत संतनिंदा होत असते ते घर नसून प्रत्यक्ष यमपुरीच आहे असे मानावे १ त्याच्या पापाला दुसरा जोडीदारच कुणी मिळण्यासारखा नसतो त्याच्या संगतीने सर्व लोकांना पीडाच होत असते २ ज्यांना संतांची निंदा आवडते ते जिवंत असले तरी नरकवासच भोगीत असतात ३ तुकाराम महाराज म्हणतात असे जे संतनिंदक असतात ते केवळ नष्ट व गाढवच असतात असे मी स्पष्ट सांगतो ४

१६२८ आले देवाचिया मना । तेथें कोणाचे चालेना ॥ १ ॥
हरिश्चंद्र ताराराणी । वाहे डोंबा घरीं पाणी ॥ २ ॥
पांडवांचा साहाकारी । राज्यावरोनि केले दुरी ॥ ३ ॥
तुका म्हणे उगेंचि राहा । होईल तें सहज पाहा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – साहकारी– साह्यकारी, मदत करणारा

अर्थ – एकदा एखादी गोष्ट करायची असे देवाच्या मनात आले तर तेथे कुणाचेच काही चालत नाही १ हरिश्चंद्र राजा व तारामती राणी यांचे वैभव केवढे ! पण देवाच्या मनात येताच त्यांना डोंबाच्या घरी पाणी भरण्याची पाळी आली २ हा श्रीहरी खरे पाहाता पांडवांचा साह्यकारी, पण शेवटी यानेच त्यांना राज्यावरून भ्रष्ट केले ३ तुकाराम महाराज म्हणतात, म्हणून आपण उगेच राहून, देवावर विश्वास ठेवून जे जे घडेल, सहज होईल ते पाहात असावे ४

१६२९ निजल्याने गाता उभा नारायण । बैसल्या कीर्तन करिता डोले ॥ १ ॥
उभा राहोनिया मुखीं नाम वदे । नाचे नाना छंदे गोविंद हा ॥ २ ॥
मारगीं चालता मुखी नाम वाणी । उभा चक्रपाणी मागें पुढें ॥ ३ ॥
तुका म्हणे यासी कीर्तनाची गोडी । प्रेमें घाली उडी नामासाटी[१] ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – मारगीं–मार्गाने

अर्थ – या नारायणाचे नामस्मरण कुणी निजल्यानिजल्या करील तर नारायण त्याच्या जवळ उभा राहील आणि कुणी आसनावर बसून याचे गुणसंकीर्तन करील तर तो आनंदाने डोलू लागतो १ कुणी उभे राहून आपल्या मुखाने याचे नाम उच्चारील तर हा गोविंद नाना प्रकारच्या छंदानी नाचू लागतो २ मार्गाने चालता चालता मुखाने अखंड नामस्मरण केले तर हा चक्रपाणी मागेपुढे उभे राहून संरक्षण करतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा या देवाला कीर्तनाची मोठीच गोडी आहे कुणी याचे प्रेमाने नामस्मरण करील तर तो त्याच्यासाठी मोठ्या आवडीने तो त्याच्याकडे उडी घेतो ४

१६३० काम क्रोध आम्ही वाहिले विठ्ठलीं । आवडी धरिली पायासवे ॥ १ ॥
आतां कोण पाहे मार्गें परतोनि । गेले[२] हारपोनि देहभाव ॥ २ ॥
रिद्धिसिद्धी सुखें हाणितल्या लाता । तेथें या प्राकृता कोण मानी ॥ ३ ॥
तुका म्हणे आम्ही विठोबाचे दास । करूनि[३] ठेलो ग्रास ब्रह्मांडाचा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – आवडी–प्रेम, प्राकृता–संसाराला, ठेलों–राहिलो

अर्थ – आम्ही आमचे सर्व कामक्रोधादी विकार विठ्ठलास अर्पण केले आहेत आणि त्याच्या पायाविषयीचे प्रेम आमच्या चित्तात आम्ही साठविले आहे १ यामुळे आमचे देहभान नाहीसे झाले असून आता परत संसाराकडे वळून कोण पाहातो ? २ या श्रीहरीसाठी रिद्धीसिद्धींना सुद्धा लाथा मारून तुच्छ मानले, तेथे या क्षुल्लक संसाराला कोण मानतो ? ३ तुकाराम महाराज म्हणतात आम्ही विठोबाचे दास असून सर्व ब्रह्मांडाचा ग्रास करून आनंदाने राहिलो आहोत ४

१६३१ उठाउठीं अभिमान । जाय ऐसें स्थळ कोण ॥ १ ॥
तें या[४] पंढरीस घडे । खळा पाझर रोकडे ॥ २ ॥
अश्रूंचिया धारा । कोठें रोमांच शरीरा ॥ ३ ॥
तुका म्हणे काला । कोठें अभेद देखिला ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – उठाउठीं– तावडतोब खळा– दुष्टाना, रोकडे– प्रत्यक्ष

अर्थ–तावडतोब अभिमान निघून जाईल असे एखादे स्थळ तुम्हास माहीत आहे काय ? १ अशा प्रकारचे स्थळ हे पंढरपूर असून येथे त्वरित अभिमान दूर होतो या ठिकाणी दुष्टांच्याही हृदयास पाझर फुटतो, प्रत्यक्ष

१ नामापाठी, २ गळा, ३ गिळूनि, ४ हें

इथ येतो २ या ठिकाणी डोळ्यांतून अश्रुधारा अश्रुधारा वाहू लागतात अंगावर रोमांच उभे राहातात ३ तुकाराम महाराज म्हणतात अशा रीतीने अभेदत्वाचा लाभ झाला तुम्ही इतरत्र कुठे पाहिला आहे काय ? ४

१६३२ पढरी पढरी । म्हणतां पापाची बोहरी[1] ॥ १ ॥
धन्य धन्य जगीं ठाय । होतो नामाचा उत्साय ॥ २ ॥
रिद्धिसिद्धी लोटांगणीं । प्रेमसुखाचिया खाणी ॥ ३ ॥
अधिक अक्षरानें एका । भूवैकुंठ म्हणे तुका ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – बोहरी– राखरांगोळी, नाश, ठाय–स्थान

अर्थ – पढरी, पढरी असा उच्चार करताच अनेक पातकांचा नाश होतो १ या जगतामध्ये पंढरपूरचे हे स्थान धन्य धन्य आहे येथे नामस्मरणाचा उत्सव सतत होत असतो २ पंढरपूर ही केवळ प्रेमसुखाची खाण असून येथे रिद्धीसिद्धी लोटांगणे घालीत पडत असतात ३ तुकाराम महाराज म्हणतात, भू या एका अधिक अक्षराने हे पंढरपूर प्रत्यक्ष भूवैकुंठच बनले आहे ४

१६३३ अल्प माझी मति । म्हणोनि येतों काकुळती ॥ १ ॥
आतां वाचवा वाचवा । मज[2] पाउलें केशवा ॥ २ ॥
धीर माझ्या मना । नाहीं नाहीं नारायणा ॥ ३ ॥
तुका म्हणे दया । मज करा अभागिया ॥ ४ ॥

टीप – प्रथम खंडातील अभंगक्रमांक ८०६ हा या ठिकाणी जसाच्या तसा आला आहे अर्थ व शब्दार्थ त्या ठिकाणी कृपया पाहावा

१६३४ भार घालीं देवा । न लगे देश डोई घ्यावा ॥ १ ॥
देह प्रारब्धा अधीन । सोसें अधिक वाढे सीण ॥ २ ॥
व्यवसाय निमित्त । फळ देतसे संचित ॥ ३ ॥
तुका म्हणे फिरे । भोवंडीनें दम जिरे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – भार–ओझे सोसें–हव्यासाने सीण–त्रास संचित–प्रारब्ध, दव, भोवंडी–घेरी मूर्च्छा,

अर्थ –लोकहो, तुम्ही आपला सर्व भार देवावर घालावा उदरनिर्वाहासाठी उगाच देशोदेशी भटकू नका १ आपला देह आपल्या प्रारब्धाच्या स्वाधीन असून जो जो तुम्ही अधिक हव्यासाने वागाल तो तो तुम्हांस अधिक त्रास मात्र होईल २ उदरनिर्वाहासाठी व्यापारव्यवसाय करणे हे एक निमित्त मात्र आहे फळ मात्र दैवानुसारच मिळत राहाते ३ तुकाराम महाराज म्हणतात उगाच पोटासाठी वणवण करीत फिराल तर घेरी यऊन जसा दम नाहीसा होतो तशी अवस्था तुमची होईल ४

१६३५ भोग भोगवरी द्यावा । संचिताचा करुनी ठेवा ॥ १ ॥
शांती धरणें जिवासाटीं । दशा उत्तम गोमटी ॥ २ ॥
देह लेखावें असार । सत्य परउपकार ॥ ३ ॥
तुका म्हणे हे मिरासी । बुडी द्यावी ब्रह्मरसीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – गोमटी– चांगली लेखावा–मानावा, असार–नाशवंत मिरासी–हक्काची वतनदारी

अर्थ – लोकहो जसे आपले प्रारब्ध असेल तसा भोग आपणास मिळतो हे ध्यानात धरून प्रारब्धाचा वाटा प्रारब्धाकडे द्यावा १ जीवभाव नाहीसा करून एक शांतीच मनात धारण करावी हीच अवस्था फार चांगली व उत्तम आहे २ आपला देह नाशवंत मानावा आणि लोकांवर नेहमी उपकार करावा ३ तुकाराम महाराज

---

१ बोहोरी, २ तुमची

म्हणतात, मनाची ही शांततेची अवस्था होऊन आपली वतनदारी असून याच अवस्थेत आपण ब्रह्मरसात दुशी देऊन असावे. ४

१६३६ येथें बोलोनियां काय । व्हावा गुरु तरि जाय ॥ १ ॥
मज न साहे वांकडें । ये विठ्ठलकथेपुढें ॥ २ ॥
ऐकोनी मरसी कथा । जंव आहेसि तुं जीता ॥ ३ ॥
हुरमतीची चाड । तेणें न करावी बडबड ॥ ४ ॥
पुसेल कोणी त्यास । जा रे करीं उपदेश ॥ ५ ॥
आम्ही विठ्ठलाचे वीर । फोडूं कळिकाळाचें शीर ॥ ६ ॥
घेऊं पुढती जन्म । वाणूं कीर्त मुखें नाम ॥ ७ ॥
तुका म्हणे मुक्ती । नाहीं आसचि ये चित्तीं ॥ ८ ॥

शब्दार्थ व टीपा:– न साहे– सहन होत नाही, हुरमतीची– अब्रूची, कीर्त– कीर्ती, आस–इच्छा

अर्थ:– आपणांस गुरू हवा असा हट्ट धरणाऱ्या इसमास तुकारामबुवा म्हणतात, तुला जर गुरू हवा तर मग येथे कीर्तनात बोलून काय उपयोग ? तुला जर खरोखरीच गुरु हवा तर तू येथून निघून जा १ या विठ्ठलाच्या कथेत हे असे वाकडे बोलणे मला सहन होणार नाही २ इतके दिवस कथा ऐकलीस पण त्याचा काहीच उपयोग झालेला दिसत नाही तू जिवत असूनही व्यर्थच मेल्यासारखा आहेस ३ ज्याला आपल्या अब्रूची किंमत असेल त्याने वृथा वडवड करू नये. ४ जो कुणी तुला विचारील त्याना तू उपदेश करण्यासाठी जा. ५ आम्ही या श्रीविठ्ठलाचे पराक्रमी वीर असून प्रत्यक्ष यमाचेही मस्तक फोडण्याचे सामर्थ्य आमच्यात आहे ६ आम्ही वारंवार जन्म घेऊ आणि मुखाने नाम व गुण याची कीर्ती गात राहू ७ तुकाराम महाराज म्हणतात, आमच्या चित्तामध्ये मुक्तीची इच्छा मुळीसुद्धा नाही. ८

१६३७ अनुहातीं गुंतली नेणे बाह्य रंग । वृत्ति येतां मग बळ लागे ॥ १ ॥
मदें माते[1] तया नाहीं देहभाव । आपुले अवयव आवरितां ॥ २ ॥
आणिकांची वाणी वेद तेणें मुखें । उपचारदुःखें नाठवती ॥ ३ ॥
तें सुख बोलतां आश्चर्य या जना । विपरीत मना भासतसे ॥ ४ ॥
तुका म्हणे बाह्य रंग तो विठ्ठल । अंतर निवालें ब्रह्मरसें ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा:– अनुहातीं–योगादी धारणानी जो दशनादाचा ध्वनी ऐकू येतो तो, मदें–मदाने, माते–उन्मत्त होतो, अंतर–मन

अर्थ – हृदयात होणाऱ्या सोहं सोहं ध्वनीला अनुहत ध्वनी म्हणतात त्या ध्वनीच्या ठिकाणी विचाराने ज्याची वृत्ती अंतर्मुख होऊन रंगली आहे तिला बाह्य परिस्थितीवर आणण्यास कष्ट पडतात. १ आनंदाने जो मदोन्मत्त होऊन नाचत आहे, त्याला आपला देह व अवयव आवरण्याची आठवणच राहात नाही. २ ज्याच्या मुखाने सतत परब्रह्माचेच चिंतन होत आहे, त्याला बाह्य दु खाची आठवण होत नाही ३ ज्या सुखाच्या अनुभवात वैषयिक सुखदु खांचा संस्कार नाहीसा होतो, त्यास सुखाचे वाणीने वर्णन केले असता लोकांचे मनाला ते विपरित भासून त्याचे आश्चर्य वाटेल. ४ तुकाराम महाराज म्हणतात, त्यांना बाहेर सर्वत्र विठ्ठलच दिसत असतो कारण त्याचे अंत करण परब्रह्माच्या रसाने शांत झालेले असते ५

१६३८ ब्रह्मरसगोडी तयांसी फावली । वासना निमाली सकळ ज्यांची ॥ १ ॥
नाहीं त्या विटाळ अखंड सोंवळीं । उपाधीवेगळीं जाणिवेच्या ॥ २ ॥

---

1 माजे

मन हे निश्चळ जाले एके ठायीं । तया उणें काई निजसुखा ॥ ३ ॥
तीचि पुण्यवंतें परउपकारी । प्रबोधी त्या नारीनरलोकां ॥४॥
तुका म्हणे त्यांचे पायीं पायपोस । होऊनिया यास करिन तेथें ॥५॥

शब्दार्थ व टीपा –फावली–मिळाली, प्राप्त झाली, प्रबोधी–जागे करतात, जागृती आणतात

अर्थ –संसारांतील ज्यांची वासना समूळ नाहीशी झाली आहे त्यांनाच ब्रह्मरसाची गोडी प्राप्त झाली असल्याचे समजावे १ असा पुरुष आधिव्याधीशिवाय असल्याने अखंड सोवळाच बनलेला आहे त्याला भेद भावाचा विटाळ कधीच झालेला नसतो २ ज्याचे मन एका परमेश्वराच्या ठिकाणी स्थिरावलेले आहे त्याच्या निजसुखात कुठलीच कमतरता राहाणार नाही ३ स्त्रीपुरुषांना परमार्थविषयक जे जागृती आणतात तेच पुण्यवंत व परोपकारी समजावेत ४ तुकाराम महाराज म्हणतात त्यांच्या पायांतील पायपोस होऊन तेथेच अखंडपणे निवास करीन ५

१६३९ जैसे तैसे राहे देवाचे हें देणें । यत्न करितां तेणें काय नव्हे ॥ १ ॥
दासा कृपासिंधु नुपेक्षी सर्वथा । अंतरींची व्यथा कळे त्यासी ॥ २ ॥
मागों नेणे परी माय जाणे वर्म । बाळा नेदी श्रम पावों कांहीं ॥ ३ ॥
तुका म्हणे मज अनुभव अंगें । वचन वाउगें मानेना हें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा –उपेक्षी–उपेक्षा करणार नाही वाउगें–वेगळे

अर्थ –जशी आपली भावभावना असेल तसे देवाचे देणे आपल्याला प्राप्त होते असा भावभक्तीने प्रयत्न केल्यास काय नाही होणार ? १ कृपेचा सागर असणारा हा परमेश्वर आपल्या दासाची उपेक्षा कधीही करणार नाही दासाच्या अंतःकरणातील व्यथा त्याला चांगलीच समजलेली असते २ मुलाने जरी काही मागितले नाही तरी त्याला काय हवे असते ते आईला माहीत असते ती बाळाला काहीही श्रम होणार नाहीत असेच वागते ३ तुकाराम महाराज म्हणतात, असा मला स्वतःला अनुभव आलेला असल्याने मी इतर कुणाचे वेगळे बोलणे मानणारच नाही ४

१६४० आम्हा हरिच्या दासा कांहीं । भय नाहीं त्रैलोकीं ॥ १ ॥
देव उभा मागें पुढें । उगवी कोडें सकट ॥ २ ॥
जैसा केला तैसा होय । धावे सोय धरोनि ॥ ३ ॥
तुका म्हणे असों सुखें । गाऊं मुखें विठोबा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा –उगवी–सुटका करतो दूर करतो

अर्थ –आम्हा हरिदासाना आता त्रैलोक्यातही कसलेच भय उरलेले नाही १ कारण आमच्या मागेपुढे देव उभा असतो २ याचो ज्या भावनेने भक्ती करावी तसा तो कृपावंत होऊन भक्ताच्या संरक्षणास धावून येतो ३ तुकाराम महाराज म्हणतात या विठोबाचे गुण गाऊन आम्ही नित्य सुखातच राहू ४

१६४१ परद्रव्यपरनारीचा अभिळास । तेथूनि हारास सर्वभाग्या ॥ १ ॥
घटिका दिवस मास वर्षें लागती तीन । बाधले पतन गाठोडीस ॥ २ ॥
पुढें घात त्याचा रोकडा शकुन । पुढें करी गुण निश्चयेंसी ॥ ३ ॥
तुका म्हणे एका तडतायमड । काळ लागे नाड परी खरा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:– अभिलास–इच्छा, वासना, हारास–ऱ्हास, नाश, रोकडा–उघड, स्पष्ट, तडतायवड–त्वरित, तावडतोब, नाड–नाश, विघ्न, अडचण.

अर्थ:–दुसऱ्याचे द्रव्य व दुसऱ्याची स्त्री यांची जो इच्छा करतो त्याच्या भाग्याचा नाश तेथून होतो. १ कुणाचा नाश एका घटकेत होईल, कुणाला एखादा दिवस, कुणाला एखादा महिना वा कुणाला काही वर्षेही लागतील; पण त्यांच्या पदरी नाश हा कायमचाच बांधला आहे असे समजावे. २ त्याचा घात पुढे केव्हा तरी होणार असे निश्चयाचे चिन्ह स्पष्ट दिसते. कारण त्याने जे कर्म केलेले असते त्याचे फळ त्याला खचितच मिळत असते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, कुणाचा नाश एका क्षणांत म्हणजे त्वरित होतो, तर कुणाच्या नाशास कालावधी लागतो हे खरे; पण शेवटी नाश होतो हेच स्पष्ट आहे. ४

१६४२ समर्थाचें केलें । कोणां जाईल मोडिलें ॥ १ ॥
वांयां करावी ते उरे । खटपट सोस पुरे ॥ २ ॥
ठेविला जो ठेवा । आपुलाला तैसा खावा ॥ ३ ॥
ज्याचें त्याचे हातीं । भुंके तयाची फजिती ॥ ४ ॥
तुका म्हणे कोटी । बाळे जाले शूळ पोटीं ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा –वाया–व्यर्थ, शूळ–शूल, सूळ, एक आयुध.

अर्थ:–समर्थांनीच जे केले आहे ते मोडण्यास कोण धजावणार ? १ त्याच्याविरुद्ध खटपट करणे व्यर्थच आहे. कुणी खटपट केली तर अखेर केवळ श्रम मात्र उरतात. २ ज्याने जशी प्रारब्धकर्माची ठेव ठेविली असेल त्याप्रमाणेच सुख:दुखाचा लाभ त्याला होईल. ३ ज्याची जी वस्तू आहे ती त्याच्या हातात आहेच. त्याविरुद्ध जो उगाच बडबडतो, त्याची मात्र फजिती आहे. ४ तुकाराम महाराज म्हणतात, अशी अनेक माणसे आपल्या आई-बापांच्या पोटी शूळ म्हणूनच जन्मास आलेली दिसतात. ५

१६४३ हे माझी मिराशी । ठाव तुझ्या पायांपाशीं ॥ १ ॥
याचा धरीन अभिमान । करीन आपुलें जतन ॥ २ ॥
देऊनियां जीव । बळी[1] साधिला हा ठाव ॥ ३ ॥
तुका म्हणे देवा । जुन्हाट हे माझी सेवा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:– मिराशी– हक्काची वंशपरंपरागत असणारी वतनदारी, ठाव– स्थान

अर्थ.– देवा, तुमच्या पायाशी स्थान मिळणे हीच माझी वतनदारी आहे. १ मला याच गोष्टीचा अभिमान असल्यामुळे मी या मिराशीचा सांभाळ करीन. २ आमच्या वाडवडिलांनी जीव देऊन हे मिराशीचे स्थान मिळविले आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तुमच्या पायाची सेवा करणे ही माझी फार जुनाट अशी मिरासदारी आहे. ४.

विवरण:– तुकाराम महाराज ज्या विठ्ठलाचे गाढे भक्त होते, त्याच्या भक्तीची परंपरा त्यांच्या घरी फार पूर्वीपासून होती. घराणे मुळचे चांगले व्यापारातील म्हणून सुखी व संपन्न असले तरी त्यांची खरी संपत्ती विठ्ठलाची भक्ती हीच होती. याचाच अभिमान तुकोबांनी आपल्या अभंगातून गाइला आहे. तुकोबांचे घराणे खरे पाहाता देहू येथील महाजनकीचे. पण ही लौकिक मिरास तुकांना कधीच हवीशी वाटली नाही. त्यांच्या इनाम जमिनीचे नावही सरकारी कागदपत्रातून 'विठ्ठल टिके' असेच सापडते. त्यांच्या मिरासदारीत श्रीविठ्ठलाच्या भक्तीचा धागा प्रमुख आहे. त्यांच्या घराण्यातील आठवे पूर्वज विश्वंभरबाबा हे मोठेच विठ्ठलभक्त होते. त्यांनीच बांधलेले विठ्ठलमंदिर तुकांनी दुरुस्त केले. पांडुरंगाची चरणसेवा हीच माझ्या वडिलांची मिरास असून त्यांनी एकादशी महाव्रताची उपासपारणी

१ वडिलीं.

करून विठ्ठलाला जवळ येले आहे, त्यानी चरणसेवेचा वाटा माझ्याकडे दिला आहे, असे त्यांनी एका अभगात म्हटल आहे 'वंशपरंपरा दास मी अंकित मी वंशपरंपरेने अंकित असा दास आहे, असे म्हणून आपल्या या अलौकिक मिरासदारीचा गौरव केला आहे 'पंढरीची वारी आहे माझे घरीं याचा तुकाना मोठाच अभिमान आहे आपल्या उपास्य दैवताबद्दल त्यानी म्हटले आहे– सहज वडिला होती सेवा । म्हणूनि पूजितों या देवा वडिलानी या देवाची पूजा केली म्हणून आणखीनच महत्त्व वाढले श्रीविठ्ठल ही आपल्या 'कुळींची कुळदेवी' असल्याचे त्यानी सांगितले आहे घराण्यातील सर्व कुळधर्म आपण निष्ठेने पाळू असा त्याचा विश्वास होता. अशी ही 'जुन्हाट सेवा' फार श्रेष्ठ असल्याची खात्री तुकाना नेहमीच वाटे

१६४४ नेणे गति काय कवण अधोगति । मानिली निश्चिती तुझ्या पायीं ॥ १ ॥
कर्म धर्म कोण नेणे हा उपाव । तुझ्या पायीं भाव ठेवियेला ॥ २ ॥
नेणे निरसू पाप पुण्य नेणें काय । म्हणऊनि पाय धरिले तुझे ॥ ३ ॥
वेडा मी अविचार न कळे विचार । तुज माझा भार पांडुरंगा ॥ ४ ॥
तुका म्हणे तुज करिता नव्हे काय । माझा तो उपाय कवण तेथें ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – उपाव–उपाय निरसू– दूर करू

अर्थ –देवा, उत्तम गती कोणती, अधोगती कोणती, हे मी काहीच जाणीत नाही मी केवळ तुझ्या पायाशीच विश्रांती मानली आहे १ कर्म कोणते, धर्म कोणता, त्याचे उपाय कोणते याचीही मला काही माहिती नाही माझा भाव केवळ तुझ्याच पायाशी आहे २ पाप दूर कसे करावे, पुण्य कसे असते, हे मला समजत नाही म्हणून मी तुझे पाय धरले आहेत ३ मी आपला असा वेडा व अविचारी असून मला तुमच्या प्राप्तीचा विचारही सुचत नाही म्हणून माझा सर्व भार देवा पांडुरंगा तुझ्यावर आहे ४ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तुम्ही केले असता काय होणार नाही ? त्यासाठी माझ्यासारख्याचा उपाय तो कितीसा चालणार आहे ? ५

१६४५ तुझा म्हणऊनि जालो उतराई । त्याचे वर्म[1] काई तें मी नेणे ॥ १ ॥
हातीं धरोनिया दावीं मज वाट । पुढें कोण नीट तेचि देवा ॥ २ ॥
देवभक्तपण करावें जतन । दोहीं पक्षीं जाण तूंचि बळी ॥ ३ ॥
अभिमाने तुज लागली हे लाज । शरणागता काज करावया ॥ ४ ॥
तुका म्हणे बहु नेणता मी फार । म्हणऊनि विचार जाणविला ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा –काज–काम, कार्य

अर्थ –देवा, मी तुझा आहे असे म्हणून तुझा उतराई झालो आहे उपकार फेडण्याचे याखेरीजचे दुसरे वर्म मला माहीत नाही १ देवा तू आता मला हाताला धरून जी वाट चांगली असेल तीच कृपा करून दाखीव २ स्वामी व सेवक हा भाव देवा तुम्ही जतन करून ठेवा कारण उभयपक्षी तूच बलवान असा साहाय्यकारी आहेस ३ शरण आलेल्याचे कार्य करण्याचे ब्रीदच असल्याने यात काही कमी पडले तर त्याची लाज देवा, तुम्हासच आहे ४ तुकाराम महाराज म्हणतात, मी फारच नेणता असल्याने मी हा विचार तुमच्यापुढे मांडला आहे ५

१६४६ मारगीं चालता पाऊलापाउलीं । चिंतावी माउली पांडुरंग ॥ १ ॥
सर्व सुख लागे घेऊनिया पाठी । आवडीचा कंठीं रस ओती ॥ २ ॥
पीतांबरें छाया करी लोभापर । पाहे तें उत्तर आवडीचे ॥ ३ ॥
तुका म्हणे हेंचि करावें जीवन । वाचे नारायण तान भूक ॥ ४ ॥

---

[1] कर्म

शब्दार्थ व टीपा -वाचे-वाणीनें, अथवा वाचवील.

अर्थ:-रस्त्याने चालत असताना पावलोपावली पांडुरंगमाऊलीचे चिंतन करावे. १ म्हणजे मग हा देव सर्व सुखे घेऊन आपले चिंतन करणाराच्या पाठीशी राहातो आणि आपल्या आवडीचा नामरस त्याच्या कंठात ओततो. २ आपल्या भक्तावर हा आपल्या पीतांबराची छाया करून त्याच्यावर अपार लोभ करतो आणि आपल्या आवडीची उत्तरे भक्ताकडून कशी घेतात हेच तो पाहातो ३ तुकाराम महाराज म्हणतात, याचे नामच जीवन करावे, वाणीने याचाच जप करावा, म्हणजे तहानभुकेची आठवण राहाणार नाही, अथवा याचे नाम घेतल्यावर मग तो तहानभूक वाचवील. ४

१६४७ जालों आतां दास । माझे तोडोनियां पाश ॥ १ ॥
ठाव द्यावा पायांपाशीं । मी तों पातकांची राशी ॥ २ ॥
सकळ हो गोवा । माझा उगवूनि देवा ॥ ३ ॥
तुका म्हणे भय । करा[1] जवळी तें नये ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – गोवा-प्रपंचाचा गुंता, ठाव-आश्रय.

अर्थ –देवा, संसाराचे सर्व पाश तोडून मी आता तुझा दास झालो आहे. १ तेव्हा आता मला तुमच्या पायांपाशी आश्रय द्यावा कारण मी पातकांची रास आहे. २ देवा, माझा हा प्रपंचविषयक गुंता तुम्ही सोडवावा तुकाराम महाराज म्हणतात, जन्ममृत्यूचे भय मला न वाटेल असे करा. ४

१६४८ अंतरींचें जाणां । तरि कां येऊं दिलें मना ॥ १ ॥
तुमची करावी म्यां सेवा । आता अव्हेरितां देवा ॥ २ ॥
नव्हती मोडामोडी । केली मागें तेचि घडी ॥ ३ ॥
तुका म्हणे दिला वाव । पायीं लागो दिला भाव ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा-अंतरींचें-मनातले, ठाव-स्थान, वाव-अवसर.

अर्थ.-देवा, माझ्या मनातील तुम्ही सर्व काही जाणता. मग तुम्ही मनात असे का आणले ? १ मी तुमची सेवा करीत असतानाही तुम्ही मला दूर करावे ? २ मागे जेव्हा तुम्ही देवभक्त असा भाव निर्माण केला तेव्हाच हा संबंध मोडला असता तरी बरे होते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, तुम्हीच मला अवसर दिला तुम्हीच तुमच्या पायांशी भाव स्थिर होऊ दिला. आता अव्हेर का करता ? ४

१६४९ पवित्र होईन चरित्रउच्चारें । रुपाच्या आधारें गोजिरिया ॥ १ ॥
*आपुरती बुद्धि पुण्य नाहीं गांठी । पायीं घालीं मिठी पाहें डोळां ॥ २ ॥*
गाईन ओंविया शिष्टांच्या आधारें । सारीन विचारें आयुष्या या ॥ ३ ॥
तुका म्हणे तुझें नाम नारायणा । ठेवीन मी मना आपुलिया ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा -शिष्टांच्या-चांगल्या, साधुसंताच्या, सज्जनाच्या

अर्थ:-देवा, तुमच्या सगुणसुंदर रुपाचे मी चरित्र गाईन आणि त्यामुळे मी पवित्र होऊन जाईन १ माझी बुद्धी कमी आहे व कसलेही पुण्य माझ्याजवळ नाही म्हणून देवा, मी तुमच्या पायांस मिठी घालून तुम्हांस डोळे भरून पाहात आहे २ पूर्वी जे सज्जन होऊन गेले, त्यांच्या साह्याने मी तुमच्या वर्णनाच्या ओव्या गाईन. याच चिंतनामध्ये मी माझे आयुष्य घालवीन. ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, नारायणा मी तुमचे नाम माझ्या मनात साठवून ठेवीन. ४

१ सदा

१६५० काय ऐसा जन्म जावा यांयांविण । कांहीं तरी ऋण असो माथां ॥ १ ॥
कोणे तरी काळें होईल आठव । नाहीं जरी भाव भार खरा ॥ २ ॥
शता एका तरी जन्माच्या शेवटीं । कृपाळुवा पोटीं होइल[1] दया ॥ ३ ॥
तुका म्हणे नाहीं फांकों तरी देत । सर्वांचें उचित सांपडलें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – आठव–स्मरण, आठवण.

अर्थः–हा जन्म असा व्यर्थच जाया काय ? काहीतरी सेवेचे ऋण देवावर आपले असावे. १ म्हणजे देवाला कोणत्या तरी काळात आपली आठवण होईल. भाव माझा खरा नसला तरी मी देवावरच भार घातलेला आहे. २ या जन्मी नाही तरी शत जन्मानंतर का होईना, पण त्या दयाळू देवाच्या पोटी माझ्याविषयी कृपा निर्माण होईल. ३ तुकाराम महाराज म्हणतात, सर्वांत श्रेष्ठ अशी जी ईश्वरभक्ती अथवा उपासना मला सापडली आहे, तिच्यापासून मी आपले चित्त फाकू देणार नाही. ४

१६५१ नाहीं कोणी दिस जात वांयांविण । साध्य नाहीं सीण लटिकाचि ॥ १ ॥
एकाचिये माथां असावें निमित्त । नसो नाहीं हित कपाळीं तें ॥ २ ॥
कांहीं एक तरी बोलायाचा जागा । नेदिती वाउगा उभा ठाकों ॥ ३ ॥
तुका म्हणे वर्में कळों येती कांहीं । ओळखी जे नाहीं होईल ते ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– सीण–श्रम, लटका–व्यर्थ.

अर्थ –कोणताही दिवस व्यर्थ वाया जात नाही. आज देवाच्या प्राप्तीचे साध्य हस्तगत झाले नाही; आणि केलेले श्रमही व्यर्थ वाटतात. १ तरी सुद्धा त्या देवाने आपले कर्तव्य केले नाही असे दूषण त्याच्या माथ्यावर ठेवता येईल. २ आपल्याकडून आपण काही तरी तक्रार करायला जागा असू द्यावी, नाही तर तो आपल्याला दारातही उभे राहाण्यास जागा देणार नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, जशी जशी त्याच्या ठिकाणी ओळख होत जाते तसतशी त्याची काही वर्में कळू लागतात ४

१६५२ काय करील तें नव्हे विश्वंभर । सेवकां दारिद्र लाज नाहीं ॥ १ ॥
मजपासूनि हें पडिलें अंतर । काय तो अव्हेर करूं जाणे ॥ २ ॥
नामाच्या चिंतनें नासी गर्भवास । नेदी करूं आस आणिकांची ॥ ३ ॥
तुका म्हणे नेणों किती वांयां गेले । तयां उद्धरिले पांडुरंगें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा –अव्हेर–अस्वीकार.

अर्थः–सर्व विश्वास भरून राहिलेला हा परमेश्वर, विश्वंभर याने केले तर काय होणार नाही ? पण सेवकास स्वतःच्या दारिद्र्याची लाजच उरत नसते. १ माझ्याकडूनच त्या प्रभूच्या सेवेत अंतर पडू लागले. तें जर न पडते तर तो काय मला अंतर पडू देता ? २ याच्या नामाचे चिंतन केले म्हणजे सर्व सांसारिक दुःखाचा नाश होतो व इतर कशाविषयीही इच्छा मनात उरत नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, आजपर्यंत कित्येकजण वाया गेले हे सांगता येत नाही, पण त्याचाही उद्धार या पांडुरंगाने केला ४

१६५३ संध्या करितोसी केशवाच्या नावे । आरंभीं तें ठावें नाहीं कैसे ॥ १ ॥
किती या सांगावे करूनि फजित । खळ नेणे हित जवळी तें ॥ २ ॥
माजल्या न कळे उचित तें काय । न घ्यावें तें खाय घ्यावें सांडी ॥ ३ ॥
तुका म्हणे घेती भिंती सवें डोकें । वावसी तीं एके अंधारलीं ॥ ४ ॥

---
[1] येईल

शब्दार्थ व टीपा –खळ–दुष्ट, साडी–सोडून देतो, वावसी–व्यर्थ

अर्थ –तू रोज सध्या करताना केशवाचे नाव जपतोस, पण त्या केशवाचे वास्तविक ज्ञान तुला कसे नाही ? १ याला फजीत करून सागावे तरी किती ? हा दुष्ट काही केल्या जवळ असणारे हित जाणीत नाही. २ जो मानलेला आहे त्याला योग्य काय ते समजतच नाही जे घेऊ नये ते तो घेतो आणि जे घ्यावे त्याला तो सोडून देतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, कित्येक जण अधारामध्ये चाचपडतात व भितीस टक्कर घेऊन व्यर्थच डोके फोडून घेतात ४

१६५४ दुधाचे घागरी मद्याचा हा बुद[1] । पडिलिया शुद्ध नव्हे मग ॥ १ ॥
तैसे खळा मुखें न करावे श्रवण । अहंकारे मन विटाळले ॥ २ ॥
काय करावीं तीं बत्तीस लक्षणे । नाक नाहीं तेणें वाया गेलीं ॥ ३ ॥
तुका म्हणे अन्न जिरों नेदी माशी । आपुलिया जैशी सवसगें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – बुद–थेंब, खळा–दुष्टाच्या

अर्थ –घागरभर दुधामध्ये जर एखादा मद्याचा थेंब पडला तर ते दूध अशुद्ध झाल्यामुळे निरुपयोगी होते १ त्याच प्रमाणे ज्याचे मन अहकाराने विटाळलेले आहे त्या दुष्टाच्या मुखाने परमार्थाच्या किंवा भक्तीच्या गोष्टी ऐकू नयेत २ सुदरपणाची चांगली बत्तीस लक्षणे असली व एक नाक जर नसेल तर काय त्यांचा उपयोग ? ती व्यर्थच होत ३ तुकाराम महाराज म्हणतात, अन्नात पडलेली माशी आपल्या सगतीने अन्न कधीही पचू देणार नाही ४

१६५५ सागावे ते बरे असतें हे पोटीं । दु ख देते खोटी बुद्धि मग ॥ १ ॥
आपला आपण करावा वेव्हार । जिकोनि अतर मन ग्वाही ॥ २ ॥
नाहीं मागें येत बोलिले वचन । पावावा तो सीण बरा मग ॥ ३ ॥
तुका म्हणे बहु भ्यालो खटपटे । आता देवा खोटें शब्द पुरे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – वेव्हार–व्यवहार, सीण–त्रास

अर्थ – जे आपल्या मनात आहे ते स्पष्टपणे सागावे पोटात जर कपट ठेविले तर मग दु ख होते १ असा व्यवहार आपला आपणच करावा व आपल्या अत करणास जिकून मनास साक्षी ठेवावे २ जे वचन आपण कपटबुद्धीने बोललो ते काही परत येत नाही, मग त्यापासून मोठे दु ख तेवढे होते ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, अशा या खटाटोपास मी फार भ्यालो आहे आता हे खोटे शब्द पुरे असे मला वाटते ४

## ॥ वाराणसीस यात्रा चालली तेव्हां स्वामींनीं भागीरथीस पत्र धाडिलें–ते अभंग ॥ ३ ॥

१६५६ परिसे वो माते माझी विनवणी । मस्तक चरणीं ठेवीतसे ॥ १ ॥
भागीरथी महादोष निवारणी । सकळां स्वामिणी तीर्थांचिये ॥ २ ॥
जीतां भुक्ति मोक्ष मरणें तुझ्या तिरीं । अहिक्यपरत्रीं सुखरूप ॥ ३ ॥
तुका विष्णुदास सताचे पोसणें । वाक्पुष्प तेणें पाठविलें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपाः– परिसें–ऐका, भुक्ति–ऐश्वर्याचे भोग, अहिक्यपरत्रीं–या लोकी व परलोकी

---

१ बिंद

अर्थ – अहो भागीरथी माते, मी तुमच्या पायावर मस्तक ठेवून विनवणी करीत आहे, ती तुम्ही ऐका १ भगीरथ राजाने मोठ्या परिश्रमाने तुम्हास महादोषाच्या निवारणासाठी येथें आणले, म्हणून तुमचे नाव भागीरथी असून सर्व तीर्थांत तुम्ही श्रेष्ठ आहात २ तुमच्या तीरावर एकदा आश्रय घेतला म्हणजे जिवतपणीच्या सर्व ऐश्वर्याचे भोग प्राप्त होतात व परलोकात प्राण्याना सुख प्राप्त होते ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी हा विष्णुदास असून माझे पोषण या संताकडून होत असते त्या योगानेच मी हे वाणीरूप पुष्प तुमच्याकडे पाठविले आहे ४

१६५७ तुम्ही विश्वनाथ । दीनरंक मी अनाथ ॥ १ ॥
कृपा कराल ते थोडी । पाया पडिलो[1] बराडी ॥ २ ॥
काय उणें तुम्हांपाशीं । मी तों अल्पेंचि संतोषी ॥ ३ ॥
तुका म्हणे देवा । काहीं भातुके पाठवा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – रंक–गरीब, बराडी–दीन, भातुके–खाऊ

अर्थ – देवा, विश्वनाथा, तुम्ही सर्व विश्वाचे स्वामी आहात, आणि मी मात्र केवळ दीन, अनाथ व गरीब आहे १ असा हीन, दीन मी तुमच्या पाया पडत आहे माझ्यावर तुम्ही कृपा कराल तेवढी थोडीच आहे २ तुमच्या जवळ खरे म्हणजे काय कमी आहे ? आणि मी पण थोडक्यात संतोषी आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, मला काही तरी प्रेमाचा खाऊ पाठवा ना ४

१६५८ पिंड पदावरी । दिला आपुलिये करीं ॥ १ ॥
माझें जाले गयावर्जन । फिटलें पितरांचे ऋण ॥ २ ॥
केलें कर्मांतर । बोंब मारिली हरिहर ॥ ३ ॥
तुका म्हणे माझें । भार उतरलें ओझें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – पदावरी–पायावर, गयावर्जन–गयेस करावयाचे धार्मिक विधी, श्राद्ध वगैरे

अर्थ – मी आपला देहरूप पिंड आपल्या हाताने विष्णूच्या पायावर अर्पण केला आहे १ यामुळे गयेस करावयाचे श्राद्धकर्म वगैरे सफल होऊन माझ्या पितरांचे कर्जही फिटून गेले २ या ठिकाणी हरिहराचे नावे मी बोंब मारली हेच माझे कर्मांतर झाले ३ तुकाराम महाराज म्हणतात, यामुळे माझ्यावरील सर्व ओझे उतरून गेले आहे ४

विवरण – तुकोबाचे वास्तव्य नेहमी बहुधा देहू गावाभोवतीच असे आळंदी, लोहगाव, शिंगणापूर, पंढरपूर एवढे फारतर त्यांच्या भ्रमणाचे मर्यादित क्षेत्र असावे काशी, गया, प्रयाग, मथुरा, वृन्दावन इत्यादी उत्तरेतील व रामेश्वरादी दक्षिणतील तीर्थयात्रा करण्याची मोठीच इच्छा हिंदू माणसाच्या मनात असते तुकोबांना स्वतःला या यात्रा घडलेल्या नव्हत्या पण काशीविश्वेश्वर, गंगामाता व गया येथील विष्णुपद यांच्या दर्शनास जाणाऱ्या यात्रेकरूबरोबर तुकोबांनी आपल्या मनातील भावार्थ व भक्ती व्यक्त करण्यासाठी तीन अभंग लिहून दिले भागीरथी ही पवित्र नदी अनेक पातकांचा नाश करणारी असून तिच्या ठायी मोक्षसुखाचे सामर्थ्य आहे या पवित्र गंगा नदीस अभंगरूपी वाक्पुष्प तुकोबांनी पाठविले होते आपणास काही तरी प्रेमादरूपी खाऊ पाठवा अशी विनंती तुकोबांनी काशीविश्वेश्वराना केली आहे आणि गयेस श्राद्धादी कर्मे करून आपल्या पितरांना मुक्ती मिळविण्याचा खटपट हिंदुमात्र करीत असतो याही पिंडदानाचा व कर्मांतराचा उल्लेख मोठ्या गमतीनें तुकोबांनी केला आहे गंगेविषयीची श्रद्धा त्यांनी इतरत्रही 'गंगाजळा पाहीं धाठीं पोट नाहीं' यासारख्या वर्णनातून व्यक्त केला आहे

---

१ पडलों

एकंदर हिंदू परंपरेतच गंगेचे माहात्म्य अनेक ठिकाणीं वर्णन केले आहे भगीरथ राजाने आपल्या पितराच्या उद्धारासाठी ही गंगा स्वर्गाहून मृत्यूलोकी आणली, याचा अर्थ भगीरथाने परिश्रम घेऊन गंगेच्या तीरावर वसाहत वसविली, शेतजमीन सुधारली, संस्कृतीचे रूप उभे केले, असा घेतला तरी सुद्धा भारतीयांना गंगा ही माता वाटावी इतपत तिची महती आहे 'तीर्थानां स्रोतसां गंगा, निम्नगानां यथा गंगा देवानामच्युतो यथा' अशा शब्दात भागवत ग्रथानें गंगेचे माहात्म्य वर्णन केले आहे भगवद्गीतेच्या दहाव्या अध्यायातही विभूतिविस्तार सांगताना 'स्रोतसामस्मि जान्हवी' असं भगवतानी म्हटले आहे

असे या गंगेचे महत्त्व अनेक संस्कृत व प्राकृत कवींनी वर्णन केले आहे 'त्वत्तीरे तरुकोटरातरगतो गंगे ! विहंगो वरं' 'त्वन्नीरे नरकांतकारिणी वरं मत्स्योऽथ वा कच्छपः' अशा शब्दात वाल्मीकींनी गंगेचा महिमा वर्णन केला आहे 'सर्वतीर्थमती गंगा तया माता न संशय,' 'कृते सर्वाणि तीर्थानि त्रेतायां पुष्कर पुरम्। द्वापरे तु कुरुक्षेत्रं कलौ गंगैव केवलम्' 'दृष्ट्वा जन्मशतं पापं पीत्वा जन्मशतद्वयम। स्नात्वा जन्मसहस्राणि हृति गंगा कलौ युगे' इत्यादी ओळींतून पुराणग्रंथानी श्रीगंगेचे पातक नष्ट करण्याचे सामर्थ्यच वर्णन केले आहे जगन्नाथ पंडित, कालिदास, मोरोपंत इत्यादी कविवर्यांनी गंगावर्णनातून आपली गंगानदीविषयीची श्रद्धा व्यक्त केलेली आहे जे गंगेविषयीचे प्रेम लोकमानसात आहे, तेवढेच काशीच्या विश्वेश्वरासंबंधी आहे एकनाथ महाराजानी गंगा व काशीचा विश्वेश्वर याच्याविषयी एकाच अभंगात मोठा समर्पक असा उल्लेख केला आहे 'धन्य काशीपुरी धन्य काशीपुरी। जेथें वास करी विश्वनाथ ॥१॥ तयाच्या दर्शनें प्राणी मुक्त होय। चारी मुक्ती पायां लागताती ॥२॥ भागीरथीं स्नान जयालागीं घडे। समळ हें झडें पाप त्याचे ॥३॥ काळभैरवाचे दर्शन घेईल। तात्काळ जाईल वैकुंठासी ॥४॥ प्रदक्षिणा पंचक्रोशीची जो करी। होईल अधिकारी सर्वस्वाचा ॥५॥' एकनाथाच्या चरित्राचा व काशी यथील त्याच्या वास्तव्याचा संबंध प्रसिद्ध आहे

तुकोबानी काशीविश्वेश्वरास व गंगेस उद्देशून जे अभंग यात्रेकरूच्या बरोबर दिले, त्याच्यामागे एक कथाही असल्याचे सांगितले जाते लोहगावास कोंडाबा लोहकरे या नावाचा एक तुकोबाचा भक्त राहात असून तो बुवाच्या कीर्तनास व भजनास नित्य येई त्याच्या पाठीमागे उभे राहून ध्रुपद म्हणे त्याच्या मनात एकदा काशीयात्रेस जाण्याचा विचार आला परंतु यात्रेला जाण्याएवढा त्याच्याजवळ पैसा नव्हता. तुकाराम महाराजांनी ही अडचण ओळखून त्याला एक होन दिला या होनाच्या चमत्काराची सर्व हकीगत महीपतीबुवानी दिलेली आहे कोंडोबा निघाला तेव्हा बुवानी त्याच्याजवळ वरील तीन अभंग करून दिले त्यांनी हे अभंग गंगेस समर्पण करण्यासाठी त्याला सूचना केली महीपतीबुवानी वर्णन केलं आहे की, तुकोबाचे हे अभंग मोठ्या प्रीतीने स्वीकारण्यासाठी गंगने आपले रत्न कंकणमंडित हात बाहेर काढले काशीविश्वेश्वराने अभंग ऐकताच स्वत च्या अंगावरील बेल व पुष्पे खाली ढाळली !

१६५९ मथुरेच्या राया। माझें दंडवत पाया ॥ १ ॥
तुमचे कृपेचें पोषणें। माझा समाचार घेणें ॥ २ ॥
नाम धरिलें कंठीं। असें आर्तभूत पोटीं ॥ ३ ॥
जीवींचें ते जाणा। तुका म्हणें नारायणा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– राया–राजा, श्रीकृष्णा, आर्तभूत–कृपेची इच्छा करणारा

अर्थ – मथुरेच्या राजा, श्रीकृष्णा, तुझ्या पायावर माझे दंडवत असो १ तुमच्या कृपेने मी पोसला जाणार असल्याने तुम्ही माझा समाचार वारवार घेत जावा. २ देवा, तुमचे नाम मी माझ्या कंठात धारण करून मी कृपेची इच्छा करणारा बनलो आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, नारायणा, माझ्या जीवाचा भाव तुम्ही नीटपणे जाणावा ४

१६६० जाय तिकडे लागे पाठीं। नाहीं तुटी आठवाची ॥ १ ॥
हरूनिया नेलें चित्त। माझें थीत भाडवल ॥ २ ॥

दावूनिया[1] रूप डोळा । मन चाळा लावियेले ॥ ३ ॥
आणीक तोंडा पडिली मिठी । कान गोष्टी नाइकती ॥ ४ ॥
बोलिल्याचा आठव न घडे । वाणी ओढे ते सोई ॥ ५ ॥
तुका म्हणे प्रेमघणी । भरली अंगीं अखंड ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – तुटी–कमतरता, यीत–वाया, व्यर्थ, थोडके

अर्थ – हा देव जिकडे जावे तिकडे पाठीशी लागतो त्याच्या स्मृतीला कधीच कमतरता नसते त्याची विस्मृती कधीही होत नाही १ याने माझे चित्त हरून नेले आहे माझ्या जवळ एवढेच थोडेसे भाडवल होते २ तुम्ही तुमचे रूप माझ्या डोळ्याला दाखविले व माझ्या मनास त्याचाच चाळा लावून दिला ३ आता देवा, तुमच्या नामाशिवाय इतर बोलणेच नाही, तोंडाला खीळ पडली आहे इतर गोष्टी ऐकायला कानही तयार नाहीत ४ मी जे काही बोलतो, त्याचेही स्मरण मला धड नीट राहात नाही श्रीहरीच्या नामाकडे माझे मन सारखे ओढ घेते ५ तुकाराम महाराज म्हणतात, श्रीहरीच्या प्रेमाची अखंड घण अंगामध्ये भरून राहिली आहे ६

१६६१ नको ऐसे जालें अन्न । भूक तान ते गेली ॥ १ ॥
गोविंदाची आवडी जीवा । करीन सेवा धणीवरी ॥ २ ॥
राहिलें तें राहो काम । सकळ धर्म देहीचे ॥ ३ ॥
देह धरिला त्याचे फळ । आणीक काळ धन्य हा ॥ ४ ॥
जाऊं नेदीं करिता सोस । क्षमा दोष करवीन ॥ ५ ॥
तुका म्हणे याच पाठी । आता साटीं जीवाची ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – तान–तहान, धणीवरी–तृप्त होईपर्यंत, सोस–हाव, इच्छा

अर्थ – आता मला अन्न नकोसे झाले असून माझी तहानभूक सर्व ताहीशी झाली आहे १ माझ्या जीवास या गोविंदाची आवड फार मोठी आहे त्याची सेवा मन तृप्त होईपर्यंत मी करीन २ देहधर्माची सर्व कामे राहिली तरी ती राहू द्या, इतर सर्व लौकिक कामेही राहू द्या ३ हा काळ धन्यतेने जात आहे हेच माझ्या देहधारणाचे फळ आहे ४ मी माझ्या मनास आता दुसऱ्या हावेकडे जाऊ देणार नाही इतराची इच्छा करीत नाही माझ्या कडून जे दोष घडले असतील, त्याची क्षमा मी श्रीहरीकडून करवीन ५ तुकाराम महाराज म्हणतात, मी आता या देवाच्या पाठीशी लागून याला जीव अर्पण करीन अथवा जीव अर्पण करून मी देवाच्या पाठीशी राहीन ६

१६६२ वाट पाहें हरि का नये आझूनि । निष्ठुर का मनीं धरियेलें ॥ १ ॥
काय करूं धीर होत नाहीं जीवा । काय आड ठेवा उभा ठेला ॥ २ ॥
नाहीं माझा धावा पडियेला कानीं । कोठें चक्रपाणी गुंतलेती ॥ ३ ॥
नाहीं आलें कळों अतरा अतर । कृपावत फार ऐकतो ॥ ४ ॥
बहुता दिसाचे राहिलें भातुकें । नाहीं कवतुकें कुरवाळिलें ॥ ५ ॥
तुका म्हणे देईं एकवेळा भेटी । शीतळ हें पोटीं होइल मग ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – ठेवा–प्रारब्ध, दैव, धीर–शांत, अतरा–मनास, अतर–मन, भातुकें–प्रेमाचा खाऊ, शीतल–थंड, शांत

अर्थ –देवा मी तुझी एकसारखी वाट पाहात असूनही तो श्रीहरी अजून कसा आला नाही ? आता निष्ठुरपणा त्याने मनात का धरला आहे ? १ काय करू मी ? माझे मन स्वस्थ होत नाही, जीव शांत होत नाही माझे

---

[1] लावूनिया

कोणते प्रारब्ध आता आड येत आहे ? २ देवा, मी आर्त मनाने केलेला धावा तुझ्या कानांवर पडत नाही का ? चक्रपाणी ? तू कोणत्या कामात गुंतला आहेस ? ३ देवा, माझ्या मनातील भाव तुला व तुझ्या मनातील मला अजून समजला नाही; पण तू तर फार कृपावत आहेस असे मी ऐकतो. ४ देवा, फार दिवसांचा प्रेमाचा घाऊ तुझ्याकडून यायचा राहिला आहे. तुम्ही अजून मला एकदाही कौतुकाने कुरवाळले नाही. ५ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, मला एकवेळा तरी भेट द्या ना. मग माझे मन शांत होईल. ६

१६६३ नाहीं दिलें कधीं कठिण उत्तर । तरी कां अंतर पडियेलें ॥ १ ॥
म्हणऊनि आतां वियोग न साहे । लांचावलें देहे संघष्टणें ॥ २ ॥
वेळोवेळां वाचे आठवितों नाम । अधिकचि प्रेम चढे घेतां ॥ ३ ॥
तुका म्हणे पांडुरंगे जननिये । घेऊनि कडिये बुझाविलें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :–संघष्टणें–सलगीसाठी, बुझाविलें–समजूत केली.

अर्थ :–आतापर्यंत मी या देवास कधी कठिण शब्दांनी उत्तर दिले नाही. तरीसुद्धा एवढे त्याच्यात व माझ्यात का अंतर पडले आहे ? १ म्हणून आता मला त्याचा वियोग सहन होत नाही. त्याच्या देहाच्या सलगी-साठी माझे मन लाचावले आहे. २ मी माझ्या वाणीने त्याचे नाव एकसारखे घेत आहे, असे नामस्मरण करताना अधिकच त्याच्याविषयीचे प्रेम वाढत आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, या पांडुरंगमाऊलीने मला कडेवर घेऊन माझी समजूत केली ४

१६६४ आतां न करीं सोस । सेवीन हा ब्रह्मरस ॥ १ ॥
आम्हां[1] लक्षण अमृत । ब्रह्मपदींचें निश्चित ॥ २ ॥
तुमचा निज ठेवा । आम्ही पाडियेला ठावा ॥ ३ ॥
तुका म्हणे देवराया । आतां लपालेती वांयां ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– सोस– दुसरी इच्छा.

अर्थ :–आता मी दुसऱ्या कशाचीही इच्छा करणार नाही. या ब्रह्मरसाचेच तेवढे सेवन मी करीन. १ ब्रह्म स्वरूपाचे अमृत मी आता निश्चितपणे सेवन करीन. २ देवा, आता तमचा निजठेवा मला चांगलाच माहीत झाला आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवराया, आता तुम्ही लपून राहिलात तरी ते व्यर्थ आहे ४

१६६५ जेथें जेथें जासी । तेथें मजचि तूं पाहसी[2] ॥ १ ॥
ऐसा पसरीन भाव । रिता[3] नाहीं कोणी ठाव ॥ २ ॥
चित्त जडलें पायीं । पाळती हें ठायीं ठायीं ॥ ३ ॥
तुका म्हणे पोटीं । देव घालुनि सांगें गोष्टी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :–रिता–रिकामा, ठाव–स्थान.

अर्थ :– देवा, ज्या ज्या ठिकाणी तुम्ही जाल त्या त्या ठिकाणी तुम्ही मलाच पाहाल. १ मी माझ्या भक्ति-भावाचा प्रसार अशा रीतीने करीन की, त्याच्याशिवाय रिकामे स्थान कुठेच दिसणार नाही २ माझे चित्त आता तुमच्या पायी जडून राहिले आहे. ते त्याच्या स्वरूपाची पाळत ठायी ठायी करीत आहे. ३ तुकाराम महाराज म्हण-तात, मी भक्तिभावाने देवास पोटात घालीन व त्याच्याजवळ या गोष्टी करीन ४

१ सुखें सेवीन अमृत. २ पासी, ३ तरी.

१६६६ सापडला हातीं । तरी जाली हे निश्चिती ॥ १ ॥
नाहीं धावा घेत मन । इंद्रियाचे समाधान ॥ २ ॥
सांडियेला हेवा । अवघा संचिताचा ठेवा ॥ ३ ॥
तुका म्हणे काम । निरसुनिया घेतो नाम ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा– धावा-धाव, घेप, हेवा-हाव, संचिताचा-पूर्वकर्मांचा, प्रारब्धाचा, निरसुनियां-सोडून, त्याग करून

अर्थ–हा देव आता आमच्या हातात सापडल्यामुळे आम्ही निश्चित झालो आहोत १ आता माझे मन इतर कोणाकडेही धाव घेत नाही माझ्या सर्व इंद्रियाचे समाधान झाले आहे २ मी आता माझ्या प्रारब्धाचा अथवा पूर्वकर्मांचा ठेवा सर्व टाकून देऊन त्याची हावही माझ्या मनातली सोडली आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, सर्व लौकिक वासनाचा त्याग करून मी या श्रीहरीचे नाम घेत असतो ४

१६६७ मुक्तिपांग नाहीं विष्णुचिया दासा । संसार तो कैसा न देखती ॥ १ ॥
बैसला गोविंद जडोनिया चित्तीं । आदि तेचि अंतीं अवसानीं ॥ २ ॥
भोग नारायणा देऊनि निराळीं । ओविया मंगळीं तोचि गाती ॥ ३ ॥
बळ बुद्धि त्याची उपकारासाटीं । अमृत तें पोटीं साटवलें ॥ ४ ॥
दयावंत तरी देवाच सारिखीं । आपुलीं पारखीं नोळखती ॥ ५ ॥
तुका म्हणे त्यांचा जीव तोचि देव । वैकुंठ तो ठाव वसती ते ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – मुक्तिपांग-पराधीनता, उत्कट इच्छा, अवसानीं-शेवटी, अखेरीस, मरणाच्या वेळी, पारखी-दुसरी, ठाव-स्थान

अर्थ–जे विष्णूचे भक्त आहेत त्याना मुक्तीची उत्कट इच्छा असत नाही तिच्यासाठी ते पराधीन होत नाहीत, आणि ते संसाराकडेही पाहात नाहीत १ आयुष्यात सदासर्वकाळ म्हणजे प्रारंभी व शेवटी त्यांच्या चित्तात गोविंदानेच निवास केलेला असतो २ त्यांनी आपला सर्व भोग नारायणाला अर्पण केलेला असून मंगल ओव्यानी तेच नारायणाला गात असतात ३ त्यांचे बळ त्यांची बुद्धी यांचा उपयोग नेहमी उपकारासाठीच होत असतो त्यांच्या पोटात जणु अमृत साठविलेले असते ४ देवासारखे ते दयावंत असतात व त्यांच्यांत हा आपला, हा दुसरा असा भेद असत नाही ५ तुकाराम महाराज म्हणतात, त्यांचा जीव म्हणजे केवळ देवच बनलेला असून ते जेथे वस्ती करतात ते स्थान वैकुंठच बनलेले असते ६

१६६८ सेवीन उच्छिष्ट लोळेन अंगणीं[1] । वैष्णवां[2] चरणीं होइन जोडा ॥ १ ॥
ऐसें जन्म आता मज देईं देवा । आवडी हे जीवा सर्व काळ ॥ २ ॥
त्यांचे चरणरज घेती अंगावरी । वदीत[3] तें शिरीं जाइन मागें ॥ ३ ॥
तुका म्हणे येथें राहिलासे भाव । सकळही वाव जाणोनिया ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – उच्छिष्ट-उष्ट, शिल्लक राहिलेले, आवडी-इच्छा, चरणरज-पायावरील माती, वाव-व्यर्थ

अर्थ–मी वैष्णवांच्या घरी राहीन, त्यांचे शिल्लक राहिलेले उष्टे खाईन व त्यांच्या अंगणात लोळण घेईन त्यांच्या पायांतील जोडाही मी होईन १ देवा, मला आता अशा प्रकारचा जन्म दे तू आता माझ्या मनाची हीच

१ चरणीं, २ वैष्णवांचे व्हाणी होइन जिव्हा, ३ वदिन

एकमेव इच्छा उरलेली आहे. २ त्यांच्या चरणांची धूळ, माती माझ्या अंगावर येवो, तिला वंदन करून, कपाळाला लावून मी ते जिकडे जातील तिकडे जाईन. ३ तुकाराम महाराज म्हणतात, हा सर्व संसार व्यर्थ आहे हे जाणून संतांच्याच ठिकाणी माझा भाव राहिलेला आहे. ४

१६६९ क्षम देयाला हो । स्फुरताती दंड बाहो ॥ १ ॥
आतां झडझडां चालें । देईं उचलूं पाउलें ॥ २ ॥
सांडीं[1] हंसगती । बहु उत्कंठा हे चित्तीं ॥ ३ ॥
तुका म्हणे आई । श्रीरंगे विठाबाई ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– क्षेम–आलिंगन, हंसगती–हंसाप्रमाणे मंद गती.

अर्थ:–देवा, तुम्हांला आलिंगन देण्यासाठी माझे बाहू स्फुरण पावत आहेत. १ आता तुम्ही लोकर लोकर पावले उचलून माझ्यासाठी यावे. २ तुम्ही आता हंसाप्रमाणे मंदगती सोडून द्यावी, कारण मला तुम्हांला भेटण्याची भारी उत्कंठा लागलेली आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, श्रीरंगे, आई, विठाबाई, तू माझी एवढी इच्छा पूर्ण करच. ४

१६७० जेणें वेळ लागे । ऐसें सांडीं पांडुरंगे ॥ १ ॥
कंठ कंठा मिळों देईं । माझा वोरस तूं घेईं ॥ २ ॥
नको पीतांबर । सांवरूं हे अळंकार ॥ ३ ॥
टाकीं वो भातुकें । लौकिकाचें कवतुकें ॥ ४ ॥
हातां[2] पायां नको । कांहीं वेगळालें राखों ॥ ५ ॥
तुका म्हणे यावरी । मग सुखें अळंकारीं ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा.– सांडी–सोडून दे, वोरस–स्नेह, स्नेहाचा पान्हा.

अर्थ:–पांडुरंगे, माते, आता मला भेट देण्यास ज्यामुळे वेळ लागेल अशा सर्व गोष्टी तू सोडून दे. १ आता माझ्या कंठाला तुझा कंठ मिळू दे. माझा स्नेह तू घ्यावास, माझ्या प्रेमाचा स्वीकार करावास २ तुझ्या अंगावरील पीतांबर सावरण्यात व अलंकार नीट करण्यात तू वेळ नको घालवूस. ३ तुझ्या ठिकाणी असणारे खेळण्याचे भातुके (खाऊ) ते लौकिकाचे असल्यामुळे कौतुकाने टाकून दे. ४ मला आलिंगन देताना तू तुझ्या हातापायांना वेगळे राखून वागू नकोस. ५ तुकाराम महाराज म्हणतात, मला एकदा भेट दिल्यानंतर मग सुखाने अलंकार घालण्यात वेळ खर्च कर. ६

१६७१ कृपेचा ओलावा । दिसे वेगळाचि देवा ॥ १ ॥
मी हें इच्छीतसें साचें । न लगे फुकटशाई काचें ॥ २ ॥
जेणें जाय कळसा । पाया उत्तम तो तैसा ॥ ३ ॥
तुका म्हणे घरीं । तुझ्या अवघिया परी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:– साचें–खरोखरच्या, सत्यस्वरूपाच्या, काचें–कच्चे, मायावी, परी–प्रकार.

अर्थ.–देवा, तुझ्या खऱ्या कृपेचा ओलावा काही वेगळाच दिसतो. १ मला मात्र तुमची खरोखरी कृपा हवी. तुमचे फुकटचे मायावी रूप मला नको २ जेणेकरून कळस चांगल्या पद्धतीने स्थिर होईल, असा पाया उत्तमपैकी रचणे आवश्यक आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, तुमच्या घरी कृपेचे अनेक प्रकार असतील, मला त्यांतील खऱ्याची जरूरी आहे ४

१ सांडी हे सगती, २ आता.

१६७२ दावूनिया कोणा काहीं । तेचि वाहीं चाळविलीं ॥ १ ॥
तैसे नको करूं देवा । शुद्धभावा माझिया ॥ २ ॥
रिद्धिसिद्धी ऐसीं आड । येती नाड नागवूं ॥ ३ ॥
उदकाऐसी दावुनि ओढी । उर फोडी झळई[1] ॥ ४ ॥
दर्पणींचे दिले धन । दिसे पण चरफड[2] ॥ ५ ॥
तुका म्हणे पायासाटीं । करीं आटी कळों द्या ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – वाहीं–मार्ग, रीत, वृत्ती, नाड–नाडण्यासाठी, आडविण्यासाठी, नागवूं–नागविण्यासाठी, लुबाडण्यासाठी, झळई–मृगजळ, दर्पणींचे–आरशामधील, आटी–प्रयत्न, खटपट

अर्थ –कुणाला काही चमत्कार दाखवून त्या मार्गानें लोकांना तुम्ही चाळविले आहे १ देवा, मला मात्र तसे करू नका, कारण माझा भाव तुमच्या ठिकाणी फार शुद्ध आहे २ रिद्धीसिद्धींसारखी विघ्ने आडवणारी व नागवणारी मार्गात येतात ३ मृगजल हे पाण्याचे रूप दाखवून हरिणाना ऊर फुटेपर्यंत पळायला लावते, त्याप्रमाणे रिद्धीसिद्धींच्या वाटा आहेत ४ आरशात पडलेले धनाचे प्रतिबिंब पाहून त्याला पकडण्यासाठी बालकाची चडफड सुरू असते ५ तुकाराम महाराज म्हणतात, मी मात्र तुमच्या पायाचा खऱ्या स्वरूपात लाभ व्हावा म्हणून प्रयत्न करीत आहे हे तुम्ही समजावे ६

१६७३ काय माता विसरे बाळा । कळवळा प्रीतीचा ॥ १ ॥
आवडीने गळा मिठी । घाली उठी बैसवी ॥ २ ॥
लावूं धावे मुख स्तना । नये मना निराळें ॥ ३ ॥
भावडाचे भातें दावी । आपुले लावी त्यास जी ॥ ४ ॥
माझें थोडें त्याचें फार । उत्तर हें वाढवी ॥ ५ ॥
तुका म्हणे नारायणा । तुम्ही जाणा बुझावू ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – उठी–उठवी, भातें–खाऊ, बुझावू–समजूत घालणे

अर्थ – आईमध्ये बालकाच्या प्रीतीचा कळवळा असल्यामुळे ती कधी त्याला विसरू शकते काय ? १ बालक आपल्या आईच्या गळ्याला मोठ्या प्रीतीनें मिठी घालीत असते ते तिला हुश्काने उठविते, बसविते २ तिच्या स्तनास मुख लावण्यासाठी ते धावत असते, त्याला त्याशिवाय दुसरे काही सुचतच नाही ३ कधी ते बालक आपल्या भावडाचा खाऊ दाखवित, आपला खाऊ त्याला देऊन आपणास काही नाही असे दाखविते ४ कधी ते बालक मला फार थोडाच खाऊ त्याला मात्र पुष्कळ असा उत्तराने तक्रारही वाढविते ५ तुकाराम महाराज म्हणतात, नारायणा, अशी या बालक भक्ताची समजूत घालण्याचे तुम्हीच जाणता ६

विवरण – ईश्वराशी अथवा पांडुरंगाशी जी अनेक नाती जडविली गेली आहेत, त्यात मातेचे किंवा आईचे नाते विशेष प्रसिद्ध आहे सेव्य–सेवक, भाऊभाऊ, पतिपत्नी, बहीणभाऊ, पितापुत्र इत्यादी नात्यावर नाही म्हटले तरी अनेक प्रकारची बंधने आहेत निर्भयपणे हवा तो हट्ट करावा व अनेक अपराधांची क्षमा मागावी, असे एकच स्थान साधुसंतानी मानले आहे, आणि ते म्हणजे सर्व जगताची, अनंत जन्माची माऊली पांडुरंग हे होय याही माऊलीजवळ काहीही मागण्यास संकोच वाटू नये ईश्वरास एकदा आई म्हटले की मग सर्वच परिस्थिती बदलून जाते आईच्या प्रेमाचे वर्णन काय करावे ? ती का कधी आपल्या बालकाला विसरेल ? त्याचे अपराध मनात ठेवील ? त्याला कठोर शासन करील ? तिचे प्रेम चंद्रापेक्षा शीतल असते त्या प्रेमात स्वार्थाचा लवलेशही नसतो त्यात निर्भयता असते निर्व्याजता असते पुत्राचे सहस्र अपराध एकटी माताच विसरू शकते.

१ झळाळी, २ धरफडी

म्हणूनच ज्ञानेश्वरापासून सर्व वारकरी संतानी विठ्ठलाला माऊली म्हणूनच हाक मारिली आहे मातेच्या प्रेमाचे अनेक विशेष दर्शविणारे कित्येक दाखले ज्ञानेश्वरानी दिलेले आहेत '**ना तरी बालक बोबडा बोलीं । वाकुडा विचुका पाऊलीं । तें चोज करूनि माउली । रिझे जैसी**–' आपल्या लहान मुलाचे वेडेवाकडे चालणे आईस किती गोड वाटते ! ती त्याच्या चुकीच्या चालीनेच धन्य होते आणखी एके ठिकाणी त्यानी म्हटले आहे, '**ऐसा सचाडपणाचिये भुली। न सांभाळवे समस्या आपुली । या लागीं योग्यता जेविं माउली । बालकाची जाणे**' ज्याला स्वतःचा तोल राखता येत नाही, त्या लहान बाळाची काळजी आईशिवाय कोण घेणार ? '**कां स्नेहाळु माये । तान्हयाची वास पाहे**' त्या प्रमाणें हळुवार दृष्टीने या ईश्वरमाऊलीन आपला सभाळ करावा अशी त्याची अपेक्षा आहे '**मायेपुढें बालका । रिगता न पडे शंका**' तशीच आपली स्थिति व्हावी असे त्याना वाटे बालकाला आईशिवाय दुसरा आधारच कोणता ? '**का बालका एकी मायेवाचोनी जिणें काय आहे ?**' म्हणून ज्ञानदेवानी प्रश्न विचारला आहे.

असे हे आईचे प्रेम निर्भय व चित्तास निवान्त करणारे असते तिच्याच जवळ आपणास हट्ट धरता येता तिच्याचजवळ आपणास आपल्या मनातील हितगुज सागता येते तिच्या गळ्यात आवडीने आपला गळा घालता येतो तिलाच ऊठ, बस अशा शब्दाच्या सत्तेने सागता येते बाळाला जशी आईची आठवण, तशी आईलाही बाळाची आठवण तीव्रतने असते बाळाला लागलेली भूक प्रथम आईलाच समजते जीवाला लागलेल्या कळा परमात्म्यास प्रथम समजाव्यात याच भूमिकेवरून तुकोबानीही आईच्या प्रेमाचा वा वात्सल्याचा आधार घेऊन अनेक ठिकाणी आपल्या भावविश्वाचा आविष्कार केलेला आहे या आईनेच जर बाळाला सोडले तर त्याने जावे तरी कोठे ? '**मायें मोकलिलें कोठें जावें बाळें । आपुलिया बळें न वचे तें**' हे बाळ तरी कसा हट्ट करते त पाहा आईने चागले सुग्रास अन्नाचे जेवण वाढले, तर या बाळाच्या मनात हट्टाचे रोप उगवते, '**रुसोनिया पळे सांडुनियां ताट**' वाढलेले ताट डावलून तो रुसता व दूर निघून जातो पण त्याला आपल्या आईची केवढी खात्री असते ! '**मागें पाहे वाट यावे ऐसी**' आपल्या आईने आपली समजूत काढण्यासाठी यावे अशी त्याची इच्छा असते आणि आईचा जीव आधीच कासावीस झालेला असतो पोरगा उपाशी राहिल्याचे दुःख तिला छेडत असते म्हणूनच तुकारामबुवा म्हणतात, '**भाडवल आम्हां आळी करावी हें**' हट्ट करावा एवढेच आम्हा मुलाना माहीत आहे '**बाळ मातेपाशीं सांगे तानभूक, उपायाचें दुःख काय जाणे !**' आपली तहानभूक आपण आईस सांगावी मात्र, ती सर्व उपाय करीलच, असे समजून दुःख सागाव, आईस त्रास द्यावा, तिची बोलणी खावीत, पण तिच्या पदराखाली लपण्यास उत्सुक व्हावे, असा मोठ्या बहारीचा प्रकार या वात्सल्यभक्तीत असू शकतो आईएवढी माया दुसरे कोण करणार ? म्हणूनच साधुसंतानी व सर्व धर्मप्रवर्तकानी ईश्वरास आई म्हटले आहे मुलगा जितका किरकिरा तितकी त्याच्यावरील माया आईने जास्त करावी, मुलाने केलेल्या खोड्यानीच तिचे जीवन बहरत, फुलत '**तान्हयाचे लागता झटे । तों तों अधिकचि पान्हा फुटे**' अशी अवस्था या मायलेकराच्या संबंधाची ज्ञानदेवानी वर्णन केली आहे अशा या वत्सल मानस मुलाचा राग कधी येईल का ? तिला मुलाचा कधी शीण वाटेल का ? रामदासानी म्हटले आहे, '**वीट नाहीं कंटाळा नाहीं । आलस्य नाहीं त्रास नाहीं । इतुकी माया कोठेंचि नाहीं । माते वेगळी**' अशा या अलौकिक प्रेमाच्या दर्शनाचा लाभ फक्त मातेपाशीच होणार, तिच्यापाशीच नाना प्रकारचे हट्ट चालू राहाणार, भावाला जास्त खाऊ का ? व मला कमी का ? अशी एक रास्त तक्रार मुलाच्या भूमिकेवरून तुकाराम महाराजानी येथ केली आहे आईची माया सर्व लेकरावर सारखी असते ईश्वराने सर्वांवर सारखीच कृपा करावी, असा त्याच्या म्हणण्याचा भावार्थ.

**१६७४** तरीं आम्ही तुझी धरियेली कास । नाहीं कोणी दास वांयां गेला ॥ १ ॥
आगा पंढरीशा उभ्या विटेवरी । येईं लवकरी धांवे नेटें ॥ २ ॥
पाळवितों तुज उभी करोनि बाहे । कृपावंता पाहें मजकडे ॥ ३ ॥
तुका म्हणे तुज बहु काम डोळे । कां[1] हे मासे वेळे ऐसी परी ॥ ४ ॥

---

१ कांसा मास

शब्दार्थ व टीपा – पढरीशा–पढरीच्या ईश्वरा, विठ्ठला, नेटें–जोराने, वेगाने, पाचारितों–बोलावितो, बाहे–हात.

अर्थ —देवा, मी आता तुमचीच कास धरून राहिलो आहे तुमचा आश्रय केल्यावर कोणताही दास वाया गेला नाही १ अरे पढरपूरच्या ईश्वरा, विठ्ठला, विटेवर उभा असणाऱ्या पांडुरंगा, तू लौकर व वेगाने धावत ये २ कृपावंता, विठ्ठला, मी माझा हात वर करून तुला बोलावीत आहे तु एकदा धावत येऊन माझ्याकडे कृपेने पाहा तरी ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तुला तर पुष्कळच कान व डोळे आहेत असे ऐकतो मग आता माझीच हाक कशी तुला ऐकू येत नाही ? माझी ही दयनीय झालेली अवस्था तुला कशी रे दिसत नाही ? ४

विवरण —या आणखी एका भावपूर्ण अभगात तुकाराम महाराजानी एका नेहमीच्याच परंतु बिनतोड मुक्तिवादाचा उल्लेख केला आहे ईश्वर एकटाच, आणि त्याला हाक मारणारे अनत जीव, त्याने कोठे कोठे लक्ष द्यावे ?अशा प्रश्नाना साधुसतानी दान प्रकारची उत्तरे दिली आहेत पहिले उत्तर असे की, ही अनत रूपे परमेश्वराने का प्रसवला ? कुणाच्या इच्छेने हे सर्व जग व्यक्त स्थितीस आले ? त्याच्याच इच्छेने हा ससार जर वाढला असेल तर मग त्यानेच सर्वांची चिंता केला पाहिजे ' ज्याचा जारमार त्याचे माथा ' असाच निर्वाळा साधुसत देत असतात दुसरे उत्तर या शकेस असे की, ईश्वरास काही दोनच डोळे व दोनच कान नाहीत आपल्यासारखे ! त्याला अनेक कान, अनेक डोळे, अनेक हात असल्यामुळे तो एकाच वेळी अनेकाना मदत करू शकतो भगवद्गीतेच्या अकराव्या अध्यायात परमेश्वराच्या विराट स्वरूपाचे वर्णन करताना ' अनेक बाहूदरवक्त्रनेत्रम् ' असा जो उल्लेख आला आहे यावडे तुकोबाचा सकेत असावा आणखी तिसऱ्या प्रकारानेही या शकेचे निरसन होते सर्वगामी असणारा सूर्य हा परमेश्वराचा नेत्र मानला जातो ' अग्निर्मूर्धा चक्षुषी चद्रसूर्यौ, ' ' चद्रमा मनसो जातश्चक्षो सूर्यो अजायत ' अशा वैदिक वचनातून भगवताचा डोळा सूर्य असल्याचे सिद्ध होत आहे म्हणूनच मोरोपतानी केकावलीच्या प्रारंभीच्याच काही श्लोकात विचारले आहे, ' नसेन दिसलों कसा ? नयन सर्वसाक्षी रवी ' सर्वसाक्षी भगवान सूर्यनारायण हा परमेश्वराचाच नेत्र असताना आपण त्याला दिसलो नाही हे मानावे तरी कसे ?

१६७५ करावा कांटाळा नव्हे हें उचित । आधींच कां प्रीत लावियेली ॥ १ ॥
जाणतसां तुम्हीं रूपाचे लाघव । आपुले[1] तें जीव घेतें ऐसा ॥ २ ॥
काय म्हणऊनि आलेती आकारा । आम्हां उजगरा करावया ॥ ३ ॥
तुका म्हणे मीड होती आजिवरी । आतां देवा उरी कोण ठेवी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा –उचित–योग्य, लाघव–प्रेम, लालसा, उजगरा–जागरण, विलब, उशीर, उरी–पर्वा, किंमत.

अर्थ –देवा, तू आमचा कटाळा करायास हे तुला योग्य दिसत नाही असा कटाळा करायचा होता तर मग असे आधी प्रेम तरी का रे जडवलेस ? १ देवा, तुमच्या रूपाची लालसा मला किती आहे तुम्ही जाणताच जीव घेण्याइतका चटका त्या तुमच्या रूपामुळे मनास लागतो २ आम्हांस तुमी प्राप्ती व्हावी म्हणून आम्हीच जागरण करावे, किंवा आमच्यावर कृपेस विलब करायचा होता तर मग तुम्ही आकारास तरी का हो आलात ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, मला आजपर्यंत तुमच्याविषयी भीड वाटे, पण आता मात्र देवा तुमची पर्वा मी ठेवणार नाही ४

विवरण – वरील १६७३ च्या अभंगापासून पुढे १६७७ च्या अभगापर्यंत परमेश्वराशी कलह करण्याच्या भूमिकेत युवा आहेत असे दिसते आपणावर परमेश्वराने कृपा करावी म्हणून एकसारखी प्रार्थना करूनही काही फळ दिसत नाहीसे पाहून तुकारामबुवा वदळीवर आल्यासारखे दिसतात अनेक डोळे व अनेक कान असूनही आपणांकडे ईश्वराचे लक्ष कसे जात नाही ? अशी शंका त्यांच्या मनात येऊन गेलीच आहे आता या अभगात ते ईश्वरालाच उपदेश करायला निघाले आहेत ! तुकायाचा अधिकार एवढा मोठा की, तें आता मी तुमी पर्वा बिल्कुल करणार

1 आपुलाले जीव

नाहीं असे ईश्वराला सांगू शकतात. जर एवढी ताटातूट करायची होती तर मग आधी एवढी प्रीती तरी जडवावी का ? असाही धिटाईचा प्रश्न ते विचारू शकतात. तुम्ही या जगाच्या रूपाने आकारास तरी का आलात ? कुणी सांगितले होते तुम्हाला व्यक्त व्हायला ? या प्रश्नातील खोच ध्यानात घेण्यासारखी आहे. ईश्वर हा स्वतःच्याच इच्छेने व्यक्तावर आलेला आहे त्याला एकाकी करमत नव्हते म्हणून तो अनेकत्वाच्या अवस्थेला आला. अशी श्रुतीची साक्ष आहे. याच आधारावर तुका त्याला विचारतात ' काय म्हणऊनि आलेती आकारा ? ' आम्ही बद्ध, आम्ही पापी, आम्ही संसारात जखडलेले आणि देवा, तू मात्र नित्य शुद्ध, मुक्त. हे कसे ? असाही प्रश्न साधुसंत नेहमीच विचारतात. एकाच बीजापासून जर ही सर्व निर्मिती असेल तर बीज शुद्ध व त्याचा विस्तार अशुद्ध हे कसे संभवते ? हे आजपर्यंत बोलायची पचाइत होती; पण अधिकार येताच तुकोबांनी आधी प्रीत जडवून मग कटाळा करणाऱ्या देवास स्पष्टपणेच विचारले आहे. पुढल्यान अभंगात तर प्रकरण हातघाईवर आल्यासारखे दिसते. पदर धरून हिसकला तर लोकांत कुणाच्या नावास बट्टा लागेल ? असा प्रश्न तुकोबांनी विचारला आहे.

१६७६ धरूनि पालव असुडीन करें। मग काय बरें दिसे लोकीं ॥ १ ॥
काय तें विचारा ठायींचें आपणां। जो[1] हा नारायणा अवकाश ॥ २ ॥
अंतर पायांसी तों वरी या गोष्टी। पडिलिया मिठी हालों नेदीं ॥ ३ ॥
रुसलेती तरी होइल बुझावणी। तांतडी करूनि साधावें हें ॥ ४ ॥
सांपडलिया आधीं कारणासी ठाव। येथें करूं भाव दृढ आतां ॥ ५ ॥
तुका म्हणे तुझे ठाउके बोभाट। मग खटपट चुकली ते ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपाः–पालव–पदर, असुडीन–ओढीन, अवकाश–उशीर, बुझावणी–समजूत, कारणासी–कार्यासाठी, बोभाट–कीर्ती.

अर्थः–देवा, मी आता तुमचा पदर हाताने धरून ओढीन. मग लोकांत काय हे बरे दिसेल ? १ नारायणा, अशा प्रसंगास अजून अवकाश आहे, उशीर आहे, तोपर्यंतच तुम्ही त्याचा विचार करा. २ जोपर्यंत तुमच्या पायांशी माझे अंतर आहे, तोपर्यंतच या गोष्टी मी बोलणार; पण एकदा पायाला मिठी पडली की मग मात्र तुम्हांला हालू देणार नाही ३ मग या कृत्याने तुम्ही रागावलात तरी मी कशी तरी समजूत तुमची काढीन पण आधी तुमचे पाय धरण्याचे कर्तव्य त्वरेने मी पार पाडीन. ४ तुमचे पाय मला सापडले याच मोठ्या कार्यभागासाठी मी तुमच्या ठिकाणी माझा भाव आता दृढ करीत आहे. ५ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तू कधी दिसतोस, कधी दिसत नाहीस, कधी तू व्यक्त असतोस, तर कधी अव्यक्त असतोस, अशी तुझी कीर्ती माहीत असल्यानेच मी. तुझे पाय दृढ धरले आहेत त्यामुळे तर माझी सर्व खटपट चुकली आहे. ६

१६७७ निष्ठुरा उत्तरीं न धरावा राग। आहे लागभाग ठायींचाचि ॥ १ ॥
तूं माझा जनिता तूं माझा जनिता। रखुमाईच्या कांता पांडुरंगा ॥ २ ॥
मुळींच्या ठेवण्यां आहे अधिकार। दुरावोनि दूर गेलों होतों ॥ ३ ॥
पोटींच्या आठवा पडिला विसर। कांहीं आला भार मायां तेणें ॥ ४ ॥
राखिला हा होता बहु चोंधां चार। साक्षीनें व्यवहार निवडिला ॥ ५ ॥
तुका म्हणे कांहीं बोलणें न लगे। आतां पांडुरंगें तूं मी ऐसें ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा–लागभाग–संबंध, ठायींचाचि–मूळचाच, ठेवण्यां–ठेव्यावर, पोटींच्या–पोटच्या मुलास, चार–उपचार, लौकिक

---

[1] जोडा मारा.

तुम्हास देवपण आले असल्याची आठवण करून दिली आहे 'आमुचिया भावें तुज देवपण। ते का विसरोनि राहिलासी ?' आपल्या भक्तावर त्वरित कृपा करीत नाही तो देव कसला ? तुकोबानी फटकळपणे म्हटले आहे, 'धिग् जिणे त्याचा स्वामी हीनवर। मरण ते बरे भले मग' हीन स्वामीची सत्ता पत्करण्यापेक्षा मरण पत्करले, असाच म्हणण्याचा रोख आहे. 'समर्थाचे बाळ केविलवाणे दिसे। तरी कोणा हासे जन देवा ?' म्हणून आणखी एका अभंगात परमेश्वराशी तक्रार केली आहे देवा, आम्ही तुझेच आहोत असे म्हणण्यात काय तुला कमीपणा झाला ? 'तुझे म्हणविता काय नाश झाला ?' 'ऐसे वा विठ्ठला कीर्ती तुझी' अशा शब्दात ही तक्रार तुकोबानी मांडलेली आहे शेवटी धीर न राहवून त्यानी ईश्वरास निक्षणान म्हणून सांगितले आहे, 'तुम्हा आम्हा तुटी होईल यावरी। ऐसे मज हरी दिसतसे' आता तुमच्यात व माझ्यात तुटी येईल अशी भीती त्यानी व्यक्त केली आहे

परंतु भक्त अशा प्रकारच्या कलहास का उत्सुक होतो ? ज्या मुखाने त्यांनी ईश्वराचे गुणगान केले त्याच मुखाने 'पांडुरंग पाहा खादलीसे रडी'–पांडुरंगा तू शेवटी रडी खाल्लीस, तुझा पराभव झाला, असे का म्हटले जाते ? परमेश्वराशीच एवढा कलह आपण का करतो ? या प्रश्नाचे उत्तर देताना तुकोबानी म्हटले आहे, 'कवणाशी भांडी कोण माझें आहे। कोण मज आहे तुजविण ?' हा एक कृपावंत पांडुरंगच असा आहे की, ज्याच्यावर वाटेल तसे रागावले तरी अभयच प्राप्त होते या विश्वासापोटी हा कलह असतो याच वृत्तीने तुकोबानी म्हटले आहे, 'निष्ठुर यासाठी करिता भांडण। आहेसी तू सर्वजाण दाता॥ ऐसे कोण दुःख आहे निवारता ?'– ईश्वरा तू सर्व काही जाणणारा आहेस, तुझ्याशिवाय आमचे दुःख कोण जाणणार आहे ? या जाणिवेच्या पोटीच थोडा रोष आणि कलह याची निर्मिती होत असते परमेश्वरावर आपण फार रागावलो, विनाकारण कलह केला याचीही जाणीव शेवटी तुकोबाना होत असते 'नये ऐसे बोले कठिण उत्तरें। सलगी लेकुरें केली पुढें। अपराध कोजे पडला तो क्षमा' म्हणून ते ईश्वरास विनवणीही करतात 'निष्ठुरा उत्तरीं न धरावा राग' या शब्दात त्यानी ईश्वराची क्षमा मागितलेली दिसते.

१६८३ नव्हो गाढे आळसी। जो तू आम्हापुढें जासी॥ १॥
अरे दिले आम्हा हातीं। वर्म वेवादाचे सर्तों॥ २॥
धरोनिया वाट। जालो[1] शिरोमणि थोट॥ ३॥
तुका म्हणे देवा। वाद करोन खरी सेवा॥ ४॥

शब्दार्थ व टीपा –गाढे–निर्बळ दुबळे, वेवादाचे–विवादाचे, कलहाचे, थोंट–दांडगा, हरामी

अर्थ –देवा, तू जरी आम्हापासून पळून दूर जाशील तरी आम्ही काही तुला तसे जाऊ देणार नाही आम्ही काही आळशी व दुबळे नाहीत १ अरे देवा, साधुसंतानी आमच्या हातात वादविवाद करण्याचे वर्म दिलेले आहे २ तुझी पळून जाण्याची वाट अडवून मी चांगलाच दांडगा व बलवानाचा शिरोमणी बनलो आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात देवा, अशा प्रकारे वादविवाद करूनच मी माझी सेवा पुरी करीन ४

१६८४ तुझा विसर नको माझिया जीवा। क्षण एक[2] केशवा मायबापा॥ १॥
जाओ राहो देह आता येचि घडी। कायसी आवडी याची मज॥ २॥
कुश्चीळ इंद्रियें आपुलिया गुणे। यांचिया पाळणे कोण हित॥ ३॥
पुत्र पत्नी बंधु सोयरीं खाणोरीं। यांचा कोण धरी[3] संग आता॥ ४॥
पिंड हा उसना आणिला पांचाचा। सेवटीं लागे ज्याचा त्यासी देणे॥ ५॥
तुका म्हणे नाहीं आणिक सोइरें। तुजविण दुसरें पांडुरंगा॥ ६॥

---

[1] जाला, [2] रे, [3] करीं.

शब्दार्थ व टीपा – घडी–घटकेस, वेळेस, कुश्चिळ–वाईट, खाणोरी–खादाड, खाणारा चोर, पिंड–शरीर, पांचाचा–पंचमहाभूताचा, सेकीं–शेवटी, अंत काळी

अर्थ —देवा, माझ्या जीवास तुझा विसर कधीही पडू नये केशवा, मायबापा, एक क्षणभरही तुझा वियोग होऊ नये १ माझा देह याच घटकेस जावो अथवा राहो, त्याची मला काहीच आवडी अथवा पर्वा नाही २ देहाची इंद्रिये आपापल्या परीनें व गुणानी अतिशय वाईट अशी आहेत, तेव्हां याचे प्रतिपालन करण्याने कोण्ते हित होणार आहे ? ३ पुत्र, पत्नी, बंधू, सोयरेधायरे हे सर्व फुकट खाणारे मात्र आहेत याची सगत आता कुणी धरावी ? ४ हा देह पंचमहाभूताकडून उसना आणलेला असल्यामुळे तो त्याचा त्याना शेवटी अतकाळी समपण करावा लागेल ५ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, पाडुरगा तुमच्याशिवाय मला दुसरे कुणीच जवळचे जिवलग नातेवाईक नाहीत ६

१६८५ ऐसे सत्य माझें येईल अंतरा । तरि मज करा कृपा देवा ॥ १ ॥
वचनासारिखें तळमळी चित्त । बाहेरि तो आंत होइल भाव ॥ २ ॥
तरि मज ठाव द्यावा पायापाशी । सत्यत्वें जाणसी दास खरा ॥ ३ ॥
तुका म्हणे सत्य निकट सेवकें । तरिच भातुकें प्रेम द्यावें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – अंतरा–मनात, अंत करणात, ठाव–स्थान, भातुकें–खाऊ

अर्थ –वरच्या अभगात सांगितलेल्या प्रकारे जर माझ्या अंत करणात प्रचीतीस येईल तर देवा, तुम्ही माझ्यावर कृपा कराच १ या माझ्या वचनासारखेच माझे चित्तही तळमळीने भरलेले आहे जो भाव आता चित्तामध्ये आहे तोच बाहेरही आहे २ तरी देवा, मला तुमच्या पायाशी स्थान द्यावे मी तुमचाच दास आहे, असे तुम्ही जाणावे ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, मी तुमचा खरा व निकटचा सेवक असेन तर प्रसादरूपी खाऊ मला द्यावा ४

१६८६ आदि वर्तमान जाणसी भविष्य । मागें पुढें नीस संचिताचा ॥ १ ॥
आतां काय देऊं पायापें परिहार । जाणा तो विचार करा देवा ॥ २ ॥
आपुलें ते येथें काय चाले केलें । जोडावे ते भले हात पुढें ॥ ३ ॥
तुका म्हणे फिके बोल माझे वारा । कराल दातारा होईल ते ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – नीस–निवड पृथक्करण, पायापें–पायाजवळ, परिहार–निरसन तक्रारीचे निवेदन, गाऱ्हाणे, वारा–दूर करा विचारात घेऊ नका

अर्थ – देवा, तुम्ही भूत वर्तमान व भविष्य काळातील गोष्टी जाणता संचिताची नोंद निवड करून त्यासबधी मागचा पुढचा विचार तुम्ही करीत असता १ देवा, आता मी तुमच्या पायावर कोणत्या तक्रारीचे निवेदन करू ? देवा तुम्हाला जो विचार योग्य जाणवत असेल तो करा २ आम्ही आपल्या बळाने काही केले तर ते येथे काय चालणार आहे ? तेव्हा पुढे हात जोडावेत हेच बरं ३ तुकाराम महाराज म्हणतात माझे हे बोलणे उगाच असल्यामुळे ते काही विचारात घेऊ नका जे तुमच्या मनात येईल ते तुम्ही करा कारण त्यातच माझे हित आहे ४

१६८७ सुखें न मनी अवगुण । दु ख भोगी त्याचें कोण ॥ १ ॥
हें का ठायींचें न कळे । राती करा झाकुनि डोळे ॥ २ ॥
चालोनि आड वाटे । पायीं मोडविले काटे ॥ ३ ॥
तुका म्हणे कोणा । बोल ठेवितो शाहाणा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– मिथ्या–खोटा, असत्य, उपाव–उपाय

अर्थ :– मी अमुक एक केले, असा अहंकार ज्याच्या चित्तात नाही, प्रपंचाचा त्रास ज्याला वाटत नाही, त्याचा उद्‌वेग ज्याला येत नाही, त्यालाच खरा त्याग घडला आहे असे समजावे १ हा अंतरंगातील भाव तो ईश्वरच जाणतो, त्याच्याशिवाय इतर बाह्यचरण उगाच आहे बाह्य डामडौलाचा उपाय व्यर्थ आहे २ ज्याचा त्याग केला आहे त्याचेच ध्यान मनामध्ये सतत राहिले तर ती खरीच विटंबना होईल ३ तुकाराम महाराज म्हणतात, खऱ्या खोट्याचा निवाडा तुम्ही स्वतःला विचारूनच करा यासंबंधी तुम्हास दुसरे कोण सागणार आहे ? ४

१६९४ हित व्हावे तरी दंभ दुरी ठेवा । चित्तशुद्धि[1] सेवा देवाची हे ॥ १ ॥
आवडी विठ्ठल गाईजे एकातीं । अलभ्य ते येती लाभ घरा ॥ २ ॥
आणीका अंतरीं न द्यावी वसति । करावी हे शांती वासनेची ॥ ३ ॥
तुका म्हणे बाण हाचि निर्वाणींचा । वाउगी हे वाचा वेचू नये ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – अंतरीं–मनामध्ये, बाण–खानीचा उपाय

अर्थ – जर तुमचे चागले हित व्हायचे असेल तर मनातील दंभ नाहीसा करा व एकचित्ताने, शुद्ध भावाने देवाची सेवा करा १ मोठ्या आवडीने विठ्ठलाचे नाव एकान्तात बसून गात बसावे यामुळे मिळण्यास कठीण असे लाभही घरी चालून येतील २ आपल्या अंतःकरणात या एका देवाशिवाय दुसऱ्या कुणासही थारा देऊ नये इतर वासनाच मनातून नाहीशी करून टाकावी ३ तुकाराम महाराज म्हणतात, हाच चिंतनाचा एक निर्वाणीचा उपाय आहे याशिवाय उगाच वाचा व्यर्थ इकडे तिकडे खर्च करू नये ४

१६९५ हो का नर अथवा नारी । ज्याचा आवडता हरि ॥ १ ॥
ते मज विठोबासमान । नमू आवडी ते जन ॥ २ ॥
ज्याचे अंतर निर्मळ । त्याचे सबाह्य कोमळ ॥ ३ ॥
तुका म्हणे भावे । जिव्हें प्रेम वोसडावें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – आवडी–प्रेमाने, अंतर–मन अंतःकरण

अर्थ – ज्याना श्रीहरीविषयी आवड मोठीच आहे ते मग पुरुष असोत वा स्त्रिया असोत १ ते सर्व मला विठोबासारखेच पूज्य आहेत अशा लोकांना मोठ्या प्रेमाने मी नमस्कार करीन २ ज्याचे मन अतिशय पवित्र व निर्मळ आहे त्याचे अंतर्बाह्य वर्तन स्वच्छ व कोमलच असते ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी मोठ्या प्रेमाच्या भावनेने माझ्या जिव्हेने त्यांची स्तुती करीन अथवा जीव त्यांच्यावरून ओवाळून टाकीन ४

१६९६ हरिची हरिकथा नावडे जया । अधम म्हणता तया वेळ लागे ।
मनुष्यदेहीं तया नाट लागले । अघोर साधिले कुंभपाक ॥ १ ॥
कासया जन्मा आला तो पाषाण । जंत का होऊन पडिला नाहीं ।
उपजे मरोनि वेळोवेळा भांड । परि लाज लंड न धरी काहीं ॥ २ ॥
ऐसियाची माता कासया प्रसवली । वर नाहीं घातली मुखावरी ।
देवधर्माविण चांडाळ हा नर । न साहे भूमि भार क्षणभरी ॥ ३ ॥
राम म्हणतां तुझें काय तें वेचलें । कां हित आपुलें न विचारिसी ।
जन्मोजन्मींचा होईल नरकीं । तुका म्हणे चुकी जरी[2] यासी ॥ ४ ॥

[1] चित्त शुद्ध, [2] जयासी, "

शब्दार्थ व टीपा – नाट–फसवणूक, कुंभपाक–एक प्रकारचा नर्क, भाड–भाडखोर, लंड–नास्तिक, पाखंडी, वर–वार, वेचलें–खर्च झाले, न विचारिसी–विचार करीत नाहीस.

अर्थ – ज्याला श्रीहरीची कथा आवडत नाही, त्याला अधम अथवा दुष्ट म्हणण्यासही फार वेळ लागतो, त्याच्याआधीच तो दुष्ट असतो, म्हणण्याचीही जरूरी नाही माणसाचा देह त्याला मिळाला असूनही त्याची मोठीच फसवणूक झालेली असते त्याने आपल्या अशा आचरणाने कुंभपाक नावाचे साधन करून ठेविलेले असते १ असा हा दगड मनुष्य जन्मास तरी का आला ? जन्त होऊन का पडून गेला नाही ? हा भाडखोर मनुष्य पुन पुन जन्मास येतो व मरतो, पण याची लाज काही या पाखंडी माणसास कधीच नसते २ अशा या अधम माणसास त्याच्या आईने तरी का जन्म दिलेला असतो ? जन्मल्याबरोबरच त्याच्या मुखात वार घालून त्याला तिने नष्ट का नाही केले ? हा चांडाळ आपले आयुष्य देवधर्माशिवाय घालवीत असतो याचा भार पृथ्वीस क्षणभरही सहन होत नाही ३ श्रीरामाचे स्मरण केल्यास तुझे काय खर्च होते ? तु आपल्या हिताचा विचार का करीत नाहीस ? तुकाराम महाराज म्हणतात, देवाचा व धर्माचा विचार करायला जर चुकलास तर मात्र तुला जन्मोजन्मी नर्कवास भोगावा लागेल ४

१६९७ उपेक्षिला येणें कोणी शरणागत । ऐसी नाहीं मात आईकिली ॥ १ ॥
आता काय ब्रीद सांडील आपुले । ठायींचे धरिले जाणोनिया ॥ २ ॥
माझ्या दोषासाठीं होइल पाठमोरा । ऐसा कोण पुरा भोग बळी ॥ ३ ॥
तुका म्हणे रुप आमुच्या कैवारे । धरिले गोजिरें चतुर्भुज ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – येणें–या श्रीहरीने, मात–हकीकत, गोष्ट

अर्थ – कोणी शरण आला आहे आणि या श्रीहरीने त्याची उपेक्षा केली असे कधी ऐकले नाही १ आता तरी हा आपले पतितपावन हे ब्रीद सोडील काय ? मूळचेच असणारे हे ब्रीद त्याने जाणून बुजून धारण केले आहे २ माझा असा काय मोठा दोष आहे किंवा असा काय प्रबळ भोग आहे, की हा श्रीहरी माझ्याकडून पाठमोरा होईल ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, आमचा कैवार घेण्यासाठी तर याने आपले साजिरे, गोजिरे रुप धारण केले आहे ४

१६९८ आवडीसारिखें संपादिलें सोंग । अनंत हें मग जालें नाम ॥ १ ॥
कळे ऐशा वाटा रचिल्या सुलभा । दुर्गम या नभाच्या ही साक्षी ॥ २ ॥
हातें जेवी एक मुखीं मागे घास । माउली जयास तैसी बाळा ॥ ३ ॥
तुका म्हणे माझें ध्यान विटेवरी । तैसीच गोजिरी दिसे मूर्ति ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – संपादिलें–धारण केले, दुर्गम–समजण्यास कठिण,

अर्थ – या श्रीहरीने आवडीप्रमाणे रुप घेतल्यावर हा अनंत रुपाचा व नामाचा झाला १ लोकांना नीट भक्तीच्या वाटा सोप्या व सुलभ होतील अशा निर्माण झाल्या तो श्रीहरी तसा कळण्यास कठीण आहे याला साक्ष या आकाशाची आहे २ एक मुलगा आपल्या हाताने जेवीत असतो, दुसरा आईने मुखात घास घालावा अशी इच्छा करतो जसे बालकाचे वागणे असेल तशा पद्धतीने त्याची आई त्याचे सव काही करीत असते ३ तुकाराम महाराज म्हणतात, माझ्या मनातील ईश्वराचे ध्यान विटेवर उभे राहिलेले आहे हीं अशीच गोजिरी मूर्ती मला दृष्टीसमोर दिसते ४

१६९९ धन्य मी मानीन आपुलें संचित । राहिलीसे प्रीत तुझे नामीं ॥ १ ॥
धन्य जालों आता यासि संदेह नाहीं । न पडों या वाहीं काळा हातीं ॥ २ ॥
ब्रह्मरस करूं भोजन पंगती । संताचे संगती सर्वकाळ ॥ ३ ॥
तुका म्हणे पोट धालेंचि न धाये । खादलेंचि खायें आवडीनें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – संचित-पूर्वपुण्य, प्रारब्ध, संदेह-शंका, वाहीं-मार्गाने, धाले-तृप्त झाले

अर्थ :– या श्रीहरीच्या नामात माझी प्रीत जडलेली असल्यामुळे मी माझे पूर्वपुण्य वा प्रारब्ध धन्य आहे असे मानतो १ मी यामुळे आता धन्य झालो, यात काही शंकाच नाही मी या मार्गाने कधी काळाच्या जबड्यात सापडणार नाही २ संताच्या संगतीस आता नेहमी बसून ब्रह्मरसाचे भोजन सतत करू ३ तुकाराम महाराज म्हणतात, या भोजनामुळे माझ्या मनाची तृप्ती होता होत नाही, म्हणून मी याचेच सेवन पुन पुन करीत असतो ४

१७०० आवडी न पुरे सेविता न सरे । पडियेली धुरेसवे गाठी ॥ १ ॥
न पुरे हा जन्म हें सुख साठिता । पुढती ही आता हेचि मागों ॥ २ ॥
मारगाची चिंता पालवी बैसता । नाहीं उसंतिता कोसपेणी ॥ ३ ॥
तुका म्हणे माझी विठ्ठल माउली । जाणे ते लागली भूक तान ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :–आवडी-प्रेम, धुरेसवें-श्रेष्ठ अशा परमेश्वराची, उसंतिता-शेवटास गेल्यानंतर, संपल्यावर, कोसपेणी-कोसाच्या मुक्कामाची, अथवा कोसाची व मुक्कामाची.

अर्थ – या सर्वश्रेष्ठ अशा श्रीहरीची गाठ एकदा पडल्यानतर त्याच्या विषयीचे प्रेम संपत नाही, की पुन पुन सेवन केल्यास पुरेसेही वाटत नाही १ श्रीहरीचे हे सुख या माझ्या हृदयात साठवीत असताना मला हा जन्म काही पुरणार नाही यासाठी देवाजवळ असाच जन्म मी मागत आहे २ एकदा पालखीत बसल्यानतर मग मार्गावरील कोसाची अथवा मुक्कामाची आपण चिंता कशास करावी ? मार्ग संपल्यावर कसली चिंता राहते ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, ही विठाबाई माझी आई असून तीच मला लागलेली तहान व भूक जाणीत असते ४

१७०१ नाहीं त्रिभुवनीं सुख या समान । म्हणऊनि मन स्थिरावलें ॥ १ ॥
धरियेलीं जीवीं पाउलें कोमळीं । केली एकावळी नाममाळा ॥ २ ॥
शीतळ होऊनिया पावलो विश्रांती । न साहे पुढती चाली चित्ता ॥ ३ ॥
तुका म्हणे जाले सकळ सोहळे। पुरविले डोहळे पांडुरंगें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – एकावळी-एकेरी, चाली-चाल, डोहळे-इच्छा

अर्थ – या श्रीहरीच्या चरणासारखे सुख त्रिभुवनात नसल्यामुळे माझे मन त्याच्या पायी स्थिरावलेले आहे. १ त्याचे कोवळे चरण मी माझ्या अंतःकरणात धरून ठेविले असून माझ्या गळयात त्याच्या नामाची एकेरी माळ घातलेली आहे २ यामुळे मी आता त्रिविध तापापासून मुक्त होऊन थंड झालो, मला पूर्ण विश्रांती मिळाली आता यापुढे चित्ताची कोणतीही चाल उरलेलीच नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, या पांडुरंगाने माझ्या सर्व इच्छा पूर्ण केल्या असून मला सर्व सुखसोहळयाचा लाभ झालेला आहे ४

१७०२ मायाबापापुढें लाडिकें लेकरूं । तैसे बोल करूं कवतुकें ॥ १ ॥
कृपावंता घालीं प्रेमपान्हारस । वोळलो वोरस पांडुरंग ॥ २ ॥
नाहीं धीर सुटी जवळी हुबरे । ठायींच पाखर कवळिते ॥ ३ ॥
तुका म्हणे मज होऊं नेदी सीण । कळों नेदी भिन्न आहे ऐसें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– वोळली-वळली, वोरस-कृपेचा पान्हा, पाखर-कृपा, गाय अथवा म्हैस यांची धाने, नेदी-देत नाही,

अर्थ -आईबापापुढे लाडके लेकरू जसे वागते तसेच पांडुरंगा, आम्ही तुझ्यापुढे कौतुकाने लाडके बोल बोलू. १ हे कृपेच्या सागरा, पांडुरंगा, तुम्ही आपल्या प्रेमाचा पान्हा मोठ्या प्रेमानें माझ्याकडे वळवा, माझ्या मुखात घाला. २ खुंटयाला बांधलेले वासरू जवळच असलेल्या गाईकडे जाऊ शकत नाही, ते एकसारखे ओरडत असते. पण गाय मात्र त्याच्या जवळ जाऊन त्याला आपल्या स्तनातील पान्हा देते व त्यास चाटत असते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, मला तुझ्या वियोगाचा शीण देवा, कधी होऊ देऊ नकोस मी तुझ्याहून भिन्न आहे असे वळू देऊ नकोस. ४

१७०३ आठवों नेंदी आवडी आणीक । भरूनियां लोक तिन्ही राहे ॥ १ ॥
मन धांवे तेथें तिचेचि दुभतें । संपूर्ण आइतें सर्वकाळ ॥ २ ॥
न लगे वळावीं[1] इंद्रियें धांवतां । ठाव नाहीं रिता उरों दिला ॥ ३ ॥
तुका म्हणे समपाउलाचा खुंट । केला[2] बळकट हालों नेदी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा -ठाव-स्थान, रिता-मोकळा.

अर्थ:- एकदा या श्रीहरीची आवड मनात निर्माण झाली की, मग दुसऱ्या कशाचीही आठवण होत नाही. त्याचेच प्रेम तिन्ही लोकांत भरून राहिलेले असते १ ज्या ज्या ठिकाणी माझे मन धावते, त्या त्या ठिकाणी त्याच्याच प्रेमाचे दुभते आयते व पूर्णपणे चाखायला मिळते २ त्याचे स्वरूप सर्वत्र इतके पसरलेले दिसते की, त्याने कुठे थोडीही जागा रिकामी ठेवलेली नाही त्यामुळे मला धावणारी इंद्रिये ताब्यात ठेवावी लागत नाहीत. ३ तुकाराम महाराज म्हणतात, समचरणाचा असा हा देव पुनः हालणार नाही अशा रीतीने येथे बळकटपणे उभा केला आहे. ४

१७०४ उत्तम घालावें आमुचिये मुखीं । निवारावे दुःखी होऊनि[3] तें ॥ १ ॥
न बैसे न वजे जवळूनि दुरी । मागें पुढें वारी घातपात ॥ २ ॥
नाहीं शंका असो भलतिये ठायीं । मावळले पाहीं द्वैताद्वैत ॥ ३ ॥
तुका म्हणे भार घेतला विठ्ठलें । अंतरीं भरले बाह्य रूप ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:- न वजे-जात नाही, वारी-निवारण करतो.

अर्थ - ही माझी विठ्ठलमाऊली जेवढे चांगले आहे तेवढे माझ्या मुखात घालते व वाईटाचे निवारण आम्ही दुःखी न रहावे अशा बेताने ती करीत असते १ ही आमची आई माझ्याजवळ सारखी उभी असते. ती कधी खालीही बसत नाही, की कधी दूर निघून जात नाही; माझ्या मागेपुढे उभी राहून माझ्यावरील घातपाताचे संकट निवारण करीत असते २ आता आम्ही कोणत्याही ठिकाणी असलो तरी आम्हांस कसलीही शंका आलेली नसते. आमचे सर्व द्वैत व अद्वैत मावळून गेलेले असते हा भेदच उरत नसतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, या विठ्ठलाने माझा सर्व भार घेतलेला असल्यामुळे तोच माझ्या अंतर्बाह्यस्वरूपांत भरून राहिलेला आहे ४

१७०५ आम्हां अळंकार मुद्राचे शृंगार । तुळसीचे हार वाहों[4] कंठीं ॥ १ ॥
लाडिके डिंगर पंढरिरायाचे । निरंतर वाचे नामघोष ॥ २ ॥
आम्हां आणिकांची चाड चिंता नाहीं । सर्व सुखें पायीं विठोबाच्या ॥ ३ ॥
तुका म्हणे आम्ही नेघों चिया मुक्ती । एकाविण चित्तीं दुजें नाहीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- डिंगर-सेवक, चाड-किमत, महत्त्व, नेघों-घेणार नाहीत.

अर्थ:- अंगावर नाना प्रकारच्या मुद्रा लावणे व तुळशीचे हार गळ्यात घालणे हेच आमचे अलंकार व हाच आमचा शृंगार होय. १ आम्ही या पंढरीरायाचे लाडके सेवक आहोत, आमच्या वाणीत एकसारखा त्याचाच

१ वोळावी, २ जाला, ३ होऊं नेदी, ४ वाहो.

घोष असतो. २ याच्यापुढे आम्हांला इतरांची काहीच किंमत नसते. याच्या पायीच, या विठोबाच्या चरणावर सर्व सुखे आम्हास दिसतात ३ तुकाराम महाराज म्हणतात, या श्रीहरीच्या शिवाय आमच्या मनात दुसरे काहीच नसल्यामुळे आम्हांस मुक्तीची सुद्धा पर्वा नसते. तिची आम्ही कधीच इच्छा करीत नाही. ४

१७०६ चला पंढरीसी जाऊं । रखुमादेवीवरा पाहूं ॥ १ ॥
डोळे निवतील कान । मना तेथें समाधान ॥ २ ॥
संता महंतां होतील भेटी । आनंदें नाचों वाळवंटीं ॥ ३ ॥
तें[1] तीर्थांचे माहेर । सर्वसुखाचें भांडार ॥ ४ ॥
जन्म नाहीं रे आणीक । तुका म्हणे माझी भाक ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा — भाक—शपथ .

*अर्थः— चला, आपण सर्वजण पंढरपूरला जाऊ तेथील रुक्मिणीचा पती पांडुरंग आपण पाहू या १ त्याला* पाहिल्याबरोबर डोळे तृप्त होतील. त्याचा नामघोष ऐकल्याबरोबर कान निवतील. तेथे मनाला फार समाधान वाटेल २ तेथे गेल्यावर साधुसंतांच्या भेटी होतील आणि मन आनंदाने वाळवंटात नाचू लागेल ३ असे हे पंढरपूर *सर्व तीर्थांचे माहेर असून सर्व सुखांचे हे एक भांडारच आहे ४ या पंढरपूर क्षेत्रास आल्यावर पुन जन्म म्हणून* येणार नाही असे तुकाराम महाराज म्हणतात, मी शपथेवर सांगतो. ५

विवरण :— या एका अतिशय सोप्या व भावपूर्ण अभंगात तुकोबानी आपल्या मनात पंढरपूर व तेथील श्रीविठ्ठल यांचे किती प्रेम आहे याचे वेचक शब्दात वर्णन केले आहे येथे गेल्यावर पांडुरंगास पाहिल्यावर डोळे व कान तृप्त होतील, साधुसंतांची भेट होईल, आनंदाने नामघोष करून वाळवंटात नाचायला मिळेल. हे पंढरपूर म्हणजे सर्व सुखाचे भांडार व तीर्थांचे माहेर आहे अशा या पंढरीचा व तेथील विठ्ठलाचा लोभ अनेक साधुसंताना पडलेला दिसतो. ' रूपाचे रूपस विठ्ठलनाम वेष । पंढरीनिवास आत्माराम ' म्हणून निवृत्तीनाथानी याचा गौरव केलेला आहे, ' काशी अयोध्या अवंति कांति । मथुरा माया गोमती । ऐशी तीर्थे इत्यादिकें आहेतीं । परी सरी न पवती पांडुरंगीं अशा शब्दात श्रीज्ञानदेवानी या पांडुरंगाचे व पंढरीचे महात्म्य वर्णन केले आहे ' जयासी पंढरीचा नेम । चित्तीं अखंड विठ्ठलप्रेम । ते धन्य भक्त भूमंडळीं ' असे त्यानीच या पंढरीचे व तेथील भक्तांचे वर्णन केले आहे ' अनंत तीर्थांचें माहेर । अनंत रूपाचें हें सार ' असे नामदेवरायानी याच्यासबंधी म्हटले आहे. या क्षेत्राचा महिमा किती आहे तर ' पाहिलिया क्षणीं नासती पातकें ? ऐसिया तुके दुजे कोण ? असे महत्त्व त्यानी या स्थानाचे सांगितले आहे ' ऐसें तीर्थ कोणी दाखवा गोमटें । जेथें प्रत्यक्ष हें भेटे परब्रह्म ' या एका अभंगात नामदेवानी 'दीनाचे माहेर' जे पंढरपूर त्याचा महिमा वर्णन केला आहे म्हणूनच दुसऱ्या एका अभंगात त्यानी म्हटले आहे ' सर्व सुखराशी भीवरेचे तीरीं । आमुची पंढरी कामधेनू ' ' विठोबाच्या गावा जाईन धावोनी । घालीन लोळणी चरणावरी ' अशी त्याच्या मनाची तीव्र इच्छा नेहमी असते ' पंढरीचे सुख नाहीं त्रिभुवनीं । ' कारण तेथे ' प्रत्यक्ष चक्रपाणी उभा असे;' सर्व संताचा मुकुटमणी जो पुंडलीक तोही तेथेच असतो म्हणूनच तेथे ' सुखाची मिराशी ' निर्माण झालेली असते या पंढरपुरास एवढे महत्त्व का ? याचे उत्तर एकनाथानी दिले आहे. ' साराचें सार गुह्याचें निजगुह्य । तें हें उभें आहे पंढरीये ' सर्व साराचे सार व गुह्य, गुप्त ज्ञानाचे ज्ञान येथे श्रीविठ्ठलाच्या रूपानें भक्तासाठी उभे आहे या पंढरीचे व येथील वैभवाचे तृप्त मनानें वर्णन करताना एकनाथानी लिहिले आहे, ' माझें माहेर पंढरी । विठ्ठल उभा विटेवरी ॥ संत मिळाले अपार । करिताती जयजयकार ॥ टाळ घोष पताका । नाचताती वैष्णव देख ॥ विठ्ठल नामें गर्जती । प्रेमभरीत नाचती ॥ एकाजनार्दनीं शरण । विठ्ठल नामें धाले पूर्ण ॥ ' त्यांच्या मतानेही *या* क्षेत्रात सर्व तीर्थे निवास करतात येथील भाग्य अनुपम्य असे त्याना वाटते

[1] तेथें.

१७०७ पैल घरीं जाली चोरी । देहा करीं बोंब ॥ १ ॥
हाबा हाबा करिसी काये । फिराऊनि नेघ्यां वायें ॥ २ ॥
सांडूनियां शुद्धी । निजलासी गेली बुद्धी ॥ ३ ॥
चोरीं तुझा काढिला बुर । वेगळें भावा घातलें दूर ॥ ४ ॥
भलतियासी देसी वाव । लाहेसि तूं एवढा ठाव ॥ ५ ॥
तुका म्हणे अझुनि तरी । उरलें तें जतन करीं ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा:– वायें–व्यर्थ, बुर–मुस्सा, लाहेसि–आलास.

अर्थ:–मायेच्या पलीकडे आत्मस्वरूपाच्या भावाची देहबुद्धीकडून चोरी झाली. त्यामुळे तुला या देहाने आक्रोश करावा लागत आहे १ मोठ्या दु खाने तू व्यर्थ का आरडाओरड करतोस ? २ तू स्वरूपाच्या ज्ञानाची शुद्धी सोडलीस व देहबुद्धीच्या अज्ञानात तू निद्रा घेऊ लागलास ३ इकडे चोरांनी तुझ्या घरात शिरून तुझा मुस्सा काढला, तुला वेगळेपणाच्या भावावर नेऊन सोडले ४ भलत्याच विकारांना तू स्थान दिल्यामुळें तू अशा भयानक ठिकाणी प्राप्त झाला आहेस. ५ तुकाराम महाराज म्हणतात, आता यापुढे तरी तू सावध हो आणि स्वत च्या आयुष्याचे रक्षण कर. ६

१७०८ किती वेळा खादला दगा । अझून कां गा जागसी ना ॥ १ ॥
लाज नाहीं हिंडतां गांवें । दु.ख नवें नित्य नित्य ॥ २ ॥
सवें चोरा हातीं फांसे । देखतां कैसे न देखसी ॥ ३ ॥
तुका म्हणे सांडिती वाट । तळपट करावया ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:– खादला–खाल्लास, दगा–धोका, सकट, तळपट–नाश

अर्थ:– अनेक वेळा जन्ममृत्यूंच्या संकटांत सापडून तू धोका खाल्लास, पण अजूनही तू जागा का होत नाहीस ? १ रोज नवे दु ख तू भोगतोस, अनेक जन्माचा प्रवास करतोस, याची तुला कधी लाज वाटत नाही ? २ तुझ्याबरोबर असणाऱ्या चोरांच्या हातांत तुला पकडण्यासाठी फासे आहेत. ते कसे पाहात नाहीस ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, हे कामक्रोधादी चोर तुझी वाट चुकवितात व तुझा नाश करायला टपून बसलेले आहेत. ४

१७०९ मुदलामध्यें पडे तोटा । ऐसा खोटा उदीम ॥ १ ॥
आणिकांची कां लाज नाहीं । आळसा जिहीं तजिलें ॥ २ ॥
एके सांते सरिखी वित्तें । हानि हित वेगळाली ॥ ३ ॥
तुका म्हणे हित धरा । नव्हे पुरा गांवढाळ ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:– उदीम–व्यापार, धदा, जिहीं–ज्यानी, सांते–सातत्याने, वित्तें–भांडवलाने

अर्थ – मुद्दलामध्येच तोटा ज्यामुळे येतो असा व्यापारधंदा खोटा आहे तो कधी करू नये १ ज्यांनी आळसाला जिंकून उद्योग केला आहे त्यांच्याकडे पाहून तुला लाज कशी वाटत नाही ? २ या बाजारात सर्वांचे भांडवल सातत्याने एकसारखेच असताना प्रत्येकाचा नफा व तोटा यात एवढा फरक का पडतो ? तुकाराम महाराज म्हणतात, सावध होऊन काही तरी हित होईल असे करा ना. अगदीच पुरे खेडवळ होऊ नका ४

१७१० निरोप सांगतां । न धरीं मम न करीं चिंता ॥ १ ॥
असो ज्याचे त्याचे माथां । आपण करावी ते कथा ॥ २ ॥

उतरावा भार । किंवा न व्हावे सादर ॥ ३ ॥
तुका म्हणे वाहे धाक । तया इह ना परलोक ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – धाक-भय, इह–हा लोक

अर्थ – कथाकीर्तनात देवाचा निरोप सांगताना मनात कसलेही भय अथवा कसलीही शंका उरता कामा नये १ या निरोपाप्रमाणे वागणे न वागणे ज्याच्या त्याच्या स्वाधीन असल्याने आपण आपली कथा निर्भयपणाने करीत असावी २ श्रोते कथेस आले आहेत किंवा नाही, अथवा या भूमीचा भार उतरतो आहे की नाही, याची चिंता करण्याचे कारण नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, जे कुणी ईश्वराचा निरोप कथाकीर्तनातून सांगताना शंका बाळगतात, त्यांना इह या लोकीचे अथवा परलोकीचे सुख कधी मिळत नाही ४

१७११ शूरत्वासी मोल । नये कामा फिके बोल ॥ १ ॥
केला न संडी कवाड । जीवेसाटीं तो हे होड ॥ २ ॥
धीर तो कारण । साहच होतो नारायण ॥ ३ ॥
तुका म्हणे हरि । दासा रक्षितो निर्धारीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – फिके–व्यर्थ, उगाच कवाड–निर्धार, होड–पैज, निर्धारीं–संकटात.

अर्थ – उगाच व्यर्थ बोलण्याने कधी कार्याची सिद्धी होत नाही, बोलल्याप्रमाणे शूरत्वाची कृती करण्यास किंमत आहे १ जीवाची पैज लावून जो निर्धार केलेला असतो तो कधी सोडू नये २ धैर्य हेच यशाचे साधन आहे या धैर्यामुळेच नारायणही साहचभूत होतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, हा श्रीहरी आपल्या दासांचे रक्षण संकटप्रसंगी निश्चयाने करीत असतो ४

१७१२ हरिच्या दासा भये । ऐसे बोलो तें ही नये ॥ १ ॥
राहोनिया आड । उभा देव पुरवी कोड ॥ २ ॥
हरिच्या दासा चिंता । अघटित हे वार्ता ॥ ३ ॥
खावे ल्यावे द्यावें । तुका म्हणे पुरवावें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा –भेद–भीती, कोड–इच्छा

अर्थ – श्रीहरीच्या दासांना भीती असते असे कुणीही बोलूही नये १ कारण देव त्यांच्या मागे उभे राहून त्यांची इच्छा नेहमी पूर्ण करीत असतो २ श्रीहरीच्या दासांना चिंता असणे ही तर एक अघटितच घटना म्हणावी लागेल असे कधी घडणार नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, तो त्यांना खाऊ घालतो, त्यांना वस्त्रे पुरवितो आपले प्रेम देऊन त्यांचे सर्व काही करतो ४

१७१३ दासा सर्व काळ । तेथें सुखाचे कल्लोळ ॥ १ ॥
जेथें वसती हरिदास । पुण्य पिके पापा नास ॥ २ ॥
फिरे सुदर्शन । घेऊनिया नारायण ॥ ३ ॥
तुका म्हणे घरीं । होय म्हणियारा कामारी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा –नास–नाश, कामारी–सेवक

अर्थ –श्रीहरीच्या भक्तांना सर्व काळ हे सुखाच्या कल्लोळाप्रमाणेच वाटतात १ ज्या ठिकाणी या हरि दासाची वसती असते, तेथे पुण्याचे पीक अमाप आलेले असते पापाचा नाश झालेला असतो. कारण हा श्रीहरी

सुदर्शनचक्र घेऊन भक्तांच्या रक्षणासाठी फिरत असतो. ३ तुकाराम महाराज म्हणतात, हा श्रीहरी 'होय' असे म्हणून भक्तांच्या घरी आपण होऊन सेवकाचे काम करीत असतो. ४

१७१४ आमचा स्वदेश । भुवनत्रयामध्यें वास ॥ १ ॥
मायबापाचीं लाडकीं । कळों आलें हें लौकिकीं ॥ २ ॥
नाहीं निपराद[1] । कोणां आम्हांमध्यें भेद ॥ ३ ॥
तुका म्हणे मान । अवघें आमचें हें धन ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:– लौकिकी–सर्व लोकांना, निपराद–नीच, दुष्ट, मान–मान हा शब्द येथे नाम म्हणून असावा, धन–धाम असाही शब्द येथे काही ठिकाणी आहे.

अर्थ:– आमचा स्वदेश या त्रिभुवनात पसरलेला असून त्यातच आमचा देश नेहमी निवास असतो. १ आम्ही या श्रीहरी मायबापाची लाडकी लेकरे आहोत, हे सर्व लोकांना माहीत आहे. २ आमच्यांत कोणी नीच अथवा अपराधी नाही, आमच्यांत कोणांत भेदभावही नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, या श्रीहरीचे नामस्मरण हेच आमचे सुखाचे विश्रांतिस्थान आहे. ४

१७१५ काय ढोरापुढें घालूनि मिष्टान्न । खरा विलेपन चंदनाचें ॥ १ ॥
नको नको देवा खळाची संगति । रस ज्या पंगती नाहीं कथे ॥ २ ॥
काय सेज बाज माकडा विकास । अळंकारा नास करुनी टाकी ॥ ३ ॥
तुका म्हणे काय पाजूनि नवनीत । सर्पा विष थीत अमृताचें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – खरा–गाढवास, खळांची–दुष्ट लोकाची, रस–आवड, सेज–सुशय्या, चांगले अंथरुण नवनीत–लोणी, दुध, थीत–व्यर्थ, वाया .

अर्थ:– जनावरांपुढे मिष्टान्न अथवा पक्वान्न वाढून काय उपयोग ? गाढवास चंदनाचा लेप देऊन काय उपयोग ? १ देवा, ज्यांना हरिकथेची आवड नाही त्याची संगती तू मला कधीच देऊ नकोस. २ माकडासाठी चांगली शय्या केली, बाज घातली, विलासांचे प्रकार केले तर त्याचा काय उपयोग ? ते सर्व अलंकार नष्टच करुन टाकील ३ तुकाराम महाराज म्हणतात, सर्पाला लोणी या दूध पाजून काय उपयोग ? ते व्यर्थच जाणार. त्याला अमृताचेही विष होणार. ४

१७१६ आनंदें एकांतीं प्रेमें वोसंडत । घेऊं अगणित प्रेमसुख ॥ १ ॥
गोप्य धन नये वारा लागों यास । पाहों नेदूं वास दुर्जनासी ॥ २ ॥
झणी दृष्टि लागे आवडीच्या रसा । सेवूं जिरे तैसा आपणासी ॥ ३ ॥
तुका म्हणे हें बहु सकुमार । न साहावे मार वचनाचा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:– गोप्य–गुप्त, वास–दृष्टी, झणी–नको, नये या अर्थाने.

अर्थ.– एकान्तात आनंदाने व प्रेमाने ओसंडणारे श्रीहरीचे हे प्रेमसुख अगणितपणाने भोगू. १ श्रीहरीचे प्रेम म्हणजे एक प्रकारचे गुप्त धन आहे याला कसल्याही प्रकारचा वारा लागून बाधा होऊ नये. याच्यावर दुष्टांची

[1] निरपराध.

दृष्टी कधीही पडू नये. २ या माझ्या आवडीच्या प्रेमसुखाला, प्रेमरसाला कुणाचीही दृष्ट होऊ नये म्हणून एकांतात बसून जसे पचेल तसे सेवन मी करीत असतो. ३ तुकाराम महाराज म्हणतात, हे माझे सुख फारच कोवळे असल्याने त्याला कुणाच्या शब्दांचाही भार सहन होत नाही. ४

१७१७ मोक्षपद तुच्छ केलें याकारणें । आम्हां जन्म घेणें युगायुगीं ॥ १ ॥
विटे ऐसें सुख नव्हे भक्तिरस । पुढतीपुढती आस सेवावें हें ॥ २ ॥
देवा हातीं रूप धरविला आकार । नेदूं निराकार होऊं त्यासी ॥ ३ ॥
तुका म्हणे चित्त निवांत राहिलें । ध्याइं तीं पाउलें विटेवरि ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपाः-आस-आशा, नेदूं-देणार नाही.

अर्थः- मोक्षपदाची प्राप्ती आम्ही तुच्छ मानली आहे. या श्रीहरीच्या भक्तीपुढे आम्हांस त्या मोक्षाची पर्वा नाही. आम्ही या सुखासाठी पुनःपुनः जन्म घ्यायचा आहे १ या भक्तिरसाचे सुख कधीही न विटणारे असे आहे. पुनः पुनः त्याचे सेवन करावे अशी आशा सारखी वाढत असते. २ या देवाने आपल्याच हातांनी आपले सगुण साकार रूप निर्माण केले आहे. आता पुनः त्याला निराकार होऊं देणार नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, त्या श्रीहरीची विटेवरची पावले बघून माझे चित्त आता निवान्त झाले आहे. ४

विवरणः-- आपण मागे अनेकदा पाहिले आहे की, तुकारामबुवासारख्या साधुसंतांनी ईश्वराच्या संगतीसाठी, भक्तीसाठी, मोक्षासारखे सर्वोच्च ध्येयही कमी प्रतीचे मानले आहे. खरे म्हणजे माणसाच्या जन्मास आल्याचे सार्थक कोणते ? तर मुक्ती किंवा मोक्ष मिळविणे, येथील यातनांतून मुक्त होणे, ईश्वराच्या स्वरूपात जाऊन विरणे, पुनः म्हणून जन्मास न येणे इत्यादी इच्छा पूर्ण करून घेण्यासाठीच सर्वांचा अट्टाहास असतो.

या मुक्तीच्या वा मोक्षाच्या प्राप्तीसाठी नाना प्रकारची खडतर तपे व साधने लोक करतात. परंतु त्यांच्या ध्यानात मोक्षाचे अथवा मुक्तीचे खरे रहस्य आलेले नसते. एका विशिष्ट अवस्थेवर गेल्यानंतर भक्तांना मुक्तीचे काहीच महत्त्व वाटेनासे होते. आपण भक्त व देव, हा आपला जिवलग सखा, पिता, माता, बंधू, त्याच्यावर रागवावे, रुसावे, त्याचा धावा करावा, त्याचे रूप चित्तात भरून घ्यावे, मुखाने त्याच्या गुणाचे संकीर्तन करावे, कानांनी त्याची कीर्ती ऐकावी, सतसंगतीत त्याच्या भजनाचा लाभ घ्यावा, यातील सौख्य कधीही कमी न होणारे आहे. तो भेटला नाही तरीही त्याच्या आठवणीत व विरहातही एक प्रकारचे सुख असते. कारण तेथे अखंड अनुसंधान असते. चिंतन असते जिव्हाळ्याची ओढ असते हे सुख मुक्त झाल्यावर कोठून येणार ? कोण कुणाचे ध्यान करणार ? कोण कुणावर रुसणार ? कोण कुणापुढे हट्ट धरणार ? ईश्वर व त्याचा भक्त हे एकच, असे नाते ज्ञानाच्या दृष्टीने ठीक असले तरी, भक्तीसाठी दुजेपण एकत्वावर आधारलेले अत्यावश्यक आहे.

मोक्षासाठी उगाच व्यर्थ भ्रमती न करता स्वत च्या अत करणातील भगवतास जाणून घेण्याचा प्रयत्न करावा श्रीशंकराचार्यांचा एक श्लोक आहे 'गभीरे कासारे विशति विजने घोर विपिने । विशाले शैले च भ्रमति कुसुमार्थं जडमति । समर्प्यैक चेत सरसिजमुमानाथ भवते । सुखेनैव प्राप्तुजन इह न जानाति किमहो उमानाथा, शकरा, जड बुद्धीचे पुरुष सुखाने तुझी प्राप्ती करून घेण्यास समर्थ असे आपले चित्तकमल तुला वाहण्याचे सोडून उगाच खोल तळ्यात, निर्जन अशा भयकर अरण्यात अथवा मोठ्या पर्वतावर तुझ्या पूजसाठी फुले वेचण्यासाठी भ्रमण करतात आपल्या जवळचे चित्तपुष्प भगवतास अर्पण केल्याने त्याची प्राप्ती होते हे त्याना कस समजत नाही !

या भक्तीच्या, नामसकीर्तनाच्या सतसमागमातील सुखाच्या भूमिकेवरून साधुसतानी मुक्तीला गौणत्वाचे स्थान दिले या भक्तिसुखासाठी वारवार जन्म घ्यावा लागला तरी त्याना कधी वाईट वाटत नाही 'आम्हा जन्म घेणे युगायुगीं' असे बुवानी याच अभगात म्हटले आहे 'गर्भवासां भीती ते आधळे जन । मुक्तिसी कारण आम्हां नाहीं,' 'वारवार जन्म घेऊ । परी पाहू पढरपूर' अशा शब्दात एकनाथानी पुन पुन जन्म घेण्याचे स्वागत केल आहे 'गर्भवास झालिया सतसेवा घडती' असे म्हणून त्यानी गर्भवासाचे महत्त्व वर्णन केले आहे ही सतसेव अथवा भगवद्भक्ती मुक्त झाल्यावर कशी घडणार ? 'मुक्त झालिया न कळे भगवद्भक्ती' अशी त्याच्या भावेत अवस्था असल्यामुळे भक्तान मुक्तीची इच्छा मनात न ठेवणे हेच युक्त होय असे सागून एकनाथानी म्हटले आहे, 'आम्ही सुखें गर्भवास घेऊ देखा । मुक्तीचिया मस्तका पाय देऊ' या भूमिकेवरून साधुसत मुक्तिपदास तुच्छ लखतात 'वैकुंठ, कैलास, अमरपदें तिन्ही । तुच्छवत् मनीं मानिताती ॥ कारण त्याच्या घरीच सायुज्यता आपण होऊन येत असते अशी स्थिती असूनही जे कुणी मुक्ती मागतील त्याना साधु-सत निर्भयपणे विचारतात, 'सांडोनि भजनाचा प्रेमा । मुक्ति मागसी अधमा । सांडोनिया सतसग काय मुक्ति ते अभग ?' कुणी फुकट मुक्तिपद दिले तरी ते घऊ नये अस सताना वाटते

तुकाराम महाराजानाही सतसगापुढे मुक्तीची पर्वा नाही 'तुका म्हणे मज नलगे सायुज्यता । राहेन या सतसमागमें' असे त्यानी म्हटले आहे 'सांडुनि सुखाचा वाटा । मुक्ति मागे तो करंटा' अस त्यानी म्हटले आहे जन्मास का यावे ? प्रभुप्रेमाचा दूधभात जन्मास येऊन घ्यावा 'का रे न घ्यावा जन्म । प्रेम लुटावें नाम । येथें मिळतो वहीभात । नाहीं वैकुंठीं ते मात' अशी ग्वाही तुकोबानी दिलेली आहे एका अभगात तर त्यानी देवास विनविले आहे, 'मोक्ष तुमचा देवा । तुम्ही दुर्लभ तो ठेवा । मज भक्तीची आवडी । नाहीं अतरीं ते गोडी' पाडुरगा मला कृपा करून मुक्त करू नका, अशी विनवणी तुकाराम महाराज ईश्वरास अनेकदा करताना दिसतात. या तुकोबाची मग इच्छा तरी काय आहे ? त्याच्याच शब्दात पाहा, 'जन्मांतरें मज ऐसीं देई देवा । जेणें चरणसेवा घडे तुझी । तुका म्हणे आम्ही मृत्युलोकी भले । तुझचि अकिले पाडुरगा ॥ साधुसताची सगत आणि ईश्वराच दृष्टी भरून प्रमसुख यासारखी श्रेष्ठ गोष्ट त्याना कुठलीच वाटत नाही या सुखासाठी ते पुन पुन जन्म घेण्यासाठी उत्सुक असतात 'नलगे वैकुठ मोक्ष सायुज्यता । सुख वाटे घेतां जन्म ऐसे' असे त्यानी म्हटले आहे या पढरपूरपुढे, त्या वैकुठनगरीची किंवा मोक्षाची काय किमत ? कारण 'मोक्षसिद्धि तेथें हिंडे दारोदारीं । होऊनि कामारी दीनरूप' अशा प्रकारे पढरपुरात विठ्ठलाच्या सगतीत मोक्षाची अथवा मुक्तीची पर्वा कुणालाच वाटत नाही

१७१८ नको बोलों भाडा । खीळ घालुनि बैस तोंडा ॥ १ ॥
ऐक विठोबाचे गुण । करीं सादर श्रवण ॥ २ ॥
प्रेमसुखा आड । काय वाजते चाभाड ॥ ३ ॥
तुका म्हणे हिता । का रे नागवसी थीता ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:- भांडा-भाडखोर माणसा, चाभाड-जवडा, दाभाड, ताट

अर्थ -अरे भांडखोर माणसा, हरीच्या कीर्तनात मध्येच उगाच बडबड करू नकोस तोंडाला खीळ घालून गप्प बैस ना १ नीट या विठोबाचे गुण ऐक मोठ्या आदराने याची कीर्ती श्रवण कर २ या विठ्ठलाच्या प्रेम-

गुलाच्या आड उगाच तोंड वाजवून येऊ नकोस ३ तुकाराम महाराज म्हणतात, या प्रेमसुखाने होणाऱ्या हितास का रे व्यर्थ मुकतोस ? ४

१७१९ अति जालें उत्तम वेश्येचे लावण्य । परि ते सवासीण न म्हणावी ॥ १ ॥
उचित अनुचित केले ठाया ठाव । गुणां मोल वाव थोरपण ॥ २ ॥
शूरत्वावाचूनि शूरामाजी ठाव । नाहीं आविर्भाव आणिलिया ॥ ३ ॥
तुका म्हणे सोंग पोटाचे उपाय । कारण कमाईविण नाहीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा–सवासीण–सुवासिनी, ठाव–स्थान, वाव–उचित, योग्य, आविर्भाव–बाह्य सोंग

अर्थ–वेश्येचे सौंदर्य कितीही उत्तम असले तरी तिला कुणी सुवासिनीचे महत्त्व देत नाहीत १ उचित व अनुचित अशी जी स्थाने आहेत त्यांना योग्य ते महत्त्व मिळतेच गुणांना योग्य असे मोल मिळत असते २ अंगी शौर्य असल्याशिवाय नुसत्या बाह्य आचरणाने अथवा सोंगाने शूरांच्यात कधीही स्थान मिळणार नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, असो बाह्य सोंगे आणल्यास पोटाची चिंता दूर होईल, पण त्याने आत्मप्राप्तीची कमाई कधी होणार नाही ४

१७२० शूरा साजती हतियारें । गाढचा हासतील पोरें ॥ १ ॥
काय केली विटंबण । मोती नासिकावाचून ॥ २ ॥
पतिव्रते रूप साजे । सिंदळ काजळ लेता लाजे ॥ ३ ॥
दासी पत्नी सुता । नव्हे सरी एक पिता ॥ ४ ॥
मान वृद्धिमता । थोर न मनिति पिता ॥ ५ ॥
तुका म्हणे तरी । आत शुद्ध दडे वरी ॥ ६ ॥

अर्थः– पाण्यातील मत्स्यादी जीवांना कोळी लोक जाळे टाकून पकडून त्यांचा घात करतात. १ असे हे प्रारंभापासूनच चालले आहे. काही जाती काहींचे वैर प्रथमपासूनच करतात २ निरपराध श्वापदांना पारधी विनाकारणच पकडत असतात. ३ तुकाराम महाराज म्हणतात, दुष्ट व चांडाळ माणसे या न्यायाने साधुसंतांना विनाकारणच छळीत असतात. ४

१७२२ वाइटानें भलें । हीनें दाविलें चांगलें ॥ १ ॥
एकाविण एका । कैंचें मोल होतें फुका ॥ २ ॥
विषें दाविलें अमृत । कडु गोड घातें हित ॥ ३ ॥
काळिमेनें ज्योती । दिवस कळों आला राती ॥ ४ ॥
उंच निच गारा । हिरा परिस मोहरा ॥ ५ ॥
तुका म्हणे भले । ऐसे नष्टांनीं कळले ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा :–हीनें–कमीपणा असलेल्या वस्तूने, फुका–फुकट.

अर्थ :–वाईट व हीन अशा वस्तूंच्यामुळेच चांगल्या वस्तूंची किंमत समजते १ एकाशिवाय दुसऱ्याची किंमत फुकट देखील होणार नाही २ विष आहे म्हणून अमृताची किंमत समजते. कडू पदार्थांच्यामुळे गोड पदार्थांची चव ध्यानात येते घात किंवा आघात होत असल्यानेच खरा फायदा लक्षात येतो ३ काजळीमुळे ज्योतीचे तेज समजते व रात्रीमुळेच दिवसाची शोभा ध्यानात येते ४ गारेचे तुकडे अगदी हलकेच; पण त्यांच्यामुळे हिरा, परीस, मोहरा यांचे महत्त्व सिद्ध होते. ५ तुकाराम महाराज म्हणतात, याप्रमाणे जगात दुष्ट लोक आहेत म्हणूनच संतांसारखे सज्जन ध्यानात येतात. त्यांचे महत्त्व समजते ६

१७२३ असो खळ ऐसे फार । आम्हां त्यांचे उपकार ॥ १ ॥
करिती पातकांची धुनी । मोल न घेतां सावणीं ॥ २ ॥
फुकाचे मजुर । ओझें वागविती भार ॥ ३ ॥
पार उतरून म्हणे तुका । आम्हां आपण जाती नरका ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :–खळ–दुष्ट, धुनी–धुणे, फुकटचे–फुकटचे.

अर्थ :–असे निंदक व दुर्जन पुष्कळ असोत, आम्हाला त्यांचेच उपकार वाटतात. १ कारण ते काहीही किंमत न घेता, साबण न लावता आमची पातके धुवून टाकतात २ असे हे दुष्ट निंदक फुकटच्या मजुराप्रमाणे काम करतात व आमच्या पातकाचे सर्व ओझे वागवितात. ३ तुकाराम महाराज म्हणतात, हे निंदक आम्हाला उद्धारास नेतात व आपण मात्र नरकास जातात. ४

विवरणः– वरील तीन अभंगात तुकारामबुवा साधुसंतांना छळणाऱ्या दुष्टांची व निंदकांची भलावणी करीत आहेत. ज्ञानेश्वर, एकनाथ, तुकाराम इत्यादी संतांचा विनाकारण छळ झाल्याचे त्यांच्या चरित्रांत दिसून येते. एक तर साधुसंतांना फार श्रेष्ठ व अद्वितीय अशा ईश्वरानुभूतीची प्रचीती आलेली असल्यामुळे ते निर्भयपणे समाजास सन्मार्ग दाखवितात, खऱ्या धर्माचा मार्ग दाखवून इष्ट व योग्य काय ते समजावून सांगतात. त्यांच्या या इत्यामुळे पोटभरू व दांभिक लोकांची मोठी अडचण होते. त्यांची लोकप्रियता ओसरते, त्यांचे ढोंग बाहेर येते मग ते सत्पुरुषांची थट्टा करू लागतात. त्यांच्या निंदेने व कुचेष्टेने आपली चलती होईल असे ते मानतात पण त्यामुळे त्यांचीच फजीती होते व संताचे मोल मात्र आहे त्यापेक्षा वाढते. संत जे पाहातात, अनुभवतात ते समजण्याचीही

घुवत त्याची नसल्याने निंदा करण्यापलीकडे त्याना काहीच साधन नाहीं म्हणूनच दुसऱ्या एका अभंगात तुकाराम-बुवानी म्हटले आहे, 'निंदक तो परउपकारी । काय वर्णू त्याची थोरी ' हा निंदक परटापेक्षा थोर आहे कारण पैसे न घेता हा पाप धुऊन टाकीत असतो. तुकारामबुवाच्या मताने हा जन्मांतरीचा परीटच असावा किंवा न्हावी तरी असावा

१७२४ संत पंढरीस जाती । निरोप धाडीं तया हातीं ॥ १ ॥
माझा न पडावा विसर । तुका विनवितो किंकर ॥ २ ॥
केरसुणी महाद्वारीं । ते मी असे निरंतरीं ॥ ३ ॥
तुमचे पायीं पायतन । मोचे माझे तन मन ॥ ४ ॥
तांबुलाची पिकधरणी । ते मी असे मुख पसरूनि ॥ ५ ॥
तुमची विष्ठा पंढरीराया । ते सारसुखी माझी काया ॥ ६ ॥
लागती पादुका । ते मी तळील मृत्तिका ॥ ७ ॥
तुका म्हणे पंढरिनाथा । दुजें न धरावे सर्वथा ॥ ८ ॥

शब्दार्थ व टीपा .– किंकर–दास, मोचे–जोडे, पायताण

अर्थ –हे साधुसंत पंढरपूरच्या वारीला निघाले असून मी पांडुरंगास त्याच्या हातीं निरोप पाठवीत आहे. १ देवा, हा तुकाराम तुमचा दास आहे त्याचा विसर तुम्हास कधी पडू नये २ तुमच्या महाद्वारात मी नित्य केरसुणी होऊन केर काढीत जाईन ३ माझे शरीर आणि मन याचे तुमच्यासाठी मी पायताण करीन ४ तुमच्या मुखातील तांबुलाचा पीक धारण करण्यासाठी माझ्या मुखाची पिकदाणी मी करीन ५ पंढरीनाथा, तुम्ही जे मलविसर्जन कराल ते माझे शरीर ग्रहण करील ६ देवा, तुमचे चरण ज्या भूमीस लागतील तेथल्या तळाची मी माती होईन ७ तुकाराम महाराज म्हणतात, पंढरीनाथा तुम्ही मला तुमच्याशिवाय वेगळे समजू नका ८

१७२५ इच्छेचें पाहिले । डोळीं अतीं मोकलिले ॥ १ ॥
याचा विश्वास तो काई । ऐसे विचारूनि पाहीं ॥ २ ॥
सुगंध अभ्यंगें पाळिता । केश फिरले जाणता ॥ ३ ॥
पिंड पाळिता ओसरे । अवघी घेऊनि मागें सरे ॥ ४ ॥
करिता उपचार । कोणा नाहीं उपकार ॥ ५ ॥
अल्प ओढवल करीं । तुका म्हणे साधीं हरी ॥ ६ ॥

१७२६ यज्ञनिमित्त तें शरिरासी बंधन । का रे तृष्णा वायाविण वाढविली ॥ १ ॥
नव्हे ते भक्ति परलोकसाधन । विषयानी बंधन केले तुज ॥ २ ॥
आशा धरूनि फळाची । तीर्थी व्रती मुक्ति केंचि ॥ ३ ॥
तुका म्हणे सिणसी वाया । शरण न वजता पंढरिराया ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा –वायावीण–उगाच, व्यर्थ, न वजता–न जाता.

अर्थ – यज्ञयागादी कर्मे करून शरीराची बंधन तू व्यर्थ का वाढवितोस? विनाकारण वासना का वाढवतोस? १ परलोकाचे साधन यज्ञयागादी कर्मांनी साधण्याने भक्ती होत नाही उलट यातून नानाप्रकारची बंधनें मात्र निर्माण होतात २ फळाची आशा धरून तीर्थयात्रा केली तरी त्यातून कधीच मुक्ती मिळणार नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, पांडुरंगास शरण न जाता उगाच श्रम का करतोस? ४

१७२७ संध्या कर्म ध्यान जप तप अनुष्ठान । अवघे घडे नाम उच्चारिता ।
न वेचे मोल काहीं लगती न सायास । तरी का आळस करिसी झणी ॥ १ ॥
ऐसे हे सार का नेघेसी फुकाचे । काय तुझें वेचे मोल तया ॥ २ ॥
पुत्रस्नेहे शोक करी अजामेळ । तव तो कृपाळ जवळी उभा ।
अनाथाच्या नाथें घातला विमानीं । नेला उचलूनि परलोका ॥ ३ ॥
अंतकाळीं गणिका पक्षियाच्या छंदें । राम राम उच्चारिले ।
तव त्या दिनानाथा कृपा आली । त्याने तियेसि वैकुंठा नेले ॥ ४ ॥
अवचिता नाम आलिया हे गती । चिंतिता चित्तीं जवळी असे[1] ।
तुका म्हणे भावें स्मरा[2] राम राम । कोण जाणे तयें दशे ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा –सायास–प्रयत्न कष्ट, गणिका–पिंगला वेश्या

अर्थ –या श्रीहरीचे नाम उच्चारताच संध्या कर्म, ध्यान, जप, तप, अनुष्ठान वगैरे सर्व काही घडते हे नाम घेण्यासाठी काही किमत द्यावी लागत नाही काही कष्ट पडत नाहीत. मग याचा आळस विनाकारण का करता? १ असे हे सारभूत असलेले फुकटचे नाम तू का नाही घेत? ते घेतल्याने तुझे काय खर्च होते रे? २ अजामेळाने पुत्रस्नेहामळे अंतकाळी नारायण या शब्दाचा उच्चार केला त्याबरोबर तो कृपाळू देव त्याच्याजवळ येऊन उभा राहिला त्या अनाथाच्या नाथाने त्याला विमानात घालून परलोकास नेला ३ गणिका अंतकाळी त्या आपल्या आवडत्या पक्ष्याच्या निमित्तान 'विठू विठू' अथवा 'राघव राघव' असे म्हणू लागली हे ऐकून त्या दीनानाथास तिची दया आली आणि त्याने त्या गणिकेमही आपल्या वैकुंठास नेले ४ केवळ योगायोगाने अवचित-पणे मुखातून ईश्वराचे नाम आले तर ही गती मिळते मग त्याचे सतत नामस्मरण केल्यास तो नेहमीच जवळ येऊन राहील म्हणून तुकाराम महाराज म्हणतात, भक्तिभावाने राम राम असे स्मरण करा अशा रीतीने रामनाम घेणाराची स्थिती कोण बरोबर जाणणार? ५

१७२८ दुष्टाचे चित्त[3] न भिने अंतरीं । जरी जन्मवरी उपदेशिला ।
पालथें घागरी घातले जीवन । न धरीच जाण तें ही त्याला ॥ १ ॥
जन्मा येऊनि तेणे पतनचि साधिले । तमोगुणे व्यापिले जया नरा ।
जळो जळो हे त्याचे ज्यालेपण । कासया हे आले संवसारा ॥ २ ॥

---

१ उभा, २ स्मरता, ३ चित्त भिन्न तें अंतरी

पाषाण जीवनीं असतां कल्पवरीं । पाहातां अंतरीं कोरडा तो ।
कुचर मुग नयेचि पाका । पाहातां सारिखा होता तैसा ॥ ३ ॥
तुका म्हणे असे उपाय सकळा । न चले या खळा प्रयत्न काहीं ।
म्हणऊनि संग न करितां भला । धरितां अबोला सर्व हित ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – जीवन–पाणी, ज्यालेपण–जन्म, कुचर–शिजण्यास कठीण, अमचोर, पाका–शिजलेल्या अवस्थेस, खळा–दुष्टास

अर्थ – एखाद्या दुष्ट माणसास जन्मभर जरी उपदेश केला तरी त्याच्या चित्ताच्या वृत्तीत कधीच फरक पडत नाही पालथ्या घागरीवर पाणी ओतल्याने ते जसे फुकट जाते तसा त्याला केलेला उपदेश व्यर्थ होतो त्यामोगें त्याला काहीच जाणीव नसते १ मनुष्याच्या जन्मास येऊन त्याने अधोगतीच केली कारण त्याला तमो गुणाने व्यापलेले असते त्याच्या जन्माला या जगण्याला आग लागो तो या जगात जन्मास तरी का आला ? २ अनेक कल्पांपर्यंत एखादा दगड जरी पाण्यात असला तरी तो अंतरंगाने कोरडाच राहातो शिजवताना एखादा कुचर मूग शिजतच नाही, तो पूर्वीप्रमाणेच टणक राहातो ३ तुकाराम महाराज म्हणतात, सर्व आपत्तींना उपाय सापडतो, पण या दुष्टाच्या प्रवृत्तीस मात्र कोणताही उपाय नाही म्हणून यांची संगत कधी धरू नये, हेच उत्तम त्यामुळेच आपले सर्व प्रकारचे हित होईल ४

१७२९ कासियानें पूजा करूं केशीराजा । हाचि संदेश माझा फेडीं आतां ॥ १ ॥
उदकें न्हाणूं तरी स्वरूप तें तुझें । तेथें काय माझें वेचे देवा ॥ २ ॥
गंधाचा सुगंध पुष्पाचा परिमळ । तेथें मी दुर्बळ काय करूं[1] ॥ ३ ॥
फळदाता तूंच तांबोल अक्षता । तरी काय आतां वाहों तुज ॥ ४ ॥
वाहूं दक्षिणा जरी[2] धातु नारायण । ब्रह्म तेंचि अन्न दुजें काई ॥ ५ ॥
गातां तूं ओंकार टाळी नादेश्वर । नाचावया थार[3] नाहीं कोठें ॥ ६ ॥
तुका म्हणे मज अवघें तुझें नाम । धूप दीप रामकृष्णहरि ॥ ७ ॥

शब्दार्थ व टीपा – कासियानें–कशानें, संदेह–शंका, उदकें–पाण्याने, वेचे–खर्च होते, परिमळ–सुवास, तांबोल तांबूल, विडा, थार–स्थान

अर्थ –देवा, मी तुझी पूजा करू तरी कशाने? ही माझी शंका तू निरसन कर आता १ तुला उदकाने म्हणजे पाण्याने न्हाऊ घालावे तरी त्या पाण्याचे स्वरूप तूच आहेस त्याने वेगळे काय होणार आहे? आणि त्यात मी माझे स्वतःचे असे काय देतो बरे? २ तुला सुवासिक गंध लावावे तर गंधाचा सुगंध तूच आहेस पुष्पाचा सुवासही देवा, तूच आहेस अशा अवस्थेत मी दुर्बळ काय करू? ३ तुला फळाचा नैवेद्य दाखवावा तर तूच फलदाता आहेस तांबूल, अक्षदा, हीसुद्धा तुझीच रूपे आहेत आता देवा मी तुला काय वाहू रे? ४ तुला आता देवा, दक्षिणा तरी काय देऊ? कारण दक्षिणा ज्या धातूची बनते ते तर नारायणाचेच स्वरूप आहे आता तुला कोणत्या अन्नाचा नैवेद्य दाखवू? कारण अन्न हे ब्रह्मच आहे दुसरे काय असणार? ५ तुझी आरती करताना गाणे म्हणावे व ॐकाराचा उच्चार करून त्या छंदाने टाळी वाजवावी नाचावे, तर तूच ओंकारस्वरूप व नादब्रह्मरूप आहेस, त्यामुळे मला आता नृत्य करायला कुठेच जागा नाही ६ तुकाराम महाराज म्हणतात, धूप, दीप इत्यादींनी केलेली षोडशोपचाराची पूजा म्हणजे मी 'रामकृष्ण हरी' म्हणून जे तुझे नाम घेतो तीच समजावी ७

---

१ वाहू, २ तरी, ३ पार

विवरण – तुकाराम महाराजांच्या या एका विशेष अभंगाचा अर्थ वाचताना सहजच श्रीशंकराचार्यांच्या 'परापूजा' या अष्टकाची आठवण होते. तुकोबांच्या वाचनात, ऐकण्यात हे असावे. गंध, धूप, नैवेद्य इत्यादींनी परमेश्वराची पूजा करणे कसे अवघड आहे हे तुकोबांनी येथे आपणांस सांगितले आहे. आपल्याकडे देवाची पूजा षोडशोपचार करून करण्याची प्रथा आहे. देवाला आसन द्यायचे, त्याचे पाय पाण्याने धुवायचे, त्याला स्नान घालायचे, त्याला वस्त्र व उपवस्त्र द्यायचे, त्याला यज्ञोपवीत समर्पण करायचे, त्याला गंध लावायचे, पुष्प, धूप, दीप नैवेद्य, नमस्कार, प्रदक्षिणा, मंत्रपुष्पांजली इत्यादी उपचारांनी सगुण देवाची पूजा करण्याची रीत आहे. भक्त आपआपल्या आवडीने यात विविधता निर्माण करतात आणि देवाचे रूप अधिक सौंदर्याने संपन्न असे सजवितात. त्याच्याकडे डोळे भरून पाहातात, त्याच्यापुढे टाळी वाजवून वाद्ये वाजवून नृत्य करतात. अशी ही षोडशोपचाराची पूजा करायला तुकोबा एकदा बसले तो त्यांना अडचण आली. एकामागून एक शंका त्यांच्या मनात येत राहिली. उदकाने परमेश्वरास न्हाऊ घालावे ? तर ही पूजा कशी काय होणार ? उदक हे कुणाचे स्वरूप ? आपण वेगळे असे काय त्याला अर्पण करणार ? गंधाचा सुगंध, फुलांचा सुवास यांची रूपे एका परमेश्वराशिवाय असून तरी शकतील काय ? या परमेश्वराला आपण दक्षिणा तरी कशी अर्पण करणार ? कारण धातुरूपाने परमेश्वरच प्रकट झालेला असतो. मग त्याचे त्यालाच देण्यात कोणता लाभ ? आणि त्यात विशेष तरी काय ? याचे गुणगान करून नाचायचे तरी कसे ? आकार, टाळी, नृत्य, गीत ही सर्व त्याचीच रूपे आहेत. तेव्हा या षोडशोपचाराच्या भानगडीत न पडता याचे नुसते 'रामकृष्ण हरी' हे नाव घ्यावे म्हणजे त्याची यथासांग पूजा झाली असे तुकोबांनी म्हटले आहे.

तुकोबांचा हा अभंग निर्गुण निराकार देवाच्या स्वरूपाचा असून त्यांनी मानसपूजेचा एक प्रकार यात दर्शविला आहे असे काहींचे म्हणणे आहे. पण या म्हणण्याचा नीट अर्थ समजावून घ्यावयास हवा. देव निर्गुण आहे, निराकार आहे, सर्व विश्वात भरून राहिला आहे, तेव्हा त्याची सगुणपूजा करणे बरोबर नाही, असा तुकोबांना अर्थ यातून अभिप्रेत नाही. देवाचे एक भव्य, उदात्त व सर्वव्यापी स्वरूप त्यांनी या अभंगात दाखविले. पण शेवटी 'रामकृष्ण हरी' या नामाच्या घोषातच अवघी षोडशोपचाराची पूजा आहे असे त्यांनी निक्षून सांगितले नाही, सगुण देवाची षोडशोपचाराची पूजा त्यांनी नाकारली नाही किंवा तिचा निषेधही केलेला नाही. मनात भाव नसताना षोडशोपचारांनी जे पूजा करतात त्यांचा मात्र निषेध तुका जरूर करतील. पण या अभंगाचा हेतू हा नसावा. ईश्वराचे सर्वव्यापी शरीर व सर्व वस्तुमात्रातील त्याचे वास्तव्य त्यांनी शंकराचार्यांच्या 'परापूजा' या अप्रतीम अष्टकाच्या आधाराने येथे सुचविले आहे इतकेच. श्रीशंकराचार्यांचे हे 'परापूजा' स्तोत्र या अभंगाशी ताडून पाहाता यावे या हेतूने येथे ते अर्थासहित दिलेले आहे.

अखण्डे सच्चिदानन्दे निर्विकल्पैकरूपिणि । स्थितेऽद्वितीय भावेऽस्मिन्कथं पूजा विधीयते ॥ १ ॥
पूर्णस्यावाहनं कुत्र सर्वाधारस्य चासनम् । स्वच्छस्य पाद्यमर्घ्यं च शुद्धस्याचमनं कुतः ॥ २ ॥
निर्मलस्य कुतः स्नानं वस्त्रं विश्वोदरस्य च । अगोत्रस्य त्ववर्णस्य कुतस्तस्योपवीतकम् ॥ ३ ॥
निर्लेपस्य कुतो गन्धः पुष्पं निर्वासनस्य च । निर्विशेषस्य का भूषा कोऽलङ्कारो निराकृते ॥ ४ ॥
निरञ्जनस्य किं धूपैर्दीपैर्वा सर्वसाक्षिणः । निजानन्दैकतृप्तस्य नैवेद्यं किं भवेदिह ॥ ५ ॥
विश्वानन्दयितुस्तस्य किं ताम्बूलं प्रकल्प्यते । स्वयंप्रकाशचिद्रूपो योऽसावर्कादि भासकः ॥ ६ ॥
प्रदक्षिणा ह्यनन्तस्य ह्यद्वयस्य कुतो नतिः । वेदवाक्यैरवेद्यस्य कुतः स्तोत्रं विधीयते ॥ ७ ॥
स्वयं प्रकाशमानस्य कुतो नीराजनं विभोः । अन्तर्बहिश्च पूर्णस्य कथमुद्वासनं भवेत् ॥ ८ ॥
एवमेव परापूजा सर्वावस्थासु सर्वदा । एकबुद्ध्या तु देवेशे विधेया ब्रह्मवित्तमैः ॥ ९ ॥
आत्मा त्वं गिरिजा मतिः सहचराः प्राणाः शरीरं गृहम् । पूजा ते विविधोपभोगरचना निद्रा समाधिस्थितिः ।
सञ्चारः पदयोः प्रदक्षिणविधिः स्तोत्राणि सर्वा गिरो । यद्यत्कर्म करोमि तत्तदखिलं शम्भो तवाराधनम् ॥१०॥

इति श्रीमच्छङ्कराचार्यकृत परापूजास्तोत्रं सम्पूर्णम् ।

भावार्थ -- अखंड, सच्चिदानंद आणि निर्विकल्पस्वरूप अशा अद्वितीय भावात स्थिर असल्यावर कशा प्रकारची पूजा केली जाणार ? १ जो पूर्ण आहे त्याला आवाहन कुठे करायचे ? जो सर्वांचा आधार आहे त्याला कोणत्या वस्तूचे आसन द्यायचे ? जो स्वच्छ आहे त्याला पाय धुण्यासाठी व अर्घ्यासाठी पाणी कसे द्यायचे ? जो नित्य शुद्ध आहे, त्याला आचमनाची तरी काय गरज ? २ निर्मळाला स्नान कसे ? संपूर्ण विश्वच ज्याच्या उदरात सामावलेले आहे त्याला वस्त्र कसे अर्पण करायचे ? जो वर्ण व गोत्र यांच्या विरहित आहे त्याला यज्ञोपवीत तरी कसे द्यावयाचे ? ३ निर्लेपाला गंध लावायचे ? जो निर्वासनिक आहे त्याला सुगंधासाठी फूल कशास ? निर्विशेषाला शोभा कशाची ? आणि निराकाराला अलंकार तरी कशासाठी ? ४ निरंजनाला धुपाची काय आवश्यकता ? जो सर्वसाक्षी त्याला नैवेद्य तरी कशासाठी ? ५ जो स्वयंप्रकाशी आहे नित्यतृप्त आहे, सूर्यचंद्रांना प्रकाश देणारा आहे व सर्व विश्वाला आनंदित करणारा आहे, त्याला तांबूल कसा काय समर्पण करायचा ? ६ जो अनंत आहे त्याला प्रदक्षिणा कशी घालायची ? अद्वितीयाला नमस्कार कसा ? व जो वेदवाक्यांनीही जाणला जात नाही त्याचे स्तवन तरी कसे करायचे ? ७ जो स्वयंप्रकाशी आणि विभु आहे त्याची आरती तरी कशी करायची ? जो आत व बाहेर सर्वत्र परिपूर्ण आहे त्याचे विसर्जन तरी कसे करायचे ? ८ ब्रह्मवेत्त्यांनी नेहमी सर्व अवस्थांत एकबुद्धीने त्या भगवानाची परापूजा केली पाहिजे ९ हे शंभो, माझा आत्मा तूच आहेस श्रीपार्वती ही बुद्धी आहे, प्राण आपले गण आहेत, शरीर आपली कुटी आहे, नाना प्रकारची भोगसामग्री आपल्या पूजेचे उपचार आहेत, निद्रा समाधी आहे माझ्या चरणांचे चालणेच प्रदक्षिणा असून मी जे काही बोलत आहे, ते सर्व आपले स्तुतिस्तोत्रच आहे अधिक काय ? मी जे काही करीत आहे, ती सर्व आपलीच आराधना आहे १०

**श्री शंकराचार्यकृत परापूजा स्तोत्र संपूर्ण**

१७३० गातां आइकतां कांटाळा जो करी । वास त्या अघोरीं कुंभपाकीं ॥ १ ॥
रागें यमधर्म जाचविती तया । तुज दिले कासया मुख कान ॥ २ ॥
विषयाच्या सुखें अखंड जागसी । न वजे एकादशी जागरणा ॥ ३ ॥
वेचूनिया द्रव्य सेवी मद्यपान । नाहीं दिलें अन्न अतीतासी ॥ ४ ॥
तीर्थाटण नाहीं केले उपकार । पाळिलें शरीर पुष्टें लोभें ॥ ५ ॥
तुका म्हणे मग केला साहे दंड । नाइकतीं लंड सांगितलें ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा–कुंभपाकीं–कुंभपाक नावाच्या अघोर नरकात, वेचूनिया–खर्च करून, अतीतासी–अतिथीस, लंड–नास्तिक

अर्थ –श्रीहरीची कथा गाताना अथवा ऐकताना जे कंटाळा करतील त्यांना शेवटी कुंभपाक नावाच्या भयानक नरकात जावे लागेल १ अशा दुष्ट लोकांना यमधर्म मोठ्या रागाने जाच करीत असतात तुला कान व मुख कशासाठी दिले ? असे ते त्याला विचारतात २ विषयाच्या सुखासाठी तू रात्री अखंडपणे जागतोस, पण एकादशीच्या दिवशी जागरण करण्यासाठी मात्र जात नाहीस ३ जवळचे द्रव्य खर्च करून मद्यपानाचे सेवन करतोस, पण दारात अतिथी आला तर त्याला कधी अन्न घालीत नाहीस ४ कधी तू तीर्थयात्रा केली नाहीस, तर कधी दुसऱ्यावर उपकार केले नाहीस, पण स्वतःचे शरीर मात्र खाऊन पिऊन पुष्ट करून ठेविले आहेस ५ तुकाराम महाराज म्हणतात असे हे नास्तिक लोक सांगितलेले ऐकत नाहीत मग मात्र वरीलसारखा दंड त्यांना सहन करावा लागतो ६

१७३१ तुझें म्हणविता काय नास जाला । ऐकें बा विठ्ठला कीर्तीं तुझी ॥ १ ॥
परी तुज नाहीं आमचे उपकार । नामरूपा थार केलियाचे ॥ २ ॥
समूळीं संसार केला देशधडी । सांडिली आवडी ममतेची ॥ ३ ॥

लोभ दंभ काम क्रोध अहंकार । यासी नाहीं थार ऐसें केलें ॥ ४ ॥
मृत्तिका पाषाण तैसें धन । आपलें ते कोण पर नेणों ॥ ५ ॥
तुका म्हणे जालों देहासी उदार । आणीक विचार काय तेथें ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा –नास–नाश, थार–थारा, आश्रय.

अर्थ –विठ्ठला, आम्ही तुझेच आहोत असे म्हणत असताना आमचा काय नाश झाला, यासबंधीची तुझी कीर्ती तू ऐक आता १ देवा, आम्ही तुला नामरूपाच्या स्थितीस आणले, पण आमचे हे उपकार तू कधी मानीतच नाहीस २ आम्ही आमचा संसार समूळ देशोधडीस लावला, ममतेची आवड त्यासबधीची आम्ही सोडूनच दिली ३ आम्ही आमच्या मनात काम क्रोध, लोभ, अहंकार याना मुळीच स्थान दिले नाही, असे केले ४ आम्ही धनास मातीप्रमाणे अथवा पाषाणाप्रमाणे मानले आपले व परक्याचे असा भावही आम्ही आमच्या मनात कधी आणला नाही ५ तुकाराम महाराज म्हणतात अशा रीतीने आम्ही आमच्या देहावरही उदार झालो आता आणखी कोणता विचार घ्यावयाचा राहिला आहे ? ६

१७३२ जाऊनिया तीर्था काय तुवा केलें । चर्म प्रक्षाळिलें वरी वरी ॥ १ ॥
अंतरींचे शुद्ध कासयानें जालें । भूषण त्वां[1] केलें आपणया ॥ २ ॥
वृंदावन[2] फळ घोळिलें साकरा । भीतरील थारा मोडेचि ना ॥ ३ ॥
तुका म्हणे नाहीं शांति क्षमा दया । तोंवरी कासया फुंदा तुम्ही ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा –चर्म–कातडे, थारा–आश्रय, अंतरंग

अर्थ –तू तीर्थयात्रेला जाऊन काय केलेस रे ? वरवरचे कातडे मात्र तेथील पाण्याने धुवून काढलेस १ पण त्यामुळे तुझे अंतःकरण शुद्ध झाले काय ? अनेक तीर्थांची यात्रा केली, एवढा लौकिक मात्र मिळविलास २ कडू वृंदावनाचे फळ साखरेत कितीहि घोळले तरी त्याच्या आतील कडूपणा कधीच जात नाही तीर्थयात्रा करून तुझे चित्त शुद्ध झाले नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, मनात दया, क्षमा, शांती तुझ्यापाशी नाही तोपर्यंत उगाच गर्वाने स्फुंदण्यात काय अर्थ ? ४

१७३३ बैसोनि निवांत शुद्ध करीं चित्त । तया सुखा अंतपार नाहीं ॥ १ ॥
येऊनि अंतरीं राहील गोपाळ । सायासाचें फळ बैसलिया ॥ २ ॥
राम कृष्ण हरि मुकुंद मुरारि । मंत्र हा उच्चारीं वेळोवेळां ॥ ३ ॥
तुका म्हणे ऐसें देईन मी दिव्य । जरी होईल भाव एकविध ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा –अंतपार–पारावार, मर्यादा, अंतरीं–मनात

अर्थ –तू एकाच ठिकाणी बसून निवांतपणे चित्त शुद्ध कर मग तुझ्या सुखाला पारावार राहाणार नाही १ तुझ्या अंतःकरणात मग तो गोपाळ येऊन राहील त्यामुळे मोठ्या कष्टाने मिळणारे फळ तुला प्राप्त होईल २ रामकृष्णहरी, मुकुंदमुरारी या मंत्राचा उच्चार तू वेळोवेळी करावास ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा रीतीने तुझा भाव जर एकविध होईल तर वर सांगितलेले फळ तुला प्राप्त होईल असे मी शपथेने सांगतो ४

१७३४ धन्य पुंडलिका बहु बरें केलें । निधान आणिलें पंढरिये ॥ १ ॥
न पवीजे केल्या तपांचिया राशी । तें जनलोकांसी दाखविलें ॥ २ ॥
सर्वोत्तम तीर्थ क्षेत्र आणि देव । शास्त्रांनीं हा भाव निवडिला ॥ ३ ॥

---

१ तों, २ इंद्रावण

विष्णुपद गया रामधाम[१] काशी । अवघीं पायांपाशीं विठोबाच्या ॥ ४॥
तुका म्हणे मोक्ष देखिल्या कळस । तात्काळ या[२] नास अहंकाराचा ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीप :-निधान-ठेवा, साठा, न पवोजे-पावत नाही, नास-नाश

अर्थ :-या पुंडलिकाने फार चांगले केले आहे त्याने हा विठ्ठलरूप ठेवा पंढरपुराला आणून भक्तांसाठी उभा केला. १ तपाच्या राशी जरी उभ्या केल्या तरी हे पावणारे नाही. असे हे दैवत पुंडलीक मुनीने सर्व दाखविले. तो पुंडलीक धन्य आहे. २ हे पंढरपूर क्षेत्र सर्व तीर्थात, सर्व क्षेत्रात व देवांत सर्वोत्तम असल्याचा निवाडा केलेला आहे ३ विष्णुपद, गया, रामधाम व काशी ही सर्व या विठ्ठलाच्या पायांपाशीच आहेत. ४ तुकाराम महाराज म्हणतात, या विठ्ठलाच्या मंदिराचा कळस दुरून पाहिला तरी तात्काळच मोक्ष मिळून अहंकाराचा नाश होतो ५

१७३५ धन्य ते पंढरी भीमातीर । आणियेलें सार पुंडलिकें ॥ १ ॥
धन्य तो हि लोक अवघा दैवांचा । सुकाळ प्रेमाचा घरोघरीं ॥ २ ॥
धन्य ते ही भूमी धन्य तरुवर । धन्य तें सरोवर तीर्थरूप ॥ ३ ॥
धन्य त्या नरनारी मुखीं नाम ध्यान । आनंदें भवन[१] गर्जतसे ॥ ४ ॥
धन्य पशु पक्षी कीटक पाषाण । अवघा नारायण अवतरला ॥ ५ ॥
तुका म्हणे धन्य संसारातें आलीं । हरिरंगीं रंगलीं सर्वभावें ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा-सार-तात्पर्य, भवन-घर.

अर्थ - ही पंढरपूरची नगरी व हे भीमातीर धन्य आहेत कारण या ठिकाणी पुंडलीकाने सर्व सारांतील सार असा विठ्ठल आणून उभा केला आहे. १ येथील राहणारे सर्व लोक धन्य व दैववान आहेत. कारण येथे घरोघरी या देवाविषयीच्या प्रेमाचा सुकाळ आहे २ येथील भूमी धन्य आहे, येथील झाडेझुडपे धन्य आहेत आणि येथील तीर्थस्वरूपाचे चंद्रभागासरोवरही धन्य आहे ३ येथील स्त्रिया व पुरुष त्यांच्या मुखात श्रीविठ्ठलाचे नाम असल्यामुळे ते धन्य आहेत त्यांच्या नामस्मरणात या घोषाने त्यांची घरे दुमदुमून गेली आहेत ४ येथील पशू, पक्षी, किडे व पाषाण हेही नारायणरूपाने येथे अवतीर्ण झाले असल्यामुळे धन्य आहेत. ५ तुकाराम महाराज म्हणतात, अशी ही सर्व माणसे एकसारखी सर्व भावांनी हरिरूपात रंगलेली असल्यामुळे जन्माला येऊन धन्य झाली आहेत ६

विवरण–या एका अभंगात तुकाराम महाराजांनी आपल्या प्रारंभीच्या दिवसांत चंचल असणाऱ्या मनाचे प्रामाणिकपणाने वर्णन केले आहे. मन हट्टी आहे, चंचल आहे, ते इंद्रियांच्या विषयांकडे धाव घेते, यामुळें चित्ताची ओढाताण फार होते, हा अनुभव पुष्कळ संतांनी आपल्या निवेदनात सांगितलेला आहे. 'अचपळ मन माझें नावरे आवरीतां' असे रामदासांनी म्हटले आहे 'चंचल हि मन कृष्ण' अशी अर्जुनाची तक्रार आहे ते आवरण्यास कठीण आहे असे अर्जुनाने सांगितल्यावर 'अभ्यासेन तु कौंतेय वैराग्येण च गृह्यते'–म्हणजे अभ्यासाने व वैराग्याने ते स्वाधीन ठेवता येते–अशी भगवंतांनी त्याची समजूत काढली आहे म्हणूनच तुकारामबुवा परमेश्वरास प्रार्थना करीत आहेत की, नारायणा, आता तुम्ही या बाबतीत उदास राहू नये मला या मनाच्या कचाटून सोडवावे तुकोबांना हा मनाचा जाच कशा प्रकारचा होता ? लौकिक दृष्टीने घरात व बाहेर त्यांची फटफजिती होत राहिलेली आपणास माहीत आहे. या संसारमोहातून सुटावे, मन ईश्वराच्या ठिकाणी दृढ करावे, एकान्तात रमवावे, साधुसंतांच्या व कथाकीर्तनांच्या संगतीत लावावे, सद्ग्रंथाच्या श्रवणात गुंतवावे, म्हणून त्यांनी प्रयत्न केल्याचेही आपण पाहिले आहे परंतु या ओढाळ व चंचल मनास आवरताना आपणांस किती कष्ट पडले, याचेही उल्लेख त्यांनी मधून-मधून अभंगांतून दिले आहेत 'बाह्यात्कार भक्ति' दिसत असली तरी 'अंतरीं संसार' आहे काय ? असे त्यांना वाटे 'पुत्र दारा धन होतां मनीं धंदा। गोविलों सदा होतों कामें' अशी अवस्था त्यांच्या मनाची प्रारंभी तरी असावी असे वाटते 'चित्त गुंतले प्रपंचें। जाले केलें ममतेचें' अशा प्रकारच्या ममत्वात ते गुंतले असावे दुसऱ्या एका अभंगात त्यांनी ईश्वराला विनविताना म्हटले आहे,'आतां सोडवणे धावा नारायणा। मज हे वासना अनावर आपली वासना अनावर झाली, हे त्यांनी या ठिकाणी सांगितले आहे तुकोबांचे हे असे आत्मपरीक्षण नेहमी चाललेले असे 'प्रपंचाबाहेरीं नाहीं आलें चित्त। केले करी नित्य वेवसाय' असा अनुभव त्यांनी दिलला आहे

अशा या अनावर व प्रमाथी मनास तुकाराम महाराजांनी प्रथम प्रथम उपदेशही करून पाहिला आहे 'अघोरा माझ्या मना ऐक एकी मात। तू का रे दुश्चित निरंतर',–'का रे नाठविसी कृपाळू देवासी। पोसितो जनासी एकला तो' अशा वचनांतून अवखळ मनास आवरण्याचा व सन्मार्गास लावण्याचा त्यांचा प्रयत्न दिसतो जग आणि मन यांत त्यांचे अंतर्बाह्य युद्ध रात्रंदिवस चालू असे मनोनिग्रहाचे शिक्षण तुकोबांच्या चरित्रक्रमावरून साधकांना घेण्यासारखे आहे 'कामक्रोध आड पडले पर्वत। राहिला अनंत पलीकडे। भुलथवे मज न सापडे वाट। दुस्तर हा घाट वैरियाचा' म्हणून आपल्या मार्गातील अडचणी त्यांनी स्पष्ट केल्या आहेत 'इंद्रियांची आम्ही पागिलों अंकितें। त्याचे रंगीं चित्त रंगलेसे। एकाचेही मज न घडे दमन। अवघी नेमून कैसी राखों' अथवा 'काय करू आता या मना। न सडी विषयाची वासना। प्रार्थियां ही राहेना। आवरें पतना नेऊ पाहे॥ 'न राहे एके ठायीं एकी घडी। चित्त तडातड मोडी। धरले विषयखोवडीं। घालू पाहे उडी भवडोहीं' असा मोठा दुर्घट संग्राम तुकोबांना करावा लागलेला दिसतो या मनाचा आणखी एक मोठा दुर्गुण त्यांनी सांगितला आहे यास दडपावे तर ते दुसरीकडेच उग्र रूप धारण करून सतावते, असा अगदी आधुनिक विचारही त्यांनी एका ठिकाणी सांगितला आहे 'अधिक कोंडितां चरफडी। मलतीकडे घाली उडी' अशा या आढाळ मनास कितीही आवरले तरी त्याची ओढी इंद्रियांच्या विषयांकडेच असते म्हणून कधी तुकोबा निर्वाणीच्या सुरात विचारतात, 'काय करू या मना आतां। का विसरते पंढरिनाथा। करी संसाराची चिंता। वेळोवेळा मागुती॥ भजन नावडे श्रवण। धावे विषय अवलोकून। बहुत चंचळ चपळ। जाता येता न लगे वेळ पंढरीनाथास विसरून संसारात रमणाऱ्या या ओढाळ मनास आवरण्याचे प्रयत्न तुकोबांच्या अभंगात पुष्कळ ठिकाणी दिसतात शेवटी या मनाचा धनी जो परमेश्वर वा विठ्ठल त्याला शरण जाण्याखेरीज तुकारामांना दुसरा उपाय सुचेना, 'आता धांवे धांवे गा श्रीहरी। गलों वाया नाही तरी। न दिसे कोणी आवरी। आणीक दुजा तयासी॥ अशी प्रार्थना त्यांनी विठ्ठलास वारंवार केली आहे

१७३८ मागतियाचे दोनि च कर। अमित भांडार दातियाचे॥ १॥
काय करूं आतां कासयांत भरूं। हा मज विचारु पडियेला॥ २॥
एके सांटवणें प्रेमें वोसडलों। जिव्हा हे भागली करिता माप॥ ३॥
तुका म्हणे आतां आहे तेथें असो। अखुनियां बैसों पायापाशीं॥ ४॥

शब्दार्थ व टीपा – कर-हात, अमित-अमर्याद, अंखुनियां-आज्ञांकित होऊन.

अर्थः— मागणाऱ्या माणसास दोन हात असले तरी देणाऱ्या दात्याचे भांडार मात्र अमर्याद आहे. १ देवा, तुझ्या कृपेचे दान मला जे मिळाले आहे ते भरू तरी कशात? हा मोठाच विचार माझ्या समोर निर्माण झालेला आहे. २ एक माझे हृदय होते; पण त्यात तुझ्या प्रेमाची साठवण केलेली असल्यामुळे तेथे आता जागा नाही. तुझ्या दानाचे माप करताना माझी जीमही थकून गेली आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, आता मी जसा आहे तसाच राहून या देवाच्या पायांपाशी आज्ञांकित होऊन बसतो. ४

१७३९ जिचें पीडे बाळ । प्राण तियेचा विकळ ॥ १ ॥
ऐसा मातेचा स्वभाव । सूत्र दोरी एक जीव ॥ २ ॥
सुखाची विश्रांति । उमटे मातेचिये चित्तीं ॥ ३ ॥
तुका म्हणे संत । तुम्ही बहु कृपावंत ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :— विकळ–दु खी, कष्टी

अर्थः— ज्या आईचे बालक दु खाने पीडलेले असते, तिचा प्राण नेहमीच दु.खी व कष्टी बनलेला असतो. १ असा हा आईचा स्वभाव मोठा प्रेमळ असतो. सूत व त्याची वळलेली दोरी यांचा जसा एकजीव असतो तसाच तो मुलाच्या व मातेच्या प्रेमात असतो! २ मुलास झालेल्या सुखाच्या विश्रांतीचे स्वरूप त्याच्या आईच्या चित्तात उमट लेले दिसते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, या आईप्रमाणेच तुम्ही संत फारच कृपाळू आहात. ४

१७४० यावें माहेरास । हे च सर्वकाळ आस ॥ १ ॥
घ्यावी उच्छिष्टाची धणी । तीर्थ इच्छी पायवणी ॥ २ ॥
भोग उभा आड । आहे तोंवरी च नाड ॥ ३ ॥
तुका म्हणे देवें । माझें सिद्धी पाववावें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपाः—आस–इच्छा, धणी–तृप्ती, पायवणी–पायाचे तीर्थ, नाड–अडथळा.

अर्थः— या आईबापाच्या घरी जावे, माहेरास यावे हीच माझी सर्वकाळ इच्छा असते. १ येथे येऊन उष्टया, शिल्लक असलेल्या अन्नाच्या सेवनाने तृप्त व्हावे, पायांचे तीर्थ घ्यावे, एवढीच एक तीव्र इच्छा माझी आहे. २ जोपर्यंत प्रारब्धभोग आड उभा आहे, तोपर्यंत आईबापांच्या भेटीस अडथळा आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवाने माझे सर्व मनोरथ आईबापांच्या प्रमाणे पूर्ण करावेत. ४

१७४१ लेंकराचें हित । वाहे[१] माउलीचें चित्त ॥ १ ॥
ऐसी कळवळ्याची जाती । करी लाभेंविण प्रीती ॥ २ ॥
पोटीं भार वाहे । त्याचें सर्वस्व ही साहे ॥ ३ ॥
तुका म्हणे माझें । तैसें तुम्हां संतां ओझें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपाः— कळवळ्याची–प्रेमाची.

अर्थ — मुलाच्या हिताचीच चिंता आईचे चित्त नेहमी धारण करीत असते. १ कोणत्याही लाभाची आशा न करता प्रेम करावे, अशी खऱ्या प्रेमाची वृत्ती असते. खऱ्या प्रेमास दुसरा कोणताही लाभ नको असतो. २ ज्या मुलास तिने नऊ महिने पोटात वागविलेले असते, त्याचा सर्व भार तीच सहन करीत असते ३ तुकाराम महाराज म्हणतात, बालकाचे ओझे जसे त्याच्या आईवर असते, तसे माझे हे ओझे तुम्हा सर्व संतांवर मी टाकले आहे. ४

१ जाणे

१७४२ आम्हां गांजी जन । तरि कां मेला नारायण ॥ १ ॥
जालों पोरटीं निढळें । नाहीं ठाव बुड आळें ॥ २ ॥
आम्हीं जना भ्यावें । तरि कां न लाजिजे देवें ॥ ३ ॥
तुका म्हणे देश । जाला देवाविण ओस ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:— गांजी–त्रास देते, सतावते, निढळें–दुर्दैवाने, ठाव बुड–आश्रयस्थान, आळें–कोडाळे, आधारस्थान.

अर्थ:— आम्हांस हे जग त्रास देत आहे अशा वेळी परमेश्वर मेला आहे की काय? १ आता आम्ही दुर्दैवाने पोरकेच झालेलो आहोत. आम्हांला आता कुठलेच आश्रयस्थान उरलेले नाही. २ लोकांचे भय जर आम्हांस आहे, तर मग याची लाज देवास नाही काय? ३ तुकाराम महाराज म्हणतात, हा सर्व देश मला देवाशिवाय परदेशाप्रमाणे ओस झाला आहे ४

१७४३ तुम्ही पाय संतीं । माझे ठेवियेले चित्तीं ॥ १ ॥
आतां बाधूं न सके काळ । जालीं विषम शीतळ ॥ २ ॥
भय नाहीं मनीं । देव वसे घरीं रानीं ॥ ३ ॥
तुका म्हणे भये । आतां स्वप्नीं ही तें नये ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा — विषम–कटू भाव

अर्थ.— तुम्ही संतांनी पाय माझ्या चित्तात ठेविलेले आहेत मी तुमचे पाय माझ्या चित्तात धारण करून ठेविले आहेत १ त्यामुळे आता मला काळाचीही भीती उरलेली नाही हृदयातील कटू भावही आता निवळून गेले आहेत २ आता देव माझ्या घरात, रानात सर्वत्र वसला असल्यामुळे माझ्या मनात कसलीच भीती उरलेली नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, आता मला भय स्वप्नातही माहीत नाही. ४

१७४४ काळाचे ही काळ । आम्ही विठोबाचे लडिवाळ ॥ १ ॥
करूं सत्ता सर्वा ठायीं । वसों निकटवासें पायीं ॥ २ ॥
ऐसी कोणाची वैसरी । वदे आमुचे समोरी ॥ ३ ॥
तुका म्हणे बाण । हातीं हरिनाम तीक्षण ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:— वैखरी–वाणी.

अर्थ:— आम्ही या विठ्ठलाचे लडिवाळ भक्त असल्यामुळे काळाचेही काळ झालो आहोत. १ आम्ही सर्व ठिकाणी सत्ता दाखवू त्याच्या पायांशी निकटपणाने निवास करू. २ आता आमच्या विरुद्ध कुणाची वाणी बोलणार आहे? आमच्या समोर आता कोण बोलणार? ३ तुकाराम महाराज म्हणतात, हरिनाम हेच तीक्ष्ण असे बाण हातात धरून मी उभा आहे. ४

१७४५ जन्मा येऊन उदार जाला । उद्धार केला वंशाचा ।
मेळवूनि धन मेळवी[1] माती । सदा विपत्ती भोगीतसे ॥ १ ॥
नाम घेतां न मिळे अन्न । नव्हे कारण देखिलिया ।
धर्म करितां ऐके कानीं । बांधे निजोनि डोकियासी ॥ २ ॥

---

१ मेळविली

घरा व्याही पाहुणा आला । म्हणे त्याला बरें नाहीं ।
तुमचे गावीं वैद्य आहे । वैसोनि काय प्रयोजन ॥ ३ ॥
उजवूं किती होतिल पोरे । मरता बरें ह्मणे यासी ।
म्हणऊनि देवा नवस करी । दावी घरींहुनि बोनें ॥ ४ ॥
पर्वकाळीं भट घरासी आला । बोंब घाला म्हणे पोरा ।
तुमचा उणा होईल वाटा । काळ पिठासी आला ॥ ५ ॥
दाढी करिता अडका गेला । घरात आला बाइलेपें ।
म्हणे आता उगवीं मोडी । डोई बोडीं आपुली ॥ ६ ॥
तीर्थ स्वप्नीं नेणे गंगा । पूजन लिंगा गांविंचिया ।
आडकूनि दार बैसे दारीं । आल्या घर म्हणे ओस ॥ ७ ॥
तुका म्हणे ऐसे आहेत गा हरी । या ही तारीं जीवांसी ।
माझ्या भय वाटे चित्तीं । नरका जाती म्हणोनि ॥ ८ ॥

शब्दार्थ व टीपा — कारण–कार्य, उजवूं–लग्ने वगैरे करणे, बोनें–नैवेद्य, अडका–पैसा, उगवी–वसूल कर

अर्थ —– हा कुणी एक मनुष्य पाहा जन्मास येऊन उदार झाला आणि पुढीलप्रमाणे वागून याने आपल्या कुळाचा उद्धार केला याने पुष्कळ धन मिळविले आणि मातीत पुरून ठेविले, सतत हा आपले दारिद्रय भोगीतच असतो १ याचे नाव चुकून जर तोंडात आले तर त्या दिवशी अन्न खायला मिळणार नाही, याचे दर्शन होताच त्या दिवशीचे काय काही नीट घडणार नाही कुणी काही धर्म केल्याचे याच्या कानी आले की याचे डोके उठते डोके बांधून हा निजूनच राहतो २ घरामध्यें कुणी व्याही अथवा पाहुणा आला तर म्हणतो, अहो मला बरेच वाटत नाही तुमच्या गावी एखादा वैद्य आहे का हो ? त्याला घेऊन या येथे बसून काय राहिलात ? ३ हा म्हणतो ही घरात पोरे किती झाली ? यांची लग्ने तरी आता कशी करू ? यातील काही मरतील तरी बरे त्यासाठी देवाला नवसही करतो आणि हा नवस घरातील रोजच्या जेवणाचा नैवेद्य दाखवूनच फेडतो ४ एखाद्या पर्वणीस भिक्षुक घरी आला तर हा पोराना सांगतो की, तुम्ही बोंब मारा हा भिक्षुक नसून घरच्या धान्यास काळ आला आहे याला घातलेला तुमचा वाटा कमी होईल ५ एकदा याने न्हाव्याकडून हजामत करून घेतली त्याला एक अडका दिला अर्ध्या अडक्यात हजामत होते, पण उरलेला अर्धा परत येईनासे पाहून तो घरात आला व आपल्या बायकोस म्हणाला, आता तू आपले डोके भादरून घे व अर्धा अडका वसूल कर ६ गंगेची तीर्थयात्रा करण्याचं याच्या स्वप्नात देखील येत नाही गावातील महादेवाच्या लिंगाची हा कधी पूजा करीत नाही, हा सदोदित स्वतःच्या दाराच्या उंबऱ्यातच अडकून बसलेला असतो व कुणी पाहुणा वगैरे आला तर सांगतो, घर रिकामे आहे कुणीच घरात नाही ७ तुकाराम महाराज म्हणतात, देवा असे जीव या जगात कितीतरी आहेत याचेही रक्षण तू कर हे सर्व जीव नरकास जातील याबद्दल मला फार भय वाटते ८

१७४६ जाणे वर्तमान । परि तें न वारे त्याच्यानें ॥ १ ॥
तो ही कारणाचा दास । देव म्हणविता पावे नास ॥ २ ॥
वेची अनुष्ठान । सिद्धी कराया प्रसन्न ॥ ३ ॥
तुका म्हणे त्याचे । मुदल गेलें हाटवेचे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा — वर्तमान–चालू व भविष्य काळ, कारणाचा–पूर्वकर्माचा, वेची–खर्च करतो, हाटवेचें–बाजाराच्या खर्चास

अर्थः–चालू व भविष्य काळांत काय घडेल हे तो जाणतो, पण त्याला पुढील अरिष्ट निवारण करता येत नाही. १ तो आपल्या पूर्वकर्मांचा दासच असून मीच श्रेय आहे, असे म्हणण्यानेच त्याचा नाश झालेला असतो. २ हा मनुष्य नाना प्रकारच्या सिद्धी प्रसन्न व्हाव्यात म्हणून अनुष्ठानात वेळ खर्च करतो. ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा माणसाचे सर्वस्व मुद्दलासकट बाजाराच्या खर्चासाठी नाहीसे होते. ४

१७४७ घातला दुकान । पढीयें तैसा आहे वान ॥
आम्ही भांडारी देवाचे । द्यावें घ्यावें माप वाचें ॥ २ ॥
उगवूं जाणों मोडी । जाली नव्हे त्याची जोडी ॥ ३ ॥
तुका म्हणे पुडी । मोल तैसी खरी कुडी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:– पढीयें–आवडेल तसा, वान–मालाचा नमुना, भांडारी–भांडाराचे धनी, मोडी–रीत, वागणूक, मोड, कुडी–शरीर.

अर्थः–आम्ही येथे परमार्थाचे दुकान घातले आहे. ज्याला जसा आवडेल तसा माल आमच्याजवळ आहे. १ आम्ही देवाच्या भांडाराचे धनी आहोत. त्याच्या इच्छेप्रमाणे आम्ही वाणीने माप देतो व घेतो. २ ज्याची जशी वागणूक असेल, तशी त्याची समजूत आम्ही काढतो. ज्याला जे प्राप्त झाले नाही त्याला ते आम्ही मिळवून देऊ. ३ तुकाराम महाराज म्हणतात, जो शरीराचे खरे मोल आम्हांस देईल त्यास आम्ही चांगल्या मालाची पुडी देऊ. ४

१७४८ सादाविलें एका । सरें अवघियां लोकां ॥ १ ॥
आतां आवडीचे हातीं । भेद नाहीं ये पंगतीं ॥ २ ॥
मोकळी च पोतीं । नाहीं पुसायाची गुंती ॥ ३ ॥
तुका म्हणे वरा । आहे ढसाळ[1] वेव्हारा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:–सरें–एकसरे, समत्वाने, आवडीचे–प्रेमाने, गुंती–अडचण, अडथळा, ढसाळ–सढळ

अर्थः–मी सर्व लोकांना एकत्वाच्या भावनेने सावध करून हाक मारली आहे. १ आता आमच्या या दुकानात ज्याला त्याला आवडीप्रमाणे माल येथे मिळेल येथे पंक्तिप्रपंच अथवा भेद नाही. २ आमच्या या दुकानातील पोती मोकळीच असल्यामुळे कुणीही माल घ्यावा त्यासाठी विचारण्याचा अडथळा येथे नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, असा हा आमचा व्यवहार पुष्कळच सढळ आहे. ४

१७४९ तडामोडी करा । परि उत्तम तें भरा ॥ १ ॥
जेणें खंडे एके खेपे । जाय तेथें लाभें वोपे ॥ २ ॥
दाविल्या सारिखें । मागें नसावें पारिखें ॥ ३ ॥
मागें पुढें ऋण । तुका म्हणे फिटे हीण ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा.–तडामोडी–मोडणे, खडे–खपे, वोपे–विकला जाईल, पारिखे–दुसरे, हीण–हीनत्व,दारिद्र्य.

अर्थः–घरातील काही महत्त्वाचे जिन्नस मोडा. त्यांचे पैसे करा, पण त्या द्रव्याने जे उत्तम असेल त्याचाच भरणा करा १ एका जन्मातच ज्यामुळे अनेक जन्मांच्या फेऱ्या संपतील व ज्याला तेथे लाभ होईल अशा रीतीने व्यापार करा. २ तुमची वागणूक नीट असावी जो माल दाखवाल तोच द्यावा ग्राहकाच्या पश्चात वेगळा अथवा दुसराच माल दाखवू नये. ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा प्रकारे वागाल तर तुमचे मागचेपुढचे ऋण फिटून दारिद्र्य दूर होईल. ४

---

[1] ढसाळ

१७५० नसावे ओशाळ । मग मानिती सकळ ॥ १ ॥
जाय तेथें पावे मान । चाले बोलिले वचन ॥ २ ॥
राहो नेदी बाकी । दान ज्याचे त्यासी टाकी ॥ ३ ॥
होवा[1] वाटे जना । तुका म्हणे साटीं गुणा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा -ओशाळ-मिधा, होवा-हवासा, साटींगुणा-गुणासाठी

अर्थ -कधी कुणाचे मिधे असू नये तरच सर्व लोक मान देतील १ जेथे तो जाईल तेथे त्याला मान मिळेल तो जे बोलेल त्याप्रमाणे लोक वागतील २ ज्याचे जे घेतले आहे, तो त्यास त्वरित परत देतो, काही बाकी उरू देत नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, असा हा मनुष्य आपल्या गुणामुळे लोकाना हवासा वाटतो ४

## ॥ अनघडसिद्धाच्या शद्बेंकरून रामेश्वरभटाच्या शरीरीं दाह जाला तो ज्यानें शमला तो अभंग ॥ १ ॥

१७५१ चित्त शुद्ध तरी शत्रु मित्र होती । व्याघ्र हे[2] न खाती सर्प तया ॥ १ ॥
विष तें अमृत आघात ते हित । अकर्तव्य नीत होय त्यासी ॥ २ ॥
दुःख तें देईल सर्व सुख फळ । होतील शीतळ अग्निज्वाळा ॥ ३ ॥
आवडेल जीवा जीवाचिये परी । सकळा अतरीं एक भाव ॥ ४ ॥
तुका म्हणे कृपा केली नारायणे । जाणिजेते येणे अनुभवे ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा -नीत-नीती, अतरीं-मनात

अर्थ -जर चित्त शुद्ध असेल तर शत्रूसुद्धा मित्र होतील. त्याला वाघ व सर्प यांच्यापासून भीती उरणार नाही, त्याला ते खाणार नाहीत १ विषसुद्धा अमृताप्रमाणे होईल आघात हिताप्रमाणे वाटेल त्याने अकर्तव्य केले तरी ते नीतिप्रमाण होईल २ जे दुःख आहे ते परिणामी सुख होईल आणि अग्निज्वालाही शीतल वाटतील ३ दुसऱ्याचे जीव स्वत च्या जीवाप्रमाणे आवडतील आणि सर्वांविषयी मनात एकच भाव उमटेल ४ तुकाराम महाराज म्हणतात, एकदा नारायणाने कृपा केल्यानतर त्याला असाच अनुभव येत राहील ५

विवरण -या एका अभगाच्या मागे तुकोबाच्या चरित्रामधील एका घटनचा सदर्भ सांगितला जातो वाघोली येथील रामेश्वरभटाला तुकारामबुवाची कीर्ती मानवली नाही जातीचा शूद्र असताना तुकाराम वेदाचे अर्थ प्राकृत भाषेत सागतात, ही गोष्ट त्याला खपली नाही त्याने तुकोबाना अभगाच्या वह्या इंद्रायणीच्या डोहात बुडवायला सांगितल्या तुकारामबुवानी ही आज्ञा शिरसावद्य मानून अभगाच्या वह्या नदीच्या डोहात बुडविल्या व आपण स्वत विठ्ठलच्या चितनात एका खडकावर मग्न झाले तुकारामबुवाच्या वह्या नदीत बुडाल्याचे समाधान मनात ठेवून रामेश्वरभट पुण्यास नागेश्वराच्या दर्शनास यावयास निघाले वाटेत भवानी पेठेतील एका मशिदीत अनगडशहा नावाच्या एका सिद्ध फकीराच्या तळ्यात रामश्वरभटाने स्नान केले आपल्या नमाजाच्या पाण्यास या ब्राह्मणाने स्नान करून बाटविले असे पाहून अनगडशहाने त्याला शाप दिला त्यामुळे रामश्वरभटाच्या अगाची भयकर आग होऊ लागली. कोणत्याही उपायाने ती आग कमी होइना, तेव्हा रामेश्वरभट आळदीस गेला तेथे ज्ञानेश्वराना शरण गेल्यावर त्यानी त्यास सुचविले की, 'श्रेष्ठ तुकारामाची निंदा तू केलीस, त्यामुळे हे दुःख तुला भोगावे लागते तेव्हा सद्भावाने तुकारामासच तू शरण जा' या जाणिवेनतर रामेश्वरभटास पश्चात्ताप झाला

१ व्हावा, २ ही

तुकोबांना आपण विनाकारण छळले, अशी चुटपुट त्याच्या मनास लागून त्याने तसा अर्थाचे एक पत्र तुकोबांना लिहिले. त्या पत्रास, उत्तर म्हणून तुकोबानी वरील अभंग लिहिला. 'होतील शीतळ अग्निज्वाळा' म्हणजे काय हे आता या संदर्भाने स्पष्ट होण्यासारखे आहे. या अभंगातील भाव ध्यानात येताच रामेश्वरभटाच्या अंगाचा दाह कमी झाला. तो त्यानंतर देहूस गेला व त्याने तुकारामांच्या चरणांवर नमस्कार केला. तुकोबांच्या संगतीत ते पुढे देहू येथेच राहू लागले. रामेश्वरभटाने या प्रसंगाचे तपशीलाने वर्णन आपल्या एका अभंगात केले आहे. तो अभंग असा–

" मासी मज आली रोकडी प्रचीत । होऊनि फजित दुःख पावे ॥
कांहीं द्वेष त्याचा करितां अंतरी । व्यथा या शरीरीं बहुत झाली ॥
ज्ञानेश्वरें मज केला उपकार । स्वप्नीं सविस्तर सांगितलें ॥
तुका सर्वश्रेष्ठ प्रिय आम्हां थोर । कां जे अवतार नामयाचा ॥
त्याची तुज काही घडली रे निंदा । म्हणोनि हे बाधा घडली तुज ॥
आतां एक करीं सांगेन तें तुज । शरण जाईं त्याला निश्चयेंसी ॥
दर्शनेंचि तुझ्या दोषा परिहार । होय तो विचार सांगितला ॥
तोचि हा विश्वास धरूनि मानसीं । जाय कीर्तनासी नित्यकाळा ॥
म्हणे रामेश्वर त्याच्या समागमें । जाले हें आराम देह माझें ॥ "

अशा रीतीने रामेश्वरभटाचा शाप तुकोबाच्या कृपेने दूर झाला, हे अनगडशहास समजताच आपला शाप दूर करणारा हा तुकोबा एवढा आहे तरी कोण? अशी जिज्ञासा त्याच्या मनात निर्माण झाली. अनगडशहा तुकोबांना भेटण्याच्या निमित्ताने देहूस येण्यास निघाला. वाटेत तो चिंचवडचे गणपतिभक्त चिंतामणी देव याना भेटला. त्यांच्या घरी जाऊन या फकिराने भिक्षा मागितली 'आपल्या हातातील कटोरा भरेल एवढे धान्य आपणांस द्यावे' अशी त्याने विनंती केली. कितीही धान्य ओतले तरी फकिराचा कटोरा काही भरेना. शेवटी चिंतामणी देवांनी एक सिद्धी निर्माण केली व तिच्या प्रभावाने अनगडशहाचा कटोरा भरल्यावर तो देहूस तुकोबाच्या घरी आला. तुकोबांच्या धाकट्या गंगू नावाच्या मुलीने मूठभर पीठ कटोऱ्यात टाकताच तो भरून गेला. तुकारामाच्या दर्शनाने तो संतुष्ट झाला. दोन दिवस राहून त्याने तुकोबाचे कीर्तन ऐकले.

१७५२ लाज वाटे मज मानिती हे लोक । हें तों नाहीं एक माझे अंगीं ॥ १ ॥
मोजूनि झिजलों मापाचिया परी । जाळावी हे थोरी लाभाविण ॥ २ ॥
कोंमळ कंटक तीक्ष्ण अगरीं । पोचट ते वरी अंगकांति ॥ ३ ॥
चित्रींचें लेप शृंगारिलें निकें । जीवेविण फिकें रूप त्याचें ॥ ४ ॥
तुका म्हणे दिसें वांयां गेलों देवा । अनुभव ठावा नाहीं तेणें ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – थोरी–मोठेपण, कंटक—काटा, लेप–चित्रकला.

अर्थ:– लोक मला माझ्या अंगी नसलेल्या गुणांबद्दल मान देतात त्यामुळे माझ्या मनास फार लाज वाटते हो. १ माप मोजणी करकरून झिजते ना ? तसा मी परमार्थासाठी झिजलो आहे मोजण्यात सर्व हयात गेली तरी मापास कसला लाभ होणार ? मला कसलाही लाभ झाला नाही तरी हे मोठेपण अंगी चिकटत आहे, त्याला आग लागो २ कोवळ्या काट्याचे टोक तीक्ष्ण दिसते, पण तेही वास्तविक तसे नसते. त्याची अंगकांती जरी प्रखर असली तरी त्याच्यावर पाय देताच ते पोचट असल्याचे ध्यानात येते ३ भिंतीवर काढलेली चित्रे चांगली शृंगारलेली असतात, पण त्यांच्यात जीव नसल्यामुळे त्याचे रूप फिकेच असते. ४ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तुमच्या कृपेचा अनुभव मला माहीत नसल्याने मी वायाच गेलो आहे ५

१७५३ बोलविसी माझें मुख[1] । परी या जना वाटे दुःख ॥ १ ॥
जया जयाची आवडी । तया लागीं तें चरफडी ॥ २ ॥
कठीण देतां काढा । जल्पे रोगी मेळवी दाढा ॥ ३ ॥
खाऊं नयें तेंचि मागे । निवारितां रडों लागे ॥ ४ ॥
वैद्या भीड काय । अतित्याई जीवें जाय ॥ ५ ॥
नये भिडा सांगों आन । पथ्य औषधा कारण ॥ ६ ॥
धन माया पुत्र दारा । हे तों आवडी नरका थारा ॥ ७ ॥
तुका म्हणे यांत । आवडे ते करा मात ॥ ८ ॥

शब्दार्थ व टीपा — जल्पे–तिटकारा करून, मेळवी दाढा–तोंड बंद करतो, अतित्याई–आततायी मनुष्य, भिडा–भिडेने. दारा–पत्नी, थारा–आश्रय, प्राप्ती मात–गोष्ट, वागणूक.

अर्थः— देवा, तू माझ्या मुखाने उपदेशात्मक शब्द बोलवितोस; पण या लोकांना ते फार दुःखाचे वाटतात १ ज्याला जे आवडते त्याच्यासाठी तो तडफडत असतो २ रोगी माणसास कडू काढा दिला तर तो त्याचा तिटकारा करून आपले तोंड मिटून घेतो. ३ वैद्याने जे खाऊ नये असे त्याला सांगितले असते तेच तो खात असतो मग ते निवारण्याची पाळी आली की रडायला लागतो. ४ वैद्याला कसली आली आहे भीड ? तो खरे तेच सांगणार; पण येथे आततायी मनुष्य जीव घालवूनच बसेल. ५ रोगी माणसाच्या भिडेने त्यास कधी भलते सलते खायला सांगू नये औषध घेतल्याचे सार्थक पथ्यामुळेच होत असते. ६ धनदौलत, मायाममता, पुत्र व पत्नी यांचे प्रेम यांच्या लोभाने नरकाची मात्र प्राप्ती होईल. ७ तुकाराम महाराज म्हणतात, असे मी तुम्हांला अनेक उपाय सांगितले आहेत, त्यांतील जे आवडतील त्याप्रमाणे तुमची वागणूक असू द्यावी. ८

१७५४ पतिव्रते आनंद मनीं । सिंदळ खोंचे व्यभिचारवचनीं ॥ १ ॥
जळो वर्म लागो आगी । शुद्धपण भलें जगीं ॥ २ ॥
सुख पुराणीं आचारशीळा । दुःख वाटे अनर्गळा ॥ ३ ॥
शूरा उल्हास अंगीं । गांढ्या मरण ते प्रसंगीं ॥ ४ ॥
शुद्ध सोनें उजळे अग्नीं । हीन काळें धांवे रंगीं ॥ ५ ॥
तुका म्हणे तोचि हिरा । घनघायें निवडे पुरा ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा — सिंदळ–वाईट चालीची स्त्री, खोंचे–कष्टी होते, आचारशीळा–सदाचारी लोकाना, अनर्गळा–दुराचारी लोकाना, गांढ्या– नामर्दास, भित्र्या माणसास, घनघायें–घणाच्या आघाताने

अर्थ :– कोणी व्यभिचाराची निंदा केली, त्याचा निषेध केला तर पतिव्रतेच्या मनास त्याचा फारच आनंद होतो, पण वाईट चालीच्या स्त्रीचे मन मात्र अतिशय खट्टू होते, कष्टी होते १ म्हणून अशा या अशुद्ध वर्तनास आग लागो. या जगात भलेपणाने, शुध्दत्वाने वागणे हेच उत्तम आहे २ सदाचारी लोकांनाच कथा-पुराण ऐकताना सुख वाटते, तर दुराचारी माणसास त्यामुळे दुःखच होते. ३ युद्धाच्या रणांगणावर जो शूर आहे, त्याचेच बाहू स्फुरण पावतात त्यालाच उल्हास वाटतो, तर जो भ्याड आहे त्याला तो प्रसंग मरणासारखा वाटतो. ४ अग्नीमध्ये जे शुद्ध सोने आहे तेच उजळून निघते, पण हीन धातू मात्र काळवंडून जातात ५ तुकाराम महाराज म्हणतात, घणाच्या आघातानी न फुटता जो टिकून राहतो तोच हिरा खरा मानायला हवा ६

[1] मुखें

१७५५ चालिती आड वाटा । आणिकां दाविती जे नीटा ॥ १ ॥
न मनीं तयांचे उपकार । नाहीं जोडा तो गव्हार ॥ २ ॥
विष सेवूनि वारी मार्गें । प्राण जातां जेणें संगें ॥ ३ ॥
बुडतां हाक मारी । ठाव नाहीं आणिकां वारी ॥ ४ ॥
तुका म्हणे न करीं हिका[1] । गुण घेऊन अवगुण टाका ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा:-- न मनीं-मानीत नाही, गव्हार-मूर्ख, वारी-निवारण करतो, हिका-हट्ट.

अर्थ :- आपण स्वत आडवाटेने जाऊन इतरांना जे सरळ वाट दाखवितात, १ त्यांचे उपकार जो मानीत नाही त्या मूर्खास कोठली तुलनाच नाही. २ आपण स्वतः हा मत्त मनुष्य विषप्राशन करतो व त्यापासून प्राण जात असताना दुसऱ्यांनी ते विष घेऊ नये म्हणून निवारण करीत असतो ३ खोल पाण्यात बुडत असताना काठावरील लोकांना तो हाका मारून सावध करतो, या पाण्याचा अंत लागत नाही असे म्हणून त्यांना सावध करीत असतो. ४ तुकाराम महाराज म्हणतात, कसलाही हट्ट आपण धरू नये जे जो कोणी सांगेल त्यांतील अवगुण टाकून गुण तेवढे घ्यावेत ५

१७५६ कुळींचें दैवत ज्याचें पंढरीनाथ । होईन दासीसुत त्याचे घरीं ॥ १ ॥
शुद्ध यातिकुळवर्णा चाड नाहीं । करीं भलते ठायीं दास तुझा ॥ २ ॥
पंढरीस कोणी जातो वारेकरी । होईन त्यांचे घरीं पशुयाति ॥ ३ ॥
विठ्ठलचिंतन दिवसरात्रीं ध्यान । होईन पायतन त्याचे पायीं ॥ ४ ॥
तुळशीवृंदावन जयाचे अंगणीं । होईन केरसुणी त्याचे घरीं ॥ ५ ॥
तुका म्हणे हाचि भाव माझ्या चित्तीं । नाहीं आणिकां गती चाड मज ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा -- चाड-इच्छा, पर्वा.

अर्थ :- पंढरीनाथ हे कुळदैवत ज्याच्या घरी आहे त्याच्या घरी मी त्याचा दासीपुत्र होऊनही राहीन. १ शुद्ध जातिकुळाची देवा, मला पर्वा नाही श्रेष्ठ वर्णाचीही इच्छा नाही. कोणत्याही जातीत जन्म दिलास तरी मला तुझा दास मात्र कर २ पंढरपुरला जाणारा जर कुणी वारकरी असेल तर मी त्याच्या घरी पशू होऊन त्याची सेवा करीन ३ ज्याच्या घरी अहोरात्र विठ्ठलाचे चिंतन होत असते, त्याच्या घरी मी त्याचा पायपोस, त्याचे पायतण होऊन राहीन ४ ज्याच्या अंगणात तुळशीचे वृंदावन आहे, त्याच्या घरी मी केरसुणी होऊन त्याचे अंगण स्वच्छ राखीन. ५ तुकाराम महाराज म्हणतात, हाच एक निष्ठेचा व सेवेचा भाव माझ्या चित्तात असून याखेरीज मला दुसरी इच्छा नाही ६

१७५७ अवघिया चाडा कुंटित करूनि । लावीं आपुलीच गोडी ।
आशा मनसा तृष्णा कल्पना । करूनियां देशधडी ।
मीतूंपणापासाव गुंतलों । मिथ्या संकल्प तो माझा तोडीं ।
तुझिये चरणी माझे दोन्ही पक्ष । अवघी करूनि दाखवीं पिंडी रे रे ॥ १ ॥
माझें साच काय केले मृगजळ । वर्ण याती कुळ अभिमान ।
कुमारी भातुकें खेळती कवतुकें । काय त्याचें साचपण ॥ २ ॥
वेगळाल्या भावें चित्ता तडातोडी । केली देशधडी मायाजाळें ।
गोत वित्त माय बाप बहिणी सुत । बंधुवर्ग माझीं बाळें ।

[1] हिरा

एका एक न धरी संबंध पुरलिया । पातलिया जवळी काळें ।
जाणोनियां त्याग सर्वस्वें केला । सांभाळीं आपुलें जाळें ॥ ३ ॥
एकां जवळी धरी आणिकां अंतरीं । तीं काय सोयरीं नव्हतीं माझीं ।
एकाचें पाळण एकासी भांडण । चाड कवणिये[1] काजीं ।
अधिक असे उणें कवण कवण्या गुणे । हे माव न कळेचि तुझी ।
म्हणोनि चिंतनीं राहिलों श्रीपती । तुका म्हणे भाक माझी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:-- वाढा-इच्छा, पिंडीं-देहाच्या ठिकाणी, साच-खरोखर, भातुके- भातुकलीचा खेळ, सुत-मुलगा, पुत्र, काजीं- कारणाने, माव-माया, भाक-वचन.

अर्थ :- देवा, माझ्या इतर सर्व इच्छा नाहीशा करून माझ्या मनास तू तुझी प्रीती जडीव. माझ्या मनातील आशा, इच्छा, कल्पना इत्यादी विकारांना देशोधडीला लाव मी व माझा देह वेगळा व तू वेगळा असा जो खोटा भाव आहे, त्यात मी गुंतलो असल्याने माझी ही वृत्ती तू मोडून काढ. मीतूपणाचे माझे दोन्ही पक्ष मी देवा, तुझ्याच चरणावर समर्पित केले आहेत. अशीच अनुभूती देवा, माझ्या देहासही येऊ दे. १ जात, वर्ण, कुळ याचा अभिमान मृगजळाप्रमाणे मिथ्या असून तो काय संसाराचा खरा प्रकार असतो काय? २ वेगवेगळे भाव मी मनात धारण केले म्हणून माझे चित्त तटातट तुटू लागते, त्याची ओढाताण झाली, या मायाजाळाने मला देशोधडीला लावले. नातेवाईक, संपत्ती, आई, बाप, बहीण, एकाचाही संबंध मला पुरा वाटला नाही काळाचे बोलावणे आल्यानंतर कोणाचाही संबंध उपयोगी झाला नाही, हे मी जाणले व सर्व संबंधाचा त्याग केला देवा, आता तू आपले हे मायारूपी जाळे नीट आवरून धर. ३ एखाद्यास आपल्याजवळ अधिक करावे, दुसऱ्यास दूर ठेवावे, खरे पाहता तो काय माझा संबंधी सोयरा नाही का? एकाचे पालन मी करावे व दुसऱ्याशी भांडण निर्मावे, असे करण्यात मला कोणते कारण आहे? एक अधिक, दुसरा कमी, असा भेद कोणत्या गुणामुळे होतो? ही तुझी देवा, माया मला कळतच नाही तुकाराम महाराज म्हणतात, देवा, म्हणूनच मी तुझ्या चिंतनातच केवळ राहिलो असे मी श्रीपती, तुला वचन देऊन सांगतो ४

१७५८ आणिकां छळावया जालासी शाहाणा । स्वहिता घातलें खानें[2] ।
आडिके पेंके करूनि सायास । कृपणें सांचलें धन ।
न जिरे क्षीर श्वानासी भक्षितां । याती तयाचा गुण ।
तारुण्यदशे अधम मातला । दवडी हात पाय कान ॥ १ ॥
काय जालें यांस वांयां कां ठकले । हातीं सांपडले टाकीतसे ।
घेउनि स्फटिकमणी टाकी चिंतामणी । नागवले आपुले इच्छे ॥ २ ॥
सिद्धीं सेविलें सेविती अधम । पात्रासारिखें फळ ।
सिंपिला मोतीं जन्मलें स्वाती । वरुषलें सर्वत्र जळ ।
कापुस पट नव्हेचि कारणा । तयास पातला काळ ।
तेंचि भुजंगें धरिलें कंठीं । मा विष जालें त्याची गरळ ॥ ३ ॥
भक्षूनि मिष्टान्न घृतसाकर । सहित सोलुनि केळें ।
घालुनियां घसां अंगोळिया । वाती करूं पाहे बळें ।
कुंथावयाची आवडी बोंबा[3] । उन्हवणी रडवी बाळें ।
तुका म्हणे जे जैसें करिती । ते पावती तैसींच फळें ॥ ४ ॥

१ कवणें ये २ खाणे ३ देवा

अर्थ –पंढरीनाथा, माझें प्रारब्ध अतिशय बलवान असल्याने तू त्याच्या भीतीनें दूर पळून जातोस १ जो पर्यंत मला जाणीव नव्हती, तोपर्यंत तू मला समजला नव्हतास, पण आता तुझे रूप समजले तू एकाचो सावणी करतोस, एकास लोकांच्यांत मान देतोस २ माझे प्रारब्ध मात्र फारच बळकट दिसते, प्रबळ दिसते त्याच्यापुढे तुझे काहीच चालत नाही आता मी तुला उगाच कोडे का घालावे? संकटात का टाकावे? ३ भोगाचे अधिपती असणारे माझे प्रारब्ध काही अजून तुला सापडत नाही, आटोपत नाही ते अनावरच राहते तर मग मी तुला उगाच शीण तरी देवा, कशास द्यावा? ४ तू माझ्यासाठी काहीच करीत नसलात तरी मी माझा हा भक्तीचा मार्ग मात्र सोडणार नाही मग मला कोणत्याही कुळात कोणताही जन्म येवो ५ माझ्या ठिकाणी असलेल्या दोषांना तू भितोस मी काही आशा धरून आहे याची तुला भीती वाटते तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तू याबद्दल कसलाच संकोच धरू नकोस ६

१७६३ लोकमान देहसुख । संपत्तिउपभोग अनेक ।
विटंबना दुःख । तुझिये भेटीवाचूनि ॥ १ ॥
तरी मज ये भेट ये भेट । काय ठाकलासी नीट ।
थोर पुण्यें वीट । तुज दैवेचि लाधली ॥ २ ॥
काय ब्रह्मज्ञान करूं कोरडें । रितें मावेचे[1] मापाडें ।
भेटीविण कुडें । तुझिये अवघें मज वाटे ॥ ३ ॥
आत्मस्थितीचा विचार । काय करूं हा उद्धार ।
न देखता धीर । चतुर्भुज मज नाहीं ॥ ४ ॥
रिद्धिसिद्धी काय करूं । अथवा अगम्य[2] विचारु ।
भेटीविण भारु । तुझिये वाटे मज याचा ॥ ५ ॥
तुजवाचूनि काहीं व्हावें । ऐसे नको माझिया जीवे ।
तुका म्हणे द्यावे । दरुषण पायाचे ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा — लोकमान–लोकाकडून मान, सन्मान रितें–रिकामे, मावेचे–मायेचे, कुडें–वाईट दरुषण–दर्शन

अर्थ –देवा, लोकाकडून, संपत्तीचा उपभोग देहसुख या सर्वांपासून तुझ्या भेटीशिवाय मला दुःखच वाटते, विटंबना झाल्यासारखी वाटते १ तरी देवा, तू ये व मला त्वरित भेट दे उगाच नुसताच उभा काय राहिला आहेस? मोठ्या पुण्याईने तुला उभे राहण्यासाठी ही वीट मिळालेली आहे २ देवा, तुझ्या भेटीशिवाय ब्रह्मज्ञानाचा लाभ कोरडाच वाटतो तुझ्या भेटीशिवाय हे ब्रह्मज्ञान म्हणजे कोरड्या मायचे रिकामे व वाईट मापच वाटते त्याचा मला काहीच उपयोग नाही ३ आत्मस्थितीचा व उद्धाराचा विचार याना घेऊन मी काय करू? तुमचे चतुर्भुज रूप पाहिल्याशिवाय मला धीर वाटणार नाही ४ रिद्धीसिद्धींना घेऊन मी काय करू? अथवा अगम्य अशा शास्त्रविचाराचा मला काय उपयोग? देवा तुझ्या भेटीशिवाय मला हा सर्व भारच वाटतो ५ तुकाराम महाराज म्हणतात, देवा तुझ्या प्राप्तीवाचून मला काही मिळावे असे वाटतच नाही यासाठी देवा, मला तुमच्या पायाचे दर्शन द्यावे ६

१७६४ तुझा म्हणवून तुज नेणें । ऐसे काय माझें जिणे ॥ १ ॥
तरि मज कवणाचा आधार । करोनिया राहो धीर ॥ २ ॥

[1] मायाचे [2] आगम

काय शब्दींचि ऐकिला । भेटी नव्हता[१] गा विठ्ठला ॥ ३ ॥
तुका म्हणे आतां । अभय देईं पंढरिनाथा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – नेणे–जाणत नाही

अर्थ –देवा, मी तुझाच आहे असे म्हटले जात असूनही मी तुला जाणीत नाही, अशा अवस्थेचे माझे जगणे कशासाठी आहे ? १ तर मग मला आधार तरी कुणाचा आहे ? कुणाच्या आधारावर मी धीर धरून राहू ? २ विठ्ठला, तुझी जर भेट झाली नाही, तर तू दीनवत्सल आहेस, पतितपावन आहेस सर्वव्यापी आहेस, असे नुसते शब्दच ऐकून काय उपयोग ? ३ तुकाराम महाराज म्हणतात आता पंढरीनाथ, मला अभयाचे स्थान तू द्यावेस

१७६५ उद्धवअक्रूरासी । आणीक व्यासआंबऋषी ।
रुक्मांगदप्रल्हादासी । दाविले तें दाखवीं ॥ १ ॥
तरि मी पाहेन पाहेन । तुझे श्रीमुखचरण ।
उताविळ मन । तयाकारणे तेथें ॥ २ ॥
जनकश्रुतदेवा करीं । कैसा शोभलासी हरी ।
विदुराच्या घरीं । कण्या धरी कवतुके ॥ ३ ॥
पांडवा अकांतीं । तेथें पावसी[२] स्मरती ।
घातले द्रौपदी । यागीं बिरडें चोळीचे ॥ ४ ॥
करी गोपीचें कवतुक । गाईगोपाळांसी सुख ।
दावीं तेचि मुख । दृष्टी माझ्या आपुले ॥ ५ ॥
तरि तू अनाथाचा दाता । मागतियां शरणागतां ।
तुका ह्मणे आतां । कोड पुरवीं हे माझें ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा –– रुक्मांगद–ऋतुध्वजाचा मुलगा, विदुर– पांडवांचा सखा, अकांतीं–संकटाच्या वेळी, यागीं– राजसूय यज्ञाच्या वेळी कोड इच्छा

अर्थ –देवा उद्धव अक्रूर व्यास, आंबऋषी रुक्मांगद व प्रल्हाद अशा भक्तांना तुम्ही जे दर्शन दिले तेच मला तू द्यावेस १ मी तुमचे तेच श्रीमुख व चरण मोठ्या आवडीने पाहीन माझे मन त्यासाठीच भारी उतावीळ बनले असून ते तेथेच जडून राहिले आहे २ श्रुतदेव जनकराजाच्या घरी जाऊन तुम्ही त्यांना मदत केली तुम्ही तर्थे शोभून दिसलात विदुराच्या घरच्या कण्याही मोठ्या आवडीने भक्षण केल्या. ३ पांडवांच्यावर संकट पडले तेव्हा त्यांनी स्मरण करताच देवा तू त्यांच्या मदतीला गेलास, राजसूय यज्ञाच्या वेळी वाढीत असताना द्रौपदीच्या चोळीचे बिरड सुटले ते तू बांधलेस ४ गोकुळातील देवा तू गोपिकांचे कौतुक केलेस तुमचे श्रीमुख पाहून तेथील गाई गोपाळांना जे सुख झाले तेच मुख मला माझ्या डोळ्यांनी पाहायचे आहे ५ तुकाराम महाराज म्हणतात, देवा तू अनाथांचा नाथ आहेस जे शरण येऊन मागणी करतात त्यांच्यावर तू कृपा करतोस तेव्हा तू माझीही इच्छा पूर्ण करावीस ६

शब्दार्थ व टीपा — खानें–चोरीस, आडके–पैसा, सायास–प्रयत्न, क्षीर–दूध, सिद्धीं–साधुसंतांनी, गरळ–विष, अंगोळिया–बोटे, वोंवा–व्यर्थ. उन्हवणी–ऊन पाणी.

अर्थ.–तू दुसऱ्याचा छळ करण्यात मोठा शहाणा झाला आहेस. पण यामुळे तू आपले स्वहित चोरीस घातले आहेस. एखाद्या कृपणाने एक पैसा पैसा करून पुष्कळ प्रयत्न केला व धनसंचय वाढविला, पण त्याचा त्याला उपयोग होत नाही. कुत्र्याला दूध पाजले तरी ते त्याला जिरत नाही. कारण हा त्याचा जातिस्वभावच आहे. त्याप्रमाणे हा अधम मनुष्य तारुण्य प्राप्त झाल्यामुळे मदमत्त होऊन गेला असून आपले हात, पाय, कान इत्यादी इंद्रिये वाया घालवीत आहे. १ अशा लोकांना काय झालेले असते ? अशा प्रकारे हे टिकले कसे गेले ? हातांमध्ये चांगली मनुष्यदेहासारखी वस्तू येऊनही ती यांनी का टाकलेली असते ? चिंतामणीप्रमाणे असणारी वस्तू देऊन यांनी स्फटिकाचा मणी घेतला व आपल्याच इच्छेने तो नागवला गेला २ पूर्वी कुणी साधुसंतांनी किंवा सिद्ध पुरुषांनी सेवन केलेल्या पदार्थांचेच सेवन हे लोक करीत असतात, पण त्याची फलप्राप्ती अधिकाराप्रमाणेच होत असते. स्वातीच्या नक्षत्राच्या पाण्याचा वर्षाव सर्वत्र सारखाच होत असला तरी ते शिंपल्यात पडले तर त्याचा मोती बनतो. तेच कापसाच्या रोगांवर पडले तर त्याचा नाश होतो सर्पांनी त्याचे सेवन केले तर त्याचेच विष बनते. ३ तुपसाखरेने मिश्रित असलेले पक्वान्न व सोललेली केळी यांचे भोजन केल्यानंतर घशात बोटे घालून हे ओकून टाकतील असे आचरण करतात. कारण यांना नेहमी व्यर्थ कुथायचीच सवय असते ऊन पाण्यामुळे लहान मुले जास्तच रडतात. तुकाराम महाराज म्हणतात, जे लोक जशी कर्मे करतात, तशी त्यांना फळे मिळतात. ४

१७५९ चंदनाचे गांवीं सर्पांची वसति । भोगिती ते होती द्वीपांतरीं ॥ १ ॥
एका ओझें एका लाभ घडे देवा । संचिताचा ठेवा वेगळाला ॥ २ ॥
क्षीराची वसति अशुद्ध सेवावें । जवळी तें जावें भोगें दुरी ॥ ३ ॥
तुका म्हणे ऐसी बुद्धि ज्याची जड । त्याहुनी दगड बरे देवा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:— संचिताचा–पूर्वकर्माचा, प्रारब्धाचा, क्षीराची—दुधाची, जड–मद.

अर्थ –चंदनाच्या झाडावर सर्पाची वसती असली तरी त्यांना सुगंधाचा लाभ होत नाही जे फार दूर असतात त्यांनाच त्या सुगंधाचा लाभ होतो १ याप्रमाणे देवा, एकाने ओझे वहावे आणि दुसऱ्याने त्याचा लाभ घ्यावा अशी स्थिती प्रारब्धामुळेच होत असते २ गाईच्या स्तनांजवळच गोचीडाची वसती असते, पण तिला जन्मभर रक्तच प्राशन करावेसे वाटते व त्या दुधाचा उपयोग दूर असणाऱ्या लोकांनाच होतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशी या गोचिडप्रमाणे ज्याची बुद्धी मद आहे, त्यांच्यापेक्षा दगड झालेले देवा बरे वाटते ४

१७६० तुज दिलें आतां करीं यत्न याचा । जीवभाववाचाकायामन[1] ॥ १ ॥
भागलो दातारा सीण जाला भारी । आतां मज तारीं शरणागता ॥ २ ॥
नेणतां सोसिली तयाची आटणी । नव्हतां ही कोणी कांहीं माझीं ॥ ३ ॥
धर्म नेणें दिशा हिंडती मोकट[2] । इंद्रियें सुनाट दाही दिशा ॥ ४ ॥
येरझारीफेरा[3] सिणलों सायासीं । आतां हृषीकेशी अंगिकारीं ॥ ५ ॥
तुका म्हणे मन इंद्रियांचे सोई । धांवे यासी काई करूं आतां ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा:— सीण–त्रास, आटणी–खटपट, प्रयत्न, मोकट–मोकाट, स्वैरपणाने

अर्थ –देवा, मी आता माझा जीव, कायावाचामनेंकरून तुला अर्पण केला आहे. तू आता त्याचे वाटेल ते करून रक्षण कर. १ दातारा, मी आता फार शिणून गेलो आहे. मला भारी श्रम झाले आहेत. तू मला, या शरणागताला आता तारावेस. २ माझे हे कुणी संबंधित नसताना मी त्यांना सांभाळण्याचा आणि पोसण्याचा खटाटोप

---

१ मनें २ मोकाट ३ येरझारी

केला, श्रम घेतले. ३ देवा, तुझ्या भक्तीचे वर्म न ओळखल्याने माझी इंद्रिये सर्व दिशांनी व्यर्थच भटकू लागली आहेत. ४ हृषीकेशा, या जन्ममृत्यूंच्या फेऱ्यांनी मी फारच दमली आहे आता तू माझा स्वीकार करावास. ५ तुकाराम महाराज म्हणतात, हे माझे मन इंद्रियांच्या ओढीने सतत धावत असते. आता याला मी काय करू ? ६

१७६१ स्वयें पाक करी । संशय तोचि धरी । संदेहसागरीं । आणीक परी बुडती ॥ १ ॥
जाणे विरळा एक । जालें तेथींचें हें सुख । देखिले बहुतेक । पुसतां वाट चुकले ॥ २ ॥
तोचि जाणे सोंवळें । शोधी विकल्पाचीं मुळें । नाचती पाल्हाळें । जे विटाळें कोंडिले ॥ ३॥
तोचि साधी संधी । सावध त्रिकाळ जो बुद्धी । संदेहाचा संधी । वेठी आणीक धरियेले ॥ ४ ॥
अखंड तें ध्यान । समबुद्धि समाधान । सोग वांयांविण । ते झांकून बैसती ॥ ५ ॥
करणे जयासाठीं । जो नातुडे कवणे आटी । तुका म्हणे साटी । चित्तवित्तेंवांचूनि ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा — संदेहसागरीं-संशयाच्या समुद्रात, आटी-परिश्रमाने.

अर्थ –स्वत:च्या हाताने स्वयपाकाची सिद्धता करणाराच जर संशय बाळगणारा असेल तर संशयाच्या सागरात तो इतरांनाही पार बुडवून टाकील १ ईश्वराच्या प्रीतीचे सुख जाणणारा क्वचितच एखादा असतो इतर पुष्कळ लोक चुकलेल्या वाटानीच जाणारे मी पाहिले आहेत २ जो नाना विकल्पाची मूळे शोधून काढतो, तोच सोवळा समजावा व जे नुसता बाह्य पसारा दाखवितात ते विटाळाने भरलेले आहेत असे समजावे. ३ जो त्रिकाळ सावध असतो, तोच स्वसुखाची या आत्मप्राप्तीची संधी साधतो, पण जे संशयाच्या संधीत पडले त्याना कुणीतरी वेठीस धरल्याप्रमाणेच त्यांची स्थिती होत असते ४ समबुद्धीने, समाधानाने जे ईश्वराचे अखंड ध्यान धरतात तेच खरे आहे जे नुसतेच डोळे झाकून घेऊन सोंग करतात, त्याचे सर्वत्र वागणे वाया गेलेले असते ५ जो परमार्थाचा विचार करायचा असतो तो या देवासाठी असल्याने इतर कोणतेही परिश्रम केले तरी तो प्राप्त होत नाही आपले सर्व चित्त, वित्त त्याला अर्पण केल्याशिवाय त्याची प्राप्ती होत नाही ६

१७६२ माझिया संचिता । दृढ देखोनि बळिवंता ।
पळसी पंढरिनाथा । भेणें आतां तयाच्या ॥ १ ॥
तरि मज कळलासी । नव्हतां भेटी जाणीवेसी ।
एक संपादिसी । मान करिसी लोकांत ॥ २ ॥
तरि हें प्रारब्ध जी गाढें । कांहीं न चले तयापुढें ।
काय तुज म्यां कोडें । रे सांकडें घालावें ॥ ३ ॥
भोगधीपति[1] क्रियमाण । तें तुज नागवे आझून ।
तरि का वांयांविण । तुज म्यां सीण करावा ॥ ४ ॥
तुज नव्हतां माझें कांहीं । परि मी न संडीं भक्तिसोई ।
हो कां भलत्या ठायीं । कुळीं जन्म भलतैसा ॥ ५ ॥
तू भितोसि माझिया दोषां । कांहीं मागणें ते आशा ।
तुका म्हणे ऐसा । कांहीं न धरीं संकोच ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा — संचिता-प्रारब्धास, भेणे-भीतीने, गाढें-बलवान, प्रबळ, सांकडें-संकट, नागवे-आटोपत नाही, अनावर होते.

१ भोगाधिपति

एकादशीच्या व्रतावर याची निष्ठा विशेष प्रकारची होती. हे रुक्मांगदाचे व्रत भ्रष्ट व्हावे म्हणून ब्रह्मदेवाने मोहिनीस मंदार पर्वतावर पाठविले. रुक्मांगदही या वेळी या पर्वतावर शिकारीसाठी आला होता. तिच्याशी विवाह करण्याचे याने ठरविले. हिने एकदा याला एकादशी व्रत मोडण्याचा प्रेमळ आग्रह केला. त्याने ते म्हणणे नाकारल्यावर तिने त्याच्या मुलाच्या शिराची मागणी केली. त्यास तो कबूल झाला. मुलावर तलवार घालणार तोच श्रीविष्णू तेथे प्रकट झाले व त्यांनी तो अनर्थ वाचविला अशी कथा नारदपुराणात दिली आहे

१७६६ मागता भिकारी जालों तुझे द्वारीं । देईं मज हरि कृपादान ॥ १ ॥
प्रेम प्रीति नाम उचित करावें । भावें संचरावें हृदयामाजी ॥ २ ॥
सर्वभावें शरण आलो पांडुरंगा । कृपाळु तूं जगामाजी एक ॥ ३ ॥
तापत्रयें माझी तापविली काया । शीतळ व्हावया पाय तुझे ॥ ४ ॥
संबंधीं जनवाद पीडलो परोपरी । अंतरलो दुरी तुजसी तेणें ॥ ५ ॥
तुका म्हणे आतां तुझा शरणागत । करावें सनाथ मायबाप ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा — काया–शरीर, जनवाद– जनापवाद

अर्थ –देवा, मी आता भिकारी होऊन तुमच्या दारात आलो आहे तरी तू मला तुझ्या कृपेचे दान करावेस १ तुमचे प्रेम, तुमचे नाम याच्याविषयी अखंड आवड, रुची तू माझ्या मनात निर्माण करावीस, माझ्यात श्रद्धेने तुम्ही प्रवेश करावा २ पांडुरंगा, मी सर्व भावाने शरण आलो आहे, या जगामध्ये तूच एक कृपाळू आहेस ३ देवा, त्रिविध तापाने माझे शरीर आता तापून गेले आहे तुझ्या पायाच्या कृपेने ते शीतळ होऊन जाईल. ४ नातेवाईक व जनलोक यांच्या त्रासाने, जनापवादाने मी फार पीडित झालो असून त्यामुळे तुला मात्र मी अंतरलो आहे ५ तुकाराम महाराज म्हणतात, मी हा आता तुलाच शरण आलेलो असून मायबापा, तू मला सनाथ कर ६

१७६७ भाव नाहीं काय मुद्रा वाणी । बैसे बगळा निश्चळ ध्यानीं ॥ १ ॥
न मनी नाम न मनी त्यासी । वाचाळ शब्द पिटी भासी ॥ २ ॥
नाहीं चाड देवाची काहीं । छळणें टोके तस्करघाई ॥ ३ ॥
तुका म्हणे त्याचा संग । नको शब्द स्पर्शअंग ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा— न मनी– मानीत नाही, चाड–पर्वा, तस्करघाई– चोराप्रमाणे, टोके– इच्छिती.

अर्थ –ज्याच्या अंतःकरणात ईश्वराविषयी भाव नाही, पण जो बाहेरून मुद्रा वगैरे लावून शृंगार करतो, वाणीचे विलास करतो त्याचा काय उपयोग? बगळ्याच्या निश्चल ध्यानाप्रमाणेच याचे वागणे असते १ हा नामाला सुद्धा मानीत नसल्यामुळे मी त्याला कधीच मान देणार नाही हा नुसताच शाब्दिक वाचाळपणा करून बडबड करीत असतो २ याला कधी देवाची पर्वा वाटत नाही एखाद्या चोराप्रमाणे हा दुसऱ्याच्या टेंप्याची इच्छा करून असतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा माणसाची संगत मला मुळीसुद्धा नको त्याच्याशी भाषण करण्याचाही प्रसंग माझ्यावर कधी येऊ नये, देवा ४

१७६८ दिनदिन शोक वाटे । आयुष्य मेणवता गाडें ॥ १ ॥
कैसीं भुललीं बापुडीं । दमविषयाचे साकडीं ॥ २ ॥
विसरलीं मरण । त्याची नाहीं आठवण ॥ ३ ॥
देखत देखत पाहीं । तुका म्हणे आठव नाहीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा—दिनदिन– दिवसदिवस, गाडें– मोजावे, साकडीं–संकटात, आठव– स्मरण

अर्थः–माझे हे मोलाचे आयुष्य संपून वाया जाते अशी मजाणताच मला दिवसेंदिवस शंका येत आहे १ दीन लोक इंद्रियविकांच्या लोभामुळे कसे भुलून गेले आहेत ! हे सर्व लोक दंभ व विषय याच्या संकटात सापडले आहेत २ स्वतःस पुढे मरण येणार असल्याचेच हे लोक विसरून गेले आहेत त्याची आठवण सुद्धा यांना नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, लोकांचे मरण पाहूनही हे लोक सावध होत नाहीत ४

१७६९ माझें मज आतां न देखें निरसतां । ह्मणऊन आधार केला ।
संसाराची आस सांडुनि लौकिक । जीव भाव तुज दिला ।
नव्हतीं माझीं कोणी मी कवणांचा । अर्थ मोहो साडवला ।
तारीं मारीं करीं भलतें दातारा । होऊन तुझा आतां ठेलों रे ॥ १ ॥
असो माझें कोडें तुज हें सांकडें । मी असेन निवाडें सुखरूप ।
बाळकासी चिंता काय पोटवेथा । जया शिरीं मायबाप ॥ २ ॥
पापपुण्यें श्रुति आटिल्या । शास्त्रांस न लगेचि ठाव ।
विधिनिषेधें गोविलीं पुराणें । वेदासी तो अहंभाव ।
ओंकाराचें मूळ व्यापिलें माया । तेथें न धरेच[1] भाव ।
ह्मणऊन कावाड सांडिलें उपसतां । धरिलें तुझेंचि नांव ॥ ३ ॥
तनमनइंद्रियें ठेवूनि राहिलों । सर्व आशा तुझे पायीं ।
तप तीर्थ दान करवूं कवणा । हातीं अधीन तें मन काई ।
आह्निक्यें परत्रें चाड नाहीं सर्वथा । जन्म सदा मज देईं[2] ।
मायामोहपाश करीं विष तैसे । तुका ह्मणे माझ्याठायीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा.– निरसता–दूर करण्याचे, कावाड–श्रम, आह्निक्ये–इहलोकाची

अर्थ– देवा, माझ्या मीपणा दूर करण्याचे मी जाणत नाही म्हणून मी तुझा आश्रय केला आहे सर्व संसाराची आशा व लौकिक टाकून देऊन मी आपला जीवभाव तुम्हांला अर्पण केला, आता देहासंबंधी माझी कोणी नव्हेत, आणि मीही कोणाचा नव्हे, त्या विषयांची इच्छा व मोह टाकला, आता मी तुमचा होऊन राहिलो आहे, दातारा, माझा उद्धार करा अगर मारा, पाहिजे ते करा १ आता मजविषयींचे हे सर्व तुमच्या मस्तकी असो, मी तुमच्या जिवावर निश्चयाने सुखरूप राहीन, बालकाच्या शिरावर आईबाप असल्यावर त्याला पोटाची आणि चिंता करण्याचे कारण नाही २ तुमच्या स्वरूपाचा शोध वेदश्रुतींच्या आधाराने जर करावा, तर त्या श्रुती पापपुण्याच्या वाटा घाटीत आल्या आहेत शास्त्रालाही शोध लागत नाही विधिनिषेधाच्या वाटा घाटीत सर्व पुराणे गुंतली आहेत व वेदाचे ठिकाणी जाणीवेचा अहंभाव आहे, आणि ओंकाराचे मूलस्थान मायेने व्यापिले आहे, म्हणून तेथे श्रद्धा बसत नाही याकरिता हे सर्व कावाड टाकून देऊन मी निश्चयाने तुमचे नामच कंठी धरिले आहे ३ माझे शरीर, सर्व इंद्रियांसहित मनही तुमच्या पायावर ठेऊन, तुमच्या पायाचीच आशा धरली आहे आता तप, तीर्थ, दानादी साधने मी कोणाचे हातून करू ? माझे स्वाधीन काय राहिले आहे ? मला इहलोकची अगर परत्राची गरज राहिली नाही, तुमची सेवा करण्याविषयी मला सर्व काळ जन्म द्या तुकाराम महाराज म्हणतात, मोहमायासंबंधी जे पाश आहेत, ते माझ्या ठिकाणी विषासारखे करा ४

१७७० तुझें नाम गोड नाम गोड । पुरे कोड सकळ ही ॥ १ ॥
रसना येरा रसा विटे । घेतां घोट अधिक हे ॥ २ ॥
आणिका रसे मरण गांठी । येणें तुटी ससारें[3] ॥ ३ ॥
तुका म्हणे आहार जाला । हा विठ्ठला[4] आम्हांसी ॥ ४ ॥

---

१ धरवे, २ देही, ३ संसारा ४ विठ्ठल,

शब्दार्थ व टीपाः— कोड–इच्छा, रसना–जीभ, येरां–इतर, दुसऱ्या

अर्थः– देवा, तुझे नाम अति गोड गोड आहे रे. या नामामुळे मनातील सर्व इच्छा पूर्ण होतात. १ इतर दुसऱ्या रसाचे सेवन केल्यास जिभेला वीट येतो, म्हणून या नामाचा घोटच अधिक घ्यावा हे बरे. २ इतर रसांच्या सेवनाने मरणच पदरी असेल, पण या नामरसाने संसारबंधने संपून जातात. ३ तुकाराम महाराज म्हणतात, विठ्ठलनामाचा आस्वाद हाच आमचा आहार बनला आहे. ४

१७७१ धालों सुखें ढेंकर देऊं । उमटें जेवूं तोंवरी ॥ १ ॥
क्रीडा करूं निरंजनीं[1] । न पुरे धणी हरिसवें ॥ २ ॥
अवघे खेळों अवघ्यामधीं । डाईं न पडो ऐसी बुद्धि ॥ ३ ॥
तुका म्हणे वांचवितां[2] । आम्हां सत्ता समर्थ ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपाः– धालों–संतुष्ट झालो निरंजनीं–एकांतात. धणी–तृप्ती, डाईं–डावात

अर्थः— या श्रीहरीच्या नामाने आम्ही तृप्त झालो आहोत. या तृप्तीचे ढेंकर आम्ही देऊ अशी तृप्ती उमटेपर्यंत आम्ही श्रीहरीच्या नामामृताचे भोजन करू. १ या हरीबरोबर आम्ही एकांतवासात निरंतर क्रीडा करू. श्रीहरीबरोबर क्रीडा करीत असताना आमची तृप्तीच कधी होत नाही. २ आम्ही सर्वांच्या बरोबर खेळ खेळू, डावात मात्र हरणार नाही, अशी आमची बुद्धी आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, विठ्ठलाची सत्ता आम्हांस वाचविण्यास समर्थ आहे. ४

१७७२ एकल्या नव्हे खेळ चांग । धरिला संग म्हणऊनि ॥ १ ॥
उमटे तेव्हां कळे नाद । भेदाभेद निवडेना ॥ २ ॥
दुसरा परी एक ऐसा । न वजे रिसा निकुरें ही ॥ ३ ॥
तुका म्हणे कळत्यां कळे । येर खेळे खेळ म्हूण ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – एकल्या–एकत्वात असताना, एकटे असताना, संग–सोबत, रिसा–त्रासाने, निकुरेंही–निकराने, निश्चयाने.

अर्थः—एकटे असताना खेळ कधीच चांगला होत नाही. म्हणून समभावाच्या वैष्णवांची मी संगत जोडली १ कोणतेही वाद्य वाजू लागल्यावरच नाद ऐकू येतो व त्यामुळे त्या वाद्याचे स्वरूप समजते. त्याशिवाय वाद्यांचे निरनिराळे प्रकार समजणार नाहीत २ एक दुसऱ्याप्रमाणेच असतो, पण निश्चयाने पराक्रम केला व कितीही त्रास घेतला तरी तो दुसऱ्याची बरोबरी करू शकत नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, हा प्रकार जे शहाणे आहेत त्यांनाच समजेल इतरांना तो खेळच वाटेल. ४

१७७३ बोलविलें जेणें । तोचि याचें[3] गुह्य जाणे ॥ १ ॥
मी तों कायाडाचा धनी । जेवूं मागावें यिकोनि ॥ २ ॥
मजुराच्या हातें । माप जालें गेलें रितें ॥ ३ ॥
जाला पुरविता । पांडुरंग माझा पिता ॥ ४ ॥
मायबापासवें । बाळें कौतुकें खेळावें ॥ ५ ॥
जैसा करितो धंदा । तैसा पडोनियां छंदा ॥ ६ ॥
त्याच्या साच गाई म्हैसी । येणें खेळावें मातीशीं ॥ ७ ॥
तुका म्हणे बोल । माझा बोलतो विठ्ठल ॥ ८ ॥

---

१ निरांजनी २ वाचवीत, ३ त्याचे

शब्दार्थ व टीपा:– गूह्य–मर्म, रहस्य, काबाडाचा–श्रमाचा, कष्टाचा, धिकोनी–रडून, रितें–रिकामे, साच–खऱ्या.

अर्थ:– ज्या विठ्ठलाने मला बोलाविले अथवा बोलते केले तोच त्यातील रहस्य जाणू शकतो. १ मी केवळ श्रमाचाच धनी असून रडून भाकन आईबापाजवळ जेवायला मागावे एवढेच मला समजते. २ मजुराच्या हाताने धान्याचे माप घातले तरी शेवटी माप रिकामे झाल्यावर मजूरही रिकामाच राहतो. ३ माझा बाप पांडुरंग माझ्या सर्व वासना पूर्ण करणारा झाला आहे ४ आईबापाबरोबर मूल कौतुकाने व निर्भयतेने खेळत असते ५ ते जसा धंदा करतील तसाच छंद आम्हांत जडून आम्ही त्याचे अनुकरण करतो ६ आईबापाच्या गाईम्हशी खऱ्याखुऱ्या असतात, पण मुले मात्र मातीच्या गाईम्हशी करून त्यांत रमतात ७ तुकाराम महाराज म्हणतात, माझे सर्व बोल तो विठ्ठलच बोलवितो. ८

१७७४ कां हो तुम्ही माझी वदविली वाणी । नेदा हे निवडूनि पांडुरंगा ॥ १ ॥
आणीक त्यां कोणां पुसावा विचार । मुळीं[1] संवसार दुराविला ॥ २ ॥
स्वामिसेवा म्हूण घेतली पदरीं । सांगितलें करीं कारण तें ॥ ३ ॥
तुका म्हणे नाहीं शिकविलें जेणें । तो याच्या वचनें उगा राहे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा.– नेदा–देत नाही ? म्हूण–म्हणून, कारण–काम.

अर्थ:–अहो पांडुरंगा, तुम्ही माझी वाणी का वदविली, हे मला अजून समजावून का सांगत नाही ? १ आम्ही आमचा संसार मुळापासून दूर केल्यामुळे आता तुमच्याखेरीज आम्ही कुणाचा हो विचार घ्यावा ? २ स्वामींची सेवा घडेल या हेतुने मी या वाणीस पदरी घेतले असून तुम्ही सांगितलेले काम देवा, मी करीत आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, याखेरीज दुसरे काही तुम्ही शिकविले नाही, तोपर्यंत आम्ही त्याच्या वचनावर विश्वास ठेवून स्वस्थ राहू. ४

१७७५ सेवकासी आज्ञा स्वामीची प्रमाण । जोंवरी[2] हा प्राण जाय त्याचा ॥ १ ॥
आणिकांचा धाक न धरावा मनीं । निरोपावचनीं[3] टळों नये ॥ २ ॥
समय सांभाळूनि आगळें उत्तर । द्यावें भेदी वज्र तयापरी ॥ ३ ॥
तुका म्हणे तरी म्हणवावें सेवक । खादलें तें अन्न हक होय ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – टळों नये–चुकू नये, अंतर पडू देऊ नये

अर्थ.– स्वामीची अथवा धन्याची आज्ञा प्रमाण मानून सेवकाने असावे प्राण जाईपर्यंत त्याने त्याची आज्ञा मानली पाहिजे. १ या कामी दुसऱ्या कुणाचाही धाक त्याने मनात आणू नये आणि स्वामीचा निरोप सांगण्यात चुकू नये. २ स्वामीकडून जर प्रसंगी भलतेच घडले तर त्यास वज्राप्रमाणे भेदणारे उत्तर द्यावे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, असा असेल त्यालाच सेवक म्हणावे अशाच सेवकाला स्वामीचे अन्न खाण्याचा हक आहे ४

१७७६ नये पुसों आज्ञा केली एकसरें । आम्हांसी दुसरें आतां नाहीं ॥ १ ॥
ज्यांचे[5] तो बळिवंत सर्व निवारितां । आम्हां काय चिंता करणें लागे ॥ २ ॥
बुद्धीचा जनिता विदयाचा व्यापक । काय नाहीं एक अंगीं तया ॥ ३ ॥
तुका म्हणे मज होईल यारिता । तरी काय सत्ता नाहीं हातीं ॥ ४ ॥

१ समुळीं, २ जोंवरी, ३ निरोपावांचूनि, ४ हाव अन्न, ५ ज्याचा.

शब्दार्थ व टीपा:—घडी–वेळेस, चाड–कौतुक, आवड.

अर्थ:— देवा, मी माझ्या मुखाने तुझे नाव मोठ्या प्रेमाने न घेईन तर माझी जीभ झडून जावो. १ हीच देणगी मला देवा, तुम्ही द्यावी अशी माझी मागणी आहे. मी याखेरीज दुसरे काहीही तुला मागत नाही. २ तुझी कीर्ती मी जर ऐकिली नाही तर माझे कान देवा, बहिरे होवोत आणि तुझे पाय जर पाहाता आले नाहीत तर माझे डोळेही जावोत. ३ माझ्या मनाला जर सर्वकाळ तुझे ध्यान लागले तर त्या चांडाळ मनाचा धिक्कार असो. ते जळून जावो. ४ माझे पाय देवा, तुझ्याकडील मार्ग चालत नसतील तर अनंता, ते गळून पडावेत ५ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तुझ्यावाचून जगण्याची मला कोणतीच आवडती इच्छा नाही. तुझे नामच तेवढे मला प्रिय आहे. ६

१७८३ म्हणसी होऊनी निश्चिंता । हरुनियां अवघी चिंता ।
मग जाऊं एकांता । भजन करूं ।
संसारसंभ्रमें आशा लागे पाठी । तेणें जीवा साटी होईल तुझ्या ॥ १ ॥
सेकीं नाडसील नाडसील । विषयसंगें अवघा नाडसील । मागुता पडसील भवडोहीं ॥ २ ॥
शरीर सकळ मायेचा बांधा । यासी नाहीं कधीं अराणूक ।
करिती तडातोडी आंत वाह्यात्कारीं । ऐसे जाती चारी दिवस वेगीं ॥ ३ ॥
मोलाची घडी जाते वांयांविण । न मिळे मोल धन देतां कोडी ।
जागा होईं करीं हिताचा उपाय । तुका म्हणे हाय करिसी मग ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:— सेकीं–शेवटी, आराणूक–विश्रांती, घडी–वेळ, कोडी–कोटी किंमतीचे.

अर्थ.— सर्व चिंता दूर करीन, निष्काळजी होईन व मग एकान्तात जाऊन भजन करीन, असे म्हणशील तर संसाराच्या संभ्रमातच तुझ्या पाठीमागे आशा लागेल व ती तुझा एके दिवशी जीव घेईल. १ शेवटी विषयांच्या संगतीत तू फसशील व नतर संसारसमुद्राच्या डोहात बुडून जाशील. २ हे शरीर मायेचेच बनलेले असल्याने त्याला कधी विश्रांती मिळणार नाही अंतर्बाह्य निवास करणारे विषयाचे चोर तुझी एकसारखी ओढाताण करतील, आणि आयुष्याचे चार दिवस तसेच निघून जातील ३ मौल्यवान असा आयुष्याचा वेळ व्यर्थ खर्च होईल मग कोटि किंमतीचे धन खर्च केले तरी ती वेळ काही पुन. मिळणार नाही तेव्हा तू आता नीट जागा हो स्वहिताचा विचार कर. नाही तर मग तुकाराम महाराज म्हणतात, तुला हाय हाय करुन रडत बसण्याची वेळ येईल ४

१७८४ कनवाळू कृपाळू भक्तांलागीं मोही । गजेंद्राचा धांवा तुवां केला विठाई ॥ १ ॥
पांडुरंगे ये वो पांडुरंगे । जीवाचे जिवलगे ये वो पांडुरंगे ॥ २ ॥
भक्तांच्या कैवारें कष्टलीस विठ्ठले । अंबरीषीकारणें जन्म दाहा घेतले ॥ ३ ॥
प्रल्हादाकारणें स्तंभीं अवतार केला । विदारूनि दैत्य प्रेमपान्हा पाजिला ॥ ४ ॥
उपमन्याकारणें कैसी धांवसी लवलाहीं । पाजी प्रेमपान्हा क्षीरसागराठायीं ॥ ५ ॥
कौरवीं पांचाळी सभेमाजी आणिली । वस्त्रहरणीं वस्त्रें कैसी जाली माउली ॥ ६ ॥
दुर्वास पातला धर्मा छळावया वनीं । धांवसी लवलाहीं शाखादेठ[1] घेऊनि ॥ ७ ॥
कृपाळू माउली भुक्तिमुक्तिभांडार । करीं माझा अंगीकार तुका म्हणे विठ्ठले ॥ ८ ॥

शब्दार्थ व टीपा:— विदारूनि–पोट चिरून, दैत्य– हिरण्यकशिपू, पांचाळी–द्रौपदी, शाखादेठ–भाजीचे पान, भुक्तिमुक्तिभांडार–भोगाचे व मुक्तीचे भांडार

१ शाखापत्र

अर्थ — विठाई, माऊले, तू आपल्या भक्तासाठी कृपाळू होऊन, कनवाळू होऊन त्याला मोहून टाकतेस नक्राच्या मिठीत सापडलेल्या राजेंद्राने तुला धावा करताच तू त्याची मुक्तता केलीस १ अगे पाडुरंगे, तू माझ्या जीवाची जीवलग आहेस तू माझ्यासाठी धावून ये २ विठ्ठले, तू भक्ताचे रक्षण करताना कष्टलीस, तुला यासाठी फार श्रम पडले अंबऋषीसाठी तू दहा जन्म घेतलेस ३ भक्त प्रल्हादाच्या रक्षणासाठी तू खांबातून प्रकट झालास आणि हिरण्यकशिपूचे पोट चिरून भक्त प्रल्हादास प्रेमाचा पान्हा पाजलास ४ उपमन्यूसाठी तू त्वरित धावलास आणि त्याला क्षीरसागराचा लाभ देऊन प्रेमाचा पान्हा पाजलास ५ दुष्ट कौरवानी द्रौपदीस भर सभेत आणले आणि तिचे वस्त्रहरण केले तेव्हा तूच वस्त्ररूपाने तिचे कसे रक्षण केलेस ? ६ पाडव वनवासात असताना दुर्वास ऋषी त्याना छळण्यासाठी आले तेव्हा तूच द्रोपदीचा धावा ऐकून धावत आलास व तिचे आणि धर्मराजाचे रक्षण एक भाजीचे पान खाऊन केलेस ७ तुकाराम महाराज म्हणतात, अशा प्रकारे तू कृपाळू माऊली असून सर्व सुखभोगाचे व चारी मुक्तींचे भाडार आहेस तेव्हा तू माझा स्वीकार करावास विठ्ठले ! ८

विवरण – या आणखी एका अभगात तुकाराम महाराज कळवळून देवास माऊली म्हणून हाक मारतात व या आईने आपल्या भक्ताचे रक्षण सकटप्रसगी कसे केले याची काही उदाहरणे देतात गजेंद्र, अंबऋषी, प्रल्हाद, उपमन्यू, द्रौपदी इत्यादीचे दाखले तुकोबानी इतरही अनेकदा दिले आहेत गजेन्द्राची कथा पुराणातून आलेली आहे हा खरे म्हणजे पाड्य देशाचा इद्रद्युम्न राजा. तप करीत असताना एकदा अगस्त्य आला असताना त्याच्याकडे याचे लक्ष गेले नाही म्हणून मुनीने त्याला मदोन्मत्त हत्ती होण्याचा शाप दिला नक्राने धरले असता श्रीविष्णूची प्रार्थना केल्यावर तुझी सुटका होईल असाही उःशाप त्याने त्याला दिला होता हूहू नावाचा एक गधर्व देवल मुनीच्या शापाने त्रिकूट पर्वतावरील सरोवरात नक्र होऊन पडला होता त्याने या हत्तीस पाण्यात पकडून ठेविले. त्यावेळी हत्तीने श्रीविष्णूचे स्मरण केले, तेव्हा विष्णूने नक्राम ठार करून गजेन्द्राची सुटका केली याप्रमाणे भगवताच्या कृपेने नक्र व गजेन्द्र या दोघाचाही उद्धार झाला गजेन्द्राच्या कथेवर सस्कृत मराठी कवीनी अनेक आख्याने रचली आहेत 'गजेन्द्र तो हत्ती सहस्रवर्षे' या एका अभगात (क्रमाक ३०८७) तुकोबानी या गजेन्द्राची सपूर्ण कथा थोडक्यात दिली आहे 'गजइद्र पशु आर्ते मोकलियला' याही आणखी एका अभगात (क्रमाक २४५५) तुकाराम बुवानी गजेन्द्रकथा वर्णन केली आहे. अंबऋषी, प्रल्हाद, उपमन्यू, द्रौपदी, धर्मराज यांचे उल्लेख तुकोबा अनेकदा करतात. त्याच्या कथाही सर्वत्र प्रसिद्ध अशाच आहेत

१७८५ कवणा पाषाणासी धरूनि भाव । कवणावरी पाव ठेवूं आता ।
म्हणऊनि निश्चित राहिलो मनीं । तूचि सर्वां खाणीं देखोनिया ॥ १ ॥
कवणाचे कारण न लगेचि काहीं । सर्वी सर्वां ठायीं तूं मज एक ।
कायावाचामन ठेविले तुझ्या पायीं । आता उरले काई न दिसे देवा ॥ २ ॥
जळें जळ काय धोविले एक । कवण तें पातक हरले तेथें ।
पापपुण्य हे वासना सकळ । ते तुज समूळ समर्पिली ॥ ३ ॥
पितरस्वरूपी तूंचि जनार्दन । सव्य ते कवण अपसव्य ।
तुका म्हणे जोत पिंड तुम्हा हातीं । देऊनि निश्चिती मानियेली ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:— पाव-पाय, पिंड–देह, खाणी–योनी, जन्म.

अर्थ— मी आता कोणत्या पाषाणास देव मानून भाव धारण करू ? कोणत्या दगडावर पाय देऊन स्थिर होऊ ? सर्व योनींमध्ये तुमीच सत्ता आहे असे पाहून मी मनाने निश्चित झालो आहे १ देवा, आता सर्व ठिकाणी तूच एक मला असल्यामुळे मला आता तुजवाचून दुसऱ्या कुणाच्या साह्याचे कारणच नाही मी, माझे शरीर, माझी वाणी, माझे मन, हे सर्व तुझ्या पायावर अर्पण केले आहे आता मला दुसरे काही उरले आहे असे काही दिसत नाही २

शब्दार्थ व टीपा:– एकसर-एकसारखी, वारिता-निवारण करणारा

अर्थ — विठ्ठला, तुम्ही एकसारखी जी आज्ञा केली आहे, तिच्याबद्दल फारसे न विचारता आम्ही ती मानू. कारण आता आम्हांस तुमच्याशिवाय दुसरे कोण आहे हो ? १ आमचे सर्व दु:खें निवारण करण्यास तो श्रीहरी समर्थ असताना आम्हाला आता चिंता करण्याचे कारण तरी काय आहे ? २ हा श्रीहरी बुद्धिदाता असून सर्व विश्वाला भरून राहिलेला आहे त्याच्या अंगी कोणती शक्ती नाही ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, माझे दु:ख निवारण करण्याइतकी कोणती सत्ता त्याच्या हातात नाही ? ४

१७७७ बळिवंत आम्ही समर्थाचे दास । घातलीया कास कळिकाळासी ॥ १ ॥
तेथें मानसाचा[1] कोण आला पाड । उलंघोनि जड गेलों आधीं ॥ २ ॥
संसाराचे बळि साधिले निधान । मारिले दुर्जन षड्वर्ग ॥ ३ ॥
तुका म्हणे एक उरला धरिता ठाव । येर केले वाव तृणवत ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – निधान–साठा, वाव–व्यर्थ, तृणवत्–गवताएवढे

अर्थ – आम्ही श्रीविठ्ठल या समर्थाचे दास असल्याने बलवान आहोत काळाबरोबरही झुंज खेळण्यास आम्ही कास मारून सिद्ध झालो आहोत १ आम्ही सर्व जड प्रकृती ओलांडून आलो आहोत तेथे आता मनाचा कसला अडथळा येणार आहे ? मनाची किंमत ती काय ? २ सर्व बाह्य व लौकिक संसारास बळी देऊन आम्ही परमार्थाच्या साठ्याचे साधन केले आहे काम, क्रोध, लोभ इत्यादी सहा शत्रू आम्ही मारून टाकिले आहेत ३ तुकाराम महाराज म्हणतात, ईश्वरावाचून इतर ते पदार्थ व्यर्थ व गवताएवढे तुच्छ मानून उरलेली एक परमार्थाची स्थितीच आम्ही आश्रयार्थ घेतलेली आहे ४

१७७८ एका गावें आम्हीं विठोबाचें नाम । आणिकांचें काम नाहीं आतां ॥ १ ॥
मोडूनियां वाटा सूक्ष्म[2] सगर । केला राज्यभार चाले ऐसा ॥ २ ॥
लावूनि मृदंग टाळश्रुतिघोष[3] । सेवूं ब्रह्मरस आवडीनें ॥ ३ ॥
तुका म्हणे महापातकी पतित । ऐसियाचें हित हेळामात्रें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा — दुस्तर- तरून जाण्यास कठिण, श्रुति–वीणा, हेळामात्रें– एका क्षणात.

अर्थ — आम्ही एका विठोबाचे नाम गाऊ त्याच्या वाचून इतरांचे काही कामच नाही आता १ सूक्ष्म व तरून जाण्यास कठिण अशा ज्या इतर साधनांच्या वाटा आहेत, त्या आम्ही मोडून टाकल्या. सर्व राज्यभार नीट चालेल अशा भक्तिमार्गास राजमार्गाचे स्थान प्राप्त करून दिले २ वीणा, मृदंग यांच्या सुरात टाळांचा घोष मिळवून आम्ही मोठ्या आवडीने ईश्वरनामाच्या ब्रह्मरसाचे सेवन करू ३ तुकाराम महाराज म्हणतात, या आमच्या मार्गाने जे महापातकी व पतित आहेत त्यांचा एका क्षणात उद्धार होतो. ४

१७७९ वाचेच्या चापल्यें बहु जाली कुशळ । नाहीं बीजमूळ हाता आलें ॥ १ ॥
म्हणोनि पढरिराया दुखी होतें मन । अंतरीचें कोण जाणे माझें ॥ २ ॥
पूज्य जालों अंगा आला अभिमान । पुढील कारण खोळंबलें ॥ ३ ॥
तुका म्हणे खूण न कळेचि निरुती । सांपडलों हातीं अहंकाराचे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा — बीजमूळ– परमार्थाचे खरे रहस्य, अंतरीचें– मनाचे, कारण– परमार्थाचे कार्य, निरुती– खरी.

---

[1] माणसाचा, [2] सूक्ष्म, [3] श्रुतिटाळघोष

अर्थ — वाणीच्या चापल्यामुळे मी मोठा कुशल वक्ता म्हणून नावारूपास आलो, पण परमार्थाचे खरे रहस्य काही माझ्या हाती अजून आले नाही १ म्हणून पंढरीराया, माझे मन फार दुःखी होत आहे रे; पण माझ्या मनाचे हे दुःख तुझ्यावाचून कोण जाणणार आहे? २ लोकांत पूज्यता वाढल्यामुळे मला अभिमान चढला. त्यामुळे परमार्थाचे पुढील कार्य मात्र थांबून राहिले ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी अहंकाराच्या हाती सापडल्यामुळे परमार्थाची खरी खूण मला समजलीच नाही. ४

१७८० आतां काढाकाढी करीं वा पंढरिराया । नाहीं तरी वांयां गेलों दास ॥ १ ॥
जाणतां बैसलों दगडाचे नावे । तिचा[1] धर्म घ्यावे प्राण हाचि ॥ २ ॥
मनाचा स्वभाव इंद्रियांचे[2] ओढी । पतनाचे[3] जोडी वरी हांव ॥ ३ ॥
तुका म्हणे जाली अंधळ्याची परी । आतां मज हरी वाट दावीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:— नावें– नावेत, होडीत

अर्थ — अरे पंढरीनाथा, आता मला या प्रपंचाच्या बंधनातून बाहेर काढ एकदा. नाही तर हा तुझा दास व्यर्थ वाया गेला असेच होईल १ जाणूनबुजून मी दगडाच्याच नावेत बसलो आहे. आणि तिचा स्वभाव तर बुडवून प्राण घ्यायचा आहे. २ इंद्रियांच्या ओढीने विषयांकडे धाव घेण्याचा स्वभाव माझ्या मनाचा बनला आहे त्यामुळे त्याची हाव पतनाकडेच असते. ३ माझी अवस्था एखाद्या आंधळ्याप्रमाणे झाली आहे तेव्हा, श्रीहरी, आता तूच मला नीट मार्ग दाखीव ४

१७८१ सज्जन तो शब्द सत्य जो मानी । छळी दुर्जन आणिकांसी ॥ १ ॥
एक गुण तो केला दोंठायीं । ज्याचा त्यास पाहीं जैसा तैसा ॥ २ ॥
भाविक शब्द वोले वाणीचा । लटिका वाचा वाचाळ तो ॥ ३ ॥
परउपकार घडे तो भला । नाठयाळ तया दया नाहीं ॥ ४ ॥
जाणीवंत तो पायरी जाणे । अधम तो नेणे खुंट जैसा ॥ ५ ॥
हित तें अनहित केलें कैसें । तुका म्हणे पिसें लागलें यास[4] ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा:— वाणीचा–कमी, पिसे–वेड

अर्थ:— जो सत्याच्या शब्दास मानतो तोच सज्जन आहे असे समजावे. आणि जो इतरांना छळतो तो दुर्जनच समजावा. १ एकच गुण असतो, पण तो दोन ठिकाणी वाटला गेल्यास ज्याचा जसा स्वभाव तसा त्याला अनुभव येतो. २ जो भाविक व सात्त्विक आहे तो फार कमी बोलतो, आणि जो लबाड असतो, त्याचीच बडबड विशेष प्रकारची असते. ३ ज्याच्या हातून परोपकार घडतो तोच भला असून ज्याला कधी कुणाची दया येत नाही त्याला नाठाळच समजावे. ४ आपली योग्यता जो ओळखतो तोच ज्ञानी समजावा व जो खुंटाप्रमाणे काहीच जाणीत नाही तो अधमच समजावा. ५ तुकाराम महाराज म्हणतात, या अधमाने पाहा जे हित तेच अनहित कसे केले त्यास खरोखरच वेड लागलेले असते. ६

१७८२ तुझें नाम मुखीं न घेतां आवडी । जिव्हा तेचि घडी झडो माझी ॥ १ ॥
हें मज देईं हें मज देईं । आणिक दुजें कांहीं न मगें तुज ॥ २ ॥
बहिर कान तुझी कीर्ती नाइकतां । पाय न देखतां जात डोळे ॥ ३ ॥
मना तुझें ध्यान नाहीं नित्य काळ । धिग तें चांडाळ जळो जळो ॥ ४ ॥
हातपाय तेणें पंथें न चलतां[5] । जावे ते अनंता गळोनियां ॥ ५ ॥
तुजविण जिणें नाहीं मज चाड । तुका म्हणे गोड नाम तुझें ॥ ६ ॥

१ तिचा तो स्वभाव प्राण घ्यावा, २ इंद्रियाची, ३ पतनाची, ४ त्यास, ५ चालतां.

शब्दार्थ व टीपा —–घडी–वेळेस, चाड–कौतुक, आवड.

अर्थ —–देवा, मी माझ्या मुखाने तुझें नाव मोठ्या प्रेमानें न घेईन तर माझी जीभ झडून जावी. १ हीच देणगी मला देवा, तुम्ही द्यावी अशी माझी मागणी आहे मी याखेरीज दुसरे काहीही तुला मागत नाही २ तुझी कीर्ती मी जर ऐकिली नाही तर माझे कान देवा, बहिरे होवोत आणि तुझे पाय जर पाहाता आले नाहीत तर माझे डोळेही जावोत ३ माझ्या मनाला जर सर्वकाळ तुझें ध्यान लागले तर त्या चांडाळ मनाचा धिक्कार असो ते जळून जावो ४ माझे पाय देवा, तुझ्याकडील मार्गं चालत नसतील तर अनंता, ते गळून पडावेत ५ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तुझ्यावाचून जगण्याची मला कोणतीच आवडती इच्छा नाही तुझे नामच तेवढे मला प्रिय आहे ६

१७८३ म्हणसी होऊनी निश्चिंता । हरूनियां अवघी चिंता ।
मग जाऊं एकांता । भजन करूं ।
संसारसभ्रमें आशा लागे पाठी । तेणे जीवा साटी होईल तुझ्या ॥ १ ॥
सेकीं नाडसील नाडसील । विषयसगें अवघा नाडसील । मागुता पडसील भवडोहीं ॥ २ ॥
शरीर सकळ मायेचा बांधा । यासी नाहीं कधीं अराणूक ।
करिती तडातोडी आंत बाह्यात्कारीं । ऐसे जाती चारी दिवस वेगीं ॥ ३ ॥
मोलाची घडी जाते वायाविण । न मिळे मोल धन देता कोडी ।
जागा होईं करीं हिताचा उपाय । तुका म्हणे हाय करिसी मग ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा —– सेकीं–शेवटी, आराणूक–विश्रांती घडी–वेळ, कोडी–कोटी किंमतीचे

अर्थ —– सर्व चिंता दूर करीन, निश्चिंत होईन व मग एकान्तात जाऊन भजन करीन, असे म्हणशील तर संसाराच्या सभ्रमातच तुझ्या पाठीमागे आशा लागेल व ती तुझा एके दिवशी जीव घेईल १ शेवटी विषयांच्या संगतीत तू फसशील व नंतर संसारसमुद्राच्या डोहात बुडून जाशील २ हे शरीर मायेचेच बनलेले असल्याने त्याला कधी विश्रांती मिळणार नाही अंतर्बाह्य निवास करणारे विषयांचे चोर तुझी एकसारखी ओढाताण करतील, आणि आयुष्याचे चार दिवस तसेच निघून जातील ३ मौल्यवान अशा आयुष्याचा वेळ व्यर्थ खर्च होईल मग कोटि किंमतीचे धन खर्च केले तरी ती वेळ काही पुन: मिळणार नाही तेव्हा तू आता नीट जागा हो स्वहिताचा विचार कर नाही तर मग तुकाराम महाराज म्हणतात तुला हाय हाय करून रडत बसण्याची वेळ येईल ४

१७८४ कनवाळू कृपाळू भक्तालागीं मोही । गजेंद्राचा धावा तुवां केला विठाई ॥ १ ॥
पांडुरंगे ये वो पांडुरंगे । जीवाचे जिवलगे ये वो पांडुरंगे ॥ २ ॥
भक्ताच्या कैवारें कष्टलीस विठ्ठले । अंबऋषीकारणे जन्म दाहा घेतले ॥ ३ ॥
प्रल्हादाकारणे स्तंभीं अवतार केला । विदारूनि दैत्य प्रेमपान्हा पाजिला ॥ ४ ॥
उपमन्याकारणे कैसी धावसी लवलाहीं । पाजी प्रेमपान्हा क्षीरसागराठायीं ॥ ५ ॥
कौरवीं पांचाळी सभेमाजी आणिली । वस्त्रहरणीं वस्त्रें कैसी झाली माउली ॥ ६ ॥
दुर्वास पातला धर्मा छळावया वनीं । धावसी लवलाहीं शाकादेठ[1] घेऊनि ॥ ७ ॥
कृपाळू माउली भुक्तिमुक्तिभांडार । करीं माझा अंगीकार तुका म्हणे विठ्ठले ॥ ८ ॥

शब्दार्थ व टीपा —– विदारूनि–पोट चिरून, दैत्य– हिरण्यकशिपू, पांचाळी–द्रौपदी, शाकादेठ–भाजीचे पान, भुक्तिमुक्तिभांडार–भोगाचे व मुक्तीचे भांडार

१ शाखापत्र

अर्थ--- विठाई, माऊले, तू आपल्या भक्तासाठी कृपाळू होऊन, कनवाळू होऊन त्याला मोहून टाकतेस. नक्राच्या मिठीत सापडलेल्या राजेन्द्राने तुझा धावा करताच तू त्याची मुक्तता केलीस १ अगे पांडुरंगे, तू माझ्या जीवाची जीवलग आहेस तू माझ्यासाठी धावून ये २ विठ्ठले, तू भक्तांचे रक्षण करताना कष्टलीस, तुला यासाठी फार श्रम पडले. अंबऋषीसाठी तू दहा जन्म घेतलेस ३ भक्त प्रल्हादाच्या रक्षणासाठी तू खांबातून प्रकट झालास आणि हिरण्यकशिपूचे पोट चिरून भक्त प्रल्हादास प्रेमाचा पान्हा पाजलास ४ उपमन्यूसाठी तू त्वरित धावलास आणि त्याला क्षीरसागराचा लाभ देऊन प्रेमाचा पान्हा पाजलास ५ दुष्ट कौरवांनी द्रौपदीस भर सभेत आणले आणि तिचे वस्त्रहरण केले तेव्हा तूच वस्त्ररूपाने तिचे कसे रक्षण केलेस ? ६ पांडव वनवासात असताना दुर्वास ऋषी त्यांना छळण्यासाठी आले तेव्हा तूच द्रौपदीचा धावा ऐकून धावत आलास व तिचे आणि धर्मराजाचे रक्षण एक भातीचे पान खाऊन केलेस. ७ तुकाराम महाराज म्हणतात, अशा प्रकारे तू कृपाळू माऊली असून सर्व सुखभोगांचे व चारी मुक्तींचे भांडार आहेस तेव्हा तू माझा स्वीकार करावास विठ्ठले ! ८

विवरण:- या आणखी एका अभंगात तुकाराम महाराज कळवळून देवास माऊली म्हणून हाक मारतात व या आईने आपल्या भक्ताचे रक्षण संकटप्रसंगी कसे केले याची काही उदाहरणे देतात गजेंद्र, अंबऋषी, प्रल्हाद, उपमन्यू, द्रौपदी इत्यादींचे दाखले तुकोबांनी इतरही अनेकदा दिले आहेत गजेन्द्राची कथा पुराणातून आलेली आहे. हा खरे म्हणजे पांड्य देशाचा इंद्रद्युम्न राजा. तप करीत असताना एकदा अगस्त्य आला असताना त्याच्याकडे याचे लक्ष गेले नाही म्हणून मुनीने त्याला मदोन्मत्त हत्ती होण्याचा शाप दिला. नक्राने धरले असता श्रीविष्णूची प्रार्थना केल्यावर तुझी सुटका होईल असाही उःशाप त्याने त्याला दिला होता. हुहू नावाचा एक गंधर्व देवल मुनीच्या शापाने त्रिकूट पर्वतावरील सरोवरात नक्र होऊन पडला होता त्याने या हत्तीस पाण्यात पकडून ठेविले. त्यावेळी हत्तीने श्रीविष्णूचे स्मरण केले, तेव्हा विष्णूने नक्रास ठार करून गजेन्द्राची सुटका केली याप्रमाणे भगवंताच्या कृपेने नक्र व गजेन्द्र या दोघांचाही उद्धार झाला गजेन्द्राच्या कथेवर संस्कृत मराठी कवींनी अनेक आख्याने रचली आहेत ' गजेन्द्र तो हत्ती सहस्त्रवर्षे ' या एका अभंगात (क्रमांक ३०८७) तुकोबांनी या गजेन्द्राची संपूर्ण कथा थोडक्यात दिली आहे. ' गजइंद्र पशु आर्ते मोकलियला ' याही आणखी एका अभंगात (क्रमांक २४५५) तुकाराम बुवांनी गजेन्द्रकथा वर्णन केली आहे. अंबऋषी, प्रल्हाद, उपमन्यू, द्रौपदी, धर्मराज यांचे उल्लेख तुकोबा अनेकदा करतात. त्यांच्या कथाही सर्वत्र प्रसिद्ध अशाच आहेत

१७८५ कवणा पाषाणासी धरूनि भाव । कवणावरी पाव ठेवूं आतां ।
म्हणऊनि निश्चिंत राहिलों मनीं । तूंचि सर्वां खाणीं देखोनियां ॥ १ ॥
कवणाचे कारण न लगेचि कांहीं । सर्वां सर्वां ठायीं तूं मज एक ।
कायावाचामन ठेविले तुझ्या पायीं । आतां उरले काई न दिसे देवा ॥ २ ॥
जळें जळ काय धोविलें एक । कवण तें पातक हरलें तेथें ।
पापपुण्य हे वासना सकळ । ते तुज समूळ समर्पिली ॥ ३ ॥
पितरस्वरूपी तूंचि जनार्दन । सव्य तें कवण अपसव्य ।
तुका म्हणे जीत पिंड तुम्हां हातीं । देऊनि निश्चिती मानियेली ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:— पाव-पाय, पिंड–देह, खाणी–योनी, जन्म.

अर्थ--- मी आता कोणत्या पाषाणास देव मानून भाव धारण करू ? कोणत्या दगडावर पाय देऊन स्थिर होऊ ? सर्व योनींमध्ये तुझीच सत्ता आहे असे पाहून मी मनाने निश्चित झालो आहे १ देवा, आता सर्व ठिकाणी तूच एक मला असल्यामुळे मला आता तुजवाचून दुसऱ्या कुणाच्या साह्याचे कारणच नाही. मी, माझे शरीर, माझी वाणी, माझे मन, हे सर्व तुझ्या पायावर अर्पण केले आहे आता मला दुसरे काही उरले आहे असे काही दिसत नाही. २

शरीरात पाण्याचा अंश आहे म्हणून त्याला पाण्यानेच धुऊन काय होणार ? त्यामुळे कोणते पातक दूर होणार आहे ? पापपुण्याची सर्व वासनाच देवा मी तुला अर्पण केली आहे. ३ तू जनार्दन प्रत्यक्ष पितरस्वरूपाचाच आहेस. त्यामुळे सव्य कोणते, अपसव्य कोणते, याची उठाठेव मी कशाला करू ? तुकाराम महाराज म्हणतात, हा माझा जिवंत देहच मी तुझ्या हाती देत आहे. त्यामुळे तर मी निष्काळजी बनलो आहे ४

१७८६ सिणलों दातारा करितां येरझारा । आतां सोडवीं संसारापासोनियां ॥ १ ॥
न सुटेचि बाकी नव्हे झाडापाडा । घातलोंसें खोडा हाडांचिया ॥ २ ॥
मायबापें माझीं जीवाचीं सांगाती । तीं देतील हातीं काळाचिया ॥ ३ ॥
पडताळूनि सुरी बैसली सेजारीं । यमफासा करीं घेऊनियां ॥ ४ ॥
पाठी पोटीं एकें लागलीं सरसीं । नेती नरकापाशीं ओढूनियां ॥ ५ ॥
जन साह्यभूत असे या सकळां । मी एक निराळा परदेशी ॥ ६ ॥
कोणां काकुलती नाहीं कोणे परी । तुजविण हरी कृपाळुवा ॥ ७ ॥
तुका म्हणे मज तुझाची भरवसा । म्हणऊनि आशा मोकलिली ॥ ८ ॥

शब्दार्थ व टीपाः— झाडापाडा–हिशेब, खोडा–सापळा

अर्थ.— दातारा, मी अनेक जन्माच्या येरझाऱ्या करताना आता शिणून गेलो आहे रे आता तू मला या संसारातापासून सोडीव ना १ माझ्या संचित कर्माची बाकीही अजून फिटत नाही, की पापपुण्याचा हिशेबही नीट होत नाही. त्यामुळे मी देहातील हाडाच्या सापळ्यात मात्र सापडलो आहे २ माझ्या जीवाचा सांभाळ करणारी माझी आईबापे, पण वेळ येताच त्याचा उपयोग काहीच न होता ती मला काळाच्या हातीच देतात ३ हा यम तर हातामध्ये सुरी पाजळून व फासा घेऊन माझ्या शेजारीच येऊन बसला आहे ४ कामक्रोधादी विकार व प्रारब्धकर्म माझ्या पाठीपोटास लागून मला नरकाकडे ओढून नेतात. ५ इतर सर्व लोक यानाच साह्य करणारे असल्याने मी मात्र एक वेगळाच व परदेशी होऊन बसतो ६ देवा, कृपाळू श्रीहरी, तुझ्यावाचून इतर कुणालाच माझी कीव कधी येत नाही. ७ तुकाराम महाराज म्हणतात, म्हणून देवा, मला तुझाच एक भरवसा आहे. यासाठी देवा मी इतर सर्व आशा कधीच सोडून दिली आहे ८

१७८७ देवाचा[1] भक्त तो देवासी गोड । आणिकांसी चाड नाहीं त्याची ।
कवणाचा सोइरा नव्हेच सांगाती । अवघियां हातीं अंतरला ॥ १ ॥
निष्काम वेडे ह्मणती बापुडें । अवघियां सांकडें जाला कैसा ।
माझें ऐसें त्या न ह्मणतीं कोणी । असे रानीं वनीं भलते ठायीं ॥ २ ॥
प्रातःस्नान करी विभूतिचर्चन । देखोनियां जन निंदा करी ।
कंठीं तुळसीमाळा बैसोनि निराळा । ह्मणती या चाडाळा काय जालें ॥ ३ ॥
गातां शंका नाहीं बैसे भलते ठायीं । शिव्या देती आई बाप भाऊ ।
घरीं बाइल ह्मणे कोठें व्याली रांड । बरें होतें पंढ मरता तरी ॥ ४ ॥
जन्मोनि जाला अवघियां वेगळा । ह्मणोनि गोपाळा दुर्लभ तो ।
तुका ह्मणे जो संसारा रुसला । तेणेंचि टाकिला सिद्धपंथ ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपाः— सांकडें–संकट, अडचण

१ देवभक्त

अर्थ:— देवाचा भक्त देवालाच गोड वाटतो आणि त्या भक्तालाही दुसऱ्या कुणाचीच गरज नसते. तो भक्त कुणाचा सोयरा नसतो, की कुणाचा सोबतीही नसतो. तो सर्वांच्या पासूनच दूर झालेला असतो. १ अशा या भक्तास लोक निष्काम, वेडा व बापुडा म्हणून हिणवतात, या सर्वांनाच त्याची अडचणच वाटते, त्याला कुणीच आपले असे म्हणत नाही. तो रानावनात कुठेही मलत्य: ठिकाणी वास्तव्य करून असतो. २ हा भक्त सकाळी स्नान करून सर्वांगाला भस्म लावतो. त्याचे हे वागणे पाहून भोवतीचे लोक त्याची निंदा करतात, गळ्यात तुळशीच्या माळा घालून हा वेगळाच होऊन एकान्तात वसतो. तेव्हा या चाडाळाला झाले तरी काय, असे लोक विचारतात ३ कुठल्याही ठिकाणी बसून देवाचे गाणे गाताना याला कसलीच शंका कधी येत नाही; पण याच त्याच्या कृत्याला पाहून याचे आईबाप व भाऊ त्याला शिव्या देतात. घरची बायको म्हणत असते की, याच्या आईने-रांडेने याला जन्म तरी कसा दिला? हा नपुसक होऊन मरण पावेल तर बरा. ४ जन्माला येऊन हा भक्त सर्व दृष्टींनी वेगळाच दिसतो. म्हणूनच गोवाळांना तो दुर्लभ वाटतो. तुकाराम महाराज म्हणतात, जो संसारात मुकला, ज्याने प्रपंचाचा त्याग केला, तोच सिद्धपंथाला जाऊन पोचेल. ५

१७८८ कस्तुरी मिनली जये मृत्तिके । तयेसी आणिके कैसी सरी ॥ १ ॥
लोखंडाचे अंगीं लागला परिस । तया आणिकास कैसी सरी ॥ २ ॥
तुका म्हणे मी न वजें यातीवरी । पूज्यमान करीं वैष्णवांसी ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा —मिनली–मिसळली, सरी–बरोबरी, न वजे–जाणार नाही.

अर्थ — एकदा कस्तुरी मातीस मिळाली की त्या मातीची बरोबरी दुसऱ्या वस्तूंशी कशी होणार? १ लोखंडाच्या अंगाला परिस लागल्यानंतर मग त्याची बरोबरी इतरांना कशी करता येईल? २ तुकाराम महाराज म्हणतात, मी कधी जातीवर जाणार नाही, जातीकडे दृष्टी देणार नाही. तो विष्णुभक्त आहे, एवढेच पाहून त्यास पूज्य मानीन. ३

१७८९ अनुहात ध्वनि वाहे सकळां पिंडीं । राम नाहीं तोंडीं कैसा तरे ॥ १ ॥
सकळां जीवांमाजी देव आहे खरा । देखिल्या दुसरा विण न तरे ॥ २ ॥
ज्ञान सकळांमाजी आहे हे साच । भक्तीवीण तेंच ब्रह्म नव्हे ॥ ३ ॥
काय मुद्रा कळल्या कराव्या सांगतां । दीप न लगतां[1] उन्मनीचा ॥ ४ ॥
तुका म्हणे नका पिंडाचें पाळण । स्थापूं नारायण आतुडेना ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा:— अनुहात–सोहं सोहं असा ध्वनी, पिंडी–शरीरात, हृदयात, साच–खरोखर, उन्मनीचा–स्वरूपानुभवाची अवस्था, पिंडाचे–शरीराचे, आतुडेना–सापडणार नाही.

अर्थ – सर्व लोकांच्या शरीरात अथवा हृदयात 'सोहं सोहं' असा ध्वनी होत असतो हे तर खरेच,परंतु मुखात रामनामाचे चिंतन नसेल तर त्याचा तरणोपाय होईल तरी कसा? १ सर्व जीवांत त्या परमेश्वराचे अस्तित्व आहे हे तर खरेच, पण सगुणत्वाने दुसऱ्या देवाचा साक्षात्कार झाल्याशिवाय तो कधी तरी तरून जाईल काय? २ सर्व लोकांत ज्ञान असते हे खरे; पण भक्तीशिवाय त्याला ब्रह्मत्वाची सर कधीच येणार नाही. ३ योगाच्या सर्व मुद्रा समजल्या असे दुसऱ्यास सांगून काय उपयोग? जोपर्यंत स्वरूपानुभवाची अवस्था प्राप्त झालेली नाही तोपर्यंत त्या सर्व व्यर्थच होत ४ तुकाराम महाराज म्हणतात, यासाठी देहाच्या रक्षणाच्या मताची स्थापना करू नका. त्यायोगे नारायण कधीही तुम्हांस सापडणार नाही ५

---

[1] लागतां

१७९० नेणें अर्थ काहीं नव्हतो माझे बोल । विनवितों कोपाल संत म्हणी ॥ १ ॥
नव्हती माझे बोल बोले पांडुरंग । असे अगसगें व्यापूनियां ॥ २ ॥
मज मूढा शक्ती कैंचा हा विचार । निगमादिकां पार बोलावया ॥ ३ ॥
राम कृष्ण हरी मुकुंदा मुरारि । बोबडया उत्तरीं हेचि ध्यान ॥ ४ ॥
तुका म्हणे गुरुकृपेचा आधार । पांडुरंगें भार घेतला माझा ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा — मूढा–मूर्खाला, निगमादिकां–वेदादिकांचे, पार–सीमा, रहस्य, तात्पर्य

अर्थ — मला कसलाही अर्थ समजत नाही, मी जे बोलत आहे ते माझे बोल नाहीतच अशी मी विनंती तुम्हास करीत आहे याबद्दल संत लोक तुम्ही कदाचित रागवाल १ मी जे बोलतो, ते माझे बोल नव्हेत, पांडुरंगच माझ्या मुखाने बोलत आहे. तोच माझ्या सर्वांगात व्यापून राहिलेला आहे मी तर मूर्खच आहे, वेदादिकांचे तात्पर्य सांगण्याची शक्ती व तेवढा प्रगल्भ विचार याची प्राप्ती मला कुठून असणार ? ३ राम, कृष्ण, हरी, मुकुंद, मुरारी या बोबडया शब्दानीच मी ध्यान करीत असतो ४ तुकाराम महाराज म्हणतात मला गुरुकृपेचा आधार असल्यामुळेच त्या पांडुरंगाने माझा सर्व भार उचलला आहे ५

१७९१ देवासी लागे सकळांसी[1] पोसावें । आम्हा न लगे खावें काय चिंता ॥ १ ॥
देवा[2] विचारावें लागे पापपुण्य । आम्हांसी हे जन अवघें भले ॥ २ ॥
देवासि उत्पत्ति लागला संहार । आम्हा नाहीं फार थोडें काहीं ॥ ३ ॥
देवासी काम लागला[3] धंदा । आम्हांसी ते सदा रिकामीक ॥ ४ ॥
तुका म्हणे आम्ही भले देवाहून । विचारिता गुण सर्वभावें ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा — विचारावें–विचार करावा लागतो रिकामीक–रिकामेपण

अर्थ — देवाला सर्वांचा सांभाळ करावा लागतो, पण आम्हाला स्वतःच्या खाण्यापिण्याचीही चिंता करावी लागत नाही १ देवाला लोकांच्या पापपुण्याचा विचार करावा लागतो, पण आम्हाला हे सर्व लोक पुण्यवानच वाटतात २ देवाला या जगाची उत्पत्ती वाढ, संहार या गोष्टी कराव्या लागतात,पण आम्हाला मात्र थोडेफारही काम नाही ३ देवाला अशा प्रकारे फार मोठा उद्योग आहे, पण आम्हाला मात्र नेहमी रिकामेपणच आहे ४ तुकाराम महाराज म्हणतात आम्ही अशा प्रकारे देवाहून फारच मोठे आहोत गुणकर्मानेही श्रेष्ठ आहोत असे विचार करता पटून येईल ५

१७९२ घेईन मी जन्म याजसाटीं देवा । तुझी चरणसेवा साधावया ॥ १ ॥
हरिनामकीर्तन संतांचे पूजन । घालूं लोटांगण महाद्वारीं ॥ २ ॥
आनंदें निर्भर असों भलते ठायीं । सुखदु खें नाहीं चाड आम्हा ॥ ३ ॥
आणीक सायास न करीं न धरीं आस । होईन उदास सर्व भावें ॥ ४ ॥
मोक्ष आम्हा घरीं कामारी तें दासी । होय सांगों तैसी तुका म्हणे ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा — निर्भर–परिपूर्ण, चाड–इच्छा, पर्वा, सायास–प्रयत्न, कामारी–काम करणारा

अर्थ — देवा, तुझी चरणसेवा साधावी यासाठी मी पुनः पुन जन्म घेईन १ हरिनामाचे कीर्तन व साधुसंतांचे पूजन करून मी तुमच्या महाद्वारी भक्तिभावाने लोटांगण घालीन २ मी कुठेही असलो तरी आनंदाने परिपूर्ण राहीन आम्हाला लौकिक सुखाची कसलीच पर्वा नाही मी आता दुसऱ्या कुठल्याही प्रयत्नांत राहाणार नाही

१ सकळा, २ देवासी, ३ लागला हा धंदा

की दुसरी कसली आशाही धारण करणार नाही. सर्व भावानी मी उदास होऊन राहीन ४ तुकाराम महाराज म्हणतात, मोक्ष आमच्या घरी आम्ही साधू ती कामे करणाऱ्या दासदासीप्रमाणे उत्सुक असतो ५

१७९३ देवा तुज मज पण । पाहो आगळा तो कोण ॥ १ ॥
तरी साच मी पतित । तूं च खोटा दिनानाथ
ग्वाही साधुसंत जन । करूनि अगीं लावीन ॥ २ ॥
आम्ही धरिले भेदाभेद । तुज नव्हे त्याचा छेद ॥ ३ ॥
न चले तुझें काहीं त्यास । आम्ही बळकाविले दोष ॥ ४ ॥
दिशा भरल्या माझ्या मनें । लपालासी त्याच्या भेणें ॥ ५ ॥
तुका म्हणे चित्त । करी तुझी माझी नीत ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा —आगळा–श्रेष्ठ, साच–खरोखर, छेद–भेद, नीत–नीती, वागणें

अर्थ – देवा, तुझ्यामाझ्यात कोण श्रेष्ठ आहे हें पाहू या ना एकदा ! १ तेव्हा तुझ्या ध्यानात असे येईल की, मी पतित असूनही खरा आहे व तू दीनानाथ असूनही खोटा आहेस साधुसंत एक मुखाने अशीच ग्वाही देतील तो मी तुझ्या माथी मारीनच २ आमच्या मनात आम्ही भेदाभेदाची, द्वैताची भावना कल्पिली आहे तिचा भेद काही तुझ्याकडून होत नाही ३ असे हे दोष आमच्या अंगात आहेत, ते तुझ्याकडून काही कधी नष्ट होत नाहीत ४ माझे चित्त सर्व दिशांकडे धावत असल्याने ते सर्वत्र भरून राहिले आहे, पण तू मात्र या भीतीने लपून राहिला आहेस देवा ५ तुकाराम महाराज म्हणतात तुझ्यामाझ्यातील अशा वागण्याचा विचार आता माझे चित्त करीत आहे ६

अर्थ — वरवर केलेल्या कपटी भावपणाने देव कधी सापडत नाही मनात असलेला शुद्ध भावच यासाठी बोलायला हवा १ ज्या परमानदाशी, परमेश्वराशी हितगुज करायचे, तो अत करणातील भाव जाणीतच असतो २ तुकाराम महाराज म्हणतात, तुम्हाला जर आपले हित साधायचे असेल तर शुद्ध भावाने तुमचे चित्त स्वच्छ ठेवावे ३

१७९५　नव्हे ब्रह्मज्ञान बोलता[1] सिद्ध । जव हा आत्मबोध नाहीं चित्तीं ॥ १ ॥
काय करिसी वाया लटिकाचि पाल्हाळ । श्रम तो केवळ जाणिवेचा ॥ २ ॥
मीच देव ऐसे सागसी या लोका । विषयाच्या सुखा टोकोनिया ॥ ३ ॥
अमृताची गोडी पुढिला सागसी । आपण उपवासी मरोनिया ॥ ४ ॥
तुका म्हणे जरि राहील तळमळ । ब्रह्म तें केवळ सदोदित ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा — टोकोनिया–नजर ठेवून, राहील–नाहीशी होईल

अर्थ — जोपर्यंत चित्तामध्ये आत्मबोध उमटलेला नाही तोपर्यंत कितीही ब्रह्मज्ञान बोलण्यात आले तरी ते काही शुद्ध स्वरूपाचे नसते १ जोपर्यंत आत्मानुभवाचा वाटा प्राप्त झाला नाही, तोपर्यंत उगाच शब्दाचा पाल्हाळ काय कामाचा ? केवळ ज्ञानाचे शब्द हे श्रमच नव्हेत का ? ३ मीच देव आहे, असे तू लोकाना सांगतोस, आणि तू स्वत मात्र अनेक विषयसुखावर नजर ठेवून असतोस ४ तुकाराम महाराज म्हणतात, तुझ्या हृदयातील तळमळ जर नाहीशी होईल, तर तू सदोदित केवळ ब्रह्म होशील ५

१७९६　गगाजळा नाहीं पाठी पोट नाहीं । अवगुण तो काहीं अमृतासी ॥ १ ॥
रवि दीप काळिमर काय जाणे हिरा । आणिका तिमिरा नाश[2] तेणे ॥ २ ॥
कर्पूरकाडणी काय कोंडा कणी । सिंधू मिळवणीं काय चाले ॥ ३ ॥
परिस चिंतामणि आणिकाचा गुणी । पालटे लागोनि नव्हे तैसा ॥ ४ ॥
तुका म्हणे तैसे जाणा सतजन । सर्वत्र सपूर्ण गगन जैसे ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा — आणिका–इतराचा, सिंधू–समुद्र, गगन–आकाश

अर्थ — गगेच्या पाण्याला पाठ व पोट असा फरक काही नसतो अमृताच्या ठिकाणी एकही दोष नसतो १ सूर्य, दिवा व हिरा हे काळोखास जाणतात काय ? उलट त्याच्यामुळे इतराचा काळोखी मात्र नाहीशी होते २ कापूर कितीही कांडला तरी कधी त्याच्या पासून कोंडाकणी निघेल का ? समुद्रात कितीही पाणी आणखी मिळविले तरी त्याची वाढ होईल का ? ३ परिस व चिंतामणी हे इतराच्या गुणानी कधी पालटत नाहीत तेच इतरांचे गुण पालटवितात. ४ तुकाराम महाराज म्हणतात, आकाश जसे सर्वत्र व परिपूर्ण असते, त्याप्रमाणे सत लोक असतात, असे तुम्ही जाणा ५

१७९७　परिस काय धातु परिस काय धातु । फेडितो निभ्रातु लोहपागु ॥ १ ॥
काय तयाहूनि जालासी वापुडें । फेडिता साकडें मासें एक ॥ २ ॥
कल्पतरु कोड पुरवितो रोकडा । चिंतामणि खडा चिंतिले तें ॥ ३ ॥
चदनांच्या वासें वसता चदन । होती काष्ठ आन वृक्षयाती ॥ ४ ॥
काय त्याचे उणें जालें त्यासी देता । विचारीं अनता तुका म्हणे ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा — लोहपांगु–लोखडाचे हीनत्व, साकडें–सकट, कोड–इच्छा, आन–इतर, विचारी–विचार कर

---

१ बोल्ता हें सिद्ध २ नाशे

अर्थः— परीस धातूला लागल्यावर काय त्याचे सोने बनवून टाकीत नाही? लोखंडाचे हीनत्व तो निःसंशयच दूर करीत असतो. १ देवा, माझे संकट दूर करण्यात तू त्या परिसापेक्षा कमी शक्तिमान झालास की काय? २ कल्पतरू हा इच्छिलेली वस्तू देऊन प्रत्यक्षाचे समाधान देतो चिंतामणीचे रत्न जे चिंतावे ते आपणास देते ३ चंदनाच्या वासामुळे त्याच्या भोवती असलेले इतर वृक्षवेलीही चंदनाप्रमाणे सुगंधित होऊन जातात. ४ या सर्व वस्तूंनी इतरांना खूप दिले, म्हणून काय त्यांना काही उणे पडले की काय? याचा देवा, अनंता, तूच विचार कर. ५

१७९८ तोडुनि पुष्पवटिका फळवृक्षयाती। बामळा राखती करूनि सार ॥ १ ॥
कोण हित तेणें देखिलें आपुलें। आणिक पाहिलें सुख[1] काई ॥ २ ॥
धान्यें बीजें जेणें जाळिलीं सकळें। पेरितो काळें जिरें बीज ॥ ३ ॥
मोडोनियां वाटा पुढिलांची सोय। आडरानें जाय घेउनि लोकां ॥ ४ ॥
विषाचें अमृत ठेवूनियां नाम। करितो अधम ब्रह्महत्या ॥ ५ ॥
तुका म्हणे त्यास नाइके सांगतां। तया हाल करितां पाप नाहीं ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा — पुष्पवटिका–फुलाची बाग.

अर्थ — जे फुलाची व फळांची बाग तोडतात व बाभळीच्या झाडांचे रक्षण करतात १ त्यांनी असे करण्यात कोणते हित पाहिलेले असते? त्यांना यात सुख तरी कोणत्या प्रकारचे वाटते? २ धान्याचे बी ज्याने सर्वच्या सर्व जाळून टाकले व शेतात कडू जिरे व कारळे याचीच पेरणी केली तर कोणते हित होणार? ३ पुढे येणारांची सोय करणाऱ्या वाटा मोडून टाकून सर्व लोकांना आड रानात घेऊन जाणाऱ्याचा फायदा काय? ४ विषाला अमृताचे नाव देऊन ते ब्राह्मणाला दिल्याने काय फायदा होणार? उलट त्याला ब्रह्महत्येचे पातकच लागणार. ५ तुकाराम महाराज म्हणतात, अशी कृत्ये करणाऱ्या माणसाने जर सांगितलेले ऐकले नाही, तर त्यास हालअपेष्टा दिल्यास पाप लागणार नाही. ६

१७९९ संसाराच्या भेणें। पळों न लाहेसें केलें ॥ १ ॥
जेथें तेथें आपण आहे। आम्ही करावें तें काये ॥ २ ॥
एकांतीसी[2] ठाव। तीहीं लोकीं नाहीं वाव ॥ ३ ॥
गांवा जातों ऐसें। न लगे म्हणावें तें कैसें ॥ ४ ॥
स्वप्नाचे परी। जागा पाहे तंव घरीं ॥ ५ ॥
तुका म्हणे काये। तुझें घेतलें म्यां आहे ॥ ६ ॥

काय पंगतीस कोंडा । एकांतासी साकरमांडा ॥ ३ ॥
काय एकपण । पोतां घालुनि गांठी खूण[1] ॥ ४ ॥
काय घ्यावें ऐसें । तया आपण अनारिसें ॥ ५ ॥
तुका म्हणे मधीं[2] । आतां तोडूं भेद बुद्धी ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा:— विशीं–संबंधी, पोतां–पदरामधील, अनारिसें–वेगळे

अर्थ:– देवा, तुम्ही पतितांना तारण्यासाठी उत्सुक असता असे ऐकतो, मग माझ्या संबधीच एवढे निष्ठुर कसे झाला हो ? १ तुम्ही आपल्या भक्तांना जी कृपा दिलीत, तीच मलाही तुम्ही द्यावी. तेच प्रेम मला तुम्ही द्यावे. १ एकांतात एखाद्यास साखरमांडाचावे जेवण द्यायचे व बाहेर पंगतींतील इतर लोकाना मात्र कोंडा वाढायचा, हे बरे दिसते का देवा ? ३ पदरामधील धन गाठ मारून लपवून ठेवायचे ही काय एकत्वाची खूण आहे ? ४ आपणांला एक व दुसऱ्याला वेगळेच, हे तुझे करणे काय बरोबर आहे ? ५ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, आता तुमच्यात व माझ्यात असलेली भेदबुद्धी दूर करू या. ६

१८०१ चित्त तुझ्या पायीं । ठेवुनि जालों उतराई ॥ १ ॥
परि तूं खोटा केशीराजा । अंतपार न कळे तुझा ॥ २ ॥
आम्ही सर्वस्वें उदार । तुज देऊनियां धीर ॥ ३ ॥
इंद्रियांची होळी । संवसार दिला बळी ॥ ४ ॥
न पडे विसर । तुझा आम्हां निरंतर ॥ ५ ॥
प्रेम एकासाटीं । तुका म्हणे न वेचे[3] गांठी ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा:— अंतपार–सीमा, मर्यादा, एकासाटीं–एकामुळे, एकाशिवाय.

अर्थ:– देवा, तुझ्या पायांवर मी माझे चित्त अर्पून आता उतराई झालो आहे. १ पण केशीराजा, तू आता खोटाच आहेस. तुझ्या स्वभावाची सीमा कळत नाही, अदाज लागत नाही. २ आम्ही आमचे सर्वस्व तुला अर्पण करून उदार झालो आहोत. ३ इंद्रियादिकांच्या विषयांची होळी करून आम्ही आमच्या संसाराचा बळी दिला. ४ तुझा मला विसर कधीच होणार नाही. ५ तुकाराम महाराज म्हणतात, तुझ्या एकाशिवाय मी माझ्याजवळचे प्रेम कुणालाच कधी दिलेले नाही ६

१८०२ आम्ही पतित म्हणोनि तुज आलों शरण । करितों चिंतन दिवस रात्रीं ॥
नाहीं तरी मज काय होती चाड । धरावया भीड तुज चित्तीं ॥ १ ॥
आम्हां न तारावें तुम्ही काय करावें । सांगीजोजीं मावें नारायणा ॥ २ ॥
अन्याय एकाचा अंगीकार करणें । तया हातीं देणें लाज तेचि ।
काय तें शूरत्व मिरवूनि बोलणें । जगामाजी दावणें बळरया ॥ ३ ॥
पोहप्या अग्रछत्र घालूनियां घरीं । दंडितो बाहेरी आलियासी ।
नव्हे कीर्ति कांहीं न मानें लोकां । काय विटंबणा तैसी ॥ ३ ॥
प्रत्यक्षासी काय द्यावें हें प्रमाण । पाहातां दर्पण साक्ष काई ।
तुका म्हणे तरी आम्हां कां न कळे । तरलों किंवा आम्ही नाहीं ॥ ५ ॥

---

१ धन २ मधी ३ बजे

शब्दार्थ व टीपा :– चाड–कारण, जरूरी, पोहधा–पाणपोया, कीर्त–कीर्ती, दर्पण–आरसा.

अर्थ :– देवा, आम्ही पापी असल्यामुळेच तुला शरण आलो आहोत. रात्रंदिवस तुझेच चिंतन आम्ही करीत आहोत नाही तर तुझी भीड धरण्याची काय जरूरी मला होती ? १ आमचे रक्षण न कराल तर देवा, तुम्ही काय करणार आहात ? नारायणा, तुम्ही मला हे माय मनात धरून सांगा ना २ एखाद्याचा स्वीकार करून त्याला दुसऱ्याच्याच हाती देणे हे लाजिरवाणे काम आहे. नुसते तोंडाने वडबड करण्यात कसले शूरत्व आले आहे ? जगामध्ये असल्या शाब्दिक बळाची काय किंमत आहे ? ३ घरात अन्नछत्र व पाणपोया घालून दारात बाहेर उभे राहणारास मात्र जो दंड करतो, त्याची कधीही कीर्ती होणार नाही. लोकांनाही त्याचे हे करणे मान्य होणार नाही. ही एक विटंबनाच होईल ४ प्रत्यक्षाला काही प्रमाण द्यावे लागते का ? एकदा आरशात पाहिल्यावर दुसऱ्याच्या साक्षीचा उपयोग तरी काय ? तुकाराम महाराज म्हणतात, आम्ही तरलो किंवा नाही हे आम्हांस का समजत नाही ? ५

१८०३ काग वग रिठा मारिले बाळपणीं । अवघी दैत्यखाणी बुडविली ॥ १ ॥
तो मज दावा तो मज दावा । नंदानंदन जीवा आवडे[1] तो ॥ २ ॥
गोवर्धन गिरी उचलिला करीं । गोकुळ भीतरी राखियेलें ॥ ३ ॥
वधुनि भोमासुरा आणिल्या गोपांगना । राज्य उग्रसेना मथुरेचें ॥ ४ ॥
पाडव जोहरीं राखिले कुसरी । विवराभीतरीं चालविले ॥ ५ ॥
तुका म्हणे हा भक्तांचा कृपाळ । दुष्टजना काळ नारायण ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – काग–एक असुर, बग–कमाच्या पक्षातील एक असुर, रिठा–एका असुराचे नाव, नंदानंदन–नंदाचा मुलगा श्रीकृष्ण, भोमासुर–नरकासुर नावाच्या राक्षसास, जोहरीं–लाक्षागृहातून, कुसरी–कुशलतेने.

अर्थ :– या श्रीकृष्णाने लहानपणीच काग, बग, रिठा, इत्यादी असुरांना ठार मारून दैत्यांची खाणच नष्ट केली १ तो श्रीकृष्ण मला दाखवा ना हो ! नंदाचा मुलगा तो कृष्ण माझ्या जीवास फारच आवडतो २ याच श्रीकृष्णाने आपल्या हाताच्या बोटावर गोवर्धन पर्वत उचलून सर्व गोकुळाचे रक्षण केले ३ नरकासुराचा वध करून याने गोकुळातील गोपींची सुटका केली. मथुरेचे राज्य उग्रसेनास दिले ४ जळणाऱ्या लाक्षागृहातून मोठ्या चतुराईने यानेच पांडवांचे रक्षण केले. त्यांना विवरातून सुखरूपपणे याने बाहेर आणले. ५ तुकाराम महाराज म्हणतात, असा हा देव भक्तांचा कनवाळू असून दुष्ट लोकांचा काळ आहे. ६

विवरण— देव हा भक्तांची संकटे कशी निवारण करितो, याची उदाहरणे तुकाराम महाराजांनी अनेक अभंगातून दिलेली आहेत. या अभंगात भगवान श्रीकृष्णाने लहानपणीच जी प्रचंड कृत्ये करून असुरांचा नाश व भक्तांचे रक्षण केले त्याचा उल्लेख आहे. काग, बग, रिठा हे कंसपक्षाकडील दैत्य श्रीकृष्णाने मारिले बक किंवा बग हा कंसाकडील एक प्रमुख दैत्य श्रीकृष्णाचा वध करण्यासाठी गोकुळात बगळ्याचे रूप घेऊन आला होता. कृष्ण आपल्या मित्रांबरोबर वनात क्रीडा करीत असताना याने त्याला गिळून टाकले. परंतु कृष्णाने त्याच्या अंगाचा दाह करायला सुरवात केल्यावर याने श्रीकृष्णास जमिनीवर सोडल्यावर श्रीकृष्णाने त्याचा जबडा चिरून ठार केल्याची कथा भागवतात आहे. गोकुळातील गोवर्धन पर्वत आपल्या करंगळीवर धारण करून श्रीकृष्णाने गोकुळवासीयांचे रक्षण केल्याचे प्रसिद्धच आहे गोकुळात दरवर्षी इंद्राचा उत्सव होत असे, पण इंद्राचा गर्व दूर व्हावा या हेतूने श्रीकृष्णाने एकदा गाई व पर्वत यांचाच उत्सव करण्याचे ठरविले, इंद्रास या गोष्टीचा भारी राग येऊन त्याने गोकुळावर अकाटपणे पर्जन्यवृष्टी केली. तेव्हा कृष्णाने सर्व गोकुळवासीयांना गोवर्धनपर्वताच्या आश्रयास नेऊन त्यांचे रक्षण केले. कंसाचा वध करून राज्य उग्रसेनास दिल्याचेही प्रसिद्ध आहे. भोमासुर म्हणजे नरकासुर– हा प्राग्ज्योतिषपुरचा राजा. भूमिपुत्र म्हणून याचे भोमासुर हे नाव होते. भूदेवीने विष्णूस प्रसन्न करून घेऊन

[1] आवडतो.

यास वैष्णवास्त्र मिळवून दिल्यामुळे हा मदमत्त झाला होता अनेक प्रकारची उत्तमोत्तम रत्ने आणि विविध प्रकारचे दागदागिने याने मिळविले होते गधर्व, देव, अप्सरा, गोकुळातील गोपकुमारी अशा सोळा हजार कन्या हरण करून याने त्यांना अलका नगरीजवळ मिणिपर्वतावर ठेविल्या होत्या त्यांची विक्री करून धन मिळविण्यासाठी त्याचा बेत असावा श्रीकृष्णाने या दीन व सकटग्रस्त स्त्रियाची सुटका करण्यासाठी भौमासुरावर स्वारी करण्याचे ठरविले निसुद, हयग्रीव, विरूपाक्ष इत्यादी अनेक दैत्याना ठार मारून श्रीकृष्णाने प्राग्ज्योतिपपुरावर स्वारी केली आपल्या सुदर्शनचक्राने नरकासुराचा वध करून त्याच्या बदिवासात असलेल्या सोळा हजार कुमारिकाची कृष्णाने सुटका केली पाडवाना नष्ट करण्यासाठी कौरवानी एक लाक्षागृह तयार केले होते त्यातून श्रीकृष्णाच्या चातुर्याने ते सुखरूप बाहेर पडल्याची कथाही महाभारतात प्रसिद्ध आहे

१८०४ तुजविण देवा । कोणा म्हणे माझी जिव्हा ॥ १ ॥
तरि हे हो का शतखड । पडो झडोनिया राड ॥ २ ॥
काहीं इच्छेसाटीं । करिल वळवळ करटी ॥ ३ ॥
तुका म्हणे कर । कटीं तयाचा विसर ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – जिव्हा–जीभ, खड–तुकड, कर–हात, कटीं–कमरेवर

अर्थ – देवा, तुझ्याशिवाय माझी जीभ कुणाचे स्मरण करील ? १ ती इतरांचे स्मरण करील तर तिचे शभर तुकडे होऊ देत ती राड झडून जाऊ देत २ कुठली तरी लौकिक इच्छा धरून ती वळवळ करील तर ती करटी समजावी ३ तुकाराम महाराज म्हणतात ज्याचे हात कमरेवर आहेत अशा पाडुरगाचा तिला विसर पडेल तर तिची अवस्था अशीच होईल ४

१८०५ आम्हा सर्वभावें हेंचि काम । न विसभावें तुझें नाम ॥ १ ॥
न लगे करावी हे चिंता । तरणें करणें काय आता ॥ २ ॥
आसनीं भोजनीं शयनीं । दुजें नाहीं ध्यानीं मनीं ॥ ३ ॥
तुका म्हणे कृपानिधी । माझी तोडिली उपाधी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – विसबावें–विसरावे, सोडावे

अर्थ – देवा, तुझ्या नामाचा कधीच विसर पडू नये व तुझे नामस्मरण आम्ही सदैव करावे, हेच एक आमचे काम आहे १ तरून जाण्यासाठी काही करावे हे आता आमच्याकडे उरलेच नाही आता आम्हाला कसलीच चिंता उरलेली नाही २ आम्ही आसनावर असलो तरी भोजन करीत असलो तरी, अथरुणावर झोपण्याच्या तयारीत असलो तरी तुझेच रूप देवा, आमच्या ध्यानी मनी असते दुसरे काहीही मनात येतच नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, कृपानिधी देवा प्रपचासबधीची सर्व उपाधी तुम्ही माझी तोडून टाकली ४

१८०६ नव्हे काहीं कवणाचा । भाव जाणवला साचा ॥ १ ॥
म्हणोनि तुझ्या पायीं । जीव ठेविला निश्चयीं ॥ २ ॥
शरीर जायाचें कोंपट । याची काय खटपट ॥ ३ ॥
तुका म्हणे वायांविण । देवा कळों आला सीण ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा– साचा–खरोखर, कोंपट–गवताची झोपडी

---

१ करी

अर्थः- देवा, मी तसा कुणाचाच नाही, हा भाव मला खरोखरच समजून आला आहे. १ म्हणूनच देवा, निश्चय करून मी माझा जीव तुझ्या पायांवर ठेविला आहे २ पंचमहाभूतांचे हे शरीर गवताच्या झोपडीप्रमाणे एके दिवशी जळून जाणार आहे ; याचे रक्षण करण्यासाठी खटपट करून काय उपयोग ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, देहादी प्रपंचाचे रक्षण करण्याचा साराच प्रयत्न व्यर्थ असून त्यात केवळ शीणच असल्याचे देवा, मला कळून आले आहे. ४

१८०७ रज्जु धरूनियां हातीं । भेडसाविलीं नेणतीं ।
कळों येतां चित्तीं । दोरी दोघां सारिखी ॥ १ ॥
तुम्हांआम्हांमध्यें हरी । जाली होती तैसी[1] परी ।
मृगजळाच्या पुरीं । ठाव पाहों तरावया ॥ २ ॥
सरी चिताक[2] भोंवरी । अळंकाराचिया परी ।
नामें जालीं दुरी । एक सोनें आटितां ॥ ३ ॥
पिसांचीं पारवीं । करोनि बाजागिरी दावी ।
तुका म्हणे तेवीं । मज नको चाळवूं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – रज्जू–दोरी, भेडसाविली–भीती दाखविली, परी–प्रकार, बाजागिरी–जादूगार, गारुडी, चाळवूं–फसवू.

अर्थ – कुणी एखाद्याने हातात दोरी धरून हा साप आहे अशी भीती नेणत्या मुलांना दाखविली तर ती फसतीलच. पण ही दोरी आहे, साप नव्हे हे समजताच भीती नाहीशी होते व दोघांनाही दोरीचा अनुभव सारखाच येतो. १ श्रीहरी, असाच प्रकार तुमच्या व माझ्या संबंधात घडला आहे केवळ मृगजळाच्या पुरात न सापडून तरून जाण्याचा आश्रय शोधण्याचा मार्ग मी शोधीत आहे २ सरी, चितांक, बुगडी हे दागिन्यांचे प्रकार वेगवेगळे असले तरी, त्यांची नावे निरनिराळी असली तरी त्यांना, मुशीत घालून आटविल्यावर नामांची भिन्नता दूर होऊन नुसते सोने मात्र उरते ३ तुकाराम महाराज म्हणतात, एखादा गारुडी पिसांचा पारवा करून दाखवितो, तो काही खरा नसतो, त्याप्रमाणे देवा, तुम्ही मला फसवू नका ५

१८०८ नेघें तुझें नाम । न करीं सांगितलें काम ॥ १ ॥
वाढे[3] वचनें वचन । दोष उच्चारितां गुण ॥ २ ॥
आतां तुझ्या घरा । कोण करी येरझारा ॥ ३ ॥
तुका म्हणे ठायीं । मजपाशीं काय नाहीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपाः–नेघे–घेत नाही

अर्थः–देवा, मी काही आता तुझे नाव घेणार नाही, की तू सांगितलेले कामही करणार नाही. १ कारण तुझ्या गुणदोषाचा उच्चार केला की, उगीच बोलण्याने बोलणे मात्र वाढते २ आता तुझ्या घराकडे कोण हेलपाटे घालणार ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, आता माझ्या ठिकाणी येथें बसल्या बसल्याच काय नाही ? ४

१८०९ व्यवहार तो खोटा । आतां न वजों तुझ्या वाटा ॥ १ ॥
एका नामा नाहीं ताळ । केली सहस्रांची माळ ॥ २ ॥
पाहों जातां घाई । खेळसी लपंडाई ॥ ३ ॥
तुका म्हणे चार । बहु करितोसी फार ॥ ४ ॥

[1] ऐसी, २ चितांक, ३ वाटे.

शब्दार्थ व टीपा:-- न वजों-जाणार नाही, चार-वेडेचार, चेष्टा.

अर्थ.-- देवा, तुझा सारा व्यवहारच खोटा आहे रे. आता मी काही तुझ्या वाटेला जाणार नाही. १ कारण तुला काही एकच नाम नाही; एकाच नामाचा मेळ काही बसत नाही सहस्र नामांची माळ तुझ्यासाठी आहे. २ तुला कुठे एका ठिकाणी शोधावे तर तू तेथे सापडत नाहीस, असा लपंडाव खेळतोस तू. ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा प्रकारे देवा, तू फार चेष्टा करितोस. ४

१८१० लटिकाचि केला । सोंग पसारा दाविला ॥ १ ॥
अवघा बुडालासी ऋणें । बहुतांचें देणें घेणें ॥ २ ॥
लावियेलीं चाळा । बहु दावूनि पुतळा ॥ ३ ॥
तुका म्हणे हात । आम्ही अवरिली मात ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:-- लटिकाची-खोटाच, मात-बोलणे, भाषण.

अर्थ:--देवा, तू अनाथनाथ, पतितपावन अशी नावे धारण करून उगाचच सोंग संपादन केले आहेस. १ पुष्कळ भक्तांच्या सेवेच्या ऋणाने तू बुडून गेला आहेस. तुझ्याकडून अनेकांचे देणेघेणे उरले आहे. २ देवा, पुतळ्या, तू पुष्कळांना लोभ दाखवून फसविले आहेस ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, आता याविषयी आम्ही हात व बोलणे आवरून घेतो ४

१८११ दाखवूनि आस । केला बहुतांचा नास ॥ १ ॥
थोंटा झोंडा शिरोमणी । भेटलासी नागवणी ॥ २ ॥
सुखाचें उत्तर । नाहीं मुदलासी थार ॥ ३ ॥
तुका म्हणे काय । तुझें घ्यावें उरे हाय ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा -- आस-आशा, नास-नाश, थोटा-कुभांडी, ठक, झोंडा-दाडगा, निलाजरा, नागवणी-फसविणारा, थार-आधार

अर्थ:-- देवा, आजपर्यंत तू पुष्कळांना आशा लावून फसविले आहेस. अनेकांचा तू नाश केला आहेस. १ असा तू कुभांडी व निलाजऱ्या लोकांचा शिरोमणी आहेस सर्वांना फसविणारा भेटला आहेस तू. २ आमच्या सेवेच्या ऋणाचे जे मुद्दल देवा तुझ्याजवळ आहे, त्याविषयी आधार वाटेल असे सुखाचे उत्तरही तू कधी देत नाहीस. ३ तुकाराम महाराज म्हणतात, तुझे आम्ही काय घ्यावे रे ? शेवटी हाय हाय करणे एवढेच मात्र उरणार आहे. ४

१८१२ लाज ना विचार । बाजारी तूं भांडखोर ॥ १ ॥
ऐसें ज्याणें व्हावें । त्याची गांठी तुजसवें ॥ २ ॥
फेडिसी लंगोटी । घेसी सकळांसी तुटी ॥ ३ ॥
तुका म्हणे चोरा । तुला आप ना दुसरा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा -- गांठी- भेट, तुटी-वैर, आप-स्वतःचा, आपले.

अर्थ:-- देवा, तुला पराची लाज नाही की विचार नाही. बाजारात बसून भांडण करणारा तू आहेस १ तुझ्यासारखाच जो भांडखोर असेल त्याची व तुझी भेट ठीक होईल. २ तू लंगोटी फेडून सगळ्यांशीच वैर धाकरतोस ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, चोरा, तुला आपले व परक्याचे असे काही उरतच नाही. ४

१८१३ ठाय नाहीं बुड । घरें वसविसी कुड ॥ १ ॥
भलते ठायीं तुझा वास । सदा एरवी उदास ॥ २ ॥
जागा ना निजेला । धाला ना भुकेला ॥ ३ ॥
न पुसतां भलें । तुका म्हणे बुझें बोलें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:— बुड-मूळ, कुड-झोपडी, धाला-तृप्त, बुसे-समजतोस

अर्थ:— देवा, तुझ्या मुळाचा शोध लागता लागत नाही. पृथ्वीवर सर्वत्र घरे व झोपड्या असून तू मात्र अदृश्यच राहिलास १ कोणत्याही ठिकाणी तुझा निवास असतो. तू नेहमीच उदास वृत्तीने असतोस. २ तू धड जागाही नाहीस, झोपलेलाही नाहीस. तू धड थकेलेला नाहीस, की तृप्त झालेलाही नाहीस. ३ तुकाराम महाराज म्हणतात, तू कुणालाही न विचारताही समजतोस व बोलतोस. ४

१८१४ श्वाना दिली सवे। पायांभोंवतें तें भोंवे ॥ १ ॥
तैसी जाली मज परी। वसे निकट सेजारीं ॥ २ ॥
जेवितां जवळी। येऊनियां पुच्छ घोळी ॥ ३ ॥
कोपेल तो धनी। तुका म्हणे नेणें मनीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा —सवें-लाडाची सवय, भोंवे-घोटाळते, परी-प्रकार.

अर्थ — मालकाने आपल्या कुत्र्याला सारखी गोंजारण्याची, लाडाची सवय केली की ते सतत त्याच्या पायांशीच घोटाळते १ तसा देवा माझाही प्रकार झाला आहे. मी तुझ्या अगदी जवळ वास्तव्य करून बसलो आहे २ मालक जेवायला बसला की कुत्रे त्याच्याजवळ येऊन बसते व एकसारखी शेपटी हालविते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, आपल्या या करण्याने आपला मालक रागावेल हे त्याच्या ध्यानातच येत नाही. माझीही तशीच अवस्था झाली आहे. ४

१८१५ वटवट केली। न विचारितां मना आली ॥ १ ॥
मज कराल तें क्षमा। कैसें नेणों पुरुषोत्तमा ॥ २ ॥
उचित न कळे। जिव्हा भलतेंचि बरळे ॥ ३ ॥
तुका म्हणे कांहीं। लौकिकाची चाड नाहीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा — न विचारतां-विचार न करता, चाड-पर्वा, गरज.

अर्थ — मनात कसलाही विचार न करता देवा, मनात आले त्याप्रमाणे उगाच शब्दांची वटवट केली १ पुरुषोत्तमा, याची मला तुम्ही क्षमा कशी कराल हेच मला काही समजत नाही २ योग्यायोग्य न समजल्यामुळे माझी जीभ हवेतसे बरळते ३ तुकाराम महाराज म्हणतात, मला थोडी सुद्धा लौकिकाची पर्वा नाही ४

१८१७ आतां पंढरीराया । माझ्या निरसावें भया ॥ १ ॥
मनीं राहिली आशंका । स्वामिभयाची सेवका ॥ २ ॥
ठेवा माथां हात । कांहीं बोला अभयमात ॥ ३ ॥
तुका म्हणे लाडें । खेळें ऐसें करा पुढें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा -- निरसावें-दूर करावे, अभयमात-अभयाची गोष्ट.

अर्थः— पंढरीनाथा, आता माझे भय तुम्ही दूर करावे. १ देवा, मी तुमचा सेवक असल्याने स्वामी रागावेल की काय ? अशी शंका माझ्या मनात उरली आहे. २ यासाठी माझ्या मस्तकावर तुम्ही हात ठेवा व अभयाची गोष्ट माझ्याजवळ बोला. ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी तुमच्यापुढे कौतुकाने व लाडाने खेळेन असे करा ४

१८१८ कवतुकवाणें । बोलों बोबडया वचनें ॥ १ ॥
हें तों नसावें अंतरीं । आम्हां[1] धरायाचें दुरी ॥ २ ॥
स्तुति तैसी निंदा । माना समचि गोविंदा ॥ ३ ॥
तुका म्हणे बोले । मज तुम्ही शिकविले ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा — अंतरीं-मनात.

अर्थ -- देवा, तुमच्याजवळ मी मोठ्या कौतुकाने व बोबड्या बोलाने बोलत आहे. १ आज मला दूर ठेवण्याचे तुम्ही देवा, मनात देखील आणू नका. २ गोविंदा, स्तुती अथवा निंदा यांना तुम्ही समान माना. ३ तुकाराम महाराज म्हणतात, तुम्ही मला जे शिकविले आहे तेच मी बोलत आहे. ४

१८१९ असो मागें जालें । पुढें गोड तें चांगलें ॥ १ ॥
आतां माझे मनीं । कांहीं अपराध न मनीं ॥ २ ॥
नेदीं अवसान । करितां[2] नामाचें चिंतन ॥ ३ ॥
तुका म्हणे बोले । तुज आधींच गोविले ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा — न मनीं-मानू नकोस, मनात ठेवू नकोस, नेदीं-देऊ नकोस, अवसान-विश्रांती, विसावा, गोविलें-गुतवून ठेविले

अर्थ .-- देवा, आतापर्यंत जे झाले ते झाले, यापुढे तरी चांगले भाषण मी करीन. १ आता येथून पुढे माझे अपराध काही मनात तुम्ही ठेवू नका. २ तुमच्या नामाचे चिंतन करताना आता देवा, मला विसावाच घेऊ देऊ नकोस ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, मी या वचनाने तुला यापूर्वीच गुतवून ठेविले आहे. ४

१८२० मातेविण बाळा । आणिक न माने सोहळा ॥ १ ॥
तैसें जालें माझ्या चित्ता । तुजविण पंढरिनाथा ॥ २ ॥
वाट पाहे मेघा बिंदु । नेघे चातक सरिता सिंधु ॥ ३ ॥
सारसांसी निशीं । ध्यान रवीच्या प्रकाशीं ॥ ४ ॥
जीवनाविण मत्स्य । जैसें धेनूलागीं वत्स ॥ ५ ॥
पतिव्रते जिणें । भ्रताराच्या वर्त्तमानें ॥ ६ ॥
कृपणाचें धन । लोभालागीं जैसें मन ॥ ७ ॥
तुका म्हणे काय । तुजविण प्राण राहे ॥ ८ ॥

---

१ आता, २ करी.

शब्दार्थ व टीपा — न माने-मानवत नाहीत, नेघे-घेत नाही, सरिता-नदी, सिंधू-समुद्र, सारसांसी-सारस पक्ष्यांना, जीवनावीण-पाण्याशिवाय

अर्थ — आईशिवाय बाळाला इतर सुखोपचार मानवतच नाहीत १ पंढरीनाथा, माझ्या चित्तास अशा-प्रमाणेच अवस्था प्राप्त झाली आहे २ चातकपक्षी मेघातून स्वाती नक्षत्राचे बिंदू केव्हा पडतील याचीच वाट पाहात असतो, त्याला नदी किंवा समुद्र यांच्या पाण्याची जरूरी नसते ३ सारस पक्षी मादीच्या भेटीसाठी रात्र-भर नदीच्या एका तीराला ओरडून सूर्योदयाचीच वाट पाहत असतो ४ पाण्यावाचून मासा अथवा धेनूवाचून वासरू जसे तडफडते, तशीच माझी अवस्था झाली आहे ५ गावी गेलेल्या पतीच्या वातमीनेच पतिव्रता स्त्रीस जिणे सुसह्य होते ६ कृपण माणसाचे मन धनाच्या लोभाने तळमळते ना ? ७ तुकाराम महाराज म्हणतात, त्याचप्रमाणे देवा, तुझ्याशिवाय काय माझे प्राण टिकून राहतील ? ८

१८२१ तुजऐसा कोणी न देखें उदार । अभयदानशूर पांडुरंगा ॥ १ ॥
शरण येती त्यांचे न विचारिसी दोष । न मागता त्यास अढळ देसी ॥ २ ॥
धावसी आडणीं ऐकोनियां धावा । कइवारें देवा भक्तांचिया ॥ ३ ॥
दोष त्यांचे जाळी कल्पकोटिवरी । नामासाटीं हरि आपुलिया ॥ ४ ॥
तुका म्हणे तुज वाणूं कैशा परी । एक मुख हरी आयुष्य थोडें ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा — अढळ-स्थिर अविनाशी पद, आडणीं-संकटाच्या वेळी

अर्थ — पांडुरंगा, भक्तांना अभय देण्यात तुझ्यासारखा दानशूर कुणीच नाही तुझ्यासारखा उदार मी कुणी पाहिलाच नाही १ जे तुला शरण आले आहेत त्यांच्या दोषांचा तू विचारच कधी करीत नाहीस त्यांना न मागताच तू अविनाशी पद देतोस २ भक्तजनांनी संकटाच्या वेळी केलेला धावा तू ऐकतोस व त्यांच्या कैवारा साठी धावून येतोस ३ जे कुणी देवा तुझे नामस्मरण करतात, त्यांचे दोष कोट्यावधी असले तरी ते तू जाळून टाकतोस ४ तुकाराम महाराज म्हणतात, तुला मी कोणत्या प्रकाराने वर्णू ? कारण वर्णन करण्यास मला एकच तोंड असून आयुष्यही फार थोडे लाभले आहे ५

१८२२ काय तुझे उपकार पांडुरंगा । सांगों मी या जगामाजी आता ॥ १ ॥
जतन हे माझें करूनि संचित । दिले अवचित आणूनिया ॥ २ ॥
घडल्या दोषांचे न घलीच भरी । आली यास थोरी कृपा देवा ॥ ३ ॥
नव्हतें ठाउके आइकिले नाहीं । न मगता[1] पाहीं दान दिले ॥ ४ ॥
तुका म्हणे याच्या उपकारासाटीं । नाहीं माझे गांठी काहीं एक ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा — गांठी-स्वाधीन, पदरी

अर्थ — पांडुरंगा, तुझे उपकार मी जगामध्ये सांगू तरी किती ? १ माझे जन्मांतरीचे पुण्य जतन करून तूच अवचितपणे आणून हातात दिले आहेस २ जे दोष माझ्या हातून घडले असतील त्यांच्या भरीस माझी पुण्याई तू घातली नाहीस, हीच देवा, तुझी मोठी कृपाच समजायला हवी ३ मला कधी माहीत नव्हते, मी कधी एकले नव्हते, असे हे दान न मागता तू आणून दिले आहेस ४ तुकाराम महाराज म्हणतात, या देवाच्या उपकाराची फेड करण्यासाठी माझ्या पदरी काही मुद्धा नाही ५

१८२३ वाळूनिया जन सांडी मज दुरी । करिसील हरी ऐसें कधीं ॥ १ ॥
आठवीन पाय धरूनि अनुताप । वाहे जळ झोंप नाहीं डोळा ॥ २ ॥

[1] मागता

नावडती जीवा आणीक प्रकार । आवडी ते फार एकांताची ॥ ३ ॥
तुका म्हणे ऐसी धरितों वासना । होईं नारायणा साह्य मज ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:— पाळूनियां-मोडून

अर्थ:— श्रीहरी, हे सर्व लोक मला सोडून जातील व मी दूर एकांतात एकटाच राहीन असे तू कधी करशील रे? १ असे घडल्यावर मी पश्चात्तापयुक्त होऊन तुझ्याच पायांचे चिंतन करीन, यामुळे माझ्या डोळ्यांना ओघ नसून त्यांतून एकसारखे पाणी ओघळत राहाते २ देवा, माझ्या जीवास यालेरीज दुसरे विषय कोणतेच आवडत नाहीत रे. मला फक्त एकांताचीच फार आवड आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, नारायणा, आधीच माझ्या चित्ताने वासना धरली असल्यामुळे तुम्ही मला साह्य करावे. ४

१८२४ सांगतों या मना तें माझें नाइके । घातावरी टेंके चांडाळ हें ॥ १ ॥
म्हणऊनि पाहे तरतें बुडतें । न लाहे पुरतें बळ करूं ॥ २ ॥
काय तें संचित न कळे पाहातां । मतिमंदचित्ता उपजतें ॥ ३ ॥
तुका म्हणे ऐसें बळ नाहीं अंगीं । पाहोनियां वेगीं पार टाकीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:— घातावरी-घात करण्यासाठी, टेंके-टपले आहे, पार-पलीकडे

अर्थ:— मी माझ्या मनास पुष्कळ सांगून पाहातो, पण ते माझे मुळी ऐकतच नाही हे चांडाळ मन माझा घात करण्यासाठीच टपलेले असते १ मी आता तरणार की बुडणार, याचाच मी विचार करीत आहे, पण या दुष्ट मनापुढे माझे बळ काही चालत नाही २ माझे पूर्वसंचित कसे काय आहे, हे काही मला नीट कळत नाही. मी मतिमंद असल्यामुळे मला माझ्याच उद्धाराची आता चिंता वाटू लागली आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, या संसारसागराच्या पलीकडे मी आता तरून जाईन, असा बलवान विश्वास काही माझ्यात नाही. ४

१८२५ आतां नको चुकों आपुल्या उचिता । उदारा या कांता रखुमाईच्या ॥ १ ॥
आचरावे दोष हें आम्हां विहित । तारावे पतित तुमचें तें ॥ २ ॥
आम्ही तो आपुलें केलेंसे जतन । घडो तुम्हांकून घडेल तें ॥ ३ ॥
तुका म्हणे विठो चतुराच्या राया । आहे तें कासया मोडो देसी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा.— तुम्हांकून-तुमच्याकडून

अर्थ — रुक्मीणीच्या कांता कृपाळू पांडुरंगा, तू आता आपल्या उचित अशा कर्तव्यकर्मास चुकू नकोस. १ दोषाचे आचरण करावे हे आम्हा जीवाना योग्यच आहे आणि आमच्यासारख्या पतिताचा तुम्ही उद्धार करावा हे तुम्हास योग्य आहे २ दोष आचरण्याचे आम्ही आपले कर्तव्य केले आहे. देवा, आता तुमच्याकडून तुमचे कर्तव्य नीट व्हावे ३ तुकाराम महाराज म्हणतात, चतुर पुरुषांच्या हे राजा विठ्ठला, हा पूर्वीपासूनच चालत आलेला मार्ग तू का सोडून देत आहेस, जुना मार्ग तू सोडू नकोस ४

१८२६ मुखें बोलावें तें जीविचे जाणसी । विदित पायांपाशीं सर्व आहे ॥ १ ॥
आतां हेंचि भलें भाकावी करुणा । विनियोग तो जाणां तुम्ही त्याचा ॥ २ ॥
आपलें तों येथें केलें नव्हे कांहीं । साधनाच्या वांहीं पडों नये ॥ ३ ॥
तुका म्हणे देह दिला पिंडदान । वेळोवेळां कोण चिंता करी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – विदित-माहीत, वांहीं-मार्गात.

अर्थ:– देवा, आता आम्ही आमच्याच मुखाने काय बोलावे? आमच्या जीवाचे तुम्ही सर्व जाणीत आहातच आमचे सर्व काही तुमच्या पायांशी माहीत आहेच १ आता आम्ही तुमची करुणा भाकावी हेच चांगले आहे. याचा काय उपयोग होईल तो तुमचा तुम्हीच जाणावा २ आता या ठिकाणी आमचे काही केल्या चालेनासे झाले आहे,

म्हणून आता विविध प्रकारच्या इतर साधनांच्या मरीम पडणे नको ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी हा देहपिंड देवा, तुलाच दान म्हणून अर्पण केला आहे आता त्याच्याविषयी पुन पुन चिंता कोण करीत बसेल ? ,४

१८२७ कामातुरा भय लाज ना विचार । शरीर असार तृणतुल्य ॥ १ ॥
नवल हे लीळा करितयाचे लाघव । प्रारब्धें भाव दाखविले ॥ २ ॥
लोभालोभ एका धनाचिये ठायीं । आणिकाची सोई चाड नाहीं ॥ ३ ॥
तुका म्हणे मूक न विचारी प्रकार । योजे तेंचि सार ययाकाळें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – असार–खोटे, चाड–किमत, जरूरी

अर्थ – कामाने अंध झालेल्या माणसात भीती, लाज अथवा कसलाही विवेक उरत नाही मनातील इच्छित साध्य होण्यासाठी तो आपले शरीर नाशवंत, खोटे व तृणवत मानतो १ त्या कामातुर माणसाचे हे वागणे व हे कौशल्यपूर्ण लाघव नवलपूर्ण आहे प्रारब्धामुळेच हा सर्व भाव प्रकट झाला आहे २ कृपण माणसाचा लोभ फक्त एका धनाच्याच ठिकाणी असतो, त्याला इतराची कधी गरजच वाटत नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, मूक लागलेला मनुष्य चांगल्या–वाईट असाचा विचारच करीत नाही ऐन वेळेस जे मिळेल ते अन्न तो खात असतो ४

विवरण – वरील अभगातील पहिल्या चरणात कामातुर मनुष्याचे वर्णन तुकोबानी केले आहे ते वाचून ' कामातुराणां न भय न लज्जा ' या सुभाषिताची आठवण होते तुकाराम महाराजाना गीता, भागवत इत्यादी सस्कृत ग्रथाचा जसा परिचय होता, तसेच त्याचे सस्कृत वाचन, पठणही विविध प्रकारचे असावे अनेक सस्कृत सदर्भ, सुभाषिते, वाक्यार्थ त्याच्या अभगातून वारवार आलेली दिसतात

१८२८ बांधे सोडी हें तो धन्याचिये हातीं । हेकडें गोविती आपणा बळें ॥ १ ॥
भुललियासी नाहीं देहाचा आठव । धोतऱ्याने भाव पालटिला ॥ २ ॥
घरात रिघावे दाराचिये सोई । भिंतीसवे डोई घेऊनि फोडी ॥ ३ ॥
तुका म्हणे देवा गेलीं विसरोन । आता वर्म कोण दावी यासी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – हेकडें–हट्टी लोक, गोविती–गुतवून घेतात, धोतऱ्यानें–धोतऱ्याच्या बिया खाल्ल्यानी

अर्थ - कुणास बांधून ठेवणे अथवा सोडणे हे त्याच्या धन्याच्या स्वाधीन असते असे असता हे लोक व्यर्थच आग्रहाने स्वत स गुतवून घेतात १ धोतऱ्याचे बी खाऊन जे कुणी बेहोष झाले त्याना स्वत च्या देहाची स्मृती नसते या बियानी त्याचे सर्वच भाव पालटून टाकलेले असतात २ घरात जायचे असेल तर दरवाज्यातूनच गेले पाहिजे, नाही तर, भिंतीवर डोके आपटून फुटून जाईल ना ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, हे सर्व लोक तुला विसरूनच गेले आहेत आता खरे मर्म याना दाखविणार तरी कोण ? ४

१८२९ कवण जन्मता कवण जन्मविता । न कळे कृपावता माव तुझी ॥ १ ॥
कवण हा दाता कवण हा मागता । न कळे कृपावता माव तुझी ॥ २ ॥
कवण भोगिता कवण भोगविता । न कळे कृपावता माव तुझी ॥ ३ ॥
कवण ते रूप कवण अरूपता । न कळे कृपावता माव तुझी ॥ ४ ॥
सर्वां ठायीं तूंचि सर्व ही जालासी । तुका म्हणे यासी दुजें नव्हे ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा माव -माया

अर्थ -- कृपावता देवा, खरे म्हणजे जन्मणारा कोण ? जन्म देणारा कोण ? तुझी ही माया काही समजतच नाही १ कृपावता, मागणारा कोण आहे देणारा कोण आहे ? ही तुझी माया काही समजतच नाही- २ कृपावता

देवा, कोण भोगणारा आहे, भोगविता कोण आहे ? तुझी ही माया काही समजत नाही. ३ कृपावंता, देवा, कोण रूपवान आहे, कोण अरूपवान आहे ? मी तुझी माया कधी समजतच नाही. ४ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तूच सर्वांच्या ठिकाणी व्यापून राहिला आहेस, तुजवाचून या जगात दुसरे काही नाहीच. ५

१८३० जेथें देखें तेथें तुझीच पाउलें । विश्व अवघें कोंदाटलें ।
रूप गुण नाम अवघा मेघश्याम । वेगळें तें काय उरलें ।
जातां[1] लोटांगणीं अवघीच मेदिनी । सकळ देव पाट जालें ।
सदा पर्वकाळ सुदिन सुवेळ । चित्त प्रेमें असे धालें ॥ १ ॥
अवघा आम्हां तूंच जालासी देवा । संसार हेवा कामधंदा ।
न लगे जाणें कोठें कांहींच करणें । मुखीं नाम ध्यान सदा ॥ २ ॥
वाचा बोले ते तुझेचि गुणवाद । मंत्रजप कथा स्तुति ।
भोजन सारूं ठायीं फल तांबोल कांहीं । पूजा नैवेद्य तुज होती ।
चालतां प्रदक्षिण निद्रा लोटांगण । दंडवत तुजप्रति ।
देखोन दृष्टी परस्परें गोष्टी । अवघ्या तुझ्या मूर्ति ॥ ३ ॥
जाल्या तीर्थरूप वावी नदी कूप । अवघें गंगाजळ जालें ।
महाल मंदिरें माडचा तनघरें । झोपडचा अवघीं देव देवाइलें ।
ऐके कानीं त्या हरिनामध्वनी । नाना शब्द होत जाले ।
तुका म्हणे या विठोबाचे दास । सदा प्रेमसुखें धाले ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:— मेदिनी-पृथ्वी, पाट-श्रेष्ठ स्थान, धाले-तृप्त झाले, हेवा-हाव, वावी-विहिरी, तनघरे-झोपडचा.

अर्थ.— देवा, मी जेथे पाहीन तेथे तुझीच पावले दृष्टीस पडतात, सर्व विश्व तुझ्याच रूपानें व्यापून राहिले आहे रूप, गुण, नाम इत्यादी रूपानी मला हा सर्वत्र या मेघश्यामाचे दर्शन घेत आहे. त्याच्या शिवाय दुसरे काही उरलेच नाही. मी कुठे लोटांगण घालावे तर सर्व पृथ्वीच मला देवस्वरूप भासते, श्रेष्ठ स्थानाप्रमाणे वाटते. सर्व वेळ हा सुदिनच वाटतो, सुवेळ वाटते, माझे चित्त यामुळे सदैव प्रेमाने तृप्त झाले आहे १ देवा, चोही बाजूस तूच आम्हाला अनुभवास येतोस तुझ्याशिवाय आता आम्हाला संसाराची हावच उरलेली नाही व दुसरा कोणता कामधंदाही राहिलेला नाही कुठे जाणे व काही करणे हे सुद्धा आता उरलेले नाही. आमच्या मुखात नेहमी तुझेच नाम असते, आणि चित्तामध्ये तुझेच रूप असते २ आमची वाणी बोलते ते तुझेच गुणवर्णन असते तिच्यामुळे तुझीच कथा, स्तुती आणि मंत्रतंत्रादी गुणानुवाद होत असतात. एखाद्या ठिकाणी आम्ही भोजन करू, काही फळ व तांबूल वगैरे भक्षण करू, तर त्यामुळे देवा, तुमची पूजा होते, तुम्हालाच नैवेद्य समर्पण होतो आम्ही कधी वाटेने जरी चाललो तरी त्यामुळे देवा, तुला प्रदक्षिणा होते, आम्ही निद्रेसाठी लवंडलो तर तुला लोटांगण घातल्यासारखे होते जे कुणी आमच्या दृष्टीस पडतात त्यांच्याशी परस्पर गोष्टी आम्ही करतो तेव्हा ती तुझीच रूपे असल्याचे आमच्या ध्यानात येते ३ विहिरी, नद्या, आड इत्यादींचे पाणी आम्हांस तीर्थाप्रमाणे वाटते. या सर्वांचे पाणी आम्हांस गंगाजलाप्रमाणे भासते मोठमोठे महाल, मंदिरे, माडचा, गवताच्या झोपडचा ही सर्व आम्हांस देवालयेच भासतात, त्यांत आम्ही देवाचेच रूप पाहातो जे आम्ही नाना प्रकारचे शब्द ऐकतो ते श्रीहरीच्या नामाचे ध्वनीच वाटतात. तुकाराम महाराज म्हणतात, आम्ही या विठ्ठलाचे दास झालो असल्यामुळे नेहमीच प्रेमसुखाने तृप्त झालेले आहोत. ४

---

[1] जातां

विवरण — साक्षात्कारानंतर थोर साधुसंताची वृत्ती जगदाकार कशी होते आणि त्याना 'वासुदेव सर्वमिति'-सर्वत्र वासुदेवच भरलेला आहे, अशी प्रचीती कशी येते याचे उत्कृष्ट वर्णन तुकोबाच्या या अभंगात आले आहे. सर्व चराचर जगतात एक वासुदेवतत्त्व भरून राहिल्याची अनुभूती म्हणजेच ईश्वराचा साक्षात्कार. सर्व विश्व भेदरयाच्या अस्तित्वाने भरून गेलेले जाणवते सत्पुरुषाचे वागणे, बोलणे, कार्यप्रवृत्त असणे, इत्यादी क्रिया या विश्वदेवाच्या उपासनेसाठीच होतात त्याचे सहज चालणे प्रदक्षिणा होते आणि निद्रेची अवस्था लोटांगणाप्रमाणे असते त्याना नदी, कूप, आड, विहीर इत्यादींचे पाणी गंगाजलाप्रमाणे पवित्र वाटते मोठमोठ्या राजवाड्यापासून झोपड्यापर्यंत एकाच वासुदेवाची निवासस्थाने त्याना वाटतात अशा प्रकारे त्याच्या सर्व क्रियाच वासुदेवाच्या अनुभूतीने, अस्तित्वाने भारावलेल्या असतात हा वासुदेव तरी कोण ? महाभारतातील शांतिपर्वात याचा खुलासा असा आहे की, 'सर्वभूताधिवासश्च वासुदेवस्ततो ह्यहम्'-सर्व भूताच्या ठायी मी वास करतो म्हणून मला वासुदेव म्हणतात, असा अर्थ या वासुदेव शब्दाचा असल्याने त्याच्या सर्वव्यापकत्वाचा बोध होण्यासारखा आहे

सर्व चराचर व्यापून राहिलेल्या या वासुदेवतत्त्वाची अनुभूती विविध प्रकारानी थोर साधुसंताना येत असते 'हें समस्तही श्रीवासुदेवो । ऐसा प्रतीतीचा घोतला भावो' अशी ज्याची स्थिती, त्यास ईश्वराच्या भक्तीचा खरा लाभ झाला असे श्रीज्ञानेश्वरानी म्हटले आहे. तो जेथे पाहील तेथे परमेश्वराचे स्वरूप त्याला दिसेल. 'ते वेळीं जयाकडे वास पाहे । तेउता मीचि तया एकु आहे । अथवा निवान्त जरी राहे । तरी मीचि तया' असे या श्रेष्ठ पुरुषाच्या दृष्टीचे वर्णन श्रीज्ञानदेवानी केले आहे या श्रेष्ठ भक्ताला सारे विश्व परमेश्वरस्वरूपाचे असल्याची अनुभूती कशी येते, याचे मोठे समर्पक वर्णन करताना भागवतकारानी म्हटले आहे- 'आणि तो भक्त आकाश, वायू, अग्नी, उदक, पृथ्वी, नक्षत्र, तारे, प्राणिजात, दशदिशा, वृक्षलतादिक, नद्या, समुद्र-हे सर्व हरीचेच रूप आहे असे समजून वस्तुमात्राला हरिभावानेच वंदन करीत असतो' ( ११-२-४१ ) सर्व विश्वच भक्ताला याप्रमाणे श्रीहरिरूपानेच नटलेले कसे दिसते, याचे मोठे बहारदार वर्णन एकनाथानी केले आहे

'पृथ्वीसी जळावरण आहे। तेंचि चतु समुद्र नांव लाहे ॥ तैसे देवाचेंचि अंग पाहे । दिशाख्य वाच्य होय दशदिशा ॥ जैसा आपलिया आंगोळिया । गणता दिसती वेगळालिया । परी असती लागलिया । स्वयें सगळिया अखंड अंगीं ॥ तेवीं वनवल्ली दर्भदाप । देखोनि म्हणे हें हरीचें अंग । अनन्य भावें लागवग । भिन्न भाग देखेना ॥ म्हणे द्रुमद्रुम वनवल्ली । हेचि अनंतकोटि रोमावळी । हरीचेनि अंगें असे वाढली । निजशोभा शोभली हरीरूपत्वें ॥ जेवि वटाच्या पारंबिया । लोंबोनि वाढती वेगळालिया । त्याही वटरूपें सचलिया । वटरूप मुकलिया म्हणों नये ॥ तैंवि चैतन्यापासोनि बोध । निघाले सरिताख्य अनेग । तेही चैतन्यघनचांग । चिद्रूपें सांग सदा वाहती ॥ हो का चंद्रबिंबीं अमृत जैसे । बिंबीं बिंबरूप होऊनि असे ॥ तेवीं भगवतीं ससारू भासे । भजनविश्वासें भगवद्रूप ॥ ऐसे वेगवेगळे भाग । पाहतां उल्हासे जव चांग । तव अवघें उघडें जग । देवोचि सांग स्वयें जाला ॥ यालागीं सर्व भूतांचे ठायीं । अनन्य शरण कैसा पाहीं । लवण जैसें सागरा पायीं । ठायीं ठायीं जडोनि ठाके ॥ तैसे मुंगीहि देखोनि जाण । हरिरूपें वंदी आपण । मशकासही अनन्य शरण । घाली लोटांगण भगवद्रूपें । गौ खर चांडाळ श्यान । अति निंद्य जे हीन जन ॥ ते भगवद्रूप देखोनि पूर्ण । घाली लोटांगण अनन्यभावें ॥ हरिरूपें देखे पाषाण । भगवद्रूपें वंदी तृण । जगमस्थावरादिकां शरण । घाली लोटांगण चिद्विश्वभावें ॥'

१८३१ जे दोष घडले न फिटे करितां काहीं । सरते तुझ्या पायीं जाले तैसे ॥ १ ॥
माझा का हो करूं नये अंगीकार । जालेती निष्ठुर पांडुरंगा ॥ २ ॥
यातिहीन नये ऐकों ज्या वेद । तया दिलें पद वैकुंठींचें ॥ ३ ॥
तुका म्हणे कां रे एकाचा आभार । घेसी माथा भार वाहोनिया ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा — सरते-सफले, आभार-भार, ओझे

अर्थ — कोणत्याही उपायांनी जे दोष सपत नाहीत, असे दोषी लोक तुझ्या पायाजवळ आले आणि त्यांचे दोष सपले १ पांडुरंगा, असे असूनही तुम्ही माझा स्वीकार का हो करीत नाही ? माझ्याविषयीच असे निष्ठुर तुम्ही का हो झालात ? २ वेदाचे श्रवण ज्यांनी करू नये असे जे हीन जातीचे आहेत, त्यानासुद्धा देवा, तू वैकुंठीचे स्थान दिलेस ३ तुकाराम महाराज म्हणतात, तू सर्वांचा भार स्वत च्या डोक्यावर घेतला आहेस, मग माझ्या एकट्याचा तुला भार का वाटतो तुला ? ४

१८३२ हरिकथेची आवडी देवा । करितो सेवा दासाची ॥ १ ॥
म्हणोनि हिंडे मागें मागें । घरटी जागें घालितसे ॥ २ ॥
निर्लज्ज भोजें नाचत रंगीं । भरतें अंगीं प्रेमाचे ॥ ३ ॥
तुका म्हणे विकले देवे । आपण भावे सवसाटी[1] ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा — भोजें–सतोषाने सवसाटीं–बदली

अर्थ — देवाला आपल्या कथेची मोठीच आवड असल्याने जे कोणी अशी हरिकथा करतील त्या दासाची सेवा तो करीत असतो १ या दासाच्या माग मागे तो हिंडतो व ते ज्या जागी वसतील, तेथे तो घिरट्या घालीत राहातो २ तो निलज्ज होऊन मोठ्या सतोषाने त्याच्या प्रेमात व रगात यऊन नाचतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा प्रकारे आपल्या हरिभक्ताच्या अनन्य भावाच्या बदली या देवाने स्वत स भक्ताना विकलेले असते ४

१८३३ साधन सपत्ति हेचि माझें धन । सकळ चरण विठोबाचे ॥ १ ॥
शीतळ हा पथ माहेराची वाट । जवळीच नीट सुखरूप ॥ २ ॥
वैष्णवाचा सग रामनाम[2] गाणे । मडित भूषणे अळकार ॥ ३ ॥
भवनदी आड नव्हतीसी जाली । कोरडीच चाली जावे पायीं ॥ ४ ॥
मायबाप दोघें पाहातील वाट । ठेवूनिया कटीं कर उभीं ॥ ५ ॥
तुका म्हणे केव्हा देखेन कळस । पळाली आळस निद्रा भूक ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – शीतळ–शात कटीं–कमरेवर

अर्थ — विठोबाचे पाय हे आमचे सर्व धन आहे, हीच आमची सर्व साधने व हीच आमची सपत्ती आहे १ हा भक्तिमार्ग मोठा शात असून ही माहेराची वाट जवळची, नीट म्हणज निर्धोक व सुखस्वरूपाची आहे २ वैष्णवाच्या सगतीत राहून रामनामाचे गाणे गाणे हेच आम्हास भूषण व अलकाररूप आहे मात्र दागिन्यांनी आम्ही शोभून दिसतो ३ यामुळे ससाराची नदी नाहीशी झाली, अथवा ती कोरडीच पडली आता पायी जाण्यात काहीच हरकत नाही ४ विठोबा व रखुमाय ही आमची मायबापे कमरेवर हात ठेवून माझी वाट पाहात आहेत ५ तुकाराम महाराज म्हणतात, मी या देवाचा कळस केव्हा पाहीन असे मला झाले आहे या चिंतनात माझा आळस, माझी निद्रा, माझी भूक सारे काही पळून गले आहेत ६

१८३४ यथार्थवादें तुज न वर्णवे कदा । बोलतों ते निंदा करितों तुझी ।
वेदश्रुति तुज नेणती कोणी । चोवीस ठेंगणीं धाडोळिता ॥ १ ॥
आता मज क्षमा करावें देवा । सलगी ते केशवा बोलियेलो ॥ २ ॥
सगुण कीं साकार निर्गुण कीं निराकार । न कळे हा पार वेदा श्रुतीं ।
तो आम्ही भावें केलासी लहान । ठेवूनिया नावें पाचारितों ॥ ३ ॥
सहस्रमुखें शेष सीणला स्तविता । पार न कळतां श्रमों ठेला ।
तेथें माझी देहबुद्धि तें काई । थोर मी अन्यायी तुका म्हणे ॥ ४ ॥

---

[1] समसाटीं, [2] रामगाण

शब्दार्थ व टीपा — यथार्थवादें-उचित अशा अर्थाने, चोवीस-अठरा पुराणे व सहा शास्त्रे, धांडोळिता-शोधता, पाचारितों-बोलावितो, हाक मारितो, शेष-शेष नावाचा नागश्रेष्ठ, पार-अंत

अर्थ — देवा, उचित अशा अर्थाने तुझे वर्णन कधीच करता येणार नाही जे जे बोलावे ते ते तुझी निंदारूपच वर्णन होते १ तुला वेद व श्रुती सुद्धा जाणू शकत नाहीत तुझा शोध घेताना अठरा पुराणे व सहा शास्त्रे सुद्धा ठेंगणी झाली आहेत देवा, तू मला यासाठी क्षमा कर आता केशवा, मी भोळ्या सत्तगोनें तुझी स्तुतीच केली आहे. २ देवा, सगुण आहेस की निर्गुण, तू साकार आहेस की निराकार, यावद्दल श्रुतींकडून काहीच अंत लागत नाही, निर्णय लागत नाही अशा तुला आम्ही आमच्या भावभक्तीनें लहान, सगुण, साकार करून ठेविला आहे व अनेक नावांनी तुला आम्ही हाका मारू लागलो आहोत ३ शेष नाग आपल्या हजार मुखांना तुझे वर्णन करताना थकून गेला आणि तुझ्या गुणांचा अंत न लागल्यामुळे प्रत्यक्ष ब्रह्मदेवही स्तब्ध होऊन राहिला तुकाराम महाराज म्हणतात, अशा परिस्थितीत देहबुद्धीने मी तुमचे वर्णन केले त्याची काय किंमत? देवा, मी या बाबतीत फारच अन्याय केला आहे ४

१८३५ कृष्ण गातां गीतीं कृष्ण ध्यातां चित्तीं । तेही कृष्ण होती कृष्णध्याने ॥ १ ॥
आसनीं शयनीं भोजनीं जेवितां । म्हणारे भोगिता[1] नारायण ॥ २ ॥
ओंविये दळणीं गावा नारायण । कांडिता कांडण करितां काम ॥ ३ ॥
नर नारी याति हो कोणी सत्तीं । भावे एका[2] प्रीती नारायणा ॥ ४ ॥
तुका म्हणे एका भावें भजा हरी । कांति ते दुसरी रूप एक ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा — ओविये-ओव्यातून.

अर्थ — कृष्णाचेच गाणे सतत गाइल्याने, कृष्णाचेच ध्यान चित्तात नेहमी केल्याने श्रीकृष्णरूपच यामुळे होता येते १ आसनावर बसले असताना, अंथरुणावर झोपताना, जेवण करीत असताना, अनेक भोग भोगीत असताना, त्या नारायणाचे स्मरण करा २ दळण दळीत असताना नारायणाचेच गुणगान ओव्यातून करावे, कांडण करीत असताना व इतरही कामे करताना त्याचेच गायन करावे ३ कोणत्याही जातीचे पुरुष असोत अथवा स्त्रिया असोत त्यांनी एकनिष्ठतेने या नारायणावर प्रीती जडवावी ४ तुकाराम महाराज म्हणतात, एकनिष्ठतेच्या भावानेच या श्रीहरीचे भजन करावे सूर्य व त्याची कांती जशी एकच, तसेच तुम्ही व हरी एकरूप व्हाल ५

विवरण — ज्याचे ज्यास ध्यान, त्याच्या स्वरूपाची प्राप्ती त्यास होते, या सिद्धान्ताचे वर्णन करून बुवानी आपणास आलेल्या अनुभवाचे सार कथन करून लोकानीही जळी, स्थळी, आसनावर, शयनावर, कामधंदा करीत असताना त्या सर्वेश्वराचे ध्यान ठेवाव असा उपदेश येथे केलेला आहे नित्याच्या अनंत उद्योगात ईश्वराच्या अखंड अनुसंधानाने वृत्ती कृष्णमय कशी होते, यासंबधी भागवतात गोपींची जी तदाकार वृत्ती वर्णन केली आहे, ती पाहण्यासारखी आहे कारण या समर्पित तदाकार वृत्तीचा आदर्श श्रीनारदानीही 'यथा व्रजगोपिकानाम्' अशा शब्दात केलेला आहे. भागवतकारानी गोपींच्या तदाकार वृत्तीचे वर्णन करताना म्हटले आहे, 'या दोहनेऽवहनने मथनोपलेप- । प्रेंखेङ्खनार्भरुदितोक्षणमार्जनादौ । गायन्ति चैनमनुरक्तधियोऽश्रुकण्ठ्यो । धन्या व्रजस्त्रिय उरुक्रमचित्तयाना '—दूध काढताना, कांडताना, दही घुसळताना, भूमी सारवताना, झोके देताना, मुले रडत असताना, सडासमार्जन करताना गोपी श्रीकृष्ण प्रभूवर अनुरक्त असतात व त्याचे गुणगान करताना त्याच्या ठिकाणी मनाने विरून जातात गोपींच्या या तन्मयतेच्या वृत्तीचे वर्णन करताना श्रीनाथमहाराजानी भागवतात म्हटले आहे, ' करितां दळणकांडण । माझें दीर्घस्वरें गाती गुण । कीं आदरिल्या दधिमथन । माझें चरित्रगायन त्या करिती ॥ करितां सडासमार्जन । गोपिकांसी माझें ध्यान । माझेंनि स्मरणें जाण । परिये (झोके) देणे बाळका ॥ गायींचें दोहन करिता । माझे स्मरणीं आसक्तता । एव सर्वकर्मी वर्ततां । माझ्या विसराची वार्ता विसरल्या ॥ करितां गमनागमन । अखंड माझ्या ठायीं मन । आसन

१ भोक्ता, २ एका प्रति

भोजन प्राशन । करितां मद्ध्यान तयासी ' याच तदाकार वृत्तीने नित्याच्या व्यवहारातील कामेही चोख होतात, अहंकाराची बाधा होत नाही सर्व प्रभुसत्तेतून होत असल्याचा प्रत्यय येतो 'दळिता कांडिता । तुज गाईन अनंता ।' अशी जनाबाईनेही साक्ष दिलेली आहे

१८३६ डोळिया पाझर कंठ माझा दाटे । येऊ देईं भेटे पांडुरंगे ॥ १ ॥
बहु दिस टाकिले निरास कां केले । कोठें वो गुंतले चित्त तुझें ॥ २ ॥
बहु धंदा तुज नाहीं वो आठव । राहिलासे जीव माझा कंठीं ॥ ३ ॥
पंढरीस जाती वारकरी संत । निरोप बहुता हातीं धाडीं ॥ ४ ॥
तुजविण कोण सावा धावा करी । ये वो झडकरी पांडुरंगे ॥ ५ ॥
काय तुझी वाट पाहों कोठवरी । कृपाळु कापरी विसरलासी ॥ ६ ॥
एक वेळ माझा धरूनि आठव । तुका म्हणे ये वो न्यावयासी ॥ ७ ॥

शब्दार्थ व टीपा — सावा–संभावित, प्रामाणिक

अर्थ — पांडुरंगा, तू, मला आता लौकर भेट दे माझ्या डोळ्यातून एकसारखे पाण्याचे पाझर फुटत आहेत कंठ दाटून येत आहे ये तू मला भेट १ तू फार दिवस मला टाकून दिले आहेस मला असे निराश कां केलेस देवा ? तुझे चित्त इतर कुठे गुंतून राहिले आहे काय ? २ तुला काम फारच असल्यामुळे तुला माझी आठवणच राहात नाही माझा प्राण तुला भेटण्यासाठी कंठाशी येऊन भिडला आहे ३ पंढरपूरला जाणारे कुणी वारकरी संत आहेत, त्यांच्याबरोबर मी तुला निरोपही पाठविला आहे ४ तुझ्यावाचून धावून येऊन रक्षण करणारे कोण प्रामाणिक आहे ? तूच पांडुरंगा, लौकर ये व माझे रक्षण कर ५ श्रीहरी, तुझी वाट मी आता कोठवर पाहू रे ? तू कृपाळू असूनही मला विसरलास की काय ? ६ तुकाराम महाराज म्हणतात, आता एक वेळ माझी आठवण तू कर आणि मला नेण्यासाठी ये ७

१८३७ अधिक कोंडितां चरफडी । भलतीकडे घाली उडी ॥ १ ॥
काय करूं या मना आतां । कां विसरतें पंढरिनाथा ।
करी संसाराची चिंता । वेळोवेळां मागुती ॥ २ ॥
भजन नावडे श्रवण । धावे विषय अवलोकून ॥ ३ ॥
बहुत चंचळ चपळ । जातां येतां न लगे वेळ ॥ ४ ॥
किती राखों दोनी काळ । निजलिया जागे वेळ ॥ ५ ॥
मज राखें आतां । तुका म्हणे पंढरीनाथा ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा — मागुती–मागून वारवार, कोंडितां–डांबले असताना

अर्थ – या मनाला मी अधिक कोंडून ठेवू लागलो तर ते जास्तच चरफडते आणि भलतीकडे उडी घालते १ मी या अशा मनास करू तरी काय ? ते पंढरीनाथाला कां विसरते ? आणि हे पुन पुन संसाराची चिंता करीत कां राहाते ? २ याला कधी भजन आवडत नाही, की काही सत्पुरुषांचे श्रवण आवडत नाही बाह्य विषय पाहून मात्र त्यांच्याकडे त्याची धाव नेहमीच असते ३ असे हे मन फारच चंचल व चपळ आहे याला कोणीकडे जायला व यायला वेळ मुळीच लागत नाही ४ निजलेल्या व जागलेल्या अवस्थेत याला मी कोठवर सांभाळू ? ५ तुकाराम महाराज म्हणतात देवा, पंढरीनाथा, आता तूच माझे रक्षण कर ६

१८३८ कथा प्रावर्ण । नव्हे भिक्षेचे तें अन्न ॥ १ ॥
करीं यापरी स्वहित । विचारूनि धर्म नीत ॥ २ ॥

देऊळ नव्हे घर । प्रपंच परउपकार ॥ ३ ॥
विधिसेवन काम । नव्हे शब्द रामराम ॥ ४ ॥
हत्या क्षत्रधर्म । नव्हे निष्काम तें कर्म ॥ ५ ॥
तुका म्हणे संतीं । करूनि ठेविली आइती ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा — कंथा–वाकळ, गोधडी, प्रावर्ण–पांघरूण

अर्थ — वाकळ किंवा गोधडी हे काही इतर वस्त्राप्रमाणे वा पांघरुणाप्रमाणे वस्त्र नाही भिक्षा मागून आणलेले अन्न इतर अन्नाप्रमाणे नाही १ याप्रमाणे धर्मनीतीचा विचार करून स्वत चे हित साधून घे २ देवाचे देऊळ हे काही इतर देवळांप्रमाणे नाही लोकांवर उपकार करून संसार केला असताना त्याचा संसार इतर संसारी माणसांसारखा नसतो ३ शास्त्राने सांगितल्याप्रमाणे विषय सेवन करणारा हा इतर विषयी लोकांप्रमाणे नसतो, राम हा शब्द काही इतर शब्दाप्रमाणे नसतो ४ युद्धभूमीवर शत्रूची केलेली हत्या हा क्षात्रधर्म असतो, ती काही इतर हत्यांप्रमाणे नसते निष्काम बुद्धीनें केलेले कर्म हे इतर कर्मांप्रमाणे नसते ५ तुकाराम महाराज म्हणतात, याप्रमाणे नीती पूर्वीच्याच संतानी आयती करून ठेविली आहे ६

१८३९ पडोनिया राहीं । उगाच संताचिये पायीं ॥ १ ॥
न लगे पुसणे[1] सांगावे । चित्त शुद्ध करीं भावें ॥ २ ॥
सहज ते स्थिति । उपदेश परयुक्ति[2] ॥ ३ ॥
तुका म्हणे भाव । जवळी धरूनि आणी देव ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा —नलगे–लागत नाही

अर्थ — लोकहो, तुम्ही साधुसंताच्या पायांवर उगाच पडून राहावे १ त्याना काही पुसावे लागत नाहीं, सांगावे लागत नाही, पण शुद्ध भाव मनात धारण करून त्यांची सेवा केली पाहिजे २ या संतांचे सहज वागणेही इतराना उपदेश करण्यासारखे असते ३ तुकाराम महाराज म्हणतात, मनात भाव धरून तुम्ही या संताच्या पायांशी असाल तर त्यामुळ ते देवास तुमच्याजवळ आणतील ४

१८४० देवाचे घरी देवे केली चोरी । देवे देव नागवूनि केला भिकारी ॥ १ ॥
धावणिया धावा धांवणिया धावा । मागचि नाहीं जावे कवणिया गावा ॥ २ ॥
सवेंचि होता चोर घरिचिया घरीं । कावलियावरी केले अवघें वाटोळें ॥ ३ ॥
तुका म्हणे येथें कोणीच नाहीं । नागवले कोण गेले कोणाचे काई ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – माग–शोध, मार्गाचा तपास, सवेंचि–बरोबर

अर्थ — या देहरूपी देवाच्या घरी देवाच्या कृपने कामक्रोधादी विकार देहात्मबुद्धीचे अज्ञान याची चोरी देवानच केली देवान या विकारांना व अज्ञानास नष्ट केले अशा प्रकारे देवानच स्वत च्या घरात चोरी करून देवा सच फसविले, भिकारी केले १ आता कुणीतरी मदतीस धावा हो मदतीस धावा हो या चोराचा शोधच लागत नाही. कोणत्या गावाला जाऊन याचा तपास करावा ? २ हा चोर माझ्या बरोबरच असून माझ्या देहरूपी घरातच राहात होता पण याला संधी सापडताच यानें सव वाटोळे करून टाकले ३ तुकाराम महाराज म्हणतात, खरे पाहाता या ठिकाणी कोणीच चोर वगैरे नाही आता कोण चोरीस गेला, कोण ठकविला गेला, हे कधी सांगता येईल काय ? ४

---

१ पुसावें, २ परवृत्ति

१८४१ अवघेचि निजों नका अवघियें ठायीं । वेळ अवेळ तरी सांभाळावी काहीं ॥ १ ॥
जतन करा रे जतन करा । घालूं पाहे घरावरी घाला चोरटें ॥ २ ॥
सीतरिलीं फार खाती खोंवताले फेरे । गेले नये हाता सेकीं तळमळ उरे ॥ ३ ॥
तुका म्हणे आम्ही करूं आपले जतन । न लगे काहीं कोणां द्यावें उघडा रे कान ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – घाला-हल्ला, सीतरिलीं-फसले गेले, सेकीं-शेवटी

अर्थ – लोकहो, तुम्ही सर्वजण अशा या ठिकाणी झोपून जाऊ नका काही वेळेचा, अवेळेचा सांभाळ तरी करावा १ लोकहो, तुम्ही तुमचे रक्षण करा घरावर चोरटे लोक हल्ला करून येत आहेत २ आजपर्यंत फार लोक जन्ममरणाच्या फेऱ्यात गोते खाऊन फसले गेले आहेत एकदा नरजन्माचे धन आपल्या हातून गेल्यानंतर ते काही परत आपल्या हाती येणार नाही शेवटी तळमळ करीतच बसावे लागेल ३ तुकाराम महाराज म्हणतात, आपले हित आम्ही जतन करू कुणाला काही त्यासाठी द्यावे लागणार नाही नीट कान उघडे ठेवून ऐका हो ४

१८४२ काळोखी खाऊन कंवाड केला धीर । आपुलिया हितें जाले जनामध्यें शूर ॥ १ ॥
का रे तुम्ही नेणा का रे तुम्ही नेणा । अल्पसुखासाटीं पडशी विपत्तीचे घाणा ॥ २ ॥
नाहीं ऐसी लाज काय तयापें आगळें । काय नव्हे केलें आपुलिया बळें ॥ ३ ॥
तुका म्हणे तरी सुख अवघेंचि बरें । जतन करून हीं आपुलालीं ढोरें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा — कंवाड-निश्चय, विपत्तीचे-संकटाच्या, घाणा-घाण्यात, भोवऱ्यात

अर्थ — या संतानी मोठा निश्चय व धीर करून अज्ञानाच्या अंधकाराचा नाश केला व आपले हित साधून हे लोकामध्यें शूर बनले लोकहो, हे तुम्हाला का समजत नाही ? तुमच्या ध्यानात हो भाव का येत नाही ? क्षणिक अशा इंद्रियसुखासाठी अनेक जन्ममृत्यूच्या भोवऱ्यात का विनाकारण पडता ? २ त्या संतापाशी तुमच्यापेक्षा काही विशेष होते काय ? याची लाज तुम्हास कशी वाटत नाही ? त्यानी स्वहित स्वत च्या बळावरच साधले नाही काय ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, याप्रमाणे वागण्यातच सर्व सुख आहे हें ध्यानात ठेवा यासाठी आपली इंद्रियरूपी गुरेढोरे नीट सांभाळा, त्याना स्वाधीन ठेवा ४

१८४३ जाय परतें काय आणिला काटाळा । बोला एक वेळा ऐसे तरी ॥ १ ॥
का हो केले तुम्ही निष्ठुर देवा । मानेना हे सेवा करितों ते ॥ २ ॥
भागवत त्यासी सांगितल्या गोष्टी । तें नाहीं अदृष्टीं आमुचिया ॥ ३ ॥
तुका म्हणे तुम्हांपासूनि अंतर । न पडे नाहीं स्थिर बुद्धि माझी ॥ ४ ॥

अंतरीं संसार भक्ति बाह्यात्कार । म्हणोनि अंतर तुझ्या पायीं ॥ ३ ॥
तुका म्हणे काय करूं नेणें वर्म । आलें तैसें कर्म[1] सोसूं पुढें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा — दुर्जन-वाईट.

अर्थ:-पांडुरंगा, मला स्वत:ला आता अनुभवानेच समजून येत आहे. उगाच तुमच्यावर कशाला रुसावे ? १ माझे हे वाईट, हट्टी, चित्त आवरता आवरले जात नाही, हे माझे मन माझाच घात करण्यासाठी प्रवृत्त झाले आहे २ माझ्या अंत:करणात संसाराविषयी आसक्ती असून मी बाहेरून मात्र भक्ती दाखवीत असतो; म्हणून तर देवा, तुझ्या पायांपासून अंतर पडत आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, तुझ्या प्राप्तीचे वर्म माझ्या ध्यानात येत नाही, त्याला मी करू काय ? आता जसे पूर्वकर्म असेल त्याप्रमाणे सर्व काही सोसू. ४

१८४५ तुजकरितां होतें आनाचें आन । तारिले पाषाण उदकीं देवा ॥ १ ॥
कां नये कैवार करूं अंगीकार । माझा बहु भार जड जाला ॥ २ ॥
चुकलासी म्हणों तरी जीवांचा ही जीव । रिता नाहीं ठाव उरों दिला ॥ ३ ॥
तुका म्हणे ऐसें काय सत्ताबळ । माझे परी कृपाळ आहां तुम्ही ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :— पाषाण-दगड, उदकीं-पाण्यात, रिता-रिकामी

अर्थ:- देवा, तुम्ही एकचा करायला लागला म्हणजे एकाचे दुसरे करून टाकता. काहीच्या बाहीच करता तुम्ही पाण्यात दगड सुद्धा तारले आहेत १ असे असूनही माझा कैवार घेऊन तुम्ही माझा स्वीकार का अजून करीत नाही ? माझे ओझे तुम्हांस फार वाटते की काय ? २ माझ्यावर कृपा करण्यास तुम्ही चुकलात असे म्हणावे तर सर्व जीवांच्या जीवांत देवा, तुम्हीच निवास करून आहात थोडीही जागा तुम्ही रिकामी ठेविलेली नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, माझे असे काय सत्ताबळ तुमच्यावर चालणार ? पण देवा, तुम्ही कृपाळू आहात. ४

१८४६ फळ देंठींहून झडे । मग मागुतें न जोडे ॥ १ ॥
म्हणोनि तांतडी खोटी । कारण उचिताचे पोटीं ॥ २ ॥
पुढें चढे हात । त्याग मागिलां उचित ॥ ३ ॥
तुका म्हणे रणीं । नये पाहों परतोनि ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा — झडे-पडते, कारण-कार्य.

अर्थ :- देठापासून एकदा फळ सुटले की, फिरून ते त्याला जोडता येत नाही. १ यासाठी कोणत्याही कामात उतावळेपणा खोटाच असतो, उपयोगी नसतो. उचित व यथायोग्य करण्यातच कार्य झाल्यासारखे असते २ एकदा पुढल्या पुढल्या साध्य गोष्टी हातात आल्या की मागील बाबींचा त्याग करणेच उचित होय ३ तुकाराम महाराज म्हणतात, शूर पुरुषांनी रणांगणातून मागे पाहू नये; मागील आशांत गुंतू नये. ४

१८४७ अगी देखोनियां सती । अंगीं रोमांच उठती ॥ १ ॥
हा तो नव्हे उपदेश । सुख अंतरीं उल्हास ॥ २ ॥
वित्तगोतांकडे । चित्त न घाली न रडे ॥ ३ ॥
आठवूनि एका । उडी घाली म्हणे तुका ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- वित्तगोतांकडे-संपत्ति व नाते वाईक यांच्याकडे.

अर्थ:— पतीबरोबर सहगमन करताना आगीच्या मोठमोठ्या ज्वाला पाहून एखाद्या सतीच्या अंगावर आनंदाचे रोमांच उठतात. १ हा प्रकार काही वरवर उपदेश करून काही होत नसतो. अंतरीच्या मनाच्या उल्हासानेच

१ वर्म

हे सुख तिला प्राप्त झालेले असते. २ त्या सतीचे आपल्या धनाकडे अथवा नातेवाईकांकडे लक्ष नसते. त्यांच्यासाठीच ती रडतही नसते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, केवळ आपल्या पतीस आठवून ती अग्नीत उडी घालायला सिद्ध झालेली असते ४

१८४८ फळ पिके देंठीं । निमित्य वारियाची भेटी ॥ १ ॥
हा तों अनुभव रोकडा । फळीं येतो खरा कुडा ॥ २ ॥
तोडिलिया बळें । वांयां जाती काचीं फळें ॥ ३ ॥
तुका म्हणे मन । तेथें आपुलें[1] कारण ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा — रोकडा-प्रत्यक्ष, कुडा-खोटा, काची-कच्ची

अर्थ — कोणतेही फळ देठाशी पिकले की मग साध्या वाऱ्याच्या भेटीच्या निमित्तानेही ते खाली गळून पडते. १ हा अनुभव सर्वांना प्रत्यक्ष असा आहे खऱ्या खोटयाचा निवाडा सहजच होत असतो २ पण बळेनेच कच्ची फळे तोडल्यास ती वायाच जातील. ३ तुकाराम महाराज म्हणतात, सर्व कार्यसिद्धीचे कारण मन हे एकच आहे. ४

१८४९ हालवूनि खुंट । आधीं करावा बळकट ॥ १ ॥
मग तयाच्या आधारें । करणें अवघेंचि बरें ॥ २ ॥
सुख दुःख साहे । हर्षामर्षी भंगा नये ॥ ३ ॥
तुका म्हणे जीवें । आधीं मरोनि राहावें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपाः- खुंट-खुंटा, हर्षामर्षी-आनंदाच्या वा दु खाच्या प्रसंगी, भंगा नये-भंगत नाही.

अर्थ :- कोणताही खुंटा आधी हालवून बळकट करावा. १ मग त्याच्या साहाय्याने जे काही साधायचे ते कार्य साधावे, तेव्हाच ते कार्य चांगले होईल. २ अनेक सुखाचे वा दुःखाचे आघात जो सहन करतो तोच आनंदाच्या अथवा दु खाच्या लाटांनी भंगत नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, आपली जीवदशा अगोदर नाहीशी करून आपण साध्य साधण्यास तत्पर असावे ४

१८५० धांवे माते सोई । बाळ न विचारितां[2] कांहीं ॥ १ ॥
मग त्याचें जाणें निके । अंग चोडवी कौतुकें ॥ २ ॥
नेणे सर्प दोरी । अगी भलतें हातीं धरी ॥ ३ ॥
तीविणे तें नेणे । आणीक कांहीं तुका म्हणे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा - सोई-आश्रयासाठी, निके-खरे, बऱ्यासाठी

अर्थ — आईस पाहून रडणारे बालक तिच्याकडेच आश्रयासाठी धाव घेत असते येणाऱ्या अडथळयाचा ते कधी विचारच करीत नाही १ मग ती आई बाळाच्या बऱ्याकरिता मोठया कौतुकाने त्याच्या रक्षणास धावते. २ हे बालक अग्नी, सर्प, अथवा दोरी यांना काहीच जाणीव नसते, कधी भलताच पदार्थ ते हातात धरते ३ तुकाराम महाराज म्हणतात, हे बालक एकटया आईशिवाय काहीच जाणीत नाही. ४

१८५१ भोग द्यावे देवा । त्याग भोगींच बरवा ॥ १ ॥
आपण व्हावें एकीकडे । देव कळेवरी जोडे ॥ २ ॥
योजे यथाकाळें । उत्तम पाला कंदें[3] मूळें ॥ ३ ॥
वंचरु[4] त्यासी दोष । तुका म्हणे मिथ्या सोस ॥ ४ ॥

---

१ सकळ, २ विचारी, ३ कदमुळें, ४ वचकामी दोष

शब्दार्थ व टीपा -- बरवा–चांगला, कळेवरीं–देहातेच

अर्थ – भोग भोगताना ते देवाला समर्पण करून भोगल्यास त्यामुळे भोगातूनही त्यागच घडतो १ सर्व भोग परमेश्वरास अर्पण करून आपण एकीकडे असावे, अलिप्त असावे, म्हणजे मग देवाची प्राप्ती आपल्या देहातेच होईल देहांतच देव वसत असल्याची अनुभूती येईल २ भूक लागली असताना कडमुळे अथवा पाला याची योजना केल्यास उत्तमच होईल ३ तुकाराम महाराज म्हणतात, जो आत्मवंचना करीत असतो, त्यास विनाकारणच दोष लागतो, म्हणून त्याचा सोस कधी असू नये ४

विवरण –इंद्रियादी वृत्तींची सर्व कर्मे करावीत, भाग भागावेत, पण ते ईश्वराला समर्पण झाले आहेत अशा वृत्तीने मग या भोगातच त्याग असतो अशा भोगाचा कधी अतिरेक होत नाही. कर्ताकरविता, बुद्धिदाता कोण आहे याच्यावर लक्ष असल्यावर कोणतेही वाईट कर्म हातून होणार नाही भगवद्गीतेच्या नवव्या अध्यायात या विषयी सांगताना भगवताने म्हटले आहे, ' यत्करोषि यदश्नासि यज्जुहोषि ददासि यत् । यत्तपस्यसि कौंतेय तत्कुरुष्व मदर्पणम् '–कौंतेया, तू जे करतोस, खातोस, हवन करतोस, दान करतोस, तप करतोस ते सर्व मला अर्पण करीत जा अशा अर्पण करण्यापासून मनोवृत्तीतच फरक पडत राहतो कर्माचे बंधन कर्म करणाराला उरत नाही भागवतातील आपल्या नित्याच्या परिचयातील श्लोक ' कायेन वाचा मनसेंद्रियैर्वा बुद्ध्यात्मना वाऽनुसृतस्वभावात् । करोति यद्यत्सकलं परस्मै नारायणायेति समर्पयेत्तत्–' काया, वाचा मन, इंद्रिये बुद्धि अगर आत्मा याच्या प्रवृत्तीने किंवा स्वभावानुसार जे जे काही आपण करतो, ते सर्व परात्पर नारायणाला समर्पण करावे याच समर्पित वृत्तीचा निदर्शक आहे आपल्या नित्याच्या भोजनाच्या वेळीही ' गोविंद ', ' गोविंद ' म्हणण्यातील कृष्णार्पण बुद्धी ध्यानात घ्यावी ' इदं कृष्णार्पणमस्तु ', ' हरिर्दाता हरिर्भोक्ता ' असे म्हणून उदक सोडण्याची प्रथा आहे, तीमधलही रहस्य हेच आहे कोणतेही कर्म कृष्णार्पणबुद्धीने करावे, फळाची आशा धरू नये, असे झाल्यावर वाईट वासना वा पापकर्माची प्रवृत्ती उरणार नाही आपली सर्व क्रियाच समर्पित भावनेने असावी या समर्पित भावनेचे फार चांगले वर्णन गीतत चौथ्या अध्यायात ब्रह्मार्पणं ब्रह्म हविर्ब्रह्माग्नौ ब्रह्मणा हुतम् । ब्रह्मैव तेन गन्तव्यं ब्रह्मकर्म समाधिना '–अर्पण म्हणजे हवन करण्याची क्रिया ब्रह्म, हवि म्हणजे अर्पण करायचे द्रव्य ब्रह्म, ब्रह्माग्नीत ब्रह्माचे हवन केले याप्रमाणे सर्वच कर्म ब्रह्म अशी ज्याची बुद्धी झाली त्याला ब्रह्म प्राप्त झाले असेच समजावे '–या श्लोकात आलेले आहे सर्व प्राणिमात्राच्या हृदयात निवास करून सर्व भोग भोगणारा भगवतच आहे, या भावनेचे आणखी समर्पक वर्णन– ' अहं वैश्वानरो भूत्वा प्राणिनां देहमाश्रित । प्राणापानसमायुक्त पचाम्यन्नं चतुर्विधम्– मी वैश्वानररूप अग्नी होऊन प्राण्याच्या देहात राहिलो असून प्राण व अपान यांनी युक्त होऊन चार प्रकाराच्या अन्नाच पचन करितो गीतेतच आले आहे अशा प्रकारे सर्वभावत्या परमेश्वराला सर्व कर्मे समर्पण केल्यावर जे भोग भोगले जातात तेही त्यागाच्याच योग्यतेचे होत. ' मयि सर्वाणि कर्माणि संन्यस्य ' ' ब्रह्मण्याधाय कर्माणि सग त्यक्त्वा करोति य । लिप्यते न स पापेन पद्मपत्रमिवाम्भसा ' ' मय्यावेश्य मनस्तात कुरु कर्माणि मत्पर ' इत्यादी गीतेतील व भागवतातील वचनातून समर्पित भावनेने कर्म करणाराच खरा सन्यासी असा आग्रह सर्वत्र दिसतो भगवद्गीतेचा हा भावार्थ ज्ञानेश्वरानी अनेक ठिकाणी आपल्या भाष्यात स्पष्ट केला आहे ते म्हणतात, ' तरी उचिते कर्मे आचरावीं । तुवां आचरोनि मज अर्पावीं । तुवां शरीरपरा नोहावें । कामनाजात सांडावे । मग अवसरोचित भोगावे । भोग सकळ ॥ जे जे काहीं व्यापार करिसी । का भोग हन भोगिसी । अथवा यज्ञीं यजिसी । नानाविधीं तें क्रिया जात आघवें । जें जैसे निपजेल स्वभावें । तें भावना करोनि करावे । मासिया मोहरा ॥ ' या वृत्तीने भोग भोगतानाही त्यागच घडत असतो ' भोगीं झाला त्याग । गीतीं गातां पांडुरंग असे दुसऱ्या एका अभंगात तुकोबानीही म्हटले आहे

१८५२ पायाच्या प्रसादें । काहीं बोलिलो विनोदें ॥ १ ॥
मज क्षमा करणे सतीं । नव्हे अनुभूत युक्ति ॥ २ ॥
नव्हे हा उपदेश । तुमचे वडबडिलो शेष ॥ ३ ॥
तुमचें कृपेचे पोषणे । जन्मोजन्मीं तुका म्हणे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:—विनोदें–सलगीने, कमीअधिक लडिवाळपणाने.

अर्थ:– संतजनहो, मी आपल्या पायाच्या प्रसादानेच लडिवाळपणाने, सलगीने कमीअधिक बोललो. १ माझी ही उक्ती माझ्या स्वतःची नाही, म्हणून तुम्ही संतानी मला क्षमा करावी. २ काही उपदेश करावा म्हणून मी बोललो नाही, तुमच्याच वचनातील उरलेला भाग घेऊन मी बोलतो. ३ तुकाराम महाराज म्हणतात, जन्मोजन्मी माझे पोषण तुमच्याच कृपेने झाले आहे. ४

१८५३ जायांचें अंगुलें लेतां[१] नाहीं मान । शोभा नेदी जन हांसविलें ॥ १ ॥
घुसळितां ताक कांडितां भूस । साध्य नाहीं क्लेश जाती वांयां ॥ २ ॥
तुका म्हणे नाहीं स्वता भांडवल । भिकेचें तें फोल बीज नव्हे ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा :– अंगुलें–भूषण, अंगठी, फोल–फोलकट.

अर्थ:—दुसऱ्याचे अंगठीसारखे भूषण आपल्या अंगावर आपण घातले तर काही मान वाढत नाही. ते शोभूनही दिसत नाही. उलट ते पाहून इतर लोक मात्र हसतात. १ लोणी काढलेले ताक घुसळून अथवा निकामी झालेला भुसा कांडून काय उपयोग ? त्यापासून काहीच साध्य होणार नाही, उगाच क्लेश मात्र होतात व श्रम वाया जातात २ तुकाराम महाराज म्हणतात, स्वतःजवळ जर भांडवल नसेल तर भीक मागून आणलेले पुरत नाही. भीकेचे आणलेले पोचट धान्य पेरल्याने त्याचे कधीही बीज होणार नाही. ३

१८५४ न बोलावें परी पडिला प्रसंग । हाकलितें जग तुझ्या नामें ॥ १ ॥
लटिकेंचि सोंग मांडिला पसारा । भिकारी तूं खरा कळों आलें ॥ २ ॥
निलाजिरीं आम्ही करोनिया धीर । राहिलों आधार धरूनियां ॥ ३ ॥
कैसा नेणों आतां करिसी शेवट । केली कटकट त्याची पुढें ॥ ४ ॥
तुका म्हणे कांहीं न बोलसी देवा । उचित हे सेवा घेसी माझी ॥ ५ ॥

झालो आहोत; असे धैर्य काही तुमच्याजवळ नाही. २ आजपर्यंत तुम्ही पुष्कळ जीवांना फसविलेत, आता मात्र कृपेचे दान घेतल्याशिवाय तुला पुढे जाऊ देणार नाही. ३ देवा, तुमच्या नामाची ओळख झाली नव्हती तोपर्यंत मी फार दु:खी होतो ४ तुकाराम महाराज म्हणतात, माझ्याकडून एकवेळ चुकी झाली, पण आता मी आपल्या सेवेची बाकी उरूं देणार नाही. ५

१८५६ कैसा कृपाळु हें न कळसी देवा । न बोलसी सेवा घेसी माझी ॥ १ ॥
काय ऐसें बळ आहे तुजपाशीं । पाहों[1] हा रिघसी कोणा आड ॥ २ ॥
पाडियेला ठायीं तुझा थारा मारा । अवघा दातारा लपसी तो ॥ ३ ॥
आतां तुम्हां आम्हां उरी तेंचि बरें । काय हीं उत्तरें वाढवूनि ॥ ४ ॥
तुका म्हणे मज साह्य जाले संत । म्हणऊनि मात फावली हे ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा:-- थारा मारा-ठावाठिकाणा, उरी-अंतर

अर्थ :- देवा, तुला कृपाळू कसे म्हणावे हेच मला समजत नाही. कारण माझ्याकडून तू सेवा मात्र घेतोस, पण माझ्याशी बोलत नाहीस १ असे वागण्यात कोणते बळ आहे रे तुझ्यापाशी ? वेळ आली म्हणजे तू कुणाच्या आड लपशील हे मी पाहीनच २ दातारा, तू कुठे कुठे लपतोस तो ठावाठिकाणा मला माहीत आहे. ३ आता तुमच्यात व आमच्यात अंतर आहे तेच देवा, बरे. उगाच बोलन बोलणे कशास वाढवावे ? ४ तुकाराम महाराज म्हणतात, मला हे असे बोलण्यात संत साहयभूत आहेत म्हणून तर मला बोलण्याला फावले आहे ५

१८५७ चुकलिया आम्हां करितसां दंड । हाकासी कां खंड पांडुरंगा ॥ १ ॥
चाळविलीं एकें रिद्धिसिद्धीवरी । तैसा मी भिकारी नव्हें देवा ॥ २ ॥
कां मी येथें गुंतों मांडुनि पसारा । मागुता दातारा दंभासाठीं ॥ ३ ॥
केलें म्यां जतन आपुलें वचन । ठायींचें धरून होतों पोटीं ॥ ४ ॥
तुका म्हणे ताळा घातला आडाखीं । ठावें होतें सेकीं आडविसी ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा:- हाकासी-हक्काच्या बाबतीत, खंड-उणीव, नकार, चाळविलीं-फसविली, ताळा-हिशेब, आडाखीं-अंदाजाने, तर्काने सेकीं-शेवटी.

अर्थ:- देवा, आमच्याकडून सेवेत काही चुकी झाली की तू दंड करतोस. मग पांडुरंगा, आमचे जे हक्काचे येणे आहे त्यास नकार का रे देतोस ? १ इतरांना तुम्ही रिद्धीसिद्धीसारखे क्षुल्लक प्रकार देऊन फसविले, पण मी तसा प्रकारचा भिकारी नाही देवा २ दातारा, केवळ दंभ माजविण्यासाठी मी येथे व्यर्थ पसारा मांडून का रे राहू ? ३ मी आपले वचन हृदयात धरून ठेविले होते त्याचे रक्षण केले. ४ तुकाराम महाराज म्हणतात, तू शेवटी मला आडवशील हे माहीत होते, म्हणून तर अंदाजाने मी हिशेब करून मेळ बसविला आहे ५

१८५८ कृपावंता कोप न धरावा चित्तीं । छळूं वक्रोक्ती स्तुती करूं ॥ १ ॥
आम्ही तुझा पार काय जाणों देवा । नेणों कैसी सेवा करावी ते ॥ २ ॥
अनंता अरूपा अलक्षा अच्युता । निर्गुणा सच्चिता सर्वोत्तमा ॥ ३ ॥
चांगलीं हीं नामें घेतली ठेवून । जालासी लाहान भक्तिकाजा[2] ॥ ४ ॥
तुका म्हणे तुझ्या पायांवरी सदा । मस्तक गोविंदा असो माझा ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा:- वक्रोक्ती-वाकड्या बोलाने, पार-अंत, सीमा.

१ पाहों हरी येसी कोण आड, २ भक्तिकाजी.

अर्थ — कृपावता, देवा, आम्ही तुम्हाला वाकडया बोलाने छळले अथवा चांगल्या शब्दानी तुमची स्तुती केली तरी तुम्ही चित्तात राग धरू नये १ देवा, तुझा अंत आम्हांस कसा लागणार ? तुझी सेवा कशी करावी हेही आम्हास समजत नाही २ अनंता, अरूपा, अलक्षा, अच्युता, निर्गुणा, सच्चिता, सर्वोत्तमा, अशी तुझी नावे आहेत ३ अशी चागली नावे तू स्वत ला ठेवून घेतली आहेस, आणि आम्हा भक्ताच्या कार्यासाठी तू लहान झाला आहेस ४ तुकाराम महाराज म्हणतात, गोविंदा, तुमच्या पायावर माझे मस्तक सदासर्वकाळ असो ५

१८५९ आता तुझा भाव कळों आला देवा । ठकूनियां सेवा घेसी माझी ॥ १ ॥
टाकूनि साकडें आपुलिये माया । घातला या सतावरी भार ॥ २ ॥
स्तुति करवूनि पिटिला डांगोरा । तें[1] कोण दातारा साच करी ॥ ३ ॥
जातीचे वाणी मी[2] पोटींचे कुडें । नाका मजपुढें ठकाठकी ॥ ४ ॥
तुका म्हणे नाहीं आले अनुभवा । आधींच मी देवा कैसे[3] नाचों ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – ठकूनियां–फसवून, साकडें–सकट, अडचण, साच–खरा, कुडें–वाईट, ठकाठकी–फसवा फसवी

अर्थ – देवा, आता तुझा भाव मला चागला समजून आला आहे तू मला फसवून माझी सेवा घेत आहेस १ मी माझे सकट तुमच्या माथ्यावर टाकून या संताच्यावर भार घालून मी राहिलो आहे २ तुमची स्तुती करून साऱ्या जगात तुमचा डांगोरा पिटला जात आहे, तो तुमच्याशिवाय कोण हो खरा करणार ? ३ मी एक जातीचा वाणी असल्यामुळे मनाचा मोठा वाईट आहे माझ्यापुढे फसवाफसवी नका करू ४ तुकाराम महाराज म्हणतात, देवा जोपर्यंत तुमच्या कृपेचा अनुभव मला आला नाही, त्याच्या आधीच आनंदाने कसा नाचू मी ? ५

१८६० जन पूजी याचा मज का आभार । हा तुम्ही विचार जाणा देवा ॥ १ ॥
पत्र कोण मानी वदितील सिक्का । गौरव सेवका त्याचि मुळें ॥ २ ॥
मी मीपणें होतों जनामधीं आधीं । कोणें दिलें कधीं काय तेव्हां ॥ ३ ॥
आता तू भोगिता सर्व नारायणा । नको आम्हा दीना पीडा करूं ॥ ४ ॥
आपुलिया हातें देसील मुशारा । तुका म्हणे खरा तोचि आम्हा ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – सिक्का–छाप, ठसा, मुशारा–मुशाहिरा, पगार

अर्थ – लोक मला पूज्य मानितात याचे आभार मजवर कशाला ? याचे कारण देवा, तुम्हीच जाणावे १ नुसते पत्र पाहून कोण त्यास मान देईल ? पण त्याच पत्रावर देवा, तुमचा ठसा असल्यावर तो कागद लोक मानतील तुमच्या कृपेने मला मान आहे २ पूर्वी मीपणाच्या अहकाराने या जगात वावरत होतोच, तेव्हां मला कुणी मान दिला होता ? ३ आता मात्र नारायणा तुमच्या कृपेने सव उपचार होतात, पण त्यांचा भोक्ता तूच आहेस आम्हा दीनांना उगाच आता पीडा देऊ नका ४ तुकाराम महाराज म्हणतात देवा, तू आपल्याच हाताने जो मुशाहिरा देशील तोच मला खरा वाटेल ५

१८६१ आमची कां न ये तुम्हासी करुणा । किती नारायणा आळवावें ॥ १ ॥
काय जाणां तुम्ही दुर्बळाचें जिणें । वैभवाच्या गुणें आपुलिया ॥ २ ॥
देती घेती करिती खटपटा आणिके । निराळा कौतुकें पाहोनियां ॥ ३ ॥
दिवस थोडे आम्हीं धरियेलें माप । याहातों संकल्प स्वहिताचा ॥ ४ ॥
तुका म्हणे मग देसी कोण्या काळें । चतुर दुर्बळें होतों आम्ही ॥ ५ ॥

---

[1] तां, [2] अम, [3] कैसा

शब्दार्थ व टीपा:––बोटीं–बोटाच्या हिशेबाने, चुकुर–चुकार.

अर्थ:–नारायणा, तुम्हांस आमची करुणा कशी बरे येत नाही अजून ? तुमची आळवणी तरी किती करावी हो ? १ तुम्ही तुमच्या वैभवाच्या गुणांत दंग आहात माझ्यासारख्या दुर्बळाच्या जीवनाची काय पर्वा तुम्हांस ? २ इतर लोक देण्याघेण्याची खटपट करून प्रपंचाचा मांड मांडीत आहेत, आणि तुम्ही तो प्रकार कौतुकाने पाहात आहात ३ आम्ही मात्र दिवस हातांच्या बोटांनी मोजीत आहोत आणि स्वहिताचा संकल्प मनात धरीत आहोत ४ देवा, तू तुझी कृपा आम्हांवर कोणत्या काळी करणार आहेस ? आम्ही चुकार व दुर्बल आहोत, तोवरच तू कृपा करावीस. ५

१८६२ तुम्हां आम्हां तुटी होईल यावरी । ऐसें मज हरी दिसतसे ॥ १ ॥
वचनाचा कांहीं न देखों आधार । करावा हा धीर कोठवरी ॥ २ ॥
सारिलें संचित होतें गांठीं कांहीं । पुढें ऋण तेंही नेदी कोणी ॥ ३ ॥
जावेंचि न लगे कोणांचिया घरा । उडाला पातेरा तुझ्या संगें ॥ ४ ॥
तुका म्हणे आम्हां हाचि लाभ जाला । मनुष्यधर्म गेला पांडुरंगा ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा:–– तुटी–अंतर, वियोग, संचित–साठलेले पुण्य, पातेरा–पतच.

अर्थ.–– श्रीहरी, आता तुमचा व आमचा वियोग होईल असेच दिसत आहे. १ काही वचनांचा आधार घेऊन आता तुमच्या दाराशी धीर धरून कुठवर मी राहावे ? तुमच्या बोलण्याचा आधारच दिसत नाही. २ थोडें पुण्य साचले होते, ते सर्व मी खर्च केले. आता यापुढे कुणी ऋण मला देणार नाही. ३ कोणाच्याही घरी जाणे रुचत नाही; कारण देवा, तुझ्या संगतीने माझी लोकांतील पतच नाहीशी झाली आहे. ४ तुकाराम महाराज म्हणतात, तुझ्या सहवासाने माझा मनुष्यपणा नाहीसा झाला हाच एक थोर लाभ झाला म्हणायचा. ५

१८६३ देव मजुर देव मजुर । नाहीं उजुर सेवेपुढें ॥ १ ॥
देव गांढचाळ देव गांढचाळ । देखोनियां बळ लपतसे[1] ॥ २ ॥
देव तर काई देव तर काई । तुका म्हणे राई तरी मोटी ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा:–– उजूर–सांगता येण्यासारखी सबब, गांढचाळ–भित्रा, दुर्बल.

अर्थ:–– देव हा आपल्या भक्तांचा मजूर आहे. भक्तांनी केलेल्या सेवेपुढे त्याला कोणतीही सबब सांगण्यासारखी नसते. १ हा देव फारच भित्रा आहे. कारण भक्ताचे बळ पाहून हा लपून बसतो. २ तुकाराम महाराज म्हणतात, हा देव आहे तरी कसा ? तर त्याच्यापेक्षा राईसुद्धा मोठी वाटेल इतका तो सूक्ष्म आहे. ३

१८६४ देव दयाळ देव दयाळ । साहे कोल्हाळ बहुतांचा ॥ १ ॥
देव उदार देव उदार । थोड्यासाठीं फार देऊं जाणे ॥ २ ॥
देव चांगला देव चांगला । तुका लागला चरणीं ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा:–– कोल्हाळ–त्रास, दगदग.

अर्थ.–– हा देव फार दयाळू आहे हो. पुष्कळ भक्तांची दगदग हा सहन करतो. १ हा देव फारच उदार आहे हो; कारण फार थोड्यासाठी हा भक्ताला खूप कृपेचे दान करीत असतो. २ तुकाराम महाराज म्हणतात, हा देव फार चांगला आहे हो म्हणून तर त्याच्या चरणी मी लीन झालो आहे. ३

१८६५ देव बासर देव बासर । असे निरंतर जेथें तेथें ॥ १ ॥
देव खोळंबा देव खोळंबा । मज झळंबा म्हूण कोंडी ॥ २ ॥

[1] तपतसे.

देव लागट देव लागट । लाविलिया चट जीवीं जडे ॥ ३ ॥
देव बावळा देव बावळा । भावे जवळा लुडबुडी ॥ ४ ॥
देव न व्हावा देव न व्हावा । तुका म्हणे गोवा करी कामीं ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा — वासर–अमर्यादित, सोळवा–अक्रिय, झळवा–स्पर्श करून, व्यापून, चट–सवय, प्रीती, गोवा करी–गुतवितो

अर्थ – हा देव येवढा अमर्याद आहे तो सर्वत्र व्यापून राहिलेला आहे. १ हा देव स्वत अक्रिय असूनही मला आपल्या मायेने त्याने व्यापून टाकून कोंडिले आहे २ हा देव मोठा लाघवी आहे भक्तानी त्याला प्रेमाची चटक लाविली की तो त्याच्या जीवात जडून राहतो ३ हा देव मोठा भोळाभावडा आहे ज्याच्या मनात भाव आहे त्याच्याजवळ हा लुडबुड करतो ४ तुकाराम महाराज म्हणतात, हा असा देव मला नको, कारण तो आपल्या कामनेत मला गुतवितो ५

१८६६ देव निढळ देव निढळ । मूळ नाहीं डाळ परदेशी ॥ १ ॥
देव अकुळी देव अकुळी । भलते ठायीं[1] सोयरीक ॥ २ ॥
देव लिगाडचा देव लिगाडचा । तुका म्हणे भाडचा दमें ठकी ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा —निढळ–निराधार, डाळ–फादी, लिगाडचा–उलाढाली करणारा, लबाडखोर, भाडचा–भाडखोर

अर्थ — हा देव मोठा निराधार आहे कारण त्याला कुठलेच मूळ नाही की परिवाराची फादीही नाही तो परदेशीच वाटतो १ या देवास कुळही नाही कारण तो कुणाशीही सोयरिक करतो २ तुकाराम महाराज म्हणतात, हा देव मोठा लबाडखोर आहे, कारण हा भाडखोर देव सर्वांना दमाने फसवितो ३

१८६७ देव वराडी देव वराडी । पाली दैंदासाटीं उडी ॥ १ ॥
देव भ्याड देव भ्याड । राखे बळीचें कवाड ॥ २ ॥
देव भाविक भाविक । होय दासाचा सेवक ॥ ३ ॥
देव होया देव होया । जैसा म्हणे तया तैसा ॥ ४ ॥
देव लाहान लाहान । तुका म्हणे अनुरेण ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा:- जोडा-तुलनेस

अर्थ:- हा देव मोठा चांगला आहे कारण जसा भक्ताचा भाव असेल तसा हा त्याला पावतो १ हा देव मोठा उदार आहे. तो एकदा देऊ लागला की मग फारथोडयाचा कधी विचार करीत नाही २ हा देव मोठा बलवान आहे याला त्रिभुवनात दुसरा कोणी तुलनेस नाही. ३ असा हा देव आपणांस हवाच कारण तो सर्व जीवांना आवडता आहे. ४ तुकाराम महाराज म्हणतात, हा देव मोठा चांगला आहे. म्हणूनच हा तुकाराम त्याच्या चरणी लागला आहे. ५

१८६९ देव पाहों देव पाहों । उंचे ठार्यी उभे राहों ॥ १ ॥
देव देखिला देखिला । तो नाहीं कोणां भ्याला ॥ २ ॥
देवा कांहीं मागों मागों । जीव भाव त्यासी सांगों ॥ ३ ॥
देव जाणे देव जाणे । पुरवी मनींचिये[1] खुणे ॥ ४ ॥
देव कातर कातर । तुका म्हणे अभ्यंतर ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा:- कातर-कात्री.

अर्थ:- असा हा देव आपण पाहू या. त्यासाठी मनाची उंच वृत्ती आपण करू १ असा हा देव ज्याने पाहिला त्याला कुणाचीही भीती वाटत नाही २ या देवाजवळ आपण काही मागू व त्याला जीवाभावाने काही मागू, सांगू ३ हा देव जाणणारा असून काही न सांगता भक्तांच्या मनातील भाव नुसत्या खुणेनेच ओळखतो. ४ तुकाराम महाराज म्हणतात, हा देव म्हणजे जणू कात्रीसारखा आहे. हा आपल्या भक्ताच्या चित्तातील जड भाव कातरून टाकतो ५

१८७० देव आमचा आमचा । जीव सकळ जीवांचा ॥ १ ॥
देव आहे देव आहे । जवळीं आम्हां अंतरबाहे ॥ २ ॥
देव गोड देव गोड । पुरवी कोडाचेंही कोड ॥ ३ ॥
देव आम्हां राखे राखे । घाली कळिकाळासी काखे ॥ ४ ॥
देव दयाळ देव दयाळ । करी तुकयाचा सांभाळ ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा - कोड-लाड, इच्छा, काखें-बगलेत.

अर्थ:- हा देव आमचा आहे हा सर्व जीवांचाही आहे. १ हा देव आमच्याजवळ सर्वत्र अंतर्बाह्य स्वरुपात भरलेला आहे. २ हा देव मोठा गोड आहे कारण हा आपल्या भक्ताच्या अंतःकरणातील इच्छा पूर्ण करतो. ३ हा देव कळिकाळाला बगलेत घालून आपल्या भक्तांचे रक्षण करीत असतो. ४ तुकाराम महाराज म्हणतात, असा हा देव फार दयाळू असून तो माझा सांभाळ करीत असतो ५

१८७१ जाऊं देवाचिया गांवां । देव देईल विसांवा ॥ १ ॥
देवा सांगों सुखदुःख । देव निवारील भूक ॥ २ ॥
घालूं देवासीच भार । देव सुखाचा सागर ॥ ३ ॥
राहों जवळी देवापाशीं । आतां जडोनि पायांसी ॥ ४ ॥
तुका म्हणे आम्ही बाळें । या देवाचीं लडिवाळें ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा.- निवारील-दूर करील, भार-ओझे.

[1] अंतरींचे.

अर्थ:– चला, आपण देवाच्या गावाला जाऊ. त्या ठिकाणी देव आपणांस विश्रांती देईल. १ या देवाला आपण आपले सुखदु:ख सांगू. कारण आपली तहानभूक दूर करील असा हा देव आहे. २ हा देव सुखाचा सागर असल्यामुळे आपण आपले ओझे त्याच्यावरच घालू. ३ आता आपण देवाच्या पायांशीच दृढ भाव धरून राहू. ४ तुकाराम महाराज म्हणतात, आम्ही या देवाची फार लाडकी बाळेच आहोत. ५

१८७२ प्रेम तेथें वास करी । मुखीं उच्चारितां हरी ॥ १ ॥
प्रेमें यावें तया गांवा । चोजवीत या वैष्णवां ॥ २ ॥
प्रेम पाठी लागे वळें । भक्त देखोनियां भोळे ॥ ३ ॥
प्रेम न वजे दवडितां । शिरे वळें जेथें कथा ॥ ४ ॥
तुका म्हणे थोर आशा । प्रेमा घरीं[1] विष्णुदासां ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा:– चोजवीत–शोध करीत

अर्थ – ज्या ठिकाणी मुखातून श्रीहरीच्या नामाचा उच्चार होत असतो, त्या ठिकाणी प्रेमाचा निवास असतो. १ याच प्रेमाच्या साहचर्याने वैष्णवांच्या गावाचा शोध करीत करीत यावे. २ भोळ्या भक्तांना पाहून प्रेम त्यांच्या मागेमागे लागते. ३ जेथे श्रीहरीची कथा चालू असते तेथे प्रेमाचा शिरकाव होतो व तेथून त्याला कुणी हाकून दिले तरी ते बाहेर जात नाही. ४ तुकाराम महाराज म्हणतात, या प्रेमामुळे मला या विष्णुदासांच्या घरी राहण्याची मोठीच आशा निर्माण झाली आहे ५

*विवरण :– वरील आठनऊ अभंगांत तुकाराम महाराजांनी देवाच्या स्वरूपाचे व गुणाचे अतिशय सोप्या* भाषेत फार चांगले वर्णन केले आहे. देव आपल्या किती जवळ आहे, तो किती चपळ आहे, दयाळू आहे, हितकर्ता आहे, उदार आहे, किती भक्तवत्सल आहे, याचे अगदी सरळ पण अर्थगर्भ भाषेत तुकाराम महाराजांनी वर्णन केले आहे. वरच्या अभंगात श्रीहरिप्रेमाचे माहात्म्य बुवांनी संक्षेपाने वर्णन केले आहे. श्रीहरीच्या भक्तीचा आधार त्याच्याविषयी अतीव प्रेम हाच आहे ही भक्ती मुख्यत: प्रेमस्वरूपा आहे 'सात्वस्मिन् परमप्रेमरूपा' असे हिचे स्वरूप नारदांनी भक्तिसूत्रात वर्णन केले आहे. या श्रीहरीच्या स्वरूपात सहज प्रेमाने मिसळून जाणे हीच त्यांची श्रेष्ठ प्रकारची भक्ती आहे 'येन्हवी तिजी ना चौथी । हे पहिली ना सरती । पैं माझिये सहजस्थिती । भक्तिनाम' *अशी या प्रेममय भक्तीची अवस्था श्रीज्ञानदेवांनी सांगितली आहे मनेवाचा-कायासहित असे हे प्रेम* भगवताला समर्पण करावे, तेव्हा तो नित्य जवळच असतो. या प्रेमाचे फारसे वर्णन करता येत नाही 'अनिर्वचनीयं प्रेमस्वरूपं । मूकास्वादनवत्' हे प्रेम बोलायचे नसते, अनुभवायचे असते. 'प्रेम नये बोलता सांगतां दावितां । अनुभव चित्ता चित्त जाणे' असे तुकोबांनी म्हटले आहे. या प्रेमाशिवाय भक्ती होऊच शकत नाही. 'प्रेमेंवीण श्रुतिस्मृतिज्ञान । प्रेमेंवीण ध्यानपूजन । प्रेमेंवीण श्रवण कीर्तन । वृथा जाण नृपनाथा' अशी या प्रेमाची महती एकनाथांनी गाइली आहे देव याच प्रेमाचा लोभी आहे

१८७३ संत मानितील मज । तेणें वाटतसे लाज ॥ १ ॥
तुम्ही कृपा केली नाहीं । चित्त माझें मज ग्वाही ॥ २ ॥
गोविलों थोरिवां । दु:ख वाटतसे जीवा ॥ ३ ॥
तुका म्हणे माया । अवरा हे पंढरिराया ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – गोविलों–गुंतलो गेलो, थोरिवां–लौकिकाच्या थोरवीत.

---

१ घरीं

अर्थः– संत लोक माझा मोठा मानसन्मान करतील याची मला मोठी लाज वाटते. १ देवा, तुम्ही आजपर्यंत माझ्यावर कृपा केलेली नाही याबद्दल मला माझे चित्त नेहमी साक्ष देत आहे २ लौकिक थोरवीच्या सुखात मी गुंतत चालल्यामुळे मला मोठे दुःख होत आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, पंढरीराया, तुम्ही ही आपली माया आता आवरून घ्या. ४

विवरणः– आपल्या पारमार्थिक अधिकाराची जाणीव तुकाराम महाराजांना सतत होती. लोक आपणास साधू म्हणतात, संत म्हणतात; या मानास आपण किती योग्य आहोत याची परीक्षा बुवा कठोरपणाने नेहमी करीत. आपले चित्त अवखळ आहे, ते प्रपंचादी वृत्तीत पुन:पुन: रमते, त्याला खेचून आणले तर ते बंड करते. हे मन पंढरीनाथाला नेहमी विसरते, संसाराच्या चिंतेत रमते याला भजन व कथाश्रवण या गोष्टी आवडत नाहीत फार चंचल असणाऱ्या या मनाचे दुखणे तुकारामबुवांनी अनेक अभंगांतून व्यक्त केले आहे अशी अवस्था असूनही लोक आपणास संत मानतात याची बुवांना प्रामाणिकपणे चिंता वाटते एक प्रकारचा संकोचही त्यांच्या मनात निर्माण होतो. ईश्वराची कृपा आपणावर पूर्णपणे झालेली नाही, याची खात्री असल्याने त्यांच्या मनाचे हे दुखणे अधिकच ठणकत राहते. म्हणून तुकाराम महाराज पांडुरंगास थोरपणाची ही माया आवरण्यासाठी येथे विनवीत आहेत.

१८७४ नाहीं तुम्ही केला । अंगीकार तो विठ्ठला ॥ १ ॥
सोंगें[1] न पवीजे थडी । माजी फुटकी सांगडी ॥ २ ॥
प्रेम नाहीं अंगीं । भले म्हणविले जगीं ॥ ३ ॥
तुका म्हणे देवा । मज वांयां कां चाळवा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा –– अंगिकार–स्वीकार, थडी–तीरावर, सांगडी–नाव, तारू.

अर्थः— विठ्ठला, जोपर्यंत तुम्ही माझा स्वीकार केलेला नाही, १ तोपर्यंत या भक्तपणाच्या नुसत्या सोंगाने मी पलीकडच्या तीरावर कसा जाणार ? फुटक्या नावेच्या साहाय्याने कुणी पैलतीर गाठू शकतो का ? २ देवा, तुमच्याबद्दल माझ्या अंगी प्रेम नाही, तरी जगाकडून मात्र भले म्हणवून मी घेतले आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, मला तुम्ही असे विनाकारण का फसविता बरे ? ४

१८७५ आतां चक्रधरा । झणी आम्हांस अव्हेरा ॥ १ ॥
तुमचीं म्हणविल्यावरी । जैसीं तैसीं तरी हरी ॥ २ ॥
काळ आम्हां खाय । तरी तुझें नांव जाय ॥ ३ ॥
तुका म्हणे देवा । आतां पण सिद्धी न्यावा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – झणी–नका, पण–वचन, ब्रीद.

अर्थः– चक्र धारण करणाऱ्या देवा, आता तुम्ही मला दूर लोटू नका १ एकदा तुम्ही मला तुमचे म्हटल्यावर आम्ही जसे आहोत तसे तुमचेच राहाणार. २ जर काळाने आम्हांला ग्रासले तर देवा, तुमचेच नाव जाईल ना ! ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, पतितपावन, अनाथनाथ हे तुमचे ब्रीद व भक्तांचे रक्षण करण्याचा तुमचा पण तुम्ही सांभाळा ना ४

१८७६ मज ऐसे कोण उद्धरिलें सांगा । ब्रीदें पांडुरंगा बोलतसां ॥ १ ॥
हातींच्या कांकणां कायसा[2] आरिसा । उरलों मी जैसा तैसा आहें ॥ २ ॥
धन्वंतरी[3] हरी रोगियाचिये वेथे । तें तों कांहीं येथें न देखिजे ॥ ३ ॥
तुका म्हणे नाहीं अनुभव अंगें । वचन वाउगें कोण मानी ॥ ४ ॥

१ सोंगे, २ काय तो फरसा, ३ धनमत्री.

शब्दार्थ व टीपा:— हरी—दूर करतो, वेथे—व्यथेस, रोगास.

अर्थ:— पांडुरंगा, पापी लोकांचा उद्धार करण्याचे तुमचे ब्रीद ना ? मग माझ्यासारख्या पापी जनांचा उद्धार तुम्ही कधी केला आहे का ? १ हातातील कंकण पाहाण्यास आरसा कशाला हवा ? मी तुम्ही कृपा न होता जसाचा तसाच उरलो आहे. २ मोठा धन्वंतरी रोग्याच्या व्यथेस दूर करतो, तसे सामर्थ्य तर तुमच्यात काहीच दिसत नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, जोपर्यंत तुमच्या कृपेचा अनुभव मला आलेला नाही, तोवर तुमच्या ब्रीदाचे फुकटचे वचन कोण मान्य करणार ? ४

१८७७ काय तें सामर्थ्य न चले या काळें । काय जालीं बळें शक्तिहीण ॥ १ ॥
माझिया संचितें आणिलासी हरी । जालें तुजवरी वरिष्ठ तें ॥ २ ॥
काय गमाविली सुदर्शन गदा । नो[1] बोला गोविंदा लाजतसां ॥ ३ ॥
तुका म्हणे काय ब्रिदाचें तें काम । सांडा परतें नाम बिनानांव ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:— न चले—चालत नाही, हरी—पराजय.

अर्थ:— देवा, तुमचे ते पूर्वीचे सामर्थ्य आता या काळात चालत नाही की काय ? तुझे बळ काय झाले ? तू शक्तिहीन झालास की काय ? तुझ्या हातांत असलेली सुदर्शन, गदा इत्यादी आयुधे काय झाली रे ? ती गमाव-ल्यामुळे गोविंदा, तू लाजेने व्यथित झालास की काय ? २ की माझ्या पूर्वसंचितानेच तुझा पराभव केला ? तुझ्या-पेक्षाही ते श्रेष्ठ ठरले की काय ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, मग पतितपावन, अनाथनाथ अशा ब्रीदांचे काय काम ? ही नावे तुम्ही मोडून द्या ना. ४

१८७८ बळ बुद्धी वेचुनियां शक्ती । उदक चालवावें युक्ती ॥ १ ॥
नाहीं चळण तया अंगीं । धांवें लवणामार्गें वेगीं ॥ २ ॥
पाट मोट कळा । भरित पखाला सागळा ॥ ३ ॥
बीज ज्यासी घ्यावें । तुका म्हणे तैसें व्हावें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:— वेंचुनियां—खर्च करून, चालवून, उदक—पाणी, लवणामार्गे—उताराच्या मार्गे, सागळा—पाण्याची झारी

अर्थ :— आपले बळ, बुद्धी व सामर्थ्य खर्च करून मोठ्या युक्तीने पाण्याच्या प्रवाहास वाट करून द्यावी. १ या पाण्याच्या अंगी मूळचे चलन मुळीच नसते. जसा उतार असेल तशा मार्गाने ते वेगाने जाते. २ आपण आपल्या युक्तीने तयार केलेला पाट मोटेने, पखालीने अथवा पाण्याच्या झारीने भरून टाकावा. ३ तुकाराम महाराज म्हणतात, ज्या बीजास जसे पाणी द्यावे तशा प्रकारचे ते होते. ४

१८७९ न म्हणे साना थोर । दुष्ट पापी अथवा चोर ॥ १ ॥
सकळां द्यावी एकी चवी । तान हरूनि निववी ॥ २ ॥
न म्हणे दिवस राती । सर्व काळ सर्वां मूर्ती ॥ ३ ॥
तुका म्हणे झारी । घेतां तांब्यानें खापरी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा — साना—लहान, चवी—चव.

अर्थ:— तहान दूर करण्याचे सामर्थ्य अंगी असणारे पाणी हा लहान, हा थोर असे कधी म्हणत नाही. किंवा हा दुष्ट, हा पापी अथवा हा चोर असा भेदभावही त्याच्याजवळ कधी नसतो. १ या सर्वांना एकाच प्रकारची चव देऊन त्यांची तहान दूर करण्याचे तेवढे त्याला माहीत असते. २ पाणी तहान दूर करताना कधी दिवस वा रात्र

१ त्या भेणें गोविंदा

असेही म्हणत नाही. सर्व प्राणिमात्रांना नेहमीच ते तृप्त करते ३ तुकाराम महाराज म्हणतात, हे पाणी कुणी धातूच्या झारीने घेईल, कुणी तांब्याने, कुणी मातीच्या भांड्याने घेईल, तरी त्याची गोडी सारखीच असते ४

१८८० इच्छा चाड नाहीं । न धरी संकोच ही कांहीं ॥ १ ॥
उदका नेलें तिकडे जावें । केलें तैसें सहज व्हावें ॥ २ ॥
मोहरी कांदा ऊंस । एक वाफा भिन्न रस ॥ ३ ॥
तुका म्हणे सुख । पीडा इच्छा पावे दुःख ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा — चाड-हौस, गरज

अर्थ — अमक्याच वाटेने आपणास न्यावे अशी इच्छा व हौस पाण्याला कधी नसते कुणी कुठे त्याला नेले तरी कधी संकोच वाटत नाही १ असे हे पाणी जिकडे न्यावे तिकडे जाते त्याचा उपयोग जसा करावा तसा होतो २ एकाच वाफ्यात मोहरी, कांदा, ऊस असे निरनिराळे पदार्थ लावले तरी त्याचे एकाच पाण्याच्या योगाने भिन्न भिन्न सर्वांचे रस निर्माण होतात ३ तुकाराम महाराज म्हणतात, या पाण्यापासून लोक आपापल्या इच्छेप्रमाणे सुख दुःख पावतात ४

१८८१ तरले ते मार्गे आपुलिया सत्ता । कमाई अनंता करूनियां ॥ १ ॥
दुसरें फेडितां धर्म तेथें कोण । ते तुज अनन्य तुम्ही त्यांसी ॥ २ ॥
मज ऐसा कोण सांगा[1] वांयां गेला । तो तुम्ही तारिला पांडुरंगा ॥ ३ ॥
तुका म्हणे नांवासारिखी करणी । न देखें हें मनीं समजावें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – करणी–कर्तृत्व, काम

अर्थ — अनंता, पूर्वी आपल्या स्वतःच्या शक्तीने कमाई करून पुष्कळ लोक तरून गेले ते तुम्ही तारले असे नाही १ कुणाची तरी अनन्य भक्ती तुम्ही घेता व मग त्याचा उद्धार करता असे उसणे घेऊन फेडण्यात धर्म कोणता ? ते भक्त तुम्हांस अनन्य असतात, तुम्ही त्यांना अनन्य राहाता एवढेच २ माझ्यासारखा पांडुरंगा, असा कोण पातकी आहे की जो तुमच्यामुळे तरला ? माझ्यासारखा वाया गेलेला पातकी मनुष्य पांडुरंगा, तुम्ही कधी तारला आहे ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तुमचे नाव पतितपावन, अनाथनाथ असे आहे, पण या नावास शोभेल असे कार्य तुम्ही कधीच केलेले नाही. असे तुम्ही तुमच्या मनात नक्की समजावे ४

१८८२ कवणांशीं भांडों कोण माझें साहे । कोण मज आहे तुजविण ॥ १ ॥
धरिलें उदास दुरदुरांतरें । साडी एकसरें केली माझी ॥ २ ॥
आइकोन माझे नाइकसी बोल । देखोनियां खोळ बुंथी घेसी ॥ ३ ॥
तुका म्हणे एके गावींची वसती । म्हणऊनि खंती वाटे देवा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – साडी–त्याग, एकसरें-एकाएकी, बुंथी–बुरखा

अर्थ – देवा तुझ्यावाचून मी कुणाशी भांडू रे ? तुझ्याशिवाय मला दुसरे आहे तरी कोण रे ? १ असे असून तुम्ही मला दूर ठेविले, उदास ठेविले, माझा एकाएकी त्याग केला तुम्ही २ माझे बोलणे तुम्ही ऐकले न ऐकल्यासारखे करता मला पाहून तुम्ही आपल्या मुखावर वस्त्रांचा बुरखा घेता देवा ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तुम्ही आम्ही एका गावाचे असे असून एवढा दुरावा, याचेच फार दुःख वाटते माझ्या मनास ४

१ भागावया गेला

१८८३ आळवितां कंठ शोकला भीतर । आयुष्य वेचे धीर नाहीं मना ॥ १ ॥
अझून कां नये हें तुझ्या अंतरा । दिनाच्या माहेरा पांडुरंगा ॥ २ ॥
धन दिसे डोळा दगडाचे परी । भोग ते शरीरीं विष जाले ॥ ३ ॥
चुकलों काय ते मज क्षमा करीं । आलिंगूनि हरी प्रेम द्यावें ॥ ४ ॥
अवस्था राहिली रूपाची अंतरीं । बाहेर भीतरी सर्व काळ ॥ ५ ॥
तुका म्हणे माझे सकळ उपाय । पांडुरंगा पाय तुझे आता ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – शोकला–शोषला, सुकला, अंतरा–मनात

अर्थ – देवा, तुझी आळवणी करता करता माझा कंठ पार सुकून गेला रे माझे अंतःकरण व्याकुळ होऊन गेले आहे आयुष्य संपत आल्यामुळे आता माझ्या मनाला कुठलाच धीर होत नाही १ दीनदुबळ्यांना माहेर वाटणाऱ्या पांडुरंगा, अजून तुझ्या मनात माझ्याविषयी कृपा कशी उपजत नाही ? २ मला आता धनसंपत्ती दगडाप्रमाणे दिसत असून शरीरास सारे भोग विषाप्रमाणे वाटतात ३ श्रीहरी, माझ्याकडून काही चूक झाली असेल तर मला क्षमा करावी मला आलिंगन देऊन प्रेम द्यावे ४ देवा, तुझ्या रूपाचे दर्शन घेण्यासारखीच माझ्या मनाची अवस्था एकसारखी राहिली आहे याच इच्छेने अंतर्बाह्य सर्वत्र मी व्यापून राहिलो आहे ५ तुकाराम महाराज म्हणतात, पांडुरंगा, आता तुझे पाय आठवणे यातच माझे सर्व उपाय आहेत ६

## ॥ शिवाजी राजे यांनीं स्वामींस अब्दागिरी, घोडा, कारकून असे न्यावयास पाठविले ते अभंग ॥ १४ ॥

१८८४ दिवट्या छत्री घोडे । हें तो बऱ्यांत न पडे ॥ १ ॥
आता येथें पंढरिराया । मज गोविसी कासया ॥ २ ॥
मान दंभ चेष्टा । हे तो शूकराची विष्ठा ॥ ३ ॥
तुका म्हणे देवा । माझे सोडववणें धावा ॥ ४ ॥

वाटते ३ एकान्ताचे सेवन करावे, लौकिक गोष्टी कधी बोलू नयेत असे माझ्या मनात येते ४ लोक, धन, शरीर हे मला वमनासारखे तुच्छ वाटते ५ तुकाराम महाराज म्हणतात पंढरीनाथा, सारी सत्ता आता तुझ्याच हातात आहे ६

१८८६ विरंचीने केले ब्रह्मांड सकळ । तयामाजी खेळ नाना युक्ति ॥ १ ॥
युक्तीचा बाळक ब्रह्मनिष्ठ ज्ञानी । गुरुभक्ति मनीं विश्वासेसी ॥ २ ॥
ऐसा तुझा प्रेमा कळे काहीं एक । पाहूनिया लेख पत्रिकींचे ॥ ३ ॥
शिव तुझें नाम ठेविले पवित्र । छत्रपति सूत्र विश्वाचे कीं ॥ ४ ॥
व्रत नेम तप ध्यानयोग कळा । करूनि मोकळा जालासी तूं ॥ ५ ॥
हहेता लागला आमुचिये भेटी । पत्रामाजी गोष्टी हेचि थोर ॥ ६ ॥
याचे हे उत्तर ऐक गा भूपती । लिहिली विनती हेताची हे ॥ ७ ॥
अरण्यवासी आम्ही फिरो उदासीन । दर्शन ही हीन अमंगळ ॥ ८ ॥
वस्त्राविण काया जालीसे मळीन । अन्नरहित हीन फळाहारी ॥ ९ ॥
रोडके हात पाय दिसे अवकळा । काय तो सोहळा दर्शनाचा ॥ १० ॥
तुका म्हणे माझी विनती सलगीची । वार्ता हे भेटीची करू नका ॥ ११ ॥

शब्दार्थ व टीपा – विरंचीनें–ब्रह्मदेवान हहेता–हेतू

अर्थ – ब्रह्मदेवाने या सृष्टीची सर्व रचना केली या ब्रह्मांडात त्याने नाना प्रकार व युक्त्या करून विविध खेळ केले आहेत १ तू बालक मोठा युक्तीचा असून ब्रह्मनिष्ठ व ज्ञानी आहेस मनात विश्वासान तू गुरूची भक्ती धारण केली आहेस २ अशा प्रकारे जिव्हाळ्याचे तुझे प्रेम तुझ्या पत्रातील मजकूर पाहून समजले ३ तुझे नाव शिव असे पवित्र ठेविले असून विश्वाच्या दैवी सूत्राप्रमाणे तू छत्रपतीच आहेस ४ व्रत नेम, तप ध्यानयोग इत्यादी करून तू मोकळा झाला आहेस ५ आमच्या भेटीचा हेतू तुझ्या मनात आलेला दिसतो पत्रामध्ये याच थोर गोष्टी तू लिहिल्या आहेस ६ आता त्या पत्राचे उत्तर असे ऐक की, भेटीचा हेतू ठेवून जी विनती केलीस त्यासंबंधी हे राजा नीट एक ७ आम्ही सदोदित अरण्यात राहाणारे असून उदासीन होऊन आम्ही फिरत असतो आमचे दर्शनही हीन व अमंगल असते ८ आमच्या अंगावर धड वस्त्रही नसल्यामुळे आमचे शरीर नेहमीच मळलेले असते आम्ही अन्न नीटसे घेतच नाही वेडी वाकडी फळे भक्षण करून राहातो ९ अशा आहारामुळे आमचे हातपाय कमजोर झालेले असून त्यांना कसलीही कळा नसते अशा आमच्या रूपाच्या दर्शनाचा सोहळा कशासाठी ? १० तुकाराम महाराज म्हणतात, माझी ही मोठ्या सलगीची विनती तुम्हांस आहे ती नीट ऐका आमच्या भेटीची गोष्ट आता काढू नका ११

१८८७ ऐसी माझी वाणी दीनरूप पाहे । हे त्या करुणा आहे हृदयस्थाची ॥ १ ॥
नव्हो कींविलवाणे नाहीं आम्ही दीन । सर्वदा शरण पांडुरंगीं ॥ २ ॥
पांडुरंग आम्हां पाळिता पोशिता । आणिकाची कथा काय तेथें ॥ ३ ॥
तुझी भेट घेणे काय हे मागणे । आशेचे हे शून्य केले आम्हीं ॥ ४ ॥
निराशेचा गाव दिधला आम्हांसी । प्रवृत्तिभागासी सांडियेले ॥ ५ ॥
पतिव्रतेचे हें मन पति भेटी । तैसे आम्ही विठोमाजी नांदो ॥ ६ ॥
विश्व हें विठ्ठल नाहीं दुजें काहीं । देखणें तुझें ही तयामाजी ॥ ७ ॥
तुज ही विठ्ठल ऐसेचि वाटलें । परि एक आले आडवें हे ॥ ८ ॥

सद्‌गुरुश्रीरामदासाचे भूषण । तेथें घालीं मन चळों नको ॥ ९ ॥
बहुता ठायीं वृत्ति चावळली जेव्हां । रामदास्य तेव्हां घडे कैसें ॥ १० ॥
तुका म्हणे घापा चातुर्यसागरा । भक्तिभाव तारा भाविकासी ॥ ११ ॥

शब्दार्थ व टीपा – हृदयस्पाची–हृदयात राहाणाऱ्या नारायणाची, रामदास्य–रामदासाचे कार्य

अर्थ – अशी माझी वाणी दीन स्वरूपाची आहे ही त्या हृदयात निरतर निवास करणाऱ्या ईश्वराचीच कृपा आहे १ तसे आम्ही मेखिलवाणे व दीन नाहीत कारण आम्ही नेहमीच त्या पांडुरंगाला शरण गेलेलो आहोत २ तो पांडुरंग आमचे पालन पोषण करतो, तेथे इतरांचे साहाय्य आम्हांस कशासाठी हवे ? ३ आमची तुझी भेट व्हावी ही मागणी तरी कशासाठी ? कोणत्याही लौकिक आशेचे आम्ही शून्य केले आहे ती नष्ट केली आहे ४ परमेश्वराने आम्हांला निराशेच्या गावाचे धनी केले आहे त्यामुळे प्रवृत्तिपर कार्यास आम्ही सोडून दिले आहे ५ पतिव्रता स्त्रीचे मन हे जसे पतीच्या भेटीसाठी उत्सुक असते, तशीच उत्सुकता विठोबाच्या भेटीची आमच्या मनात नांदत असते ६ आम्हांस हे सर्व विश्व एका विठ्ठलाने भरलेले दिसते, दुसरे काही त्याशिवाय दिसतच नाही तुझे पाहाणेही यातच सामावलेले आहे ७ माझ्यासारखेच या विठ्ठलामुळे तुलाही वाटले असते, पण एक गोष्ट त्याच्या आड आली ८ श्रीसद्‌गुरु रामदास हे देशाचे भूषण आहे तू त्याच्या ठिकाणी मन घाल तेथून चित्त ढळू देऊ नकोस ९ नाना ठिकाणी वृत्ती चाळवशील तर मग रामदासाचे कार्य घडून कसे येणार ? १० तुकाराम महाराज म्हणतात, चातुर्याच्या सागरा, शिववा, भक्तिभावानेच भाविक लोक तरले जातात ११

१८८८ तुम्हापाशीं आम्ही येऊनिया काय । वृथा सीण आहे चालण्याचा ॥ १ ॥
मागावें हें अन्न तरी भिक्षा थोर । वस्त्रासी हे थार चिंध्या बिदी ॥ २ ॥
निद्रेसी आसन उत्तम पाषाण । वरी आवरण आकाशाचें ॥ ३ ॥
तेथें काय करणें कवणाची आस । वांयां होय नाश आयुष्याचा ॥ ४ ॥
राजगृहा यावें मानाचिये आसे । तेथें काय वसे समाधान ॥ ५ ॥
रायाचिये घरीं भाग्यवंता मान । इतरा सामान्या[1] मान नाहीं ॥ ६ ॥
देखोनिया वस्त्रें भूषणाचे जन । तात्काळ मरण येतें मज ॥ ७ ॥
ऐकोनिया मानाल उदासता जरी । तरी आम्हा हरि उपेक्षीना ॥ ८ ॥
आतां हेचि तुम्हा सांगणें कौतुक । भिक्षे ऐसें सुख नाहीं नाहीं ॥ ९ ॥
तपव्रतयाग महा भले जन । आशाबद्ध हीन वर्तताती ॥ १० ॥
तुका म्हणे तुम्ही श्रीमंत मानाचे । पूर्वींच दैवाचे हरिभक्त ॥ ११ ॥

शब्दार्थ व टीपा – सीण–त्रास, बिदी–रस्त्यावरील

अर्थ – तुमच्यापाशी येऊन आमचा काय फायदा होणार ? चालण्याचा मात्र विनाकारण त्रास होणार आहे १ तुमच्यापाशी येऊन काही अन्न मागण नाही, भिक्षेसारखे थोर सुख नाही आणि वस्त्राविषयी म्हणशील तर रस्त्यावरील एखादी चिंधीही आम्हास मोठी वाटते २ पाषाणाच्या आसनावरच आम्हास चांगली निद्रा येते वर आकाशाचे पांघरूण असतेच ३ अशा अवस्थेत कुणी कशाची व कुणाची आशा करावी ? उगाच आयुष्याचा नाश मात्र व्हायचा ४ मोठ्या मानाची आशा धरून राजगृहास यावे काय ? तेथे कसले समाधान आम्हांस मिळणार ? ५ जे कुणी लौकिक दृष्टीने भाग्यवान असतील त्यांनाच राजाच्या घरचा मान वाटेल इतर सर्व-सामान्यांना त्याची काहीच किंमत नाहीं ६ नाना किंमतीची मोठी वस्त्र व दागिने यांचा लाभ इतर लोकांना

[1] सामान्य

वाटला तरी मला मात्र यांना पाहून तात्काळ मरण आल्यासारखे वाटते ७ आमचे हे बोल ऐकून तुम्ही उदास झालात तरी श्रीहरी आमची कधीच उपेक्षा करणार नाही. ८ आता तुम्हांला हेच कौतुकाने पुन. एकदा सांगतो की, भिक्षेप्रमाणे सुख कुठेच नाही. ९ तर, व्रते, यज्ञयाग करणारे लोक फार मोठे असतील; पण ते वासनांनी बद्ध असल्यामुळे हीनच असतात. १० तुकाराम महाराज म्हणतात, तुम्ही मात्र मनानेच श्रीमंत आहात आणि पूर्वीपासूनच श्रीहरीचे भक्त आहात. ११

१८८९ आतां एक योग साधावा हा नीट । भल्याचा तो वीट मानूं नये ॥ १ ॥
जेणें योगें तुम्हां घडों पाहे दोष । ऐसा हा सायास करूं नये ॥ २ ॥
निंदक दुर्जन संग्रहीं असती । त्यांची युक्ती चित्तीं आणूं नका ॥ ३ ॥
परीक्षावे कोण राज्याचे रक्षक । विवेकाविवेक पाहोनियां ॥ ४ ॥
सांगणें न लगे सर्वज्ञ तूं राजा । अनाथांच्या काजा साह्य व्हावें ॥ ५ ॥
हेंचि ऐकोनियां चित्त समाधान । आणीक दर्शनें चाड नाहीं ॥ ६ ॥
घेऊनियां भेटी कोण हा संतोष । आयुष्याचे दिस गेले गेले ॥ ७ ॥
एकदोनी कर्में जाणोनिया वर्में । आपुलिया भ्रमें राहूं आतां ॥ ८ ॥
कल्याणकारक अर्थ याचा एक । सर्वां भूतीं देख एक आत्मा ॥ ९ ॥
आत्मारामीं मन ठेवूनियां राहे । रामदासीं पाहें आपणेयां ॥ १० ॥
तुका म्हणे राया धन्य जन्म क्षिती । त्रैलोकीं हे ख्याति कीर्ति तुझी ॥ ११ ॥

शब्दार्थ व टीपा:– सायास–कष्ट, प्रयत्न, काजा–कार्यासाठी, चाड–इच्छा, क्षिती–पृथ्वीवर

अर्थ:– राजा, आता मी सांगतो तो एक योग तू नीट साधावास. जे चांगले आहे त्याचा वीट कधी करू नये १ ज्यामुळे तुमच्याकडे दोष येईल असे कोणतेही प्रयत्न तुम्ही करू नयेत. २ आपल्या भोवती निंदा करणारे दुर्जन नेहमीच असतात, त्यांची बोलणी मनात कधी आणू नयेत. ३ जे राज्याचे रक्षक असतील त्यांची नीट परीक्षा करावी, नीट विवेक करून वागावे ४ राजा, तू सर्वज्ञ आहेसच तुला काही सांगावे असे नाही जे अनाथ आहेत त्याचे काम करण्यासाठी तू नेहमी मदत करावीस ५ तुमचे हेच कार्य ऐकून आम्हांस समाधान होईल आणखी दर्शन घेण्याची व देण्याची मनात इच्छा नाही. ६ भेट घेतल्यानंतर आणखी आनंद तो कसला होणार? आमच्या आयुष्याचे दिवस आता संपत आले. ७ एकदोन कर्मांतील मर्म जाणून आम्ही आता आमच्याच भक्तिप्रेमाच्या नादात दंग राहू. ८ याचा अर्थ कल्याणकारकच असून सर्व भूतमात्रांतून एक असलेला आत्मा तू पाहावास ९ त्या आत्मारामावर चित्त ठेवून तू वाग व रामदासांच्याच मूर्तीमध्ये आम्हास पाहा १० तुकाराम महाराज म्हणतात, राजा, तुझा जन्म या पृथ्वीवर धन्य आहे. त्रैलोक्यात तुझी कीर्ती वाढेल. ११

१८९० आतां हे विनवणी प्रधानअष्टक[1] । प्रभूसी विवेक समजावा ॥ १ ॥
प्रतिनिधि मानरक्षक चतुर । सात्विकाचें घर तुम्हांपाशीं ॥ २ ॥
मजुमुचे धणी लेखनकारक । पत्रींचा विवेक समजावा ॥ ३ ॥
पेशवे सुरनिस चिटनिस डबीर । राजाज्ञा सुमंत सेनापति ॥ ४ ॥
भूषण पंडितराव विद्याधन । वैद्यराजा नमन माझें असे ॥ ५ ॥
पत्राचा हा अर्थ अंतरीं जाणोनि । विवंचोनि श्रवणीं घाला तया ॥ ६ ॥

१ अष्टका.

सात्विक प्रेमळ दृष्टांताच्या मतें । बोलिलों बहुत कळावया ॥ ७ ॥
यथास्थित निरोप सांगणें हा राया । अर्थ पाहा वांयां जाऊं नेदा ॥ ८ ॥
भिडेंसाटीं बोला गाळूनि अर्थातें । अनर्थकारी तुमतें होइल तेणे ॥ ९ ॥
तुका म्हणे तुम्हा नमन अधिकाऱ्यां । सांगणे तें राया पत्र माझें ॥ १० ॥

शब्दार्थ व टीपा – प्रधानअष्टक–अष्टप्रधान, मजुमुचे–जमाखर्चाचे, पेशवे–मुख्य प्रधान, सुरनीस–शिक्के मारण्याचे काम करणारा, सचीव, चिटनीस–पत्रव्यवहार करणारा कारकून, डबीर–महत्त्वाच्या कागदावर सह्या करणारा अधिकारी, सुमत–प्रधान

अर्थ – आता यानतर मी शिवरायाच्या अष्टप्रधानाना विनंती करीत आहे तुम्ही या माझ्या पत्रातील विवेक राजाला समजावून सांगावा. १ प्रतिनिधी मोठे मानरक्षक व चतुर आहेत सात्विकतेने तर त्यांच्या जवळ घरच केले आहे २ जमाखर्चाचे काम करणारे व हिशेब लिहिणारे मुजुमदार यानी या पत्रातील विवेक राजाला समजावून सागावा ३ पेशवे, सुरनीस, चिटणीस, डबीर, राजाज्ञा सुमन, सेनापती यानीही हे काम करावे ४ भूषण पडितराय, विद्याधन, वैद्यराज यांना माझे नमन असो ५ या सर्वांनी या माझ्या पत्राचा अर्थ मनात नीट जाणून घ्यावा. नीट विचार करून राजाच्या कानी तो घालावा ६ सात्विक व प्रेमळ दृष्टाताच्या साह्याने मी हा उपदेश राजाला समजावा म्हणूनच पुष्कळ सोपा केला आहे ७ राजाला नीट यथास्थित रीतीने माझा निरोप कळवा यातील अर्थ वाया घालवू नका ८ केवळ भीड वा सकोच मनात धरून काही अर्थ गाळाल तर मात्र तुमच्यावर मोठी अनर्थकारक अशी सकटपरपरा येईल ९ तुकाराम महाराज म्हणतात, तुम्ही राजाचे अधिकारी आहात, तुम्हाला माझा नमस्कार असो माझ्या पत्रातील अर्थ राजाला नीट समजावून सागावा. १०

१८९१ जाणोनि अंतर । टाळिसील करकर ॥ १ ॥
तुज लागली हे खोडी । पांडुरंगा बहु कुडी ॥ २ ॥
उठविसी दारीं । धरणे एखादिया परी ॥ ३ ॥
तुका म्हणे पाये । कैसे सोडीन ते पाहें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – करकर–कटकट, कुडी–वाईट

अर्थ – देवा, तुला भेटण्याची माझी तळमळ जाणून तू ही शिवरायाकडून आलेली कटकट टाळशील १ पाडुरगा, तुला अशी ही कटकट लावून देण्याची फार वाईट खोड लागलेली आहे २ एखाद्याच्या मागे उगाच धरणे धरल्यासारखे लचाड तू लावतोस ३ तुकाराम महाराज म्हणतात, तुझे पाय मी कसे सोडतो तेच पाहातो मी ते सोडणार नाहीच ४

१८९३ काय दिला ठेवा । आम्हां विठ्ठलचि व्हावा ॥ १ ॥
तुम्ही कळलेसी उदार । साटीं परिसाची गार ॥ २ ॥
जीव दिला तरी । वचना माझ्या नये सरी ॥ ३ ॥
तुका म्हणे धन । आम्हां गोमासासमान ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- ठेवा-लाभ, गार-गारगोटी

अर्थ:- तुम्ही आम्हाला काय लाभ करून देणार आहात ? आम्हाला हा एक विठ्ठलच हवा १ तुम्ही फार मोठे उदार आहात असे समजले; पण परिस घेऊन गारगोटी देण्यात तुम्ही उदार कसले ? २ या विठ्ठल-कृपेने मुखातून जी अमृतवचने बाहेर पडतात त्यांची सर एखाद्याने जीव दिला तरी कधी यायची नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, आम्हाला धन है गोमांसाप्रमाणे वाटते ४

१८९४ पिकवावे धन । ज्याची आस करी जन ॥ १ ॥
पुढें उरे खातां देतां । नव्हे खंडण मवितां ॥ २ ॥
खोलीं पडे ओली बीज । तरींच हातीं लागे निज ॥ ३ ॥
तुका म्हणे धनी । विठ्ठल अक्षरें हीं तिन्ही ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – मविता-मोजमाप करताना.

अर्थ:- लोक ज्याची इच्छा करतात असे धन तुम्ही पुष्कळ पिकवावे. १ ते इतके की, कितीही खाल्ले तरी ते उरावेच, त्याचे मोजमाप करताना ते कधी संपून नये. २ खोल सजल जमिनीत बीज पडेल तर हाताशी उत्तम पिकाचे हित प्राप्त होईल ३ तुकाराम महाराज म्हणतात, मला मात्र 'विठ्ठल' ही तीन अक्षरेच धनाप्रमाणे, धन्याप्रमाणे वाटतात ४

१८९५ मुंगी आणि राव । आम्हां सारखाची जीव ॥ १ ॥
गेला मोह आणि आशा । कळिकाळाचा हा फांसा ॥ २ ॥
सोनें आणि माती । आम्हां समान हे चित्तीं ॥ ३ ॥

अर्थ – तिन्ही भुवनात आता आम्ही वैभवाचे धनी आहोत १ हा देव आमचा मायबाप असल्यामुळे आमच्या हातात सर्व प्रकारचे सामर्थ्य आले आहे. २ आमच्या अंगी जे सर्व प्रकारचे बळ आहे ते त्रिभुवनात कुठे सापडेल काय ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, आता आमचीच सत्ता सर्वत्र आहे ४

१८९७ आम्ही तेणे सुखी । म्हणा विठ्ठल विठ्ठल मुखीं ॥ १ ॥
तुमचे येर वित्त धन । तें मज मृत्तिकेसमान ॥ २ ॥
कंठीं मिरवा तुळसी । व्रत करा एकादशी ॥ ३ ॥
म्हणवा हरिचे दास । तुका म्हणे मज हे आस ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – येर–इतर

अर्थ – मुखाने विठ्ठल विठ्ठल म्हणण्यातच आम्हांला मोठे सुख प्राप्त होते १ तुमचे इतर धन व वित्त या गोष्टी आम्हाला मातीप्रमाणेच वाटतात. २ गळ्यात तुळशीची माळ घालावी, एकादशीचे व्रत करावे, हेच आमचे धन ३ तुकाराम महाराज म्हणतात, याप्रमाणे वागून श्रीहरीचे दास म्हणवून घेण्याचीच इच्छा मला फार मोठी आहे ४

अशाच एका प्रसंगाच्या निमित्ताने निर्माण झालेले वरील चौदा अभंग आहेत हे अभंग किती ? चार, की नऊ की चौदा? असा वादग्रस्त प्रश्न निर्माण झालेला आहे अभंग क्र १८८६-१८९०पर्यंतचे पाच अभंग फार मोठे आहेत त्याची रचना व त्यातील उल्लेख पाहून ते तुकोबाचे नसावेत असे मानण्यात येते छत्रपती, अष्टप्रधान, रामदास याना महत्त्व तुकोबाच्या निर्याणानतर आले तुकोबाचे निर्याण शके १५७१ अथवा १५७३ साली झाले असे मानण्यात येते यानतर जवळ जवळ पचवीस वर्षांनी राज्याभिषेक झाला मग तुकोबाच्या अभगात छत्रपती, अष्टप्रधानाची नावे याचा उल्लेख कसा ? हो कालदोषात्मक विसगतीच नव्हे काय ? तसेच या मोठया अभगात रामदासाचा उल्लेख पुन पुन आला आहे. हा तरी कितपत शक्य आहे ? इत्यादी प्रश्नामुळे वारकरी सप्रदायात या मोठया पाच अभगाना प्रक्षिप्त मानण्याची चाल आहे

परतु आधुनिक सशोधनाचा मागोवा घेतल्यास या मोठया अभगातीलही अर्थ नीट लागतो असे दिसून येईल *' घेऊनियां भेटी कोण हा सतोष । आयुष्याचे दीस वाया गेले ' या उल्लेखावरून तुकोबानी हे अभग निर्याणा-*पूर्वी एकदोन वर्षांच्या अवधीत लिहिले असावेत छत्रपती, अष्टप्रधान याची माहिती राज्याभिषेकाच्या आधीपासूनही मिळते शिवाजी राजानी तजावर येथे शहाजी राजे याच्या सहवासात हिंदुराज्यपद्धतीचा नमुना लहानपणीच पाहिलेला होता शहाजी राजानीच छत्रपतिपद, अष्टप्रधानादीची निर्मिती, हिंदवी स्वराज्याची निर्मिती इत्यादी बाबतीत शिवरायाना प्रेरणा दिली होती शिवाजी राजाना पुणे प्राती पाठविताना जी निवडक माणसे शहाजी राजानी त्याच्या बरोबर दिली होती त्याचा तपशील शिवभारतकारानी दिलेला आहे शहाजी राजानी दिलेल्या सूचनाप्रमाणेच प्रधान कामे करीत होते शके १५७९ च्या महजरमध्ये पेशवे, मुजूमदार, डबीर, सुरनीस, मरनीवत, सबनीस वगैरे उल्लेख आहेत ' तेरीज रकमालाकारकीर्दे महाराज छत्रपती सीवाजी राजे तो हवेली तलब किले सरेसगड येथील सुमारे १३ गावाच्या जमाबदी प्रकरणीचा तक्ता ' या शके १५६९ च्या पत्रात छत्रपती असा उल्लेख आलेला आहे तेव्हा राज्याभिषेकानतरच अष्टप्रधानाच्या नेमणुका व छत्रपती या नावाचा उल्लेख असा प्रकार नसल्याने तुकोबाचे हे पाच अभग प्रक्षिप्त मानण्याचे कारण नाही

आम्हां पाळिता पोसिता । आणिकांची कथा काय तेथें '? ' निरालंबा गांव दिधला आम्हांसी । प्रवृत्तिमार्गासी सांडियेलें ॥' थाम्हाला एकच ध्यास आहे 'पतिव्रतेचें मन पति भेटो, तैसे । आम्ही विठोबाजीं नाशो । '

याप्रमाणे आपण ' प्रवृत्तिमार्गासी सांडियेलें ' असे तुकोबानी म्हटले आहे ते त्याच्या एकदर मनोवृत्तीस अनुसरून आपला निर्याणकाळ जवळ आला असल्याचेही त्यानी याच अभंगातून सूचित केले आहे या निवृत्तीच्या मन स्थितीत यानी शिवरायाचे महत्त्व चांगले ओळखले दिसते ' मुक्तीचा बालक ब्रह्मनिष्ठ ज्ञानी ', ' शिव तुझें नाम ठेविले पवित्र । छत्रपती सूत्र विश्वाचे वीं ' म्हणून त्यानी शिवाजीचा यथार्थ गौरव केला आहे आणि शिवरायाना उपदेश करताना त्यानी म्हटले आहे- हाती घेतल्या कामाचा योग नीट साधावा, भल्याचा वीट कधी मानू नये निंदक दुर्जनाची युक्ती मनात कधी आणू नये शेवटी त्यानी सार म्हणन सांगितले आहे, ' परीक्षावे कोण राज्याचे रक्षक । विवेकाविवेक पाहोनिया ॥ सांगणे न लगे सर्वज्ञ तू राजा । अनाथाच्या काजा साह्य व्हावे ॥ ' याच भूमिकेवरून त्यानी अष्टप्रधानाना दिलेल्या सूचनाही महत्त्वाच्या आहेत

१८९८ नाहीं काष्ठाचा गुमान । गोवी भ्रमरा सुमन ॥ १ ॥
प्रेम प्रीतीचे बांधलें । तें न सुटे काहीं केले ॥ २ ॥
पदरीं घालीं पिळा । बाप निर्वळ साटीं बाळा ॥ ३ ॥
तुका म्हणे भावें । भेणें देवें आकारावें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – गुमान–पर्वा, चिंता गोवी– गुंतविते

अर्थ:– मोठमोठ्या लाकडाना कोरण्यात तत्पर असणाऱ्या भुंग्यास त्याची काहीच पर्वा वाटत नाही अशा भ्रमरास सुगंधी कमल मात्र आपल्यात गुंतवून ठेविते १ प्रेमाच्या सूत्राने जे बांधले गेले आहे ते कोणाच्याही प्रयत्नाने सुटणारे नसते २ लहान बालक लाडाने आपल्या बापाच्या पदरास पिळा घालून त्याला खेटून उभे असते अशा वेळी शक्तिमान बापही केवळ प्रेमाच्या पोटी दुबळा बनलेला असतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, याप्रमाणे शुद्ध भावामुळेच निराकार देव भिऊन आकारास येत असतो ४

१८९९ भावापुढें बळ । नाहीं कोणाचे सबळ ॥ १ ॥
करी देवावरी सत्ता । कोण त्याहूनि परता ॥ २ ॥
बैसे तेथें येती । न पाचारिता सर्व शक्ति ॥ ३ ॥
तुका म्हणे राहे । तयाकडे कोण पाहे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा– परता– दुसरा, न पाचारितां–न बोलाविता

अर्थ – एकदा ईश्वराविषयी भाव दृढ केला की मग त्याच्या विरुद्ध कोणाचेही बळ कधी चालत नाही १ अशा भाविकाची देवावर सत्ता असते याच्यावाचून दुसरा असा सत्ता करणारा कोण आहे ? २ हा भाविक जेथे बसेल तेथे न बोलावता सव शक्ती येतील ३ तुकाराम महाराज म्हणतात, तो जेथे राहील त्याकडे वाकड्या नजरेने कोण पाहू शकणार ? ४

१९०० भावाचिया बळें । आम्ही निर्भर[१] दुर्बळें ॥ १ ॥
नाहीं आणिकांची सत्ता । सदा समाधान चित्ता ॥ २ ॥
तर्दी नाहीं ठाव । येथें रिघावया वाव ॥ ३ ॥
एकछत्रीं राज । तुक्या पांडुरंगीं काज ॥ ४ ॥

१ निर्बळ

शब्दार्थ व टीपा – निर्भर–आनंद, सुखरूप, निर्भय, वाव–स्थान काज–काम

अर्थ – आम्ही दुर्बळ असलो तरी या श्रीहरीवरील एकचित्ताच्या भावामुळे आम्ही सुखरूप व आनंदी आहोत १ आमच्या चित्तास नेहमीच समाधान असल्यामुळे त्यावर दुसऱ्या कुणाचीच सत्ता कधी चालणार नाही २ अनेक प्रकारच्या कुतर्कांना प्रवेश करण्यास आमच्या चित्तात स्थानच नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, माझे काम या पांडुरंगाशी असल्यामुळे त्याचे एकछत्री राज्य माझ्या ठिकाणी आहे ४

१९०१ सत्तावर्त्ते मन । पाळी विठ्ठलाची आन[1] ॥ १ ॥
आज्ञा वाहोनिया शिरीं । सांगितले तेंचि करीं ॥ २ ॥
सरलीसे धाव । न लगे वाढवावी हाव ॥ ३ ॥
आहे नाही त्याचे । तुका म्हणे कळे साचे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – वर्ते–वागने

अर्थ – आता माझे मन त्या पांडुरंगाच्या सत्तेप्रमाणे वागते यासाठी त्याला घातलेली विठ्ठलाची शपथ ते पाळते १ त्याला जो आज्ञा मी करतो ती शिरसावंद्य मानून ते काम करीत असते २ अनेक विषयांची हाव आता या मनास उरलेली नाही, ती वाढवावी असेही त्याला वाटत नाही ३ आता या मनास जे काही आहे व नाही यासंबंधीचे ज्ञान चांगलेच झाले आहे ४

१९०२ खावे ल्यावे द्यावे । जमाखर्च तुझ्या नावे ॥ १ ॥
आता चुकली खटपट । झाडचा पाडयाचा बोभाट ॥ २ ॥
आहे नाहीं त्याचे । आम्हा काम सांगायाचे ॥ ३ ॥
तुका म्हणे चिंता । भार वाहे तुझ्या माथा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – झाडया पाडयाचा–रोजचा हिशोब

अर्थ – देवा, चांगले खावे, अंगावर वस्त्रे घालावीत, काही कुणाला द्यावे, अशी सर्व कामे आम्ही करतो, पण याचा जमाखर्च तुमच्या नावाने आम्ही मांडतो १ आता आम्हाला कसलीही खटपट करण्याचे कारण नाही रोजच्या हिशोबाची कटकट आता आमच्याकडे नाही २ काही आहे अथवा काही [illegible] याबद्दल फक्त सांगण्याचे काम मात्र आमचे आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, आमच्या चिंतेचा सर्व भार आम्ही देवा, तुझ्याच माथ्यावर समर्पण केला आहे ४

१९०३ आता बरें जाले । माझे माथाचे निघाले ॥ १ ॥
चुकली हे मरमर । भार माथाचे डोंगर ॥ २ ॥
नसता काहीं जोडी । करिती बहुते तडातोडी ॥ ३ ॥
जाला झाडापाडा । तुका म्हणे गेली पीडा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – माथाचे–डोक्यावरचे ओझे, मरमर–कष्ट, यातायात, झाडापाडा–निकाल हिशोबाचा निवाडा

अर्थ –– माझ्या माथ्यावरचे सर्व ओझे निघाले हे एकापरी बरे झाले १ डोक्यावरील डोंगराएवढे भार उतरले त्यामुळे माझ्यामागचे कष्ट संपले २ काहीही प्राप्ती नसताना या विकारांनी माझी फार तोडातोडी केली होती ३ तुकाराम महाराज म्हणतात, आता सर्व हिशोबाचा निवाडा झाल्यामुळे माझ्या मागची पीडा दूर झाली आहे ४

---

१ आण

१९०४ संचितचि खावें । पुढें कोणाचें न घ्यावें ॥ १ ॥
आतां पुरे हे चाकरी । राहों बैसोनियां घरीं ॥ २ ॥
नाहीं काम हातीं । आराणूक दिवसराती ॥ ३ ॥
तुका म्हणे सत्ता । पुरे पराधीन आतां ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – संचितचि-जे कर्म गाठविले त्याप्रमाणे, आराणुक-विश्रांती.

अर्थ – आता आम्ही आमच्या पूर्वसंचिताप्रमाणे जे मिळेल ते सेवन करू. यापुढे इतरांचे आम्ही काही घेणार नाही १ आता इतरांची चाकरी करणे पुरे; आता आम्ही आत्मस्वरूपी स्वस्थही राहू. २ आता आम्ही कोणत्याही कामनेच्या, विषयांच्या हाती सापडणार नसल्याने रात्रंदिवस आम्हांस विश्रांतीच मिळणार आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, आता पराधीनता पुरे झाली. आता आम्ही स्वतःच्या सत्तेने वागू. ४

१९०५ ज्याचे गांवीं केला वास । त्यासी नसावें उदास ॥ १ ॥
तरीच जोडिलें ते भोगें । कांहीं आघात न लगे ॥ २ ॥
वाढवावी थोरी । मुखें म्हणे तुझे हरी ॥ ३ ॥
तुका म्हणे हे गोमटी । दास न घालावी तुटी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपाः– वास-निवास, गोमटी-उत्तम, थोर.

अर्थ – ज्याच्या घरी अथवा गावी आपण निवास केला त्याच्याविषयी कधी उदास राहू नये. १ असे केले तरच आपणास मिळविलेल्या वस्तूचा उपभोग घेता येईल कसलीही अडचण यात येणार नाही. २ श्रीहरी, आम्ही तुमच्या गावी राहू, तुमची थोरवी वर्णन करू व तुमचे म्हणवून घेऊ. ३ तुकाराम महाराज म्हणतात, दासाचे कसलेही नुकसान होऊ नये हेच उत्तम होय ४

१९०६ माझा तुम्ही देवा केला अंगीकार । हें मज साचार कैसें कळे ॥ १ ॥
कां हो कांहीं माझ्या नये अनुभवा । विचारितां देवा आहें तैसा ॥ २ ॥
लौकिकाचा मज लाविसी आभार । शिरोरत्नभार दुःखाचा हा ॥ ३ ॥
तुका म्हणे नाहीं पालट अतरीं । तेथें दिसे हरी ठकाठकी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – साचार-खरोखर, विचारिता-विचार करून पाहाता, अतरीं-मनात, ठकाठकी-फसवा फसवी.

अर्थ – देवा, तुम्ही माझा अंगीकार केला आहे हे खरोखर मला कसे कळावे ? १ यातील माझ्या अनुभवास काहीच कसे येत नाही ? विचार करून पाहाता देवा, मी आहे तसाच कसा राहिलो आहे ? २ भक्तीच्या विषयीचा माझा लौकिक वाढवून त्याचे ओझे का वाढविले ? या शिरोरत्नाचे ओझेच मला वाटत आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, जोपर्यंत माझ्या अतःकरणात पालट झाला नाही, तोपर्यंत देवा तुमची येथे फसवाफसवीच मला दिसते. ४

१९०७ तोंडें बोलावें तें तरी वाटे खरें । जीव येरयेरें वंचिजे ना ॥ १ ॥
हें तुम्हां सांगणे काय उगवूनि । जावें समजोनि पांडुरंगा ॥ २ ॥
जेविल्याची खूण वाढित्या अंतरीं । प्रीतीनें हे धरी चाली तेथें ॥ ३ ॥
तुका म्हणे बहु परीचे आदर । अत्यंत वेव्हारसंपादणी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – वंचिजे–न फसविण्याच्या बुद्धीने, उगवून-समजावून, उघड करून

अर्थ –जीवांनी एकमेकांस फसविण्याच्या बुद्धीने न बोलले तरच ते तोंडाने बोललेले खरे वाटते १ देवा, हे काय तुम्हास समजावून सांगायला हवे ? पांडुरंगा, तुम्हीच हे समजावून घ्या २ जेवणारास काय हवे, काय आवडते हें वाढणारासच चांगले समजते कारण आवडत्या पदार्थाकडे खाणाराची ओढ असेल हे वाढणारास समजते ३ तुकाराम महाराज म्हणतात आदरसत्काराचे प्रकार पुष्कळ असतात, काही अत्यंत अगत्याचे असतात काही वर वरच्या व्यवहारासाठी असतात ४

१९०८ न पालटे एक । भोळा भक्तचि भाविक ॥ १ ॥
येरां नास आहे पुढें । पुण्य सरतां उघडें ॥ २ ॥
नेणे गर्भवास । एक विष्णूचाचि दास ॥ ३ ॥
तुका म्हणे खरें । नाम विठोबाचे बरें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – येरा–इतराना

अर्थ – जो भाविक भक्त आहे त्याच्या स्थितीत कधीही बदल होत नाही १ इतराना पुण्याचा नाश होताच स्वस्थितीपासून भ्रष्टता आहे २ फक्त विष्णुदासाना मात्र गर्भवासाची चिंता नसते ३ तुकाराम महाराज म्हणतात, विठोबाचे नाम हेच उत्तम व खरे आहे ४

## ॥ स्वामींनीं पत्र पंढरीनाथास पंढरीस पाठविलें ते अभंग ॥ ३६ ॥

१९०९ कोणा मुखें ऐसी ऐकेन मी मात । चाल तुज पंढरिनाथ बोलावितो ॥ १ ॥
मग मी न धरीं आस मागील बोभाट । वेगीं धरिन वाट माहेराची ॥ २ ॥
निराजलें चित्त करितें तळमळ । केधवा देखती मूळ आलें डोळे ॥ ३ ॥
तुका म्हणे कई भाग्याची उजरी । होईल पंढरी देखावया ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – मात–हकीगत, बातमी, निराजले–त्रासले, कंटाळले, मूळ–आमंत्रण, उजरी–उदय प्रकाश

अर्थ – चल, तुला पंढरीनाथ बोलावीत आहे, अशी बातमी मी कुणाच्या बरे मुखातून ऐकेन ? १ अशी बातमी ऐकल्यानंतर मी मागची सर्व आशा व सर्व संबंध सोडून त्वरेने माहेराची वाट धरीन २ माझे चित्त वाट पाहाता पाहाता त्रासून कंटाळून गेले आहे मला माहेराचे मूळ आले आहे, असे दृश्य माझे डोळे केव्हा बरे पाहतील? ३ तुकाराम महाराज म्हणतात, पंढरपूर पाहाण्याच्या भाग्याचा उदय केव्हा होणार आहे ? ४

१९१० कां माझा विसर पडिला मायबापा । सांडियेली कृपा कोण्या गुणें ॥ १ ॥
कैसा कंठूनियां राहों सवसार । काय एक धीर देऊं मना ॥ २ ॥
नाहीं निरोपाची पावली वारता । करावी ते चिंता ऐसी कांहीं ॥ ३ ॥
तुका म्हणे एक वेचूनि वचन । नाहीं समाधान केलें माझें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – वारता–वार्ता, हकीगत, बातमी, वेचून–खर्च करून

अर्थ – मायबाप पांडुरंगास माझा विसर कसा बरे पडला ? कोणत्या कारणासाठी त्याने माझ्यावर कृपा करण्याचे सोडून दिले ? १ आता या जगातील संसारात मी दिवस तरी कसे कंठू ? माझ्या मनास धीर तरी कोठवर देऊ ? २ त्या विठ्ठलाच्या निरोपाची वार्ता काहीच अजून समजली नाही अशी त्याबद्दलची चिंता तरी किती करावी ? ३ तुकाराम महाराज म्हणतात एखादे कृपेचे वचन बोलून, खर्च करून या पांडुरंगाने माझे समाधान केले नाही ४

१९११ काहीं माझे कळों आले गुणदोष । म्हणऊनि उदास धरिलें ऐसें ॥ १ ॥
नाहीं तरी येथें न घडे अनुचित । नाहीं ऐसी रीत तया घरीं ॥ २ ॥
कळावे तें मना आपुलिया सर्वे । ठायींचे हें घ्यावें विचारूनि ॥ ३ ॥
तुका म्हणे मज अव्हेरिलें देवें । माझिया कर्तव्यें बुद्धीचिया ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – विचारूनि–विचार करून

अर्थ – या देवाला माझे काही गुणदोष समजून आले असतील म्हणूनच तो माझ्याविषयी असा उदास राहिला असेल १ असे नसले तर याच्या ठिकाणी असे अनुचित कधी घडत नाही, याच्या घरी असे अनुचित करण्याची रीत नाही २ आपल्याबरोबर असलेल्या आपल्या मनालाच खरी स्थिती समजते, म्हणून स्वतःच्या मनाच्या स्थितीचा स्वतःच विचार केला पाहिजे ३ तुकाराम महाराज म्हणतात, माझ्या कर्तव्यबुद्धीचा विचार करूनच या देवाने माझा अव्हेर केलेला असावा ४

१९१२ नव्हे धीर काहीं पाठवूं निरोप । आला तरी कोप येऊ सुखें ॥ १ ॥
कोपोनिया तरी देईल उत्तर । जैसें तैसें पर फिरावूनि ॥ २ ॥
नाहीं तया तरी काय एक पोर । मज तों माहेर आणीक नाहीं ॥ ३ ॥
तुका म्हणे असे तयामध्यें हित । आपण निवांत असों नये ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – कोप–राग

अर्थ – आता मला धीर धरवत नाही त्याला आपण होऊन काही निरोप पाठवू ? त्याबद्दल त्याला राग आला तरी मला येऊ देत १ रागावून का होईना पण एकदा तो मला उत्तर तरी देईल फिरून कसेतरी बोलेलच २ त्याला तरी काय लक्ष देण्यासाठी एकच पोर आहे असे नाही, पण मला मात्र माहेर एकमेव आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात म्हणून त्याला निरोप पाठविण्यातच आपले हित असल्यामुळे आपण कधी निवांत बसून राहू नये ४

१९१३ आता पाहों पंथ माहेराची वाट । कामाचा बोभाट पडो सुखें ॥ १ ॥
काय करूं आता न गमेसें जालें । बहुत सोसिलें बहु दिस ॥ २ ॥
घर लागे पाठीं चित्ता उभे वारे । आपुलें तें झुरे पाहावया ॥ ३ ॥
तुका म्हणे जीव गेला तरी जाव । धरिला तो देव भाव सिद्धी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – न गमसे–करमेनासे

अर्थ – आता मी माहेरच्या वाटेची मार्गप्रतीक्षा करीतच राहीन, मग घरातील कामाचा बोभाटा झाला तरी खुशाल होवो १ मी आता करू तरी काय ? मला करमेनासे झाले आहे मी फार दिवस कष्ट सोसले २ घर माझ्या पाठीशी लागल्यासारखे झाले असल्याने माझ्या चित्तास उभे वारे सुटले आहे प्रिय आईबापाचे रूप पाहाण्यासाठी माझे चित्त झुरू लागले आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात आता माझा जीव गेला तरी जावो, देवाचा मी आश्रय शुद्ध भावनेने धरलेला आहे तो सोडणार नाही ४

१९१४ विनवीजे ऐसें भाग्य नाहीं देवा । पायाशीं केशवा सलगी केली ॥ १ ॥
धीटपणें पत्र लिहिलें आवडी । पार नेणें थोडी मति माझी ॥ २ ॥
जेथें देवा तुझा न कळेचि पार । तेथें मी पामर काय वाणूं ॥ ३ ॥
जैसे तैसे माझे बोल अंगीकारीं । बोबड्या उत्तरीं गौरवितो ॥ ४ ॥
तुका म्हणे विटेवरि जीं पाउलें । तेथें म्यां ठेविलें मस्तक हें ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – पार–सामर्थ्य, सीमा, मर्यादा.

अर्थः– देवा, तुम्हांला मी जाणून विनंती करावी असे माप माझे नाही आज मात्र आपल्या पायांशी विनंती करून केशवा, सलगीच वाढवीत आहे मी. १ धिटाई व आवड मनात धरून मी तुम्हास पत्र लिहिले आहे. माझ्या अल्प बुद्धीस तुमचे सामर्थ्य जाणवत नाही २ देवा, जेथे तुमच्या स्वरूपाचा अंतच काही लागत नाही तेथे मी पामर तुमचे काय वर्णन करू ? ३ देवा, माझे हे वेडेवाकडे बोल कसेही असले तरी त्यांचा स्वीकार तुम्ही करा. कारण मी या माझ्या बोबड्या बोलण्याने गौरवच करीत आहे ४ तुकाराम महाराज म्हणतात, या देवाची पाउले मी विटेवर पाहिली; त्यांवर मी हे माझे मस्तक ठेविले आहे ५

१९१५ देवांच्या ही देवा गोपिकांच्या पती । उदार हे ख्याती त्रिभुवनीं ॥ १ ॥
पातकांच्या रासी नासितोसी नामें । जळतील कर्मे महा दोष ॥ २ ॥
सर्व सुखें तुझ्या वोळगती पायीं । रिद्धि सिद्धि ठायीं मुक्तिचारी ॥ ३ ॥
इंद्रासी दुर्लभ पाविजे तें पद । गीत गातां छंद वातां[१] टाळी ॥ ४ ॥
तुका म्हणे जड जीव शक्तिहीन । त्यांचें तूं जीवन पांडुरंगा ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा– वोळगती–प्राप्त होतात.

अर्थ.– हे देवांच्या देवा, गोपिकांच्या पती असणाऱ्या देवा, तू उदार आहेस अशी तुझी ख्याती त्रिभुवनांत आहे. १ तुझ्या नामाच्या उच्चाराने पातकाच्या राशी नाहीशा होतात, सर्व दुष्कर्मे जळून जातात, महादोष नाहीसे होतात. २ तुझ्या पायी देवा, सर्व सुखे प्राप्त होतात. रिद्धीसिद्धी, चारही मुक्ती याना तुझ्याच पायांचा आश्रय आहे. तुझ्या पायाच्या आश्रयाने या गोष्टी प्राप्त होतात. ३ इंद्राला दुर्लभ असणारे स्थान श्रीहरीचे नाम सुस्वराने गाण्यामुळे व त्याच्या तालात टाळी वाजविल्यामुळे प्राप्त होते ४ तुकाराम महाराज म्हणतात, जे जीव जड व शक्तिहीन आहेत, त्यांचे पांडुरंगा, तू जीवन आहेस. ५

१९१६ काय जालें नेणों माझिया कपाळा । न देखीजे डोळां मूळ येतां ॥ १ ॥
बहु दिस पाहे वचनाची वास । धरिलें उदास पांडुरंगा ॥ २ ॥
नाहीं निरोपाचें पावलें उत्तर । ऐसे तों उत्तर निष्ठुर न पाहिजे ॥ ३ ॥
पडिला विसर किंवा कांहीं धंदा । त्याहूनि गोविंदा जरूरसा ॥ ४ ॥
तुका म्हणे आले वेचाचें सांकडें । देणें घेणें पुढें तो ही धाक ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा –मूळ–आमंत्रण, वास–वाट, साकडे–संकट.

अर्थ.–देवा, माझ्या नशिबात काय आहे, मला काही माहीत नाही. मला माहेराचे आमंत्रण आलेले काही मी डोळयांनी पाहात नाही. १ पांडुरंगा, मी तुमच्या उत्तराची वाट फार पाहिली हो. तुम्ही माझ्याविषयी उदास का आहात? २ मी तुमच्याकडे जो निरोप पाठविला, त्याचे उत्तर मला काहीच आले नाही अशी निष्ठुरता देवा आमच्याविषयी नसावी ३ तुम्हास आमचा विसर पडला की काय? किंवा इतर कुठल्या तरी महत्त्वाच्या उद्योगात तुम्ही गुंतलात की काय गोविंदा ! ४ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तुम्हांला माझ्यासाठी काही खर्च करावा लागेल असे साकडे पडले आहे की काय? त्याचप्रमाणे तुम्हाला काही देण्याचाही धाक वाटत असावा. ५

१९१७ एवढा संकोच तरि कां व्यालासी । आम्ही कोणांपाशीं तोंड वासूं ॥ १ ॥
कोण मज पुसे सिणलें भागलें । जरी मोकलिलें तुम्हीं देवा ॥ २ ॥
कवणाची वाट[२] पाहों कोणीकडे । कोण मज ओढे जीवलग ॥ ३ ॥
कोण जाणे माझें जीवींचें सांकडें । उगवील कोडें संकटाचें ॥ ४ ॥
तुका म्हणे तुम्ही देखिली निश्चिती । काय माझे चिंतो[३] पांडुरंगा ॥ ५ ॥

१ वाहातां, २ वास, ३ निश्चिती.

शब्दार्थ व टीपा – व्यालासी-जन्म दिलास गोवविलें-गोवले, टाकणे सांकडें-संकट उगवील-सोडवील

अर्थ –देवा, तुला कृपा करण्याचा एवढा संकोच वाटत होता तर मग इतक्या जीवांना जन्म तरी कशासाठी रे दिलास? आता आम्ही आमचे दुःख कुणापाशी तोंड उघडून सांगावे? १ मी दमलो आहे, भागलो आहे, अशी घोषणा देवा, तुम्ही एवढा माझा त्याग केल्यावर कोण करणार आहे? २ मी आता कुणाची वाट शोधत्या दिशेने पाहू? असा कोण माझा जीवलग आहे की तो मला जवळ करील? ३ माझ्या जीवावरचे संकट कोण जाणून घेईल रे? मला संकटातून सोडविणारा कोण आहे? ४ तुकाराम महाराज म्हणतात, पांडुरंगा माझ्या चित्तात अशी कोणती निश्चिती तुम्ही पाहिली हो? ५

१९१८ देईं डोळे भेटी न धरीं संकोच । न घलीं कांहीं वेंच तुजवरी ॥ १ ॥
तुज बुडवावें ऐसा कोण धर्म । अहर्निशीं नाम घेतां थोडें ॥ २ ॥
फार थोडें कांहीं करूनि पातळ । त्याजमध्यें काळ कढे लावूं ॥ ३ ॥
आहे माझी तेचि सारीन सिदोरी । भार तुजवरी नेदीं माझा ॥ ४ ॥
तुका म्हणे आम्हां लेंकराची जाती । भेटायया खंती वाटतसे ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – वेंच-खर्च, सारीन-खर्च करीन, खंती-काळजी

अर्थ –देवा, मला तुझी दृष्टिभेट होऊ दे भेट देण्यात तू संकोच करू नकोस यासाठी मी तुला कोणत्याच खर्चात घालीत नाही १ तुला कुठल्या तरी संकटात बुडवावे हा कुठला धर्म? तुझे नाम रात्रंदिवस घेतल्यासही थोडेच आहे २ थोडेफार करून आम्ही तुझे नाम घेत जाऊ व त्यात आमचा काळ कसा तरी घालवू ३ देवा, माझी जी काही संचिताची शिदोरी आहे तीच मी कशी तरी पुरवून लाईन, खर्च करीन मी माझा भार काही तुझ्यावर घालणार नाही ४ तुकाराम महाराज म्हणतात, आमची लेकरांची जात अशी की, त्यांना तुला भेटण्याची काळजी नेहमीच वाटावी ५

१९१९ सीण भाग हरे तेथींच्या निरोपें । देखिलिया रूप उरी नुरे ॥ १ ॥
इंद्रियांची धांव होईल कुंटित । पावेल हें चित्त समाधान ॥ २ ॥
माहेर आहेसे लौकिकीं कळावें । निढळ बरवें शोभा नेदी ॥ ३ ॥
आस नाहीं परी उरी बरी वाटे । आपलें तें भेटे आपणासी ॥ ४ ॥
तुका म्हणे माझी अविट आवडी । खंडण तातडी होऊं नेदीं ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – हरे-नाहीसा होतो, निढळ-निराधार, दुर्दैवी, खंडण– तूट, ताटातूट, तातडी– कधीही.

अर्थ –माझ्या माहेरचा मला निरोप आला की माझ्या मनाचा शीण सगळा नाहीसा होतो मग प्रत्यक्ष रूप पाहिल्यावर तो तर मुळीच उरणार नाही १ माझ्या सर्व इंद्रियांची धाव थांबून माझ्या चित्तास समाधान प्राप्त होईल २ मला माहेर आहे असे लौकिकात समजून यावे, नाही तर मज निराधाराची ही शोभा काही चांगली नाही ३ मला आता कोणतीही आशा उरलेली नाही, पण तुझ्या भेटीची इच्छा उरलेली बरी वाटते जे आपले ते आपणास भेटते, असा भाव त्यामुळे वाटत राहातो ४ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तुझ्याविषयी माझ्या मनात असणारी आवड अवीट आहे ती कधी कमी होणार नाही तीत तू कधीही ताटातूट करू नकोस ५

१९२० धरितो वासना परी नये फळ । प्राप्तीचा तो काळ नाहीं आला ॥ १ ॥
तळमळी चित्त घातलें खापरीं । फुटतसे परी लाहीचिया ॥ २ ॥
प्रकार ते कांहीं नाथडती जीवा । नाहीं पुढें ठावा काळ हातीं ॥ ३ ॥

जातो तळा येतों मागुताला[1] वरी । वोळशाचे फेरी सांपडलो ॥ ४ ॥
तुका म्हणे बहु करितो विचार । उतरें डोंगर एक चढें ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – वोळशाचे–पाण्यातील भोवरा, संकट.

अर्थ.– मी देवा, तुझ्या भेटीची इच्छा करितो, पण अजून फळ काही मिळत नाही तुझ्या प्राप्तीची वेळ काही अजून आलेली नाही १ खापरात भाजताना लाही जशी फुटते, तसे माझे चित्त देवा, तुझ्यासाठी तळमळते २ देवा, तुझ्या भेटीशिवाय इतर कोणतेही प्रकार माझ्या मनास आवडत नाहीत, पण अजून तुझी भेटही झाली नाही; आता पुढे काय होईल, हे त्या काळाच्याच हाती आहे ३ पाण्याच्या भोवऱ्यात एक प्राणी तळाशी जातो व दुसरा वर येतो, तशा प्रकारे मी या संकटात सापडलो आहे ४ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, अनेक विचारांच्या डोंगरांवर मी चढतो आणि उतरतो हा एक माझ्या मनाचा छंदच आहे ५

१९२१ कां माझे पंढरी न देखती डोळे । काय हे न कळे पाप यांचें ॥ १ ॥
पाय पंथें कां हे न चलती वाट । कोण हें अदृष्ट कर्म बळी ॥ २ ॥
कां हे पायांवरी न पडे मस्तक । क्षेम कां हस्तक न पवती ॥ ३ ॥
का या इंद्रियांची न पुरे वासना । पवित्र होईना जिव्हा कीर्तीं ॥ ४ ॥
तुका म्हणे कईं जाऊनि मोटळें[2] । पडेन हा लोळें महाद्वारीं ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – पथें–मार्गाने क्षेम–आलिंगन, मोटळें–शरीर

अर्थ – माझे डोळे या पंढरीस का पाहात नाहीत? यानी असे पाप तरी कोणते केले आहे ते काही समजत नाही १ माझे पाय पंढरपूरची वाट का चालत नाहीत? असे होण्यात माझे कोणते बलवान प्रारब्ध आड आले आहे ? २ माझे हे मस्तक त्या पांडुरंगाच्या पायावर का बरे पडत नाही ? आणि त्या विठ्ठलाला आलिंगन द्यायला माझे हे हात का बरे पुढे होत नाहीत ? ३ माझ्या या सर्व इंद्रियांची ही वासना का बरे पुरी होत नाही ? देवा, तुमची कीर्ती गाऊन ही माझी जीभ पवित्र का होत नाही ? ४ तुकाराम महाराज म्हणतात, माझ्या देहाचे हे मोटकुळे महाद्वारात कधी लोटांगण घेईल असे मला झाले आहे. ५

१९२२ काय पोरें जालीं फार । किंवा न साहे करकर ॥ १ ॥
म्हणऊनि केली सांडी । घास घेऊं न ल्हां[3] तोंडीं ॥ २ ॥
करूं कलागती । तुज भांडणें भोंवतीं ॥ ३ ॥
तुका म्हणे टाचे । घरीं जालेसे बरोंचें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – करकर–कटकट सांडी–त्याग, कलागती–भांडणे, टाचे–उणीव, कमतरता बरोचें–पुष्कळ अन्नसामग्री.

अर्थ –देवा, तुला लेकरे फार झाली की काय रे ? किंवा त्यांची कटकट तुला सहन होत नाही ? १ आम्ही मुले तुझ्याजवळ असलो की तुला एकही घास घेण्यास अवधी देणार नाही म्हणून का तू आमचा त्याग केला आहेस? २ देवा, तुझ्याभोवती गोंगाट करून आम्ही भांडण करू अशी का धास्ती तुला वाटते? ३ तुकाराम महाराज म्हणतात, की देवा, तुझ्या घरचा अन्नसामग्रीचा साठा संपला म्हणून का तू मला जवळ करीत नाहीस ? ४

१९२३ कांहीं चिंतेविण । नाहीं उपजत सीण ॥ १ ॥
तरी हा पहिला विसर । माझा तुम्हां जाला भार ॥ २ ॥
आली कांहीं तुटी । गेली सुटोनियां गांठी ॥ ३ ॥
तुका म्हणे घरीं । बहु बैसले रिणकरी ॥ ४ ॥

१ मागुता लौकरी, २ मोटाळे, ३ न स्हायें.

शब्दार्थ व टीपा –उपजत-निर्माण होत, सीण-भार, तुटी-तूट, खोट

अर्थ –देवा, मनात कसली तरी चिंता असल्याशिवाय कधी त्रास निर्माण होत नाही १ माझा भार तुमच्यावर फार झाला का ? या चिंतेमुळे तुम्हाला माझा विसर झाला की काय ? २ किंवा देवा, तुमच्या संचयामध्ये काही तूट आल्यामुळे व जवळचा साठा संपल्यामुळेच तू माझ्याकडे लक्ष देत नाहीस ३ तुकाराम महाराज म्हणतात, तुझ्या दारात पुष्कळच रिणकरी बसले असावेत, म्हणूनच माझा विसर तुला झाला असावा ४

१९२४ निरोपासी वेचे । काय बोलता फुकाचें ॥ १ ॥
परी हे नेघेवेचि यश । भेओ नको सुखी आस ॥ २ ॥
सुख समाधानें । कोण पाहे देणे घेणे ॥ ३ ॥
न लगे निरोपासी मोल । तुका म्हणे वेचे बोल ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – वेचे-खर्च होते, नेघेवे-घेववत नाही भेओं नको-भिऊ नकोस

अर्थ— देवा, कुणाबरोबर तरी निरोप पाठविला असतास तर तुझे काय खर्च झाले असते रे ? फुकटच्या शब्दामुळे तुला काय खर्च येतो रे ? १ पण हे यश काही तुझ्याच्याने मोठपणे घेववत नाही तरी देवा, आता तू भिऊ नकोस, सुखात राहा २ जो स्वत च्या सुखातच गुग होतो तो दुसऱ्याचे देणेघेणे कधीतरी जाणतो का ! ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, निरोपाचे शब्द पाठविण्यास काहीच खर्च लागत नाही, तेव्हा एवढे शब्द तरी खर्च कर ना. ४

१९२५ जोडीच्या हव्यासे । लागे धनाचेचि पिसें ॥ १ ॥
मग आणीक दुसरें । लोभ्या नावडती पोरें ॥ २ ॥
पाहे रुवयाकडे । मग अवघें ओस पडे ॥ ३ ॥
तुका म्हणे देवा । तुला बहुतचि हेवा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – जोडीच्या-प्राप्तीच्या, पिसें-वेड, हेवा-हाव

अर्थ – कृपण व लोभी माणसास धनाच्या प्राप्तीच्या हव्यासामुळे तेच एक वेड सतत लागून राहाते १ मग त्या लोभी माणसास एका द्रव्याशिवाय दुसरे काहीही, स्वत ची पोरेसुद्धा आवडत नाहीत २ तो नेहमी केवळ धनाकडच पाहातो आणि त्यामुळे त्याला सर्व व्यथ वाटते ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, याप्रमाणे तुलाही फार हाव सुटलेली दिसते पुष्कळाचा लोभ तुला असल्यामुळे मला तू जवळ करीत नाहीस ४

१९२६ मविले मवितो । नेणो रासी पडिल्या किती ॥ १ ॥
परि तू धालाचि न धासी । आले उभाउभीं घेसी ॥ २ ॥
अवघ्यां अवघा काळ । वाटा पाहाती[1] सकळ ॥ ३ ॥
तुका म्हणे नाहीं । अराणूक तुज काहीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – मविले-मोजलले मवितो-मोजतात, आराणूक-विसावा

अर्थ– एकदा मोजलेलच परत मोजावे, अशा किती राशी पडलेल्या आहेत हे काही समजत नाही १ पण तू एकदा तृप्त झाला असलास तरी आपल्या भक्तांविषयी अतृप्त आहेस जे कुणी तुला आनतेने भेटतील त्यांना तू तावडतोब जवळ करतोस २ सदासर्वकाळ सर्व वाटा तुझ्याकडेच यऊन मिळतात, अथवा सर्व लोक तुझ्याकडेच डोळे लावून बसतात, तुझीच वाट पाहातात ३ तुकाराम महाराज म्हणतात देवा, तुला यामुळे थोडाही विसावा कधी मिळत नाही ४

[1] वाहाती

१९२७ न बैससी खालीं । सम उभाच पाउलीं ॥ १ ॥
ऐसे जाले बहुत दिस । जालीं युगें अठ्ठाविस ॥ २ ॥
नाही भाग सीण । अराणूक एक क्षण ॥ ३ ॥
तुका म्हणे किती । मापें केलीं देती घेती ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा — सम-एकसारखे, भाग-त्रास, सीण-कष्ट, त्रास, अराणक-विश्रांती

अर्थ —देवा, एकसारखे पाय जोडून तू उभा राहिला आहेस, तू खाली कधी बसतच नाहीस १ अशा अव स्थेत पुष्कळ दिवस होऊन गेले अठ्ठावीस युगे होऊन गेली तरी तू अजून उभाच आहेस २ तुला याचा कधीं त्रास वाटत नाही, कारण तू क्षणभरही कधी विश्रांती घेत नाहीस ३ तुकाराम महाराज म्हणतात तुझ्याजवळ देणेघेणे करण्याची मापे किती आहेत हे समजतच नाहीं ४

१९२८ जोडी[1] कोणासाटीं । एवढी करितोसी आटी ॥ १ ॥
जरी हे आम्हा नाही सुख । रडो पोरे पोटीं भूक ॥ २ ॥
करूनि जतन । कोणा देसील हे धन ॥ ३ ॥
आमचे तळमळे । तुझें होईल वाटोळें ॥ ४ ॥
घेसील हा श्राप । माझा होऊनिया बाप ॥ ५ ॥
तुका म्हणे उरी । आता न ठेवीं यावरी ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा -जोडी-प्राप्ती मिळकत आटी-प्रयत्न, खटपट, उरी-उणीव

अर्थ —देवा, असे अतोनात् श्रम करून कुणासाठी रे एवढी प्राप्ती करून ठेवितोस ! १ तुझ्या या प्राप्तीचे जर आम्हास सुख नाही तर काय तिचा उपयोग ? पोटात भूक लागल्याने तुझी ही पोरे रडतात ना २ तू या सर्व धनाचे जतन करून कुणाला रे देणार आहेस ? ३ देवा, आमच्या या तळमळीमुळे तुझे मात्र वाटोळे होईल माझा हा शाप घेशील ४ तुकाराम महाराज म्हणतात देवा, म्हणून तू आता याविषयी काही उणीव ठेवू नकोस ५

१९२९ करूनि चाहाडी । अवघी बुडवीन जोडी ॥ १ ॥
जरि तू होऊनि उदास । माझी बुडविसी आस ॥ २ ॥
येथें न करीं काम । मुखें नेघें तुझें नाम ॥ ३ ॥
तुका म्हणे कुळ । तुझें बुडवीन समूळ ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा — जोडी-प्राप्ती आस-इच्छा

अर्थ — देवा, तू कधीच कृपा करीत नाहीस अशी तुझी चहाडी करून मी तुझी सर्व प्राप्ती बुडवून टाकीन १ उदास होऊन तू जर माझी इच्छा बुडवशील तर मी असेच करीन देवा २ मी येथे राहून काहीसुद्धा काम करणार नाही मुखाने तुझे नामसुद्धा कधी घेणार नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, तुझा भक्ताना काहीच उपयोग नाही असे सांगून तुझे कुळच मी समूळ बुडवून टाकीन ४

१९३० समर्थाचे पोटीं । आम्ही जन्मलो करंटीं ॥ १ ॥
ऐसी जाली जगीं कीर्ति । तुम्च्या[2] नामाची फजिती ॥ २ ॥
येथें नाहीं खाया । न ये कोणी मूळ न्याया ॥ ३ ॥
तुका म्हणे जिणे । आतां खोटें जीवपणे ॥ ४ ॥

१ जोडी केली कोणा०-, २ माझ्या.

शब्दार्थ व टीपा — करंटी-दरिद्री, कमनशिबी.

अर्थ —देवा, तुमच्यासारख्या समर्थाच्या पोटी जन्मास येऊन आम्ही असे कमनशिबी असावे ना ? १ तुम्ही जर अशी कीर्ती साऱ्या जगात वाढली तर तुमच्या नामाची मोठीच फजिती होईल. २ येथे मला काही खायला नाही, की मला कुणी माहेरी नेण्यासाठी आमंत्रण पाठवीत नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, आता जिवत राहूनही हे जगणे मला व्यर्थच वाटू लागले आहे ४

१९३१ पुढें तरी चिंता । काय येईल तें आता ॥ १ ॥
मज सांगोनियां धाडीं । वाट पाहातों वराडी ॥ २ ॥
कंठीं धरिला प्राण । पायांपाशीं आलें मन ॥ ३ ॥
तुका म्हणे चिंता । बहु वाटतसे आतां ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा– वराडी–वराडी, आशाळभूत, भुकेलेला

अर्थ — देवा, आता यापुढे तरी तुझ्या चित्तात येईल तसे तू कर १ मला तू घेऊन जाण्यासाठी निरोप पाठीव ना मी भुकेलेला तुझी वाट पाहातो आहे २ मी तुझ्यासाठी देवा, प्राण कंठाशी धारण केला आहे. माझे मन तुझ्या पायांशीच अर्पण केले आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, तू आता कृपा कशी काय करशील याविषयी मला फार चिंता वाटते ४

१९३२ कैंचा मज धीर । कोठें बुद्धि माझी स्थिर ॥ १ ॥
जें या मनासी आवरूं । आंत[1] पोटीं वाव धरूं ॥ २ ॥
कैंची शुद्ध मति । भाडवल ऐसें हातीं ॥ ३ ॥
तुका म्हणे अंगा । कोण दशा आली सांगा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा– वाव–व्यर्थ

अर्थ — देवा, मला कसला धीर आलाय ? माझी बुद्धी तरी कुठे स्थिर आहे ? १ आत पोटात धरून या माझ्या मनास आवरावे तर तेही चंचल असल्याने व्यर्थ होते २ माझी वासना तरी शुद्ध आहे का ? हे असे शुद्ध भाडवल देवा, माझ्या हाती असल्याने तू मला कसा भेटणार ! ३ तुकाराम महाराज म्हणतात, यामुळे देवा, माझ्या अंगाशी कसा फजितीचा प्रसंग आला आहे हे तुम्हीच सांगा. ४

१९३३ समर्पक वाणी । नाहीं ऐकिजेसी कानीं ॥ १ ॥
आता भावें करूनि साचा । पाया पडिलों विठोबाच्या ॥ २ ॥
न कळे उचित । करूं समाधान चित्त ॥ ३ ॥
तुका म्हणे विनती । विनविली धरा चित्तीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा –समर्पक–योग्य, साचा–खरोखर

अर्थ —देवा, कानानी नीट ऐकावी अशी योग्य वाणी माझी नाही १ पण मी आता भाव धरून खरोखरच विठोबाच्या पायां पडत आहे २ ज्यामुळे चित्तास समाधान होईल असे काही योग्य ते कसे करावे हे मला समजत नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी पत्राने देवा, तुम्हांला जी विनती केली आहे, ती तुम्ही चित्तात धारण करावी. ४

---

१ आतां.

१९३४ येती वारकरी । वाट पाहातों तोंवरी ॥ १ ॥
घालूनियां दंडवत । पुसेन निरोपाची मात ॥ २ ॥
पत्र हातीं दिलें । जया जेथें पाठविलें ॥ ३ ॥
तुका म्हणे येती । जाइन सामोरा पुढती ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा -मात-हकीगत.

अर्थ- पंढरपुराहून वारकरी परत येईपर्यंत मी त्याची वाट पाहीन. १ ते आल्यावर मी त्यांना दंडवत घालीन व विठ्ठलाच्या निरोपाची हकीगत विचारीन २ मी त्यांना विठ्ठलास पत्र लिहून तेथे पाठविले आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, ते वारकरी समोर येताच मी त्यांना सामोरा जाईन व भेटेन ४

१९३५ रुळे महाद्वारीं । पायांखालील पायरी ॥ १ ॥
तैसें माझें दंडवत । निरोप सांगतील संत ॥ २ ॥
पडे दंडकाठी । देह भलतीसवा लोटी ॥ ३ ॥
तुका म्हणे बाळ । लोळे न धरितां सांभाळ ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:—रुळे-लोळेन, दंडकाठी-हातातील काठी

अर्थ:—मंदिराच्या पायाखालच्या पायरीवर महाद्वारात मी लोळण घेईन १ असा हा माझ्या दंडवताचा निरोप संत विठ्ठलाला सांगतील . २ हातातील काठी खाली पडावी तसा माझा देह देवाच्या समोर पडेल. ३ तुकाराम महाराज म्हणतात, एखादे बालक जसे आपल्या अंगाचा सांभाळ न करता जमिनीवर लोळते त्याच प्रमाणे मी लोटांगण घेईन. ४

१९३६ तुम्ही संतजनीं । माझी करावी[१] विनवणी ॥ १ ॥
काय तुक्याचा अन्याय । त्यासी अंतरले पाय ॥ २ ॥
भाका बहुतां रीती । माझी कींव काकुलती ॥ ३ ॥
न देखे पंढरी । तुका चरण विटेवरी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा -भाका-सांगा, कानावर घाला.

अर्थ:-संतजनहो, तुम्ही माझी एवढी विनंती देवास करा १ तुकयाचा एवढा अन्याय तरी काय झाला? की त्याला तुझे पाय दिसू नयेत, असे तुम्ही त्या पांडुरंगाला विचारा. २ तुम्ही मजविषयी कींव व काकुळती पुष्कळ प्रमाणात त्याच्या कानावर घाला. ३ तुकाराम महाराज म्हणतात, मला या पंढरपुरातील विठ्ठलाची पावले विटेवर दिसत नाहीत; असे का ? हेही विचारा. ४

१९३७ होइल कृपादान । तरी मी येईन धांवोन ॥ १ ॥
होती संतांचिया भेटी । आनंदें नाचों वाळवंटीं ॥ २ ॥
रिघेन मातेपुढें । स्तनपान करीन कोडें ॥ ३ ॥
तुका म्हणे ताप । हरती देखोनियां बाप ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:-रिघेन-येईन, जाईन, कोडें-कौतुकाने

---

१. करा.

अर्थ – जर मजवर ईश्वराची कृपा होईल तर मी त्याच्यापुढे धावत येईन १ त्याच्या बरोबर आनंदाने वाळवटात नाचत येईल २ त्या रुक्मिणीमातेपुढे जाऊन मी मोठ्या कौतुकाने स्तनपान करीन ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा प्रकारे तो मायबाप पांडुरंग पाहिल्यावरोबर माझ्या मनाचा सारा ताप दूर होईल ४

१९३८ परिसोनि उत्तर । जाब देईजे सत्वर ॥ १ ॥
जरी तू होसी कृपावंत । तरि हा बोलावीं पतित ॥ २ ॥
नाणी काहीं मना । करूनि पापाचा उगाणा ॥ ३ ॥
तुका म्हणे नाहीं । काय शक्ति तुझे पायीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – परिसोनि–ऐकून, नाणी–आणू नकोस, उगाणा–झाडा

अर्थ –देवा, माझे हे शब्द ऐकून त्याचे उत्तर तू सत्वर दे १ तू थोर कृपावंत आहेस, तरी माझ्यासारख्या पतिताला बोलावणे पाठीव २ तू मनात काही आणू नकोस माझ्या सर्व पातकाचा नाश करूनच तू मला बोलाव ३ तुकाराम महाराज म्हणतात, यासाठी तुझ्यापाशी शक्ती नाही की काय? ४

१९३९ ऐकोनिया कीर्ती । ऐसी वाटती विश्रांती ॥ १ ॥
माते सुख डोळा पडे । तेथें कोण लाभ जोडे ॥ २ ॥
बोलता[1] ये वाचे । वीट नये जिव्हा नाचे ॥ ३ ॥
तुका म्हणे धावे । वासना ते रस घ्यावे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – माते–मग

अर्थ – त्या श्रीहरीची कीर्ती ऐकल्या बरोबरच मनाला विश्रांतीचे सुख मिळते १ मग ते सुख प्रत्यक्ष डोळ्यासमोर उभे राहिल्यास केवढा तरी त्यामुळे लाभ होईल २ त्या सुखाचे वर्णन या वाणीने करता येणार नाही किंवा जिभेलाही त्याचा वीट न येता ती आनंदाने नाचत असते ३ तुकाराम महाराज म्हणतात, ते प्रेमसुख भोगण्यासाठी माझी वासना धावत असते, त्या प्रेमरसाचा आस्वाद घेण्यास ती उत्सुक असते ४

१९४० किती करूं शोक । पुढें वाढे दुःखें दुःख ॥ १ ॥
आता जाणसी तें करीं । माझें कोण मनीं धरी ॥ २ ॥
पुण्य होते गांठी । तरि का लागती हे आटी ॥ ३ ॥
तुका म्हणे बळ । माझी राहिली तळमळ ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – गाठीं–जवळ स्वाधीन, आटी–प्रयत्न, खटपट

अर्थ –देवा, आता मी तुझ्या भेटीसाठी किती शोक करावा? त्यामुळे दुःखाने दुःख मात्र वाढते १ आता तुला समजेल तसे तू कर माझे कोण मनावर घणार आहे? २ जर माझ्याजवळ भरपूर पुण्याचा साठा असता तर एवढी खटपट का करावी लागली असती? ३ तुकाराम महाराज म्हणतात माझ्या मनात असलेली तळमळ हेच एक माझे बळ आहे ४

१९४१ करील आवाळी । माझ्या दाताची कसाळी ॥ १ ॥
जासी एखादा मरोन । पाठी लागेल हें जन ॥ २ ॥

१ बोलतां एवाचे

घरीं लागे कळह[1] । नाहीं जात तो शीतळ ॥ ३ ॥
तुका म्हणे पोरवडे । मज येतील रोकडे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपाः– आबाळी–फजिती, कसाळी–रागाचे बोलणे, कळह– भांडण, तंटा, शीतळ–सुखकर.

अर्थः– माझ्या अशा या रागाच्या बोलण्याने तुझी मात्र फजिती होईल. १. माझ्या तीव्रतेच्या बोलण्याने तू एखाद्या वेळी मरून जाशील; मग मात्र सर्व लोक माझ्या पाठीशी लागतील. २. घरात एकदा भांडणतंटा सुरू झाला की मग कुणासच सुखकारक वाटत नाही. ३. तुकाराम महाराज म्हणतात, मग माझ्या वाट्यास मात्र केवळ पोरकटपणा येईल. ४

१९४२ आतां आशीर्वाद । माझा असो सुखें नांद ॥ १ ॥
म्हणसी कोणा तरी काळें । आहेतसीं माझीं बाळें ॥ २ ॥
दुरी दूरांतर । तरी घेसी समाचार ॥ ३ ॥
नेसी कधीं तरी । तुका म्हणे लाज हरी[2] ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – दूरांतर–पुष्कळ कालानंतर.

अर्थः– देवा, तू सुखाने नांद असा माझा तुला आशीर्वाद आहे. १ ही माझीच लेकुरे आहेत असे कधी तरी तू म्हणशीलच. २ दूर कुठेही असलास तरी पुष्कळ कालानंतर का होईना पण तू माझा समाचार घेशील. ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, श्रीहरी, तुला लाज असल्याने तू कधीतरी मला घेऊन जाशील. ४

१९४३ आतां हे सेवटीं । माझी आइकावी गोष्टी ॥ १ ॥
आतां द्यावा वचनाचा । जाब कळे तैसा याचा ॥ २ ॥
आतां करकर । पुढें न करीं उत्तर ॥ ३ ॥
तुका म्हणे ठसा । तुझा आहे राखें तैसा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा.—करकर–कटकट.

अर्थः– देवा, आता शेवटी माझे एक म्हणणे तरी ऐका. १ आता तुम्हास कळेल तसा मला वचनाचा जाब द्या. २ आता मी वेडेवाकडे शब्द बोलून तुझ्यापुढे कटकट करणार नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, आता तुझा जसा ब्रीदाचा ठसा असेल तसे तू वाग. ४

१९४४ बोलिलों तें आतां । कांहीं जाणतां नेणतां ॥ १ ॥
क्षमा करावे अन्याय । पांडुरंगे माझे माय ॥ २ ॥
स्तुती निंदा केली । लागे पाहिजे साहिली ॥ ३ ॥
तुका म्हणे लाड । दिला तैसें पुरवा कोड ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपाः– साहिली–सहन केली, कोड–कौतुक.

अर्थ.– देवा, मी आतापर्यंत काही जाणतेपणी अथवा नेणतेपणी जे काही बोललो १ त्याची तू क्षमा करावीस. पांडुरंगे, माय, तू माझे अन्याय विसरून जा. २ मी तुझी स्तुती अथवा निंदा केली तरी तू सहन केली पाहिजेस ३ तुकाराम महाराज म्हणतात, तुम्ही माझे कौतुक आजवरच्या लाडाप्रमाणे करावे. ४

---

१ कळ हे, २ घरी.

१९४५ माहेरिचा काय येईल निरोप । म्हणऊनि झोंप नाहीं डोळां ॥ १ ॥
बाट पाहें आस धरूनियां जीवीं । निडळा हे ठेवीं वरी बाहे ॥ २ ॥
बोटवरी माप लेखितो दिवस । होतों कासावीस धीर नाहीं ॥ ३ ॥
काय नेणों संतां पडेल[1] विसर । कीं नव्हे सादर मायबाप ॥ ४ ॥
तुका म्हणे तेथें होईल दाटणी । कोण माझें आणी मना तेथें ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपाः–आस–इच्छा, निडळा–कपाळावर, बाहे–हात, लेखितो–मोजतो, दाटणी–गर्दी, सादर–तत्पर.

अर्थ :– माझ्या माहेरहून आईबापांचा काय निरोप येईल ? असे मनात येऊन माझ्या डोळ्यावरची झोप नाहीशी झाली आहे. १ मी माझ्या जीवात त्याची मोठी इच्छा धरून, कपाळावर हात ठेवून वाट पाहत आहे. २ मी बोटांच्या मापाने दिवस मोजीत आहे, माझा जीव अतिशय कासावीस होत असून मला मुळीच धीर नाही आता. ३ हे साधुसंत माझा निरोप सांगायला विसरले की काय ? किंवा माझे मायबापच तत्पर नाहीत असे दिसते ४ तुकाराम महाराज म्हणतात, तेथे आईबापांशी भाविकाची गर्दी झाली असेल, माझे तेथे कोण मनावर घेणार ? ५

१९४६ परि तो आहे कृपेचा सागर । तोंवरी अंतर पडों नेदी ॥ १ ॥
बहुकानदृष्टी आइके देखणा । पुरोनियां जना उरलासे ॥ २ ॥
सांगितल्याविणें जाणे अंतरिचें । पुरवावें ज्याचें तैसें कोड ॥ ३ ॥
बहुमुखें कीर्ती आइकिली कानीं । विश्वास हा मनीं आहे माझ्या ॥ ४ ॥
तुका म्हणे नाहीं जात वांयांविण । पाळितो वचन बोलिलों तें ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपाः– देखणा–देखणारा, कोड–कौतुक, हौस.

अर्थः– पण असे कसे होईल ? तो माझा मायबाप कृपेचा सागर असल्याने तो आहे तोपर्यंत काही कमी पडू देणार नाही. १ त्याला पुष्कळ कान व डोळे असून तो सर्व काही पाहाणारा आहे, तो सर्व जगाला पुरून उरला आहे. २ मनात जे असेल ते तो न सांगता जाणून घेतो व ज्याची जशी इच्छा असेल तशी त्याची हौस तो पुरवितो. ३ त्याची कीर्ती मी पुष्कळांच्या मुखांनी, कानांनी ऐकली आहे, माझ्या मनात त्याच्याविषयी पूर्ण विश्वास आहे. ४ तुकाराम महाराज म्हणतात, आपले बोललेले वचन जो पाळतो त्याचे बोलणे कधीच व्यर्थ जात नाही. ५

१९४७ यावरि न कळे संचित आपुलें । कैसें वोडवलें होइल पुढें ॥ १ ॥
करील विक्षेप घाडितां मुळासी । किंवा धाडा ऐसी तांतडी हे ॥ २ ॥
जोंवरी हे डोळां देखें वारकरी । तों हें मरोवरी करी चित्त ॥ ३ ॥
आस वाढविते बुद्धीचे[2] तरंग । मनाचे ही वेग वावडती ॥ ४ ॥
तुका म्हणे तेव्हां होतील निश्चळ । इंद्रियें सकळ निरोपानें ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा.– संचित–दैव, प्रारब्ध, वोडवलें–उभे राहिले, विक्षेप–विघ्न, मुळासी–आमंत्रण धाडण्यात, मरोवरी–कल्पनांचे श्रम, सायास, वावडती–वाढतात, निश्चळ–स्थिर

अर्थः–आता यानंतर माझे प्रारब्ध कसे काय आहे हे काही समजत नाही. पुढे काय ओढवणार आहे हे कळत नाही. १ मला आमंत्रण पाठविण्यात ते विघ्न आणील किंवा लौकर धाडा अशी तातडी करील ? २ जोपर्यंत हे वारकरी निरोप घेऊन आलेले डोळ्यांनी दिसत नाहीत तोपर्यंत माझे हे चित्त कल्पनांचे उगाचच श्रम करणार. ३

१ पडिला, २ चित्ताचे ते वेग वावरती.

आशेमुळे बुद्धीचे नाना प्रकारचे तरंग वाढतात, मनाच्या चांचल्याचे विकारही वाढतात. ४ तुकाराम महाराज म्हणतात, त्याचा निरोप येईल तेव्हाच माझी सर्व इंद्रियें शांत होतील. ५

१९४८ होईल निरोप घेतला यावरी । राउळाभीतरीं जाऊनियां ॥ १ ॥
करूनियां दधिमंगळभोजन । प्रयाण शकुनसुमुहूर्तें ॥ २ ॥
होतील दाटले सद्‌गदित कंठीं । मरतें या पोटीं वियोगाचें ॥ ३ ॥
येरयेरां भेटी क्षेम आलिंगनें । केलीं समाधानें होतीं संतीं ॥ ४ ॥
तुका म्हणे चाली न साहे मनास । पाहाती कळस परपरतों[1] ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा.– राउळाभीतरीं-देऊळात जाऊन, परपरतों-पुन पुनः.

अर्थ -- देवळात जाऊन वारकरी संतांनी देवाजवळ माझा निरोप सांगितला असेल. १ निघण्याच्या वेळी दहिभाताचे मंगल भोजन करून प्रयाण करण्यासाठी मुहूर्त व शकुन पाहून ते निघण्याच्या तयारीत असतील २ या श्रीहरीचा वियोग होणार म्हणून त्यांचा कंठ सद्‌गदीत झाला असेल, त्यांना प्रेमाचे भरतें आले असेल. ३ तेथून निघते वेळी एकमेकांनी एकमेकांस आलिंगन देऊन परस्परांचे समाधान केले असेल. ४ तुकाराम महाराज म्हणतात, परत घरी निघाल्यावर वियोगदुःख मनास सहन न झाल्याने पुनः पुनः ते कळसाकडे बघत असतील ५.

१९४९ ऐसी ते सांडिली होईल पंढरी । येत वारकरी होते वाटे ॥ १ ॥
देखिले सोहळे होती आठवत । चालती ते मात करूनियां ॥ २ ॥
केली आइकिली होईल जे कथा । राहिलें तें चित्ता होइल प्रेम ॥ ३ ॥
गरुडटके टाळ मृदंग पताका । सांगती ते एकां एक सुख ॥ ४ ॥
तुका म्हणे आतां येती लवलाहीं । आलिंगूनि बाहीं देइन क्षेम ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – सांडिली-सोडली, मात-बातचीत, हकीगत, बाहीं-हातांनी, क्षेम-आलिंगन.

अर्थ – वारकरी संतांनी पंढरपूर क्षेत्र सोडले असेल व ते वाटेने परत येत असतील. १ पंढरीत असताना यात्रेचे जे सोहळे त्यांनी पाहिले असतील त्यांची आठवण करूनच ते चालत असतील त्याच गोष्टींची हकीकत बोलत बोलत ते चालत असतील. २ त्यांनी तेथे जी कथा केली असेल, ऐकली असेल त्यातील प्रेमच त्यांच्या चित्तात स्थिरावले असेल. ३ गरुडटका, टाळ, मृदुंग,पताका इत्यादी बरोबर घेऊन ते भजनात दंग होऊन एकमेकांस सुखवीत असतील. ४ तुकाराम महाराज म्हणतात, आता हे वारकरी संत लवकर येतील आणि त्यांना मी दोन्ही हातांनी कवटाळून आलिंगन देईन. ५

१९५० क्षेम मायबाप[2] पुसेन हें आधीं । न घलीं[3] हें मधीं सुख दुःख ॥ १ ॥
न करीं तांतडी आपणांपासूनि । आइकेन कानीं सांगती तें ॥ २ ॥
अंतरींचें संत जाणतील गूज । निरोप तो मज सांगतील ॥ ३ ॥
पायांवरी डोई ठेवीन आदरें । प्रीतिपडिभरें आळिंगून ॥ ४ ॥
तुका म्हणे काया करीन कुरवंडी । ओवाळून सांडीं त्यांवरून ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा.– क्षेम-कुशल, प्रीतिपडिभरें-प्रेमाच्या उमाळ्याने.

अर्थ – ते संत आल्यावर मी प्रथम माझ्या मायबापाचे कुशल विचारीन, मध्येच मी माझ्या सुख-दुःखाच्या गोष्टी कधी काढणार नाही. १ मी माझ्याकडून उगाच उतावळेपणा करणार नाही ते सांगतील ते मुकाट्याने ऐकेन २ संत माझ्या मनातील रहस्य बरोबर जाणून मला मायबापाचा निरोप सांगतील. ३ .मोठ्या

१ परतोनि, २ मायबापा, ३ न घालीं.

आदराने मी त्या संतांच्या पायांवर डोके ठेवीन प्रीतीच्या उमाळ्याने मी त्यांना आलिंगन देईन ४ तुकाराम महाराज म्हणतात, मी त्यांच्यावरून माझा देह ओवाळून टाकीन. ५

१९५१ होइल माझी संतीं भाकिली करुणा । जे त्या नारायणा मनीं बैसे ॥ १ ॥
शृंगारुनि माझीं बोबडीं उत्तरें । होतील विस्तारें सांगितलीं ॥ २ ॥
क्षेम आहे ऐसें होइल सांगितलें । पाहिजे धाडिलें शीघ्र मूळ ॥ ३ ॥
अवस्था जे माझी ठावी आहे संतां । होइल कृपावंता निरोपिली ॥ ४ ॥
तुका म्हणे सवें येईल मुऱ्हाळी । किंवा कांहीं उरी राखतील ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – शृंगारुनि–सुशोभित करून, गौरवून, मुऱ्हाळी–लग्न झाल्यानंतर नवरीच्या पाठराखणी म्हणून गेलेले मनुष्य

अर्थः– ज्यामुळे त्या नारायणाच्या मनात माझ्या विषयी दया निर्माण होईल अशी करुणा संतांनी त्याच्या पुढे भाकली असेल. १ माझे वेडेवाकडे व बोबडे शब्द त्यांनी सुशोभित करून गौरवाच्या भाषेत सांगितले असतील २ माझ्या विषयीचे सर्व कुशल त्यांनीं सांगितले असेल व त्याला लौकर बोलावणे पाठविले पाहिजे असा आग्रह धरला असेल ३ विठ्ठलाशिवाय माझ्या मनाची जी स्थिती झाली आहे ती त्या संतांना माहीत असल्याने ती सर्व हकीगत त्या कृपावंतांनी त्याला सांगितली असेल ४ तुकाराम महाराज म्हणतात, त्याच्या बरोबर मला नेण्यासाठी कुणीतरी मनुष्य येईल. किंवा त्या संतांनी काही मनात ठेवले असेलच ५

१९५२ दोहींमध्यें एक घडेल विश्वासें । भातुकें सरिसें मूळ तरी ॥ १ ॥
करिती निरास निःशेष न घडे । कांहीं तरी ओढे चित्त मायें ॥ २ ॥
लौकिकाची तरी धरितील लाज । काय माझ्या काज आचरणें ॥ ३ ॥
अथवा कोणाचें घेणें लागे रीण । नाहीं तरी हीनकर्मी कांहीं ॥ ४ ॥
व्यालीचिये अंगीं असती वेधना । तुका म्हणे मना मन साक्ष[1] ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – मूळ–बोलावणे, आमंत्रण, निरास–निराशा, व्यालीचिये–जन्म देणाऱ्या आईच्या, वेधना–वेदना.

अर्थः– मला तुमच्याकडील आमंत्रण हाच खाऊ मिळाला तर तुमच्यामाझ्यात एक प्रकारचा विश्वास निर्माण होईल १ देवा तू कधी संपूर्ण निराशा करशील असे कधी होणार नाही. आईच्या चित्ताची ओढ मुलाकरिता असतेच २ काही लौकिकाची तरी लाज त्यांच्या चित्ताला वाटेल ना ! माझ्या आचरणाशी काय काम आहे ? ३ नाही तर मला कुणाचे ऋण घेण्याचे काय कारण आहे ? मी काही हितकर्ता नाही. ४ जी जन्म देणारी आई असते तिच्याच मनास वेदना होतात तुकाराम महाराज म्हणतात, याबद्दलची साक्ष माझ्या मनास चांगलीच आहे ५

१९५३ बैसतां कोणापें नाहीं समाधान । विवरे हें मन तेचि सोई ॥ १ ॥
घडी घडी मज आठवे माहेर । न पडे विसर क्षणभरी ॥ २ ॥
नो[2] बोलावें ऐसा करितों विचार । प्रसंगीं तों फार आठवतें ॥ ३ ॥
इंद्रियांसी वाहो पडिली ते चाली । होती विसांवली येचि ठायीं ॥ ४ ॥
एकसरें सोस माहेरासी जावें । तुका म्हणे जीवें[3] घेतलासे ॥ ५ ॥

१ माक्षी, २ न, ३ जीव

शब्दार्थ व टीपा– कोणापें–कोणात, कोणाच्या पाशी, विवरे–विचार करते, वाही–ओघ.

अर्थः– आता मला कुणाच्या जवळ बसल्याने समाधान होत नाही केवळ या माझ्या मायबापाचाच विचार माझ्या मनात सारखा येत असतो १ मला माझ्या माहेराची आठवण राहून राहून एकसारखी होत असते. एक क्षणभरही त्यांचा विसर मला होत नाही २ या संबधी काही बोलू नये असाच विचार मी करतो, पण प्रसंग आला की मला त्याची फार आठवण येते. ३ माझ्या सर्वेन्द्रियाच्या ओघांची दिशाच या बाजूने आहे. याच ठिकाणी त्यांना विश्रांती मिळत असते ४ तुकाराम महाराज म्हणतात, माहेरास जावे असा माझ्या मनास एकसारखा ध्यास वाटत असतो, माझ्या मनास तोच एकसारखा सोस आहे. ५

१९५४ नाहीं हानि परी न राहावे निसुर । न पडे विसर काय करूं ॥ १ ॥
पुसाविसी वाटे मात कापडियां । पाठविती न्यावा मूळ मज ॥ २ ॥
आणीक या मना नावडे सोहळा । करितें टकळा माहेरींचा ॥ ३ ॥
बहु कामें केलें बहु कासावीस । बहु जाले दिस भेटी नाहीं ॥ ४ ॥
तुका म्हणे त्याचें न कळे अंतर । अवस्था तों फार होते मज ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – निसुर–निष्काळजी, मात–हकीगत, वार्ता, कापडियां–यात्रेकरुना, टकळा–ध्यास, कामें–इच्छेनें, अंतर–मन

अर्थः– माझी काही हानी होत नाही हे खरे, पण मला निष्काळजीपणाने राहावत नाही. मला त्याचा विसर मुळीच पडत नाही त्याला काय करू ? १ जे यात्रेकरू वारकरी आहेत त्यांना वार्ता विचारावी असे वाटते, मला नेण्यासाठी आमंत्रण येईल का? असे त्यांना विचारावेसे वाटते २ माझ्या मनाला या खेरीज दुसरा कुठलाच सोहळा नको. त्याला एकसारखा माहेरचा ध्यास आहे. ३ याच एका इच्छेने मला फारच कासावीस केले आहे. कारण पुष्कळ दिवस झाले तरी अजून मायबापाची भेट झाली नाही. ४ तुकाराम महाराज म्हणतात, मला काही त्याच्या मनाचा थांग लागत नाही. आणि इकडे तर माझ्या मनाची अवस्था फारच बिकट होत आहे. ५

१९५५ तोंवरी म्यां त्यास कैसें निषेधावें । जों नाहीं बरवें कळों आलें ॥ १ ॥
कोणाचिया मुखें तट नाहीं मागें । वचन वाउगें बोलों नये ॥ २ ॥
दिसे हानि परी निरास न घडे । हे तंव रोकडे अनुभव ॥ ३ ॥
आपुलियां भोगें होईल उशीर । तोंवरी कां धीर केला नाहीं ॥ ४ ॥
तुका म्हणे गोड करील सेवट । पाहिली ते वाट ठायीं[1] आहे ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – बरवें–पत्य, खरी परिस्थिती, तट–तट, दुष्कीर्ती.

अर्थ – जोपर्यंत त्याच्या विषयी खरी परिस्थिती समजली नाही तोपर्यंत त्याचा निषेध मी कसा करावा ? १ यापूर्वी त्याने कुणाचा निषेध केला, उपेक्षा केली अशी दुष्कीर्ती अजून माझ्या कानी आलेली नाही तेव्हा त्याच्या विषयी काही वावगे बोलू नये हेच बरे २ थोडी हानी मला दिसत आहे, पण या कामी निराश होता कामा नये. हा अनुभव तर आता प्रत्यक्षच रोजचा आहे ३ आपल्या प्रारब्धकर्मानुसार उशीर होईल तो होईल, तोपर्यंत धीर धरण्यास काय हरकत आहे ? ४ तुकाराम महाराज म्हणतात, हा मायबाप माझे शेवटी सर्व गोडच करील, कारण यापूर्वी त्याने आपल्या भक्ताची काय वाट लावली ते मला माहीत आहे ५

१ ठावी

१९५६ माहेरींचे आलें ते मज माहेर । सुखाचे उत्तर करिन त्यासी ॥ १ ॥
पायावरी माथा आळिंगीन बाहीं । घेईन लवलाहीं पायवणी ॥ २ ॥
सुख समाचार पुसेन सकळ । कैसा पर्वकाळ आहे त्यास[1] ॥ ३ ॥
आपुले जीवींचे सुखदु:ख भावें । सांगेन अघवे आहे तैसें ॥ ४ ॥
तुका म्हणे वीट नेघें आवडीचा । बोलिलीच वाचा बोलवीन ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – बाहीं–हातानी पायवणी–पायाचे तीर्थ

अर्थ – माझ्या माहेरहून जे संत येतात ते मला माझ्या माहेराप्रमाणेच वाटतात त्यांच्याशी मी सुखाने समाषण करीन १ मी त्यांच्या पायावर डोकें ठेवीन, दोनही हातानी त्याना आलिंगन देईन मी त्यांच्या पायाचे तीर्थ घेईन २ मी त्यांना सुखाचा सर्व समाचार विचारीन, त्याना माझ्याकडे येण्यास पर्वकाळाचा मुहूर्त कसला आहे ? ३ मी आपल्या नावाचे सुखदु:ख ज आहे ते मोठ्या भक्तिभावाने जसे आहे तसे सांगीन ४ तुकाराम महाराज म्हणतात, जे माझ्या प्रेमाचे आहे ते पुन सांगण्यात मला कंटाळा येणार नाही मी जे पूर्वी बोलतो तेच पुन त्यांच्याशी बोलेन ५

१९५७ वियोग न घडे सन्निध वसले । अखंड राहिले होय चित्तीं ॥ १ ॥
विसरु न पडे विकल्प न घडे । आलें तें आवडे तया पथें ॥ २ ॥
कामाचा विसर नाठवे शरीर । रसना मधुर नेणे फिकें ॥ ३ ॥
निरोपासी काज असो अनामिक । निवडिता एक नये मज ॥ ४ ॥
तुका म्हणे हित चित्तें ओढियेलें । जेथें तें उगलें जावें यथें ॥ ५ ॥

अर्थ – आता माझे सखेसायरे असलेले वारकरी येतील माझ्या जीवास हीच एक मोठी इच्छा लागून राहिली आहे १ मी विठ्ठलाला जो निरोप पाठविला होता त्याची हकीगत ते मला सांगतील माझ्या माहेरचा सगळा वृत्तान्त मला मग समजेल २ कोणता लाभ झाला, काय काय माल तेथे होता, कोणास काय काय मिळाले हे सर्व मी विचारीन ३ माझ्यासाठी मायबापाने कोणता खाऊ धाडला आहे ते मी विचारीन आणि ते सुखी आहेत ना ? अशी मी चौकशी करीन ४ तुकाराम महाराज म्हणतात ते काय सांगतील ते मी मनात भाव धारण करून कानानी ऐकेन ५

१९५९ काय करावे म्या केले ते विचार । घडेल साचार काय पाहो ॥ १ ॥
काय मन नाही धरीत आवडी । प्रारब्धीं जोडी तेचि खरी ॥ २ ॥
काय म्या तेथींचे राखिले चाखोनि । ते हे करीं मनीं विवचना ॥ ३ ॥
आणीक ही त्यासी बहुत कारण । बहु असे जिणे ओढीचे ही ॥ ४ ॥
तुका म्हणे आम्हा बोळविल्यावरी । परती माघारी केली नाहीं ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – साचार-खरोखर, कारण-कामे

अर्थ – मी पुष्कळ विचार केला, पण त्याला काय करायचे ? त्यामुळे काही अनुभवास खरोखर येते काय? हा खरा प्रश्न आहे १ मन काय कधी कशाची आवड धारण करीत नाही? पण दैवयोगाने जे प्राप्त होते तेच खरे २ मी काय त्या ठिकाणचे टिकविलेले चाखून पाहिले आहे ? मला काय अनुभव आहे ? तर मग त्याची विवचना मी मनाशी का करावी ? ३ त्याला आणखी पुष्कळच कामे असतील त्याच्याही जिवाची फार ओढाताण होत असते ४ तुकाराम महाराज म्हणतात, आम्हाला एकदा निरोप दिल्यावर याने परत आम्हाला बोलाविले नाही, आमची चौकशी केली नाही ५

१९६० आम्हां अराणूक संवसारा हातो । पडिली नव्हती आजिवरी ॥ १ ॥
पुत्रदाराधन होता[1] मनी धदा । गोवियेलो सदा होतो कामें ॥ २ ॥
चोडवले ऐसे दिसते कपाळ । राहिले सकळ आवरोनि ॥ ३ ॥
मागें पुढें काही न दिसे पाहाता । तेथूनिया चिंता उपजली ॥ ४ ॥
तुका म्हणे वाट पाहयाचे कारण । येथीचिया हिणे जाले भाग्य ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – आराणूक-विश्रांति, गोवियेलों-गुंतून गेलो होतो, कपाळ-नशीब, कारण-काम

अर्थ – आम्ही आजपर्यंत संसाराच्या मोहात सापडलो असल्याने कधी विश्रांतीच आम्हास मिळाली नव्हती १ आमच्या मनात सतत बायको मुले धन, धंदा याचीच चिंता होती याच्याच वासनांनी आम्ही गुंतून गेलो होतो २ आता मात्र दैव उजाडले आहे असे वाटते कारण आता सर्व बघने आवरली गेली आहेत ३ मागे पुढे पाहावे तो काहीच न दिसल्याने मात्र आता मनात चिंता निर्माण झाली आहे ४ तुकाराम महाराज म्हणतात, याच्या प्राप्तीविषयी मी हीनभाग्य झाल्यामुळे त्याची वाट पाहाणे हेच काम आता उरले आहे ५

१९६१ बहु दिस नाहीं माहेरची भेटी । जाली होती तुटी व्यवसायें ॥ १ ॥
आपुल्याला होतो गुतलो व्यासगें । नाहीं त्या प्रसगें आठवले ॥ २ ॥
तोडिले तुटते जडतो जडले । आहे ते आपुले आपणायें ॥ ३ ॥

---

१ होती

बहु[1] निरोपाचे पावले उत्तर । जवळीच पर एक तें ही ॥ ४ ॥
काय जाणो मोह होईल सांडिला । बहु दिस तुटला तुका म्हणे ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – तुटी–वियोग, व्यासंगे–व्यवसायात

अर्थ – आईबापाची भेट पुष्कळ दिवसात झाली नाही प्रपंचाच्या व्यवसायात सापडल्यामुळे वियोग निर्माण झाला होता १ मी आपल्याच व्यवसायात व प्रपंचात गुंतून राहिलो असल्याने त्यांची आठवण मला राहिली नाही २ नात्याचे व प्रेमाचे संबंध तोडले की तुटतात व जडविले की जडतात, आपण वागू तसे ते टिकतील ३ माझ्या निरोपाचे उत्तर पुष्कळ प्रकारे मिळाले, ते एक माझ्या जवळ आहेच ४ तुकाराम महाराज म्हणतात, पुष्कळ दिवस आईबापाचा संबंध तुटला असल्याने त्यांनी माझा संबंध अथवा लोभ सोडला आहे असेच वाटते ५

१९६२ होतीं नेणों जालीं कठिणें कठीण । जवळीच मन मनें ग्वाही ॥ १ ॥
आम्ही होतों सोई सांडिला मारग । घडिले तें मग तिकून ही ॥ २ ॥
निश्चितीनें होते पुढिलाची साडी । न चाले ते कोडी मायबापा ॥ ३ ॥
आम्हां नाहीं त्याचा घडिला आठव । त्याचा बहु जीव विखुरला ॥ ४ ॥
तुका म्हणे जाले धर्माचे माहेर । पडिलें अंतर आम्हाकूनि ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – तिकून–तिकडून, आइबापाकडून, विखुरला–तळमळला

अर्थ – मी फार कठोर वृत्तीचा झालो म्हणून आईबाप माझ्याशी कठोर झाले की काय न कळे माझ्या कठोरपणाविषयी माझे मनच ग्वाही देत आहे १ आम्हीच आईबापांचा अथवा माहेरचा मार्ग सोडला मग त्यांच्याकडूनही तेच घडून आले २ अशा या निश्चयामुळे ल्हान मुलाची मात्र आबाळ होते आणि मग ही कोंडी त्या आईबापासही चालत नाही ३ आम्हाला त्यांची आठवण झाली नाही, पण त्यामुळे त्यांचा जीव मात्र फार कळवळून गेला ४ तुकाराम महाराज म्हणतात, त्यामुळे हे मायबाप म्हणजे जणु धर्माचे झाले आहेत, कारण आमच्याकडूनच अंतर पडले ना ५

१९६३ आतां करावा कां सोस वायाविण । लटिकाचि सीण मनासी हा ॥ १ ॥
असेल तें कळो येईल लौकरी । आतां वारकरी आल्यापाठी ॥ २ ॥
बहु विलवाचे सन्निध पातले । धीराचे राहिले फळ पोटीं ॥ ३ ॥
चालिलें तें ठाव पावेल सेवटीं । पुरलिया तुटी पाउलाची ॥ ४ ॥
तुका म्हणे आसे लागलासे जीव । म्हणऊनि कींव भाकीतसे ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – सीण–त्रास आल्यापाठी–आल्यानंतर, आसे–इच्छा, आशा

अर्थ – आता मी व्यर्थ सोस का करावा ? उगाच माझ्या मनास त्रास मात्र होत राहणार १ जे असेल ते लौकरच समजून येईल, वारकरी परत आल्यानंतर सर्व काही समजेलच २ ज्याला फार मोठा उशीर होता ते आता अगदी जवळ येऊन पोचले आहे, आता थोडा धीर धरला की फळ हातांती येईलच ३ जे मार्ग चालत आहेत ते शेवटी मुक्कामास पोचतीलच जर मार्गात पावलेच रोखून राहिली तर मात्र वियोग होत राहील ४ तुकाराम महाराज म्हणतात, माझा जीव आशेला लागला आहे म्हणून तरी मी ही करुणा भाकीत आहे ५

१९६४ मागलेती देवा । माझा नमस्कार घ्यावा ॥ १ ॥
तुम्ही क्षेम कीं सकळ । बाळ अवघे गोपाळ ॥ २ ॥

---

१ नाहीं

मारगीं चालता । श्रमलेती येता जाता ॥ ३ ॥
तुका म्हणे काहीं । कृपा आहे माझ्या ठायीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – भागलेली-श्रमलेले दमलेले

अर्थ – अहो देवा, तुम्ही फार श्रमून गेलेले आहात मी तुम्हास नमस्कार करितो १ तुम्ही सर्व बाल-गोपालांसहित सुखरूप असावे २ वाटेने जाण्यायेण्यामुळे तुम्ही फार श्रमून गेले आहात ३ तुकाराम महाराज म्हणतात तुमची माझ्यावर काही कृपा आहेच ४

१९६५ घालूनिया ज्योती । वाट पाहे दिवसराती ॥ १ ॥
बहु उताविळ मन । तुमचे व्हावे दरुषण ॥ २ ॥
आलो बोळवीत । तैसे याचि पर्थे चित्त ॥ ३ ॥
तुका म्हणे पेणी । येतां जाता दिवस गणीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – दरुषण-दर्शन, बोळवीत-घालवीत, पेणी-मुक्काम

अर्थ – मी माझ्या डोळ्यात वात घालून रात्रदिवस तुमची वाट पाहात आहे १ माझे मन फारच उतावळे झाले असून तुमचे दर्शन व्हावे अशी त्यास भारी उत्कंठा आहे २ तुम्हांस जाताना मी ज्या वाटेवर घालवीत आलो त्याच वाटेकडे मी चित्त लावून बसलो आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, तुमच्या मार्गावरील जातायेताचे मुक्काम मी मोजीत बसलो आहे ४

१९६६ आजि दिवस धन्य । तुमचे जाले दरुषण ॥ १ ॥
सांगा माहेरींची मात । अवघा विस्तारीं वृत्तांत ॥ २ ॥
आइकतो मन । करुनि सादर श्रवण ॥ ३ ॥
तुका म्हणे नाम । माझा सकळ संभ्रम ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – दरुषण-दर्शन मात-हकीगत बातमी, संभ्रम-समारंभ

अर्थ – तुमचे दर्शन झाल्यामुळे आज माझा दिवस धन्य झाला आहे १ आता तुम्ही माझ्या आईबापांकडील सब हकीगत सांगा २ मी ती उत्कंठित व सादर मनाने ऐकेन ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवाचे नाम हाच आमचा मोठा आनंददायक समारंभ आहे ४

१९६८ काय पाठविलें । सांगा भातुकें विठ्ठलें ॥ १ ॥
आसे लागलासे जीव । काय केली माझी कींव ॥ २ ॥
फेडिलें मुडतर । किंवा कांहीं जरजर ॥ ३ ॥
तुका म्हणे सांगा । कैसें आर्त पांडुरंगा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – भातुकें–खाऊ, मुडतर–दुःख, दैन्य, जरजर–जीर्ण, फाटके वस्त्र, आर्त–इच्छा, तीव्रता.

अर्थ :–माझ्या विठ्ठलमाऊलीने कोणता प्रेमाचा खाऊ पाठविला आहे ते सांगा ना? त्याने माझ्याविषयी कोणत्या प्रकारची दया केली आहे? हे ऐकण्याची माझ्या जीवास फार मोठी आशा लागून राहिलेली आहे. २ त्याने माझे कोणते दैन्य या दुःख दूर केले? मला त्याने काही जुने, फाटके वस्त्र पाठविले आहे काय? ३ तुकाराम महाराज म्हणतात, या पांडुरंगास माझ्याबद्दल तीव्र इच्छा कोणती आहे ते सांगा. ४

१९६९ आजिचिया लाभें ब्रह्मांड ठेंगणें । सुखी जालें मन कल्पवेना ॥ १ ॥
आर्तभूत माझा जीव जयांसाटीं । त्यांच्या जाल्या भेटी पायांसवें ॥ २ ॥
वाटुली पाहातां सिणले नयन । बहु होतें मन आर्तभूत ॥ ३ ॥
माझ्या निरोपाचें आणिलें उत्तर । होइल समाचार सांगती तो ॥ ४ ॥
तुका म्हणे भेटी निवारला[1] ताप । फळले संकल्प संत आले ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – कल्पवेना–कल्पनाच करता येत नाही, आर्तभूत–तीव्रतेने इच्छा करणारा, सिणले–कष्टी झाले, त्रासले, नयन–डोळे.

अर्थ :–आज तुमच्या दर्शनामुळे जो लाभ झाला आहे त्यामुळे मला ब्रह्मांड ठेंगणे वाटत आहे. १ माझे मन किती सुखी झाले आहे याची कल्पनाच करवत नाही. १ माझा हा जीव ज्यांच्या निरोपासाठी तीव्रतेने व्याकुळ झाला होता, त्यांच्या पायांची भेट मला आज झालेली आहे. २ त्यांची वाट पाहात पाहात माझे डोळे कष्टी झाले. त्यांच्या दर्शनासाठी माझे व्याकुळ मन फारच उत्सुक होते. ३ माझ्या निरोपाचे उत्तर हे संतलोक आणतील आणि तिकडचा सर्व समाचार मला सांगतील. ४ तुकाराम महाराज म्हणतात, अशा संतांची भेट झाली असल्याने सर्व ताप दूर झाला आहे कारण संत घरी आल्यामुळे माझ्या मनाचे संकल्प परिपूर्ण झाले आहेत. ५

१९७० आजि बरवें जालें । माझें माहेर भेटलें ॥ १ ॥
डोळां देखिले सज्जन । निवारला भाग सीण ॥ २ ॥
धन्य जालो आतां । क्षेम देऊनियां संतां ॥ ३ ॥
इच्छेचे पावलों । तुका म्हणे धन्य जालों ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – बरवें–चांगले, क्षेम–आलिंगन.

अर्थ :–आज मला माझे आईबाप भेटले हे फार चांगले झाले १ माझ्या डोळ्यांनी आज मी साधुसंत पाहिले. त्यामुळे माझा सर्व शीण दूर झालेला आहे. २ या साधुसंतांना आश्वासन देऊन मी धन्य झालो आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, जे या तीव्र इच्छेने होते ते प्राप्त झाल्यामुळे मी धन्य झालो आहे. ४

[1] निरसला, निवाला

१९७१ वोरसोनि येती । वत्सें धेनुवेच्या चित्तीं ॥ १ ॥
माझा कराया[1] सांभाळ । वोरसोनियां कृपाळ ॥ २ ॥
स्नेहें भूक तान । विसरतीं जाले सीण ॥ ३ ॥
तुका म्हणे कौतुकें । दिलें प्रेमाचें भातुकें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :–वोरसोनि– प्रेमभराने, वत्सलतेने.

अर्थ :– प्रेमाच्या भराने गाईच्या चित्तात तिची वासरे येतात. १ त्याचप्रमाणे तुम्ही कृपाळू संतसज्जनांनी मला प्रेमाने सांभाळावे २ तुमच्या प्रेमाच्या लाभामुळे माझी भूक, तहान व परिश्रम यांचे निवारण होईल ३ तुकाराम महाराज म्हणतात, असा हा खाऊ मला माझ्या मायबापांनी कौतुकाने दिला आहे. ४

१९७२ आलें तें आधीं खाईन भातुकें । मग कवतुकें गाईन ओव्या ॥ १ ॥
सांगितला आधीं आइको निरोप । होइल माझा बाप पुसे[2] तो तें ॥ २ ॥
तुका म्हणे माझे सखे वारकरी । आले हे माहेरीहून आजि ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा:– भातुके–प्रेमाचा खाऊ.

अर्थ :–जो खाऊ माझ्या मायबापांनी माझ्यासाठी पाठविला आहे तो मी प्रेमाने अगोदर खाईन. मग कौतुकाने ओव्या गाईन १ आईबापांनी माझ्यासाठी निरोप सांगितला आहे तो नीट ऐकेन २ तुकाराम महाराज म्हणतात, माझे हे वारकरी मित्र आज माझ्या आईबापांच्या गावाहून आले आहेत. ३

१९७३ आयुष्य जोडल्या सुखाचिया रासी । पार त्या भाग्यासी नाहीं आतां ॥ १ ॥
काय सांगों सुख जालें आलिंगनें । निवाली दर्शनें कांति माझी ॥ २ ॥
तुका म्हणे यांच्या उपकारासाठीं । नाहीं माझे गांठी कांहीं एक ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा –पार–अंत, सीमा.

अर्थ :–या संतांच्या भेटीमुळे अपार अशा सुखाच्या राशी आम्ही मिळविल्या आहेत. आता त्या भाग्यास काही सीमाच उरलेली नाही १ त्यांच्या आलिंगनामुळे जे सुख झाले त्याचे वर्णन मी काय करू ? माझ्या मनाचा ताप त्यामुळे एकदम दूर झाला. २ तुकाराम महाराज म्हणतात, या वारकरी संतांनी माझ्यावर जे उपकार केले आहेत ते फेडण्यासाठी माझ्याजवळ काही नाहीच ३

१९७४ पवित्र व्हावया घालीन लोळणी । ठेवीन चरणीं मस्तक हें ॥ १ ॥
जोडोनि हस्तक करीन विनवणी । घेईन पायवणी धोवोनियां ॥ २ ॥
तुका म्हणे भांडवल माझें सुचें । संतां हें ठायींचे ठायें आहे ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा –पायवणी–पायाचे तीर्थ, सुचें–थोडे, अल्प

अर्थ :–पवित्र होण्यासाठी मी या संतांच्या पायांवर लोळण घेईन, आणि त्यांच्या चरणांवर मस्तक ठेवीन. १ मी हात जोडून त्यांना विनंती करीन व त्यांच्या पायांकडे धावत जाऊन तीर्थ घेईन. २ तुकाराम महाराज म्हणतात, असे हे माझे अल्पसे भांडवल आहे. माझे हे मुळचे भांडवल या संतांना माहीत आहे ३

---

१ करावा. २ पुसे तोचि

पत्राचे अभंग समाप्त । ३६ । १९ । ११ ॥ ६६ ॥

विवरण :— वरील १९०९ अभंगक्रमांकापासून १९७४ क्रमांकापर्यंतचे ६६ अभंग 'पत्राचे अभंग' म्हणून प्रसिद्ध आहेत. यांत पुन थोडी वर्गवारी अशी केली जाते की, पहिले ३६ संतांबरोबर पाठविलेल्या पत्रांचे अभंग, दुसरे त्या पत्राच्या उत्तराच्या मार्गप्रतीक्षेचे १९ अभंग, आणि तिसरे परत आलेल्या संतांची भेट झाली ते ११ अभंग असा एकूण ६६ अभंगांत तुकारामबुवांनी विठ्ठलास निरोपासाठी संतांबरोबर पत्र पाठविले, निरोपाच्या प्रतीक्षेत अस्वस्थ चित्ताने काळ कठिला आणि पुन ते संतांच्या दर्शनाने सुखरूप पावले, असा थोडक्यात मथितार्थ आलेला आहे या पत्रात्मक अभंगांच्या मागे थोडी भूमिका आहे ती अशी

तुकाराममहाराजांच्या घरी पंढरपुरची वारी नेहमीप्रमाणेच पूर्वीपासून चालू होती प्रत्येक वर्षी आषाढी व कार्तिकी एकादशीस बुवा पंढरपुरला जात असत एकदा वारीच्या सुमारास बुवा हिवतापाने आजारी झाले वारकरी संतांच्याबरोबर आपणांस वारीस जाता येत नाही; असे पाहून बुवांच्या चित्ताची उलघाल झाली त्यांना पाऊलही उचलणे शक्य नव्हते अशा वेळी चोहोंकडे वारकरी पंढरपुरास जाण्यासाठी निघाले आपली वारी चुकणार म्हणून बुवांना अतिशय दु ख झाले शेवटी त्यांनी पांडुरंगासाठी अभंगात्मक पत्र लिहिले या पत्रात्मक अभंगांतील व्याकुळता, उत्कंठा, मनाची कोवळीक आणि माहेराची ओढ समरस भासून पाहण्यासारखी आहे पांडुरंगास आपला विसर का पडला ? माझे काही गुणदोष मायबापांच्या मनांत आले की काय ? त्याला अनेक मुले असली तरी 'मज तो माहेर आणीक नाही', एवढा तुला आमच्याविषयी राग होता तर मग तू आम्हांला जन्म तरी का रे दिलास ? देवा, तुम्ही एकदा सोडल्यावर माझी चौकशी तरी कोण करणार ? देवा, ममता पुरवण्याचा निरोप पाठविण्यात तुझा काय रे खर्च होतो ? तू समर्थ असताना आम्ही तुझ्यापोटी करंटी निपजलो अशी तुझी कीर्ती कधी होऊ नये. अशा अनेक भावभावनांनी तुकारामबुवांनी देवाची मनापासून आळवणी केलेली आहे वारकरी पंढरपुरास जातील, आपले पत्र पांडुरंगाच्या हाती देतील, मग पांडुरंग आपले क्षेमकुशल विचारील, ही तुकोबांच्या मनाची आशा आहे त्यांनी वारकरी संतानाही परोपरीने विनवून " काय तुझ्याचा अन्याय । त्यासी अंतरले पाय । भाका बहुतां रीती । माझी कींव काकुलती । " अशी प्रार्थना केली आहे

यानंतर माहेरचा निरोप कसा येईल, केव्हा येईल या चिंतेत तुकारामबुवांची झोपच नाहीशी झाली आहे कपाळावर हात ठेवून ते वारकरी संतांची वाट पाहात उभेच राहिले संत देवळात जातील, निरोप घेतील, 'दधि मंगल भोजन' करून शुभमुहूर्त पाहून परत निघतील, त्यांचे कंठ वियोगाच्या भावनेने सद्गदीत झाले असतील, परस्परांची आलिंगने पडली असतील, परतीच्या वाटेवर पंढरपुरचे सुखसोहळे वारकरी आठवीत असतील, त्याच गोष्टी ते एकमेकांशी करीत असतील, ते आले म्हणजे त्यांच्या पायावर डोके ठेवून मायबापांचा निरोप मी ऐकेन अशा विचारांत तुकोबांचे मन भारावून गेले होते वारकरी संतांच्या सर्व यात्रेचे एक मानसचित्र रेखीवपणे त्यांनी डोळ्यापुढे उभे केले आपल्या थोबडया वाणीने देखणे रूप संतांनी वर्णन करून कसे सांगितले असेल, आपणास मूळ पाठविण्यासाठी त्यांनी पांडुरंगाची प्रार्थना कशी केली असेल, या वारकरी संतांचे स्वागत आपण त्यांच्या पायावर लोळण घेऊन करू, अशा प्रकारच्या स्वप्नात तुकारामबुवा गुंग होऊन गेले होते

शेवटी वारकरी संत पंढरपुरहून आले. त्यांचे स्वागत बुवांनी उचित अशा शब्दात केले आहे मार्गाने चालता चालता तुम्हांस श्रम झाले असतील तुम्ही सर्व बालगोपाल सुखरूप आहात ना ? माझे नमस्कार घ्यावेत तुमच्या वाटेकडे माझे चित्त केव्हापासून होते तुमचे दर्शन व्हावे म्हणून माझ्या मनाची तळमळ होती आज तुमच्या दर्शनाने माझे जीवित धन्य झाले माझे मायबाप काय म्हणाले ते झटकन सांगा आता माझ्या माहेराहून कोणते 'आतुके' तुम्ही आणले आहे? आज मला तुमच्या दर्शनामुळे ब्रह्मांड ठेंगणे होऊन गेले आहे. आज माझे माहेरच मला भेटल्याने मनास फार आनंद झाला तुमच्या दर्शनानेच माझ्या मनाचा ताप दूर झालेला आहे अशा भाषेत तुकाराम महाराजांनी वारकरी संतांचे स्वागत केले आहे

या सर्व अभंगातून तुकोबांच्या मनाच्या उत्कट अवस्थेची, त्यांच्या विठ्ठलप्रीतीची चांगलीच प्रचीती येते तुकोबांच्या मनाचा जिव्हाळा व त्यांची आतुरता यांचे यथार्थ दर्शन या पत्राच्या अभंगांमुळे घडते संतचरित्रकार

महीपतीबुवांनी तुकोबांच्या आयुष्यातील या प्रसंगाचे बहारदार वर्णन आपल्या 'भक्तलीलामृत' नावाच्या ग्रंथातील सदतिसाव्या अध्यायात केले आहे 'आषाढी कार्तिकी पंढरीसी। नेम न टळेचि यात्रेसी। तों अकस्मात एके दिवशीं। व्यथा शरीरासी उद्‌भवली ॥ शीत ज्वरें करोनि ताण। देह परम जाहला क्षीण। म्हणे यात्रेसि आलें महाविघ्न। उपाय कोणता करावा?' या चिंतेत बुवा होते हिवतापाच्या बाधेने त्यांच्या नित्यनेमात बाधा आली या अडचणीमुळें त्यांचे चित्त विरघळून गेले 'गाय देखतां वत्स दुरे। कां चंद्रावीण तळमळी चकोर। चातक न देखतां जळधर। तैसी चित्ती झुरे सर्वदा ॥ मत्स्य तळमळी जळाविण। कीं मातेवांचूनि आश्रदे तान्हें। कां कृपणाचे हरपता धन। न पडे चैन तयासी ॥ तैसी पंढरीची अंतरली वारी। तुकयासी खेद वाटे अंतरीं। मार्गी चले पाउल भारी। यास्तव अंतरीं झुरतसे ॥' एवढ्यात हातात टाळपताका घेऊन विठ्ठलाच्या गजरात पंढरपुरास निघालेले वारकरी देहूस आले त्यांच्याजवळ तुकोबांनी एक पत्र लिहून दिले तुकोबांच्या अभंगाचा योग्य असा भावार्थ आणताना महीपतीबुवांनी म्हटले आहे, 'एवढें सकोची तुम्हें अंतर। तरी मग कशास व्यालाति पोर। ज्याचा जार त्यासीच भार।'' हरिणी वृष्टीस न पडे पाडसा। तें टुकटुका पाहे दाही दिशा। मजही तैसीच जाहली दशा। पंढरीशा सुज्ञ ठावें ॥ चातकाप्ति मेघ ओळखतां वेग। तृषेनें न पुरे त्याचा शोष। मजही तैसें वाटे दुःख। प्रकार अनेक काय सांगों ॥ कां मातेनें टाकोनि दीधले तान्हें। तें जनात दिसे केविलवाणे। तैसीच दशा मजकारणें। रुक्मिणीरमण जाणसी तू'

या यात्रेकरू संतात रामेश्वरभट्ट गंगाधर मवाळ कडुसकर संताजी तेली इत्यादी वारकरी होते असे महीपती सांगतात तुकोबाचे पत्र पाहून पांडुरंगही गहिवरून आला त्याने तुकोबांना आणण्यासाठी गरुडाचे वाहन पाठविले. आपणासही येथे तुझ्याशिवाय चैन पडत नसल्याचे पांडुरंगाने तुकोबांना कळविले परंतु बुवा या गरुडावर बसून गेले नाहीत 'माझी अवस्था सांगूनि तया। मियें आणावें पंढरीनाथा। म्हणोनि गरुडाचिये पाया। प्रेमळ तुकया लागतसे। असा आग्रह तुकोबांनी धरला दरम्यान वारकरी परत आले 'तुम्हांसि भेटावया रुक्मिणीपती। सत्वरची येती आज येथें' असा निरोप वारकरी संतांनी तुकोबांना सांगितला तुकाराम महाराज त्यांचीच वाट पाहात होते अशा वेळी घडलेल्या एका प्रसंगाचे वर्णन महीपतीबुवांनी करताना म्हटले आहे '-ऐसा रीतीं प्रेमळ तुका। चित्तीं आठवी वैकुंठनायका। तों गगनीं झळके गरुड टका। निजभक्त सखा यतसे ॥ खग वहनीं वैकुंठपती। अकस्मात उतरले क्षितीं। पीतांबराची झळके दीप्ती। तेणें गभस्ती लोपला ॥ ठाण साजिरें सुकुमार। जघनीं वोही कर। दिव्य कुंडलें मकराकार। श्रीमुख मनोहर श्रीहरीचें। दिव्य कौस्तुभ वैजयंती। मयूरपिच्छें शिरीं असती। तुळसीहार गळां मिरविती। देखितां विश्रांती होय जीवा।' असा या श्रीविठ्ठलाच्या भेटीने बुवा संतुष्ट झाले त्यांनी अशी ही सगुणस्वरूप पाहतां दृष्टीं। चरणीं मिठी घातली' तुकाराम महाराजांच्या पत्राच्या अभंगात राहिलेली त्रुटी अशा रीतीने महीपतीबुवांनी पूर्ण केली आहे

१९७५ मना एक करीं। ह्मणे[1] जाईन पंढरी। उभा विटेवरी। तो पाहेन सांवळा ॥ १ ॥
करीन सांगसी[2] ते काम। जरी जपसी हे नाम।
नित्य वाचे राम। हरि कृष्ण गोविंदा ॥ २ ॥
लागें संतांचिया पाया। करें उल्हास गावया।
आलों मागावया। शरण देईं उचित ॥ ३ ॥
नाचे रंगीं वाहे टाळी। होय सादर ते काळीं।
तुका म्हणे मळी। सांडूनियां अंतरी ॥ ४ ॥

रागराग व ठोपा - वाहें-वाजीव

१ म्हणे मी जाईन २ सांगती

अर्थ :–मना, मी सांगतो तसे तू कर. मी पंढरपूरला जाऊन तेथे विटेवर उभा असलेला तो श्यामसुंदर विठ्ठल पाहीन असे तू म्हण एकदा. १ तू तर नेहमी वाणीने राम, कृष्ण, हरी, गोविंद असे नाम घेशील तर मी तुझे तू सांगशील ते काम करीन. २ तू संतांच्या पायांशी नम्र राहा व कीर्तनात प्रभुनाम गाण्यासाठी उल्हास धर. हेच मी तुला शरण येऊन मागत आहे जे काय उचित आहे ते तू मला दे. ३ भजनरंगात प्रेमाने तू नाच व आनंदाने टाळी वाजीव, याविषयी तू तत्पर हो तुकाराम महाराज म्हणतात, तू आपल्या अंतःकरणातील विकारांचा सर्व मळ काढून टाक. ४

१९७६ न राहे क्षण एक वैकुंठीं । क्षीरसागरीं त्रिपुटी ।
जाय तेथें[1] दाटी । वैष्णवांची धांवोनि ॥ १ ॥
भाविक गे मायें भोळें गुणाचें । आवडे तयाचें नाम घेतां तयासी ॥ २ ॥
जो नातुडे कवणिये परी । तपें दानें व्रतें थोरी ।
म्हणतां याचे हरि । राम कृष्ण गोविंदा ॥ ३ ॥
चौदा भुवनें जया पोटीं । तो राहे भक्तांचिये कंठीं ।
करूनियां साटी । चित्त प्रेम दोहींची[2] ॥ ४ ॥
जया रूप ना आकार । धरी नाना अवतार ।
घेतलीं हजार । नांवें ठेवूनि आपणां ॥ ५ ॥
ऐसा भक्तांचा ऋणी । पाहातां आगमीं पुराणीं ।
नाहीं तुका म्हणे ध्यानीं । तो कीर्तनीं नाचतसे ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा :–त्रिपुटी–शेष, गरुड व लक्ष्मी या तीनांचा समुदाय, नातुडे–सापडत नाही, आगमी–वेदांत, शास्त्रात.

अर्थ :–हा श्रीहरी एक क्षणभरही वैकुंठात राहात नाही. शेष, गरुड व लक्ष्मी या त्रिपुटीचे जेथे वास्तव्य असते अशा क्षीरसागरातही याला राहाणे आवडत नाही. हा जेथे प्रेमळ वैष्णव दाटी करून भजनात गुंग झालेले असतात तेथे हा धावत जातो. १ असा हा श्रीहरी मोठा भाविक, भोळा व गुणसंपन्न आहे याचे नाम घेणाऱ्या भक्तांची यास मोठीच आवड असते. २ तप, व्रत, दान इत्यादींनी हा देव कधीच प्रसन्न होत नाही. अशा कोणत्याही उपायांनी न सापडणारा हा देव वाणीने हरी, राम, कृष्ण, गोविंद असे नाम घेताच भक्तांकडे धावत येतो. ३ ज्या देवाच्या पोटामध्ये चौदा भुवने सामावलेली आहेत, तो हा देव आपले स्वत:चे प्रेम व भक्तांचे चित्त यांसाठी भक्तांच्या कंठांत निवास करून राहतो ४ या देवाला खरे म्हणजे रूप नाही, आकार नाही, तरी याने भक्तांसाठी अनेक अवतार घेऊन आपणास हजार नामांनी साकार केले. ५ असा हा देव भक्तांचा ऋणी आहे. हा शास्त्रांत अथवा पुराणांत शोध घेता कधी सापडणार नाही पण तुकाराम महाराज म्हणतात, तो आपल्या भक्तांच्या कीर्तनात मात्र आनंदाने नाचत असतो. ६

विवरण – देव हा भक्ताचा नेहमीच ऋणी असतो मोठमोठे यज्ञयाग करणाऱ्या, जपतपादी साधने करणाऱ्या कर्मठांत त्याला कमलेही प्रेम वाटत नाही. शास्त्रे व पुराणे यांच्या वाचनानीही त्याची प्राप्ती होणार नाही. मात्र हा श्रीहरी आपले नामस्मरण प्रीतीने जेथे घेतले जाते अशा कीर्तनात सतत उभा असतो. तो कधी वैकुंठात अथवा क्षीरसागरातही राहात नाही. त्याला नेहमी आपल्या भक्ताच्या प्रेमाची भूक असते. म्हणून भगवंताच्या कीर्तनाचा महिमा सर्व साधुसंतांनी विशेष रीतीने वर्णन केलेला आहे 'कीर्तनाच्या सुखें सुखी होती

[1] जेजें. [2] राहिची.

देव ' अशी साक्ष आद्य कीर्तनकार नामदेव यांनी दिलेली आहे ' कीर्तनाची आवडी देवा । वैकुंठाहुनी घाली धावा । नवल वैकुंठींच नसे । तो कीर्तनीं नाचतसे ॥ भाळ्या भोळ्यासाठीं । धांवे त्याच्या पाठोपाठीं ॥ ' अशा भावेत एकनाथांनी भगवताच्या कीर्तनप्रेमाचे वर्णन केले आहे ' आवडीं करितां हरिकीर्तन । हृदयीं प्रगटे जनार्दन । थोर कीर्तनाचे सुख । स्वयें तिष्ठे आपण देख । ' असा कीर्तनमहिमा त्यांनी वर्णन केला आहे या देवाला ' नावडे वैकुंठ शेषशयन । वैष्णवसदन आवडले ॥ रमा म्हणे कैसी नवलपरी । देव भुलले वैष्णवाघरीं । जो नातुडे ध्यानी समाधी साधनीं । तो स्वानंदे कीर्तनीं नाचतसे ॥ जो यज्ञावदानीं काहीं नेघे मायें । तो द्वादशी क्षीराब्धी उष्ट्यां उष्ट्या खाये ॥ लक्ष्मी म्हणे देव आतुडे कवणे बुद्धी । वैष्णवाची सेवा करावी त्रिशुद्धी । ' अशा शब्दात एकनाथांनी देवाचे कीर्तनप्रेम वर्णन केले आहे

भगवताच्या गुणकीर्तनामुळे सारे विश्वच कसे धवळून जाते व यामुळे या सुखास स्वत. भगवतही कसा उत्सुकलेला असतो याचे वर्णन ज्ञानेश्वरीच्या नवव्या अध्यायात ज्ञानेश्वरानी फार चांगल्या प्रकारे केले आहे कीर्तनप्रसंगामुळे प्रायश्चित्ताचे व्यवसायच सपले, कारण पापाचे नावसुद्धा आता कीर्तनात उरलेले दिसत नाही अमृताशिवाय जगणे व योगाशिवाय डोळ्यानी कैवल्य पाहाणे या गोष्टी कीर्तनामुळेच शक्य होतात या कीर्तनामुळे जगाला ' एकसरें आनंदाचे आवारु ' निर्माण झालेले असते या कीर्तनसुखाची स्वत भगवतालाही कशी व केवढी ओढ असत, हे सांगताना ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, ' तो मी वैकुंठीं नसें । एक वेळ भानुबिंबींही न दिसे । वरी योगियांचींही मानसें । उमरडोनि जाय । परी तयांपाशीं पांडवा । मी हारपला गिवसावा । जेथ नामघोषु बरवा । करिती ते माझे ॥ '

१९७७ स्वल्प वाट चला जाऊं । वाचे गाऊं विठ्ठल ॥ १ ॥
तुम्ही आम्ही खेळीमेळीं । गदा रोळीं आनंदें ॥ २॥
ध्वजा कुंचे गरुडटके । शृंगार निके करोनि ॥ ३ ॥
तुका म्हणे हेचि नीट । जवळी वाट वैकुंठा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा–स्वल्प–थोडी, सोपी, निके–चागले खराखर

अर्थ – ही कीर्तनाची नामभक्तीची वाट सोपी असल्याने आपण त्याच वाटेने जाऊ या मुखाने विठ्ठलाचे नाम गाऊ. १ तुम्ही व आम्ही सर्व मिळून खेळीमेळीने व आनंदाच्या भरात त्या श्रीहरीला गाऊ २ हे ध्वज, हे कुंचे अथवा मोरचेल हे गरुडटके याना चांगल्या रीतीने सुशोभित करू ३ तुकाराम महाराज म्हणतात, वैकुंठास जाण्यासाठी हीच जवळची नीट असणारी वाट आहे ४

१९७८ आनंदाच्या कोटी । साटवल्या आम्हां पोटीं ॥ १ ॥
प्रेम[1] चालिला प्रवाहो । नामओघ लवलाहो ॥ २ ॥
अखंड खंडेना जीवन । राम कृष्ण नारायण ॥ ३ ॥
थडी आहिक्य परत्र । तुका म्हणे सम तीर ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा –कोटी–प्रकार, थडी–किनारा, आहिक्य–हा लोक, परत्र–परलोक, सम–सारखाच.

अर्थ –आनंदाचे सर्व प्रकार आमच्या पोटात साठविलेले आहेत १ आमच्या मुखातून हरिनामाचा ओघ मोठ्या वेगाने सुरू आहे २ राम, कृष्ण, नारायण या नामाच्या उच्चारामुळे माझ्या जीवनास खड नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, नामसकीर्तनाचा हा पूर या लोकीच्या व परलोकीच्या दोनही तीरांवरून एकसारखाच भरून वाहात आहे ४

---

१ प्रेमा

१९७९ चाहाडाची माता । व्यभिचारीण तत्त्वता ॥ १ ॥
पाहे संतांचें उणें । छिद्र छळावया सुनें ॥ २ ॥
जाणों त्याच्या वाचें । कांहीं सोडिलें गांठीचें ॥ ३ ॥
तुका म्हणे घात । व्हावा ऐसी जोडी मात ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :-चहाडाची-चहाडी करणाराची, तत्त्वता-खरोखर, सुनें-कुत्रे, गांठीचें-पदरचे, मात-गोष्ट

अर्थ :-जो चहाडी करतो त्याची आई खरोखर व्यभिचारीणच समजावी. १ संतांचा कमीपणा त्यांना छळण्यासाठी कुत्र्याप्रमाणे हे शोधीत असतात. २ जणू काही त्यांच्या भाषाच्या पदरचेच यांनी काही घेतलेले असते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, यांचे बोलणे स्वतःचा घात व्हावा असेच असते. ४

१९८० सापें ज्यासी खावें । तेणें प्राणासी मुकावें ॥ १ ॥
काय लाधला दुर्जन । तोंडावरी थुंकी जन ॥ २ ॥
विंचु हाणी नांगी । अग्न लावी आणिकां अंगीं ॥ ३ ॥
तुका म्हणे जाती । नरका पाउलीं चालती ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा ;-आणिकां-दुसऱ्याच्या.

अर्थ :-ज्याला साप चावतो तो प्राणासच मुकतो. १ त्यापासून त्या दुर्जनास काय मिळाले ? सर्व लोक मात्र त्याच्या तोंडावर थुंकत असतात. २ विंचू आपली नांगी दुसऱ्यांना मारून त्यांच्या अंगाची आगआग करून सोडतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा या दुष्ट लोकांची पावले नरकाकडेच पडत असतात. ४

## स्वामींनीं स्त्रीस उपदेश केला ते अभंग ॥ ११ ॥

१९८१ पिकल्या[1] सेताचा आम्हां देतो वांटा । चौधरी गोमटा पांडुरंग ॥ १ ॥
सत्तर टके बाकी उरली मागे तो हा । मागें झडले दाहा आजिवरी ॥ २ ॥
हांडा भांडीं गुरें दाखवी ऐवज । माजघरीं बाजे बैसलासे ॥ ३ ॥
मज यासी भांडतां जाय नेदी बळें । म्हणे एका वेळे घ्याल वांटा ॥ ४ ॥
तुका म्हणे स्त्रिये काय वो करावें । नेदितां लपावें काय कोठें ॥ ५ ॥

विवरण – आपल्या पत्नीस तुकोबानी केलेल्या उपदेशाच्या अकरा अभंगापैकी हा पहिलाच अभंग फार महत्त्वाचा आहे यातील रूपकाचा अर्थ समजावून घेण्यासारखा आहे मानवी देह हे एक क्षेत्र असून त्याचा मालक पंढरपुरचा श्रीविठ्ठल अथवा परमेश्वर असून त्याने हे क्षेत्र वहिवाटीसाठी, कमण्यासाठी आपणास दिलेले आहे, अशी भूमिका तुकोबानी या ठिकाणी घेतलेली आहे मानवी देह म्हणजे क्षेत्र हा विचार आपल्या तत्त्वज्ञानाच्या परंपरेत प्राचीन काळापासून चालत आलेला आहे ' इदं शरीरं कौंतेय क्षेत्रमित्यभिधीयते ' कौन्तेया, या शरीरासच क्षेत्र असे म्हटले आहे. अशी सुरुवातच गीतेच्या तेराव्या अध्यायाची आहे पृथ्वी, आप, तेज, वायू, आकाश ही पंच-महातत्त्वे, अहंकार, बुद्धी, अव्यक्त प्रकृती, दहा सूक्ष्म इंद्रिये व मन, शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध हे पंचेन्द्रियाचे पाच विषय, इच्छा, द्वेष, सुख, दुःख, संघात, चेतना म्हणजे प्राणादिकाचा व्यापार आणि धृती म्हणजे धैर्य, अशा या ३६ तत्त्वाचा समुदाय म्हणजे मानवी देहाचे हे क्षेत्र, अशी गीतेने कल्पना केलेली आहे क्षेत्राच्या अथवा देहाच्या वर्णनाचे कार्य अनेकानी, अनेक प्रकारानी करून या तत्त्वाची संख्याही वेगवेगळी सांगितली आहे.

या देहाच्या क्षेत्राची ही तत्त्वाच्या संख्येवरून कल्पना समजावून घेतली म्हणजे या अभंगाचा अर्थ सुलभ होत जातो या गोमटया चौधरीस, पांडुरंगास आम्ही दहा टक्क्याचा वाटा आतापर्यंत दिला आहे व अजून सत्तर टक्के द्यायचे आहेत, म्हणजे एकूण ऐंशी टक्क्याचा हिशेब पूर्ण करायचा आहे असे तुकाराम महाराज म्हणतात, यातील अर्थ काय ? हे ऐंशी टक्के मान्याचे आले कुठून ? दहा टक्के आधीच देऊन पूर्ण केले आहेत म्हणजे काय ? या प्रश्नाची उत्तरे शोधताना देहाच्या अथवा क्षेत्राच्या तत्त्वाच्या संख्येचा हिशेब तपासणे महत्त्वाचे आहे तुकोबाच्या मताने हा देह एंशी तत्त्वाचा आहे त्या सर्व तत्त्वाचा हिशेब देणे मानवी जीवितात महत्त्वाचे आहे या ऐंशी टक्यातील दहाच टक्के आजपर्यंत दिले आहेत. दहा टक्के म्हणजे पाच टक्के ज्ञानेंद्रिये व पाच टक्के कर्मेंद्रिये याना ईश्वरभजनात गुंतवून मी या दहा टक्क्याचा हिशेब चुकता केला आहे असे बुवा म्हणतात, आणि आता उरलेल्या सत्तर टक्क्याचा हिशेब पूर्ण करणे आहे असे त्याना म्हणायचे आहे. हे सत्तर टक्के समजावून घेण्यासाठी ऐंशी तत्त्वाचाच थोडा परिचय करून घेऊ

पृथ्वी, आप, तेज, वायू, आकाश या पंचमहाभूतांचा विचार प्राचीन तत्त्वपरंपरेत महत्त्वाचा असून यातूनच पुढे ही संख्या वाढलेली दिसून येत वर सांगितल्याप्रमाणे गीतेने ही तत्त्वसंख्या छत्तीस मानली आहे. भागवतातील एकादश स्कंधातील बाविसाव्या अध्यायात या तत्त्वसंख्येचा तपशीलवार विचार केलेला आहे तुकारामबुवाच्या मताने ही तत्त्वे ऐंशी असून त्यानी हे क्षेत्र समृद्ध झालेले आहे ही ऐंशी तत्त्वे अशी,–

| | | |
|---|---|---|
| अंतःकरणपंचक – | अंतःकरण, मन, बुद्धी, चित्त व अहंकार | |
| प्राणपंचक – | व्यान, | समान, उदान, अपान व प्राण |
| ज्ञानेंद्रियपंचक – | श्रवण, | त्वचा, चक्षू, जिव्हा व घ्राण |
| कर्मेंद्रियपंचक – | वाचा, | हस्त, पाद, शिश्न व गुद |
| विषयपंचक – | शब्द, | स्पर्श, रूप, रस व गंध |

ही झाली पंचवीस तत्त्वे ही सूक्ष्मदेहाची तत्त्वे मानली जातात. याखेरीज अशीच स्थूल देहाचीही पंचवीस तत्त्वे मानली आहेत, ती अशी

| | |
|---|---|
| पृथ्वी – | अस्थी, मांस, त्वचा, नाडी व रोम |
| आप – | शुक्र, शोणित, लाळ मूत्र व स्वेद |
| तेज :– | क्षुधा, तृषा, आलस्य, निद्रा व मैथुन |
| वायू – | चळण, वळण, प्रसारण निरोध व आकुंचन |
| आकाश – | काम, क्रोध, शोक, मोह आणि भय |

स्थूल देहाची ही पंचवीस व सूक्ष्मदेहाची वरील पंचवीस मिळून ५० तत्त्वे झाली यानंतर आणखी तत्त्वाचे उपभेद करून ही संख्या ऐंशीपर्यंतही नेता येते ती अशी –

देहाच्या अवस्था – जागृती, स्वप्न, सुषुप्ति व तुर्या

देहाचे अभिमानी :– विश्व, तैजस, प्राज्ञ व प्रत्यगात्मा

देहाची स्थाने :– नेत्र, कंठ, हृदय व मूर्धा अथवा मस्तक

देहाचे भोग – स्थूल, प्रविविक्त ( स्वप्नभोग ), आनंद व आनंदभोग

देहाच्या मात्रा – अकार, उकार, मकार व अर्धमात्रा

देहाचे गुण – तम, रज, सत्त्व व शुद्धसत्त्व

अर्थः-नीट विचार करून पाहाता असे दिसते की, सर्व एकाचेच राज्य आहे. मग मला दुसरा कोण पाठीशी घालील ? १ हे सर्व अंगण मागून, पुढून मोकळेच असल्याने आम्ही आता कोणत्या रीतीने सुटून पळून जावे ? २ या पांगळपाच्या हातातील काठीने आम्ही हिंडावे तरी किती? कुठेही आम्ही गेलो तरी आमच्या पाठीमागे याचे दूत लागतात. ३ याची कुळवाडी कुठून मी पत्करायला गेलो, असे मला झाले आहे आता हा मला जीव गेला तरी सोडणार नाही. ४ तुकाराम महाराज म्हणतात, आता येथेच याची सर्व बाकी पूर्ण करून राहावे व तो जे देईल ते खावे हेच उत्तम. ५

१९८३ नागवूनि एकें नागवींच केलीं । फिरोनियां आलीं नाहीं येथें ॥ १ ॥
भेणें सुती कोणी न घेती पालवीं । करूनियां गोवी निसंतान ॥ २ ॥
एकें तीं गोविलीं घेऊनि जमान । हांसतील जन लोक तयां ॥ ३ ॥
सरले तयांसी घाली वैकुंठीं । न सोडी हे साटी जीवें जाली ॥ ४ ॥
तुका म्हणे जालों जाणोनि नेणतीं । सांपडलों हातीं याचे आम्ही ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपाः-नागवून-सर्वस्व घेऊन, नागवीच-निर्धन, उघडे, भेणें-भीतीने, सुती-लोभ,जमान-जामीन, गोवी-गुंतवून ठेविनो.

अर्थ-याने कित्येकाचे सर्वस्व हरण करून त्यांना निर्धन केले आहे, उजाड केले आहे. हे लोक फिरून कधी संसारात आलेच नाहीत १ याच्या या भीतीमुळे लोभाने कुणी याला पदरातच घेत नाहीत; कारण हा सर्वांचे घाटोळे करून स्वतःच्या स्वरूपात गुंतवून ठेवितो. २ याने आणखी कित्येकांचे जामीन घेऊन त्यांना गुंतवून ठेविले आहे. त्यांना तर लोक आता हसू लागले आहेत ३ ज्यांचे सर्व येथे फिटले आहे त्यांना हा तामडतोब वैकुंठालाच नेतो. जीव एकदा याला समर्पण झाला की तो याला सोडीत नाही. ४ तुकाराम महाराज म्हणतात, अशा प्रकारे आम्ही सर्व जाणून नेणते झालो आहोत. आम्ही याच्या हातात सपडलो आहोत. ५

१९८४ आतां तूं तयास होईं वो उदास । आरंभला नास माझ्या जीवा ॥ १ ॥
जरूर हें जालें मज[1] कां नावडे । उपास रोकडे येती आतां ॥ २ ॥
बरें म्या तुझिया जीवाचें तें काय । व्हावें तें हें पाहें विचारूनि ॥ ३ ॥
तुज मज तुटी नव्हे या विचारें । सहित लेकुरें राहों सुखें ॥ ४ ॥
तुका म्हणे तरी तुझा माझा संग । घडेल वियोग कधीं नव्हे ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा- नास-नाश, विचारूनि-विचार करून,

अर्थः- ज्याने अशा रीतीने माझ्या जिवाचा नाश आरंभिला आहे, त्याच्यासंबंधी तू उदास हो. त्याची आशाच सोड. १ याची मला जरूरी आहेच तुला तो का आवडत नाही ? आता याच्याविना उघडउघड उपास पडतील मला. २ बरे, याच्या पुढे तुझ्या जीविताचे एवढे काय मोठेसे ? याची प्राप्ती कशी होईल याचाच विचार करून तू राहा. ३ यासारखाच जर तू विचार करशील तर तुझामाझा कधीच वियोग होणार नाही सर्व मुलां-लेकरांसहित आपण सुखाने राहू ४ तुकाराम महाराज म्हणतात, तरच तुझीमाझी संगत नीट होईल व तीत कधी वियोग घडणार नाही. ५

१९८५ काय करूं आतां माझिया संचिता । तेणें जीवविता साटी केली ॥ १ ॥
न म्हणावें कोणी माझें हें करणें । हुकुम तो येणें देवें केला ॥ २ ॥

१. तुज

करूनि मोकळा सोडिलों भिकारी । पुरविली तरी पाठी माझी ॥ ३ ॥
पाणिया मोंपळा जेवावया पानें । लाविलीं वो येणें देवें आम्हां ॥ ४ ॥
तुका म्हणे यासी नाहीं वो करुणा । आहे नागवणा ठावा मज ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा –संचिता-प्रारब्धास, नागवणा-सर्वस्व हरणारा

अर्थ :-आता मी या माझ्या प्रारब्धभोगास काय करू तरी काय? याने माझा जीव व माझे सारे धन हरण केले आहे १ हें सर्व माझेच करणें आहे असे कुणी म्हणू नये, हा सर्व हुकुम या देवानेच केलेला आहे २ त्यानेच मला भिकारी करून मोकळे सोडले आहे त्याने माझी अगदी पाठ पुरविली आहे. ३ पाणी पिण्यासाठी भोपळा व जेवायला पान अशी माझी अवस्था या देवाने केलेली आहे ४ तुकाराम महाराज म्हणतात, या देवास काही दयाच येत नाही तो सर्वस्व हरण करणारा आहे हे मला पूर्णपणे माहीत आहे ५

१९८६ नको धरूं आस व्हावे या बाळांस । निर्माण तें त्यास त्याचे आहे ॥ १ ॥
आपुला[1] तूं गळा घेईं उगवूनि । चुकवीं जाचणी गर्भवास ॥ २ ॥
ऐवज देखोनि बांधितील गळा । म्हणोनि निराळा पळतसे ॥ ३ ॥
देखोनियां त्यांचा अवघड मार । कांपे थरथर जीव माझा ॥ ४ ॥
तुका म्हणे जरी आहे माझी चाड । तरी करीं वाड चित्त आता ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – आस-इच्छा, उगवूनि-सोडवून, ऐवज-ठेवा, साठा, चाड-जरूरी, आस्था, वाड-थोर, मोठे

अर्थ – माझ्या मुलांबाळांना भरपूर मिळावे अशी आशा तू आता धरू नकोस त्यांच्यासाठी त्यांच्या प्रारब्धाने जे निर्माण झाले आहे जे त्यांना मिळालेच १ तू मात्र या सर्व मोहातून स्वत गळा सोडवून घे गर्भवासाचा भार तू चुकव २ आपल्या जवळ काही धनाचा या इच्छेचा साठा असेल तर गळाच बांधला जाईल, या भीतीने मी सर्वस्वाचा त्याग करून पळ काढीत आहे ३ त्यांची ती अवघड शिक्षा पाहूनच माझ्या जीवाचा नुसता थरकाप होत आहे ४. तुकाराम महाराज म्हणतात, तुला खरोखरीच जर माझी जरूरी असेल तर तू आता तुझे चित्त मोठे करून वाग ५

१९८७ भले लोक तुज बहु मानवती । वाढेल या कीर्ति जगामाजी ॥ १ ॥
म्हणे मेलीं गुरें म्हशीं नेलीं चोरें । नाहींत लेकुरें जालीं मज ॥ २ ॥
आस निरसूनि कठिण हे मन । करीं यो समान वज्र तैसे ॥ ३ ॥
किंचित हें सुख टाकी वो थुंकोनि । पावसील धनी परमानंद ॥ ४ ॥
तुका म्हणे थोर चुकती सायास । भवबंधपाश तुटोनिया ॥ ५ ॥

१९८८ ऐक हें सुख होईल दोघांसी । सोहळा हे ऋषि करिती देव ॥ १ ॥
जडितविमानें बैसविती मानें । गंधर्वांचें गाणें नामघोष ॥ २ ॥
संत महंत सिद्ध येतील सामोरे । सर्वसुखा पुरे कोड तेथें ॥ ३ ॥
आलिंगूनि लोळों त्यांचिया पायांवरी । जाऊं तेथवरी मायबापें ॥ ४ ॥
तुका म्हणे तया सुखा वर्णू काय । जेव्हां बापमाय देखें डोळां ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– कोड–इच्छा.

अर्थ:– तू माझे ऐक. यामुळे आपणां दोघांनाही सुख होईल. ऋषी, मुनी व देव हा आपला सोहळा पाहातील. १ रत्नजडित विमानांत मोठ्या सन्मानाने आपणांस बसवितील. गंधर्वांचे गाणे व नामघोष आपल्यासाठी होईल. २ संत, महंत, सिद्ध व सर्वजण आपणांस सामोरे येतील. तेव्हां आपली सर्व सुखांची इच्छा पूर्ण होईल. ३. आपण त्याला आलिंगन देऊन त्याच्या पायांवर लोळणच घेऊ आपले मायबाप आहेत तेथपर्यंत आपण जाऊ ४ तुकाराम महाराज म्हणतात, जेव्हां आपण आपल्या मायबापांना आपल्या डोळ्यांनी पाहू, तेव्हाच्या सुखाचे मी काय वर्णन करू? ५

१९८९ देव पाहावया करीं वो सायास । न धरीं हे आस नाशिवंत ॥ १ ॥
दिन शुद्ध सोम सकाळीं पातला । द्वादशी घडला पर्वकाळ ॥ २ ॥
द्विजां पाचारुनि शुद्ध करीं मन । देई वो हें दान यथाविध ॥ ३ ॥
नको चिंता करूं वस्त्रा या पोटाची । माउली आमुची पांडुरंग ॥ ४ ॥
तुका म्हणे दुरी सांगतों पाल्हाळीं । परी तो जवळी आहे आम्हां ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – सायास–खटपट, प्रयत्न, द्विजां–ब्राह्मणांना, पाचारुनि–बोलावून.

अर्थ:– देव पाहाण्यासाठी तू काही प्रयत्न कर ना. या नाशवंत प्रपंचाची इच्छा कधीच धरू नकोस, १ चांगला सोमवारचा दिवस शुद्ध व पवित्र असा उजाडला आहे द्वादशीला पर्वकाळ प्राप्त झाला आहे २ तू ब्राह्मणांना बोलावून आण व मन शुद्ध करून विधीप्रमाणे सर्वस्वाचे दान करून टाक ३ अंगावर वस्त्र कसे मिळेल, अथवा पोटास अन्न कसे मिळेल, याची चिंता कधी तू करू नकोस. कारण आपणांस सांभाळणारी ती माऊली पांडुरंग समर्थ आहे. ४. तुकाराम महाराज म्हणतात, माझें हे सांगणे दूरचे व पाल्हाळाचे असेल, पण हा पांडुरंग मात्र अगदी जवळ आहे. ५

१९९० सुख हें नावडे आम्हां कोणा बळें । नेणसी अंधळे जालीसी तूं ॥ १ ॥
भूक तान कैसी राहिली निश्चळ । खुंटलें चपळ मन ठायीं ॥ २ ॥
द्रव्य जीवाहूनि आवडे या जना । आम्हांसी पाषाणाहूनि हीन ॥ ३ ॥
सोइरे सज्जन जन आणि वन । अवघें समान काय गुणें ॥ ४ ॥
तुका म्हणे आम्हां जवळीच आहे । सुख दुःख साहे[1] पांडुरंग ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा:– खुंटले–स्थिर झाले.

अर्थ:–कुठल्याही बळामुळे आम्हांला संसारसुख हे कधीच आवडणार नाही तू आंधळी झाली असल्यामुळ तुझ्या ध्यानात हे येत नाही. १ आमची भूक व तहान ही जागच्या जागी निश्चळ होऊन राहिली आहेत चचल असणारे मनही जागच्या जागी स्थिर झाले आहे. २ या संसारी लोकांना द्रव्य जीवापेक्षा प्यार असते. पण

१. साहे

आम्ही मात्र त्याला दगडापेक्षा वाईट मानतो ३ सोयरे आणि नातेवाईक सज्जन, इतर लोक यांना आम्ही समान कोणत्या गुणांमुळे मानतो ? ४ तुकाराम महाराज म्हणतात, हा पांडुरंग आमच्या जवळच असून तो आमचे सर्व सुखदुःख सहन करीत असतो ५

१९९१ गुरुकृपे मज बोलविले देवें । होईल हे[1] घ्यावे हित काहीं ॥ १ ॥
सत्य देवें माझा केला अंगीकार । आणीक विचार नाहीं आतां[2] ॥ २ ॥
होई वळकट घालूनिया कास । हाचि उपदेश तुज आतां ॥ ३ ॥
सडा समार्जन तुळसीवृंदावन । अतीतपूजन ब्राह्मणाचे ॥ ४ ॥
वैष्णवाची दासी होई सर्वभावे । मुखीं नाम घ्यावे विठोबाचे ॥ ५ ॥
पूर्णबोध स्त्रीभ्रतार संवाद । धन्य जिहीं वाद आइकिला ॥ ६ ॥
तुका म्हणे आहे पांडुरंगकथा । तरेल जो चित्ता धरील कोणी ॥ ७ ॥

शब्दार्थ व टीपा – अंगीकार–स्वीकार, अतीतपूजन–अतिथीचे पूजन

अर्थ – या देवाने श्रीगुरुकृपेमुळेच मला बोलते केले त्यातील ज्यामुळे काही हित होईल त्याचा स्वीकार तू करावास १ खरोखर या देवाने माझा स्वीकार केला आहे याविषयी आता दुसरा विचारच असण्याची जरूरी नाही २ आता कास घालून धैर्यवान हो हाच आता माझा तुला उपदेश आहे ३ तुळशीवृंदावनापुढे रोज सडा-समार्जन तू कर अतिथींचे व ब्राह्मणाचे तू पूजन करावेस ४ सर्वभावाने वैष्णवांची दासी होऊन तू सेवा कर मुखाने सतत तू विठोबाचे नाव घ्यावेस ५ पती व पत्नी यांच्यातील हा पूर्णबोधाचा संवाद ज्यांनी ऐकला ते धन्य होत ६ तुकाराम महाराज म्हणतात, ही पांडुरंगकथा जे कुणी ऐकतील जे चित्तात धारण करतील ते धन्य होत त्यांचा उद्धार होईल ७

' कोणाची माईल होऊनिया ओढू । सवत्तारी काढू आपदा किती ।। काय तरी देऊं तोंडलील पोरें । मरतीं तरी बरें होतें आता ।।' असे निर्वाणीचे उद्गार तिने काढले आहेत. एकापरीने जिजाईचा त्रागा तिच्या भूमिकेवरून पाहाता योग्यच वाटतो. ती एक सांसारिक स्त्री. तिलाही तिची कर्तव्ये होती ना! आणि सर्व सृष्टीच्या रहस्याचा शोध घ्यायला निघालेले तुकारामबुवा, त्यांचही काही चुकले असे म्हणवत नाही. असाध्य अशा ध्येयाने वेडावलेल्या महापुरुषाच्या संसाराची परवड अटळच होते. लौकिकाच्या मोजपट्टीने त्याचा थारपणा मापू नये, हेच खरे.

तुकोबाच्या अलौकिक जीविताची साक्ष लोकांना पटू लागली. त्यांचे नामस्मरण, त्यांची भजनप्रीयता, त्यांची अभंगवाणी, त्यांची तल्लीनता, त्यांचा सहज, सरळ स्वभाव याचा परिणाम होऊन त्यांच्या भोवती लोक नित्य जमत असत. मग त्यांच्या या गर्दीस पाहून जिजाई संतापत असे, कधी वारकऱ्यांच्यावर रागावत असे. तिची सौम्यपणाने समजूत काढीत आपल्या घरी उगाच कोण येतील? काय त्यांचा त्याला धंदा नाही? परंतु देवासाठी झाले ब्रह्मांड सोइरें ।कोमळया उत्तरें काय वेचे ? या देवासाठी सारे ब्रह्मांड आपले नातेवाईक बनले आहे त्यांना गोड कोमल शब्दात उत्तर देशील तर तुझे काय खर्च होईल? अशा शब्दात तुकाराम महाराज तिची समजूत काढीत. असाच एका प्रसंगी त्यांनी तिला हा पूर्ण बाधाचा उपदेश केला आहे. तो आजही कुणाही संसारी स्त्रीस उपयुक्त होण्यासारखा आहे.

महीपतीबुवांनी पूर्णबाधाची पार्श्वभूमी देताना तुकोबाच्या संसाराचे यथार्थ चित्र रेखाटण्याचा प्रयत्न केला आहे. तुकोबा व जिजाई यांची शाब्दिक टक्कर नेहमी होत असे. बुवा वैतागाने, वैराग्याने भंडाऱ्याच्या डोंगरावर बसत. गावातील देवळात कीर्तन करीत. हा नसता उद्योग जिजाईला सहन होत नसे. तुकोबांचे लक्ष घराकडे व प्रपंचाकडे अगदी नाही असे पाहून ती एकदा त्यांना म्हणाली, "तू दोन महिने न येसी घरा । तरी मी कोणाची होऊं दारा । या संसारा चालवूं ?" या जिजाईच्या प्रश्नावर तुकोबांनी नेहमीचेच उत्तर दिले आहे, 'विठोबा रखुमाई बापमाय । त्यांचे पाय आठवीत जाय । तरी आपदा न होय संसारीं ।। 'असे म्हणून तुकोबा घरी आले. आणि 'द्वारीं वृंदावनीं होती तुळसी । त्या स्थळासी बैसले ' या दिवशी एकादशी होती असे महीपतीबुवांनी म्हटले आहे ते बरोबर दिसते कारण दुसऱ्या दिवशीच्या द्वादशीच्या पर्वकाळाचा उल्लेख पूर्णबोधाच्या अभंगात आहे. तुकोबांनी ही योग्य संधी पाहून जिजाईस परमार्थाचा बोध केला आणि म्हटले, ' उदयीक द्वादशी सोमवार । स्नान करोनि येई सत्वर । मग पाचारोनि द्विजवर । लुटवी घर त्या हातीं ।। अन्नवस्त्र याची चिंता । मनात नको करू सर्वथा । पांडुरंग बाप शिरीं असता । तो उणे तत्त्वता पडों नेदि ।। माझें ऐकशील जरी उत्तर । तरी जगीं कीर्ती वाढेल थोर । म्हणावें बांधीं नली चोरें । मेलीं गुरें चान्याविण ।। आसनीं रसोनिया जाण । बच्या ऐसें करावें मन । लेकुरें जाहली नाहींत म्हणोन । करी सोडवण आपुली ।। बळकट घालूनिया कांस । सांडी नाशवंताची आस । दवद्विज, अतीत यास । पूजी मंदीरास आणोनि ।। चरणाची दासी होऊनि भावे । संतासि अनन्य शरण जावे । विठोबाचे नाम घ्यावें । प्रेमभावें करोनियां ।। अकरा अभंग ऐसा रीतीं । कांतेसी उपदेश केला प्रीती । पूर्ण बोध प्रथ त्यासी म्हणती । ऐकता विरक्ति होय जीवा ।। तुकोबाच्या पूर्णबाधाच्या अभंगाची पूर्ण छाया महीपतीबुवांच्या या ओव्यातून दिसते. तुकाराम महाराजांच्या उपदेशाप्रमाणे जिजाईने खरेच ब्राह्मणांना घर लुटून दिले, परंतु क्षणिक वैराग्याने जिजाईची मूळ वृत्ती निवळली नाही. परत तिची ' प्रपंचाकडे मुरडली वृत्ती ' म्हणून महीपतीने तिच्या मनाची शोकाकुल अवस्थाही वर्णन केली आहे.

१९९२ खडा रवाळी साकर । जाला नामाचाचि फेर ।<br>
न दिसे अंतर । गोडी ठायीं निवडितां ।। १ ।।<br>
तुम्ही आम्ही पांडुरंगा । भिन्न ऐसें काय सांगा ।<br>
चाळविलें जगा । मी हें माझें यासाठीं ।। २ ।।

पायीं हातीं नाकीं शिरीं । हेम राहे[1] अळकारीं ।
मुसे आल्यावरी । काय निवडे वेगळें ॥ ३ ॥
निजलिया लाभ हानी । तोच खरी ते स्वप्नीं ।
तुका म्हणे दोन्ही । निवारलीं जागतां ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – रवाळी–भरडी, जाड गाखर, हेम–सुवर्ण, मुसे–मुशीत आटल्यास.

अर्थ -- खडी साखर, जाडी भरडी साखर आणि नेहमीची साखर यांच्या नावांतच भेद आहे गोडीत फरक पाहू जाता काहीच दिसणार नाही १ त्याचप्रमाणे, पांडुरंगा, तुमच्याआमच्यात भेद काय आहे तो सांगा हा मी, हे माझे, असा दुजाभाव निर्माण करून तुम्ही लोकांना फसविता २ पायात, हातात, नाकात आणि डोक्यात घालण्याचे निरनिराळे सुवर्णालंकार केले तरी त्यातील सोनें एकच असते मुशीत घालून हे दागिने आटविल्यास त्याचे निराळेपण उरेल काय ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, झोपेत असताना, स्वप्नात असेपर्यंत त्यातील हानी-लाभ खरे वाटतात, पण एकदा जाग आल्यावर मात्र हे दोनही भाव निवारले जातात ४

१९९३ आम्ही जाणो तुझा भाव । कैंचा भक्त कैंचा देव ।
बीजा नाहीं ठाव । कैंचे फळ शेवटीं ॥ १ ॥
सपादिले बहु रूप । कैंचे पुण्य कैंचे पाप ।
नव्हतो आम्ही आप । आपणासी देखिले ॥ २ ॥
एके ठायीं घरिच्याघरीं । न कळता जाली चोरी ।
तेथें तेंचि दुरी । जाणे येणे खुटले ॥ ३ ॥
तुका म्हणे धरूनि हातीं । उर ठेविली मागुती ।
एकांतीं लोकांतीं । देवभक्तिसोहळा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – ठाव– ठिकाण, पत्ता

अर्थ – देवा आम्ही तुझ्या स्वरूपाचा भाव जाणतो तेथ देव व भक्त कसले आले आहेत ? जेथे बीजाचा ठकाणा नाही तेथे शेवटी फळे तरी कुठून मिळणार ? १ तुम्ही नानाविध रूपानी सोंग घेतले आहे तेथे पाप कोणते आणि पुण्य तरी कोणते ? जोपर्यंत आम्ही आपले नव्हतो, तोपर्यंत तुम्ही दाखविले ते खरे भासत होते २ घरच्या घरी तुमचे आणि आमचे वास्तव्य एकत्रच होते परंतु हे न कळल्यासारखे होऊन आत्मभावाची चोरी झाली आणि या अज्ञानाच्या अशा निवृत्तीमुळे जन्ममृत्यूच्या खेपा संपून गेल्या ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा प्रकारे देवाने आम्हांस हाताशी धरले आणि एकान्तात व लोकात देव व भक्त यांच्या प्रेमाचा सोहळा अनुभवण्या-साठी द्वैतभाव शिल्लक ठेवला ४

१९९४ काहीं बोलिलो बोबडें । मायबापा तुम्हापुढें ।
सलगी लाडें कोडें । मज क्षमा करावी ॥ १ ॥
काय जाणावा महिमा । तुमचा म्या पुरुषोत्तमा ।
आवडीनें सीमा । साडविली मज हातीं ॥ २ ॥
घडे अवज्ञा सख्यत्वें । बाळें बापासी न म्यावें ।
काय म्यां सांगावें । आहे ठावें तुम्हांसी ॥ ३ ॥

१ साजे

तुका म्हणे देवा । प्रेम लोभ न संडावा ।
पाळिला पाळावा । लळा पुढती आगळा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – कोडें–कौतुकानें आवडीने–प्रेमाने

अर्थ – मायबापा, तुमच्यापुढे मी मोठ्या सलगीने, लाडाने, प्रेमाने बोबडे बोललो, याची मला तुम्ही क्षमा करावी १ पुरुषोत्तमा, तुमच्या महिम्याचे वर्णन मी काय करावे ? मी तो काय जाणाया ? परंतु प्रेमामुळे काही मर्यादेचे उल्लंघन माझ्या हातून झाले असेल २ मुलाचे पित्याशी जवळचे, सख्यत्वाचे नाते असल्याने निर्भयतेने त्याची अवज्ञा होऊ शकते, देवा, हे मी काय आपल्याला सांगावे ? तुम्हास सर्व काही ठाऊक आहेच ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, माझ्या विषयीचा लोभ तुम्ही सोडू नये, आजपर्यंत तुम्ही माझे पालनपोषण केले आहे, त्याप्रमाणेच किंवा त्याहून अधिक लळा लावून माझे लाड पुरवावेत ४

१९९५ बहु भितो जाणपणा । आड न यो नारायणा ।
घेईन प्रेमपान्हा । भक्तिसुख निवाडें ॥ १ ॥
यासी तुळे ऐसें कांहीं । दुजें त्रिभुवनीं नाहीं ।
काला भात दहीं । ब्रम्हादिका दुर्लभ ॥ २ ॥
निमिषार्ध संतसंगति । वास वैकुंठी कल्पांतीं ।
मोक्षपदें होतीं[1] । ते विश्रांती बापुडी ॥ ३ ॥
तुका म्हणे हेंचि देई । मीतूंपणा खंड नाहीं ।
बोलिलो त्या नाहीं । अभेदाची आवडी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – जाणपणा–ज्ञानीपणास निवाडें–खरोखर, न्यायाने, हक्काने, अखेरीस

अर्थ – देवा, मी ज्ञानीपणास फार भीत असतो नारायणा, यासाठी हा ज्ञानीपणा माझ्या आड येऊ देऊ नकोस मी भक्तिप्रेमाचा पान्हा घेऊनच खरोखर सुखी होईन १ या भक्तिप्रेमाची तुलना होईल असे दुसरे काही त्रैलोक्यात नाही भक्तिप्रेमाच्या मेळाव्यातील काल्याचा दहीभात ब्रह्मादिकांनाही दुर्लभ असतो २ एखाद्या अर्ध्या क्षणाची जी संतसंगती लाभते तीमधील सुख कल्पांतापर्यंत वैकुंठात वास मिळाल्याच्या सुखाएवढे असते मोक्ष, वैकुंठादी सुखे बापुडी होऊन संतसंगातच विश्रांतीसाठी येतात ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, मी–तू-पणाचा खंड होणार नाही असेच देणगी मला तू द्यावीस मी ज्या अभेदभावनेविषयी बोललो त्याची मला तशी आवड नाही ४

विवरण – या अभंगात तुकारामबुवा आपणास ज्ञानीपणा नको, त्यामुळे प्रेमसुखास कमतरता येईल असे समजून सांगत आहेत या भक्तिसुखाची तुलना होईल असे त्रिभुवनात दुसरे काही नाही असे बुवा आग्रहाने येथे सांगतात गोकुळात श्रीकृष्णाबरोबर खेळ खेळताना जो दहीभाताचा काला करून प्रेमाने एकमेकांच्या मुखात घालतात त्याची गोडी काय वर्णन करावी ? हा घास ब्रह्मादिकांना सुद्धा दुर्लभ आहे यमुनेतील पाण्यात माशाचे रूप घेऊन देव यातील भाग सेवन करण्यात टपलेले असतात अशी साधुसंतांची साक्ष आहे ' काल्याचिये आसें । देव जळीं झाले मासे '। असे तुकोबांनीच म्हटले आहे भक्तीच्या या सुखापुढे मोक्ष, वैकुंठ अथवा अभेदभावनेची आवड यांचीही पर्वा मुमुक्षूंना नसते अभेदत्व तत्त्वज्ञानाच्या दृष्टीने ठाव असले तरी प्रेमसुख भोगण्यासाठी ' मी तूपणा खंड नाही ' अशीच अवस्था असायला हवी, या प्रेमसुखाच्या आश्रयाने मोक्षादिक सुखे बापुडी होऊन लीनदीन होतात, यासाठी मुक्तीची हाव संतांना मुळीच नसते मुक्तिपदास मिळवून संतसंगती व ईश्वराशी हितगुज करण्यातील गोडी कोण सोडण्यास तयार होईल ? ब्रह्मज्ञान सुद्धा या प्रेमसुखापुढे फिके पडते ' घाड घरीन ब्रह्मज्ञानीं ।

[1] येती.

तरी मज व्यर्थ व्याली जननी ॥ मज प्रेम घडिये देवा । न मागे आन कांहीं केशवा ॥' असे भक्तश्रेष्ठ नामदेवानी म्हटले आहे ' सोडूनि मुक्तीचा वाटा । भुक्ति मागे तो करंटा ॥' अशा भावनेने तुकोबानी या सुखाच्या तुलनेने मुक्तीचा निषेध केला आहे

१९९६ देवा आतां ऐसा करीं उपकार । देहाचा विसर पाडीं मज ॥ १ ॥
तरीच हा जीव सुख पावे माझा । बरें केशीराजा कळों आलें ॥ २ ॥
ठाव देईं चित्ता राखें पायांपाशीं । सकळ वृत्तींसी अखंडित ॥ ३ ॥
आस[1] भय चिंता लाज काम क्रोध । तोडावा संबंध यांचा माझा ॥ ४ ॥
मागणें तें एक हेंचि आहे आतां । नाम मुखीं संतसंग देईं ॥ ५ ॥
तुका म्हणे नको वरपंग देवा । घेईं माझी सेवा भावशुद्ध ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – ठाव– आश्रय, आस–आशा, इच्छा, वरपंग–वरवरची, बाह्यात्कारी.

अर्थ – देवा, आता माझ्यावर असा एक उपकार कर मला माझ्या देहाचा विसर पाड १ केशीराजा, तू असे केलेस तरच माझ्या जीवाला सुख होईल हे मला चांगले समजून आले आहे २ सर्व वृत्तींच्या सहित तू माझ्या चित्ताला अखंडपणे तुझ्या पायांपाशी आश्रय दे ३ आशा, भीती, चिंता, लाज, काम व क्रोध इत्यादी वृत्तींचा व माझा संबंध तू तोडून टाक ४ माझ्या मुखात सतत तुझे नाम असू दे, व संतसंगती नेहमी असावी एवढीच मागणी मी तुझ्याजवळ करीत आहे ५ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, माझ्याकडून वरवरची सेवा न घेता शुद्धभावाची मनापासूनची सेवा तू घ. ६

१९९७ तुज न करितां काय नव्हे एक । हे तों सफळिक संतवाणी ॥ १ ॥
घेईं माझा भार करीं कइवार । उतरीं हा पार भवसिंधु ॥ २ ॥
उचित अनुचित पापपुण्यकाला । हा तों नये मला निवडितां ॥ ३ ॥
कुंटित राहिली बोलतां बोलतां । पार न पवतां वाणी पुढें ॥ ४ ॥
पुसतां ही कोणा न कळे हें गुज । राखें आतां लाज पांडुरंगा ॥ ५ ॥
तुका म्हणे बहु पाहिलें या जीवें । वर्म आलें जी ठावें नाम तुझें ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – कइवार–पक्ष, कड, पार–अंत, गुज–रहस्य, मर्म

अर्थ – देवा तू एकदा करायचे मनात आणलेस तर काय नाही होणार? सर्व काही घडेल अशी सर्व संतांची साक्ष आहे १ यासाठी देवा, तू माझे ओझे घे, माझा पक्ष घेऊन मला या भवसिंधूतून तारून न्या २ उचित काय आहे, अनुचित काय आहे पाप काय पुण्य काय, याची सरमिसळ झाल्याने मला त्यातून उचित व पुण्यमय अशी निवड करता आलेली नाही ३ माझी वाणी तुझे वर्णन करता करता थकून गेली आहे कुंठित झाली आहे तुझ्या कीर्तीच्या वर्णनाचा अंत तिला लागत नाही ४ तुझ्या प्राप्तीसंबंधीचे मर्म कुणाला विचारावे तर त्यांनाही हे समजत नाही पांडुरंगा, आता माझी लाज तूच राख ५ तुकाराम महाराज म्हणतात, माझ्या जीवाने आतापर्यंत पुष्कळ शोध केला पण तू प्राप्त होण्यातील मर्म तुझे नाम असल्याचे मला माहीत झाले ६

१९९८ मज त्याची भीड नुलघवे देवा । जो म्हणे केशवा दास तुझा ॥ १ ॥
मज आवडती बहु तैसे जन । करिती कीर्तन कथा तुझी ॥ २ ॥
सांडूनिया लाज नाचेन त्यापुढें । आइकती कोडें नाम तुझें ॥ ३ ॥

---

[1] असे

न लगे उपचार होईन भिकारी । वैष्णवांच्या घरीं उष्टावळी ॥ ४ ॥
तुका म्हणे जाणों उचित अनुचित । विचारूनि हित तेंचि करूं ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा:– नुलंघवे–मोडवत नाही, कोडें–कौतुकानें.

अर्थ – देवा केशवा, मी तुझा दास आहे असे जे म्हणतात त्यांची भीड माझ्याच्याने मोडवत नाही. १ देवा, तुझे कथाकीर्तन सतत करणारे जे कुणी आहेत तेच मला फार आवडतात. २ जे तुझे नाम कौतुकाने गातात त्यांच्यापुढे मी सर्व सोडून प्रेमाने नाचेन. ३ मला दुसरे कसलेही सुखाचे उपचार नकोत. मी भिकारी होईन व या वैष्णवांच्या घरी उष्टचा पत्रावळीही उचलण्याचे काम करीन त्यांच्या उष्टचाचे सेवन करून राहीन. ४ तुकाराम महाराज म्हणतात, मी उचित, अनुचित याचा योग्य विचार करून जे हिताचे आहे तेच नीट विचार करून करीन. ५

१९९९ तुझे पाय माझे राहियेले चित्तीं । ते मज दाविती वर्म देवा ॥ १ ॥
आम्हां अंधा तुझ्या पायांचा आधार । जाणसी विचार चालवितां[1] ॥ २ ॥
मन स्थिर ठेलें इंद्रियें निश्चळ । हें तों माझें बळ नव्हे देवा ॥ ३ ॥
पापपुण्य भेद नासिलें तिमिर । त्रिगुण शरीर सांडियेलें ॥ ४ ॥
तुका म्हणे तुझा प्रताप हा खरा । मी आणें दातारा शरणागत ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – वर्म–रहस्य, ठेलें–राहिले, तिमिर–अंधार.

अर्थ:– देवा, तुझे पाय माझ्या चित्तात राहिलेले असल्यामुळे ते मला तुझ्या प्राप्तीचे रहस्य दाखवितात. १ आम्हां आंधळ्या लोकांना आधार फक्त तुझ्याच पायांचा असून तूच आम्हांला या मार्गात ठेवण्याचे जाणतोस. २ देवा, माझे मन स्थिर राहिले असून सर्व इंद्रियेही शांत झाली आहेत. हे काही माझे बळ नव्हे. ३ पापपुण्याचा भेद नाहीसा झाल्याने अज्ञानाचा अंधार संपला असून सत्त्व, रज, तम या तीनही गुणांनी माझ्या शरीराचा त्याग केला आहे. ४ तुकाराम महाराज म्हणतात, हा सर्व प्रताप खरोखर तुझाच आहे. मी तुला शरण आलेला जाणत आहे. ५

२००० जेथें जातो तेथें[2] तूं माझा सांगाती । चालविसी हातीं धरूनियां ॥ १ ॥
चालों वाटे आम्ही तुझाचि आधार । चालविसी भार सवें माझा ॥ २ ॥
बोलों जातां बरळ करिसी तें नीट । नेली लाज धीट केलों[3] देवा ॥ ३ ॥
अवघे जन मज जाले लोकपाळ । सोइरे सकळ प्राणसखे ॥ ४ ॥
तुका म्हणे आतां खेळतों कौतुकें । जालें तुझें सुख अंतर्बाहीं ॥ ५ ॥

अवघेचि आम्ही त्यालों अळंकार । शोभलों हि फार अवघ्यांवरी ॥ ४ ॥
तुका म्हणे आम्ही सदैयाचे[1] दास । करणे न लगे आस आणिकांची ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – आराणूक–शांति, सुख, आस–इच्छा

अर्थ – भक्तीचे व हरिनामाचे पीक या खेपेस भरपूर झाले असल्यामुळे आम्हाला सुकाळच प्राप्त झालेला आहे सर्व काळ आता आम्ही ह्या प्रेमसुखात राहू १ मला सर्वांपासून आता सौख्य व समाधानच प्राप्त झाले आहे त्यामुळे माझा सर्व शीणभाग नाहीसा झाला आहे. २ आता आम्हांला सर्वत्र पांडुरंगाचेच दर्शन होत आहे तोच अनुभव येत आहे त्यामुळे जगातील दुजे–माझे असा भेद नाहीसा झाला आहे ३ आम्ही हरिनामाचे सर्व अलंकार धारण केले आहेत त्यामुळे आम्ही सर्वांच्यापेक्षा सुशोभित झालो आहोत ४ तुकाराम महाराज म्हणतात, आम्ही विठोबाचे सुदैवी दास झालेलो असल्यामुळे इतर कोणाची आशा करण्याचे कारण नाही ५

२००२ साधनें आमुचीं आज्ञेचीं धारकें । प्रमाण[2] सेवकें स्वामिसत्ता ॥ १ ॥
प्रकाशिलें जग आपुल्या प्रकाशें । रवि कर्मरसें अलिप्त त्या ॥ २ ॥
सांगणें तें नाहीं करणें आपण । मोलही वचन वाय जालें ॥ ३ ॥
तुका म्हणे आम्हां माडवल हातीं । येरझारा खाती वेचढियें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – धारकें–धारण करणारी

अर्थ –स्वामीचा अथवा धन्याचा अधिकार हेच सेवकास प्रमाण असते, त्याप्रमाणे या जगातील सत्ता धारण करणारी सर्व साधने आमच्याच आज्ञेत असतात १ सूर्य स्वतःच्या प्रकाशाने सर्व जगास प्रकाशित करतो, पण या कृत्यापासून तो अलिप्त असतो त्याप्रमाणे मी या साधनांहून वेगळाच आहे २ यासंबंधी आपण आम्हास सांगणे व त्याप्रमाणें करणे याची जरूरीच नाही यासाठी आमच्या मोलाच्या वचनांनीच आम्ही बांधले गेलो आहोत, अथवा आपण जे सांगतो ते करीत नसलो तर आपले मोलाचे वचन वाया गेल्यासारखे होते ३ तुकाराम महाराज म्हणतात, सर्व भांडवल आमच्याच हातात असून लोक मात्र जन्ममृत्यूच्या कितीतरी खेपा करीत आहेत ४

२००३ शुभ जाल्या दिशा अवघाचि काळ । अशुभ मंगळ मंगळाचें ॥ १ ॥
हातींचिया दीपें दुराविली निशी । न देखिजे कैसी आहे ते ही ॥ २ ॥
सुख दुःखाहूनि नाहीं विपरीत । देतील आघात हितफळें ॥ ३ ॥
तुका म्हणे आतां आम्हांसी हे भले । अवघेचि जाले जीव जंत ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा –निशी–रात्र

अर्थ –आम्हाला आता सर्व दिशा व सर्व काळ शुभदायक झालेला असून जे जे अशुभ आहे ते ते सर्व मंगलांतील मंगल बनले आहे १ भक्ति प्रेमाचा अथवा आत्मज्ञानाचा दिवा आमच्या हातात असल्यामुळे अज्ञानाची रात्र नाहीशी झाली आहे ती कशी असते हे सुद्धा आता आम्हांस दिसत नाही २ सुख हे दुःखाहून काही वेगळे आहे असे भासत नाही आघात अथवा संकटं हेही आम्हास हिताची फळे देते ३ तुकाराम महाराज म्हणतात, आता आम्हास जगातील हे सर्व जीवजंतू उत्तमच वाटत आहेत ४

२००४ पाप पुण्य दोन्ही वाहाती मारग । स्वर्गनर्कभोग याचीं पेणीं ॥ १ ॥
एका आड एक न लगे पुसावें । जेविल्या देखावें मागें भूक ॥ २ ॥
राहाटीं पडिले भरोनिया रितीं । होतील मागुतीं येतीं जातीं ॥ ३ ॥
तुका म्हणे आम्ही खेळतियांमधीं । नाहीं केली बुद्धि स्थिर पाहो ॥ ४ ॥

---

१ देवाचे २ प्रधान

शब्दार्थ व टीपा-मारग-मार्ग, येणीं-मुक्काम, रितें-रिकामे.

अर्थ :- या जगात पाप व पुण्य असे दोन मार्ग असून पापमार्गाने जाणारे नर्काच्या व पुण्यमार्गाने जाणारे स्वर्गाच्या, भोगाच्या मुक्कामात पोचतात १ जेवणामागून भूक व भुकेमागून जेवण असे चक्र चालू आहे. यांत कोण कोणाच्या मागे हे विचारावेच लागत नाही, त्याप्रमाणे स्वर्ग व नरक अर्थात पुण्य व पाप एकामागून एक असे आहेत. २ रहाटगाडग्याच्या चक्रात एक भाडे भरून येते व ते लगेच रिकामे होते, असेच चक्र एकामागून एक याप्रमाणे चालू असते पापपुण्य व नर्कस्वर्ग यांचेही असेच असते. जन्ममृत्यूंच्या खेपा अशाच असतात. ३ तुकाराम महाराज म्हणतात, आम्ही याच चक्रात खेळत असलो तरी आम्ही त्यांत आमची बुद्धी स्थिर केलेली नाही. ४

२००५ हित तें हें एक राम कंठीं राहे । नाठविती देहभाव देहीं ॥ १ ॥
हाचि एक धर्म निज बीजवर्म । हेचि जाळी कर्में केलीं महा ॥ २ ॥
चित्त राहे पायीं रूप बैसे डोळां । जीवें कळवळा आवडीचा ॥ ३ ॥
अखंड न खंडे अभंग न भंगे । तुका म्हणे गंगे मिळणी सिंधु ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा-बीजवर्म-श्रीहरीच्या प्राप्तीचे रहस्य, मर्म.

अर्थ :-श्रीहरीचे, श्रीरामाचे नाम कंठात राहिले ही एक हिताचीच गोष्ट झाली. यामुळे देह असूनही देहभाव आठवत नाहीत. १ श्रीहरीच्या प्राप्तीचे हेच एक रहस्य असून, हाच एक धर्म असून याच्यामुळे महान अशी प्रारब्ध-कर्मे जळून जात आहेत २ माझे चित्त त्याच्या पायाशी स्थिर होते आणि त्याचेच रूप डोळ्यांत बसून राहाते त्याच्या प्रेमाचा कळवळा जीवात सतत असतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, गंगा समुद्रास मिळाली तरी ती अखंडपणे वाहात असते, त्याप्रमाणे ईश्वरप्रेमास कधीच खंड न पडता ते अखंडपणे प्रवाहित असते, न भंगणारे अभंग असे त्याचे रूप असते ४

माझिये जातीचें मज भेटो कोणी । आवडीची धणी फेडावया ॥ १ ॥
आवडे ज्या हरि अंतरापासूनि । ऐसियांचे मनीं आर्त माझे ॥ २ ॥
तयालागीं जीव होतो कासावीस । पाहातीलं वास नयन हे ॥ ३ ॥
सुफळ[1] हा जन्म होईल तेथून । देतां आलिंगन वैष्णवांसी ॥ ४ ॥
तुका ह्मणे तोचि सुदिन सोहळा । गाऊं या गोपाळा धणीवरि ॥ ५ ॥

पिकलें स्वरूप आलिया घुमरी । रासी ते अंबरीं न समाये ॥ ४ ॥
मोजितां तयाचा अंत नाहीं पार । खुंटला व्यापार तुका ह्मणे ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :–परवडी–नाना प्रकारची, धालिया–संतुष्ट होऊन, वोसंडलें–प्रकट झाले, घुमरी–पुष्कळ, ओतप्रोत, भरघोस, अंबरीं–आकाशात.

अर्थ :–श्रीहरीचे कथामृत आणि संतांचा सहवास हेच आमचे जीवन होय. १ संतांच्या पंगतीस एके ठिकाणी बसून नाना प्रकारचे भोजन आम्ही करू व नामामृताची गोडी पावलोपावली आम्ही चाखू. २ या भोजनाने तृप्त झाल्यावर, संतुष्ट झाल्यावर आनंदाचे ढेकर येतील आणि वाणीतून प्रेमसुखाच्या शब्दांचा प्रवाह प्रकट होईल. ३ यामुळे श्रीहरीच्या कृपेचे, स्वरूपाचे पीक भरघोस येईल. त्याच्या राशी आकाशात न मावणाऱ्या होतील. ४ तुकाराम महाराज म्हणतात, या सुखराशी मोजाव्यात तर त्यांना अंत नाही, म्हणून त्यांची गणती करण्याचे कामच खुंटून गेले आहे. ५

२००८ जोडिलें तें आतां न सरे सारितां । जीव बळी देतां हाता आलें ॥ १ ॥
संचित सारूनि बांधिलें धरणें । तुंबिलें जीवन साक्षेपें हें ॥ २ ॥
शीत उष्ण तेथें सुखदु:ख नाहीं । अंतर सबाही एक जालें ॥ ३ ॥
बीज तो अंकुर पत्र शाखा फळें । प्राप्तबीज मुळें अवघें नासे ॥ ४ ॥
तुका म्हणे नामीं राहिलीसे गोडी । बीजाच्या परवडी होती जाती ॥ ५ ॥

सारभूत असे असून ते विकत घ्यायला किंमत द्यावी लागत नाही ससारसमुद्र तरुन जाण्यासाठी याचाच उपयोग होईल ३ मागच्या काळात झालेल्या अनेक थोर थोर भाग्यवतांनी याच नामरूपी मालाचा साठा स्वत जवळ केला होता ४ तुकाराम महाराज म्हणतात, आमच्या दुकानात खोटा, वाईट, असा माल नाही कोणताही घातपात करणारा माल आमच्या जवळ नाही चित्त शुद्ध करुन हा माल तुम्ही घ्यावा ५

२०१० पर्जन्यें पडावे आपुल्या स्वभावे । आपुलाल्या दैवे पिके भूमि ॥ १ ॥
बीज तेचि फळ येईल शेवटीं । लाभहानितुटी ज्याची तया ॥ २ ॥
दीपाचिये अंगीं नाहीं दुजाभाव । धणी [१] चोर साव सारिखेंचि ॥ ३ ॥
काउळें ढोंपरा ककर तित्तिरा । राजहंसा चारा मुक्ताफळें ॥ ४ ॥
तुका ह्मणे येथें आवडी कारण । पिकला नारायण जया तैसा ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – साव–सभावित, प्रामाणिक, ककर–लहान खडा, दगड, तित्तर–तित्तर नावाचा पक्षी, आवडी–प्रेम

*अर्थ –पाऊस आपल्या स्वभावाप्रमाणे सर्वत्र सारखाच पडत असतो परतु जमीन मात्र आपापल्या मशागतीच्या* दैवाप्रमाणे पिकत असते १ जसे बीज पेरले जाईल त्याचप्रमाणे शेवटी फळ हाताशी येईल ज्याच्या त्याच्या प्रारब्धाप्रमाणे लाभ अथवा हानी होत असते २ दिवा सर्वांना सारखाच प्रकाश देत असतो हा घराचा मालक, हा चोर, हा सभावित मनुष्य असा भेद तो कधी करीत नाही, त्याला सर्व सारखेच वाटतात ३ कावळ्याला जनावराचे ढोपर, तित्तर पक्ष्याला लहान दगड आणि राजहंसाला मात्र मोत्यांचा चारा, अशी व्यवस्था असते. ४ तुकाराम महाराज म्हणतात, अशा प्रकारे आपली आवड अथवा आपला भाव मुख्यत कारणीभूत असून त्यास अनुसरुन नारायणाच्या कृपेचे फळ ज्याचे त्यास मिळत राहील ५

२०११ धीर तो कारण एकविधभाव । पतिव्रते नाही सर्वभावे ॥ १ ॥
चातक हे जळ न पाहाती दृष्टी । वाट पाहे कंठीं प्राण मेघा ॥ २ ॥
सूर्यविकासिनी नेघे चद्रामृत । वाट पाहे अस्तउदयाची ॥ ३ ॥
धेनु येऊ नेदी जवळी आणिका । आपुल्या बाळकाविण वत्सा ॥ ४ ॥
तुका ह्मणे नेम प्राणासवेसाटी । तरीच या गोष्टी विठोबाचीं ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा:- कामारी-काम करणारा, रज-धुळीचे कण, बेताळीस-बेचाळीस कुळांचा, कवळी-घास सार-तात्पर्य.

अर्थ :- मी संतांच्या घरी मनोभावे काम करणारा असा त्यांचा दास आहे. मी त्यांच्याच दारांत व मातघरांत लोळत असतो. १ संतचरणाच्या धुळीचे कण यामुळे सहजच माझ्या अंगास लागतात व त्यायोगे माझ्या बेचाळीस कुळांचा उद्धार होतो. २ हे संत जेवून झाल्यावर मी त्यांच्या उष्ट्या पत्रावळी गोळा करून त्यांतील अन्नाचा घास मुखात घालीत असतो. ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी याखेरीज दुसरा विचारच मनात आणीत नाही. संतसहवास हेच तात्पर्य माझ्या मनास पटले आहे. ४

२०१६ एक शेरा अन्ना चाड । येर वाउगी बडबड ॥ १ ॥
कां रे[1] तृष्णा वाढविसी । बांधवूनि मोहपाशीं ॥ २ ॥
औट हात तुझा जागा । येर सिणसी वाउगा ॥ ३ ॥
तुका ह्मणे श्रम । एक विसरतां राम ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:- चाड-आठवण, याद. येर-दुसरी, इतर. औट-साडेतीन.

अर्थ :- भल्या गृहस्था, लक्षात ठेव की, तुला एक शेर अन्नाचीच आठवण असावी. इतर बडबड त्याखेरीज सर्व व्यर्थच मानावी लागेल. १ उगाच स्त्रीपुत्रादिकांच्या व संसारव्यापाच्या मोहाच्या पाशात का बांधून राहातोस? उगाच त्यांची आशा का वाढवितोस ? २ तुला राहण्यासाठी खरे म्हणजे साडेतीन हाताची जागा पुरे आहे. त्यासाठी इतर खटपट व्यर्थच आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, या रामनामास विसरून राहिल्यास बाकीच्या साधनांत सर्व श्रमच होतील ४

२०१७ आलें धरायेच[2] पेंठे । पुढें मागुतें न भेटे ॥ १ ॥
होसी फजीती वरपडा । लक्ष चौऱ्यासीचे वेढां ॥ २ ॥
नाहीं कोणांचा सांगात । दुःख भोगितां आघात ॥ ३ ॥
एका पाउलाची वाट । कोणां सांगावा बोभाट ॥ ४ ॥
जुंतिजेसी घाणां । नाहीं मारितया करुणा ॥ ५ ॥
तुका ह्मणे हित पाहें । जोंवरि हें हातीं आहे ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा :- धरायेच-हा शब्द भरायेच असा असावा. वरपडा-स्वाधीन झाल्यावर, पडल्यावर, सांगात-सोबत. जुतिजेसी-जुंपलेल्या वेळास.

अर्थ :- लोकहो, या मनुष्यजन्मास तुम्ही देहरूपाने आला आहात, तोपर्यंतच या पेठेच्या बाजारात भरपूर माल हरिकृपेचा भरून घ्या नाहीतर मागेपुढे कधी मिळेल असे नाही १ जर का चौऱ्याऐंशी लक्ष योनींच्या फेऱ्यांत पडलात तर मात्र तुमची फार मोठी फजिती होईल. २ अशा प्रसंगी दुःखाचे आघात सोसताना कुणाची संगत सोबत नसते. ३ या आडरानात भटकताना एक पाऊलवाटच असल्याने तिथे मार्ग चुकल्यास कुणास विचारता येईल ? ४ घाण्याला जुंपलेल्या बैलास तो थकून मदगतीने चालू लागल्यास पाठीवर मारच बसतो. त्याची दया मारणारास कधीच येत नाही. ५ म्हणून तुकाराम महाराज म्हणतात, जोपर्यंत हा नरदेह प्राप्त झाला आहे, आपल्या हातात आहे तोपर्यंतच आपले हित साधून घ्या. ६.

२०१८ लाभ जाला बहुतां दिसी । लाहो करा पुढें नासी ।
मनुष्यदेहा ऐसी । उत्तमजोडी जोडिली ॥ १ ॥

१ काम तृष्णा. २ भरायेंचि.

घेईं हरिनाम सादरे । भरा सुखाचीं भाडारे ।
जालिया व्यापारे । लाहो हेवा जोडीचा ॥ २ ॥
घेउनि माप हातीं । काळ मोवी दिवस राती ।
चोर लाग घेती । पुढें तैसे पळावे ॥ ३ ॥
हित सावकासे । ह्मणे करीन ते पिसे ।
हातीं काय ऐसे । तुका ह्मणे नेणसी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– लाहो-प्राप्ती, फायदा. नासी-नाश होईल हेवा-हाव, मोवी-मापतो मोजतो. पिसे-वेडेपण

अर्थ – पुष्कळ दिवसानी माणसाचा उत्तम देह मिळालेला आहे तर त्याचा पुरेपूर फायदा करून घ्या नाही तर त्याचा पुढे नाश होईल. १ मोठ्या आदराने श्रीहरीचे नाम घ्यावे व सुखाचे भाडार भरून ठेवावे त्याचा याप्रमाणे या व्यावतीत जास्त प्राप्तीची हाव मनात ठेवावी २ कारण हा काळ हातात माप घेऊन दिवस रात्र मोजीत असतो, त्यामुळे चोर माग लागले असताना जसे आपण पळतो तशीच त्वरा स्वहिताच्या साधनासाठी करावी ३ तुकाराम महाराज म्हणतात, सावकाश म्हातारपणी या जन्माचे हित आम्ही पाहू असे म्हणाल तर ते वेडेपण होईल कारण जगणे आपल्या हाती नाही हे तुम्ही काय जाणीत नाही ? ४

२०१९ सुखाचे ओतले । दिसे श्रीमुख चागले ॥ १ ॥
मनें धरिला अभिळास । मिठी घातली पायास ॥ २ ॥
होता दृष्टादृष्टी । ताप गेला उठाउठी ॥ ३ ॥
तुका ह्मणे जाला । लाभें लाभ दुणावला ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – ओतले-ओतून तयार केल अभिळास-अभिलाषा, इच्छा, उठाउठी-तावडतोब

अर्थ – या श्रीहरीचे मुख इतके चागले दिसते की ते जणु सुखरसच ओतून निर्माण झाले असावे १ या रूपाची माझ्या मनाने इच्छा धारण केली व त्याच्या पायास मिठी घातली २ याची दृष्टादृष्ट होताच माझ्या मनाचा ताप तावडतोब निघून गेला ३ तुकाराम महाराज म्हणतात, या अशा लाभाने माझा लाभ दुप्पट झाला आहे ४

२०२० झरा लागला सुखाचा । ऐसा मापारी कइचा ॥ १ ॥
जो हे माप तोडें धरी । सळे जाळी ते आवरी ॥ २ ॥
जाले बहु काळ । कोणा नाहीं ऐसे बळ ॥ ३ ॥
तुका ह्मणे तळ । नाहीं पाहेसा सकळ ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा मापारी-मापाड्या, माप घेणारा. सळ-मोजमाप करण्याची सळई तळ-सार, तात्पर्य, ठाव

अर्थ – या श्रीहरीच्या दर्शनाच्या व कृपेच्या सुखाचा तो झरा मला सापडला आहे त्याचे मोजमाप करणारा मापाडी कोण होणार ? १ हे माप करण्यासाठी जो सळई धरील तो आपले माप आवरूनच धरेल त्याच्याने हे माप करवणार नाही २ अशी मोजदाद करण्याचे प्रयत्न पुष्कळ वेळा झालेले आहेत पण त्याचे माप करण्याचे बळ आहे कुणाजवळ ! ३ तुकाराम महाराज म्हणतात, या सर्वांची मोजदाद करून त्याचा ठाव गाठण्यात यश मिळवील असा कुणी नाही ४

२०२१ आह्मी बोलो तें तुज कळे । एक दोहीं ठायीं खेळे ॥ १ ॥
काय परिहाराचे काम । जाणे अतरींचे राम ॥ २ ॥
कळोनिया काय चाड । माझी लोकांसी बडबड ॥ ३ ॥
कारण सवे एका । अवघें आहे म्हणे तुका ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – अतरीचें–मनातील चाड-पर्वा, हिंमत, सवें एका–एकासवे, एकासाठीच

अर्थ – देवा आम्ही जे बोलतो ते तुला चांगलेच कळते कारण तुझ्यात व माझ्यात अशा दोन्ही ठिकाणी तुमेच तत्त्व एकत्वाने सचार करीत असते खेळत असते १ अशा स्थितीत तुला सर्व सांगण्याचे काय कारण आहे ? तू राम माझ्या मनातील सर्व जाणीत असतोस २ उगाच माझी ही बडबड इतर लोकांना कळण्यात काय आहे ? त्याची मला काय पर्वा आहे ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, मला फक्त एका ईश्वराच्या कृपेचेच कारण आहे तेच माझे सर्व साध्य आहे ४

२०२२ उमटे ते ठायीं । तुझे निरोपावें पायीं ॥ १ ॥
आम्हीं करावे चिंतन । तुझें नामसकीर्तन ॥ २ ॥
भोजन भोजनाच्या काळीं । मागों करूनिया आळी ॥ ३ ॥
तुका ह्मणे माथा । भार तुझ्या पंढरिनाथा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – ठायी–मनात अत करणात, आळी–हट्ट

अर्थ – देवा आमच्या अत करणात जे जे काही उमटेल ते ते सर्व तुझ्या पायावर आम्ही अर्पण करू १ नेहमी तुझे नामसकीर्तन व चिंतन आम्ही करावे २ भूक लागताच भोजनाच्या वेळेस आम्ही हट्ट करून तुझ्याजवळ प्रेमामृताचे भोजन मागू ३ तुकाराम महाराज म्हणतात पंढरीनाथा, माझा सर्व भार तुझ्याच माथ्यावर आहे ४

२०२३ केला पण सांडी । ऐसियासी ह्मणती लंडी ॥ १ ॥
आतां पाहा विचारून । समर्थासी बोले कोण ॥ २ ॥
आपला निवाड । आपणचि करितां गोड ॥ ३ ॥
तुह्मीं आह्मीं देवा । बोलिला बोल सिद्धी न्यावा ॥ ४ ॥
असे घुरे उणें । मागें सरे तुका ह्मणे ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – पण–प्रतिज्ञा, लडी–लबाड, उन्मत्त, विचारून–विचार करून, घुरे–थोरपणा

अर्थ – देवा, केलेल्या प्रतिज्ञेप्रमाणे जो वागत नाही त्यास लबाड अथवा उन्मत्त म्हणतात ! १ याचा तुम्हीच विचार करून पाहावा तुम्ही समर्थ असल्याने तुम्हांस कोण बोलणार ? २ आपला निर्णय आपणच करून घ्यावा हे फार चांगले असते ३ देवा, तुम्ही व आम्ही मिळून जी प्रतिज्ञा केली आहे ती सिद्धीस न्यावी ४ तुकाराम महाराज म्हणतात, या विषयात जर मागे सरण झाले तर ते तुमच्या मोठेपणास कमीपणाचे आहे ५

२०२४ न व्हावे तें जालें । तुह्मां आह्मासी लागलें ॥ १ ॥
आता हालमाकलमें । मांडोनिया पाडू वर्मे ॥ २ ॥
पाटोळपासवेंसाटी । दिली रगटयाची गाठी ॥ ३ ॥
तुका ह्मणे हरी । आणूनिया करिन सरी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – हालमाकलमें–हमरीतुमरी पाटोळपा सवेंसाटी–रेशमी वस्त्राच्या, रगटयाची–भिकार वस्त्राची हरी–नगमत करून, सरी–बरोबरी

अर्थ देवा तुमचे आमचे भांडण झाले ही न होणारी ती गोष्ट झाली खरी १ आता हमरीतुमरीवर येऊन भांडण उकरून एकमेकांचे यम काढू २ देवा, तुमच्या अंगावरील रेशमी व किमती पीतांबरात माझ्या भिकारड्या रवट्याची गाठ दिली आहे ३ परंतु तुकाराम महाराज म्हणतात मी तुम्हांस जिंकेन, तुमचा पराभव करून तुमच्याशी बरोबरी करीन ४

२०२५ पतितमिरासी । ते म्यां धरिला जीवेंसी ॥ १ ॥
आतां बळिया सांग कोण । म्याही तुमें माझें मन ॥ २ ॥
पावनाचा ठसा । दावीं मज तुझा कैसा ॥ ३ ॥
धाव[1] तुका म्हणे जाले । रोख पाहिजे दाविलें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – पतितमिरासी-पतितपणाचा हक्क, बळिया-बलवान, ठसा-नक्षी, सामर्थ्य धाव-व्यर्थ

अर्थ -देवा, पतित असण्याचा माझा हक्क मी बजावला आहे ती माझी मिरासदारीच आहे ती मी जीवा पावेतो सांभाळली आहे १ आता तुझ्यामाझ्यात कोण बलवान आहे सांग यास तुझ्यामाझ्या मतांची साक्ष आहे २ पावन करण्याची शक्ती तुझ्या अंगी कशा प्रकारची आहे ती मला दाखवीत ना ३ तुकाराम महाराज म्हणतात, तू जर अंगी प्रचीती आणून दिली नाहीस तर तुझी पतितपावनपणाची कीर्ती व्यर्थच म्हणावी लागेल काही तरी रोख प्रत्यय द्या ४

२०२६ करितां येरझारा । उभा न राहासी वेव्हारा ॥ १ ॥
हे तो झोंडाईचे चाळे । काय पोटीं तें न कळे ॥ २ ॥
आरोगुनी मृग । बैसलासी जैसा बग ॥ ३ ॥
तुका म्हणे किती । बुडविलीं आळवितीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – येरझारा-ये जा हेलपाटे वेव्हारा-व्यवहारासाठी हिशेब देण्यासाठी झोंडाईचे-दांडगे पणाचे चाळ-कृत्य, आरोगुनी-गिळून बग-बगळा

अर्थ – देवा तुझ्या दारात आम्ही किती हेलपाटे घातले पण तू व्यवहार पूर्ण करण्यासाठी तुझ्या दारात आमच्यासमोर उभाच राहात नाहीस १ असे हे तुझे वागणे शुद्ध दांडगाईचे असून तुझ्या मनात तरी काय आहे ते समजत नाही २ जणू मृग गिळून स्तब्ध राहून बगळ्याप्रमाणे तू स्वस्थ बसला आहेस ३ तुकाराम महाराज म्हणतात तुला आळविणाऱ्या किती तरी लोकांना तू असे बुडविले आहेस ४

व भाडखोर नाही. ४ ज्यामुळे तुला कटकट वाटेल तो व्यवहारच आम्ही सोडून देऊ ४ तुकाराम महाराज म्हणतात, आता या संतांच्या देखतच या व्यवहाराचा निकाल देऊ ५

२०२८ सिंचन करितां मूळ । वृक्ष ओलावे सकळ ॥ १ ॥
नको पृथकाचे भरी । पडों एक मूळ धरीं ॥ २ ॥
पाणचोऱ्याचें दार । वरिल दाटावें तें थोर ॥ ३ ॥
वश जाला राजा । मग आपुल्या त्या प्रजा ॥ ४ ॥
एक चिंतामणी । फिटे सर्व सुखधणी ॥ ५ ॥
तुका म्हणे धांवा । आहे पंढरी विसांवा ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – पृथकाचे-वेगवेगळ्या देवांच्या, पाणचोर-गारुड्याजवळचे एक पात्र यास पुष्कळ भोके असतात. त्याचे वरचे ताड दाबले तरच त्यात पाणी टिकू शकते. नाहीतर भोकातून पाणी गळून जाते, सुखधनी-सुखाची इच्छा, धावा-धावत जा

अर्थ :– झाडांच्या मुळांनाच पाणी घातल्यास सर्व वृक्ष पानाफुलांसहित ओलावून जातो. १ याप्रमाणे वेगवेगळ्या देवांच्या नादी न लागता सारभूत असणारा हा पंढरीचा देवच धरून ठेवावा २ गारुड्याजवळचे पाणचोर पात्र असते, त्याचे वरील टोक दाबून धरले तर त्यात पाणी कायम राहाते ३ एकदा राजासच वश करून घेतले की सर्व प्रजा आपलीच आहे असे मानायला हरकत नाही. ४ मनात हवा असलेला पदार्थ देणारा चिंतामणी एकदा हाती आल्यावर मग सर्व प्रकारच्या सुखांची इच्छा तृप्त होते ५ तुकाराम महाराज म्हणतात, असा हा सर्व सुखाचा धनी पंढरीस आहे, त्याकडे धावत जा. तेथे तुम्हास चांगली विश्रांती मिळेल. ६

२०२९ करूं याची कथा नामाचा गजर । आम्हां संवसार काय करी ॥ १ ॥
म्हणवूं हरिचे दास लेऊं तीं भूषणें । कांपे तयाभेणें कळिकाळ ॥ २ ॥
आशा भय लाज आड नये चिंता । ऐसी तया सत्ता समर्थाची ॥ ३ ॥
तुका म्हणें करूं ऐसियांचा संग । जेणें नव्हे भंग चिंतनाचा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– लेऊ-धारण करू, अंगावर वागवू, संग-सोबत

अर्थ. – आम्ही याच श्रीहरीची कथा गाऊ व याच्याच नामाचा गजर करू. मग आम्हांला संसाराची काय भीती आहे ? १ याच हरीचे आम्ही दास म्हणवून घेऊ आणि याच्या नामाचे दागिने अंगावर धारण करू. त्यामुळे प्रत्यक्ष यमासही भय वाटून तो थरथर कापू लागेल २ *आशा, भय, लाज, चिंता हे विकार आमच्या मनाच्या* आड येत नाहीत, अशी या आमच्या सामर्थ्यवान प्रभूची सत्ता आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, ज्यामुळे नामचिंतनाचा भंग होणार नाही अशा या प्रभूची आम्ही सोबत करणार आहोत ४

२०३० काय सर्प खातो अन्न । काय ध्यान बगाचे ॥ १ ॥
अंतरींची बुद्धि खोटी । भरले पोटीं वाईट ॥ २ ॥
काय उंदीर नाहीं धांवी । राख लावी गाढव ॥ ३ ॥
तुका म्हणे सुसर जळीं । काउळीं कां न न्हाती ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – बगाचे-बगळ्याचे, धावीं-बिळात.

अर्थ – मनात भाव नसताना उगाच वरवर निराहारी राहाण्यात काय अर्थ आहे ? तसे पाहिले तर सर्प तरी अन्न कुठे खातो ? बगळ्याचे ध्यान काय कामाचे ? १ अंतःकरणात खोटी बुद्धी भरून राहिलेली असल्यामुळे

वाईट वासनाच सर्व मनात भरलेल्या असतात २ गुहेमध्ये उगाच राहण्यात काय अर्थ ? उंदीर नाही बिळात राहात ? अंगाला राख लावून थरथर ढोंग करण्यात काय अर्थ ? गाढव नाही राखेत लोळत ? ३ उगाच मनात भाव नसताना पाण्यात बुडी मारण्यात काय अर्थ आहे ? तुकाराम महाराज म्हणतात, सुसरी पाण्यातच असतात, आणि कावळ्याचे स्नान असतेच की, पण ते काय कामाचे ? ४

२०३१ मदें मातलें नागवें नाचे । अनुचित याचे बडबडी ॥ १ ॥
आता शिकवावा कोणासी विचार । कर्म तें दुस्तर करवी धीट ॥ २ ॥
आले अंगासी ते बळिवंत गाढें । काय वेडयापुढें धर्मनीत ॥ ३ ॥
तुका म्हणे कळों येईल तो भाव । अंगावरि घाव उमटता ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – मद–माज, कैफ, मातले–माजले, दुस्तर–वाईट, कठीण, गाढें–बलिष्ठ

अर्थ – एखाद्या दारूसारख्या पदार्थाच्या सेवनाने मत्त झाल्यावर, माजल्यावर एखादा नागव्यानेच नाचतो आणि वाणीने अनुचित प्रकारची बडबड करतो १ त्याचे हे वाईट कर्मच त्याला धीट करीत असल्यामुळे विचार तरी कोणाला शिकवावा लागणार ? २ जी स्थिती अंगी प्राप्त होते तीच बलवान असल्यामुळे या वेड्यापुढे धर्मनीतीचे महत्त्व तरी काय सांगावे ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, शेवटी यमदूतांचे घाव अंगावर पडतील तेव्हा स्वत च्या वागणुकीचा भाव त्याला चांगलाच समजून येईल ४

२०३२ सोन्याचे पर्वत करवती पाषाण । अवघे रानोरान कल्पतरु ॥ १ ॥
परि या दुर्लभ विठोबाचे पाय । तेथें हे उपाय न सरती ॥ २ ॥
अमृतें सागर भरवती गंगा । म्हणवेल उगा राहे काळा ॥ ३ ॥
भूत भविष्य कळों येईल वर्तमान । करवती प्रसन्न रिद्धिसिद्धी ॥ ४ ॥
स्थान मान कळों येती योगमुद्रा । नेववेल वारा ब्रह्मांडासी ॥ ५ ॥
तुका म्हणे मोक्ष राहे आलीकडे[1] । इतर बापुडें काय तेथें ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – करवती–करवतील, न सरती–उपयोगी नाहीत, स्थान–स्थान

• अर्थ – योगसिद्धीच्या साह्याने सुवर्णाचे पर्वत व दगडही बनविता येतील सर्व रानांतील सर्व वृक्ष कल्पतरू बनविता येतील १ पण या पांडुरंगाचे पाय दुर्लभच राहातील त्याच्या प्राप्तीसाठी मात्र हे उपाय अपुरेच पडतील २ अमृताने सागर व गंगा भरून टाकता येईल प्राण घ्यायला आलेल्या प्रत्यक्ष यमासही थांबविणे, उगा राहा म्हणणे सोपे आहे ३ विशेष प्रयत्नाने भूत, भविष्य व वर्तमानकाळातील घटना समजतीलही सर्व प्रकारच्या रिद्धिसिद्धि प्रसन्न करून घेता येतील ४ स्थान व त्याचे मान अशा प्रकारच्या योगमुद्रा समजतील आणि प्राणवायू ब्रह्मांडासही नेता येईल ५ तुकाराम महाराज म्हणतात, परंतु या श्रीहरीपासून मोक्षही अलिकडेच राहतो, तेव्हा वरीलसारख्या इतर गोष्टींची काय किंमत ? ६

विवरण –या अभंगात रिद्धीसिद्धीचे सामर्थ्य, योगयागाची मातबरी यांच्यापेक्षा श्रीहरीचे पाय श्रेष्ठ आहेत हे फार चांगल्या रीतीने तुकोबानी स्पष्ट केले आहे माणसास या आयुष्यात काय हवे असते ? भरपूर सोनेनाणे, अमरत्व देणारे अमृत दीर्घायुष्य, भूतभविष्याचे ज्ञान अल्पपरिश्रमाने रिद्धीसिद्धीच्या साहाय्याने अकल्पिताची प्राप्ती, इच्छिलेले फळ देणारा एखादा कल्पतरू, एखादी कामधेनू यांचीच इच्छा माणसास एकसारखी असते या गोष्टी मिळाल्या की आपण सुखात राहू अशी त्याची भ्रामक कल्पना असते तुकाराम महाराज सांगतात, मोठ्या प्रयत्नाने अथवा योग-सामर्थ्याने रिद्धीसिद्धी वश होतील सुवर्णाचे पर्वत, सुवर्णाचे दगड, रानोमाळ सर्व कल्पतरूच, सागर व गंगा अमृताने

[1] ऐलीकडे

भरून दिसतील यम उभा राहील, भूत भविष्य समजेल, योगमुद्रेच्या साह्याने बारा ब्रह्मांडास नेता येईल परंतु या सर्व गोष्टीमुळे मोक्षही मिळणार नाही, की खऱ्या सुखाची प्राप्तीही होणार नाही

अशा या 'स्वर्गीय' सुखाचा साधुसंतानी नेहमीच वीट मानला आहे योगसाधनेत कष्ट अधिक, शरीर-यातना फार म्हणून साधुसंतानी तीस दूर सारून नामसंकीर्तनाचा मार्ग सुलभपणे चोखाळला योगसाधनेतून प्राप्त होणाऱ्या रिद्धीसिद्धी याचा ईश्वरप्राप्तीत अडथळाच मानला चित्तवृत्तीचा निरोध करून त्याचा स्वत मध्ये लय करून द्रष्टा जेव्हा स्वस्वरूपानुभावात निमग्न होतो तेव्हा त्या स्थितीस योग म्हणतात या अवस्थेसाठी यम, नियम, आसन, प्राणायाम, प्रत्याहार, धारणा, ध्यान व समाधी या आठ अंगाचा अभ्यास करावा लागतो यम, नियम, आसन, प्राणायाम, प्रत्याहार, धारणा इत्यादि प्रक्रियातून माणसास जाव लागते, हठयोगात शरीरकष्टास महत्त्व असते भूचरी, खेचरी, अगोचरी, अलक्ष शांभवी, षण्मुखी अचल इत्यादी मुद्रांचे साधन करावे लागते नाभी, हृदय, भृकुटी, नासाग्र यापैकी एका स्थानावर लक्ष केंद्रित करावे लागते आसन, प्राणायाम, नाना प्रकारचे बंध याच्या साह्याने नाभीच्या स्थानावर असलेली कुंडलिनी नावाची एक सर्पाकार शक्ती जागृत होते व ती हळूहळू वर सरकू लागते मूलाधारचक्र, स्वाधिष्ठानचक्र मणिपुरचक्र, अनहातचक्र, विशुद्धचक्र, अग्निचक्र इत्यादीतून ही कुंडलिनी ब्रह्म-रंध्राच्या दारातून सहस्रदळ कमळापर्यंत पोचते. येथील अमृत बिंदूचे प्राशन करते अशी ही प्राणशक्ती कुंडलिनी या अमृताच्या झऱ्यापर्यंन्त पोचून तृप्त होते

अशा प्रकारच्या योगसाधनापासून नाना प्रकारच्या सिद्धीची प्राप्ती होत असते अजरामर होण्याची सिद्धी, शरीर पुष्ट करणारी गरिमा सिद्धी, आकाशगमनसिद्धी, सिद्धदर्शनसिद्धी, परकायाप्रवेशसिद्धी, दूरदर्शनसिद्धी इत्यादी सिद्धीची प्राप्ती होऊन वाटेल ते चमत्कार करण्याचे सामर्थ्य अंगी येते परंतु या सिद्धीच्या प्राप्तीमुळेच ईश्वर दुरावतो, या सिद्धीची प्राप्ती म्हणजे ईश्वरप्राप्ती नव्हे हे ज्ञानी माणसाने ओळखावे सिद्धीच्या चमत्कारातून अथवा त्या योगे प्राप्त झालेल्या मान्याच्या पर्वतापासून, कल्पतरूपासून, अमृताच्या सागरापासून, भूतभविष्याच्या ज्ञानापासून, दीर्घायुष्याच्या प्राप्तीपासून ईश्वराची जवळीक कशी साधणार ? विठोबाचे पाय प्राप्त होण्यासाठी या साधनाचा काहीच उपयोग होत नाही एकनाथ महाराजानी या सिद्धीचे समग्र वर्णन आपल्या भागवताच्या पंधराव्या अध्यायात केले असून त्याच्यामुळे ईश्वरप्राप्तीस अडथळा कसा येतो हेही स्पष्ट केले आहे. माझे भजन करताना साधकाने सिद्धीची वाट धरू नये असे सांगताना एकनाथ म्हणतात --

" अहेतुक करिता माझें भजन। तेणे शीघ्र माझी प्राप्ती जाण। तेथें सिद्धींवरी घालिता मन। आली नागवण मत्प्राप्तीसी ॥ ज्यासी विषयभोग लागे गोड। तोच सिद्धींची वाहे चाड। ज्यासी माझे प्राप्तीचे कोड। तो पाळीना वड ऋद्धिसिद्धींचे ॥ ज्यासी लौकिकीं अतिप्रतिष्ठा। तो सिद्धींच्या सोशी खटपटा। ज्यासी मत्प्राप्तीची निष्ठा। तो वचेना वाटा सिद्धींच्या ॥ माझे प्राप्तीनिकट जाण। उठे सिद्धीची नागवण। मार्गी छळावया व्यामोहक-पण। विलंबकारण मत्प्राप्ती ॥ माझें स्वरूप अद्वैतता। तेथें सिद्धींच्या नानावस्था। ते मायेची व्यामोहकता। जाण तत्त्वता उद्धवा ॥ "

एवा भक्तीच्या प्राप्तीपुढे, ईश्वराच्या प्रेमापुढे रिद्धीसिद्धींचा व लौकिक प्राप्तीची पर्वा साधुसंताना कधीच नसते श्रीकृष्णदयार्णवानी आपल्या हरिवरदा ग्रंथाच्या चौदाव्या अध्यायातही ईश्वरप्राप्तीच्या व भक्तीच्या तुलनेने सिद्धीचा असाच निषेध करताना म्हटले आहे,

" स्वबोधोपलब्धीसाठीं। योगमार्गी एक हट्टी। जाऊनि बैसती कपाटीं। महादुर्घटीं अभ्यासीं ॥ हे दुर्लभ के जडीं टाके। न जोडता पीडिजे दुःखें। तथापि मरी मरती मूर्खें। नसता ठाऊकें निजवर्म ॥ भवजळीं चंचळ मानसमासा। धारणा गळें रोधिता घसा। तळमळी पावोनि परम क्लेशा। विश्रांतिलेशा न पावता ॥ पंचप्राणी यमोक्त पवनें। वाहता टवटविती सर्व करणें। सोमींच्या बस्तापरी होणें। सरोधने त्याचेनि ॥ प्राणनिरोधें पिंड पडे। तो भवव्याघ्रातें वरपडे। शुकाच्यासे ऊर्ध्व पवाडे। तें आतुडे मूर्च्छेतें ॥ तेणे देह चिरकाळ राहे। परि अज्ञान अणुमात्र न वजाय। म मेलिया नवे देह लाहे। उणे काय ते ठायीं ॥ योगें हाचि देह वाचे। तरी विशेष काय पं

तयाचे । देहबुद्धी शुभाशुभाचे । भोगणे न चुके कोणासी ॥ मूर्च्छा घडीच निरसले । प्रेम सुखासी अंतरले । आत्म ज्ञाना दुरी ठेले । ऐसे ताडले अभक्त ॥ एव सर्व मंगला जननी । ते सप्रेम भक्ति अव्हेरुनि । जे प्रवर्तले ज्ञान साधनीं । क्लेशमरणीं त्या पडली ॥ जैसे सांडूनि सुरम धण । स्थूलकाष्ठ अवलोकून । त्याचें करितां दीर्घ कांडण । क्लेशावांचून फळ न लभे ॥'

२०३३ भाविका हें वर्म सांपडलें निकें । सेविती कौतुकें धणीवरि ॥ १ ॥
इच्छितील तैसा नाचे त्यांचे छंदें । वंदिती तीं पदें सकुमारें ॥ २ ॥
विसरले मुक्ति भक्तिअभिळासें । ओढत सरिसें सुख आलें ॥ ३ ॥
तुका म्हणे नाहीं मागायाची आस । पांडुरंग त्यास विसवेना ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – निके-खरे, चांगले, धणीवरी-संतुष्ट होईपर्यंत, अभिळासें-इच्छेने, आस-इच्छा, विसवेना-दूर करीत नाही

अर्थ .– या भाविक लोकांना श्रीहरीच्या प्राप्तीचे खरे वर्म सापडले आहे म्हणून त्याचे ते कौतुकाने संतुष्ट होईपर्यंत सेवन करतात १ असे हे भाविक जशी इच्छा करतील त्याप्रमाणे त्यांच्या छंदाने देव नाचत राहातो आणि या देवाची सुकुमार पावले हे भाविक भक्त मोठ्या प्रेमाने वंदितात २ भक्तीच्या इच्छेने हे भाविक मोक्ष-सुखाला सुद्धा विसरून जातात त्यांच्या बरोबर प्रेमाच्या ओढीने हे भक्तिसुख निकटच आलेले असते ३ तुकाराम महाराज म्हणतात, या भाविकांना काही मागण्याची इच्छाच नसते कारण पांडुरंग त्यांना कधीच दूर करीत नाही ४

२०३४ भक्ता समागमें सर्वभावें हरि । सर्व काम करी न सांगता ॥ १ ॥
साटवला राहे हृदयसंपुष्टीं । बाहेर धाकुटी मूर्ति उभा ॥ २ ॥
मागण्याची वास पाहे मुखाकडे । चिंतिल्या रोकडे मनोरथ ॥ ३ ॥
तुका म्हणे जीव भाव देवापायीं । ठेवूनि ते कांहीं न मागती ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा — समागमें-सहवासात, बरोबर, वास-वाट

अर्थ – हा श्रीहरी आपल्या भक्ताच्या सहवासात सर्वभावाने असतो न सांगता भक्ताची सर्व कामे तो करीत असतो १ तो आपल्या भक्ताच्या हृदयसंपुटात जरी साठवलेला असला तरी बाहेर सगुण व लहान मूर्तीच्या रूपाने तो सतत जवळ उभाच असतो २ हे भक्त काही मागतील की काय ? या वृत्तीने तो त्यांच्या मुखाकडे पाहून एकसारखी वाट पाहत असतो आणि ज्या इच्छा आपल्या भक्तांना होतात त्या तो तावडतोब पुऱ्या करतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, या भक्तांनीही आपला जीवभाव त्या देवाच्या पायावर अर्पण केलेला असतो ते त्याच्या जवळ इतर काही मागतच नाहीत ४

गेले आहेत त्यांच्यांत या भगवंताचे प्रेमरुप जणु भरून ओतलेले आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, जेथे अशा या भक्तराजाची वसती असते त्या ठिकाणी श्रीहरीची वसती असते यात कसलाही संशय नाही. ४

विवरण :– या एका भावपूर्ण अभंगात तुकोबानी स्वतःस झालेल्या ब्रह्मानंदाचे गोचर वर्णन केले आहे. सर्व दुराशा मरतो, मनाचे क्लेश दूर होतात, हुरहूर, तळमळ, व्यथा सपून चित्त हरिरुप होऊन जाते मनाच्या सर्व वृत्ती परम प्रेमस्वरूपाच्या ठिकाणी लीन होतात, अंगावर अष्टसात्त्विक भाव प्रकट होतात, डोळ्यातून आनंदाश्रू वाहू लागतात, सर्व इंद्रियांचे व्यापार केवळ ब्रह्मरुप होऊन गेल्यामुळे सर्वत्र श्रीहरीची प्रचीती येत असते या अनुभूतीचे मोठे हृद्य व आनंददायक वर्णन तुकोबानी अनेक ठिकाणी केलेले असते. वास्तविक पाहता या प्रेमाचे वर्णन करता येण्यासारखे नसते 'मुक्यानें गूळ खादिला । गोडी नये सांगायला' असेच या भक्तिप्रेमाची गोष्ट असली तरी भोगसुखाची चव तुकोबांनी अनेक ठिकाणी शब्दानी साकार केलेली आहे. 'रूप पाहतां लोचनीं । सुख जालें वो साजणी' अशा अनुभवाचे सुख ज्यानी अनुभवले त्याचे वर्णन तरी कसे करता येणार? 'पाहतां लोचन सुखावलें'. 'सुखाचे ओतले । दिसे श्रीमुख चांगलें', 'होता दृष्टादृष्टी । ताप गेला उठाउठी ।' अशी अवस्था भक्ताच्या मनाची होऊन जाते, असे तुकाराम महाराजानी वर्णन केले आहे. 'रूपीं गुंतले लोचन । पायी स्थिरावले मन ॥ देहभाव हारपला । तुज पाहतां विठ्ठला ॥ फळो नेणों सुख दु:ख । तहान हारपली भूक ॥' अशी आपल्या मनाची अवस्था झाल्याचे तुकारामबुवा सागतात. 'स्थिरावली वृत्ति पांगुळला प्राण । अंतरींची खूण पावोनिया । पुंजाळले नेत्र झाले अर्धोन्मीलित । कंठ सद्गदित रोमांच झाले ॥' अशा भावेत तुकोबा या आनंदानुभूतीचे वर्णन करतात. ही अवस्था मोठी सुखमय खरीच. 'काय सांगों झाले काहींचिया बाही' म्हणून तुकाराम महाराज वर्णन करतात, 'आनंदाचे डोहीं आनंद तरंग । आनंदाची अंग आनंदाचे' अशा या आनंदाच्या अनुभवात सर्व मंगलाचा निवास असतो. एकदा अंतरीची ज्योत प्रकाशली, ईश्वराच्या कृपेचा प्रकाश फाकला की मग 'तेथींचा आनंद ब्रह्मांडीं न माये । उपमेसी काय देऊं सुखा?' अशी अवस्था होऊन जाते. या सुखाचे, या आनंदाचे, या दुर्लभ प्राप्तीचे वर्णन तरी किती करावे? जेथे दृष्टी जाईल तेथे 'गगनीं गाभा' उभा असलेला जाणवतो, दिसतो. 'डोळा बैसलें बैसलें । ध्यान राहोनी सचलें', अशी मनाची अवस्था होऊन जाते.

२०३६ कासया गुणदोष पाहों आणिकांचे । मज काय त्यांचें उणें असे ॥ १ ॥
काय पापपुण्य पाहों आणिकांचें । मज काय त्यांचें उणें असे ॥ २ ॥
नष्टदुष्टपण कवणाचें वाणूं । तयाहून अणु[१] अधिक माझें ॥ ३ ॥
कुचर खोटा मज कोण असे आगळा । तो मी पाहों डोळां आपुलिये ॥ ४ ॥
तुका म्हणे मी भांडवलें पुरता । तुजसी पंढरिनाथा लावियेले ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– आणिकांचे–इतरांचे, दुसऱ्यांचे, वाणूं–वर्णन करू, कुचर–अगचोर, कपटी.

अर्थ :– मी दुसऱ्याचे गुणदोष कशासाठी पाहू? ते काय माझ्यापाशी अगदीच नाहीत की काय? १ मी दुसऱ्याचे पापपुण्य कशास पाहू? माझ्यापाशी काय त्यांची उणीव आहे की काय? २ मी दुसऱ्याचा नष्टपणा व दुष्टपणा कशासाठी वर्णन करू? त्यापेक्षा अणुभार माझ्याकडे अधिकच आहे. ३ कपटी, कामचुकार असा माझ्यापेक्षा जास्तो कोण आहे? मी तो माझ्या डोळ्यांनी पाहाणार आहे ४ तुकाराम महाराज म्हणतात, पंढरीनाथा, वरील दुर्गुणांचे भांडवल माझ्याजवळ मोठे असून ते मी तुलाच समर्पण केले आहे ५

काळें पुरविली पाठी । वरुषें जालीं तरी साठी ॥ ४ ॥
काळ भोंवताला भोंवे । राम येऊं नेदी जिव्हे ॥ ५ ॥
तुका म्हणे काळा । कर्म मिळतें तें जाळा ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा:– नेणां–जाणीत नाहीस, झांपडी–झडप.

अर्थ :–तुझ्याजवळ काळ सतत उभा आहे तो तू जाणीत नाहीस. पण तो अखेरीस तुझ्या डोळ्यांवर झडप घालील व तुझ्या कानांत खुंट्या ठोकील. तुला दिसणार नाही, ऐकू येणार नाही असे तो करील. १ यासाठी तू मोठ्या हुषारीने आपल्याच ठिकाणी सावध होऊन राहा. २ काळ पाहा तुझ्याच जवळ अखंडपणे उभा असून तो तुला काही दानधर्मही नीटसा करू देणार नाही ३ तुझ्या वयाला जरी साठ वर्षे पूर्ण झाली तरी तो काळ काही तुझी पाठ सोडणार नाही. तो तुझ्या पाठीस सारखाच आहे. ४ हा काळ तुझ्याभोवती सारखा उभा आहे, फिरत आहे. तो तुला मुखाने रामनामसुद्धा नीट घेऊ देणार नाही. ५ तुकाराम महाराज म्हणतात, तुझे हे कर्म काळाला साह्य करणारे असल्यामुळे तू या श्रीहरीच्या नामाने त्याचे दहन कर. ६

शब्दार्थ व टीपा – सबदणी–कपडे धुण्याचे परटाचे पात्र उजळणी–स्वच्छता

अर्थ – दुष्ट मनुष्य हा सज्जनाचे भूषणच आहे कारण तो सज्जनांची निंदा करून स्वतःचे पुण्य सज्जनांना अर्पण करतो व त्यांचे दोष स्वतः घेतो हा सज्जनांना एक अलभ्य लाभच होतो १ अशा या परोपकारी दुष्ट माणसाची धन्य होय कारण हा दुसऱ्यावर उपकार करून स्वतः मात्र नरकास जातो २ परटाचे कपडे धुण्याचे पात्र स्वतः मळाने भासले जाते, पण दुसऱ्याचे कपडे मात्र स्वच्छ करते या दुष्टांचे तसेच असते ३ तुकाराम महाराज म्हणतात अशा दुष्टांचा खरोखरीच मोठ्या प्रेमाने आदर करावा ४

२०३९ साहोनियां टाकीघाये । पाषाण देवचि जाला पाहे ॥ १ ॥
तया रीती दृढ मन । करीं साधाया कारण ॥ २ ॥
बाण शस्त्र साहे गोळी । शूरा ठाव उंच स्थळीं ॥ ३ ॥
तुका म्हणे सती । अग्न न देखे ज्या रीती ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – टांकीघायें–टाकीचे घाव, कारण–काय अग्न–अग्नी

अर्थ – टाकीचे घाव सहन केल्यानंतरच दगडाला देवपण आलेले असते हे पाहा ना १ त्याप्रमाणे आपले काय साधण्यासाठी तू आपले मन दृढ ठेव २ बाणांचे, शस्त्राचे घाव व गोळ्यांचा मारा सहन केल्यावरच शूराला ऊंच स्थानावरचा मान मिळतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, सती जाणारी स्त्री आगीची पर्वा कधीच करीत नाही अग्निप्रवेशामुळेच ती सतीत्वास पोचलेली असते ४

२०४० तेणें वेशें माझीं चोरिलीं अगें । मानावया जग आप्तपणें ।
नाहीं चाड भीड संसाराचे कोड । उदासीन सर्व गुणें ।
भय मोह लज्जा निरसली शंका । अवघियां एकचि पणे[1] ।
विठ्ठलाच्या पायीं बैसोनि राहिलीं । भागलीं नुठित तेणें ॥ १ ॥
आता त्यासीं काय चाले माझें बळ । जालोंसे दुर्बळ सत्त्वहीन ।
दग्ध पट दिसे सगति[2] बरवट । काय त्याचे कारण ॥ २ ॥
आळसे दृष्टी न पाहे आपुलें । एकचि देखिलें सर्वरूप ।
मानामान तेथें खुटोनि राहिले । पिशुन तो कोण बाप ।
ज्योति ना अंधार अवघा एककार । तेथें काय पुण्यपाप ।
विठ्ठलावांचुनि काहींच नावडे । वेगळाल्या भावे रूप ॥ ३ ॥
बळवडिवार लौकिक वेव्हार । गली आशा तृष्णा माया ।
सुखदु खाची वार्ता नाइके । अंतरलो दुरी तया ।
मौनपणनिष्काम होऊनि । राहिलों आपुलिया ठाया ।
तुजविण आतां मज नाहीं कोणी । तुका म्हणे देवराया ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – चाड–इच्छा, भागलीं–श्रमली, नुठित–उठत नाहीत, पट–वस्त्र बरवट–चांगली जशीच्या तशी, पिशुन–द्वाड चहाडखोर, दुष्ट

अर्थ – या श्रीहरीचे स्वरूपविशेष असा की, त्याने माझी सर्व अंगे चोरून टाकली त्यामुळे मी हे सर्व जग आप्तस्वरूपाचे मानू लागलो मला आता लौकिक संसाराची इच्छा भीड आणि कौतुकही नाही मी सर्वांविषयी उदास झालो आहे माझ्यामधील भय, मोह लाज व शंका यांचे निरसन झाले असून सर्व एकच असल्याचा अनुभव मला

१ पेण २ दुरोनि

आला आहे माझी सर्व इंद्रिये विठ्ठलाच्या पायावर बसून राहिली आहेत विषयाच्या संगतीने ती दमलेली असल्यामुळे ती आता या पायावरून उठतच नाहीत १ आता त्यांच्या ठिकाणी माझे बळ काहीच चालत नाही मी त्याच्याविषयी आता दुर्बल व सत्त्वहीन बनलो आहे जळालेल्या वस्त्राची घडी जशी चांगली जशीच्या तशी दिसते परंतु तिचा उपयोग मात्र नसतो, तशीच माझ्या इंद्रियांची अवस्था झाली आहे २ मी आता आपल्या संसाराकडे आळसदृष्टीनेही पाहात नाही कारण मी फक्त त्याचे एकच रूप पाहिले आहे या अवस्थेत माझा मान वा अपमान नाहीसा झालेला आहे त्या ठिकाणी वाप आदिकरून द्वाड नात्याबाही संबंध राहिलेला नाही या स्थितीत प्रकाशही नाही आणि अंधारही नाही सर्व एकच प्रकाशमय आत्मस्वरूप आहे तेथे पापपुण्यासही अवसर नाही निरनिराळ्या रूपांहून विठ्ठलाचे रूपच मला सर्वत्र दिसते. दुसरे काही दिसतच नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात बळाचा, मोठपणाचा, लौकिकाचा, व्यवहाराचा विचारच आता नाही आशा, तृष्णा माया या वृत्तीही आता गेल्या सुखदुःखाची वार्ताही माझ्या कानावर आता येत नाही मी त्याच्यापासून चांगलाच दुरावलो आहे मी–तूपणाच्या भावनेपासून मी निष्काम होऊन मुक्त झालो आहे मी आता आपल्याच स्वरूपात स्थिर झालेलो आहे देवराया, आता मला तुझ्यावाचून दुसरे कुणी नाही रे ४

२०४१ कथा पुराण ऐकता। झोपें नाथिले तत्त्वता।
खाटेवरि पडता। व्यापी चिंता तळमळ ॥ १ ॥
ऐसी गहन कर्मगति। काय तयासी रडती।
जाले जाणते जो चित्तीं। कांहीं नेघे आपुला ॥ २ ॥
उदक लाविता न धरे। चिंता करी केव्हा सरे।
जाऊं नका धीरें। म्हणे करिता ढवाळचा ॥ ३ ॥
जवळी गोंचिड क्षीरा। जैसी कमळणी दर्दुरा।
तुका म्हणे दुरा। देशत्यागें तयासी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – नाथिले–व्यापिले, उदक–पाणी, ढवाळचा–ढवाळच्या क्षीरा–दुधाच्या, कमळणी–कमळ-कंद, दुर्दुरा–बेडकास

अर्थ – कथापुराण ऐकत असताना या मूर्खास झोपेने व्यापलेले असते आणि घरी खाटेवर पडल्यावर मात्र अनेक प्रकारच्या चिंतांनी हृदय तळमळत राहाते १ अशी ही कर्मगती मोठी कठीण असते, तिच्यापुढे काय रडायचे! मोठे मोठे जाणते झाले तरी ते याविषयी आपल्या चित्तात काही जाणीव धरीत नाहीत २ कथेत झोप यऊ नये म्हणून कुणी डोळ्यांना पाणी लावले तरी काही उपयोग होत नाही ही कथा केव्हा सरेल अशी एक चिंता त्याच्या मनास असते पण उलट ढवाळच्या करताना मात्र कुणी जाऊ लागला तर तो त्याला जाऊ नको असे धीराने म्हणून बसवितो ३ दुधाने भरलेल्या गाईच्या स्तनाशीच गोचीड असते पण तिला काही त्या दुधाचा लाभ होत नाही चिखलात कमलकंद असूनही त्याचा लाभ तेथे राहाणाऱ्या बेडकांना होत नाही तुकाराम महाराज म्हणतात त्याप्रमाणे हा मूर्ख मनुष्य कथेमध्ये असूनही देशत्याग केलेल्याप्रमाणे दूरच असतो ४

२०४२ संदेह बाधक आपआपणयातें। रज्जुसर्पवत भासतसे।
भेऊनियां काय देखिलें येणें। मारें घायेंविण लोळतसे ॥ १ ॥
आपणचि तारी आपणचि मारी। आपण उद्धरी आपणया।
शुकनळिकेन्यायें गुतलासि काय। विचारूनि पाहें मोकळिया ॥ २ ॥

१ ढवाळ्या

पापपुण्य कैसे भांजिले अंक । दशकाचा एक उरविला ।
जाणोनिया काय होतोसी नेणता । शून्या[1] ठाव रिता नाहीं नाहीं ॥ ३ ॥
दुरी दृष्टी पाहें न्याहाळूनि । मृगजळा पाणी न म्हणें चाडा ।
धावताचि फुटे नव्हे समाधान[2] । तुका म्हणे जाण पावे पीडा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – संदेह–संशय, रज्जुसर्पवत–दोरी ही सापाप्रमाणे, शुकनळिकेन्यायी–राघू किंवा पोपट नालिकेच्या भ्रमाने गुंतून पडतो त्याप्रमाणे, विचारूनि–विचार करून, भांजिले–रमी केले

अर्थ – संशय हा नेहमी आपला आपणासच बाधक होतो दोरी ही सापाप्रमाणे भासली तरी तिची बाधा केवळ संशयामुळे होणारच या ठिकाणी उगाच भिऊन काय उपयोग आहे ? त्याचे खरे कारण पाहायला हवे मार खाल्यावाचूनच लोळण्यात काय अर्थ आहे ? १ आपणच आपणांस तारीत असतो, मारीत असतो आपणच आपला उद्धार करायचा असतो पोपट जसा पिंजऱ्यातील नलिकेच्या भ्रमात सापडून फसतो, तसा तू या संसारचक्रात कसा काय सापडलास ? नीट विचार स्वरूपाचा करून पाहा तू मोकळाच आहेस असे तुला दिसेल २ पापपुण्याची वजावट केल्यावर बाकी शून्यच उरते दहावरचे शून्य पुसल्यावर एकाचाच आकडा बाकी उरतो तसे पापपुण्याच्या वजावटी नंतर शून्य राहाते १ ते रिकामे नसते, ज्ञानाच्या अनुभवानें परिपूर्ण असते, हे तुला ठाऊक असून तू बळानच नेणत्यासारखे का वागतोस ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, जरा बारकाईने व दूर दृष्टीने न्याहाळून पाहा ना ! उगाच मृगजळास पाणी समजून राहू नकोस नाहीतर त्याच्या पाठीमागे लागून छाती मात्र फुटून जाईल विनाकारण दुःख मात्र पावशील ४

२०४३ कथे उभा अंग राखेल जो कोणी । ऐसा कोण गणी तया पापा ॥ १ ॥
येथें जो पातकी न येताच भला । रणीं कुचराला काय चाले[3] ॥ २ ॥
कथे बैसोनि आणीक चर्चा । धिग त्याची वाचा कुंभपाक ॥ ३ ॥
तुका म्हणे ऐलपैल ते थडीचे । बुडतील साचे मध्यभागीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – रणीं–रणांगणावर, युद्धप्रसंगी, कुचर–कुचराई करणारा, कुंभपाक–एक प्रकारचा नरक, साचे–बरोबर

अर्थ – कथेमध्ये उभा राहून जो अंगचोरपणा करील त्याच्या पापाची गणना करण्यास कोण समर्थ आहे ? १ असा पातकी कथेमध्ये न येईल तरच भला अंगचुकार माणसाचा युद्धप्रसंगी काय उपयोग ? २ कथेमध्ये बसून जो इतरांच्या गप्पा करतो त्याच्या वाणीचा धिक्कार असो ती कुंभपाकाचा नरकंच समजावी ३ तुकाराम महाराज म्हणतात, भवनदीच्या पलीकडचे असोत किंवा अलीकडचे असोत, कथेमध्ये अशी वर्तणूक करतील तर नदीच्या मध्यभागीच बुडून जातील ४

२०४४ नावडे ज्या कथा उठोनिया जाती । ते यमा फावती बरे बोजा ॥ १ ॥
तो असे जवळी गोचिडाच्या न्यायें । देशत्यागें ठाव तया दुरी ॥ २ ॥
नव्हे भला कोणी नावडे दुसरा । पाहुणा किंकरा यमा होय ॥ ३ ॥
तुका म्हणे तया करावे तें काई । पाषाण का नाहीं जळामध्यें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – बोजा–सहज आयतेच, किंकरा–दास

---

१ शून्याचा ठाव नाही जाला २ सावधान ३ आले

अर्थ – श्रीहरीची कथा आवडत नाही म्हणून जे कुणी उठून जातील ते यमाच्या हाती सहज आयतेच सापडतील १ गाईच्या थानाजवळच गोचिडाची वस्ती असते, पण तिला दूध न मिळता रक्तच मिळते तशीच त्याची स्थिती होते अशा माणसास कथेचा लाभ न होता तो देशत्याग केल्याप्रमाणे कथासुखाला दुरावतो २ असा मनुष्य चांगला तर नव्हेच, पण दुसरा कुणी भला जवळ येईल तर तोही त्याला आवडत नाही असा हा मनुष्य यमाच्या दासाचा पाहुणाच होतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा माणसास काय करावे ? नदीच्या पाण्यात पुष्कळ दगड असतात ना ? त्यातलाच तो एक ४

२०४५ जवळी नाहीं चित्त । काय मांडियेलें प्रेत ॥ १ ॥
कैसा पाहे चर्मदृष्टि । दीप स्नेहाच्या शेवटीं ॥ २ ॥
कातेलेसें श्वान । तैसें दिशा हिंडे मन ॥ ३ ॥
याचे कानीं हाणे । कोण बोंब तुका म्हणे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – स्नेहाच्या–तेलाच्या, कातेलेंसे–पिसाळलेले, श्वान–कुत्रे

अर्थ – हरीच्या कथेत बसला आहे, पण चित्त जर स्वाधीन नसेल तर त्याचा उपयोग काय ? त्याचे प्रेतच जणु तिथे असते १ दिव्यातील तेल सपायच्या वेळी जशी त्याची ज्योत मोठी होत असते, त्याचप्रमाणे त्याची अखेरच्या क्षणी होणारी दृष्टी चळलेली असते २ पिसाळलेल्या कुत्र्याप्रमाणे त्याचे मन चहू दिशांना धावत असते ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा या माणसाच्या कानावर कुणी बोंब मारावी ? ४

२०४६ दुर्बळा वाणीच्या एक दोनि सिद्धि । सदैवा समाधि विश्वरूपीं ॥ १ ॥
काय त्याचें वाया गेलें तें एक । सदा प्रेमसुख सर्वकाळ ॥ २ ॥
तीर्थ देव दुरी तया भाग्यहीना । विश्व त्या सज्जना दुमदुमिलें ॥ ३ ॥
तुका म्हणे एक वाहाती मोळिया । भाग्यें आगळिया घरा येती ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – सदैवा–सुदैवी, भाग्यवान

अर्थ – नाना प्रकारचे उपाय करून जे लोक वाणीच्या एक दोन सिद्धी मिळवितात ते दुबळेच होत परंतु विश्वरूपाने व्यक्त झालेल्या परमेश्वराशी जे तादात्म्य पावतात तेच भाग्यवान होत १ त्यांचे काय वाया जाते ? ते नेहमी एक श्रीहरीचे प्रेमसुखच भोगतात २ अशा या भाग्यहीन लोकांना देव व तीर्थ यांचा दुरावाच असतो आणि सज्जनाचा देव सर्व विश्वात दुमदुमून राहिलेला असतो ३ तुकाराम महाराज म्हणतात एकजण लाकडांची मोळी डोक्यावर घेऊन उपजीविका करतो, तर दुसऱ्याच्या घरी भाग्य आयतेच येत राहाते ४

२०४७ परिमळें काष्ठ ताजवा तुळविलें । आणीक[1] नावाचीं घोडीं ।
एक तीं कांतिवें चर्मविलीं ढवळारें । एकाचिया कुड मेडी ।
एक दीनरूप आणिती मोळिया । एक ते वाधोनि माडी ।
अवघिया बाजार एकचि जाला । मोविकलीं आपुल्या पाडीं ॥ १ ॥
गुण तो सार रूपमध्यकार । अवगुण तो फार पीडीतसे ॥ २ ॥
एक गुणें आगळे असतो । अमोल्य नावाचे तडे ।
एक समर्थ दुर्बळा घरीं[2] । फार मोलाचे घोडे ।

[1] नावड चि [2] परी

एक झगझग करिती वाळवंटीं । कोणी न पाहाती तयाकडे ।
समर्थ सपन्न आपुलाले घरीं । मायेक दैन्य बापुडें ॥ ३ ॥
एक नामें रूपें सारिखा असती । अनेकप्रकार याती ।
ज्याचिया संचितें जैसे आले पुढें । तयाची तैसीच गति ।
एक उचपदीं बैसोनि सुखें । दास्य करवी एका हातीं ।
तुका म्हणे का मानिती सुख । चुकलिया वाया खती ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – परिमळें–सुवासामुळे, ताजवां–तराजूनें, तुळविले–मापले, मोजले, ढवळारें–घरे, कुड–कुपण, मेडी–मेढी

अर्थ –चंदनास सुवास असल्यामुळे त्याचे तराजूने मापून वजन होते, त्याला चांगली किंमत येते इतर काष्ट या नावाने लाकडे थोडी आहेत का ? काही लाकडे चांगली कापून त्यांची घरे बनवितात, तर काही लाकडाचा कुंपण व मेढी याच्यासाठी उपयोग होतो काही लाकडाच्या मोळ्या बांधून अल्प किंमतीत त्या विकल्या जातात तर काहींचा उपयोग माडी बांधण्यासाठी होतो अशी ही लाकडे एकाच बाजारात असतात, पण आपल्या किंमतींनी विकली जातात १ अशा ठिकाणी गुणवत्ता हे सर्वश्रेष्ठ गमक आहे रूप हे मध्यम प्रकारचे मानले जाते आणि पीडादायक अनुभव तर कनिष्ठ स्वरूपाचा असतो २ खड्यामध्ये गुणवान खडे वेगळेच असतात अमोलिक खडे श्रीमंताच्या घरी असतात, पण असे किंमतवान खडे दुर्बळ अशा गरिबाच्या घरी थोडेच असतात वाळवटात कित्येक खडे सूर्याच्या प्रकाशात चमचम करतात, पण त्याच्याकडे कुणीही पाहात नाही भाग्यवान व सपन्न लोक आपापल्या घरी सुखाने असतात आणि दुसरे काही मात्र गरिबीतच राहातात ३ तुकाराम महाराज म्हणतात, नावानी व रूपानीं कित्येक सारखेच असले तरी त्याच्यात अनेक प्रकारच्या जाती असतात पूर्वीच्या कर्माप्रमाणे ज्याला त्याला चांगली अथवा वाईट गती मिळत असते एक उच्च स्थानावर बसून दुसऱ्याकडून सेवा करून घेतो, यामध्ये सुख आहे असे हे लोक का मानतात ? आणि हे सुख संपल्यावर मग उगाच तळमळ तरी का करतात ? ४

२०४८ नाहीं आम्हा शत्रु सासुरें[1] पिशुन । दाटले हे घन माहियेर ॥ १ ॥
पाहें तेथें पांडुरंग रखुमाई । सत्यभामा राही जननिया ॥ २ ॥
लज्जा भय काहीं आम्हा चिंता नाहीं । सर्वसुखें पायीं वोळगती ॥ ३ ॥
तुका म्हणे आम्ही सदैवाचीं बाळें । जालों लडिवाळें सकळांचीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – पिशुन–दुष्ट, घन–घनदाट, वोळगती–प्राप्त होतात

अर्थ –आम्हांस कुणी शत्रू नाहीत, सोयरे नाहीत किंवा दुष्टही नाहीत आम्हास सर्वत्र हा माहेररूपी विठ्ठलच घनदाटपणे व्यापून राहिलेला दिसतो १ जेथे पाहावे तेथे पांडुरंग, रखुमाई, सत्यभामा, राही असे आई-बापच दिसतात २ म्हणून आम्हांला भय, लाज, चिंता वगैरे काही नाही सर्व प्रकारची सुखे आमच्या पायाशी प्राप्त होतात ३ तुकाराम महाराज म्हणतात, आम्ही त्या विठ्ठलाची बाळे सदैव दैववान आहोत, त्यामुळे आम्ही सर्वांचेच लाडके आहोत ४

२०४९ गर्भी असता बाळा । कोण पाळी याचा लळा ॥ १ ॥
कैसा लाघवी सूत्रधारी । कृपाळुवा माझा हरी ॥ २ ॥
सर्प पिलीं वितांचि खाय । वांचलिया कोण माय ॥ ३ ॥

---
१ सोयरे

गगनीं लागला कोसेरा । कोण पुरवी तेथें चारा ॥ ४ ॥
पोटीं पाषाणाचे जीव । कवण जीव त्याचा भाव ॥ ५ ॥
तुका म्हणे निश्चळ राहें । होईल तें सहज पाहें ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – लळा–लाड, कोसेरा–काळी चिडा

अर्थ –आईच्या गर्भात बाळ असताना त्याचे लाड कोण करीत असतो ? १ मासा हा श्रीहरी कसा कृपाळू, माधवी व सूत्रधार आहे पाहा २ सर्पिण जन्मताच आपल्या पिलाना खाऊन टाकते, पण त्याना तिच्या तावडीतून वाचविणारा याच्याशिवाय कोण आहे ? ३ कोळी किड्याने आपल्या अगच्या ततूचे घर उच ठिकाणी केलेले असते, त्याला तिथे चारा कोण पुरविते ? ४ जमीनीतील दगडाच्या खालीही अनेक जीव असतात, त्याचा जीव याच्याखेरीज कोण वाचविणार ? ५ तुकाराम महाराज म्हणतात, लोकहो, तुम्ही निश्चित राहा आणि याच्या कृपेने जे जे होईल ते निश्चित मनाने पाहा ६

२०५० न म्हणें कवणा सिद्ध साधक गव्हार । अवघा विश्वभर वाचूनिया ॥ १ ॥
ऐसे माझे बुद्धि काया वाचा मन । लावीं तुझें ध्यान पाडुरगा ॥ २ ॥
गाता प्रेमगुण शका माझ्या मनीं । नाचता रगणीं नाठवावी ॥ ३ ॥
देईं चरणसेवा भूताचे भजन । वर्णा अभिमान साडवूनि ॥ ४ ॥
आशापाश माझी तोडीं माया चिंता । तुजविण व्यथा नको कांहीं ॥ ५ ॥
तुका म्हणे सर्व भाव तुझे पायीं । राहे ऐसे देईं प्रेम देवा ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – गव्हार–मूर्ख

अर्थ –मी कुणालाच सिद्ध, साधक अथवा मूर्ख म्हणणार नाही कारण सर्वत्र हा विश्वभरच व्यापून राहिलेला आहे त्याशिवाय मी दुसरे काहीच जाणीत नाही १ पाडुरगा अशा प्रकारे माझ्या बुद्धीस, शरीरास, वाचेस, मनास तुझेच ध्यान लाव २ श्रीहरीचे प्रेमगुण गाताना त्याच्या प्रभावाने रगणात नाचताना माझ्या मनात भलतीच शका येऊ देऊ नकोस ३ वर्णाभिमान सोडून देऊन सर्वभूतो तुझे वास्तव्य असल्याने त्यांचे भजन व तुझी चरण सेवा एवढ्याच गोष्टी दे ४ माझ्या सर्व आशेचे पाश, माया चिंता यांची बधने तोडून तुझ्याशिवाय दुसरी कोणतीच व्यथा मला ठेवू नकोस ५ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, माझे सर्व भाव तुझ्या पायीच स्थिरावतील असे प्रेम मला तू द्यावेस ६

२०५१ अग्निमाजी गेलें । अग्नि होऊन तेंच ठेलें ॥ १ ॥
काय उरलें तया पण । मागील तें नाम गुण ॥ २ ॥
लोह लागे परिसा अगीं । तो ही भूषण जाला जगीं ॥ ३ ॥
सरिता ओहळा ओघा । गगे मिळोनि जाल्या गगा ॥ ४ ॥
चदनाच्या वासें । तरु चदन जाले स्पर्शे ॥ ५ ॥
तुका जडला संता पायीं । दुजेपणा ठाव नाहीं ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – लोह लोखड, तरु–झाडे, सरिता–नदी

अर्थ –एखादा पदार्थ अग्नीत टाकला की तो अग्निरूपच होऊन जातो १ मग त्या पदार्थाचे मागील नामरूप व गुण यांचा माग काही उरत नाही २ लोखडाचा स्पर्श परिसाला होताच ते अगाला सुवर्णाच्या रूपाने भूषण होते ३ एकदा गगेस नद्या ओढे लहान नाले मिळाले की ते गगारूपच होऊन जातात. ४ चदनाच्या सुवासामुळे जवळील इतर झाडेही स्पर्शामुळे चदनरूप होऊन सुगधी बनतात ५ तुकाराम महाराज म्हणतात, त्याप्रमाणे मीही सतांच्या पायाशीच जडलो आहे त्यामुळे माझ्यात वेगळेपणास अवसरच उरलेला नाही ६

२०५२ ऐसा भाग्यें जालों । तरी धन्य जन्मा आलों ॥ १ ॥
वळें तळीले पायरी । संत पाय देती वरी ॥ २ ॥
प्रेमामृतपान । होईल चरणरजें स्नान ॥ ३ ॥
तुका म्हणे सुखें । तया हरतील दुःखें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– वळे–वागणे, रहाणे तळीले–खालच्या, चरणरजें–चरणावरील धुळीच्या कणामुळे

अर्थ – पुढीलप्रमाणे मी भाग्यवान झालो तरच माझ्या जन्माचे सार्थक झाल्यासारखे होईल १ सर्वांत खालच्या पायरीवर राहाणे आले तर संत तीवर पाय देतील २ त्याच्या श्रीहरीप्रेमामृताचे सेवन करता येईल त्याच्या चरणरजामुळे धूलिस्नान होईल ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा प्रकारच्या सुखाने सर्व दुःखे नाहीशी होतील ४

२०५३ करिता या सुखा । अंतपार नाहीं लेखा ॥ १ ॥
माथा पडती संतपाय । सुख कैवल्य तें काय ॥ २ ॥
ऐसा लाभ नाहीं । दुजा विचारिता काहीं ॥ ३ ॥
तुका म्हणे गोड । तेथें पुरे माझें कोड ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – अंतपार–शेवट, मर्यादा कोड–इच्छा

अर्थ – पुढीलप्रमाणे असलेल्या सुखास मर्यादा नाही असेच समजा १ डोक्यावर संताचे पाय पडत आहेत त्याच्यापुढे कैवल्यसुख ती काय किंमत आहे ? २ विचार करून पाहाता अशा प्रकारचा लाभ त्रैलोक्यात दुसरा नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात हेच फार गोड आहे येथे माझ्या सर्व इच्छा पूर्ण होतील ४

२०५४ वेद जया गाती । आम्हां तयाची संगति ॥ १ ॥
नाम धरियेलें कंठीं । अवघा साटविला पोटीं ॥ २ ॥
ॐकाराचें बीज । हातीं आमुचें तें निज ॥ ३ ॥
तुका म्हणे ब्रह्म मोटें । अणुरेणिया धाकुटें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – निज–स्वस्वरूपाचे

अर्थ – वेदानी ज्याची महती वर्णन केली आहे त्याची संगती आम्हाला आहे १ त्याचे नाम आम्ही आमच्या कंठात धारण केले आहे त्याला आम्ही आमच्या पोटात साठवून ठेविला आहे २ ॐकाराचे बीजरूपाचे जें स्वस्वरूपाचे निधान आहे तेंच आमच्या हातात आले आहे ३ ते फार मोठे असूनही अणुपरमाणुपेक्षाही सूक्ष्म आहे ४

विवरण – मराठी साधुसंतांचे दैवत पंढरीचा पांडुरंग हा वेदप्रणीत असल्याचे अनेकदा सांगितले जाते वेदानी याची स्तुती गाइलेली असते हा श्रीहरी म्हणजे प्रत्यक्ष ॐकारस्वरूप होय असे या अभंगात म्हटले आहे ॐ हे वर्णमालेतील अक्षर ब्रह्माचे प्रतीक मानले जाते ॐकाराची उपासना म्हणजेच सर्व चराचर विश्वास भरून राहिलेल्या ब्रह्मतत्त्वाची उपासना होय. ' ॐ इत्येकाक्षरं ब्रह्म ' अशा शब्दात गीतेत या ॐकारस्वरूपी ब्रह्माचा उल्लेख केला आहे सृष्टीच्या आरंभी प्रथम ब्राह्मण वेद व यज्ञ हे उत्पन्न झाले असून ही सर्व निर्मिती ज्या ब्रह्मापासून झाली ते ॐकाररूपच मानले जाते ' ॐ तत्सत् ' हा संकल्पच सत्याचे मूळ होय हे तत्त्व जसे विश्वव्यापी आहे तसेच ते ' अणोरणीयान् ' म्हणजे अणूपेक्षा धाकटेही आहे, सूक्ष्मही आहे ज्ञानेश्वरानी याचे वर्णन ' जें गगनाहून जुनें । जें परमाणूहूनि सानें । जयाचेनि सन्निधानें । विश्व चळे ' अशा समर्पक शब्दात केले आहे ' हें एकाक्षर ब्रह्म । जो माझें स्वरूप परम ' असा या ॐकाराशी ब्रह्माचा संबंध आहे

२०५५ तूं[1] श्रीयेचा पति । माझी बहु हीन[2] याती ॥ १ ॥
दोघे असों एके ठायीं । माझा माथा तुझे पायीं ॥ २ ॥
माझ्या[3] दीनपणां पार । नाहीं बहु तूं उदार ॥ ३ ॥
तुका म्हणे पांडुरंगा । मी ओहोळ तूं गंगा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:– श्रीयेचा–लक्ष्मीचे.

अर्थ :– देवा, तुम्ही लक्ष्मीचे पती आहात आणि मी तर फारच हीन जातीचा आहे. १ परंतु दोघे आपण एकाच ठिकाणी असू. माझे मस्तक तुमच्या पायांवर असावे २ माझ्या दीनपणास अंत नसला तरी तू मात्र फार उदार आहेस. ३ तुकाराम महाराज म्हणतात, पांडुरंगा, मी एक साधा ओहोळ असून तू गंगा आहेस. ४

२०५६ मी याचक तूं दाता । काय सत्य पाहों आतां ॥ १ ॥
म्या तों पसरिला हात । करीं आपुलें उचित ॥ २ ॥
आम्ही घ्यावें नाम । तुम्हां समाधान काम ॥ ३ ॥
तुका म्हणे देवराजा । वाद खंडीं तुझा माझा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– खंडी–नाहीसा कर.

अर्थ :– देवा, मी याचक असून तू दाता आहेस. आता यातील खरे काय ते पाहूच. १ मी याचक म्हणून तुझ्यापाशी हात पसरला आहेच; आता उचित असे दान देण्याचे काम तू करावेस. २ आम्ही देवा, तुमचे नाम घ्यावे आणि तुम्ही आमच्या मनाचे कृपा करून समाधान करावे हे बरे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवराजा, तुम्ही आपले काम करून तुमचामाझा वाद खंडन करून टाका, नाहीसा करा ४

२०५७ तुझे पोटीं वाव[4] । व्हावा ऐसा माझा भाव ॥ १ ॥
करीं वासनेसारिखें । प्राण फुटे येणें दुःखें ॥ २ ॥
अहंकार खोटे । वाटे श्वापदांचे थाटे ॥ ३ ॥
तुका म्हणे आई । हातीं धरूनि संग देई ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– वाव–आश्रय, थाटे–समुदाय

अर्थ :– देवा, तुझ्या पोटात मला आश्रय मिळावा असी माझ्या मनाची भावना आहे. १ माझ्या या वासनेप्रमाणे तू दान द्यावेस कारण तुझ्या वियोगदुःखामुळे माझे प्राण फुटू पाहात आहेत २ या संसाराच्या वाटेने अहंकारादी श्वापदांचे समुदाय ठिकठिकाणी आहेत ३ तुकाराम महाराज म्हणतात, आई विठाई, तू मला हाती धरून स्वतःची संगती दे ४

२०५८ दारीं परोवरी । कुडीं[5] कवाडीं मी घरीं ॥ १ ॥
तुमच्या लागलो पोषणा । अवघे ठायीं नारायणा ॥ २ ॥
नेदीं खाऊं जेवूं । हातींतोंडींचे ही घेऊं ॥ ३ ॥
तुका म्हणे अंगीं । जडलो ठायींचा सलगी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – परोवरीं–परवरी, माजघरात. कुडीं–कुटी, झोपडी, कवाडीं–दारात

१ तुम्ही तरी हो श्रीपति. २ दीन, ३ माझा दीनपणा फार, ४ ठाव, ५ कुटि.

अर्थ :– दारात, माजघरात अथवा झोपडीत, झोपडीच्या दारात जेथे तुम्ही आहात तेथे मीं आहेच १ नारायणा, सर्व ठिकाणी माझ्या पोषणाचे काम तुमचेकडेच आहे २ तुला आम्ही खाऊ वा जेऊ देणार नाही तुझ्या हातीतोंडीचेही आम्ही घेऊ ३ तुकाराम महाराज म्हणतात, मूळच्या सलगीनेच मी तुमच्या अंगास येऊन जडलो आहे ४

२०५९ मज कोणी काहीं करी । उमटे तुमचे अंतरीं ॥ १ ॥
ध्याला वाढविले म्हूण । मज सुख तुज सीण ॥ २ ॥
माझें पोट धाले । तुझे अंगीं उमटलें ॥ ३ ॥
तुका म्हणे खेळें । तेथें[1] तुमचियां बळें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा — व्याला-जन्म दिलात धाले-संतुष्ट झाले

अर्थ – देवा, मला जर कुणी काही बरेवाईट केले तर त्याचा ठसा तुमच्या अंतःकरणावर उमटतो. १ तुम्ही मला जन्म दिलात, वाढविलेत, म्हणूनच मला मोठे सुख झाले तुम्हांस मात्र शीण झाला २ माझे पोट भरल्यामुळे मी संतुष्ट झालो यामुळे तुमच्या चित्तातही तो आनंद उमटला ३ तुकाराम महाराज म्हणतात, जेथे तेथे मी तुमच्याच प्रेमबळावर खेळत असतो ४

२०६० जोडोनिया कर । उभा राहिलो समोर ॥ १ ॥
हेंचि माझें भांडवल । जाणे कारण विठ्ठल ॥ २ ॥
भाकितो करुणा । आतां नुपेक्षावे दीना ॥ ३ ॥
तुका म्हणे डोई । ठेवीं वेळोवेळां पायीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – नुपेक्षावे-उपेक्षा करू नये

अर्थ – मी दोनही हात जोडून देवाच्या समोर उभा राहिलो आहे १ हेच माझे भांडवल आहे याचे कारण या विठ्ठलास माहीत आहे २ मी आता करुणा भाकत आहे माझी उपेक्षा यापुढे करू नये ३ तुकाराम महाराज म्हणतात मी वेळोवेळी तुमच्या पायांवर डोके ठेवीत आहे ४

२०६१ आम्ही घ्यावें तुझें नाम । तुम्ही आम्हां[2] द्यावें प्रेम ॥ १ ॥
ऐसे निवडिले मुळीं । संतीं बैसोनि सकळीं ॥ २ ॥
माझी डोई पायावरी । तुम्ही न धरावी दुरी ॥ ३ ॥
तुका म्हणे केला । खंड दोघांचा विठ्ठला ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – खंड-करार

अर्थ – देवा, आम्ही तुमचे नाम घ्यावे व तुम्ही आम्हाला प्रेम द्यावे १ असाच निवाडा सर्व संतांनी एकत्र बसून पूर्वीच केला आहे २ मी माझे डोके तुमच्या पायावर ठेविले आहे ते आता तुम्ही दूर करू नये ३ तुकाराम महाराज म्हणतात, विठ्ठला, असाच करार तुमच्याआमच्यांत झाला आहे ४

२०६२ वारिलें लिगाड । बहुदिसांचें हें जाड ॥ १ ॥
न बोलावे ऐसें केलें । कांहीं वाउगें तितुकें ॥ २ ॥
जाला चौघाचार । गेला खंडोनि वेव्हार ॥ ३ ॥
तुका म्हणे देवा । करीन ते घ्यावी सेवा ॥ ४ ॥

[1] येथें, [2] अम्हा

शब्दार्थ व टीपा:~ वारिलें-दूर केले. लिगाड-लचांड. जाड-जड.

अर्थ :- पुष्कळ दिवसांचे सेवेचे हे लचांड मी आता दूर केले. १ देवा, आम्ही आता आणीक काही बोलू नये असे तुम्ही केले आहे. २ चारचौघांत निवाडा होऊन तुमच्याआमच्यातील मतभेद संपून गेला. ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, मी तुमची जी सेवा करीन ती तुम्ही मान्य करून घ्यावी. ४

२०६३ पायरवे अन्न । मग करी क्षीवक्षीण[१] ॥ १ ॥
ऐसे होती घातपात । लाभे विण संगे चीत ॥ २ ॥
जन्माची जोडी । वाताहात एके घडी ॥ ३ ॥
तुका म्हणे शंका । हित आड या लौकिका ॥ ४ ॥

किती येरझारा । मागें घातलिया घरा ॥ ३ ॥
मासें मज नारायणा । देतां कां रे नये मना ॥ ४ ॥
भांडावे ते किती । बहु सोसिली फजिती ॥ ५ ॥
तुका म्हणे नाहीं । लाज तुझे अंगीं कांहीं ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – सदी-संधी

अर्थ – देवा आम्ही भिकारी तुझ्या दारी धरणे धरून तुला कोंडण्यासाठी बसलो आहोत १ आता आम्ही तुला कुठेही हालचाल करू देणार नाही आम्हांला ही चांगली संधी आता मिळाली आहे २ यापूर्वी तुझ्या दारात आम्ही किती तरी हेलपाटे घातले आहेत ३ नारायणा, माझे मलाच देताना तुझ्या मनास एवढा संकोच का रे ? ४ तुझ्याशी आम्ही आता भांडावे तरी किती रे ? आजपर्यंत या कामी पुष्कळ फजिती सोसली ५ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, आता तुझ्या ठिकाणी थोडी सुद्धा लाज उरलेली नाही ६

२०६७ जालों द्वारपाळ । तुझें राखिलें सकळ ॥ १ ॥
नाहीं लागो दिले अंगा । आड ठाकलो मी जगा ॥ २ ॥
करूनिया नीती । दिल्याप्रमाणे चालती ॥ ३ ॥
हातीं दंड काठी । उभा जिवाचिये साटी ॥ ४ ॥
बळ बुद्धी युक्ती । तुज दिल्या सर्व शक्ती ॥ ५ ॥
तुका म्हणे खरा । आतां घेईन मुशारा ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – मुशारा–वेतन

अर्थ – देवा, मी तुझा द्वाररक्षक होऊन तुझे सर्व काही सांभाळले १ तुमच्या व जगाच्या मध्ये मी उभा राहून तुम्हास कसलाही धक्का लागू दिला नाही २ ज्याप्रमाणे नीतिनियम करून दिले आहेत त्याप्रमाणेच जग चालत आहे ३ हातामध्ये दंड अथवा काठी धरून, तुम्हास जीव समर्पण करून मी रक्षणार्थ उभा आहे ४ देवा आम्ही आमचे बळ, बुद्धी युक्ती या सर्व शक्ती तुलाच अर्पण केल्या आहेत ५ तुकाराम महाराज म्हणतात या सेवेबद्दलचे आता खरे वेतन मी तुमच्या जवळून घेईन ६

२०६८ फळाची तो पोटीं । घडे वियोगें ही भेटी ॥ १ ॥
करावे चिंतन । सार तेंचि आठवण ॥ २ ॥
चित्त चित्ता ग्वाही । उपचारें चाड नाहीं ॥ ३ ॥
तुका म्हणे देवा । पावे अंतरींची सेवा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – चाड–गरज

अर्थ – तुमच्या वियोगातही भेटीच्या योगाचे फळ मिळत आहे १ ते असे की तुमचे चिंतनच सतत करावे तुमची आठवणच सारभूत आहे २ एकाच्या चित्ताला दुसऱ्याच्या चित्ताची ग्वाही उपयोगी पडते त्या ठिकाणी इतर उपचाराची काही आवश्यकता उरत नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, अंतःकरणापासून केलेली सेवाच देवाला पावते ४

२०६९ दुर्बळाचे कोण । ऐके घालूनिया मन ।
राहिलें कारण । तयावाचूनि काय तें ॥ १ ॥

कळों आले अनुभवे। पांडुरंगा माझ्या जीवे।
न[1] संगतां ठावे। पडे चर्या देखोनि ॥ २ ॥
काम क्रोध माझा देहीं। भेदाभेद गेले नाहीं।
होतें तेथें कांहीं। तुज कृपा करितां ॥ ३ ॥
हे तों नव्हे उचित। नुपेक्षावे शरणागत।
तुका म्हणे रीत। तुमची आम्हां न कळे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा - कारण–कार्य

अर्थ – दुर्बळाची हकीगत लक्ष देऊन कोण ऐकणार ? त्याच्यावाचून कुणाचे काय कार्य अडणार ? १ पांडुरंगा, हे असे मला माझ्या अनुभवामुळेच समजले तुम्ही जरी मला सांगितले नाही तरी तुमची चर्या पाहूनच मला सर्व काही समजले २ माझ्या अतःकरणातील कामक्रोधादी विकार व भेदाभेद भाव अजून गेले नाहीत अशा स्थितीत तुझी कृपा झाली तरी काय होणार ? ३ देवा, हे तुमचे करणे उचित नाही शरण आलेल्याची अशी उपेक्षा कधी करू नये तुकाराम महाराज म्हणतात या बाबतीत तुमची रीत काय आहे, हे मात्र आम्हांस समजत नाही ४

२०७० आम्ही भाव जाणो देवा। न कळती तुझिया मावा।
गणिकेचा[2] कुढावा। पतना न्यावा दशरथ ॥ १ ॥
तरी म्या काय गा करावे। कोण्या रीती तुज पावे।
न सगतां ठावे। तुम्हाविण न पडे ॥ २ ॥
दोनी फाकलिया वाटा। गोवी केली[3] घटापटा।
नव्हे धीर फाटा। आड राने भरती ॥ ३ ॥
तुका म्हणे माझे डोळे। तुझे देखती हे चाळे।
आता येणे वेळे। चरण जीवे न सोडी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – मावा–माया, कुढावा–कुडावा, रक्षण, गोवी–गुंता, घटापटा–घटाकाश, पटतत्‌ इत्यादी व्यर्थ बडबड

अर्थ – देवा, तुझी माया काही समजत नाही हा भाव मात्र आम्ही जाणतो गणिकेने शेवटी तुझे नाव घेतले, त्या वेळी तू तिचे रक्षण केलेस दशरथाने पुत्रस्नेहाने रामराम म्हटले तेव्हा तुम्ही त्याला पतनाला नेले १ असे आहे तर मग आम्ही आता काय करावे ? कोणत्या मार्गाने तुला आम्ही पावावे ? हे तुम्ही सांगितले नाही तर आम्हांस समजणारच नाही २ पापपुण्याच्या, स्वर्गनरकाच्या या दोन वाटा पडलेल्या आहेत घटाकाश व पटतत्‌ यासारख्या शब्दांच्या जंजाळाने विचारांचा गुंताच झालेला आहे यामुळे लोकांना धीर न वाटता ते आडरानातच शिरतात ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा प्रकारच्या तुझ्या चेष्टा माझे डोळे पाहतात, आता या वेळेस मात्र जीव गेला तरी मी तुझे पाय सोडणार नाही ४

२०७१ वेरझारीं जाला सीण। बहु केले खेदक्षीण[4]।
भाडणासी दिन। आजी येथें फावला ॥ १ ॥
आता काय भीड भार। धरूनिया लोकाचार।
बुडवूनि वेव्हार। सरोबरी करावी ॥ २ ॥

१ नमता हें ठावे २ गणिकेचा करिशी कुडावा, ३ केला, ४ क्षीदक्षीण

आले बहुताच्या मना । का रे न होसी शाहाणा ।
मुळींच्या वचना । आम्ही जागों आपुल्या ॥ ३ ॥
तुका म्हणे चौघामधीं । तुज नेले होतें आधीं ।
आता नाहीं[1] मधीं । उरी काहीं राहिली ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – खेदक्षीण-खेद, दुःख, कष्ट, सरोबरी-बरोबरी उरी-शेवट

अर्थ – देवा, तुझ्या घरी हेलपाटे घालण्यातच मला फार शीण झाला फार कष्ट झाले पण आता तुझी-माझी गाठ पडली असल्यामुळे भांडण करण्यास दिवस सापडला आहे १ आता लोकाचाराची भीड धरून काय करायचे ? आता तुझ्यामाझ्यातील व्यवहार मपवून तुझ्याशी बरोबरी करावी असे वाटते २ असे हे प्रकार पुष्कळांच्या ध्यानात आले असूनही तू अजून शहाणा का होत नाहीस ? तुमचेआमचे जे मूळचे वचन आहे ते धरून आम्ही सावध आहोत ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा पूर्वी तुला चारचौघात नेऊन ठराव केला होता आता त्यासबंधी काही शेवट उरलेला नाही ४

२०७२ कल्पतरूखालीं । फळें येती मागीतलीं ॥ १ ॥
तेथें बैसल्याचा भाव । विचारूनि बोले ठाव ॥ २ ॥
द्यावे ते उत्तर । येतो प्रतित्याचा[2] फेर ॥ ३ ॥
तुका म्हणे मनीं । आपुल्याच लाभहानि ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – विचारूनि-विचार करून ठाव-योग्य असे, प्रतित्याचा-अनुभवाचा

अर्थ – कल्पतरूच्या खाली बसल्यावर जी जी इच्छा आपण करू, ती ती फळे आपणास मिळतील १ मात्र तेथे बसल्यावर हा कल्पतरू आहे असे जाणून, विचार करून जे योग्य आहे तेच बोलावे २ जसे तुमचे उत्तर जाईल त्याप्रमाणे अनुभवाचा लाभ तुम्हास येईल ३ तुकाराम महाराज म्हणतात, लाभ अथवा हानी या गोष्टी आपल्या मनातील इच्छेप्रमाणे होतात ४

२०७३ रगले या रगें पालट न धरी । खेवले अतरी पालटेना ॥ १ ॥
सावळें निखळ कृष्णनाम ठसे । अगसगें कैसे शोभा देती ॥ २ ॥
पवित्र जाले तें न लिंपे विटाळा । नेदी बैसो मळा[3] आडवरी ॥ ३ ॥
तुका म्हणे काळें काळें केले तोंड । प्रकाश अभड देखोनिया ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – खेवले–मिसळ स्थिरावले, अभड-पुष्कळ प्रखर

अर्थ – एकदा प्रभुप्रमाने अतःकरण रगले म्हणजे ते काही पालटत नाही प्रभूचे ध्यान एकदा अतःकरणात मिसले की मग त्यात पालट होत नाही १ शुद्ध, सावळे कृष्णनाम अतःकरणावर ठसले असल्यामुळे अगाला कशी शोभा आलेली आहे २ जे पवित्र झाले ते कधीही विटाळाने लिप्त जात नाही, की कधी कुठलाही मळ स्वतःवर बसू देत नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात प्रभुप्रेमाचा हा प्रखर प्रकाश पाहून काळाने तोंड काळे केले आहे ४

२०७४ जगा काळ खाय । आम्ही मारा दिले पाय ॥ १ ॥
नाचो तेथें उभा राहे । जाता व्यग[4] करी साहे ॥ २ ॥
हरिच्या गुणे धाला । होता खातचि भुकेला ॥ ३ ॥
तुका म्हणे हळु । जाला करत शीतळु ॥ ४ ॥

---

१ आता नामधी, २ प्रीतीचा चि, ३ मला, ४ वग

शब्दार्थ व टीपा – उणे-कमी, त्रुटी, धाला—तृप्त झाला.

अर्थ – सर्व जगाचा ग्रास करणारा जो काळ त्याच्या मस्तकावर आम्ही पाय दिलेला असतो १ आम्ही प्रभुकीर्तनात जेथे नाचत असतो तेथे हा काळ उभा राहातो आणि काही उणे झाल्यास मदत करतो २ सर्व विश्वाचा ग्रास करून भुकेलेलाच असणारा हा काळ श्रीहरीचे गुणकीर्तन ऐकून तृप्त झाला ३ तुकाराम महाराज म्हणतात, प्रखर असणारा हा काळ आमच्यासाठी हळूहळू मऊ झाला आहे ४

२०७५ ब्रह्मरस घेई काढा । जेणे' पीडा वारेल ॥ १ ॥
पथ्य नाम विठोबाचे । अणीक वाचे न सेवीं ॥ २ ॥
भवरोगाऐसे जाय । आणीक काय क्षुल्लके ॥ ३ ॥
तुका म्हणे नव्हे बाधा । अणीक कदा भूताची ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – वारेल-निवारेल, दूर होईल

अर्थ – अरे माणसा, तू ब्रह्मरसाचा काढा घे ना त्यामुळे तुझी सर्व पीडा दूर होईल १ त्याला पथ्य फक्त विठोबाचे नाम वाचेने घेणे हेच आहे याखेरीज या वाणीने आणखी काहीही उच्चारू नये २ यामुळे भवरोगासारखी व्याधीही दूर होते, तेथे इतर किरकोळ रोगाची काय कथा ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, तुला यामुळे इतर भूताचीही बाधा कधीच होणार नाही ४

२०७६ अगें अनु जाला मज । संतरजचरणाचा ॥ १ ॥
सुखी जालों या सेवनें । दुःख नेणे यावरी ॥ २ ॥
निर्माल्याचे तुळसीदळ । विष्णुजळ चरणींचें ॥ ३ ॥
तुका म्हणे भावसार । करुनि फार मिश्रित ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – अगें-स्वतःला

२०७८ करितां कोणाचें ही काज । नाहीं लाज देवासी ॥ १ ॥
बरें करावें हें काम । धरिलें नाम दीनबंधु ॥ २ ॥
करुनि अराणूक पाहे । भलत्या साह्य व्हावया ॥ ३ ॥
बोले तैसी करणी करी । तुका म्हणे एक हरि ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा.– काज–कार्य, काम, अराणूक–सुख, समाधान.

अर्थ .– आपल्याही भक्ताचे काम करताना या देवास कसलीच लाज वाटत नाही. १ दीनदु:खितांचे भले करावे हेच त्याचे काम असते. कारण त्याने स्वत:चे नावच दीनबंधू असे धारण केले आहे. २ तो सर्वांची चौकशी करून सर्वांना समाधान देतो. पाहिजे त्याला मदत करतो. ३ तुकाराम महाराज म्हणतात, बोलल्याप्रमाणे वागणारा हा एक श्रीहरीच आहे. ४

२०७९ उभें चंद्रभागे तीरीं । कट धरोनियां करीं ।
पाउलें गोजिरीं । विटेवरी शोभलीं ॥ १ ॥
त्याचा छंद माझ्या जीवा । काया वाचा मनें हेवा ।
संचिताचा ठेवा । जोडी हातीं लागली ॥ २ ॥
रूप डोळियां आवडे । कीर्ति श्रवणीं पवाडे ।
मस्तक नावडे । उठों[1] पायांवरोनि ॥ ३ ॥
तुका म्हणे नाम । ज्याचें नासी क्रोध काम ।
हरी भवश्रम । उच्चारितां वाचेसी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा .– कट–कस, कंबर, हेवा–हाव.

अर्थ :– या श्रीहरीचे रूप चंद्रभागेच्या तीरावर कंबरेवर हात धरून उभे आहे. याची गोजिरवाणी पावले विटेवर मोठी शोभून दिसत आहेत. १ माझ्या जीवाला याचाच छंद कायावाचामने करून लागलेला आहे, त्याचीच हाव माझ्या मनास आहे प्रारब्धानेच मला हा ठेवा माझ्या हाती लागला आहे. २ याचे रूप माझ्या डोळ्यांना फारच आवडते. याची कीर्ती, वर्णन केलेले पवाडे ऐकायला फार आवडतात याच्या पायांवरील मस्तक वर उचलावे असे वाटतच नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, ज्याच्या नामामुळे कामक्रोध हे विकार नाहीसे होतात व तेच वाणीनें उच्चारताच संसारश्रमाचाही नाश होतो. ४

२०८० आम्हां हेंचि भांडवल । म्हणो विठ्ठल विठ्ठल ॥ १ ॥
सुखें तरों भवनदी । संगें वैष्णवांची मांदी ॥ २ ॥
वाखराचें वाण । सांडूं हें जेवूं जेवण ॥ ३ ॥
न लगे वारंवार । तुका म्हणे येरझार ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा .– मांदी–मेळावा, समुदाय, वाखराचे–एक लोखंडी पदार्थ, येथे निषिद्ध वस्तू.

अर्थ:–आम्ही सुखाने विठ्ठल विठ्ठल म्हणत राहू. हेच आमचे खरे भांडवल होय १ या भांडवलाच्या जोरावर आम्ही वैष्णवांच्या समुदायासहित भवनदी सुखाने तरून जाऊ. २ या खेरीज असणाऱ्या निषिद्ध वस्तूंचे जेवण न करता या विठ्ठलनामाचेच जेवण आम्ही जेऊ ३ तुकाराम महाराज म्हणतात, यामुळे जन्ममृत्यूच्या येरझाऱ्या पुन: पुन: घालाव्या लागणार नाहीत ४

[1] नुठों.

२०८१　आता माझ्या भावा । अंतराय नको देवा ॥ १ ॥
आले भागा तें करितो । तुझें नाम उच्चारितो ॥ २ ॥
दृढ माझें मन । येथें राखावें बांधोन ॥ ३ ॥
तुका म्हणे वाटे । नको फुटो देऊं फांटे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – भागा-वाटयास

अर्थ – देवा, माझा तुजविषयी जो भाव आहे त्यात आता अंतर पडू देऊ नकोस १ माझ्या वाटयास तुझ्या नामाचे चिंतन करणे आले आहे ते मी करतो. २ याच ठिकाणी माझे मन दृढ राहील असे करा ३ तुकाराम महाराज म्हणतात, आता या मार्गात उगाच फाटे फुटू देऊ नका ४

२०८२　काय देवापाशीं उणें । हिंडे दारोदारीं सुनें ॥ १ ॥
करी अक्षराची आटी । एके कवडीच सांटीं ॥ २ ॥
निंदी कोणा स्तवी । चिंतातुर सदा जीवीं ॥ ३ ॥
तुका म्हणे भांड । जळो जळो त्याचें तोंड ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – सुनें-कुत्र्याप्रमाणे, आटी-आटाआट, खटाटोप, प्रयत्न, भांड-मूर्ख

अर्थ – खरे पाहाता देवापाशी काय कमी आहे ? उगाच कुत्र्याप्रमाणे दारोदार हिंडण्यात काय अर्थ आहे ? १ एखाद्या कवडीसाठी उगाच अक्षराचा, पाठांतराचा खटाटोप करण्यात काय अर्थ ? २ लाभासाठी *एखाद्याची स्तुती करायची, तर कुणाची निंदा करायची व आपण मात्र सदोदित चिंतातुर असावे, अशीच काहींची* अवस्था असते ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा या मूर्खाचे तोंड जळून जावो ४

२०८३　मागणें तें मागों देवा । करूं भक्ती त्याची सेवा ॥ १ ॥
काय उणें तयापाशीं । रिद्धिसिद्धी ज्याच्या दासी ॥ २ ॥
कायावाचामन । करूं देवा हें अर्पण ॥ ३ ॥
तुका म्हणे विश्वंभर । ज्याच्यानें हें चराचर ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – चराचर-सजीवनिर्जीव, सचलन-अचलन

अर्थ – जे काही आम्हास मागणे मागायचे ते आम्ही देवापाशी त्याची सेवा व भक्ती करून मागू १ त्याच्या जवळ काय कमी आहे ? रिद्धीसिद्धी तर त्याच्या दासीच आहेत २ अशा या देवाला आम्ही आमचे कायावाचा-मन अर्पण करू ३ तुकाराम महाराज म्हणतात, *अशा या विश्वंभरामुळे विश्वाला भरून राहिलेल्या देवामुळेच सर्व* सजीवनिर्जीव जगात नटले आहे ४

२०८४　चित्तीं नाहीं आस । त्याचा पांडुरंग दास ॥ १ ॥
असे भक्ताचिये घरीं । काम न सांगतां करी ॥ २ ॥
अनाथांचा बंधु । असे अंगीं हा संबंधु ॥ ३ ॥
तुका म्हणे भावें । देवा सत्ता राबवावें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – आस-इच्छा

अर्थ – ज्याच्या चित्तात कसलीही आशा उरलेली नसते त्याचा पांडुरंग हा दास असतो १ असा हा ईश्वर आपल्या भक्ताच्या घरी न सांगता काम करीत असतो २ कारण अनाथांचा बंधू असा हा त्याचा संबंध सर्वांशी असतो ३ तुकाराम महाराज म्हणतात भावबळाच्या सत्तेने देवास असे आपलेसे करून राबवावे ४

२०८५ कर्कशसंगति । दुःख उदंड फजिती ॥ १ ॥
नाहीं इह ना परलोक । मजुर दिसे[1] जैसें रंक ॥ २ ॥
वचन सेटावरी । त्याचे ठेवूनि धिक्कारी ॥ ३ ॥
तुका म्हणे पायीं बेडी । पडिली कपाळी कुऱ्हाडी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – कर्कशसंगति–भांडखोर स्त्रीची संगत इह–या लोकीच, रंक गरीब दरिद्री सेटावरी–क्षुल्लक कस्पटाप्रमाण

अर्थ – कर्कश वृत्तीची अथवा भांडखोर स्वभावाची बायको मिळाली की नवऱ्याची उदंड फजिती होत असते एकसारखे दुःखच त्याला सहन करावे लागते १ तिच्या संगतीत त्याला या लोकी सुख कधी मिळत नाही, व परलोकातही कधी मिळण शक्य नसते एखाद्या गरीब मजुराप्रमाणे त्याची अवस्था बनलेली असते २ अशी ही स्त्री नवऱ्याचे वचन क्षुल्लक मानून त्याचा पुनः पुनः धिक्कार करते ३ तुकाराम महाराज म्हणतात अशी स्त्री म्हणजे पायात पडलेली भली मोठी बेडीच होय किंवा कपाळावर पडलेली कुऱ्हाडच तिला समजावे ४

२०८६ बीज पेरे[2] सेतीं । मग गाडेवरी वाहाती ॥ १ ॥
वाया गेले ऐसें दिसे । लाभ त्याचे अंगीं वसे ॥ २ ॥
पाल्याची जतन । तरि प्रातीं येती कण ॥ ३ ॥
तुका म्हणे आळा । उदक देतां लाभे फळा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा — सेतीं–शतात प्रातीं यती–प्रत्ययास येती असे असावे आळा–आळे उदक–पाणी

अर्थ – शेतात थोडसे जरी बीज पेरले तरी गाड्या भरभरून ते घरी नेता येते १ जमिनीत बीज टाकल्या बरोबर ते वाया गेलेसे दिसते पण तसे करण्यातच लाभ असतो २ पेरल्यानतर उगवलेल्या पिकाच्या पाल्याचे जतन केले तरच भरपूर धान्यकणांचा लाभ होतो ३ तुकाराम महाराज म्हणतात बीजाच्या झाडास चांगले आळ करून पाणी दिले तरच चागले फळ हाती यईल ४

२०८७ जाणावें तें सार । नाहीं तरी वगा फार ॥ १ ॥
डोळे झांकिलिया रवि । नाहीं ऐसा होय जेवीं[3] ॥ २ ॥
बहुथोड्या आड । निवारितां लाभें जाड ॥ ३ ॥
तुका म्हणे खरें । नेलें हातींचें अंधारें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – रवि–सूर्य, जवीं–ज्याप्रमाणे

अर्थ – मुख्य सारभूत तत्त्व काय आहे ते जाणावे नाही तर फार मोठा वगा होत राहातो १ डोळे जर झाकले तर उगवलेल्या सूर्याच्या प्रकाशाचा काय उपयोग ? तो असून नसून ज्याप्रमाणे सारखाच होय २ त्याप्रमाणे अज्ञानाचे थोडे पडळ डोळ्यावर आले आहे ते दूर केले की मोठाच लाभ होईल ३ तुकाराम महाराज म्हणतात अज्ञानाच्या अंधारामुळे हाती असलेले सत्यज्ञानाचे खरे रूप दुरावल्यासारखे होते ४

२०८८ मुळीं नेणपण । जाला तरी अभिमान ॥ १ ॥
वाया जावें हेंचि खरें । केलें तेणेंचि प्रकारें ॥ २ ॥
अराणूक नाहीं कधीं । जाली तरि भवबुद्धि ॥ ३ ॥
असरली नाव । तुका म्हणे नाहीं ठाव ॥ ४ ॥

१ जालें २ परी ३ जीवी

शब्दार्थ व टीपा – नेणपण-अज्ञान, अराणूक–विश्रांती, युग, अंतरली-चुकली.

अर्थ – माझा देह हेच सर्वस्व असा अभिमान झाला हेच मुळी अज्ञान आहे १ अशा या प्रकाराने लोक वाया जातात हेच खरे २ अशी भेदबुद्धी झाली की मग कधी जीवांना विश्रांतीच मिळणार नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, भवसागर तरुन नेणारी नावच चुकली की मग पैलतीरावरील आश्रयाचा लाभ होणार नाही. ४

२०८९ संवसारसांते आले हो आइका । तुटीचें तें नका केणें मरूं ॥ १ ॥
लाभाचा हा काळ अवघे विचारा । पारखी ते करा साह्य येथें ॥ २ ॥
शृंगारिलें दिसे न कळे अंतर । गोविला[1] पदर उगवेना ॥ ३ ॥
तुका म्हणे खोटें गुंपतां विसारें । हातिचिया खरें हातीं घ्यावें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – संवसारसांते-समाराच्या बाजारात, केणें–माल, विचारा–विचार करा, गोविला–दडलेला, उगवेना–सापडत नाही, ध्यानात येत नाही, गुंपता–गुतून राहिल्यास

अर्थ – या संसाराच्या बाजारात आलेल्या लोकांनो, नीट ऐका ज्यामुळे तुमचे नुकसान होईल असा खोटा माल तुम्ही येथे खरेदी करु नका. १ हा तुमच्या फायद्याचा काळ आहे याचा तुम्ही सर्वजण नीट विचार करा. जे कुणी मालाची पारख करणारे असतील त्याचे साह्य घ्या तुम्ही. २ काही माल वरुन चांगला शृंगारलेला दिसतो; पण त्याचे अंतरंग काही समजून येत नाही दडून राहिलेला फसवा पदर काही त्याच्या ध्यानात येत नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, पुढील मालाच्या भरवशावर विसार देऊन गुंतून राहिल्यास तो व्यवहार खोटा होईल. मालाची चांगली परीक्षा करुन हातोहात किंमत व माल देऊन घेऊन रोखीचा व्यवहार करावा हे चांगले. ४

२०९० सारावीं लिगाडें धरावा सुपंथ । जावें उसंतीत हळूहळू ॥ १ ॥
पुढें जातियाचे उमटले माग । भांबावलें जग आडरानें ॥ २ ॥
वेचल्याचा पाहे वरावरि झाडा । बळाचा निवडा पुढिलिया ॥ ३ ॥
तुका म्हणे जैसी दाखवावी वाणी । ते घ्यावी भरोनी शेवट तों ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – लिगाडें–लचाडे, सुपंथ–चागला मार्ग, उसतीत–उल्लघीत, आश्मीत, माग–मार्ग, वेचल्याचे–खर्च झाल्याचा, झाडा–हिशेब, वाणी–वाचा

अर्थ – ससारातील सर्व लचाड संपवून सन्मार्ग धरावा आणि तोच हळूहळू आश्मीत जावा १ पुढे जे सत्पुरुष चालून गेले आहेत त्यांच्या मार्गाने जावे परतु भांबावून गेलेले जग हे न जाणून आडरानात व्यर्थ शिरुन फसते. २ जे आपले आयुष्य खर्च होते त्याचा हिशेब वारवार करावा जो बलवान निधड्या छातीने पुढे जाईल त्याचा मागोवा घ्यावा किंवा जो सदा रोनीने पुढे जातो तो बलवान समजावा ३ तुकाराम महाराज म्हणतात, आपल्या वाचेने बोलून आपण जसे दाखवितो तसेच माप शेवटपर्यंत भरुन घावे हे चागले ४

२०९१ बुद्धिमंदा शिरीं । भार फजितो पदरीं ॥ १ ॥
जाय तेथें अपमान । पावे हानि थुंकी जन ॥ २ ॥
खरियाचा पाड । मागें लावावें लिगाड ॥ ३ ॥
तुका म्हणे करी । वर्म नेणे भरोवरी ॥ ४ ॥

---

[1] गोविवॉ.

शब्दार्थ व टीपा – पाड–किंमत, लिगाड–खोटे कृत्य, न्नाड बरोबरी–श्रम, खटाटोप

अर्थ – जो परमार्थाविषयी मतिमंद असतो त्याच्या डोक्यावर अज्ञानाचा फार मोठा भार असतो त्याच्या पदरी फजितीच येत असते १ तो जेथे जातो तेथें अपमान पावतो त्याची हानी होते, लोक त्याच्या तोंडावर थुंकत असतात २ तो खऱ्याची किंमत प्रथम वाढवतो पण मग नंतर खोट्याचे काही तरी लचांड निर्माण करतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा प्रकारे त्याचा खटाटोप एकसारखा चालू असतो, पण त्याला परमार्थाचे मर्म कधीच सापडलेले नसते ४

२०९२ पूर्वजांसी नर्का जाणे ते एक आइका ॥ १ ॥
निंदा करावी चाहाडी । मनीं धरूनि आवडी ॥ २ ॥
मात्रागमना ऐसी । जोडी पातकांची रासी ॥ ३ ॥
तुका म्हणे वाट । कुंभपाकाची ते नीट ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – कुंभपाक–एक प्रकारचा नर्क

अर्थ – लोकहो, तुमच्या पूर्वजांना नर्कास पाठवायचे असेल तर मग एक गोष्ट करा १ मनात मोठे प्रेम धरून दुसऱ्याची निंदा व चहाडी सतत करावी २ मात्रागमनासारखी पातकांची रास जोडावी ३ तुकाराम महा-राज म्हणतात, अशी ही वाट थेट कुंभपाक नावाच्या नर्काचीच आहे ४

२०९३ देहा लावी वात । पालव घाली जाली रात ॥ १ ॥
वेडी ते वेडी बहुतच[१] वेडी । चाखता गोडी चवी नेणे ॥ २ ॥
कडिये मूल भोंवतें भोंये । मोकलुनि रडे धाये ॥ ३ ॥
लेकरें वित्त पुसे जगा । माझा गोहो कोण तो सांगा ॥ ४ ॥
आपुली शुद्धि जया नाहीं । आणिकाची ते जाणे काई ॥ ५ ॥
तुका म्हणे ऐसे जन । नर्का जाता राखे कोण ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – देहा–दिवसा, पालव–पदर भोंवें–फिरते, वित्त–वीत, जन्म देऊन गोहो–नवरा

अर्थ – अशी ही स्त्री पाहा दिवसा दिवा लावून बसते आणि रात्र झाली की पदराने तो तो विसवून टाकते १ अशी ही स्त्री फारच वेडी म्हणावी, कारण तिला कुठल्याही पदार्थाची गोडी अथवा चव समजत नाही २ अशी स्त्री आपल्या लहान मुलास कडेवर घेते आणि मूल हरवले म्हणून स्वत भोवतीच फिरते व धाय मोकलून रडायला लागते ३ ही स्वत च्या मुलाना जन्म देते आणि लोकांना माझा नवरा कोणता तो सांगावा, असे विचा-रीत सुटते ४ जिला आपली स्वत चीच शुद्धी नाही ती दुसऱ्याचे काय जाणील ? ५ तुकाराम महाराज म्हणतात अशा प्रकारचे लोक नरकास जात असताना त्यांना कोण आडवू शकणार ? ६

२०९४ आवडीचे दान देतो नारायण । बाहे उभारोन राहिलासे ॥ १ ॥
जें जयासी रुचे तें करी समोर । सर्वज्ञ उदार मायबाप ॥ २ ॥
ठायीं पडिलिया तेंचि लागे खावें । ठायींचेचि घ्यावें विचारूनि ॥ ३ ॥
बीज पेरूनियां तेंचि घ्यावें फळ । डोरलीस केळ[२] कैंचे लागे ॥ ४ ॥
तुका म्हणे देवा कांहीं मोल नाहीं । तुम्हा तूंचि पाहीं शत्रु सखा ॥ ५ ॥

१ बहुत, २ केळें

शब्दार्थ व टीपा – वाहे–हात, विचारूनि–विचार करून.

अर्थः –ज्याला ज्याची आवड आहे तसें दान हा नारायण देत असतो, अशी इच्छा पूर्ण करणारा नारायण हात वर करून दानासाठी उभा आहे. १ अगा हा उदार व सर्व जाणणारा मायबाप ज्याला जे आवडेल ते समोर आणून ठेवितो. २ आपले प्रारब्ध जसे असेल त्याचप्रमाणे आपली आवड निर्माण होते व आपणांस खावे लागते, यासाठी प्रथमच नीट विचार करून वागावे. ३ जे बीज पेरावे तेच फळ आपणांस मिळेल. बोरलीच्या झाडाला केळी कशी येतील ? ४ तुकाराम महाराज म्हणतात, या संबंधी देवास काही बोल लावता येत नाही. तुमाच तू मित्र का शत्रू आहेस हे नीट पाहा. ५

२०९५ अडचणीचें वार । बाहेर माजी पैस फार ॥ १ ॥
काय करावें तें मौन्य । दाही दिशा हिंडे मन ॥ २ ॥
बाहेर[१] दावी वेश । माजी वासनेचे लेश ॥ ३ ॥
नाहीं इंद्रियां दमन । काय मांडिला दुकान ॥ ४ ॥
सारविलें निकें । वरि माजी अवघें फिकें ॥ ५ ॥
तुका म्हणे अंतीं । कांहीं न लगेचि हातीं ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपाः– अडचणीचे–लहान, माजी–आत, पैस-पुष्कळ जागा, ऐसपैस जागा, मौन्य–मुकेपणा. निकें–चांगले.

अर्थः– आतबाहेर चांगली ऐसपैस जागा ठेवून एखाद्याने घर बांधले; पण आत शिरण्याचे दार मात्र फार लहान ठेविले तर काय त्याचा उपयोग ? १ मन जर दहाही दिशांना चौफेर धावत असेल तर त्या मौनाचा तरी काय उपयोग ? २ बाहेरून परमार्थाचा आव आणणारा वेष आहे; पण आत मात्र वासनेचे लेश तसेच आहे. काय याचा उपयोग ? ३ बाहेर इंद्रियांचे दमन नीटपणे होत नाही आणि उगाच परमार्थाचे दुकान मांडून काय उपयोग ?४ वरून फार चांगले सारवून स्वच्छ केले तरी आतून सर्व मळके असेल तर काय उपयोग ? ५ तुकाराम महाराज म्हणतात, अशा मुळे शेवटी तुझ्या हातांत काहीच लागणार नाही. ६

२०९६ लय लक्षूनियां जालों म्हणती देव । तो ही नव्हे भाव सत्य जाणा ॥ १ ॥
जालों बहुश्रुत न लगे आतां कांहीं । नको राहूं ते हो निश्चितीनें ॥ २ ॥
तपें दानें काय मानिसी विश्वास । बीज फळ त्यास आहे पुढें ॥ ३ ॥
कर्म आचरण यातीचा स्वगुण । विशेष तो गुण काय तेथें ॥ ४ ॥
तुका म्हणे जरी होईल निष्काम । तरिच होय राम देखे डोळां ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा– लय–एकतानता, लक्षूनियां–पाहून.

अर्थ.– कधी तरी कशी तरी वृत्तीची एकतानता झाली की आपणच देव झालो असे जे समजतात त्यांचा भाव खरा नसतो असे समजावे १ आपण फार श्रवण केले, आपण आता बहुश्रुत झालो, आता काही करण्याची जरूरी नाही, अशाही निश्चितीने तू गप्प राहू नकोस. २ पुष्कळ तप केले, दान केले यांचाही विश्वास मानू नकोस. कारण त्यांचे फळ भोगण्यासाठी पुढे जन्म घ्यावाच लागणार आहे. ३ कर्माचे आचरण हा त्या जातीचा व वर्णाचा स्वभावधर्मच आहे. तो आचरल्याने विशेष असे काय साधले गेले ? ४ तुकाराम महाराज म्हणतात, लोक जर खरोखरीच निष्काम वृत्तीने काम करतील तरच त्यांच्या डोळ्यांना रामाचे दर्शन होऊन ते रामरूप होतील ५

[१] शरीर.

२०९७ पुरली धांव कडिये घेईं । पुढें पायीं न चलवीं ॥ १ ॥
कृपाळुवे पांडुरंगे । अगसंगे जिवलगे ॥ २ ॥
अवघी निवारावी भूक । अवघ्या दुःख जन्माचे ॥ ३ ॥
तुका म्हणे बोलवेना । लावीं स्तना ईश्वरे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – निवारावी–दूर करावीस

अर्थ – देवा, आता धावून धावून पाय दुखायला लागले आई, आता तू आम्हास कडेवर घे पुढे आता आमच्या पायानी आम्हास चालवत नाही १ कृपाळू पांडुरंगे, आई, तू आमच्या अगसगाने जिवलग झाली आहेस २ आमची सर्व भूक तू दूर करावीस सर्व जन्माचे दुःख तू दूर कर. ३ तुकाराम महाराज म्हणतात, आई, आता मला फारसे बोलवत नाही, तू चटकन मला आपल्या स्तनाला लाव व प्रेमपान्हा पाज ४

२०९८ जें जें मना वाटे गोड । तें तें कोड पुरविसी ॥ १ ॥
आता तूचि बाह्यांतरीं । अवघ्यापरी जालासी ॥ २ ॥
नाहीं सायासाचे काम । घेता नाम आवडी ॥ ३ ॥
तुका म्हणे सर्वसांगें[1] । पांडुरंगे दयाळे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – कोड–इच्छा, सायासाचे–कष्टाचे, श्रमाचे

अर्थ – माझ्या मनास जी जी गोड वाटते ती ती इच्छा देवा, तू पूर्ण करतोस १ आता तूच आतून व बाहेरून सर्वत्र एकच भरून राहिला आहेस २ तुझे नाम मोठ्या प्रेमाने घेताना इतर श्रमांची जरुरीच नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, दयाळे, पांडुरंगे आमचे सर्व यथासांग झाले आहे ४

२०९९ जेथें माझी दृष्टि जाय । तेथें पाय भावीन ॥ १ ॥
असेन या समाधानें । पूजा मनें करीन ॥ २ ॥
अवघाच अवघे देसी । सुखरासी संपन्न ॥ ३ ॥
तुका म्हणे बंधन नाहीं । ऐसें कांहीं तें करूं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – भावीन–भावना करीन, अनुभवीन

अर्थ – देवा, जथे जेथे माझी दृष्टी जाईल तेथे तेथे तुझेच पाय मी अनुभवीन १ त्याच समाधानाने मी तुझी पूजा मनाने करीन २ तू सवच्या सर्व काही देतोस तू सुखराशींनी संपन्न आहेस ३ तुकाराम महाराज म्हणतात, पुन ज्यामुळे ससारबधन उरणार नाही ते आम्ही करू ४

२१०० नातुडे जो कवणे परी । उभा केला विटेवरी ॥ १ ॥
भला भला पुंडलिका । मानलासी जनलोका ॥ २ ॥
कोण्या काळें सुखा । ऐसा कोण पावता ॥ ३ ॥
अवघा आणिला परिवार । गोपी गोपाळांचा भार ॥ ४ ॥
तुका म्हणे धन्य जाले । भूमी वैकुंठ आणिले ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – नातुडे–सापडत नाही, मानलासी–मान्य झालास

१ सव सगें

अर्थ – जो कुणालाही सापडत नाही असा देव पुंडलिकाने विटेवर उभा केला आहे १ पुंडलिका, तू फार चांगला भक्त आहेस रे ! कारण तुला या भव लोकांकडून मान्यता मिळालेली आहे २ नाही तर अशा या भक्ति-सुखाची प्राप्ती कोणत्या काळात अशा रीतीने कुणास झाली असती ? ३ गोपी, गोपाळ या सर्वांचा परिवार तू येथे आणलेला आहेस ४ तुकाराम महाराज म्हणतात, तू साक्षात वैकुंठ या भूमीवर आणून आम्हांस धन्य केले आहेस ५

२१०१ अवघे चुकविले सायास । तप रासी जीवा नास ॥ १ ॥
जीव देऊनिया बळी । अवघीं तारिलीं दुर्बळीं ।
केला भूमंडळीं । माजी थोर पवाडा ॥ २ ॥
काहीं न मगे याची गती । लुटवितो जगा हातीं ॥ ३ ॥
तुका म्हणे भक्तराजा । कोण वर्णी पार तुझा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – सायास–कष्ट, परिश्रम, नास–नाश नाश, पवाडा–कीर्ती

अर्थ – अनेक प्रकारची तपे करून जीवाला त्रास करून घ्यायचे कष्ट या वैष्णवांनी सर्व चुकविले १ त्यांनी श्रीहरीच्या चरणी आपल्या जीवाला बळी देऊन सर्व दुबळ जीवांना तारले आणि या भूमीवर कीर्ती गाण्याइतके थोर कर्तृत्व करून ठेविले २ कुणास काही मागायचे नाही हीच याची रीत असते सर्व जगाकडून मात्र हे श्रीहरीचे प्रेम लुटवितात ३ तुकाराम महाराज म्हणतात, भक्तराजा तुझा अपार महिमा कोण वर्णन करू शकणार ? ४

२१०२ प्रमाण हें त्याच्या बोला । देव भक्ताचा अंकिला ॥ १ ॥
न पुसता जाता नये । खालीं बैसता ही भिये ॥ २ ॥
अवघा त्याचा होत । जीव भावा ही सहित ॥ ३ ॥
वदे उपचाराची वाणी । काहीं माग म्हणऊनि ॥ ४ ॥
उदासीनाच्या लागें । तुका म्हणे धावे मागें ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा– अंकिला–स्वाधीन

अर्थ – हा देव आपल्या भक्तांच्या स्वाधीन इतका आहे की, त्याचा शब्द हच त्याला प्रमाण असते १ तो त्यांना विचारल्याखेरीज कुठे जात नाही, आणि विटेवर खाली बसण्यासही हा भितो २ सर्व जीवभावासहित हा त्यांच्याच ठिकाणी सर्व लक्ष वेधून अनन्य झाला आहे ३ तुम्ही काही तरी मागा हो अशी उपचाराची वाणी हा आपल्या भक्ताकडे उच्चारीत असतो ४ तुकाराम महाराज म्हणतात, जे कुणी उदासीन आहेत, त्यांच्या पाठीमागे हा धावत असतो ५

२१०३ काहीं न मागती देवा । त्याची करू धावे सेवा ॥ १ ॥
हळूहळू फेडी ऋण । होऊनिया[1] रूपें दीन ॥ २ ॥
होऊं न सके वेगळा । क्षण एक त्या निराळा ॥ ३ ॥
तुका म्हणे भक्तिभाव । हाच देवाचा ही देव ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – न सके–न शके, शकत नाही

अर्थ – जे कुणी या देवास काहीच मागत नाहीत त्यांची सेवा करण्यासाठी हा धावत असतो १ स्वतः दीनवाणे रूप घेऊन हा भक्ताचे ऋण हळूहळू फेडीत असतो २ त्यांच्याशिवाय एक क्षणही हा वेगळा राहू शकत नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, एकनिष्ठेचा भक्तिभाव हाच देवाचाही देव आहे ४

१ रूप धरोनिया दीना

२१०४ जाणे अंतरिचा भाव । तोचि करितो उपाय ॥ १ ॥
न लगे सांगावें मागावें । जीवें भावें अनुसरावें ।
अविनाश घ्यावें । फळ धीर धरोनि ॥ २ ॥
बाळा[1] न मागतां भोजन । माता घाली पाचारून ॥ ३ ॥
तुका म्हणे तरी । एकीं लंघियेले गिरी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- अविनाश-शाश्वतचे, पाचारून-बोलावून, लंघियेले-ओलांडले, गिरी-पर्वत.

अर्थ :- आपल्या भक्तांच्या मनातील भाव ओळखून हा ते पूर्ण करण्याचे उपाय करीत असतो. १ याला काही सांगावे लागत नाही, मागावे लागत नाही, जीवभावाने त्यास एकनिष्ठेने अनुसरावे आणि धीर धरून शाश्वतचे फळ घ्यावे. २ लहान बाळास स्वत. बोलावून त्याने न मागताच आई त्याला प्रेमाने भोजन देत असते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, या देवाच्या आश्रयाने कित्येकांनी पर्वतही ओलांडून दाखविले. ४

२१०५ आम्ही नाचों तेणें सुखें। वाऊं टाळी गातों मुखें ॥ १ ॥
देव कृपेचा कोंवळा । शरणागता पाळी लळा ॥ २ ॥
आम्हां जाला हा निर्धार । मागें तारिलें अपार ॥ ३ ॥
तुका म्हणे संतीं । वर्म दिले आम्हां हातीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:- वाऊं-वाजवू.

अर्थ:- या श्रीहरीच्या प्रेमसुखात आम्ही प्रेमाने नाचू, टाळी वाजवू, आणि मुखाने त्याचे नाम गाऊ. १ हा देव मोठ्या कोवळ्या हृदयाचा असल्याने कृपाळू आहे. शरणागतांचे हा प्रेमाने रक्षण करतो. २ याने पूर्वी अनेक जीवांना तारले; आम्हांसही तो तारील असा आमचा विश्वास आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, असे हे प्रेमाचे वर्म संतांनी आमच्या हातात दिले आहे. ४

२१०६ जालों निर्भर मानसीं । म्हणऊनि कळलासी ॥ १ ॥
तुझे म्हणविती त्यांस । भय चिंता नाहीं आस ॥ २ ॥
सुर्कविसी पाश । गर्भवासयातना ॥ ३ ॥
तुझें जाणोनियां वर्म । कंठीं धरियेलें नाम ॥ ४ ॥
तुका म्हणे तेणें सुखें । विसरलों जन्मदुःखें ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा.- निर्भर-निश्चित, निष्काळजी, आस-आशा.

अर्थ .- देवा, तू आम्हांस नीट कळलास म्हणून आम्ही मनातून निष्काळजी झालो. १ आम्ही देवा, तुझे आहोत, असे जे म्हणतात, त्यांना कसलीही भीती, चिंता अथवा आशा उरत नाही. २ त्याची सर्व प्रकारच्या पाशांतून व गर्भवासाच्या यातनांतून मुक्तता होते. ३ हा तुझ्या स्वभावाचा विशेष जाणून आम्ही आमच्या मुखात त्याचेच नाम सतत धारण केले आहे. ४ तुकाराम महाराज म्हणतात, या श्रीहरीच्या प्रेमसुखामुळे आम्ही जन्मदुःखही विसरलो. ५

२१०७ नको दुष्टसंग । पडे भजनामधीं भंग ॥ १ ॥
काय विचार देखिला । सांग माझा तो विठ्ठला ॥ २ ॥

---

[1] बाळ

तुज निषेधितां । मज न साहे सर्वथा ॥ ३ ॥
एका माझ्या जीवें । वाद करूं कोणासवें ॥ ४ ॥
तुझे वर्णूं गुण । कीं हे राखों दुष्टजन ॥ ५ ॥
काय करूं एका । मुखें सांग म्हणे तुका ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा :– भंग–खंड, अंतर.

अर्थ :– देवा, मला दुष्टांची संगत देऊ नकोस. त्यांच्यामुळे तुझ्या भजनात खंड पडतो. १ विठ्ठला, माझ्या-संबंधी तुम्ही काय विचार केला आहे तो तरी सांगा ना. २ हे दुष्ट लोक नेहमी तुझा निषेध करतात, ते मला मुळीच सहन होत नाही. ३ पण मी माझ्या एकट्याच्यानेच कुणाकुणाशी वाद करावा ? ४ या माझ्या मुखाने मी तुझे गुणगान देवा, गाऊ ? की या दुष्ट लोकांना गप्प बसवू ? ५ तुकाराम महाराज म्हणतात, या माझ्या एका मुखाने मी काय तरी काय ते देवा, तुम्ही सांगावे ६

२१०८ विठ्ठल माझी[1] माय । आम्हां सुखा[2] उणें काय ॥ १ ॥
घेतों अमृताची धनी । प्रेम वोसंडले स्तनीं ॥ २ ॥
क्रीडों वैष्णवांच्या मेळीं । करूं आनंदाच्या जळीं ॥ ३ ॥
तुका म्हणे कृपावंत । ठेवीं आम्हांपाशीं चित्त ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:– धनी–तृप्ती, क्रीडों–खेळू.

अर्थ :– विठ्ठल ही आमची आई असल्याने आमच्या सुखाला कसली उणीव आहे ? १ हिच्या स्तनांतून ओसंडणारे प्रेमदुग्ध अमृताप्रमाणे असून त्याच्या सेवनाने आमची तृप्ती पूर्णपणे होते २ आम्ही वैष्णवांच्या मेळा-व्यात आनंदाने क्रीडा करू, खेळ खेळू, आनंदाच्या जळात पोहू. ३ तुकाराम महाराज म्हणतात, ती कृपावंत माउली आपले चित्त आमच्या जवळच ठेवीत असतो ४

२१०९ भक्तिसुखें जे मातले । ते कळिकाळा शूर जाले ॥ १ ॥
हातीं बाण हरिनामाचे । वीर गर्जती विठ्ठलाचे ॥ २ ॥
महां दोषा आला त्रास । जन्ममरणां केला नाश ॥ ३ ॥
सहस्रनामाची आरोळी । एक एकाहूनि बळी ॥ ४ ॥
नाहीं आणिकाचा गुमान । ज्याचें अंकित त्यावांचून ॥ ५ ॥
तुका म्हणे त्यांच्या घरीं । मोक्षसिद्धी या कामारी ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा :– मातले–मत्त झाले, रंगले, गुमान–पर्वा, कामारी–काम करणाऱ्या दासी.

अर्थ :– भक्तिसुखाने रंगलेले जे भक्तवीर असतात ते कळिकाळासही जिंकणारे शूर होतात. १ हातांत हरिनामाचे बाण घेऊन विठ्ठलाचे हे वीर नामाची गर्जना करीत असतात २ यांच्या सामर्थ्यामुळे महादोषही त्रस्त होऊन नाहीसे होतात आणि जन्ममरणादींचे दुःख नाहीसे होते ३ एकाहून एक बलवान असणाऱ्या या भक्त-वीरांनी विष्णुसहस्रनामाची आरोळी वारंवार दिलेली असते ४ हे भक्तवीर ज्याच्या स्वाधीन असतात त्याच्या खेरीज इतर कुणाचीच ते पर्वा करीत नाहीत ५ तुकाराम महाराज म्हणतात, अशा या भक्तवीरांच्या घरी रिद्धीसिद्धी व मोक्ष काम करणाऱ्या दासीप्रमाणे वागतात. ६

१ माता, २ सुखें.

२११० पंधरा दिवसां एक एकादशी । कां रे न करिसी व्रतसार ॥ १ ॥
काय तुझा जीव जातो एका दिसे । फराळाच्या मिसे धणी घेसी ॥ २ ॥
स्वहित कारण मानवेल जन । हरिकथा पूजन वैष्णवाचे ॥ ३ ॥
थोडे तुज घरीं होती उजगरे । देउळासी कां रे मरसी जातां ॥ ४ ॥
तुका म्हणे का रे सकुमार जालासी । काय जव देसी यमदूतां ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – मिसे–निमित्ताने, धणी–तृप्ती, उजगरे–जागरणे.

अर्थ – दर पंधरा दिवसांनी एक एकादशी, असे सर्व व्रतांचे सार असलेले व्रत तू का रे करीत नाहीस ? १ जर कधी केलेस तर फराळ करायला मिळेल या निमित्ताने तृप्त होतोस पण एक दिवस उपास घडला तर काय तुझा जीव जातो की काय ? २ जर तू या दिवशी हरिकथा ऐकशील, वैष्णवाचे पूजन करशील तर तुझे स्वतःचे हित होईल आणि लोकही तुला मानतील ३ तुला घरच्या घरी काय थोडी जागरणे होतात ! तर मग देवळात जाऊन या एका दिवशी हरिकीर्तनासाठी जागरण केलेस तर काय मरशील का रे ? ४ तुकाराम महाराज म्हणतात, एवढा कसा रे तू नाजुक व सुकुमार झालास ? अशाने शेवटी यमदूतांना काय जाब देशील ? ५

२१११ कथा हे भूषण जनामध्यें सार । तरले[1] अपार बहुत येणे ॥ १ ॥
नीचिये कुळींचा उंचा वंद्य होय । हरीचे जो गाय गुणवाद ॥ २ ॥
देव त्याची माथां वंदी पायधुळी । दीप झाला कुळीं वंशाचिये ॥ ३ ॥
त्याची निंदा करी त्याची कुष्ठ वाणी । मुख संवदणी रजकाची ॥ ४ ॥
तुका म्हणे नाहीं चोरीचा व्यापार । विठ्ठलाचे सार नाम घ्यावे ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – सवदणी–परटाचे धुण्याचे पात्र

अर्थ – सर्व साधनात श्रीहरीची कथा हेच एक सारभूत तत्त्व आहे या साधनामुळे अनेक जीव तरून गेले आहेत १ जो या श्रीहरीचे गुणगान गातो तो नीच कुळातील असला तरी उच्च कुळीचा होऊन सर्वांना वंद्य होतो २ देवच त्याच्या पायांवरील धूळ आपल्या मस्तकावर धारण करतो जणु तो आपल्या कुळाचा कुलदीप आहे असे तो मानतो ३ त्याची निंदा जे करतील त्यांच्या तोंडास रक्तपिती होईल त्याचे मुख परटाच्या कपडे धुण्याच्या पात्राप्रमाणेच समजावे ४ तुकाराम महाराज म्हणतात, सारभूत असलेले हे विठ्ठलनाम काही चोरीचा व्यापार नव्हे, यात काही लपवालपवी नाही ५

२११२ टाळघोळ सुख नामाचा गजर । घोषें जयजयकार ब्रह्मानंदु ॥ १ ॥
गरुडटके दिंडी पताकांचे भार । आनंद अपार ब्रह्मादिकां ॥ २ ॥
आनंदें वैष्णव जाती लोटांगणीं । एक एकाहूनि भद्रजाति ॥ ३ ॥
तेणे सुखें सुटे पाषाणा पाझर । नष्ट खळ नर शुद्ध होती ॥ ४ ॥
तुका म्हणे सोपें वैकुंठवासी जातां । रामकृष्ण कथा हेची वाट ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा .– भार–समुदाय, भद्रजाति–हत्ती, खळ–दुष्ट

अर्थ – नामाचा गजर, टाळघोळाचा ध्वनी आणि या सर्वांच्या घोषामुळे ब्रह्मानंद होतो १ गरुडटके दिंडया, अनेक पताकांचे समुदाय यांना पाहून ब्रह्मादिकांनाही फार मोठा आनंद होतो २ हत्तीप्रमाणे बलाढ्य असणारे वैष्णव एकमेकांना मोठ्या प्रेमाने लोटांगण घालतात ३ या प्रेमसुखामुळे पाषाणालाही पाझर फुटतो व

१ उतरले अपार बहु येणें

दुष्ट असलेले लोकही या नामसंकीर्तनामुळे शुद्ध होऊन जातात ४ तुकाराम महाराज म्हणतात रामकृष्णांची कथा करणे हीच वैकुंठाला जाण्याची एक सोपी वाट आहे ५

विवरण – वरील दोनही अभगांत कलियुगात श्रेष्ठतेस पावलेल्या नामसंकीर्तनाच्या साधनाचे माहात्म्य तुकोबांनी वर्णन केले आहे सर्व साधनांमध्ये थोर, सर्व जातींच्या लोकांना उपयुक्त, सर्वांना सुलभ आणि तडक वैकुंठाची वाट असणारे हे एक साधन असल्याचे साधुसंतांनी सांगितले आहे भागवतात सांगितलेल्या नवविधा॰ भक्तीतही कीर्तनभक्तीस प्राधान्य देण्यात आले आहे नारदमुनी हे या कीर्तनभक्तीचे आद्य प्रवर्तक असून त्यांच्या मते ' हरेर्नाम हरेर्नाम हरेर्नामैव केवलम् । कलौ नास्त्येव नास्त्येव नास्त्येव गतिरन्यथा ' हरिनामाच्या शिवाय कलियुगात दुसरे साधनच नाही या कीर्तनभक्तीची अनेक वैशिष्ट्ये मराठी साधुसंतांनी अनेक प्रसंगी सांगितली आहेत ' एवं योगयागादि तपसाधनें । पोटीं केलीं हरिकीर्तनें । कलियुगीं नामस्मरणें । जन उद्धरणें हरिकीर्तनीं ' असे एकनाथांनी म्हटले आहे, ' नाचू कीर्तनाचे रंगीं । ज्ञानदीप लावू जगीं ' असं म्हणून नामदेवांनी कीर्तनाचा सुकाळ महाराष्ट्रात केला ' कळिकाळ नसे नामसंकीर्तनासी । उत्तमीच योनी हेंहि तसे ' असे महत्त्व त्यांनी कीर्तनाचे सांगितले आहे आणि ' हेंचि कलिमाजी साधन । आवडी कीर्तन हरीचें ॥ न घडे योगयाग तप । होय अनुताप कीर्तनीं ' असं सांगून एकनाथांनी कीर्तनभक्तीने कोणकोण तरले याची नामावळी ही दिली आहे तुकोबांनी तर या कीर्तनापासूनच आपल्या आध्यात्मिक जीवनाचा प्रारंभ केला आहे ' अवीट हे क्षीर हरिकथा माउली ', प्रेम अमृताची धार । वाहे देवाही समोर ', ' सोपें वर्म आम्हां सांगितलें संतीं । टाळ दिंडी हातीं घेऊनि नाचा । समाधिचें सुख सांडा ओवाळूनी । ' ऐसा या कीर्तनीं ब्रह्मरस ' अशा शब्दांतून तुकाराम महाराजांनी कीर्तनाची महती वर्णन केली आहे

२११३ देखोवेखी करिती गुरु । नाहीं ठाउका विचारु ॥ १ ॥
वर्म तें न पडे ठायीं । पांडुरंगाविण कांहीं ॥ २ ॥
शिको कळा शिकों येती । प्रेम नाहीं कोणा हातीं ॥ ३ ॥
तुका म्हणे सार । भक्ति नेणती गव्हार ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – देखोवेखी एकाचे पाहून गव्हार–अडाणी मूर्ख

अर्थ – एकाने गुरू केलेला पाहून दुसरा गुरू करतो गुरुस्वरूपाचा खरा विचार कुणासच माहीत नसतो १ पांडुरंगाखेरीज परमार्थाचे खरे रहस्य कुणालाच समजणार नाही २ अनेक कला शिकविल्यानंतर यतील पण श्रीहरीचे प्रेम हे काही कुणाला असे शिकवून देता येणार नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, सर्व साधनांचे सार असलेली ही भक्ती अडाणी मूर्खांना समजत नाही ४

२११४ भाग्यवंत म्हणो तया । शरण गेले पंढरिराया ॥ १ ॥
तरले तरले हा भरवसा । नामधारकाचा ठसा ॥ २ ॥
भुक्तिमुक्तिचें तें स्थळ । भोळेभाविक निर्मळ ॥ ३ ॥
गाइलें पुराणीं । तुका म्हणे वेदवाणी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – ठसा–वहिवाट रीत

अर्थ – जे पंढरीनाथाला शरण गेले आहेत तेच भाग्यवंत म्हणावे लागतील १ तेच खरोखर तरले हा विश्वास आहे नामधारकांची अशीच रीत आहे २ निर्मळ मनाचे जे भोळे भाविक आहेत त्यांना हे भक्तीचे व मुक्तीचे एक स्थानच वाटते ३ तुकाराम महाराज म्हणतात, वेदांनी व पुराणांनी याच मताचा अनुवाद केला आहे ४

२११५ जैसें चित्त जयावरी । तैसें जवळी तें दुरी ॥ १ ॥
न लगे द्यावा परिहार । या कोरडें उत्तर ।
असें अभ्यंतर । साक्षभूत जवळी ॥ २ ॥
अवघें जाणें सूत्रधारी । कोण नाचे कोणे परी ॥ ३ ॥
तुका म्हणे बुद्धि । ज्याची तेच तया सिद्धि ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – परिहार-पुरावा, समर्थन.

अर्थ :– जसे ज्याचे चित्त एखाद्यावर जडलेले असते तशी ती वस्तु जवळ अथवा दूर असते १ या गोष्टीचे समर्थन करण्याचीही जरूरी नाही, नुसत्या कोरड्या उत्तराची काय किंमत ? या सर्वांच्या जवळ साक्षीभूत असे मन असतेच. २ कोण कोणत्या प्रकारे नाचतो हे जाणणारा व सर्व जगाची सूत्रे धारण करणारा तो देव जाणणारा आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, ज्याची जशी बुद्धी असेल तशी त्याला सिद्धी प्राप्त होईल ४

२११६ नाहीं पाइतन भूपतीशीं दावा । धिग त्या कर्तव्या आगी लागो ॥ १ ॥
मुंगियांच्या[१] मुखा गजाचा आहार । न साहावे भार जाय जीवें ॥ २ ॥
तुका म्हणे आधीं करावा विचार । शूरपणें तीर मोकलावा ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा:– पाइतन-पायतन, जोडा, वहाण इ, भूपतीशीं-राजाशी, गजाचा-हत्तीचा.

अर्थ – ज्याला पायात घालायला पायतन नाही त्याने राजाशी वैर करणे व्यर्थच आहे अशा त्याच्या करण्याला आग लागो. १ मुंगीच्या मुखात हत्तीला लागणारा आहार घातला तर त्या भाराने असह्य होऊन तिचा जीवच जाणार. २ तुकाराम महाराज म्हणतात, म्हणून प्रत्येकाने आपल्या सामर्थ्याचा अगोदर विचार करावा. शूरपणाने युद्धास उभे राहून मग बाण सोडावा ३

२११७ तिन्ही लोक ऋणें बांधिले जयानें । सर्वसिद्धि केणें तये घरीं ॥ १ ॥
पंढरीचोहोटां घातला दुकान । मांडियेले वान आवडीचे ॥ २ ॥
आषाढी कार्तिकी भरियेले हाट । इनाम हे पेंठ घेतां देतां ॥ ३ ॥
मुक्ति कोणी तेथें हातीं नेघे फुका । लुटितील सुखा प्रेमाचिया ॥ ४ ॥
तुका म्हणे संतसज्जन भाग्याचें । अनंता जन्मींचे सांटेकरी ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा — केणें-माल, चोहोटां-उघड्यावर, वान-वाण, प्रकार, हाट-बाजार

अर्थ :- भक्तिसामर्थ्याच्या ऋणात ज्याने तीनही लोकांना बांधून ठेविले आहे, त्याच्या घरी सर्व रिद्धी-सिद्धींचा मालक असतो १ या वैष्णवांनी पंढरपुरास उघड्यावर आपले दुकान उघडले आहे ज्याला जसे आवडतील तसे प्रकार त्याच्या दुकानात आहेत. २ या ठिकाणी दर आषाढी व कार्तिकी एकादशीस हरिनामाचा बाजार भरतो आणि या जागी नामाची देवघेव करताना इनामही दिले जाते ३ येथे मुक्ती मिळते, पण ती फुकट सुद्धा घ्यायला कुणी तयार नसते ते केवळ प्रेमसुखाचीच लूट करतात ४ तुकाराम महाराज म्हणतात, असे हे संतसज्जन मोठे भाग्याचे आहेत त्यांनी अनंत जन्म घेऊन देवच साठविलेला असतो ५

२११८ दु:खाचिये साटीं तिथें मिळे सुख । अनाथाची भूक दैन्य जाय ॥ १ ॥
उदाराचा राणा पंढरीस आहे । उभारोनि बाहे पालवितो ॥ २ ॥
जाणतियाहूनि नेणत्याची गोडी । आळिंगी आवडी करूनियां ॥ ३ ॥

१ मुंगियेचा

शीण घेऊनिया प्रेम देतो साटी । न विचारी तुटी लाभा काहीं ॥ ४ ॥
तुका म्हणे असों अनाथ दुबळीं । आम्हांसी तो पाळी पांडुरंग ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – वाहे-बाहू, हात, चालविती-बोलाविती

अर्थ – या पंढरपुरास जो कुणी येईल त्याचे दुःख नाहीसे होऊन त्याला सुखाची प्राप्ती होईल जो कुणी अनाथ असेल त्याची भूक शमेल, दैन्य जाईल १ कारण या ठिकाणी सर्व उदारांचा राजा पांडुरंग पंढरपुरात उभा आहे तो आपल्या भक्तांना हात उभारून प्रेमाने बोलावीत आहे २ या देवाला शहाण्यांपेक्षा नेणत्यांची प्रीती मोठीच असते तो त्यांना मोठ्या प्रेमाने आलिंगन देतो ३ तो आपल्या भक्तांचा सारा शीण घेतो व उलट त्यांना प्रेम देतो यावेळी फायद्यातोट्याचा तो कधी विचारच करीत नाही ४ तुकाराम महाराज म्हणतात, आम्ही अनाथ दुबळे आहोत म्हणूनच तो पांडुरंग आमचे पालनपोषण करीत असतो ५

२११९ आणिक मात माझ्या नावडे जीवासी । काय करूं यासी पांडुरंगा ॥ १ ॥
सुखा तेचि गोड श्रवणा[1] आवडी । चित्त माझें ओढी तुझे पायीं ॥ २ ॥
जये पदीं नाहीं विठ्ठलाचें नाम । मज होती श्रम आइकतां ॥ ३ ॥
आणिकांचे मज म्हणवितां लाज । वाटे हें सहज न बोलावें[2] ॥ ४ ॥
तुका म्हणे मज तूच आवडसी । सर्वभावेंविशीं पांडुरंगा ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – मात-गोष्ट, पदीं-शब्दात

अर्थ – पांडुरंगा मला तुझ्यावाचून दुसरी कोणतीच गोष्ट आवडत नाही याला मी तरी काय करू ? १ तुझीच कीर्ती मुखाने गावी अशी व कानाने ऐकावी अशी गोडी मला आहे तुझ्याच पायांशी माझे चित्त सतत ओढले जाते २ ज्या शब्दांतून विठ्ठलाचे नाम नाही ते शब्द ऐकत असताना मला फार श्रम होतात ३ मी दुसऱ्यांचा आहे हे म्हणताना माझ्या मनास भारी लाज वाटते सहज म्हणून बोलण्याचाही संकोच वाटतो. ४ तुकाराम महाराज म्हणतात पांडुरंगा, सर्व भावांनिशी तूच मला फार आवडतोस ५

२१२० कळेल हें तैसे गाईन मी तुज । जनासवें काज काय[3] माझें ॥ १ ॥
करीन मी स्तुती आपुले आवडी । जैसी माझ्या गोडी वाटे जीवा ॥ २ ॥
होऊनी निर्भर नाचेन मी छंदें । आपुल्या आनंदें करूनियां ॥ ३ ॥
काय करूं कळा युक्ती या कुसरी । जाणिवेच्या परी सकळिका ॥ ४ ॥
तुका म्हणे माझें जयासवें काज । भोळा तो सहज पांडुरंग ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – काज-काम निर्भर-निश्चिंत कळा-कला

अर्थ – देवा मला जसे कळेल तसे मी तुझे गुणगान करीन, इतर लोकांशी माझे काय काम आहे ? १ मी आपल्या आवडीप्रमाणे तुझी स्तुती करीन जसे माझ्या मनास गोड वाटेल तसे मी स्तवीन २ हरिनामाच्या छंदात मी निश्चिंत होऊन आपल्याच आनंदात नाचेन ३ मला इतर कलाकुसर वा युक्ती यांची काय जरूरी आहे ? जाणतेपणाचे सर्व प्रकार घेऊन तरी मला काय करायचे आहे ? ४ तुकाराम महाराज म्हणतात, ज्याच्याशी माझे काम आहे तो हा पांडुरंग भोळा व सहजप्राप्य असा आहे ५

१ श्रवणीं, २ बोलवे ३ नाहीं

२१२१ तयासी नेणती बहु आवडती । होय ज्या चित्तीं एक भाव ॥ १ ॥
उपमन्यु धुरु हे काय जाणती । प्रल्हादाच्या चित्तीं नारायण ॥ २ ॥
कोळी भिल्ल पशु श्वापदें अपारें । कृपेच्या सागरें तारियेलीं ॥ ३ ॥
काय तीं गोपाळें चांगलीं शाहाणीं । तयां चक्रपाणी जेवी सवें ॥ ४ ॥
तुका म्हणे भोळा भाविक हा देव । आम्ही त्याचे पाव धरूनी ठेलों ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – उपमन्यू–व्याघ्रपादाचा मुलगा, याला शंकराने क्षीरसागर दिला, धुरु–ध्रुव, पाव–पाय, ठेलों–राहिलो

अर्थ – ज्याच्या चित्तात श्रीहरीविषयी एकनिष्ठेचा भाव आहे असे नेणत लोकच त्याला फार आवडतात १ उपमन्यू, ध्रुव हे काय जाणीत होते ? त्याना काय ज्ञान होते ? प्रल्हादाच्या चित्तात तर फक्त एक नारायणच होता २ कोळी, भिल्ल, पशू अनेक श्वापदे यांचाही या कृपेच्या सागराने उद्धार केला ३ गोकुळात गाई राखणारी गवळ्यांची ती पोरे काय विशेष चांगली होती ? शहाणी तरी होती ? पण हा चक्रपाणी देव त्याच्या बरोबर मोठ्या आवडीने जेवण करी ४ तुकाराम महाराज म्हणतात, असा हा आमचा भोळा देव आहे त्याचे पाय आम्ही आमच्या चित्तात धरून ठेविले आहेत ५

२१२२ न लगे पाहावें अबद्ध बाकडें । उच्चारावें कोडें नाम तुझें ॥ १ ॥
नाहीं वेळ नाहीं पंडिताचा धाक । होत कां वाचक वेदवक्ते ॥ २ ॥
पुराणीं ही कोठें न मिळे पाहातां । तैशीं या अनंता ठेवूं नामें ॥ ३ ॥
आपुलिया मना उपजे आनंद । तैसे करूं छंद कथाकाळीं ॥ ४ ॥
तुका म्हणे आम्ही आनंदेंचि धालों । आनंदचि ल्यालों अळंकार ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – अबद्ध–वेडेवाकडे, कोडें–कौतुकाने धालों–संतुष्ट झालो

अर्थ – देवा, आम्ही कौतुकाने तुझे नाव उच्चारितो ते वेडेवाकडे आहे की कसे आहे हे आम्ही कधीच पाहात नाही १ तुझे हे नाम घ्यायला आम्हाला काळवेळही पाहावी लागत नाही आम्हास या कामी वेदाध्ययन करणाऱ्या पंडितांचीही कधी भीती वाटत नाही २ जी या पुराणातूनही कुठे मिळणार नाहीत एवढी नावे आम्ही या देवाला, या अनंताला प्रेमाने ठेवू ३ आमच्या मनास ज्यामुळे आनंद निर्माण होईल असा छंद कथेच्या वेळी आम्ही करीत राहू ४ तुकाराम महाराज म्हणतात, याच आनंदाने आम्ही संतुष्ट झालो याच आनंदाचे अलंकार आम्ही आमच्या अंगावर घातले आहेत ५

२१२३ दैन्य दुःख आम्हां न येती जवळी । दहन हे होळी होती दोष ॥ १ ॥
सर्व सुखें येती माने लोटांगणीं । कोण यासी आणी दृष्टीपुढें ॥ २ ॥
आमुची आवडी संतसमागम । आणीक त्या नाम विठोबाचें ॥ ३ ॥
आमचें मागणें मागों त्याची सेवा । मोक्षाची निर्देवा कोणा चाड ॥ ४ ॥
तुका म्हणे पोटीं साटविला देव । न्यून तो हा भाव कोण आम्हां ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – दहन–जळणे, चाड–इच्छा न्यून–कमतरता

अर्थ – आमच्या जवळ आता दैन्य व दुःख कधीच येणार नाहीत सर्व दोष आमचे जवळूनच गेले आहेत १ जगातील सर्व सुखे मोठ्या मानाने आम्हास लोटांगण घालीत येतात पण त्याना आम्ही आमच्या दृष्टीपुढे सुद्धा ठेवीत नाही २ संतांचा सहवास आणि या विठोबाचे नाम हीच आमच्या मनाची आवडी आहे ३ या विठोबारायाची

सेवा हेच आमचे मागणे असून याखेरीज मोक्षाची इच्छा कोणता दुर्दैवी मनुष्य करील ? ४ तुकाराम महाराज म्हणतात, हा देव आम्ही आमच्या हृदयात साठविला असून आतां आम्हांला कोणत्या गोष्टीची कमतरता आहे ? ५

२१२४ काळतोंडा सुना । भलतें चोरूनि करी जना ॥ १ ॥
धिग त्याचें साधुपण । विटाळुनि यतें मन ॥ २ ॥
मंत्र ऐसे घोकी । वश व्हावें जेणें लोकीं ॥ ३ ॥
तुका म्हणे थीत । नागवला नव्हे हित ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – सुना-कुत्रें, थीत–व्यर्थ, वाया.

अर्थ :– लोकांना समजू न देता अंधारात भलभलते मांत्रिक प्रयोग करणारा हा मनुष्य काळतोंड्या कुत्र्यासारखाच आहे. १ याचे मन दुराचाराने विटाळलेले असल्यामुळे त्याच्या साधुत्वाच्या वरवरच्या वागणुकीचा धिक्कार असो. २ लोकांनी आपणांस वश व्हावे म्हणून हा वशीकरणाचे मंत्र घोकीत असतो. ३ तुकाराम महाराज म्हणतात याचे जिणे व्यर्थ असून हा सर्वस्वास नागवला गेला असून याचे हित कधीच होणार नाही. ४

२१२५ विठ्ठल मुक्तिदाता । नव्हे मरो हे बोलता ॥ १ ॥
मज न साहावें कानीं । विष उत्तर लागे मनीं ॥ २ ॥
हरीकथेतें धिक्कारी । शत्रु माझा तो वैरी ॥ ३ ॥
सुना काळतोंडा । जो या देवा म्हणे धोंडा ॥ ४ ॥
अहं म्हणे ब्रह्म । नेणे भक्तीचें[1] तें वर्म ॥ ५ ॥
तुका म्हणे क्षण । नको तयाचे[2] वदन ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा :– सुना-कुत्रें.

अर्थ:– विठ्ठल हा मुक्ती कधीच देत नाही असे जे कुणी म्हणतील ते तात्काळ भस्म जातील. १ मला हे बोलणे माझ्या कानांनी अगदी सहन होत नाही. हे उत्तर माझ्या मनास विषाप्रमाणे झोंबले २ श्रीहरीच्या कथेचा जो कुणी धिक्कार करील तो माझा शत्रूच होईल. ३ या माझ्या विठ्ठलास जो कुणी धोंडा म्हणेल तो काळतोंड्या कुत्राच होय ४ मीच ब्रह्म आहे असे जो म्हणतो त्याला भक्तीचे वर्म मुळीच समजलेले नसते. ५ तुकाराम महाराज म्हणतात, अशा लोकाचे मला एक क्षणभरही दर्शन नको ६

२१२६ यमपुरी त्यांणी वसविली जाणा । उच्छेद भजना विधी केला ॥ १ ॥
अवघड कोणी न करी सांगतां । सुलभ बहुतां गोड वाटे ॥ २ ॥
काय ते नेणते होते मागें ॠषी । आधार लोकांसी ग्रंथ केले ॥ ३ ॥
द्रव्य दारा कोणें स्थापियेलें धन । पिंडाचें पाळण विषयभोग ॥ ४ ॥
तुका म्हणे दोहीं ठायीं हा फजित । पावे यमदूतजना हातीं ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा:– दारा–पत्नी, पिंडाचे–देहाचे

अर्थ – देवाच्या भजनविधीचा जे कुणी विच्छेद करतात त्यांनी यमपुरीच वसविली आहे असे वाटते १ कुणाला एखादी कठिण गोष्ट सांगितली तर ती कुणी करीत नाही पण सोपी गोष्ट मात्र सर्वांना गोड वाटते. २ मागील काळाचे ऋषिवर्य काय वेडे होते की काय ? त्यांनी तर लोकाना आधारासाठी ग्रंथ तयार केले आहेत ३

१ भक्तिभाव वर्म २ तयाचे कोण दर्शन.

त्याच्यापैकीं कुणी धन, स्त्रीपुत्रादिक, देहाचे पोषण, विषयभोग इत्यादींची प्रतिष्ठा वाढविली आहे काय ? ४ तुकाराम महाराज म्हणतात, हे न समजणारा मनुष्य यमदूताकडून आणि लोकाकडून अशा दोनही बाजूनी फजीत पावतो. ५

२१२७ न कळतां कोणीं मोडियेलें व्रत । तया प्रायश्चित्त चाले कांहीं ॥ १ ॥
जाणतियां वज्रलेप जाले थोर । तयांस अघोर कुंभपाक ॥ २ ॥
आतां जरी कोणी नाइके सांगतां । तया शिकवितां तेंचि पाप ॥ ३ ॥
काय करूं मज देवें बोलविलें । माझें खोळंबलें काय होतें ॥ ४ ॥
तुका म्हणे जना पाहा विचारूनी । सुख वाटे मनीं तेंचि करा ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – कुंभपाक–भीषण नर्क, विचारूनी–विचार करून

अर्थ .– एकादशीसारख्या व्रताचा भंग नकळत झाला तर त्याला काही प्रायश्चित्त आहे. १ पण जाणून बुजून त्या व्रताचा भंग करणारे जर कुणी असतील तर ते त्यांचे पाप वज्रलेपासारखे होऊन शेवटी त्यांना कुंभपाकाचा नर्क भोगावा लागेल. २ अशा या वाटेने कुणी जात असताना त्यास सांगितले तरी तो कधी ऐकतच नाही अशा माणसास काही शिकविले तरी शिकविणारासच पाप लागणार. ३ हे सर्व सांगण्यासाठी देवानेच मला बोलते केले नाही तर माझे काय खोळंबले होते ? ४ तुकाराम महाराज म्हणतात, म्हणून लोकहो, नीट विचार करून पहा. ज्या योगे तुमच्या मनास सुख वाटेल तेच करा. ५

विवरण :– ज्या माणसास तपाचे, व्रताचे महत्त्व समजत नाही, त्याला शिकवून काय उपयोग ? उलट शिकविणारास पाप लागायचे. अशा माणसास कुणी काही न शिकवावे हेच बरे 'इदं ते नातपस्काय नाभक्ताय कदाचन । न चाशुश्रूषवे वाच्यं न च मां योऽभ्यसूयति' हे गुह्य ज्ञान ज्याला तप नाही, भक्ती नाही, व ऐकण्याची इच्छाही नाही, जो माझी नेहमी निंदा करतो त्याला कधीही सांगू नकोस अशी स्पष्ट सूचना भगवद्गीतेत शेवटी भगवंतानी दिलेली आहे. ज्ञानेश्वरानी याला गुरुभक्तीची जोड दिली आहे. 'अथवा तापसुहि जाला । परी गुरुभक्ती जो दिला । तो वेदीं अत्यज वाळिला । तैसा चाळी ' म्हणून गुरुभक्तीविहीन माणसाचे भवितव्य त्यांनी स्पष्ट केले आहे. अशा माणसास उपदेश करून काय फायदा ? मुदर, टपोरे मोत्ये असून काय उपयोग ? दोरा ओवण्यासाठी त्याला भोकच नसेल तर ? सागर मोठा गभीर असून उपयोग काय ? त्यावरील पर्जन्याची वृष्टि व्यर्थच नाही का होणार ? एकादशीसारखे व्रत, भक्ती, सतसहवास, भगवत्प्रेम याच्याखेरीजची इतर सर्व सामग्री काय कामाची ? ' दीपेंवीण ठाण दिवी । रात्रीची जैशी ' अशीच त्याची योग्यता मानावी. ' अग गोरें आणि तरुणें । वरि लेइले आहे लेणें । परी येकलेनि प्राणें । सांडिले जैसी ॥ सोनियाचे सुंदर । निर्वाळिले होय घर । परी सर्पांगना द्वार । रुंधले आहे ॥ निपजे दिव्यान्न चोखट । परी माजी असे काळकूट । असो मैत्री कपट । – गर्भिणी जैसी ' असे सरस दृष्टान्त एकामागून एक देऊन स्पष्टपणे सांगितले आहे की ' याकारणें धनंजया । तो भक्तु मेघावी स्वविया । तरी नको वाया दया । शास्त्री आतळों देवों ' गुरुभक्तिविहीन तपही साधुसंताना मान्य नाही

या अभंगात आपणास देवाने बोलते केले आहे नाही तर आपले काय खोळंबले होते ? अशा एक नेहमीचा विचार तुकारामबुवानी व्यक्त केला आहेच ' नव्हतो माझे बोल बोले पांडुरंग । असे अंतरंग व्यापुनिया ', ' वचनाचा अनुभव हातीं । बोलवितो देव मज ', आपुनिया बळे नाहीं मी बोलत . परि त्या विश्वंभरे बोलविले ', ' तुका म्हणे मज बोलवितो देव ',' मज विश्वंभर बोलवितो,' इत्यादी वचनानी आठवण या ठिकाणी होण्यासारखी आहे.

२१२८ वाचे विठ्ठल नाही । तोचि प्रेतरूप पाही ॥ १ ॥
धिग त्याचे ज्यालेपण । भार न साहे मेदिन ॥ २ ॥

न बैसे कीर्तनीं । गुण नाइके जो कानीं ॥ ३ ॥
जातां काटाळे देउळा[1] । तोचि सुना मुखकाळा ॥ ४ ॥
हरिभक्तिविण । त्याचें जळो शाहाणपण ॥ ५ ॥
तुका म्हणे तेणें । वंशा आणियेलें उणें ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – ज्यालेपण–जन्माला येणे, मेदिन–पृथ्वी, सुना–कुत्रे

अर्थ – ज्याच्या वाणीत विठ्ठलाचे नाम येत नाही तो मनुष्य जिवंत असला तरी प्रेताप्रमाणेच मानावा १ तो जन्माला येऊन स्वयं त्याचा धिक्कार असो त्याच्या पापाचा भार पृथ्वीला सहन होत नाही २ असा हा मनुष्य श्रीहरीच्या कीर्तनास कधी बसत नाही की कधी कानांनी त्याचे गुणकीर्तन ऐकीत नाही ३ देवाच्या देवळात जायला कटाळा करणाऱ्या या माणसास काळतोंडे कुत्रेच समजावे ४ ज्याला श्रीहरीची भक्ती माहीत नाही त्याच्या शहाणपणास आग लागो ५ तुकाराम महाराज म्हणतात, अशा माणसाने आपल्या कुळाला व वंशालाच कमीपणा आणला आहे ६

२१२९ तारिलीं[2] बहुतें चुकवूनि घात । नाम हें अमृत स्वीकारितां ॥ १ ॥
नेणतां सायास शुद्ध आचरण । यातीकुळहीन नामासाठीं ॥ २ ॥
जन्म नाव[3] धरी भक्तीच्या पाळणा । आकार कारणा याच साठीं ॥ ३ ॥
असुरीं दाटली पाप होतां फार । मग फेडी भार पृथिवीचा ॥ ४ ॥
तुका म्हणे देव भक्तपण सार । कवतुकवेव्हार तयासाठीं ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – घात–आघात, संकटे

अर्थ – जो कुणी हरिनामामृताचे सेवन करतो त्यास देव अनेक संकटांतून तारतो १ त्याचे आचरण किती शुद्ध आहे, त्याने साधनांचे परिश्रम किती केले आहेत, त्याचे यातिकूळ किती शुद्ध आहे इत्यादी चौकशी न करता तो केवळ नाम घेतो यासाठीच उद्धारला जातो २ अशा भक्ताच्या उद्धारासाठीच व भक्तांच्या पालनपोषणासाठीच त्याने आकार धारण करून विठ्ठल हे नाव स्वीकारलेले आहे ३ जेव्हा दैत्य फार माजतात, पृथ्वीला पापाचा फार मोठा भार होतो तेव्हा देव अवतार धारण करून या पृथ्वीचे ओझे कमी करीत असतो ४ तुकाराम महाराज म्हणतात या देवास भक्ती हेच सारभूत तत्त्व वाटत असल्यामुळें तो त्यासाठीच भक्तीचा व्यवहार कौतुकाने वाढवीत असतो ५

२१३० याचिया आधारें राहिलों निश्चिंत । ठेवूनिया चित्त पायीं सुखें ॥ १ ॥
माझें सुखदुःख जाणे हित फार । घातलासे भार पांडुरंगा ॥ २ ॥
कृपेचीं पोसणीं ठायींचीं अंकिलीं । म्हणऊनि लागली यास चिंता ॥ ३ ॥
मन राखे हातीं घेऊनिया काठी । इंद्रियें तापटी[4] फांकों नेदी ॥ ४ ॥
तुका म्हणे यासी अवघड नाहीं । शरणागतां कांहीं रक्षावया ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – अंकिलीं–ताब्यात असलेली, आज्ञाधारक

अर्थ – या विठ्ठलाच्या पायावर मोठ्या सुखाने आम्ही आमचे चित्त ठेविले असल्याने या आधारावर निश्चिंत होऊन राहिलो आहोत १ हा देव माझे सुखदुःख नीट जाणतो, माझ्या हिताची जपणूक फार करतो म्हणून आम्ही आमचा सर्व भार या पांडुरंगावरच घातला आहे २ आम्ही त्याचेच आज्ञाधारक असून त्याच्या कृपेवर पोसलेलो आहोत म्हणूनच आमची चिंता त्याला नेहमी करावी लागते ३ हा देव आमच्या मनाचे रक्षण

१ राऊळा, २ वारिली, ३ नाम, ४ कौतुके वेव्हार, ५ वापटी

हातात विवेकाची काठी घेऊन करीत असतो तावट इंद्रियांना इतरत्र फाकू देत नाही ४ तुकाराम महाराज म्हणतात, शरण आलेल्यांचे रक्षण करणे यात काहीच कठीण नाही ५

२१३१ उभाउभी फळ । अंगीं मंत्राचें या बळ ॥ १ ॥
म्हणा विठ्ठल विठ्ठल । गोड आणि स्वल्प बोल ॥ २ ॥
कळिकाळाची बाधा । नव्हे उच्चारिता सदा[1] ॥ ३ ॥
तुका म्हणे रोग । वारे भवाऐसा भोग ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा — उभाउभी–त्वरित, वारे–दूर होतात

अर्थ – पुढे दिलेल्या मंत्राच्या अंगी त्वरित फलप्राप्ती देण्याचे सामर्थ्य आहे १ यासाठी तुम्ही विठ्ठल विठ्ठल असा गोड व सोप्या शब्दांच्या मंत्राचा नित्य उच्चार करा २ या मंत्राचा सतत उच्चार केल्यावर कळिकाळाचीही बाधा तुम्हास कधी होणार नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, या मंत्रामुळे भवरोगासारखे भोग दूर होतात ४

२१३२ जैसा अधिकार । तैसें बोलावें उत्तर ॥ १ ॥
काय वाउगी घसघस । आम्ही विठोबाचे दास ॥ २ ॥
आम्ही जाणों एका देवा । जैसी तैसी करूं सेवा ॥ ३ ॥
तुका म्हणे भावें । माझें पुढें पडेल ठावें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – घसघस–वटवट

अर्थ – ज्याचा जसा अधिकार तसा त्याला उपदेश करीत जावा १ आम्ही विठोबाचे दास असल्याने तुमची सर्व वटवट आमच्यापुढे व्यर्थच आहे २ आम्ही फक्त हाच एक देव जाणतो व कशीतरी त्याचीच सेवा करितो ३ तुकाराम महाराज म्हणतात, जे कुणी भाव ठेवून माझे ऐकतील त्यांना त्याची किंमत पुढे समजून येईल ४

२१३३ न वजतां घरा । आम्ही कोणाचा दातारा ॥ १ ॥
कां हे छळूं येती लोक । दाट वळेंचि कंटक ॥ २ ॥
नाहीं आम्ही खात । कांहीं कोणाचे लागत ॥ ३ ॥
कळे तैसी सेवा । तुका म्हणे करूं देवा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – वजतां–जाता, कटक–दुष्ट

अर्थ – दातारा, आम्ही काही कुणाच्या घरी कधी जात नाही १ असे असून हे दुष्ट लोक छळण्यासाठी वळेच का बरे आमच्याकडे येतात ? २ आम्ही कुणाचे काही खात नाही की कुणाचे आम्ही काही देणे लागत नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, आम्हाला जशी समजेल तशी सेवा आम्ही तुझी करू ४

२१३४ मोहरोनी चित्ता । आणूं हळूचि वरि हिता ॥ १ ॥
तों हे पडती आघात । खोडी काढिती पंडित ॥ २ ॥
सवसारा भेणें । कांहीं उसती तों पेणें ॥ ३ ॥
एखादिया भावें । तुका म्हणे जवळी यावें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – मोहरोनी–आकर्षित करून, वळवून, भेणें–भीतीने, पेणें–मुक्काम

[1] कदा

अर्थ – आम्ही आमच्या चित्तास वळवून हळूहळू स्वहितावर स्थिर करीत असतो. १ तेवढ्यात पतित लोक काहीतरी आमची चूक काढतात व आमच्यावर आघात करतात २ या संसाराच्या भीतीने व्यग्र होऊन आम्ही परमार्थमार्गाचा मुक्काम हळूहळू गाठीत असतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, कोणत्या तरी एका भावाने आपण देवाच्या जवळ जाण्याचा प्रयत्न करावा ४

२१३५ काय जाणो वेद । आम्ही आगमाचे भेद ॥ १ ॥
एक रूप तुझें मनीं । धरूनि राहिलो चिंतनीं ॥ २ ॥
कोठें अधिकार । नाहीं रानट विचार ॥ ३ ॥
तुका म्हणे दीना । नुपेक्षावे नारायणा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – आगमाचे-शास्त्रातील, रानट-रानटी, साधेभोळे

अर्थ – देवा, आम्ही वेदांचा अर्थ काय जाणावा ? शास्त्रांतील भेदही आम्ही जाणू शकत नाही १ आमच्या मनात तुझेच तेवढे एक रूप स्थिरावलेले असते त्याचेच चिंतन आम्ही करीत असतो. २ तसा आमचा अधिकार तरी कुठे आहे ? आम्ही केवळ रानवट आहोत ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा नारायणा, आम्हां दीनांची उपेक्षा कधी करू नये ४

२१३६ धर्माचे पाळण । करणे पाषांड खंडण ॥ १ ॥
हेंचि आम्हां करणे काम । बीज वाढवावे नाम ॥ २ ॥
तीक्षण उत्तरें[1] । हातीं घेऊनि बाण फिरें ॥ ३ ॥
नाहीं भीड भार । तुका म्हणे साना थोर ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – पाषांड-नास्तिक मत

अर्थ – सद्धर्माचे पालन करावे, नास्तिक मताचे खंडण करावे १ हेच काम आम्हांला करायचे आहे. सर्व धर्मांचे बीजभूत असलेले प्रभुनाम वाढविण्याचे काम आमचे आहे २ यासाठी तीक्ष्ण शब्दांची उत्तरे हेच बाण हाती घेऊन आम्ही नेहमी फिरत असतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, या कामात आम्ही कुणाही लहान थोराची कधीच भीडभाड ठेवीत नाही ४

विवरण– आपल्या सामर्थ्याविषयीची यथार्थ जाणीव तुकोबानी या अभंगात प्रकट केली आहे ढोंग, दंभ, दुराचार यांचा नायनाट करून नामसंकीर्तनाचा व प्रभुप्रेमाचा मार्ग स्थापित व्हावा म्हणून तुकोबाचा अवतार होता. नाना धर्ममते, नाना पाखंड विचार, नाना भेद यांच्यावर तुकोबाना कठोरपणे प्रहार करावे लागले मेणाहून मऊ असणारा हा विष्णुदास प्रसंग पडताच वज्रापेक्षाही कठीण होत राही आपले सर्व जीवनच ईश्वरकृपेने भरलेले असल्याने त्याच बळावर आता आपणास लोकधर्माची माडामाड करायची आहे अशी यथार्थ जाणीव बुवाना होती ' नाम विठोबाचे घेईन मी वाचे । बीज कल्पांतीचे तुका म्हणे । ' याप्रमाणे तुकोबाना हरिनामाचे बीज हस्तगत झाले असल्याने याच बीजाचा प्रसार करण्याचे कार्य त्याना करायचे होते नारायणाच्या कृपेने आपली वाणी मिश्रित झाली आहे, आपण आता केवळ उपकारापुरते उरलो आहोत, अशी भूमिका तुकोबाची बनली होती फार पूर्वीपासूनही आपण अशेच धर्मप्रसाराचे काम करीत असल्याचे तुकोबांनी एका अभंगात म्हटले आहे 'मागें बहुता जन्मीं । हेंचि करित आलों आम्ही ॥ ' आपण श्रीहरीचे जुनेच सवंगडी असून 'रामकृष्ण नारायण' असे प्रभुनामाचे चिंतनात रमतो असेही एका अभंगात त्यांनी म्हटले आहे मुकाने समाधी लाविली तेव्हा आपण तिथे होतो असे त्यांनी आणखी

१ उत्तर

एका अभंगात (क्र २४७८) म्हटले आहे त या खोट्याचा निवाडा करण्यासाठी आपण आहोत असे तुकाराम-बुवानी ' उजळावया आलों वाटा । खरा खोटा निवाडा ' या ओळीत म्हटले आहे धर्मसंस्थापनेच्या कार्यात साहय करण्यासाठी, सज्जनांचा डांगोरा पिटण्यासाठी आपला अवतार आहे अशी योग्य जाणीव तुकोबाना होती. ' आम्ही वैकुंठवासी आलों याचि कारणासी ' हा अभंग तुकोबांची भूमिका स्पष्ट करण्यास समर्थ आहे.

२१३७ निवडावे खडे । तरी दळण[1] वोजें घडे ॥ १ ॥
नाहीं तरि नासोनि जाय । कारण आळस उरे हाय ॥ २ ॥
निवडावे तन । सेतीं करावे राखण ॥ ३ ॥
तुका म्हणे नीत । न विचारिता नव्हे हित ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – वोजें–चांगले, स्वच्छ तन–वायफळ गवत, न विचारिता–विचार केला नाही तर, नीत–नीती

अर्थ – खडे निवडून दळण दळले तरच ते चांगले होते १ आळसाने तसे जर केले नाही तर ते नासून जाईल व मग मात्र हाय हाय करावे लागेल २ शेतातील वायफळ गवत निवडून काढावे व पिकाचे रक्षण करावे तरच लाभ होईल ३ तुकाराम महाराज म्हणतात धर्मनीतीचा नीट विचार केला नाही तर खरे हित होणार नाही ४

२१३८ दुर्जनाचा मान । सुखें करावा खंडण ॥ १ ॥
लात हाणोनिया वारी । गुंड वाट शुद्ध करी ॥ २ ॥
बहुतां पीडी खळ । त्याचा धरावा विटाळ ॥ ३ ॥
तुका म्हणे नखें । काढुनि टाकिजेती सुखें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – खंडण–नाहीसा गुंड–गोटा दगड, खळ–दुष्ट

अर्थ – दुर्जनाचा मान सुखाने नाहीसा करावा त्याची मानखंडणा करावी १ लाथ हाणूनच रस्त्यावरील धोंडा दूर करून वाट मोकळी करावी २ अनेकांना त्रास देणारा जो मनुष्य त्याचा मनात विटाळ जरूर धरावा ३ तुकाराम महाराज म्हणतात नखे जशी आपण काढून दूर टाकतो, त्याप्रमाणे या दुष्टाचा त्याग करावा ४

२१३९ नका धरूं कोणी । राग वचनाचा मनीं ॥ १ ॥
येथें बहुतांचे हित । शुद्ध करोनि राखा चित्त ॥ २ ॥
नाहीं केली निंदा । आम्हीं दूषिलेसे[2] भेदा ॥ ३ ॥
तुका म्हणे मज । येणे विण काय काज ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – दूषिलेसे–दूषण दिले काज–कारण

अर्थ – माझ्या उपदेशपर वचनाचा कुणी राग मनात धरू नका १ तुम्ही चित्त शुद्ध करून उपदेश ऐका त्यामुळे पुष्कळांचे हितच होणार आहे २ आम्ही काही कुणाची निंदा केली नाही पण भेदबुद्धीच्या वृत्तीस मात्र आम्ही दूषण दिले आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात नाहीतर मला या कामावाचून काय अडले होते ? ४

२१४० काहीं जडभारी । पडता ते भवसरीं ॥ १ ॥
तुज आठवावे पाय । आम्हीं मोकलूनि धाय ॥ २ ॥
तान पीडी भूक । शीत उष्ण वाटे दुःख ॥ ३ ॥
तुका म्हणे लाड । तेथें पुरें माझें कोड ॥ ४ ॥

---

१ दळणा वोज घडे, २ दूषिलेसे

शब्दार्थ व टीपा :- जडभारी-मोठे संकट, कोड-इच्छा.

अर्थ :- फार मोठे संकट देवा, जेव्हा आमच्यावर येऊन पडते, १ तेव्हा आम्ही तुझी आठवण करून धाय मोकलून रडतो २ आम्हांला तहान-भूक यांची पीडा झाली अथवा शीत-उष्ण यांचे दुःख झाले की आम्ही तुझी आठवण करू ३ तुकाराम महाराज म्हणतात, याच पायांशी माझे सर्व लाड व इच्छा पुऱ्या होतात. ४

२१४१ होऊनि कृपाळ । भार घेतला सकळ ॥ १ ॥
तूंचि चालविसी माझें । भार सकळ ही ओझें ॥ २ ॥
देह तुझ्या पायीं । ठेवुनि झालों उतराई ॥ ३ ॥
कायावाचामनें । तुका म्हणे दुजें नेणें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- कृपाळ-कृपाळू, दुजें-दुसरे.

अर्थ :- देवा, तू कृपाळू होऊन माझा सर्व भार घेतला आहेस १ माझा योगक्षेम देवा, तूच चालवीत आहेस. माझे ओझे तुझ्यावरच सर्व आहे २ मी हा माझा देह तुझ्याच पायावर ठेवून उतराई झालो आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी कायावाचामनेकरून तुझ्याशिवाय दुसऱ्या कुणालाच जाणीत नाही. ४

२१४२ आतां होईं माझे बुद्धीचा जनिता । अवरावें चित्ता पांडुरंगा ॥ १ ॥
येथूनियां कोठें न वजें बाहेरी । ऐसें मज धरीं सत्ताबळें ॥ २ ॥
अनावर गुण बहुतां जातींचे । न बोलावें वाचे ऐसें करीं ॥ ३ ॥
तुका म्हणे हित कोणिये जातीचें । तुज ठायें साचें मायबापा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा - जनिता-जन्म देणारा, न वजें-जाऊ नये.

अर्थ - पांडुरंगा, आता तू माझ्या बुद्धीस जन्म देणारा हो या भ्रमणाऱ्या चित्तास नीट आवरून धर. १ तुझ्याखेरीज इतर कुठे माझ्या चित्ताने जाऊ नये अशा सत्तेने तू मला धारलेसे कर. २ माझ्याजवळ आवरता न येणारे अनेक प्रकारचे दुर्गुण आहेत ते माझ्या मुखातून बाहेर न यावेत असे तू कर. ३ तुकाराम महाराज म्हणतात, मायबापा, माझे हित कशा प्रकारचे व कशात आहे तू जाणतोसच ४

२१४३ नित्य या मनासी करितो विचार । तों हें अनावर विषयलोभी ॥ १ ॥
आतां मज राखें आपुलिया बळें । न देखें हें जाळें उगवतां ॥ २ ॥
सांपडलों गळीं नाहीं त्याची सत्ता । उगळी मागुता घेतला तो ॥ ३ ॥
तुका म्हणे मी तो अज्ञानचि आहे । परि तुझी पाहें वास देवा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- अनावर-आवरता न येण्याजोगे, उगवतां-सुटण्याची.

अर्थ - मी माझ्या मनात सतत विचार करीत आहे, परंतु हे आवरता न येणारे मन विषयलोभी बनले आहे १ देवा, तू आता मला स्वतःच्या सामर्थ्यानेच राख मला काही या जाळ्यातून सुटण्याची सोय दिसत नाही. २ या माशाने गळ तोंडात धरल्याने तो आता चांगलाच सापडला असून त्यातून निसटण्याची शक्ती मात्र त्याच्या जवळ नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, मी तर फार अज्ञानीच असून तुझी वाट पाहात आहे ४

२१४४ दुर्बळाचे हातीं सांपडलें धन । करितां जतन नये त्यासी ॥ १ ॥
तैसी परी मज झाली नारायणा । योगक्षेम जाणा तुम्ही आतां ॥ २ ॥
खातां लेतां नये मिरविता वरि । राजा दंड करी जनराग ॥ ३ ॥
तुका म्हणे मग तळमळ उरे । देखिलें तें झुरे पाहावया ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- परी-प्रकार.

अर्थः- दुर्बळाच्या हातात धनसंपत्ती आल्यास त्याला तिचे रक्षण काही करता येत नाही १ नारायणा, तसाच प्रकार माझ्या बाबतीत झाला आहे. या माझ्या योगक्षेमाची सर्व व्यवस्था तुम्हीच आता करावी २ दरिद्री व दुर्बल माणसाला धनाचा उपयोग खाताना, दागदागिने वापरताना करता येत नाही, ते चोरीचे समजून राजा शिक्षा करतो तर लोक त्याचा रागराग करतात. ३ तुकाराम महाराज म्हणतात, जे उरलेले असते त्याकडे पाहून तळमळ करीत राहाणे मात्र शिल्लक राहाते ४

२१४५ मागें जैसा होता माझे अंगीं भाव । तैसा एक ठाव नाही आतां ॥ १ ॥
ऐसें गोही माझें मन मजपाशीं । तुटी मुदलेसी दिसे पुढें ॥ २ ॥
पुढिलांचे मना आणि गुणदोष । पूज्य आपणांस करावया ॥ ३ ॥
तुका म्हणे जाली कोंबडयाची परी । पुढेंचि उकरी लाभ नेणें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा - गोही-साक्षी, परी-प्रकारे.

अर्थ - पूर्वी देवाविषयी माझ्या मनात जो एक भाव होता त्याचा थोडाही अंश आज शिल्लक राहिलेला नाही १ याविषयी माझे मनच मला साक्ष देत आहे भावसंपत्तीच्या मुदलातच तूट येत आहे २ दुसऱ्याचे गुण-दोष मी माझ्या मनात आणून स्वतःचे मोठेपण वाढवितो ३ तुकाराम महाराज म्हणतात, माझी स्थिति एखाद्या कोंबडयाप्रमाणे झाली आहे. खाण्याच्या पदार्थासाठी ते उकिरडा उकरत उकरत पुढेच जाते व खाद्यपदार्थ त्याच्या पायांशीच असतो ४

२१४६ किती तुजपाशीं देऊं परिहार । जाणसी अंतर पांडुरंगा ॥ १ ॥
आतां माझें माझे हातीं देईं हित । करीं माझें चित्त समाधान ॥ २ ॥
राग आला तरी कापूं नये मान । बाळा मायेविण कोण दुजें ॥ ३ ॥
तुका म्हणे ऐसा होईल लौकिक । मागे बाळ भीक समर्थाचें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा .- परिहार-सांगणे, समर्थन, अंतर-मन

अर्थः- देवा, माझ्या स्थितीचे आता मी किती समर्थन करून सांगू रे ? पांडुरंगा, तू माझे मन सर्वस्वी जाणतोस १ आता माझे हित माझ्या हाती देऊन माझ्या चित्ताचे समाधान तू करावेस २ राग आला तरी तू माझी मान कापू नयेस आईशिवाय बालकास मायेचे दुसरे कोण असते ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी तुमचे बालक, समर्थाचे बाळ भीक मागत आहे असा तुमचा लौकिक होईल ना ! ४

२१४७ लाज वाटे पुढें तोंड दाखवितां । परि जाऊं आतां कोणापाशीं ॥ १ ॥
चुकलिया काम मागतो मुशारा । लाज फजितखोरा नाहीं मज ॥ २ ॥
पाय सोडूनियां फिरतो बासर । स्वामिसेवे चोर होऊनियां ॥ ३ ॥
तुका म्हणे मज पाहिजे दंडिलें । पुढें हे घडलें न पाहिजे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा - मुशारा-कामाचा मोबदला, बासर-सैरावैरा

अर्थः- देवा, यापुढे तुम्हाला तोंड दाखविण्याची भारी लाज वाटते पण मी आता जाऊ तरी कुणापाशी? १ मी तुमची सेवाचाकरी करण्याचे काम चुकवून त्याचा मोबदला मात्र मागत आहे असा या फजितखोर मला लाज

१ परिहर.

शब्दार्थ व टीपा .– व्हरलें-रूपांतरित झाले, पाझरले

अर्थ :– माझ्या चित्तात या श्रीहरीचे जे रूप होते तेच पाझरून माझ्या अनुभवास आले १ असे हे रूप मनात जवळच कधी असते, कधी आवडीने पुन पुन व्यक्ततास येत असते २ जे झालले तेच पुन झावेसे वाटते व ज्याची भेट घेतली आहे त्यालाच पुन भेटावेसे वाटते ३ तुकाराम महाराज म्हणतात, आम्ही आमच्या लोभाने तुम्हाला उभे केले आहे ४

२१६५ पोटीं शूळ अगीं उटी चंदनाची । आवडी सुखाची कोण तया ॥ १ ॥
तैसे मज कां गा केले पंढरिराया । लौकिक हा[1] वांयां वाढविला ॥ २ ॥
ज्वरिलियापुढें वाढिलीं मिष्टान्नें । काय चवी तेणें घ्यावी त्यांची ॥ ३ ॥
तुका म्हणे मढें शृंगारिलें वरी । तेंचि जाली परी मज देवा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – शूळ-शूळाची व्यथा, ज्वरिलियापुढे-ज्याला ताप आला आहे त्याच्या पुढे

अर्थ – ज्याला पोटाच्या शूळाची व्यथा आहे त्याच्या अगास चंदनाची उटी लावून काय उपयोग ? त्याला काय सुख होणार त्यापासून ? १ पंढरीराया, याप्रमाणे तू मला का केले आहेस ? तुझी प्राप्ती नसताना उगाचच हा माझा लौकिक का वाढविला आहे ? २ ज्याच्या अगात ताप आहे त्याच्या पुढे मिष्टान्ने वाढून काय उपयोग ? त्याने त्यांची काय चव घ्यावी ? ३ तुकाराम महाराज म्हणतात प्रेताला वरवर शृंगारतात त्याप्रमाणे देवा, माझी स्थिती झाली आहे ४

२१६६ वेगडाचा रंग राहे कोण काळ । अगें हे पितळ न घेसता ॥ १ ॥
माझें चित्त मज जवळीच गोही । तुझी मज नाहीं भेटी ऐसे ॥ २ ॥
दासीसुता नाहीं पितियाचा ठाव । अवघेंचि वाव सोंग त्याचें ॥ ३ ॥
तुका म्हणे माझी केली विटंबना । अनुभवें जना येईल कळों ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – गोही साक्ष, ग्वाही, पितियाचा-बापाचा, ठाव-पत्ता, वाव-व्यर्थ

अर्थ – वेगडाचे रूप पितळाप्रमाणे चकाकून दिसते, पण ही चमक किती वेळ टिकणार ? १ त्याप्रमाणे देवा, तुझीमाझी भेट झाली नाही तर होईल अशी ग्वाही माझे चित्त मलाच देत आहे २ दासीपुत्राला स्वतःच्या बापाचा काही पत्ता माहीत नसतो, त्यामुळे त्याचे कोणत्याही जातीचे आचरण व्यर्थच होते ३ तुकाराम महाराज म्हणतात, याप्रमाणे देवा, माझी विटंबना होत असल्याचा अनुभव सर्व जनांस कळून येईल ४

२१६७ मजपुढें नाहीं आणीक बोलता । ऐसें कांहीं चित्ता वाटतसे ॥ १ ॥
याचा कांहीं तुम्हीं देखावा[2] परिहार ॥ सर्वज्ञ उदार पांडुरंगा ॥ २ ॥
कामक्रोधें नाहीं सांडिलें आसन । राहिले बसोन देहामध्यें ॥ ३ ॥
तुका म्हणे आतां जालों उतराई । कळों यावें पायीं निरोपिलें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – आणीक दुसरा, परिहार-विचार

अर्थ – माझ्यापुढे दुसरा कोण बोलका आहे ? असे माझ्या चित्तास एकसारखे वाटत आहे १ सर्व जाणणाऱ्या उदारा पांडुरंगा, ही अवस्था दूर करण्यासबंधी तुम्ही विचार करा ना २ अजून माझ्या मनातील कामक्रोधांनी आपले स्थान सोडलेले नाही ते माझ्या देहातच स्थान बळकट करून आहेत ३ तुकाराम महाराज म्हणतात, ही माझी स्थिती समजून यावी म्हणून पायांशी ठेविली असून त्यामुळे मी आता उतराई बनलो आहे ४

---

१ व्हावया वाढविला २ देखा

शब्दार्थ व टीपा :– परी-प्रकार.

अर्थः– दुर्बळाच्या हातात धनसंपत्ती आल्यास त्याला तिचे रक्षण नाही करता येत नाही १ नारायणा, तसाच प्रकार माझ्या बाबतीत झाला आहे. या माझ्या योगक्षेमाची सर्व व्यवस्था तुम्हीच आता करावी. २ दरिद्री व दुर्बल माणसाला धनाचा उपयोग खाताना, दागदागिने वापरताना करता येत नाही; ते चोरीचे समजून राजा शिक्षा करतो तर लोक त्याचा रागराग करतात. ३ तुकाराम महाराज म्हणतात, जे उरलेले असते त्याकडे पाहून तळमळ करीत राहाणे मात्र शिल्लक राहाते.४

२१४५ मागें जैसा होता माझे अंगीं भाव । तैसा एक ठाव नाहीं आतां ॥ १ ॥
ऐसें गोही माझें मन मजपाशीं । तुटी मुदलेंसी दिसे पुढें ॥ २ ॥
पुढिलांचे मना आणि गुणदोष । पूज्य आपणांस करावया ॥ ३ ॥
तुका म्हणे जाली कोंबडयाची परी । पुढेंचि उकरी लाभ नेणें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:– गोही–साक्षी, परी–प्रकार.

अर्थ.– पूर्वी देवाविषयी माझ्या मनात जो एक भाव होता त्याचा थोडाही अंश आज शिल्लक राहिलेला नाही १ याविषयी माझे मनच मला साक्ष देत आहे. भावभक्तीच्या मुदलातच तूट येत आहे. २ दुसऱ्याचे गुण-दोष मी माझ्या मनात आणून स्वतःचे मोठेपण वाढवितो. ३ तुकाराम महाराज म्हणतात, माझी स्थिति एखाद्या कोंबड्याप्रमाणे झाली आहे. खाण्याच्या पदार्थासाठी ते उकिरडा उकरत उकरत पुढेच जाते व खाद्यपदार्थ त्याच्या पायाशीच असतो ४

२१४६ किती तुजपाशीं देऊं परिहार[1] । जाणसी अंतर पांडुरंगा ॥ १ ॥
आतां माझें माझें हातीं देईं हित । करीं माझें चित्त समाधान ॥ २ ॥
राग आला तरी कापूं नये मान । बाळा मायेविण कोण दुजें ॥ ३ ॥
तुका म्हणे ऐसा होईल लौकिक । मागें बाळ भीक समर्थाचें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– परिहार–सांगणे, समर्थन, अंतर–मन.

अर्थः– देवा, माझ्या स्थितीचे आता मी किती समर्थन करून सांगू रे ? पांडुरंगा, तू माझे मन सर्वस्वी जाणतोस. १ आता माझे हित माझ्या हाती देऊन माझ्या चित्ताचे समाधान तू करावेस २ राग आला तरी तू माझी मान कापू नयेस. आईशिवाय बालकास मायेचे दुसरे कोण असते ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी तुमचे बालक, समर्थाचे बाळ भीक मागत आहे असा तुमचा लौकिक होईल ना ! ४

२१४७ लाज वाटे पुढें तोंड दाखवितां । परि जाऊं आतां कोणापाशीं ॥ १ ॥
चुकलिया काम मागतों मुशारा । लाज फजितखोरा नाहीं मज ॥ २ ॥
पाय सोडूनियां फिरतों वासर । स्वामिसेवे चोर होऊनियां ॥ ३ ॥
तुका म्हणे मज पाहिजे दंडिलें । पुढें हें घडलें न पाहिजे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– मुशारा–रागाचा मोबदला, वासर–सैरावैरा.

अर्थः– देवा, यापुढे तुम्हाला तोंड दाखविण्याची भारी लाज वाटते पण मी आता जाऊ तरी कुणापाशी? १ मी तुमची सेवाचाकरी करण्याचे काम चुकवून त्याचा मोबदला मात्र मागत आहे. अशा या फजितखोर मला लाज

[1] परिहर.

शब्दार्थ व टीपा :– जडभारी–मोठे संकट, कोड–इच्छा

अर्थ :– फार मोठे संकट देवा, जेव्हा आमच्यावर येऊन पडते, १ तेव्हा आम्ही तुझी आठवण काढून धाय मोकलून रडतो २ आम्हांला तहान-भूक याची पीडा झाली अथवा शीत-उष्ण यांचे दुःख झाले की आम्ही तुझी आठवण करू ३ तुकाराम महाराज म्हणतात, याच पायांशी माझे सर्व लाड व इच्छा पुऱ्या होतात. ४

२१४१ होऊनि कृपाळ । भार घेतला सकळ ॥ १ ॥
तूंचि चालविसी माझें । भार सकळ ही ओझें ॥ २ ॥
देह तुझ्या पायीं । ठेवुनि झालो उतराई ॥ ३ ॥
कायावाचामनें । तुका म्हणे दुजें नेणें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – कृपाळ–कृपाळू, दुजें–दुसरे

अर्थ – देवा, तू कृपाळू होऊन माझा सर्व भार घेतला आहेस १ माझा योगक्षेम देवा, तूच चालवीत आहेस माझे ओझे तुझ्यावरच सर्व आहे २ मी हा माझा देह तुझ्याच पायावर ठेवून उतराई झालो आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी कायावाचामनेकरून तुझ्याशिवाय दुसऱ्या कुणासच जाणीत नाही ४

२१४२ आतां होई माझे बुद्धीचा जनिता । अवरावे चित्ता पांडुरंगा ॥ १ ॥
येथूनिया कोठें न वजें बाहेरी । ऐसें मज धरीं सत्ताबळें ॥ २ ॥
अनावर गुण बहुतां जातींचे । न बोलावे वाचे ऐसें करीं ॥ ३ ॥
तुका म्हणे हित कोणिये जातीचें । तुज ठावें साचें मायबापा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – जनिता–जन्म देणारा, न वजें–जाऊ नये

अर्थ – पांडुरंगा, आता तू माझ्या बुद्धीस जन्म देणारा हो या भ्रमणाऱ्या चित्तास नीट आवरून धर. १ तुझ्याखेरीज इतर कुठे माझ्या चित्ताने जाऊ नये अशा सत्तेने तू मला आपलेसे कर. २ माझ्याजवळ आवरता न येणारे अनेक प्रकारचे दुर्गुण आहेत ते माझ्या मुखातून बाहेर न यावेत असे तू कर. ३ तुकाराम महाराज म्हणतात, मायबापा, माझे हित कशा प्रकारचे व कशात आहे तू जाणतोसच ४

२१४३ नित्य या मनासी करितो विचार । तों हें अनावर विषयलोभी ॥ १ ॥
आतां मज राखें आपुलिया बळें । न देखें हें जाळें उगवतां ॥ २ ॥
सांपडलों गळीं नाहीं त्याची सत्ता । उगळी मागुता घेतला तो ॥ ३ ॥
तुका म्हणे मी तो अज्ञानचि आहे । परि तुझी पाहे वास देवा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – अनावर–आवरता न येण्याजोगे, उगवतां–सुटण्याची.

अर्थ – मी माझ्या मनात सतत विचार करीत आहे परंतु हे आवरता न येणारे मन विषयलोभी बनले आहे १ देवा, तू आता मला स्वतःच्या सामर्थ्यानेच राख मला काही या जाळ्यातून सुटण्याची सोय दिसत नाही. २ या माशाने गळ तोंडात धरल्याने तो आता चांगलाच सापडला असून त्यांतून निसटण्याची शक्ती मात्र त्याच्या जवळ नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, मी तर फार अज्ञानीच असून तुझी वाट पाहात आहे ४

२१४४ दुर्बळाचे हातीं सांपडलें धन । करितां जतन नये त्यासी ॥ १ ॥
तैसी परी मज झाली नारायणा । योगक्षेम जाणां तुम्ही आतां ॥ २ ॥
खातां लेतां नये मिरवितां वरि । राजा दंड करी जनराग ॥ ३ ॥
तुका म्हणे मग तळमळ उरे । देखिलें तें पुरे पाहावया ॥ ४ ॥

२१५१ पाळिलों पोसिलों जन्मजन्मांतरीं । वागविलों करीं धरोनियां ॥ १ ॥
आतां काय माझा घडेल अव्हेर । मागें बहु दूर वागविलें ॥ २ ॥
नेदी वारा अंगीं लागों आघाताचा । घेतला ठायींचा भार माथां ॥ ३ ॥
तुका म्हणे बोल करितों आवडी । अविट तेचि गोडी अंतरींची ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- करीं-हातात, आघाताचा-संकटाचा.

अर्थ - देवा, पूर्वी अनेक जन्मी तुम्ही माझे पालनपोषण चांगल्या प्रकारे केले. आम्हांला हातात धरून वागविले. १ पूर्वी खूप दूरच्या काळातही मला आपल्या बरोबर वागविले. आणि आताच माझा अव्हेर कराल काय? २ आमच्या अंगावर कोणत्याही प्रकारच्या संकटांचा वारा येऊ नये म्हणून माझे सर्व ओझे तुम्ही स्वत च्या शिरावर घेतले आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, माझ्या मनात जी अवीट अशी गोडी निर्माण झाली आहे. तिच्याविषयीच मी मोठ्या प्रेमाने बोलत आहे. ४

२१५२ पांडुरंगा कांहीं आइकावी मात । न करावें मुक्त आतां मज ॥ १ ॥
जन्मांतरें मज ऐसी[1] देई देवा । जेणें चरणसेवा घडे तुझी ॥ २ ॥
वाखाणीन कीर्ती आपुलिया मुखें । नाचेन मी सुखें तुजपुढें ॥ ३ ॥
करूनि कामारी दास दीनाहुनी । आपुला[2] अंगणीं ठाव मज ॥ ४ ॥
तुका म्हणे आम्ही मृत्युलोकी भले । तुझेचि अंकिले पांडुरंगा ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा.- मात-गोष्ट, हकीकत, कामारी-काम करणारा, अंकिले-स्वाधीन.

अर्थ :- पांडुरंगा, माझी एक गोष्ट ऐका ना. मला तुम्ही कधीच मुक्त करू नका. १ ज्यामुळे तुमची चरणसेवा सतत होईल असेच जन्म देवा, मला पुन पुन. द्यावेत. २ त्यामुळे मी तुझी कीर्ती स्वत च्या मुखाने गाईन आणि भक्तीने तल्लीन होऊन मी तुझ्यापुढे नाचेन. ३ अत्यंत दीन असा काम करणारा सेवक करून मला तुमच्या अंगणात आश्रय द्या. ४ तुकाराम महाराज म्हणतात, आम्हांला हा मृत्युलोकच भला वाटतो. आम्ही तुझे आज्ञाधारक दास आहोत तेच बरे. ५

विवरण-साधुसंताना स्वर्गाची, मुक्तीची किंवा मोक्षाची चर्चा कधीच नसते, हा विषय पूर्वी अनेकदा येऊन गेलेला आहे. ईश्वराच्या निर्गुणनिराकार स्वरूपात एकरूप होऊन जाणे, पुनर्जन्म, संसारदुःख, इंद्रियाचे विषय, पापपुण्य, स्वर्गनर्क इत्यादी द्वंद्वांतून सुटणे आणि सहजस्थितीत, आत्मानंदात रमून जाणे ही मुक्तीची स्थूल कल्पना. आपण संसारात बद्ध आहोत, त्यातून मुक्त होऊन ईश्वरस्वरूपाशी मिळण्यासाठी सारी साधने खटपट करतात. परंतु संतानी बद्धतेची कल्पनाच काढून टाकिली. 'मुक्त कासया म्हणावें । बंधनचि नाहीं ठावें' अशी अवस्था त्यानी वर्णन केली आहे यांशिवाय वरवरचे बंधन वाटते त्याचेही रूप नीट निरखून पाहिल्यावर, बोधाच्या दृष्टीने त्याकडे पाहिल्यावर तेही बंधन वाटतच नाही. आणखी असे की, एकदा मुक्त झाले की संपले सर्व ! तो संतसहवास, ते सगुणरूपदर्शन, ती अंत करणातील हुरहूर, ती प्रेमाची प्रतीक्षा, ते शुभशकुन, तो वरकरणीचा खोटा कलह, ती शाब्दिक भांडणाची चमक, ती व्यग्र मनाची तळमळ, ते मीलनाचे सुख, नामचिंतनाचे ते समाधान इत्यादींची गोडी मुक्तीच्या अवस्थेत कुठून पाहायला-भोगायला मिळणार ? म्हणूनच साधुसंत मुक्तीला, मोक्षाला अव्हेरून अनेक जन्माची होम धरतात. संतसंग, चरणसेवा, नामस्मरण, कीर्तनभजन, आणि रूपदर्शन यातील आनंदापेक्षा मुक्ती कोण श्रेष्ठ मानणार ? हा सगुण देह नाना साधनांनी कष्टवायचा, त्याचा नाश करायचा आणि मग मुक्तीचे सुख अनुभवायचे, हेही संतांना मान्य नाही. हा देह, हा प्रपंच, हे पंचविषय निर्माण कुठून झाले ? या प्रश्नाच्या

१ तैसी, २ आपले

वाटत नाही २ मी तुमचे पाय सोडून इतरत्र संतावरा भटकतो तुमच्या सेवेत मात्र त्यामुळे उणीव निर्माण झाली ३ तुकाराम महाराज म्हणतात, यापुढे असे काही न घडावे म्हणून मला चांगली शिक्षाच झाली पाहिजे ४

२१४८ पुढिलिया सुखें निंब देता भले। बहुत वारले होय दुःख ।। १ ।।
हे तो वर्म असे माउलीचे हातीं। हाणी मारी प्रीती हितासाठीं ।। २ ।।
खेळता विसरे भूक तान घर। धरूनिया कर आणी बळें[1] ।। ३ ।।
तुका म्हणे पाळी[2] तोंडींचिया घासे। उदार सर्वस्वे सर्वकाळ ।। ४ ।।

शब्दार्थ व टीपा – वारले–दूर गाल

अर्थ – पुढे चांगले सुख मिळावे म्हणून कडुलिंबाचे औषध देणे हितकारक आहे त्यामुळे पुढील दुःख दूर झाल्यासारखे होते १ असे हे वर्म आईच्या हातात असते ती आपल्या लेकराना मारहाण करीत असली तरी ते सारे हितासाठीच असते २ मूल खेळता खेळता तहानभूक विसरून जाते पण त्याची आई मात्र त्याला त्याचा हात धरून बळेन ओढून आणीत असते ३ तुकाराम महाराज म्हणतात तोंडचा घास देऊन याप्रमाण आई आपल्या मुलाचे पालनपोषण करीत असते ती सतत उदारच असते ४

२१४९ आता गुण दोष काय विचारिसी। मी तो आहे रासी पातकाची ।। १ ।।
पतितपावनासवे समागम। अपुलाला धर्म चालवीजे ।। २ ।।
घनघायें[3] भेटी लोखंडपरिसा। तरी अनारिसा न पालटे ।। ३ ।।
तुका म्हणे माती कोण पुसे फुका। कस्तुरीच्या तुका समागमें ।। ४ ।।

शब्दार्थ व टीपा – रासी–रास, ढीग घनघायें–घणाच्या घावान फुका फुकट, तुका–तुलनेन सहवासान

अर्थ — देवा, आता माझ गुणदोष काय विचारता ? मी तर पातकाची रासच आहे १ परंतु नहमी पतीत पावनाचा सहवास असल्यान ठीक दोघही आपापला धर्म सांभाळीत आहेत २ लोखंडी घणाच्या घावान जरी लोखडाची व परिसाची भेट झाली तरी इतर काही न होता लोखडाचे सुवर्णच होते ३ तुकाराम महाराज म्हणतात, एरवी मातीस फुकट तरी कोण विचारतो ? पण कस्तुरीच्या सहवासान तिचा मोल चढते ४

२१५० कृपावंता दुजें नाहीं तुम्हा पोटीं। लाडे बोले गोठी[4] सुख मातें ।। १ ।।
घेउनि भातुकें लागसील पाठी। लाविसील ओंठीं ब्रह्मरस ।। २ ।।
आपुलिये पाख घालिसी पाखर। उदार मजवर कृपाळू तू ।। ३ ।।
तुका म्हणे आम्हाकारणे गोविंदा। वागविसी गदा सुदर्शन ।। ४ ।।

शब्दार्थ व टीपा – दुजें–दुजाभाव गोष्ठी–गोष्टी भातुकें–खाऊ

अर्थ :– देवा कृपावंता, तुमच्या पोटात दुजाभाव नाही यासाठी तुम्ही व आम्ही एकत्र येऊन मोठ्या प्रेमान सुखाच्या गोष्टी करू हेच मला मोठ सुख आहे १ हातात खाऊ देऊन तू आपल्या बालकांच्या माग लाग तोस त्यांच्या मुखात ब्रह्मरस घालतोस २ आपल्या स्वतःच्या पंखाची छाया त्यांच्यावर करितोस असा तू माझ्या वरही फार मोठा कृपाळ व उदार आहेस ३ तुकाराम महाराज म्हणतात गोविंदा, तू आमच्यासाठीच हातात गदा, सुदर्शन इत्यादी आयुधे वागवीत आहेस ४

१ बळ, २ पोळा, ३ घण घायी भेटी लोखडा परीसा ४ गोष्टी ५ वदा

कथा मंत्रजप कथा हरी ताप । कथाकाळीं कांप कळिकाळासी ॥ ४ ॥
तुका म्हणे कथा देवाचें हो[1] ध्यान । समाधि लागोन उभा तेथें[2] ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– हरी–दूर करते, नासी–नाश करते.

अर्थ – श्रीहरीची कथा दुःख दूर करते. तीच संसारातून मुक्त करते. अशी या विठोबाची कथा फार चांगली आहे. १ कथेमुळे पापाचा नाश होतो. दोषी लोकांचा उद्धार होतो आणि जे मूढ आहेत त्यांना कथेमुळें समाधीच लागते. २ कथा हेच तप व ध्यान असून तिला अनुष्ठानाचेही महत्त्व आहे. हरिकथा ही अमृताच्या सेवनाप्रमाणे आहे. ३ कथा हाच मंत्रजप असून कथा सर्व प्रकारचे ताप हरण करते कथेच्या वेळी प्रत्यक्ष यमाचाही भीतीनें थरकाप होतो ४ तुकाराम महाराज म्हणतात, कथा हे देवाचेही ध्यान असून तो कथेत समाधिस्थ होऊन उभा असतो ५

विवरण –हरिकथा हेच कलियुगात सर्वश्रेष्ठ व सर्वात सोपे असे साधन सांगितले आहे. जप, तप, ध्यान, मंत्र, तीर्थयात्रा या सर्व गोष्टी हरिकथेने साधतात देवाचे अस्तित्व याच कथेमध्ये मूर्तिमत असते. ' अखंड तेथें पांडुरंग । कीर्तनीं नाचतसे अभंग ॥ .. नाम घेता धावे विठ्ठल । नलगे तप नलगे मोल । कष्ट न लगती बहुसाल ॥ हा कृपाळु दीनाचा ' अशी साक्ष नामदेवाची आहे. या कीर्तनाच्या प्रेमासाठी देव वैकुंठीहून धावत येतो. या देवास कीर्तनची आवड किती आहे ? ' नवल वैकुंठींच नसे । तो कीर्तनीं नाचतसे ॥ भाळयाभोळयासाठीं । धावे त्याच्या पाठोपाठी ॥ " ' देवासी प्रिय होय कीर्तन । नाचे येऊन आनंदें ॥ न विचारी यातीकुळ । असोत अमंगळ भलतैसे ॥ अशी या कीर्तनाची आवड भगवतास असल्याचे एकनाथांनी म्हटले आहे ' कीर्तन ते पूजा कीर्तन ते भक्ति । कीर्तन होय मुक्ति सर्व जीवा ॥ पातकी चांडाळ असोत भलते । कीर्तनीं तरते कलियुगीं ॥ " असा महिमा त्यांनी कलियुगाचा वर्णन केला आहे. या एका सोप्या साधनाचा उपभोग आबालवृद्धांना होत असल्याची साक्ष साधुसंताची आहे.

२१५५ काय ऐसा सांगा । धर्म मज पांडुरंगा ॥ १ ॥
तुझे पायीं पावे ऐसा । जेणें उगवे हा फांसा ॥ २ ॥
करीं कृपादान । तैसें बोलवीं वचन ॥ ३ ॥
तुका म्हणे देवा । माझें हृदय वसवा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – उगवें–सुटेल, फांसा–गुंता, पाश

अर्थ :–पांडुरंगा, असा एखादा धर्म मला सांगा ना १ ज्यामुळे मी तुमच्या पायी येऊन पावेन व संसारपाशातून माझी सुटका होईल. २ माझ्यावर कृपा करशील अशी वचने माझ्याकडून देवा, तुम्ही बोलवा ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, माझ्या हृदयात तुम्ही वस्ती करा ४

२१५६ मला म्हणे जन । परि नाहीं समाधान ॥ १ ॥
माझें तळमळी चित्त । अंतरलें दिसे हित ॥ २ ॥
कृपेचा आधार । नाहीं दंभ जाला भार ॥ ३ ॥
तुका म्हणे कृपें[3] । अंतराय कोण्या पापें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – अंतराय–तुटी, अंतर, दुरता.

अर्थ – लोक मला चांगले म्हणतात, पण त्यामुळे माझ्या मनास मात्र समाधान नाही. १ माझ्या हितास अंतर पडलेले असल्यामुळे माझे चित्त एकसारखे तळमळत असते २ तुमच्या कृपेचा आधार काहीच नाही आणि

---

१ हें, २ फार, ३ रूपें

उत्तराच्या शोधात सर्व काही गवसणारे आहे. मेल्यानंतर, देहत्यागानंतर मोक्ष आम्हास मिळेल असे म्हणणाऱ्या लोकाना श्रीज्ञानदेवानी मूर्ख म्हटले आहे. 'दीप गेल्यावरी कैचा जो प्रकाश?' असा प्रश्न त्यानी केला आहे 'आहे मी हा कोण करावा विचार' हाच एक सर्वसुखाचा श्रेष्ठ मार्ग आहे.

पंढरपूरची वारी सोडून, सत्संग सोडून, कोण मुक्तीच्या मागे लागणार? ईश्वराचे पाय अंतरून मुक्तीची आशा कोण करणार? चुकून ईश्वराने मुक्ती दिलीच तर? तर मग नामदेव म्हणतात, 'मग मी काय करू वैकुंठनायका। ऐसा प्रेमसुखा कोठें पाहू?' 'झणी मुक्तिपद देसी पांडुरंगा। मग या सतसंगा कोठें पाहो?। मग हे पंढरी आनंद सोहळा। कवणाचे डोळां पाहो देवा॥ मग हें हरिकथा अमृत संजीवनी। कवणाचे श्रवणीं ऐकों देवा?' अशी ही अवस्था मुक्तीच्या भयानें नामदेवाची झालेली दिसते फुकटची मुक्तीही कुणी मग पत्करीत नाहीत. वाळवटात संत दीनरूप घेऊन हिंडतील, पण मुक्तीकडे पाठ फिरवितील. नामदेवानी तर मोक्षालाच संताचे दास बनविले आहे 'दोन्ही कर जोडूनि मोक्ष पाहे वास। म्हणे होईन दास हरिदासांचा,' 'भक्तांचिया पायां पडे पुढता पुढती। मज करा सांगाती मोक्ष म्हणे।'

गर्भवासास व पुनर्जन्मास भिण्याचे काय कारण? जन्म घेण्यामुळेच संतसेवा घडेल, प्रभूचे सगुण दर्शन होईल श्रीएकनाथ महाराजानी म्हटले आहे, 'गर्भवासा भीती ते आंधळे जन। मुक्तिसी कारण नाहीं आम्हा॥ गर्भवास झालिया संतसेवा घडती। मुक्त झालिया न फळे भगवद्भक्ती॥ आम्ही सुखें गर्भवास घेऊं देवा। मुक्तीचिया मस्तकीं पाय देऊं॥' मुक्त झालो याच कल्पनेत बद्ध होतो ही वृथा समजूत असल्याने मुक्ती खरी नव्हे असे सांगताना एकनाथानी म्हटले आहे, 'सुटलों म्हणता बांधला होता। मुक्त म्हणे त्याचे अंगीं ये बद्धता॥ बद्धता नाहीं जेथें मुक्त ते काई। भ्रांती दो ठाई झोंबतसे॥' आणि हीच कल्पना तुकोबाची आहे. 'मोक्षपदें तुच्छ केलीं या कारणें। आम्हा जन्म घेणें युगायुगीं।' आणि हे अनेक जन्म कशासाठी? कोणता हेतू संताच्या मनात असतो? 'एका हातीं टाळ एका हातीं चिपुळिया। घालिती हुमरी एक वाहताती टाळिया॥ मातले वैष्णव नटती नाना छंदें। नाहीं चाड मोक्षपदीं भजनीं आवडी॥' या सुखासाठी मनुष्यजन्माची, देहाची हौस साधुसंताना असते.

२१५३ माझे अंतरींचे तोचि जाणे एक। वैकुंठनायक पांडुरंग॥ १॥
जीव भाव त्याचे ठेवियेला पायीं। मज चिंता नाही कवणेविशीं॥ २॥
सुखसमारंभें संतसमागमें। गाऊं वाचे नाम विठोबाचें॥ ३॥
गाता पुण्य होय आइकतां लाभ। संसारबंद तुटतील॥ ४॥
तुका म्हणे जीव तयासी विकिला। आणीक विठ्ठलाविण नेणें॥ ५॥

शब्दार्थ व टीपा – अंतरींचे–मनातील.

अर्थ – हा वैकुंठनायक पांडुरंगच फक्त आमच्या मनातील भाव ओळखतो. १ त्याच्याच पायांवर मी माझा जीवभाव ठेवून दिलेला आहे, आता मला कशाचीही चिंता करण्याचे कारण नाही. २ मोठ्या समारंभपूर्वक व सुखाने संतसहवासात या विठोबाचे नाम प्रेमाने गाऊ ३ या गाण्यामुळे पुण्य होते व ऐकण्याने लाभच पदरी पडतो आणि शेवटी संसारबंधने तुटून जातात ४ तुकाराम महाराज म्हणतात, मी माझा हा जीव त्या विठ्ठलासच विकला आहे, त्याच्याशिवाय मी दुसरे काही जाणीतच नाही ५

२१५४ कथा दुःख हरी कथा मुक्त करी। कथा याचि थोरी विठोबाची॥ १॥
कथा पाप नासी उद्धरिले दोषी। समाधि कथेसी मूढजना॥ २॥
कथा तप ध्यान कथा अनुष्ठान। अमृत हें पान हरिकथा॥ ३॥

२१६८ सावित्रीचें विटंबण । रांडपण करीतसे ॥ १ ॥
काय जाळावें तें नांव । अवघें वाव असे तें ॥ २ ॥
कुबेर नांव मोळी वाहे । कैसी पाहें फजिती ॥ ३ ॥
तुका म्हणे ठुणगुण देखें । उगीं मूर्ख फुंदतां ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपाः- वाव-व्यर्थ, ठुणगुण-दांभिकपणा, फुंदणे-घमेंड करणे.

अर्थः- एखाद्या स्त्रीचे नाव सावित्री असून ती रांडपणा करीत असेल तर त्या नावाचा काय उपयोग ? १ त्या नावाला काय जाळायचेय ? सर्वच व्यर्थ आहे मग. २ एखाद्याचे नाव मात्र कुबेर; आणि धंदा मात्र मोळी वाहण्याचा केवढी ही फजीती पाहा ना ३ तुकाराम महाराज म्हणतात, उगाच दांभिकपणा दाखवून व्यर्थ का घमेंड करता ? ४

२१६९ न गमेसी जाली दिवसरजनी । राहिलों लाजोनि नो[1] बोलावें ॥ १ ॥
रुचिविण काय शब्द वाऱ्या माप । अनादरें कोप येत असे ॥ २ ॥
आपुलिया रडे आपुलेंचि मन । दाटे समाधान पावतसे ॥ ३ ॥
तुका म्हणे तुम्ही असा जी जाणते । काय करूं रिते वादावाद ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा.- न गमेसी-करमेनासे, रजनी-रात्र, कोप-तिटकारा, राग

अर्थ :- देवा, तुझ्याशिवाय मला रात्रदिवस करमेनासे झाले आहे. पण लाजेमुळे मला न बोलवल्यामुळे मी तसाच मूक राहिलो आहे. १ माझ्या शब्दाची रुची तुम्हांस काहीच दिसत नाही. वाऱ्यास मोजल्याप्रमाणे ते व्यर्थच होत असल्याने या अनादरामुळे मला तुमचा रागच येत आहे २ आपले मन आपल्या ठिकाणी रडत असते व मग आपण होऊनच समाधान पावते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा; हे सर्व तुम्ही जाणीत आहात, उगाच मी व्यर्थ वादविवाद कशासाठी करू ? ४

२१७० मेल्यावरि मोक्ष संसारसंबंध । आरालिया बद्ध ठेवा आम्हां ॥ १ ॥
वागवीत संदेह राहों कोठवरी । मग काय थोरी सेवकाची ॥ २ ॥
गाणें गीत आम्हां नाचणें आनंदें । प्रेम कोठें भेदें अंगा येतें ॥ ३ ॥
तुका म्हणे किती सांगावे दृष्टांत । नसतां तूं अनंत सानुकूळ ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- आरालिया-विश्रांती घेतल्यावर, संदेह-संशय.

अर्थ - देवा, आम्ही तुमच्या ठिकाणी विश्रांती घेण्यास आल्यावर आम्हास बद्ध करून ठेविता. पण मेल्या-नंतर आम्हास संसारबंधन उरणार की मोक्ष मिळणार ? हे काय समजावे ? १ अशा प्रकारचा संशय मी कुठवर वागवू ? यात तुमच्या सेवकाचा थोरपणा तो काय राहिला ? २ आम्ही तुमचे गीत गाऊन तुमच्या पुढे प्रेमाने व आनंदाने नाचावे पण वरील प्रकारचा भेद अथवा संशय मनात असल्यावर असे प्रेम अंगी कुठून येणार ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, असे आणखी किती दृष्टान्त द्यावेत ? अनंता, तू जर अनुकूल नसशील तर काय त्याचा उपयोग ? ४

२१७१ एकाएकीं आतां असावेंसे वाटे । तरिच हे खोटे चाळे केले ॥ १ ॥
वाजवूनि तोंड घातलों[2] बाहेरी । कुल्प[3] फवनी दारीं माजी वसा ॥ २ ॥

१. न २ घातले ३. कर्ले

शब्दार्थ व टीपा :– पालटे–रूपांतरित झाले, पाझरले

अर्थ :– माझ्या चित्तात या श्रीहरीचे जे रूप होते तेच पाझरून माझ्या अनुभवास आले १ असे हे रूप मनात जवळच कधी असते, कधी आवडीने पुन पुन व्यक्तास येत असते २ जे खाल्ले तेच पुन खावेसे वाटते, व ज्याची भेट घेतली आहे त्यालाच पुन भेटावेसे वाटते ३ तुकाराम महाराज म्हणतात, आम्ही आमच्या लोभाने तुम्हाला उभे केले आहे ४

२१६५ पोटी शूळ अगीं उटी चंदनाची । आवडी सुखाची कोण तया ॥ १ ॥
तैसें मज का गा केलें पंढरिराया । लौकिक हा वाया वाढविला ॥ २ ॥
ज्वरिलियापुढें वाढिलीं मिष्टान्नें । काय चवी तेणें घ्यावी त्याची ॥ ३ ॥
तुका म्हणे मढें शृंगारिलें वरी । तेचि जाली परी मज देवा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – शूळ–शूळाची व्यथा, ज्वरिलियापुढे–ज्याला ताप आला आहे त्याच्या पुढे

अर्थ – ज्याला पोटाच्या शूळाची व्यथा आहे त्याच्या अंगास चंदनाची उटी लावून काय उपयोग ? त्याला काय सुख होणार त्यापासून ? १ पंढरीराया, याप्रमाणे तू मला का केले आहेस ? तुझी प्राप्ती नसताना उगाचच हा माझा लौकिक का वाढविला आहे ? २ ज्याच्या अंगात ताप आहे त्याच्या पुढे मिष्टान्ने वाढून काय उपयोग ? त्याने त्यांची काय चव घ्यावी ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, प्रेताला वरवर शृंगारतात त्याप्रमाणे देवा, माझी स्थिती झाली आहे ४

शब्दार्थ व टीपा:— वाड–थोर, मोठे, दीपक–दिवा, सांगातीं–बरोबर, चाड–गरज

अर्थ :– देवा, आता माझे सर्व ओझे तुम्ही तुमच्या शिरावर घ्यावे. १ आम्ही तुमच्या पोटी दगड जन्मास आलो आहोत, त्याला काय करायचे ? तुम्हीच आमचे मन आता मोठे करा. २ आमचे डोळे व प्रकाश देणाऱ्या दिव्याची वातही तूच होऊन आमच्या बरोबर चल. ३ तुकाराम महाराज म्हणतात, आम्हांला यासबंधी आता दुसरा विचार करण्याची गरज नाही ४

२१६१ असोत हे बोल । अवघें तूंचि भांडवल ॥ १ ॥
माझा मायबाप देवा । सज्जन सोयरा केशवा ॥ २ ॥
गाळियेले भेद । सारियेले वादावाद ॥ ३ ॥
तुका म्हणे मधीं । आतां न पडे उपाधि ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:– गाळियेले–संपविले, सारियेले–संपविले, नष्ट केले

अर्थ .– आता मी जे बोललो ते असू द्या. देवा, तूच तर आमचे सर्व भांडवल आहेस. १ तूच माझा सज्जन, सोयरा, माय, बाप आहेस. २ तुम्हीच सर्व भेद संपविले व वादविवाद नष्ट केले. ३ तुकाराम महाराज म्हणतात, आता मी कोणत्याही उपाधीत कधी पडणार नाही. ४

२१६२ करीन कोल्हाळ । आतां हाचि सर्वकाळ ॥ १ ॥
आतां ये वो माझे आई । देईं भातुकें विठाई ॥ २ ॥
उपायासी नाम । दिलें याचें पुढें क्षेम ॥ ३ ॥
बीज आणि फळ । हेचि तुका म्हणे मूळ ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:– कोल्हाळ–अट्टहास, गोंगाट, कटकट, उपायासी–योगक्षेमासाठी, निर्वाहासाठी

अर्थ :– देवा, आता सदासर्वकाळ मी कटकट करीत राहाणार आहे. १ विठाई. माते, आता तू धावून ये व मला प्रेमाचे भातुके दे २ योगक्षेमासाठी तू आम्हांस तुझे नाम हे एक साधन दिले आहेस, तेच कल्याणदायक आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, बीज आणि फळ या सर्वांचे मूळ नाम हे एकच आहे. ४

२१६३ धनासींच धन । करी आपण[1] जतन ॥ १ ॥
तुज आळवितां गोडी । पांडुरंगा खरी जोडी ॥ २ ॥
जेविल्याचें खरें । वरी उमटे ढेंकरें ॥ ३ ॥
तुका म्हणे धाय । तेथें कोठें उरे हाय ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा.– जोडी–प्राप्ती, धाय–तृप्ती

अर्थ – धन स्वत चे रक्षण स्वत च करीत असते. १ त्याप्रमाणे पांडुरंगा, तुला आळविण्यात मला गोडी वाटते व त्यामुळेच तुझी प्राप्ती होते २ पोटभर जेवण झाल्याचे ढेकर आल्यानेच समजते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, एकदा तृप्ती झाल्यावर मग तळमळ कुठून उरणार ? ४

२१६४ अनुभवा आले । माझे चित्तींचे क्षरलें ॥ १ ॥
असे जवळी अंतरे[2] । फिरे आवडीच्या फेरें ॥ २ ॥
खादलेंचि खाटे । खावें भेटलेंचि भेटे ॥ ३ ॥
तुका म्हणे उमें । आम्ही राखियेलें लोभें ॥ ४ ॥

१. आपणा २. अतर

साधुत्वाच्या दमाची तर वाढ लोकात फार झाली आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, कोणत्या पापामुळे देवा, तुमच्या कृपेत कमतरता पडत आहे हे काही समजत नाही ४

२१५७ शिकविले बोल । बोलें तैसी नाहीं ओल ॥ १ ॥
आता देवा संदेह नाहीं । वाया गेलों यासी काहीं ॥ २ ॥
एकांताचा वास । नाहीं संकल्पाचा नास ॥ ३ ॥
बुद्धि नाहीं स्थिर । तुका म्हणे शब्दा धीर ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – ओल–भावना, अंतःकरणाची वृत्ती संदेह–शंका

अर्थ – जसे देवा, तुम्ही शिकविले तसे बोल मी बोलतो पण त्याप्रमाणे अंतःकरणाची वृत्ती बनत नाही १ देवा, आता माझा जन्म वायाच गेला यात कसलीही शंका नाही २ नाना संकल्पाचा नाश होऊन प्रभुप्राप्तीचा एकांत काही मला प्राप्त झालेला नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, माझी बुद्धी स्थिर नाही आणि माझ्या शब्दातही निश्चय नाही ४

२१५८ उचिताचा दाता । कृपावंता तू अनंता ॥ १ ॥
का रे न घलिसी धांव । तुझें उच्चारिता[१] नांव ॥ २ ॥
काय बळयुक्ति । नाहीं तुझे अंगीं शक्ति ॥ ३ ॥
तुका म्हणे तू विश्वंभर । ओस माझें का अंतर ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – ओस–रिकामे, अंतर–मन, हृदय

अर्थ – अनंता तू उचित असे दान देणारा असून कृपावंत आहेस १ तुझे नाव मी उच्चारितो तेव्हा तू माझ्याकडे का रे धावून येत नाहीस ? २ तुझ्याजवळ काय बळ व युक्ती नाही ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तू विश्वंभर असूनही माझे हृदय मात्र तुझ्याशिवाय रिकामे का आहे ? ४

२१५९ वाहावतों पुरीं । आतां उचित तें करीं ॥ १ ॥
माझी शक्ति नारायणा । कींव भाकावी करुणा ॥ २ ॥
आम्हा ओढी काळ । तुझें क्षीण झालें बळ ॥ ३ ॥
तुका म्हणे गोडी । जीवा मातेचिया ओढी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – पुरीं–संसारनदाच्या पुरात

शब्दार्थ व टीपा:— थाड–थोर, मोठे, दीपक–दिवा, सांगातीं–बरोबर, चाड–गरज

अर्थ :– देवा, आता माझे सर्व ओझे तुम्ही तुमच्या शिरावर घ्यावे. १ आम्ही तुमच्या पोटी दगड जन्मास आलो आहोत, त्याला काय करायचे ? तुम्हीच आमचे मन आता मोठे करा. २ आमचे डोळे व प्रकाश देणाऱ्या दिव्याची वातही तूच होऊन आमच्या बरोबर चल. ३ तुकाराम महाराज म्हणतात, आम्हांला यासंबंधी आता दुसरा विवाद करण्याची गरज नाही. ४

२१६१ असोत हे बोल । अवघें तूंचि भांडवल ॥ १ ॥
माझा मायबाप देवा । सज्जन सोयरा केशवा ॥ २ ॥
गाळियेले भेद । सारियेले वादावाद ॥ ३ ॥
तुका म्हणे मधीं । आतां न पडे उपाधि ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:– गाळियेले–संपविले, सारियेले–संपविले, नष्ट केले.

अर्थ .– आता मी जे बोललो ते असू द्या. देवा, तूच तर आमचे सर्व भांडवल आहेस. १ तूच माझा सज्जन, सोयरा, माय, बाप आहेस. २ तुम्हीच सर्व भेद संपविले व वादविवाद नष्ट केले. ३ तुकाराम महाराज म्हणतात, आता मी कोणत्याही उपाधीत कधी पडणार नाही. ४

२१६२ करीन कोल्हाळ । आतां हाचि सर्वकाळ ॥ १ ॥
आतां ये वो माझे आई । देई भातुकें विठाई ॥ २ ॥
उपायासी नाम । दिलें याचें पुढें क्षेम ॥ ३ ॥
बीज आणि फळ । हेंचि तुका म्हणे मूळ ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:– कोल्हाळ–अट्टहास, गोंगाट, कटकट, उपायासी–योगक्षेमासाठी, निर्वाहासाठी

अर्थ :– देवा, आता सदासर्वकाळ मी कटकट करीत राहाणार आहे. १ विठाई. माते, आता तू धावून ये व मला प्रेमाचे भातुके दे. २ योगक्षेमासाठी तू आम्हांस तुझे नाम हे एक साधन दिले आहेस, तेच कल्याणदायक आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, बीज आणि फळ या सर्वांचे मूळ नाम हे एकच आहे. ४

२१६३ धनासींच धन । करी आपण[1] जतन ॥ १ ॥
तुज आळवितां गोडी । पांडुरंगा खरी जोडी ॥ २ ॥
जेविल्याचें खरें । वरी उमटे ढेंकरें ॥ ३ ॥
तुका म्हणे धाय । तेथें कोठें उरे हाय ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:– जोडी–प्राप्ती, धाय–तृप्ती

अर्थ.– धन स्वतःचे रक्षण स्वतःच करीत असते. १ त्याप्रमाणे पांडुरंगा, तुला आळविण्यात मला गोडी वाटते व त्यामुळेच तुझी प्राप्ती होते. २ पोटभर जेवण झाल्याचे ढेकर आल्यानेच समजते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, एकदा तृप्ती झाल्यावर मग तळमळ कुठून उरणार ? ४

२१६४ अनुभवा आलें । माझें चित्तींचें क्षरलें ॥ १ ॥
असे जवळी अंतरे[2] । फिरे आवडीच्या फेरें ॥ २ ॥
खादलेंचि वाटे । खावें भेटलेंचि भेटे ॥ ३ ॥
तुका म्हणे उभें । आम्ही राखियेलें लोभें ॥ ४ ॥

---

१. आपणा २. अंतर

शब्दार्थ व टीपा :– क्षरलें–रूपांतरित झाले, पाझरले.

अर्थ :– माझ्या चित्तात या श्रीहरीचे जे रूप होते तेच पाझरून माझ्या अनुभवास आले. १ असे हे रूप मनात जवळच कधी असते, कधी आवडीने पुन: पुन: व्यक्तास येत असते २ जे खाल्ले तेच पुन: खावेसे वाटते, व ज्याची भेट घेतली आहे त्यालाच पुन. भेटावेसे वाटते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, आम्ही आमच्या लोभाने तुम्हांला उभे केले आहे. ४

२१६५ पोटीं शूळ अंगीं उटी चंदनाची । आवडी सुखाची कोण तया ॥ १ ॥
तैसें मज कां गा केलें पंढरिराया । लौकिक हा[1] वांयां वाढविला ॥ २ ॥
ज्वरिलियापुढें वाढिलीं मिष्टान्नें । काय चवी तेणें घ्यावी त्यांची ॥ ३ ॥
तुका म्हणे मढें शृंगारिलें वरी । तेचि जाली परी मज देवा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:– शूळ–शूळाची व्यथा, ज्वरिलियापुढें–ज्याला ताप आला आहे त्याच्या पुढे.

अर्थ :– ज्याला पोटाच्या शूळाची व्यथा आहे त्याच्या अंगास चंदनाची उटी लावून काय उपयोग ? त्याला काय सुख होणार त्यापासून ? १ पंढरीराया, याप्रमाणे तू मला का केले आहेस ? तुझी प्राप्ती नसताना उगाचच हा माझा लौकिक का वाढविला आहे ? २ ज्याच्या अंगात ताप आहे त्याच्या पुढे मिष्टान्ने वाढून काय उपयोग ? त्याने त्यांची काय चव घ्यावी ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, प्रेताला वरवर शृंगारतात त्याप्रमाणे देवा, माझी स्थिती झाली आहे. ४

२१६६ वेगडाचा रंग राहे कोण काळ । अंगें हें पितळ न देखतां ॥ १ ॥
माझें चित्त मज जवळीच गोही । तुझी मज नाहीं भेटी ऐसें ॥ २ ॥
दासीसुतां नाहीं पितियाचा ठाव । अवघेंचि वाव सोंग त्याचें ॥ ३ ॥
तुका म्हणे माझी केली विटंबना । अनुभवें जना येईल कळों ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– गोही-साक्ष, ग्वाही, पितियाचा–बापाचा, ठाव–पत्ता, वाव–व्यर्थ

अर्थ :– वेगडाचे रूप पितळाप्रमाणे चकाकून दिसते, पण ही चमक किती वेळ टिकणार ? १ त्याप्रमाणे देवा, तुझीमाझी भेट झाली नाही तर होईल अशी ग्वाही माझे चित्त मलाच देत आहे. १ दासीपुत्राला स्वतःच्या बापाचा काही पत्ता माहीत नसतो, त्यामुळे त्याचे कोणत्याही जातीचे आचरण व्यर्थच होते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, याप्रमाणे देवा, माझी विटंबना होत असल्याचा अनुभव सर्व जनांस कळून येईल. ४

२१६७ मजपुढें नाहीं आणीक बोलता । ऐसें कांहीं चित्ता वाटतसें ॥ १ ॥
याचा कांहीं तुम्हीं देखावा[2] परिहार ॥ सर्वज्ञ उदार पांडुरंगा ॥ २ ॥
कामक्रोधें नाहीं सांडिलें आसन । राहिले वसोन देहामध्यें ॥ ३ ॥
तुका म्हणे आतां जालों उतराई । कळों यावें पायीं निरोपिलें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – आणीक-दुसरा, परिहार–विचार

अर्थ:– माझ्यापुढे दुसरा कोण बोलका आहे ? असे माझ्या चित्तास एकसारखे वाटत आहे. १ सर्व जाणणाऱ्या उदारा, पांडुरंगा, हो अवस्था दूर करण्यासंबंधी तुम्ही विचार करा ना. २ अजून माझ्या मनातील कामक्रोधांनी आपले स्थान सोडलेले नाही ते माझ्या देहातच स्थान बळकट करून आहेत. ३ तुकाराम महाराज म्हणतात, ही माझी स्थिती समजून यावी म्हणून पायांशी ठेविली असून त्यामुळे मी आता उतराई बनलो आहे. ४

१. व्हावया वाढविला २. देखा

२१६८ सावित्रीचें विटंबण । रांडपण करीतसे ॥ १ ॥
काय जाळावें तें नांव । अवघें वाव असे तें ॥ २ ॥
कुबेर नांव मोळी वाहे । कैसी पाहें फजिती ॥ ३ ॥
तुका म्हणे ठुणगुण देखें । उगीं मूर्खं फुंदतां ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:- वाव-व्यर्थ, ठुणगुण-दांभिकपणा, फुंदणे-घमेंड करणे.

अर्थ:- एखाद्या स्त्रीचे नाव सावित्री असून ती रांडपणा करीत असेल तर त्या नावाचा काय उपयोग ? १ त्या नावाला काय जाळायचेय ? सर्वच व्यर्थ आहे मग. २ एखाद्याचे नाव मात्र कुबेर; आणि धंदा मात्र मोळी वाहण्याचा. केवढी ही फजीती पाहा ना ३ तुकाराम महाराज म्हणतात, उगाच दांभिकपणा दाखवून व्यर्थ का घमेंड करता ? ४

२१६९ न गमेसी जाली दिवसरजनी । राहिलों लाजोनि नों[1] बोलावें ॥ १ ॥
रुचिविण काय शब्द वांच्या माप । अनादरें कोप येत असे ॥ २ ॥
आपुलिया रडे आपुलेंचि मन । वाटे समाधान पावतसें ॥ ३ ॥
तुका म्हणे तुम्ही असा जी जाणते । काय करूं रिते वादावाद ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:- न गमेसी-करमेनासे, रजनी-रात्र, कोप-तिटकारा, राग

अर्थ :- देवा, तुझ्याशिवाय मला रात्रंदिवस करमेनासे झाले आहे. पण लाजेमुळे मला न बोलवल्यामुळे मी तसाच मूक राहिलो आहे. १ माझ्या शब्दाची रुची तुम्हांस काहीच दिसत नाही. वाच्यास मोजल्याप्रमाणे ते व्यर्थच होत असल्याने या अनादरामुळे मला तुमचा रागच येत आहे. ३ आपले मन आपल्या ठिकाणी रडत असते व मग आपण होऊनच समाधान पावते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, हे सर्व तुम्ही जाणीत आहात, उगाच मी व्यर्थ वादविवाद कशासाठी करू ? ४

२१७० मेल्यावरि मोक्ष संसारसंबंध । आरालिया बद्ध ठेवा आम्हां ॥ १ ॥
वागवीत संदेह राहों कोठवरी । मग काय थोरी सेवकाची ॥ २ ॥
गाणें गीत आम्हां नाचणें आनंदें । प्रेम कोठें भेदें अंगा येतें ॥ ३ ॥
तुका म्हणे किती सांगावे दृष्टांत । नसतां तूं अनंत सानुकूळ ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- आरालिया-विश्रांती घेतल्यावर, संदेह-संशय.

अर्थ:- देवा, आम्ही तुमच्या ठिकाणी विश्रांती घेण्यास आल्यावर आम्हास बद्ध करून ठेविता पण मेल्या-नंतर आम्हांस संसारबंधन उरणार की मोक्ष मिळणार ? हे काय समजावे ? १ अशा प्रकारचा संशय मी कुठवर वागवू ? यात तुमच्या सेवकाचा थोरपणा तो काय राहिला ? २ आम्ही तुमचे गीत गाऊन तुमच्या पुढे प्रेमाने व आनंदाने नाचावे. पण वरील प्रकारचा भेद अथवा संशय मनात असल्यावर असे प्रेम अंगी कुठून येणार ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, असे आणखी किती दृष्टान्त द्यावेत ? अनंता, तू जर अनुकूल नसशील तर काय त्याचा उपयोग ? ४

२१७१ एकाएकीं आतां असावेंसे वाटे । तरिच हे खोटे चाळे केले ॥ १ ॥
धाजवूनि तोंड घातलों[2] बाहेरी । कुल्प[3] करुनी दारीं माजी वसा ॥ २ ॥

१. न २. घातले ३. कर्लु

उजेडाचा केला दाटोनि अंधार । सवे हुद्देदार चेष्टाविला ॥ ३ ॥
तुका म्हणे भय होतें तोंचि वरी । होती कांहीं उरी स्वामिसेवा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – एकाएकी–एकट, कुलूप–कुलूप माजी–आत, वसा–राहिलात

अर्थ – देवा तुम्हाला नेहमी एकटे राहावेसे वाटते, म्हणूनच असे हे खोटे चाळे फसविण्यासाठी तुम्ही केलेत १ देव निर्गुणनिराकार असल्याचे सांगून आम्हास बाहेर पाठविलेत आणि आपण स्वत कुलूप घालून आत बसून राहिलात २ तुमच्या घरात ज्ञानाचा प्रकाश असूनही मुद्दामच तुम्ही अज्ञानाचा अंधार पसरविला आहेसे वाटते आणि त्याबरोबरच तुमच्या करणीचे समर्थन करणाऱ्या वेदशास्त्राच्या हुद्देदारास प्रवृत्त केले ३ तुकाराम महाराज म्हणतात, जोपर्यंत तुमचे-आमचे स्वामीसेवकाचे नाते उरले होते तोपर्यंत तुमचे भय आमच्या मनात शिल्लक राहिले होते ४

२१७२　काय नव्हेसी तूं एक । देखों कासया पृथक ॥ १ ॥
मुंग्या कंचे मुंगळे । नटनाट्य तुझे चाळे ॥ २ ॥
जाली तरी मर्यादा । किंवा त्रासावें गोविंदा ॥ ३ ॥
तुका म्हणे साचा । कोठें जासी हृदयींचा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – पृथक–निराळं वेगळे, साचा–खरोखर

अर्थ – देवा, या विविध वस्तूंच्या रूपाने तू एकच नाहीस काय ? असे असताना मी तुला वेगळेपणाने का पाहू ? १ मुंग्या मुंगळे असे अनेक प्राणी कसले आहेत ? हे सर्व नाटकी चाळे तुझेच आहेत २ गोविंदा, तुझ्या कर्तृत्वाची मर्यादा झाली म्हणून आम्ही का त्रासावे ? ३ तुकाराम महाराज म्हणतात देवा, तू तर आमच्या हृदयात आहेस तू जाणार कुठे दुसरीकडे ? ४

२१७३　का जी वाढविलें । न लगता हें उगलें ॥ १ ॥
आता मानिता कांटाळा । भोंवतीं मिळालिया बाळा ॥ २ ॥
लावूनियां सवे[1] । पळता दिसाल बरवें ॥ ३ ॥
तुका म्हणे बापा । येता न कळाचि रूपा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – उगलें–उगाच बरवें–चागले सवे–सवय

अर्थ – देवा हा व्याप जर तुम्हास नको होता तर उगाच हा पसारा तरी का वाढविला ? १ तुमच्या भोवती आम्ही मुलेबाळे जमा झालो आहोत, आता आमचा कटाळा कशास करता ? २ आम्हाला तुमची सवय तुम्ही लावलीत किंवा सेवेत लावलेत व तुम्ही मात्र निराकारात पळून जाता हे चागले दिसते का ? ३ तुकाराम महाराज म्हणतात बापा तुम्ही विविध रूपानी नटलात तेव्हा तुम्हास हे ज्ञान नव्हते का ? ४

२१७४　क्षुधेलिया अन्न । द्यावें पात्र न विचारून ॥ १ ॥
धर्म आहे वर्मा अंगीं । कळलें पाहिजे प्रसंगीं ॥ २ ॥
द्रव्य आणि कन्या । येथें कुळ कर्म सोधण्या ॥ ३ ॥
तुका म्हणे पुण्य गांठी । तरिच उचितासी भेटी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – क्षुधेलिया–भुकेलेल्यास, पात्र–योग्यता वर्मा–रहस्य धर्म समजण्यात

---

१ सेवे

अर्थ - जो क्षुधेने व्याकुळ झालेला आहे त्यास योग्यतेचा विचार न करता अन्न द्यावे १ कोणत्या प्रसंगी काय करावे हे कळण्यातच धर्माचे रहस्य आहे २ द्रव्यदान व कन्यादान मात्र करताना चांगले वाईट कूळ व धर्म यांचा शोध करून करावे ३ तुकाराम महाराज म्हणतात पुण्य जर पदरी असेल तर वरीलप्रमाणे उचित गोष्टी घडून येतात ४

२१७५ वेचावे ते जीवे । पूजा घडे ऐसा नावे ॥ १ ॥
बिगारीची ते बिगारी । साक्षी[1] अंतरींचा हरी ॥ २ ॥
फळ बीजाऐसे । कार्यकारणासरिसे ॥ ३ ॥
तुका म्हणे मान । लवणासारिखें लवण ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा - वेचावे-खर्च करावा लवण नम्रत्व, लवणे

अर्थ - आपला जीव देवाला समर्पण करण्यानेच देवाची खरी पूजा होत असते १ याशिवाय सर्व बिगारीच्या कामाप्रमाणे असते यास साक्षीदार अंतःकरणातील श्रीहरी आहे २ बीजाप्रमाणे फळ असते, आणि कारणाप्रमाणेच कार्य घडते ३ तुकाराम महाराज म्हणतात, ज्याच्या जवळ जसे नम्रत्व असेल त्यास त्याप्रमाणे देव मान देतो ४

२१७६ मज नाहीं धीर । तुम्ही न करा अंगीकार ॥ १ ॥
ऐसे पडिले विषम । बळी देवाहूनि कर्म ॥ २ ॥
चालो नेणे वाट । केल्या न पवे[2] बोभाट ॥ ३ ॥
वेचो नेणे जीवे । तुका उदास धरिला देवे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा - अंगीकार-स्वीकार, विषम-संकट, वेचों-खर्च करावा

अर्थ - देवा, तुम्ही माझा स्वीकार केलेला नसल्यामुळे मला आता धीर धरवत नाही १ असे हे संकट पडले असून या देवाहून माझे कर्म बलवान झालेले दिसते २ देवा, तुमच्याकडे येण्याची वाट मला माहीत नाही आणि तुमच्या नावाने बोभाटा केला, तर तो मला पचत नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, या देहाचा खर्च देवा, तुमच्या सेवेत कसा करावा हे समजत नाही कारण तुम्ही मला दर्शनाविषयी उदास केले आहे ४

२१७७ तळमळी चित्त दर्शनाची आशा । बहु जगदीशा करुणा केली ॥ १ ॥
वचनींच संत पावले स्वरूप । माझें नेदी पाप योगा येऊं ॥ २ ॥
वेठीऐसा करीं भक्तिवेवसाव । न पवेचि जीव समाधान ॥ ३ ॥
तुका म्हणे कईं देसील विसावा । पांडुरंगे धावा घेतें मन ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा - वेठीऐसा-जुलमाच्या कामासारखा

अर्थ - जगदीशा, तुझ्या दर्शनाच्या आशेने माझे चित्त फारच तळमळत आहे तुमच्या प्राप्तीविषयी मी फार तळमळ केली १ या करुणेच्या शब्दांनी अनेक संतांना तुझेच स्वरूप प्राप्त झाले, तुझ्या स्वरूपाला ते पोचले, पण माझे पाप मात्र असा हा योग काही आणू देत नाही २ जुलमाच्या कामासारखा मी या भक्तीचा व्यापार करीत आहे, त्यामुळे माझ्या जीवास समाधान पावत नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात पांडुरंगा, मला तू कधी विसावा देशील रे ? माझे मन एकसारखे ओढ घेत आहे ४

---

१ साक्ष, २ पचा

२१७८ हागता ही खोडी । चळण[1] मोडविते काडी ॥ १ ॥
ऐसे अनावर गुण । आवरावे काय म्हूण ॥ २ ॥
नाहीं जरी संग । तरी बडबडविती रंग ॥ ३ ॥
तुका म्हणे देवा । तुमची न घडेचि सेवा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – चळण–हालचाल, म्हूण–म्हणून, संग–सोबत, सहवास, रंग–रंगात येऊन

अर्थ — एखादा शौचाला बसला तरी त्याला जवळची काडी मोडून काहीतरी हालचाल करावीशी वाटते १ अशा अनावर खोडी कित्येकांना असतात काय काय म्हणून सावरायच्यात ? २ दुसऱ्या कुणाची संगतसोबत नसता-नाही स्वत शीच बडबड रंगात येऊन कुणी करतात ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा अवगुणामुळे देवा तुमची सेवा मात्र कधी घडत नाही ४

२१७९ देह निरसे तरी । बोलावया नुरे उरी ॥ १ ॥
येर वाचेचे वाग्जाळ । अळंकारापुरते बोल ॥ २ ॥
काचे तरी कढे । जाती ऐसे चित्त ओढे ॥ ३ ॥
विष्णुदास तुका । पूर्ण धनी जाणे चुका ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – नुरे–उरत नाही, वाग्जाळ–वाणीचं व्यर्थ जाळ, काचे–कच्चे

अर्थ :– ज्याच्या देहाचा निरास झाला आहे त्याला बोलायला काहीच उरत नाही १ त्यावाचून इतर सर्व वाणीचे व्यर्थ जाळे असते केवळ अलंकारिक शब्दजालच असते २ जोंवर कच्चे आहे तोपर्यंतच ते कडकड असा आवाज करून कढत असते त्याप्रमाणे ज्याची जशी जात असेल तसे त्याचे चित्त ओढले जाते ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी विष्णुदास असून माझ्यात पूर्णत्व आहे, की चुका आहेत हे तो श्रीहरीच जाणून आहे ४

२१८० खोट्याचा विकरा । येथें नव्हे काच हिरा ॥ १ ॥
काय दावायाचे काम । उगाच वाढवावा श्रम ॥ २ ॥
परीक्षकाविण । मिरवो जाणां ते तें हीण ॥ ३ ॥
तुका पाया पडे । वाद पुरे हे झगडे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा विकरा–विक्री

अर्थ काच हातांत घेऊन कुणी हा हिरा आहे असे समजेल त्याचे हे खोटे येथे विकले जाणार नाही १ त्याप्रमाणे तुम्ही उगाच तुमच्या साधुत्वाच्या खुणा कशासाठी दाखविता ? उगाच श्रम मात्र वाढतील २ नीट परीक्षा केल्याखेरीज अंगावरील जे जे दागिने मिरवाल ते ते खोटे आहेत असे समजावे ३ तुकाराम महाराज म्हणतात, वादविवाद व झगडे आता पुरे मी तुमच्या पायां पडते ४

२१८१ पंढरीस घडे अतित्यायें मृत्य । तो जाय पतित अध पाता ॥ १ ॥
दुराचारें[2] मोक्ष सुखाचे वसति । भोळी बाळमूर्ति पांडुरंग ॥ २ ॥
केला न सहावे[3] तीर्थउपवास । कर्मेविण दोषसाधन तें ॥ ३ ॥

१ चरण, २ दुराचाऱ्या मोक्षसुखाची वसति, ३ साहे

कालियापें भेद मानितां निवडे । श्रोत्रियांसी जोडे अंत्यजता ॥ ४ ॥
माहेरीं सलज्ज ते जाणा सिंदळी । कालिमा काजळी पावविते ॥ ५ ॥
तुका म्हणे तेथें विश्वास जतन । पुरे भीमास्नान सम पाय ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा:– आतितयार्पे–आततायीपणाने, दुराग्रहाने, कालियापें–कीर्तनाचा काळा त्यामध्ये.

अर्थ – पंढरपुरात जर कुणी आततायीपणाने जीव देईल तर तो पातकी नरकालाच जाईल. १ या ठिकाणी कुणी दुराचारी असेल तरी पश्चात्तापाने त्यास मोक्ष मिळेल. कारण येथे भोळी भाबडी अशी पांडुरंगाची बाळ मूर्ती आहे. २ या स्थानावर जर कुणी तीर्थ, उपवास केला तर तो या देवास सहन होत नाही. आणि या ठिकाणी हरि-कीर्तनाखेरीज इतर कोणते साधन आचरले तर ते दोषास्पद होते. ३ कीर्तनाच्या काळ्यामध्ये कुणी भेद मानला व कुणी कुणास निवडून दूर ठेविले तर ते मोठे वेदशास्त्रज्ञ असतील तरी त्यांना अस्पृश्यत्व प्राप्त होईल. ४ जी स्त्री आपल्या घरी आईबापांच्याजवळ लाजते ती वाईट चालीची आहे असे समजावे. अशा स्त्रीला काजळीप्रमाणे कालिमा लागेल ५ तुकाराम महाराज म्हणतात, येथे मनात विश्वास ठेवून, भीमा नदीच्या पाण्यात स्नान करून विठ्ठलाच्या समचरणांवर मस्तक ठेवावे हे चांगले. ६

२१८२ चातुर्याच्या अनंतकळा । सत्या विरळा जाणता[४] ॥ १ ॥
हांसत्यासवें हांसे जन । रडतां भिन्न पालटे ॥ २ ॥
जळो ऐसे वांजट बोल । गुणां मोल भूस मिथ्या ॥ ३ ॥
तुका म्हणे अंधळयाऐसें । वोंगळ पिसें कौतुक ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – वांजट-क्रियेशिवाय व्यर्थ बोलणारा, पिसें–वेडे

अर्थ:– चातुर्याच्या अनंत कला अंगी असणारे लोक अनंत आहेत. पण सत्य जाणणारा क्वचित असतो १ हसणाऱ्या माणसाच्या-संगतीने सारे जन हसतच असते व उलट रडणाऱ्याकडे पाहून दूर होतात. २ क्रियेवीण बोलण्यास आग लागो. कारण चांगल्या गुणांना किंमत आहे. नुसत्या भुसकटास शून्य किंमत राहाते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, वेडे लोक कौतुकाने आंधळ्याप्रमाणे वागतात व फसतात ४

२१८३ नयो वाचे अनुचित वाणी । नसो मनीं कुडी बुद्धि ॥ १ ॥
ऐसें मागा अरे जना । नारायणा विनवूनि ॥ २ ॥
कामक्रोधां पडो चिरा । ऐसा बरा सायास ॥ ३ ॥
तुका म्हणे नानाछंदें । या विनोदें न पडावें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा .– कुडी–वाईट, चिरा पडो–दगड पडावा, बंद व्हावेत, सायास–प्रयत्न

अर्थ – माझ्या वाचेने अनुचित शब्द कधी उच्चारले जाऊ नयेत व मनात कधी वाईट बुद्धी निर्माण होऊ नये. १ अहो लोकहो, नारायणास विनंती करून तुम्ही अशीच मागणी करा. २ कामक्रोधादी विकारांवर दगड पडून ते बंद व्हावेत असेच प्रयत्न तुम्ही करावेत. ३ तुकाराम महाराज म्हणतात, उगाच नाना प्रकारच्या छंदांत चेष्टेने सुद्धा पडू नका. ४

२१८४ माझिया देहाची मज नाहीं चाड । कोठें करूं कोड आणिकांचें ॥ १ ॥
इच्छितां ते मान मागा देवापासीं । असा संचितासी गुंपले[५] हो ॥ २ ॥

१ निवाडे, २ येथें, ३ सत्य, ४ जाणता, ५ गुंफले.

देह आम्ही केला भोगाचे सांभाळीं । राहिलो निराळों मानामाना ॥ ३ ॥
तुका म्हणे कोणें[1] वेचावे वचन । नसतां तो सीण वाढवावा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – चाड-पर्वा, कौतुक, कोड-कौतुक, गुपले-गुंतलेले

अर्थ – मला माझ्या देहाची पर्वा नाही तेथें मी दुसऱ्याचे कौतुक कुठे करू ? १ लोकहो, तुम्ही आपल्या संचित कर्मात गुंतून राहिलेले आहात ज्याची इच्छा करता ते देवापाशी मागा ना २ आम्ही आपला देह प्रारब्ध-भोगाच्या स्वाधीन केला आहे आणि मानापमानाहून वेगळे होऊन राहिलो आहोत ३ तुकाराम महाराज म्हणतात, आता यासाठी कुणी शब्द खर्च करून कशासाठी परिश्रम वाढवावेत ? ४

२१८५ धरितां इच्छा दुरी पळे । पाठी सोहळे उदासा ॥ १ ॥
म्हणऊनि असट मन । नका खुण सांगतों ॥ २ ॥
आमिषापाशीं अवघें वर्म । सोस श्रम पाववी ॥ ३ ॥
तुका म्हणे बीज न्यावें । तेथें यावे फळानें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – असट-आसक्त

अर्थ – कुठल्याही विषयाची इच्छा धरताच तो दूर पळत राहतो उलट त्याच्याकडे पाठ फिरविताच अनेक सुखसोहळे मागे लागतात १ म्हणून मनाने आसक्त असावे ही तुम्हांस एक खूण सांगत आहे २ विविध प्रकारच्या विषयभोगांचा सोस करणे हेच सर्व दुःखाचे मर्म आहे असे समजा ३ तुकाराम महाराज म्हणतात, जिकडे बीज न्यावे तिकडे फळ येतेच ४

२१८६ वेद शास्त्र नाहीं पुराण प्रमाण । तयाचें वदन नावलोका[2] ॥ १ ॥
तार्किकाचें अंग आपणा पारिखें । माजिऱ्यासारिखें वाईचाळे[3] ॥ २ ॥
माता निंदी तया कोण तो आधार । भंगले खापर याचे नावे ॥ ३ ॥
तुका म्हणे आडराणे ज्याची चाली । तयाची ते बोली मिठेंविण ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – वदन-तोंड, नावलोका-पाहू नका, माजिऱ्यासारखे-मन्नावलेल्या, माजलल्या, वाईचाळे वरळता

अर्थ – वेद, शास्त्र, पुराणे यात सांगितलेले ज्याला मान्य नाही त्याचे तोंडही पाहू नका १ जो तार्किक असतो तो स्वतःलाच पारखा झालेला असतो उगाच माजलेल्या माणसाप्रमाणे व्यर्थच वरळत असतो २ जो आईची निंदा करतो त्याला कुठला आधार असणार ? त्याच्या पापाचे खापर त्याच्या डोक्यावर फुटलेले असते ३ तुकाराम महाराज म्हणतात, ज्याचे वागणे असे आडमार्गाचे व शास्त्रविरहित असते, त्याचे बोलणे मिठाशिवाय असलेल्या अन्नाप्रमाणे आळणीच असते ४

२१८७ कस्तुरीचे अंगी मीनली मृत्तिका । मग वेगळी का येईल लेखूं ॥ १ ॥
तयापरि भेद नाहीं देवभक्तीं । सदेहाच्या युक्ति सरों द्याव्या ॥ २ ॥
इंधनें तें आगी संयोगाच्या गुणें । सागरा वरुषणे वाहाळ तोंचि ॥ ३ ॥
तुका म्हणे माझें साक्षीचे वचन । येथें तो कारण शुद्ध भाव ॥ ४ ॥

---

१ नलगे २ नावलोकावे, ३ वाईचळ

शब्दार्थ व टीपा :– मीनली–मिसळली, मिनली, लेखूं–समजावी, संदेहाच्या–संशयाच्या, वाहाळ–ओहोळ. साक्षीचे–अनुभवाचे.

अर्थ:– माती एकदा कस्तुरीत मिसळली की ती काय वेगळी समजावी ? १ त्याप्रमाणे देव आणि भक्त यांच्यात भेद नसतो. यासंबंधी संशयाच्या ज्या ज्या कल्पना असतील त्या सर्व नाहीशा कराव्यात. २ अग्नी आणि इंधन यांच्या संयोगातच इंधन म्हणजे लाकडे वगैरे अग्निरूप होतात. सागराला ओहोळ मिळाल्यावर ते सागररूपच होऊन जातात. ३ तुकाराम महाराज म्हणतात, हे माझे बोलणे अनुभवाचे असून या ठिकाणी केवळ शुद्ध भावाचे कारण आहे. ४

२१८८ भक्ति तें नमन वैराग्य तो त्याग । ज्ञान ब्रह्मीं भोग ब्रह्मतनु ॥ १ ॥
देहाच्या निरसनें पाविजे या ठाया । माझी ऐसी काया जंव नव्हे ॥ २ ॥
उदक अग्नि धान्य जाल्या घडे पाक । एकाविण एक कामा नये ॥ ३ ॥
तुका म्हणे मज कळे ते[1] चांचणी । बडबडीची वाणी अथवा सत्य ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:–उदक–पाणी, पाक–स्वयंपाक.

अर्थ:– सर्वांभूती भगवद्भाव कल्पून नमन करणे ही भक्ती असून सर्वस्वाचा त्याग करणे हे वैराग्य आहे. देह ब्रह्मरूप करून ब्रह्माचा भोग घेणे हे ज्ञान आहे. १ देहभावाचे निरसन करून, म्हणजे हा देह माझा नव्हे असे समजून स्वस्थानाची प्राप्ती करून घेता येते. २ पाणी, अग्नी व धान्य या गोष्टी एकत्र आल्या तरच उत्तम स्वयंपाक होईल. यांतील एक जरी नसेल तरी काही उपयोग होणार नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, ही पोकळ बडबड आहे की, तीत काही सत्य आहे हे थोडी परीक्षा करिताच समजून येईल. ४

विवरण –या अभंगात भक्ती, वैराग्य आणि ज्ञान यांच्या समर्पक व्याख्या तुकारामबुवांनी केल्या आहेत. 'ज्ञान ब्रह्मीं भोग ब्रह्मतनु' शरीरच ब्रह्मरूप करून परब्रह्माचा भोग भोगणे हे खरे ज्ञान असे या ठिकाणी सांगितले आहे. या कल्पनेचा थोडा विस्तार करणे आवश्यक आहे. पंचमहाभूतांचा हा देह ब्रह्मरूप करणे म्हणजे काय करणे ? हे समजण्यासाठी आधी ब्रह्मस्वरूपाची थोडी ओळख करून घेणे अगत्याचे आहे. हे ब्रह्म कसे आहे ? याची वर्णने उपनिषदे, गीता इत्यादी ग्रंथांनी केलेली आहेत. हे 'अनादिमत्परं ब्रह्म न सत्तन्नासदुच्यते' हे अनादी, सर्वांच्या पलीकडचे असून त्याला 'सत्' म्हणत नाहीत, आणि 'असत्'ही म्हणत नाहीत आणखी हे ब्रह्म कसे आहे ? भगवद्गीतेच्या तेराव्या अध्यायात वर्णन केले आहे –

'सर्वतः पाणिपादं तत्सर्वतोऽक्षिशिरोमुखम् ।
सर्वतः श्रुतिमल्लोके सर्वमावृत्य तिष्ठति ॥
सर्वेन्द्रियगुणाभासं सर्वेन्द्रियविवर्जितम् ।
असक्तं सर्वभृच्चैव निर्गुणं गुणभोक्तृ च ।
बहिरन्तश्च भूतानामचरं चरमेव च ।
सूक्ष्मत्वात्तदविज्ञेयं दूरस्थं चान्तिके च तत् ।
अविभक्तं च भूतेषु विभक्तमिव च स्थितम् ।
भूतभर्तृ च तज्ज्ञेयं ग्रसिष्णु प्रभविष्णु च ॥
ज्योतिषामपि तज्ज्योतिस्तमसः परमुच्यते ।
ज्ञानं ज्ञेयं ज्ञानगम्यं हृदि सर्वस्य धिष्ठितम् ॥" (गीता १३ : १३-१७)

[1] केले ते.

ज्याला सर्व बाजूंनी हातपाय आहेत, सर्व बाजूंनी डोळे डोकी व तोंडे आहेत, सर्व बाजूंनी कान आहेत, तेच या लोकी सर्वत्र व्यापून राहिले आहे. सर्व इंद्रियांच्या गुणांचा आभास होणारा असून त्याला कोणतेच इंद्रिय नाही. जे सर्वांपासून अलिप्त म्हणजे भिन्न असूनही सर्वांना धारण करणारे आणि निर्गुण असूनही गुणांचा उपभोग घेणारे आहे. सर्व भूतांच्या आत व बाहेरही आहे. ते अचर आहे व चरही आहे. सूक्ष्म असल्यामुळे ते अविज्ञेय आहे. दूर असूनही जवळ आहे. ते तत्त्वतः अविभक्त म्हणजे अखंड असूनही सर्व भूतात जणु काय नानात्वाने विभागून राहिले आहे, व सर्व भूतांना धारण करणारे, ग्रासणारे व उत्पन्न करणारेही तेच समजले पाहिजे. त्यालाच तेजांचेही तेज व अंधकारापलीकडचे म्हणतात. ज्ञान जे जाणायचे ते ( ज्ञेय ) व ज्ञानगम्य म्हणजे ज्ञानानेच समजणारेही तेच असून सर्वांच्या हृदयात तेच अधिष्ठित आहे.

*वेद, उपनिषद व गीता यांनी वर्णन केलेल्या या ब्रह्माच्या रूपावरून जसे ब्रह्माचे ज्ञान होते तसेच त्याचे* व जगताचेही संबंध सूचित होतात. हे आसक्त असूनही सर्वांना धारण करते, निर्गुण असूनही गुणांचा उपभोग घेते, सर्व भूतांच्या आत व बाहेर हेच अखंड असूनही सर्व भूतमात्रात विभागून राहिलेले आहे इत्यादी वर्णनावरून *त्याचा व व्यक्त जगाचा संबंध सूचित केलेला आहे. हाच संबंध योगवासिष्ठासारख्या महत्त्वाच्या ग्रंथातही वर्णन* केलेला आहे.

> 'यस्मिन्सर्वं यतः सर्वं यत्सर्वं सर्वतश्चयत् ।
> सर्वं सर्वतया सर्वं यत्सर्वं सर्वदा स्थितम् ।

म्हणजे ते जगातील सर्व वस्तूंना आधार आहे. सर्व त्याच्या मालकीचे आहे जे सर्वांचे उपादान व निमित्त कारण म्हणजे मायवाद आहे. याच ब्रह्माचा विकास म्हणजे जग होय. 'ब्रह्मबृंहयं हि जगज्जगच्च ब्रह्मबृंहणम्' म्हणजे जगतही ब्रह्माचीच झालेली वृद्धी असून ज्ञान झाल्यावर हे जग ब्रह्मरूपाने व्यापलेले आहे असा अनुभव येतो. समुद्राच्या ठिकाणी तरंग, बिन्दू, लाटा इत्यादी अनेक रूपानी असणारे एकच जल असून, त्याप्रमाणे विश्वातील अनंत वस्तूंच्या रूपानी आत्मतत्त्वच ब्रह्मरूपाने विलसत असते. हे सर्व व्यक्त जग एकाच ब्रह्मतत्त्वाचा विस्तार आहे, एकाच बीजापासून हा सर्व विस्तार पावला आहे. एकाच सुवर्णाचे हे नाना अलंकार बनलेले आहेत. पाताळात, भूतळी, स्वर्गात, तृणात, प्राण्यात व इतरत्रही हे चिद्रूप परब्रह्मच दिसत असते. फल, पुष्प, लता, पत्र, शाखा, स्कंध आणि मुळे यांनी युक्त असलेला वृक्ष जसा बीजातच सूक्ष्मत्वाने असतो, त्याप्रमाणे हे जग या ब्रह्मात सूक्ष्मत्वाने असते. सूर्यकान्त मण्यामध्ये जसा अग्नी, दुधामध्ये जसे तूप, मिरचीत जसा तिखटपणा, त्याप्रमाणे हे सर्व त्रैलोक्य त्या ब्रह्मात असते. मातीच्या ठिकाणी बाहुली व लाकडाच्या ठिकाणी जशी प्रतिमा अव्यक्त रूपाने असते किंवा काळ्या रंगात जशा पुढे रेखाटल्या जाणाऱ्या चित्राच्या विविध रंगातील छटा असतात, त्याप्रमाणे सर्व व्यक्त वस्तू त्या परब्रह्मात अव्यक्त रूपात असतात.

अशा प्रकारे ब्रह्माचे व जगाचे संबंध असल्याचे ज्ञान अनुभवास आले की पंचमहाभूतांचे बनलेले शरीरही ब्रह्मरूप होऊन जाते. माझे शरीर वेगळे आहे अथवा मी म्हणजे माझे शरीर हा भाव बरोबर नाही. शरीरच ब्रह्मरूप असल्याचे जाणणे, अनुभवणे हे खरे ज्ञान होय. 'माझी ऐसी काया नव्हे।' असे मानणे म्हणजे काय हे आतां स्पष्ट होईल. ही काया कीर्तनरसातही ब्रह्मीभूत होऊन जाते असा तुकारामबुवांचा स्वानुभव आहे.

२१८९ श्रीसंतांचिया माथा चरणावरी । साष्टांग हें करीं दंडवत ॥ १ ॥
विश्रांती पावलो सांभाळउत्तरीं । वाढलें अंतरीं प्रेमसुख ॥ २ ॥
डौरली हे काया कृपेच्या वोरसे । नव्हे अनारिसे उद्धरलो ॥ ३ ॥
तुका म्हणे मज न घडता सेवा । पूर्वपुण्यठेवा वोडवला ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – डौरली–शोभली, शृंगारित झाली, अनारिसे–वेगळे

अर्थ – श्रीसंताच्या चरणावर माथा ठेवून त्याना साष्टांग दंडवत मी घालीत आहे १ तुम्हीच माझ्या चित्तातील प्रेमसुख वाढविले असल्यामुळे मी या विश्रांतिस्थळास पोचलो आहे आता या स्थितीचा तुम्ही सांभाळ करावा २ तुमच्या कृपेच्या वर्षावाने माझी काया ( शरीर ) सुशोभित झाली आहे आता खरोखर उद्धारा-शिवाय काही दुसरे वेगळे आहे असे नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, पूर्वपुण्याईमुळे मला हा ठेवा संतांची सेवा न घडताच मिळाला आहे ४

२१९० नेणों काय नाड । आला उचित काळा आड ॥ १ ॥
नाहीं जाली संतभेटी । येवढी हानी काय मोठी ॥ २ ॥
सहज पायापासीं । जवळी[1] पावलिया ऐसी ॥ ३ ॥
चुकी जाली आता काय । तुका म्हणे उरली हाय ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – नाड–प्रतिबंध, अडसर, अडथळा

अर्थ – योग्य वेळेच्या आड कोणता अडथळा आला आहे हे काही समजत नाही १ साधुसंताची भेट झाली नाही ही काय मोठी हानी नाही ? २ नाहीतर त्याच्या पायापाशी सहजासहजी येऊन पोचलो असतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, आता एकदा चूक झाल्यावर काय उरणार ? नुसते हाय हाय करणे हेच ४

२१९१ आणीक काहीं नेणे । असे पायाच्या चिंतने ॥ १ ॥
माझा न व्हावा विसर । नाहीं आणीक आधार ॥ २ ॥
भांडवल सेवा । हाचि ठेवियेला ठेवा ॥ ३ ॥
करीं मानभावा । तुका विनंती करी देवा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – आणीक–दुसर, मानभावा–भावाचा मान

अर्थ – श्रीहरीच्या पायांचे मी चिंतन करीत असल्याने दुसरे काहीच जाणीत नाही १ देवा, माझा विसर तुम्हास कधी नव्हता, कारण मला तुमच्याशिवाय दुसरा कुठलाच आधार नाही २ तुमच्या सेवारूपी भांडवलाचाच तेवढा ठेवा माझ्या जवळ आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तुम्ही माझ्या भावभक्तीचा मान ठेवावा, अशीच माझी विनंती आहे ४

२१९२ आरुष माझी वाणी बोबडीं उत्तरें । केली ते लेकुरें सलगी पायीं ॥ १ ॥
करावें कवतुक संतीं मायबापीं ॥ जीवन देउनि रोपीं विस्तारिजे ॥ २ ॥
आधारें वदली प्रसादाची वाणी । उच्छिष्टसेवनी तुमचिया ॥ ३ ॥
तुका म्हणे हेंचि करितो विनंती । मागेन[2] पुढती सेवादान ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – आरुष–वेड्यावाकड्या, जीवन–पाणी

अर्थ – माझ्या वेड्यावाकड्या शब्दांनी मी तुमच्यापाशी बोललो बोबड्या उत्तरांनी तुमच्यापाशी भाषण केले, हो लहान लेकराने आपणांपाशी सलगी केली आहे १ संत मायबापांनी याचे कौतुक करावे व माझ्यात असलेल्या या प्रेमभक्तीस पाणी देऊन तिचे रोप चांगले वाढवावे २ आपल्याच आधारामुळे माझ्या तोंडून ही प्रसादाची वाणी बाहेर पडत आहे तुमच्याच उच्छिष्टसेवनाने मी बोलत आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, आपणांकडून मला पुढे सेवेचे दान मिळेल हीच विनंती मी आपणास करीत आहे ४

---

१ तुज जवळी पावली एसी, २ मागोनि

२१९३ पुरुषा हातीं कंकणचुडा । नवल दोडा वृत्तिया ॥ १ ॥
पाहा कैसी विटंबना । नारायणा देखिली ॥ २ ॥
जळो ऐसी सिदावळी । भाटवोळीपणाची ॥ ३ ॥
तुका म्हणे पाहों डोळां । अवकळा नये हे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा — दोडा-द्वाड, वाईट, भाटवोळीपणाची-भाटाप्रमाणे व्यर्थ बडबड करण्याची.

अर्थ — पुरुषाच्या हातांत बांगड्याचा चुडा असणे हे मोठे वाईट नवल आहे. १ नारायणा, पाहा ही कशी विटंबना आम्ही पाहिली ती २ भाटाप्रमाणे व्यर्थ बडबड करण्याची वृत्ती असणाऱ्याच्या जीवास आग लागो. ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा प्रकारची अवकळा डोळ्यांनी पाहाणे नको. ४

२१९४ वितीयेवढेंसें पोट । केवढा[1] बोभाट तयाचा ॥ १ ॥
जळो याची[2] विटंबना । मूक जना नाचवी ॥ २ ॥
अभिमान सिरीं भार । जाले खर तृष्णेचे ॥ ३ ॥
तुका म्हणे नरका जायें । हाचि जीवें व्यापार ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपाः-सिरीं-डोक्यावर, खर-गाढव.

अर्थ-वितीएवढे पोट असून ते भरण्यासाठी केवढी यातायात करावी लागते. त्याच्या भरणाविषयी केवढा बोभाटा होतो १ पोटाची मूक माणसास वाटेल तसे नाचविते. अशी त्याची विटंबना जळून जावो. २ विविध तृष्णांचे म्हणजे इंद्रियांच्या विषयांचे ओझे डोक्यावर घेऊन लोक गाढवच बनले आहेत. ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशामुळे जीवास नरकाला जाण्याचाच व्यापार घडतो ४

२१९५ सेवटासी जरी आलें । तरी जाले आंधळें ॥ १ ॥
स्वहिताचा लेश नाहीं । दगडा काहीं अंतरीं ॥ २ ॥
काय परिसासवें भेटी । खापरखुंटी जालिया ॥ ३ ॥
तुका म्हणे अधम जन । अवगुणचि वाढवी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा — अधम-हीन, वाईट.

अर्थ—मृत्यूचा दिवस आला तरी हे लोक पाहा कसे अज्ञानाने आंधळे झाले आहेत. १ अशा या दगडाच्या मनात स्वहित साधण्याचा लेशही नाही २ खापराच्या तुकड्याची भेट परिसाशी झाल्यावर काय उपयोग ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा या वाईट लोकाकडून अवगुणच वाढविले जातात ४

२१९६ प्रायश्चित्तें देतो तुका । जातो लोका सकळां ॥ १ ॥
धरितील ते तरती मनीं । जाती घाणी वाया त्या ॥ २ ॥
निग्रहअनुग्रहाचे ठाय । देतो घाय पाहोनि ॥ ३ ॥
तुका जाला नरसिंहीं । भय नाहीं कृपेनें ॥ ४ ॥

---

१ येव्हढा, २ त्याची.

शब्दार्थ व टीपा – घाणी–नरकास, निग्रह–दमन अनुग्रह–कृपा

अर्थ – सर्व लोकांना प्रायश्चित्त देत हा तुकाराम निघाला आहे १ हा माझा उपदेश जे मनात धरून वागतील ते तरतील आणि जे ऐकणार नाहीत ते नर्कात वायाच जातील २ दमन किंवा कृपादान हे समोरच्या माणसाचा अधिकार पाहूनच ठरवावे लागते ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवाच्या कृपेने मी नरसिंह असल्यामुळे मला कसलेही भय नाही ४

२१९७ दुर्जनाचे अंग अवघेंचि सरळ । नर्काचा कोथळ साठवण[1] ॥ १ ॥
खाय अमंगळ बोले अमंगळ । उठवी कपाळ संघट्टणें ॥ २ ॥
सर्पा मंत्र चाले धरावया हातीं । खळाची ते जाती निखळचि ॥ ३ ॥
तुका म्हणे काहीं न साहे उपमा । आणीक अधमा बोखटाची ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – संघट्टणें–संगतीने खळाची–दुष्टाची निखळचि–अगदीच

अर्थ – दुर्जनाचे सर्व अंगच खरोखर नर्क साठविण्याचा कोथळा आहे १ त्याचे खाणे अमंगळ असते बोलणे अमंगळ असते आपल्या संगतीने तो दुसऱ्याचे कपाळ उठवीत असतो २ मंत्राच्या सामर्थ्याने सर्पही हातात धरता येतो, पण त्यापेक्षाही या दुष्टाची जात फारच वाईट असते ३ तुकाराम महाराज म्हणतात अशा या दुर्जनास कोणत्याही वाईटाची उपमा दिली तरी ती शोभत नाही, इतका तो वाईट असतो ४

२१९८ ऐका जी संतजन । सादर मन करूनि ॥ १ ॥
सकळांचें सार एक । कंटक ते त्यजावे ॥ २ ॥
विशेषता कांद्याहूनि । सेवित्या घाणी आगळी ॥ ३ ॥
तुका म्हणे ज्याची जोडी । ते[2] परवडी बैसीजे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – कंटक–दुष्ट लोक सेवित्या–खाणारास आगळी–अधिक जोडी–संगत, सोबत, परवडी–विपुल लाभ

अर्थ – संतलोकहो, तुम्ही सावध चित्ताने नीट एका १ सव गोष्टींचे एक तात्पर्य की दुष्ट लोकांचा त्याग करावा २ कांद्यापेक्षा त्याचा खाणाराचीच अधिक घाण येते ३ तुकाराम महाराज म्हणतात, ज्याची जशी संगत करावी तसा विपुल लाभ व्हायचा ४

२१९९ आज्ञा पाळुनिया असे एकसरें । तुमचीं उत्तरें संताचीं हीं ॥ १ ॥
भागवूनि देह ठेवियेला पायीं । चरणावरि डोई येथूनचि ॥ २ ॥
येणें जाणें हें तो उपाधीचें मूळ । पूजा ते सकळ अकर्तव्य ॥ ३ ॥
तुका म्हणे असे चरणींचा रज । पदींच सहज जेथें तेथें ॥ ४ ॥

२२०० न सडाया ठाव । ऐसा निश्चयाचा भाव ॥ १ ॥
आतां पुरे पुन्हा यात्रा । हेंचि सारूनि सर्वत्रा ॥ २ ॥
सनिधचि सेवा । असों करूनियां देवा ॥ ३ ॥
आज्ञेच्या पाळणें । असे तुका संतां म्हणे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – सडाया–सोडावा, ठाव–स्थान, ठिकाण, सारून–त्याग करून

अर्थ.– देवा, आता तुमचे स्थान मी कधी सोडणार नाही, असा माझ्या मनाचा निश्चय झाला आहे १ आता पुन जन्माला येण्याची यात्रा पुरे. सवस्वाचा त्याग करून मी आता हेच धरून राहिलो आहे २ देवा, तुमची सेवा करीत आम्ही सतत तुमच्याजवळ राहू ३ तुकाराम महाराज म्हणतात, संतहो, मी तुमच्या आज्ञेचे पालन करीत आहे ४

२२०१ उपाधीचे बीज । जळोनि राहिले सहज ॥ १ ॥
आम्हा राहिली ते आता । चाली देवाचिया सत्ता ॥ २ ॥
पराधीन तें जिणें । केलें सत्ता नारायणें ॥ ३ ॥
तुका म्हणे जाणें पाय । खुटले आणीक उपाय ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – चाली–चालणे, चाल्णे

अर्थ – सर्व प्रापंचिक उपाधींचे बीज आता सहजासहजी जळून गेले आहे १ आता या देवाच्या सत्तेने चालणे एवढेच आमच्याकरिता राहिले आहे २ आमचे जीवन या नारायणाने स्वतःकडे घेऊन पराधीन केले, त्याच्या सत्तेने ते चालणार ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी फक्त आता या देवाचे पायच जाणीत असल्याने आता इतर उपाय खुंटून गेले आहेत ४

२२०२ गोविंदावाचोनि वदे ज्याची वाणी । हगवण घाणी पिटपिट ते ॥ १ ॥
मस्तक सांडूनि सिसफुल गुडघा । चार तो अवघा वावळ्याचा ॥ २ ॥
अगभूत म्हूण पूजितो वाहाणा । म्हणता शाहाणा येइल कैसा ॥ ३ ॥
तुका म्हणे वेश्या सांगे सवासिणी[१] । इतर पूजनीं भाव तैसा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – सिसफुल–डोक्यात घालायचा फुलाचा अलंकार

अर्थ – एका गोविंदाशिवाय ज्याची वाणी बोलत राहाते, ते त्याचे बोलणे हगवणीच्या घाणीच्या पिटपिटण्यासारखे आहे १ स्त्रियांना डोक्यात घालायचा फुलाचा अलंकार जर गुडघ्यास बांधला तर तो वावळटपणाचा वेडाचारच दिसेल २ अगभूत म्हणून पायातील जोडयाची जो पूजा करतो त्यास शहाणे कसे म्हणता येईल ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, इतर देवांची पूजा करण्याचा भाव हा वेश्येस सुवासिनी म्हणून बोलाविण्यासारखे आहे ४

२२०३ कुत्र्याऐसे ज्याचे जिणें । संग कोणी न करीजे ॥ १ ॥
जाय तिकडे हाडहाडी । गोंहवाडीच सोइरीं ॥ २ ॥
अवगुणाचा त्याग नाहीं । खवळे पाहीं उपदेशें ॥ ३ ॥
तुका म्हणे कैंचो लवी । ठेंग्या केवीं अंकुर ॥ ४ ॥

१ सुवासिनी

शब्दार्थ व टीपा :- सग-सोबत, गोन्ह्याडी-गुखाडी, हगीनदारी, लवी-नम्रता, ठेंग्या-खुंट.

अर्थ :- ज्या माणसाचे जिणे कुत्र्याप्रमाणे असते त्याची सगत कुणीही करीत नाही. १ तो जिकडे जाईल तिकडे कुत्र्याप्रमाणे त्याला हाडहाड केली जाते. त्याला त्याचे सगेसोयरे हगीनदारीतच भेटतात. २ असा मनुष्य कधी अवगुणांचा त्याग करीत नाही. कुणी त्याला उपदेश केला तर तो खवळून जातो. ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा माणसास नम्रता कुठून येणार ? खुंटाला कधी अंकुर फुटेल काय ? ४

२२०४ सर्वथा ही खोटा संग । उपजे भंग मनासी ॥ १ ॥
बहु रंगें भरलें जन । संपन्नचि अवगुणी ॥ २ ॥
सेविलिया निष्कामबुद्धी । मद्यें शुद्धी सांडवी ॥ ३ ॥
त्रासोनियां बोले तुका । आतां लोकां दंडवत ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- भंग-बिघाड, सांडवी-सोडते, संपते.

अर्थ :- अशा प्रकारच्या वाईट माणसाचा सग खोटा असतो. कारण त्याच्या संगतीने मनात बिघाड निर्माण होतो. १ जग अनेक रगांनी भरले असून ते अवगुणांनी संपन्न असे आहे २ मद्य जरी निष्काम बुद्धीने सेवन केले तरी त्यामुळे शुद्धी सपते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा प्रकारच्या लोकांना दंडवत असो. मी असे त्रासून बोलतो आहे. ४

२२०५ उपचारासी वाज जालों । नका बोलों यावरी ॥ १ ॥
असेल तें असो तैसें । भेटीसरिसें नमन ॥ २ ॥
दुसऱ्यामध्यें कोण मिळे । छंद चाळे बहु मतें ॥ ३ ॥
एकाएकीं आतां तुका । लौकिका या बाहेरी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- वाज जालों-कटाळलो, थ्रासलो.

अर्थ :-लोकहो, पुष्कळ उपचार करून मी आता कंटाळलो. आता तुम्ही यासबंधी काही बोलू नका. १ जसे असेल तसे असू द्या भेट होताच मी तुम्हांस नमन करतो. २ कारण, अनेक छद व अनेक चाळे करणारे लोक पुष्कळ आहेत. त्यांच्यात कोण मिसळणार ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, आता या लौकिकाच्या बाहेर निघून मी एकटा राहिलो आहे ४

२२०६ मी तें मी तूं तें तूं । कुंकूड हें लाडसो ॥ १ ॥
वचनाची पडो तुटी । पोटींचें पोटीं राखावें ॥ २ ॥
तेथील तेथें येथील येथें । वेगळ्या कुंथें कोण मारें ॥ ३ ॥
याचें यास त्याचें त्यास । तुकयानें कास घातली ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- कुंकड-कोणीकडे.

अर्थ .- माझ्यात मीपणा व तुझ्यात तूपणा असे लाड मी कोणीकडे करू ? १ अशा वचनाची तूटच पडावी. पोटातले पोटातच राहावे. २ त्या ठिकाणीचा धर्म त्या ठिकाणी, व या ठिकाणचा धर्म या ठिकाणी, अशा वेगळ्या कुंथण्याचे ओझे कोण सहन करणार ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, म्हणूनच त्याचे त्याला व याचे याला हा भाव नाहीसा करण्यासाठी मी प्रतिज्ञा केली आहे ४

२२०७ लाडाच्या उत्तरीं वाढविती कळहे । हा तो अमंगळ जातिगुण ॥ १ ॥
तमाचे शरीरीं विटाळचि वसे । विचाराचा नसे लेश तो ही ॥ २ ॥
कवतुके घ्यावे लेकराचे बोल । साहिलिया मोल ऐसे नाहीं ॥ ३ ॥
तुका म्हणे काय उपदेश खळा । न्हाउनि काउळा क्षतें[1] धुंडी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – कळहे–कलह, भांडण, तम–राग, खळा–दुष्टास, क्षतें–जखमा

अर्थ – प्रथम लाडालाडाने बोलून मग भांडण करणे हा अमंगल गुण जाणावा १ ज्याच्या अंगी फार राग त्याच्या ठिकाणी विटाळ वस्ती करून असतो त्याच्या मनात चांगला विचार अणुमात्रही नसतो २ मात्र लेकराचे हे बोल कौतुकाने घ्यावेत मग ते सहन केल्यावर अमोल आहेत ३ तुकाराम महाराज म्हणतात, दुष्ट माणसास उपदेश करून काय फायदा ? कावळ्यास चांगले न्हाऊ माखू घातले तरी तो मेलेल्या जनावरांच्या जखमाच शोधीत राहणार ४

२२०८ आतां मज देवा । इचे हातींचे सोडवा ॥ १ ॥
पाठी लागलीसे लासी । इच्छा जिते जैसी तैसी ॥ २ ॥
फेडा आतां पाग । अंगीं लपवुनी अंग ॥ ३ ॥
दुजें नेणें तुका । कांहीं तुम्हासी ठाउका ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – लासी–एक राक्षसी

अर्थ – देवा, आता मला या इच्छेच्या हातून सोडवा १ ही इच्छा नेहमीप्रमाणेच जिवंत असून एखाद्या राक्षसीप्रमाणे माझ्या मागे लागली आहे २ माझे अंग तुमच्या अंगात समावून घेऊन देवा माझे पांग फेडा आता ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा मी तुमच्यावाचून दुसरे काही जाणीत नाही, हे तुम्हांस माहीत आहे ४

शब्दार्थ व टीपा – पारिखे–माहीत नसते, गोऱ्हवाडीचा–गुप्वाडीचा, हगीनदारीचा, झणी–नये, सीण–दु:ख, श्रम, दरुषणें–दर्शनाने, कारण–काय

अर्थ – जो कुणी विष्ठेचे सेवन करीत असतो त्याला अमृताची चव माहीत नसते, कारण वाईट व अमंगल लोकांचे सोबती अमंगलच असतात १ हगीनदारीचा अंत कधी पाहू नये त्याचप्रमाणे दुर्जनाची सोबतही संतांनी कधी करू नये २ या दुर्जनांच्या अंगी असणाऱ्या भेसळीच्या या योगात अमंगल गुण असतात त्यांच्या दर्शनानेच मनात दु:ख निर्माण होते ३ तुकाराम महाराज म्हणतात, ज्यांच्या घरी दुर्जनाची छी थू हे धन असते, तेथे आमचे काय काम असणार ? ४

२२११ चावळले[1] काय न करी बडबड । न म्हणे फिकें गोड भुकेले तें ॥ १ ॥
उमजल्याविण न धरी सांभाळ । असो खळखळ जनाची हे ॥ २ ॥
गरज्या न कळे आपुलिया चाडा । करावी ते पीडा कोणा पाईं ॥ ३ ॥
तुका म्हणे भोगितील भोगें । संचित तें जोगें आहे[2] कोणा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – चावळले–वेडे यानेन, गरज्या–गरजवंत, चाडा–गरज, जरूरी

अर्थ – जो कुणी भुकेने पीडला गेला आहे तो कधी अन्न फिके म्हणजे आळणी अथवा गोड असे म्हणत नाही वेड लागलेला मनुष्य मनास वाटेल तशी बडबड करीत नाही काय ? १ असा मनुष्य शुद्धीवर आल्याखेरीज स्वत:च्या देहाचा सांभाळ करणार नाही यामुळे अशा लोकांजवळ खळखळ करणे पुरे आहे २ जो कुणी गरजवंत आहे त्याला आपल्या गरजेसाठी कुणाला कशी पीडा द्यावी हे समजत नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, लोक आपापल्या प्रारब्धाप्रमाणे भोग भोगतील कुणाचे संचित योग्य प्रकारचे आहे ? ४

२२१२ आपुला तो देह आम्हा उपेक्षीत । कोठें जाऊं हित सांगों कोणा ॥ १ ॥
कोण नाहीं दक्ष करितां संसार । आह्मीं हा विचार वमन केला ॥ २ ॥
नाहीं या धरीत जीवित्वाची चाड । कोठें करूं कोड आणिकांचे ॥ ३ ॥
तुका म्हणे असों[3] चिंतोनिया देवा । मी माझें हा हेवा सारूनिया ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – वमन–त्याग, चाड–इच्छा, कोड–पर्वा, हेवा–हाव, सोस

अर्थ – आम्ही आमच्या देहाची उपेक्षा केली आहे आता कुठे जाऊन कुणाला हिताचा विचार मी सांगू ? १ आपला संसार करण्याविषयी कोण दक्ष नाही ? आम्ही मात्र या संसाराच्या विचाराचा त्याग केला आहे २ जिथे मी माझ्या जिवाची काळजी करीत नाही, इच्छा धरीत नाही तिथे दुसऱ्याची पर्वा कुठे करू ? ३ तुकाराम महाराज म्हणतात मी, माझे अशी हाव सोडून देऊन आम्ही श्रीहरीचे चिंतन करून राहू ४

२२१३ चाकरीवांचून । खाणें[4] अनुचित वेतन ॥ १ ॥
धणी काढोनिया निजा । करील ये कामाची पूजा ॥ २ ॥
उचितावेगळें । अभिलाषें तोंड काळें ॥ ३ ॥
सांगे तरी तुका । पाहा लाज नाहीं लोकां ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – वेतन पगार श्रममूल्य

अर्थ – धन्याची काहीएक चाकरी न करता चाकराने पगार खाणे हे उचित नाही १ चाकराने धन्याची योग्य ती सेवा केल्यावरच योग्य तो गौरव धनी चाकराचा करीत असतो २ योग्य अशी चाकरी न करताच

१ चळलें २ नाहीं, ३ असें, ४ खाव

पगाराची इच्छा करणारा काळतोंड्या असतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी एवढे सांगत असतानाही पाहा या लोकांना कसलीच लाज नाही ४

२२१४ वरें सावधान । राहावे समय राखोन ॥ १ ॥
नाहीं सारखिया वेळा । अवघ्या पावतां अवकळा ॥ २ ॥
लाभ अथवा हानी । थोड्यामध्येंच मोधनी ॥ ३ ॥
तुका म्हणे राखा¹ । आपणा नाहीं तोंचि वासा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – मोधनी–शकुन वासा–नाश.

अर्थ – लोकहो, तुम्ही नीट समय ओळखून चांगले सावध रहा १ सर्व वेळा काही अवकळा प्राप्त करून देणाऱ्याच असतात असे नाही २ शकुनाप्रमाणे लाभ होण्याची अथवा हानी होण्याची वेळ थोडक्यातच कळून येते ३ तुकाराम महाराज म्हणतात, जोपर्यंत तुमच्या आयुष्याचा नाश होत नाही तोपर्यंतच तुम्ही तुमचे स्वतःचे रक्षण करून घ्या ४

२२१५ काय करूं जी दातारा । काही न पुरे ससारा ॥ १ ॥
जाली माकडाची परि । येतों तळा जातो वरी ॥ २ ॥
घालीं मलते ठायीं हात । होती शिघ्या बैस लात ॥ ३ ॥
आदि अतीं तुका । सागे न कळे झाला चुका ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा.– जोडी–प्राप्ती, सुनें–कुत्रे.

अर्थ :– सज्जनांची निंदा करून शेवटी खावी हीच अखेर दुर्जनांची प्राप्ती असते. १ काही तरी निमित्त काढून जे सज्जनांचे उणे काढण्यासाठी कुत्र्याप्रमाणे धावतात. २ हे दुर्जन कधी मुखाने रामनाम घेत नाहीत. कायावाचामने करून संतांची निंदा करणे हेच त्यांचे एकमेव काम असते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, संताची निंदा त्यांच्या मागून करावी हेच त्याच दुर्जनांच्या वाट्यास आलेले असते. ४

२२१८ शादीचे तें सोंग । संपादितां राजा व्यंग[1] ॥ १ ॥
पाहा कैसी विटंबना । मूर्खा अभाग्याची जना ॥ २ ॥
दिसतें तें लोपी । झिज्या वोढुनिया पापी ॥ ३ ॥
सिंदळी त्या सती । तुका म्हणे थुंका घेती ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा .– शादीचे–लग्नाचे, व्यंग–कमीपणा.

अर्थ :– लग्नाचे नुसते सोंग जर राजाने संपादन केले तर ते त्याला कमीपणा आणणारे आहे. १ अशा या अभागी व मूर्ख लोकांची विटंबना कशी झाली आहे पाहा. २ जे तोंड चांगले दिसते ते कपाळावरील झिजा ओढून जो वडवितो तो पापीच असतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, चांगली सती असून जी वाईट चालीने वागते तिच्या तोंडावर लोक थुंकत असतात. ४

२२१९ भक्ता म्हणऊनि वंचावें जीवें । तेणें शेण खावें काशासाटीं ॥ १ ॥
नासिले अडबद कौपीन ते माळा । अडचण राउळामाजी केली ॥ २ ॥
अंगीकारिले सेवे घडे अंतराय । तया जाला न्याय खापराचा ॥ ३ ॥
तुका म्हणे कोठें तगों येतो घाणीं । आहाच हो मनीं अधीरता ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:– वंचावें–फसवावे, अडबंद–कडदोरा

अर्थ – आपण देवाचे भक्त आहोत असे तोंडाने म्हणतो आणि तशी सेवा मात्र करीत नाही. मग त्याने असे शेण तरी कशासाठी खावे ? १ असे भक्त कडदोरा बांधतात, कौपिन घेतात, गळ्यात माळा घालतात, पण त्याचा काय उपयोग ? त्यांचा नाशच होतो. असे भक्त देवळात उगाचच गर्दी करून सोडतात २ जी सेवा पत्करलेली असते तिच्यात अंतर पडते. तेव्हा खापर–परीस–न्यायाप्रमाणेच याचा परिणाम होणार. ३ तुकाराम महाराज म्हणतात, ज्याच्या मनात उगाचच अधीरता असते असे घाणेरडे मन कधी टिकून राहील काय ?४

२२२० गयाळाचें[2] काम हिताचा आवारा । लाज फजितखोरा असत नाहीं ॥ १ ॥
चित्ता न मिळे तें डोळां सलों येतें । असावें परतें जवळूनि ॥ २ ॥
न करावा संग न बोलावी मात । सावधान चित्त नाहीं त्यासी ॥ ३ ॥
तुका म्हणे दुःख देतील माकडें । घालितो सांकडें उफराटें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – गयाळाचे–गबाळाचे, वावळ्याचे, आवारा–खटाटोप, सांकडें–संकट.

अर्थः– स्वहिताचा व्यर्थ खटाटोप करीत बसणे हे गयाळपणाचे काम आहे याची त्या फजितखोरास लाजही असत नाही. १ जो आपल्या मनासारखा वागत नाही तो डोळ्यात सारखा सलत राहातो. म्हणून आपण त्याच्यापासून दूरच असावे. २ ज्याचे चित्त स्वहिताविषयी सावध नाही त्याचा संग कधी धरू नये. किंवा त्याच्याशी भाषणही करू नये ३ तुकाराम महाराज म्हणतात, असे हे माकडाच्या वृत्तीचे लोक भलतेच संकट निर्माण करून मला दुःख देतात. ४

---

१ वेंग, २ गहिल्याचे.

२२२१ बहु बरें एकाएकीं । संग चुकी करावा ॥ १ ॥
ऐसे बरें जाले ठावे । अनुभवें आपुल्या ॥ २ ॥
सांगावे तें काम मना । सलगी जना नेदावी ॥ ३ ॥
तुका म्हणे निघे अगी । दुजे संगीं आतळतां ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा –आतळतां–स्पर्श होताच

अर्थ – लोकांची संगत सोडून एकान्तात राहावे हे मला फार बरे वाटते १ असे हे मला स्वतःच्या अनुभवावरून चांगले समजून आले आहे २ जे काही काम असेल ते आपल्या मनास सांगावे इतर लोकांशी त्यासाठी सलगी करू नये ३ तुकाराम महाराज म्हणतात, दुसऱ्याच्या संगतीत आल्याने जसे लाकडाच्या घर्षणातून आग निर्माण होते तशी ती दुसऱ्याच्या संगतीने आपली अवस्था होऊन नाश होतो ४

अलकापुरीं स्वामी कीर्तनास उभे राहिले तेव्हां कवित्वाचा निषेध करून लोक बोलिले कीं कवित्व बुडवणें तेहां कवित्व बुडवून पांच दिवस होते ॥ लोकांनीं फार पीडा केली कीं संसारही नाहीं व परमार्थही बुडविला. आणीक कोणी असतें तें जीव देतें. मग निद्रा केली ते अभंग ॥ २०॥

२२२२ भूतबाधा आम्हा घरीं । हे तों आश्चर्य गा हरी ॥ १ ॥
जाला भक्तीचा कळस । आले वसतीसी दोष ॥ २ ॥
जागरणाचें फळ । दिली जोडोनि तळमळ ॥ ३ ॥
तुका म्हणे देवा । आहाच कळो आली सेवा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा –आहाच–व्यर्थ, उगाच

अर्थ – अहो श्रीहरी, भुताची, इतर प्राणिमात्राची आम्हांस बाधा व्हावी हे तर मोठेच आश्चर्य आहे १ हा तर भक्तीचा कळसच झाला म्हणायचा, कारण येथे दोषाची वसती झाली २ हरिजागरणाचे फळ तळमळीच्या रूपाने मला प्राप्त झाले ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तुमची आम्ही सेवा केली ती व्यर्थच म्हणावी लागेल असे दिसते ४

२२२३ नाहीं जो वेचलो जिवाचिया त्यागें । तोंवरी वाउगें काय बोलो ॥ १ ॥
जाणिवले आता करीं ये उदेश । जोडी किंवा नाश तुमची जीवे ॥ २ ॥
ठायींचिचि आले होतें ऐसे मना । जावे ऐसे वना दृढ जाले ॥ ३ ॥
तुका म्हणे मग वेचीन उत्तरें । उद्देशिले खरें जाल्यावरी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा –वेचलों–खर्च झालो, अर्पण झालो

अर्थ –जीव समर्पण करून जोपर्यंत सेवेस लागलो नाही तोपर्यंत वावगे असे काय बोलावे ? १ तुमची प्राप्ती करून घेण्यास मी माझ्या जीवाचा नाश करून घेईन किंवा तुमच्यासाठी जीव समर्पण केल्यावर एक तर तुमची प्राप्ती तरी होईल, किंवा नाश तरी होईल हे आता समजून आले आहे २ प्रथमपासूनच वनात जावे असे

आमच्या मनात दृढ झाले होते ३ तुकाराम महाराज म्हणतात, मनास जो उद्देश धरला आहे तो बरोबरच पूर्ण झाला तर मी देवाशी भाषण करीन. ४

२२२४ करूं कवित्व काय नाहीं आतां लाज । मज भक्तराज हांसतील ॥ १ ॥
आतां आला एका निवाड्याचा दिस । सत्याविण रस विरसला[1] ॥ २ ॥
अनुभवाविण कोण करी पाप । रितेंचि संकल्प लाजलावे[2] ॥ ३ ॥
तुका म्हणे आतां न धरवे धीर । नव्हे जीव स्थिर माझा मज ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा .- निवाड्याचा-निर्णयाचा, निकालाचा, रितेंच-पोकळ, व्यर्थ.

अर्थ :- आता कवित्व करण्याविषयी मला काय लाज वाटत नाही काय ? कारण भक्तराज आता मला हसतील ना. १ आता निर्णयाचा एक दिवस आलेला आहे सत्यावाचून रसाचा विरस होत राहील. २ अनुभवाशिवाय पाप तरी कोण करील ? व्यर्थ संकल्प करणे लाजिरवाणे काम आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, आता मला धीर धरवत नाही; कारण माझा जीवच आता स्थिर राहिलेला नाही ४

२२२५ नाहीं आइकत तुम्ही माझे बोल । कासया हें फोल उपणूं भूस ॥ १ ॥
ऐसी तें करीन बैसलिया ठाया । तूंचि बुझावया जवळी देवा ॥ २ ॥
करावे ते केले सकळ उपाय । आतां पाहों काय अझूनि वास ॥ ३ ॥
तुका म्हणे आला आशेसी सेवट । होऊनियां नीट पायां पडों[3] ॥ ४ ॥

*शब्दार्थ व टीपा – उपणूं-पाखडू, भूस-फोलकट, बुझावया-समजूत घालण्यासाठी, वास-वाट.*

अर्थ :- देवा, तुम्ही माझे बोलणे काही ऐकत नाही. मग मी उगाच फोलकट, भूस पाखडू कशाला ? १ देवा, तू मला समजाविण्यासाठी जवळ येशील असा उपाय करून मी याच ठिकाणी बसून राहीन. २ आजपर्यंत मी जे जे उपाय करायचे ते केले आहेत. आता अजूनही मी तुमची वाट पाहू काय ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, आता आपल्या आशेची अखेर झाली. मी आता नीट होऊन तुमच्या पायां पडतो ४

२२२६ नव्हे तुम्हां सरी । येवढें कारण मुरारी ॥ १ ॥
मग जैसा तैसा काळ । दाट सारावा पातळ ॥ २ ॥
स्वामीचे तें सांडे । पुत्र होतां काळतोंडें[4] ॥ ३ ॥
शब्दा नाहीं रुची । मग कोठें तुका वेची ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – सरी-तरी शब्द येथे असावा, कारण-कार्य, दाट-उत्तम, पातळ-वाईट, सांडे-कमी होतो, रुची-किंमत.

अर्थ:— मुरारी, एवढे सुद्धा माझे काम तुमच्याने होत नाही ना ? १ मग चांगला अथवा वाईट काळ जसा येईल तसा काढावा २ मुलगा काळतोंडचा निघाल्यावर त्याच्या पित्याचे महत्त्वही कमी होते ३ तुकाराम महाराज म्हणतात, शब्दांची एकदा किंमत कमी झाल्यावर मग ते कशाला बोलावेत ? ४

२२२७ केल्यापुरती आळी । कांहीं होते टाळाटाळी ॥ १ ॥
सत्यसंकल्पाचें फळ । होतां[5] न दिसेचि बळ ॥ २ ॥
वळणांच्या ओव्या । रित्या खरें मापें घ्याव्या ॥ ३ ॥
जातीं उखळें घाटूं । तुका म्हणे राज्य घाटूं ॥ ४ ॥

---

१ विसरला, २ लाजवावे, ३ पडें, ४ काळें तोंड, ५ हे तो.

शब्दार्थ व टीपा – हाळी-हट्ट, घाटू-लाकडी पळा, धाटूं-मिळवू

अर्थ – हट्ट केल्यापुरती काहीतरी देऊन कशीतरी माझी टाळाटाळी होते १ सत्य संकल्पाच्या फळाची प्राप्ती होईल असे काही दिसत नाही २ दळणाच्या वेळी ज्या ओव्या म्हटल्या जातात त्या लाख्याखोट्या मापाने कशा मोजल्या जातील ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, उखळे, लाकडी पळण यानी राज्य मिळविणे कधी शक्य होईल काय ? ४

२२२८ आता नेम जाला । याच फळसीं विठ्ठला ॥ १ ॥
हातीं न धरीं लेखणी । काय मुसकुट ते वाणी ॥ २ ॥
जाणे तेणे काळ । उरला सारीन सकळ ॥ ३ ॥
तुका म्हणे घाटी । घाटू कोरडा शेवटीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – फळसीं-शेवटी, अखेरीस, घाटी-घमा.

अर्थ – विठ्ठला, आता अखेरीस मी मनाशी निश्चय केला आहे १ मी पुन म्हणून हातात लेखणी धरणार नाही उगाच फोल वाणी खर्च करण्यात काय अर्थ आहे ? २ उरलेला काळ असे मला समजेल तशा प्रकाराने मी कठीन ३ तुकाराम महाराज म्हणतात, शेवटी कोरडा झालेला घसाच का ना तरी चाटून राहीन ४

२२२९ पावावे संतोष । तुम्हीं यासाटीं सायास ॥ १ ॥
करीं आवडी वचनें । पालटूनि क्षणक्षणे ॥ २ ॥
द्यावे अभयदान । भुमी न पडावे वचन ॥ ३ ॥
तुका म्हणे परस्परें । कांहीं वाढवीं उत्तरें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – सायास-प्रयत्न.

अर्थ – देवा, तुम्ही संतुष्ट व्हावे यासाठी माझे सतत प्रयत्न होत आहेत १ क्षणाक्षणाला देवा तुम्हास आवडणारी वचने मी बोलत आहे २ तुम्ही मला अभयदान द्यावे आमचे बोलणे भमीवर पडल्यासारखे व्यर्थ न व्हावे ३ तुकाराम महाराज म्हणतात, परस्परात प्रेमाचे काही संभाषण वाढवावे ४

२२३० बोलता वचन असा पाठमोरे । मज भाव बरे कळो आले ॥ १ ॥
मागितले नये अरुचीनें हाता । नाहीं वरी सत्ता आदराची ॥ २ ॥
समाधानासाठी लाविलासे कान । चोरले तें मन दिसतसा ॥ ३ ॥
तुका म्हणे आम्हां तुमचेचि फंद । वरदळ छंद कळो येती ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – अरुचीने-आवडले नसल्याने, रुची नसल्याने, वरदळ-वरवरच

अर्थ – आम्ही काही शब्द बोलू लागलो की तुम्ही पाठमोरे होता असे तुमच्या मनातील भाव मला चांगले समजून आले १ तुम्हास मी जे मागतो ते न आवडल्यामुळे व त्याचा आदरही तुमच्या मनात नसल्यामुळे ते काही आमच्या हाती येत नाही २ चित्ताचे समाधान व्हावे म्हणून आम्ही कान लावून बसलो आहोत पण तुम्ही मात्र आपले मन चोरून ठवले आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, आम्हांस तुमचे हे वरवरचे छंद फंद समजून येतात ४

२२३१ काशासाटीं बैसो करूनिया हाट । वाउगा बोभाट डांगोरा हा ॥ १ ॥
काय आले एका जिवाच्या उद्धारें[1] । पावती उच्चारें काय हो ते ॥ २ ॥

---

[1] उदारें.

नेदी पट परी अन्नें तों न मारी¹ । आपुलिये थोरीसाटीं राजा ॥ ३ ॥
तुका म्हणे आतां अव्हेरिलें तरी । मग कोण करी दुकान हा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– हाट–बाजार, पट–राज्याधिकार.

अर्थ:– देवा, हा बाजार भरवून तुमच्या सामर्थ्याचा स्वयं डांगोरा आणि बोभाटा मी करू ? १ एका जोधाच्या उद्धाराचे काय ही विशेष आहे तुम्हाला ? एका नामाच्या उच्चाराबरोबर तू पावतोस. इतर गोष्टींची जरूरी काय आहे ? २ आपली स्वतःची थोरवी रक्षण करण्यासाठी राजा आपल्या नावडत्या मुलास जरी राज्याधिकार देत नसला तरी अन्नाशिवाय काही उपाशी ठेवून मारत नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, तुम्ही जर आता माझा स्वीकार केला नाही तर मग मी हा दुकानाचा पसारा तरी कशासाठी केला आहे ? ४

२२३१ (अ) माझा मज नाहीं । आला उबग तो कांहीं ॥ १ ॥
तुमच्या² नामाची जतन । नव्हता थोर वाटे सीण ॥ २ ॥
न पडावी निंदा । कानीं स्वामीची गोविंदा ॥ ३ ॥
तुका म्हणे लाज । आम्हां स्वामीचें तें काज ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा.– उबग–त्राम, कटाळा, काज–कार्य.

अर्थः– माझा मला काही कंटाळा आलेला नाही १ पण तुमच्या नावाच्या लौकिकाचे जतन होत नाही याचे फार वाईट वाटते. २ गोविंदा, स्वामींची निंदा माझ्या कानी येऊ नये असे मात्र वाटते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, आम्हांस स्वामीच्या कार्याबद्दल मनात लाज आहे. ४

२२३२ कांहीं मागणें हें आम्हां अनुचित । वडिलांची रीत जाणतसों ॥ १ ॥
देह तुच्छ जालें सकळ उपाधी । सेवेपाशीं बुद्धि राहिलीसे ॥ २ ॥
शब्द तो उपाधि अचळ निश्चय । अनुभव हा काय नाहीं अंगीं ॥ ३ ॥
तुका म्हणे देह फांकिला विभागीं । उपकार अंगीं उरविला³ ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– फांकिला–वाटला गेला, विभागला गेला.

अर्थ :– इतर कोणाजवळ काही मागावे हे तर आम्हांला अयोग्य वाटते कारण आम्ही संतांसारख्या वडिलांची रीत जाणून आहोत. १ देह व सर्व उपाधी आम्हांस तुच्छ वाटतात आमची बुद्धी देवाच्या सेवेतच राहिलेली आहे. २ अचल व निश्चल अशा स्वरूपाच्या पुढे शब्द हीही एक उपाधीच आहे. असा अनुभव आमच्या अंगी नाही काय ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, पंचमहाभूतांचा देह पंचमहाभूतांत मी वाटून टाकिला आहे आणि अंगी परोपकार तेवढा ठेविला आहे ४

२२३३ मागितल्यास कर⁴ पसरी । पळतां भरी वाखती ॥ १ ॥
काय आम्ही नेणों वर्म । केला श्रम नेणतां ॥ २ ॥
बोलतां बरें येतां रागा । कठीण लागा मागेंमागें ॥ ३ ॥
तुका म्हणे येथें बोलो । असे चाली उफराटी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– कर–हात, वाखती–खोळ, ओटी, पदर.

१ मरी, २ तुम्ह्या, ३ उमविला, ४ पसरी कर.

अर्थ :– देवा, जो कुणी काही तुमच्यापाशी मागतो त्याच्याच पाशी तुम्ही हात पसरता व जो तुमच्यापासून दूर पळून जातो त्याची तुम्ही ओटी भरता १ हे तुमचे वर्म काय आम्ही जाणीत नाही ? न जाणता उगाच श्रम मात्र आम्ही केले २ कुणी चांगले बोलले तर तुम्ही त्याच्यावर रागावता, आणि जो कठीण हृदयाचा आहे त्याच्या मागे मागे मात्र तुम्ही लागता ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशी ही तुमच्या ठिकाणी उलट्या पद्धतीची रीत आहे. ४

२२३४ असो तुझें तुजपाशीं । आम्हां त्यासी काय चाड ॥ १ ॥
निरोधें[1] कां कोंडूं मन । समाधान असोनी ॥ २ ॥
करावा तो उरे आट । खटपट वाढतसे ॥ ३ ॥
तुका म्हणे येऊनि रागा । कां मी भागा[2] मुकेन ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– चाड–विमन, पर्वा, जरूरी, निरोधें–दडपून, विरोध करून, आट–खटपट, परिश्रम

अर्थ – देवा, आता तुमचे तुमच्यापाशी असू दे आम्हांला काय त्याची जरूरी आहे ? १ चित्ताचे निरोधन करून त्यासाठी मी मनाला कशाला कोंडून घेऊ ? माझ्या मनास समाधान वाटत आहे २ जो जो खटपट करावी ती ती वाढीसच लागून त्रास मात्र शेवटी उरतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी उगाच रागवून माझ्या वाट्यास आलेल्या विभागास कशासाठी मुकू ? ४

२२३५ आहे तेंचि पुढें पाहों । बरे आहों येथेंचि ॥ १ ॥
काय वाढवूनि काम । उगाच श्रम तृष्णेचा ॥ २ ॥
स्थिरावतां ओघीं बरें । चाली पुरे पडेना ॥ ३ ॥
तुका म्हणे वळितां मन । आम्हां क्षण न लगे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– स्थिरावतां–स्थिर राहिल्यास

अर्थ – मी या ठिकाणी आहे तेथेच बरा आहे येथे असूनच पुढचे प्रकार काय होतील ते पाहू १ उगाच काम वाढविण्यात काय अर्थ आहे ? विनाकारण तृष्णेचे मात्र दुःख होणार २ वाहत्या ओघातच स्थिर राहाणे बरे. कारण वाहात्या ओघात कितीही चालले तरी पुरे पडणार नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, या श्रीहरीचे मन वळविताना आम्हांस एक क्षणही लागणार नाही ४

२२३६ सांगा दास नव्हें तुमचा मी कैसा । ऐसें पंढरीशा विचारूनि ॥ १ ॥
कोणासाटीं केली प्रपंचाची होळी । या पायां वेगळी मायबापा ॥ २ ॥
नसेल तो द्यावा सत्यत्वासी धीर । नये भाजूं हीर उफराटे ॥ ३ ॥
तुका म्हणे आम्हा आहिक्य परत्रीं । नाहीं कुळगोत्रीं दुजें[3] कांहीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – विचारूनि–विचार करून, हीर–अंकुर, आहिक्य–ऐहिक, इहलोक, परत्रीं–परलोक

अर्थ – पंढरीराया मी तुमचा दास कसा नाही हे नीट विचार करून सांगा बरे १ अहो मायबाप, मी तुमच्या पायांशिवाय इतर कशासाठी माझ्या प्रपंचाची होळी केली आहे ? २ सत्य ज्या ठिकाणी आहे त्यास धीर नसेल तर तो तुम्ही द्यावा उलट बीज उगवणार नाही अशा रीतीने त्याचा अंकुर भाजून टाकू नये ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तुझ्याशिवाय आमच्या कुळगोत्रात या लोकी व परलोकी दुसरे कुणीही नाही ४

---

१ विरोधें, २ विभागा, ३ तुजविण

२२३७ अनन्यासी ठाव एक सर्वकाजें । एकाविण दुजें नेणे चित्त ॥ १ ॥
न पुरतां आळी देशधडी व्हावें । हें काय बरवें दिसतसे ॥ २ ॥
लेंकराचा भार माऊलीचे शिरीं । निढळ तें दुरी धरिलिया ॥ ३ ॥
तुका म्हणे किती घातली लांबणी । समर्थ होऊनि केवढयासाटीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :— काजें-कार्य, आळी-हट्ट, निढळ-दुर्दैवी.

अर्थः— जे भक्त देवा, तुला अनन्य झाले आहेत त्या सर्वांच्या कार्याचे ठिकाण एकच आहे. त्यांचे चित्त या एकाशिवाय दुसरे काहीही जाणीत नाही. १ त्यांचा हट्ट पूर्ण न होता त्यांनी देशोधडीस लागावे हे काय चांगले दिसते का ? २ लेकराचा सर्व भार आईच्याच शिरावर असतो. तिने त्याला दूर ठेविले तर ते दुर्दैवीच ठरेल. ३ तुकाराम महाराज म्हणतात, तुम्ही चांगले समर्थ असून एवढयाशा कामासाठी केवढी लांबण लावता ! ४

२२३८ स्तुति तरि करूं कोणापासीं । कीर्ती तरि कैसी वाखाणावी ॥ १ ॥
खोटया तंव नाहीं अनुवादाचें काम । उरला तो भ्रम वरि बरा ॥ २ ॥
म्हणवावें त्याची लुण नाहीं हातीं । अवकळा फजिती सावकाशें ॥ ३ ॥
तुका म्हणे हेंगे तुमचें माझें तोंड । होऊनीयां लंड आळवितों ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपाः- हेंगे-इकडे, लंड-निलाजरा.

अर्थ — देवा, तुमची स्तुती मी कोणापाशी व किती प्रकारांनी करावी ? तुमची कीर्ती तरी कशी वर्णन करावी ? १ उगाच तुमचा खोटा अनुवाद करून काम भागणार नाही त्यापेक्षा वरवरचा भ्रम राहिलेला बरा. २ तुम्हांस काही गौरवावे तर त्याचा काही अनुभव आलेला नाही. आमची मात्र फजिती व विटंबना सावकाश सुरू आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, आणखी इकडे मी निलाजरा होऊन तुमचे वर्णन तोंडाने गात आहे ४

२२३९ कांहींच न लगे आदि अवसान । बहुत कठीण दिसतसां ॥ १ ॥
अवघ्याच माझ्या वेंचयिल्या शक्ती । न चलेसी युक्ति जाली पुढें ॥ २ ॥
बोलिलें वचन हारपलें नभीं । उतरलों तों उभीं आहों तैसीं ॥ ३ ॥
तुका म्हणे कांहीं न करावेंसें जालें । थकितचि ठेलें चित्त उगें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपाः- आदि-प्रारंभ, अवसान-शेवट, वेंचविल्या—खर्चिल्या, नभीं-आकाशात.

अर्थः— देवा, प्रारंभापासून शेवटापर्यंत मनाला कसलीच आशा वाटत नाही. तुम्ही फार कठिण व अप्राप्य दिसता १ माझ्या सर्व शक्ती खर्च झाल्या, तुम्ही नाहीशा केल्या. आता तुमच्यापुढे काही युक्ती चालेल असे दिसत नाही २ मी जे जे बोलतो ते आकाशात नाहीसे होऊन जाते आणि आम्ही मात्र असे आहोत तसेच तुमच्यापाशी उभे आहोत. ३ तुकाराम महाराज म्हणतात, आता आणखी काही करावे असे वाटतच नाही चित्त थकत थकत उगाच होऊन राहिले आहे. ४

२२४० रुपें[1] गोविलें चित्त । पायीं राहिलें निश्चित ॥ १ ॥
तुम्हीं देवा अवघेंचि गोमटें । मुख देखतां दुःख न भेटे ॥ २ ॥

[1] रूपी गोविवेलें चित्त.

आली इंद्रियां विश्रांति । भ्रमता पीडत ते होतीं ॥ ३ ॥
तुका म्हणे भेटी । सुटली भवबंदाची गांठी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – गोविलें–गुतून राहिल गोमटें–चांगले

अर्थ – देवा, तुमच्या रूपाच्या ठिकाणी माझे चित्त गुतून राहिले आहे, तुमच्या पायांशीच निश्चित होऊन राहिलेले आहे १ देवा, तुम्ही सर्वस्वी चांगले आहात तुमचे मुख पाहिल्यावर दु खाचे दर्शनही होत नाही २ अनेक विषयांच्या ठिकाणी भ्रमण केल्यामुळे कष्टी झालेली इंद्रिये तुमच्या ठिकाणी विश्रांतीस पावली आहेत ३ तुकाराम महाराज म्हणतात, तुमची भेट झाल्यामुळें संसारबंधनाची गाठ सुटली ४

## स्वामींनी तेरा दिवस निद्रा केली. मग भगवंतें येऊन समाधान केलें कीं, कवित्व कोरडे आहे तें काढणें उदकांतून

२२४१ थोर अन्याय केला तुझा अंत म्यां पाहिला । जनाचिया[1] बोलासाटीं चित्त क्षोभविलें ॥ १ ॥
भागविलासी केला सीण अधम मी यातिहीन । झांकुनि लोचन दिवस तेरा राहिलों ॥ २ ॥
अवघें घालूनिया कोडें तानभुकेचे सांकडें । योगक्षेम पुढें तुज करणें लागेल ॥ ३ ॥
उदकीं राखिले कागद चुकविला जनवाद[2] । तुका म्हणे ब्रीद साच केलें आपुलें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – अधम–दुष्ट, कोडें–कौतुकानें, साकडें–संकट, साच–खरोखर

अर्थ – देवा, माझे तुझ्यावर संकट घालून मी तुझा अंत पाहून फार मोठा अन्याय केला आहे लोकांच्या बोलण्यासाठी मी माझे चित्त प्रक्षुब्ध केले १ मी दुष्ट व यातिहीन असून तुला फार कष्ट देऊन श्रमविले आहे मी या स्थितीत डोळे झाकून तेरा दिवस तसाच राहिलो २ देवा, तुझ्यावर मी तहानभुकेचे सर्व संकट घालून राहिल्यामुळें तुलाच माझा योगक्षेम आता पाहावा लागेल ३ तुकाराम महाराज म्हणतात देवा कवितांच्या वह्यांचे कागद पाण्यातून तारून तू जनापवाद चुकविलास व आपले ब्रीद राखलेस ४

२२४२ तू कृपाळू माउली आम्हां दीनांची साउली । न सरित[3] आली बाळवेशें जवळी ॥ १ ॥
माझें केलें समाधान रूप गोजिरें सगुण । निवविलें मन आलिंगन देऊनी ॥ २ ॥
कृपा केली जना हातीं पायीं ठाव दिला सर्तीं । फळों नये चित्तीं दु ख कैसें आहे तें ॥ ३ ॥
तुका म्हणे मी अन्यायी क्षमा करीं वो माझे आई । आतां पुढें काई तुज घालूं सांकडें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा न सरित–न सवरित, लगबगीने त्वरित, सांकडें–संकट

अर्थ –देवा, तू आमची कृपाळू आई असून आम्हा दीनांची सावली आहेस तू लगबगीने बाळवेश धारण करून आमच्या जवळ धावून आलीस १ सुंदर व सगुण रूप दाखवून तू माझ्या चित्ताचे समाधान केलेस, आलिंगन देऊन माझे मन तृप्त केलेस, शीतल केलेस २ तू लोकांकडून कृपा करविलीस आणि संतांनीही आपल्या पायी मला आश्रय दिला त्यामुळे आता दु ख कसले आहे याची चित्ताला जाणीवही होत नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, माझे आई, मी अन्यायी असल्याने मला तू क्षमा कर यापुढे तुला आम्ही संकट घालू काय ? ४

१ जगाचिया, २ जनापवाद, ३ न सवरीत

२२४३ कापो कोणी माझी मान सुखें पीडोत दुर्जन । तुज होय सीण तें मी न करीं सर्वथा ॥ १ ॥
चुकी जाली एकवेळा मज पासूनि चांडाळा । उभें करोनियां जळा माजी वह्या राखिल्या ॥२॥
नाहीं केला हा विचार माझा कोण अधिकार । समर्थासी भार न कळे कैसा घालावा ॥ ३ ॥
गेलें होऊनियां मागें नये बोलों तें वाउगें । पुढिलिया प्रसंगें तुका म्हणे जाणावें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :–सीण-शीण त्रास, माजी–आत.

अर्थ – देवा, कुणी माझी मान कापली अथवा दुष्ट लोकांनी मला कितीही पीडा दिली तरी ज्यामुळे तुला त्रास होईल असे मी काही करणार नाही. १ देवा, तुला पाण्यात उभे राहून वह्यांचे रक्षण करायला लावले ही माझ्यासारख्या चंडाळाकडून मोठीच चूक झाली २ या कामी माझा अधिकार कोणता हाही विचार मी केलेला नाही. तुझ्यासारख्या समर्थावर मी किती म्हणून ओझे घालावे ? याचाही विचार मी केलेला नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, जे यापूर्वी होऊन गेले ते गेले, आता त्याविषयी वायगे कशासाठी बोलावे ? पुढल्या प्रसंगी मात्र मी नीट जाणून राहीन. ४

२२४४ काय जाणें मी पामर पांडुरंगा तुझा पार ।धरिलिया धीर काय एक न करिसी ॥ १ ॥
उतावीळ जालों आधीं मतिमंद हीनबुद्धि । परि तूं कृपानिधी नाहीं केला अव्हेर ॥ २ ॥
तूं देवांचा ही देव अवघ्या ब्रह्मांडाचा जीव । आम्हां दासा कींव कां भाकणें लागली ॥ ३ ॥
तुका म्हणे विश्वंभरा मी तो पतितचि खरा । अन्याय दुसरा दारीं धरणें बैसलो ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपाः– पार–अंत, सीमा, महिमा.

अर्थ.– पांडुरंगा, मी पामर मनुष्य मी तुझा महिमा कसा जाणणार ? धीर धरल्यानंतर तू काय करणार नाहीस ? १ देवा, मी मतिमंद व बुद्धिहीन असून आधीच उतावळा झालो आहे पण तू कृपेचा साठा असल्यामुळे माझी उपेक्षा कधीच केली नाहीस २ तू सर्व देवांचा देव व सर्व जगताचा जीव आहेस. असे असताना आम्हा दासाना काकुळतीस का यावे लागते ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, विश्वाला भरून राहिलेल्या देवा, मी तर खराच पतित आहे, आणि तुझ्या दारी धरणे धरून बसलो आहे, हा दुसरा अन्याय केला आहे. ४

२२४५ नव्हती आली सीसा सुरी अथवा घाय पाठीवरी ।
तो म्यां केला हरी एवढा तुम्हां आकांत ॥ १ ॥
वांटिलासी दोहीं ठायीं मजपाशीं आणि डोहीं ।
लागों दिला नाहीं येथें तेथें आघात ॥ २ ॥
जीव घेती मायबापें थोडया अन्यायाच्या कोपें ।
हें तो नव्हे सोपें साहों तोंचि जाणीतलें ॥ ३ ॥
तुका म्हणे कृपावंता तुज ऐसा नाहीं दाता ।
काय वाणूं आतां वाणी माझी कुंटली ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– सीसा–शीर्ष, डोके, मान, कोपें–रागाने, वाणूं–वर्णन करू, कुंटली–खुटली

अर्थ.–श्रीहरी, माझ्या डोक्यावर कुणी एखादी सुरी ठेविली नव्हती अथवा कुणी माझ्या पाठीवर घावही घातलेला नव्हता; की त्याच्यासाठी मी एवढा आकान्त करावा १ देवा, माझ्या अभंगाचे रक्षण करण्यासाठी तुला डोहात आणि माझे रक्षण करण्यासाठी काठावर अशा दोनही ठिकाणी वाटून रहावे लागेल आणि या दोनही ठिकाणी तू काही

आयात पोचू दिला नाहीत २ लेकराने थोडा जरी अन्याय केला तरी लौकिक जगातील आईबाप रागाने आपल्या मुलाचा जीवसुद्धा घेतील, पण तुम्ही माझा अपराध एवढा लहान समजूनही तो तुम्ही सहन केला, हे मी जाणून आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, कृपावंता, तुमच्यासारखा मोठा दाता दुसरा कुणी नाही तुमचे मी काय वर्णन करावे ? माझी वाणी तर कुंठित होऊन गेली आहे ४

## वर्णावे केला

२२४६ तूं माउलीहून मयाळ चंद्राहूनि शीतळ । पाणियाहूनि पातळ कल्लोळ प्रेमाचा ॥ १ ॥
देऊं काशाची उपमा दुजी तुज पुरुषोत्तमा । ओवाळूनि नामा तुझ्या वरूनि टाकिलों ॥ २ ॥
तुवां केलें रे अमृता गोड त्या ही तू परता । पांचा तत्त्वांचा जनिता सकळ सत्तानायक ॥३॥
कांहीं न बोलोनि आतां उगाच चरणीं ठेवितो माथा ।
तुका म्हणे पंढरिनाथा क्षमा करीं अपराध ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – मयाळ–मायाळू, परता–पक्षा, जनिता–जन्म देणारा

अर्थ – देवा, तू आईपेक्षाही मायाळू आहेस तू चंद्राहून शीतल असून पाण्यापेक्षा पातळ आहेस तू जणू प्रेमाचा डोहच आहेस १ पुरुषोत्तमा, तुला मी दुसरी उपमा तरी कशाची देऊ ? तुझ्या नामावरून मी माझ्या देहास ओवाळून टाकिले आहे २ देवा, तू जे गोड अमृत निर्माण केले आहेस, त्यापेक्षाही तू मधुर आहेस पृथ्वी, आप (पाणी), तेज, वायू आणि आकाश या पाच तत्त्वांना जन्म देणारा तूच असून सर्वसत्ताधीशही तूच आहेस ३ तुकाराम महाराज म्हणतात, पंढरीनाथा, आता मी काही न बोलता उगाच राहातो आणि चरणावर मस्तक ठेवितो माझे सर्व अपराध तू क्षमा करावेस ४

२२४७ मी अवगुणी अन्यायी किती म्हणोन सांगों काई । आतां मज पायीं ठाव देई विठ्ठले ॥ १ ॥
पुरे पुरे हा संसार कर्म बळिवंत दुस्तर । राहों नेदी स्थिर एके ठायीं निश्चळ ॥ २ ॥
अनेक बुद्धीचे तरंग क्षणाक्षणा पालटती रंग । धरूं जातां संग सवे तो होतो बाधक ॥ ३ ॥
तुका म्हणे आतां अवघी तोडीं माझी चिंता । येऊनि पंढरिनाथा वास करीं हृदयीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – दुस्तर–तरून जाण्यास कठिण

अर्थ – विठ्ठल माये, मी तर फारच अवगुणी व अन्यायी आहे किती तेही सांगता येणार नाही आता मला तुझ्या पायाचा आश्रय द्यावा १ आता हा मला लौकिक संसार पुरे झाला कारण माझे संचित कर्म तरून जाण्यास बाधक ठरत आहे ते मला एके ठिकाणी क्षणभरही विश्रांती घेऊ देत नाही २ माझ्या बुद्धीचे अनेक तरंग क्षणाक्षणाला रंग पालटून उमटत आहेत त्यांचा जो जो संग धरावा तो तो बाधकच होत जातो आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, पंढरीनाथा, माझी सर्व चिंता आता तू दूर कर, आणि माझ्या हृदयात वास्तव्य करून राहा ४

विवरण – वरील वीस व सात अशा अभंगाच्या गटात तुकाराम महाराजांच्या आयुष्यातील एक महत्त्वाचा व कसोटीचा प्रसंग झालेला आहे प्रपंच व व्यवसाय यांचा वीट येऊन तुकोबांनी आत्मिक साधनेचा मार्ग चालावयास प्रारंभ केला गुरुकृपा व नामदेवप्रेरणा यामुळे तुकोबांना आध्यात्मिक अधिकार प्राप्त झाला त्यांच्या मुखातून भक्तिरसात्मक कवित्व निघू लागले त्यांच्या कीर्तनास शेकडो आबालवृद्ध येत राहिले. अनेकांनी त्यांच्या

अमृतमधुर वाणीचा आस्वाद लुटला अनेकांनी त्याना साष्टांग दंडवत घालायला सुरवात केली तुकोबाना यातील काहीच नको हाते, पण देवाचा निरोप मात्र काव्यवाणीच्या द्वारे सागणं अगत्याचे होते म्हणून त्याची भक्तिरसात्मक अशी अभगवाणी नित्य स्रवत राहिली त्यामुळे वर्णाभिमानाने अहकारी झालेले रामेश्वरभट्टासारखे लोक खवळून गेले. तुकोबा वेदान्तचर्चा अनधिकाराने आपल्या अभगातून करतातसे पाहून काही दुष्ट लोकानी तुकोबाना विरोध केला जातीचा शूद्र आणि मुखात वेदान्तवाणी ! श्रुतीचा अर्थ याने काय म्हणून सागावा ? अशी तक्रार रामेश्वरभट-प्रभृती वरिष्ठ वर्गाच्या नेत्यानी खुद्द तुकारामबुवापाशीच केली आपण कवित्व करण्याचे सोडून दऊ, पण झाले आहे या कवित्वाचे काय करायचे ? या बुवाच्या प्रश्नावर उत्तर मिळाले, 'सर्व कवित्व इद्रायणीच्या डोहात बुडवून टाकावे.' ब्रह्मवृन्दाची ही आज्ञा शिरसामान्य करून बुवानी आपल्या वह्या वस्त्रात बाधल्या; त्या नीट बुडाव्यात म्हणून त्यात दगड घालून इद्रायणीच्या डोहात विठ्ठलाचे नाव घेऊन बुडविल्या

आपल्यावर आलेल्या या सक्टाने बुवाचे मन हदरून गेले. त्यांनी आकान्त केलेला नसला तरी आपल्या हातून एवढे दिव्य होण्याइतपत अन्याय व अपराध तरी कोणता झाला, याचा शोध ते आपल्या मनाशी घेत असले अगात दोष निर्माण झाले हाव काय भक्तीचा कळस समजायचा ? मग हा भक्तीचा पसारा मांडला तरी कशा-साठी ? प्रपचाची होळी कशासाठी केली ? अशा प्रश्नानी तुकोबाचे मन गलबलून गेले अभगाच्या वह्या बुडविल्याने परमार्थ सपला आणि घरचा प्रपच तर केव्हाच दृष्टीआड झालेला होता. तुकोबानी या विचारामुळे अन्नपाणी सोडले आणि तेरा दिवसपर्यंत उपवास केला विठ्ठलाच्या चिंतनात हा काळ त्यांनी घालविला तुकोबानी निर्वाणीच्या प्रसगी श्रीहरीलाच साकडे घातले. भगवद्भक्ताची तळमळ व सकटप्रस्तावस्था पाहून पाडुरगही खडबडून जागे झाले व त्यानी श्रीकृष्णाचे बाळरूप घेऊन आपल्या भक्ताचे रक्षण केले अभग पाण्यातही सुरक्षित आहेत अशी प्रेरणा तुकोबाना श्रीहरीने दिली तुकोबानी डोहाकडे पाहिले, तो आपले अभगवाङ्मय 'अभग' असल्याचे त्याच्याही ध्यानी येऊन त्याना ईश्वरीलीलेचे कौतुक वाटले हा अलौकिक चमत्कार पाहून त्याच्या डोळ्यातून प्रेमाश्रूच्या धारा वाहू लागल्या. आपल्यासाठी भगवतास आपण किती कष्ट दिले, 'जनांचिया बोलासाठीं । चित्त क्षोभविलें' असे त्यानी म्हटले. ईश्वराला आपण श्रमविले, त्याच्यावर भलतेच साकडे घातले, याचा तुकोबाना पश्चात्ताप झाला. 'टाकूनि लोचन दिवस तेरा राहिलों' असे त्यानीच म्हणून 'उदकीं राखिले कागद । चुकविला जनवाद' अशी वस्तुस्थिती कथन केली आहे या प्रसगीचे शेवटचे सात अभग भक्तीने आर्द्र झालेले असून तुकोबाच्या मनाचे अनेक नाजुक धागे यात विणलेले दिसतील आपण पाडुरगास विनाकारण शीण दिल्याबद्दलचे दु:ख, ईश्वराने पाण्यातून वह्या राखल्या म्हणून कौतुक, आपल्या अन्यायाची जाणीव, यापुढे विठ्ठलाला असा शीण न देण्याचे आश्वासन, माऊलीहून मायाळू, चद्राहून शीतळ, पाण्याहून पातळ असणाऱ्या या प्रेमकल्लोळरूप श्रीहरीचा महिमा वर्णन करण्याची असमर्थता, इत्यादी विविध भावनानी बुवाचे मन करुणेने, कृतज्ञतेने, आपल्या अपराधाच्या जाणिवेने भिजून चिंब *झाले आहे तुकोबाना वास्तविक पाहता चमत्काराची आवड नव्हती; पण या एका अद्वितीय चमत्कारामुळे,* जलदिव्यामुळें त्याची कीर्ती अधिकच पसरली, आणि तुकोबाच्या मुखातून देवच बोलतो ही श्रद्धा बळावत गेली.

हाकून द्याव, असाच उपक्रम दुष्ट प्रवृत्तीच्या लोकांनी केलेला होता 'यासि उपाय योजावा निका । देशोधडी करावा तुका । त्याचा अपमान होईल देखा ।', यासाठी हे अधम लोक तत्पर झाले 'तुका शूद्र जातीचा निश्चित । आणि श्रुति मथितार्थ बोलतो' हे त्यांना पसंत पडले नाही 'हरिकीर्तन करोनि तेणें । भाविक लोकांसि घातलें मोहन । त्यासि नमस्कार करिती ब्राह्मण । हें आम्हां कारणें अश्लाघ्य' हे मुख्य दूषण समावित ब्राह्मणवर्णाचे होते या तुकोबाच्या प्रचाराविरुद्ध रामेश्वरभट्टांनी चळवळ सुरू केली त्यांनी स्पष्ट शब्दांत तुकारामबुवांना ऐकविले 'तू तरी यातीचा शूद्र निश्चित । कवित्व बोलसी कीर्तनांत । त्यांत अर्थ उमटत श्रुतीचे ।। अधिकार नसतां बोलसी कैसे । शास्त्रविरुद्ध आम्हांसि दिसे । तरी वक्तया आणि श्रोतयास । रौरव असे यातना ।। तरी आजपासूनि हे कविता । तुवां न बोलावी सर्वथा ।' इतकेच बोलून रामेश्वरभट्ट थांबले नाहीत त्यांनी यापूर्वीच्या कवित्वाची विल्हेवाट लावण्यासाठी तुकारामांना बजाविले की, 'लिहिलें कवित्व आपुल्या हातें । बुडवीं उदकांत नेऊनी ।।' तुकाबांनी ही आज्ञा प्रमाण मानली पांडुरंगमूर्तीला साष्टांग नमस्कार घालून त्याचीच इच्छा समजून त्यांनी 'लिहिल्या वह्या घेतल्या समस्त । मग इंद्रायणीच्या डोहांत । नेऊन बुडवित स्वहस्तें ।। वस्त्रांत गांठोडें बांधोनि जाण । त्यामाजीं घातले पाषाण । विठ्ठल नामें गर्जूनि गजर । देतसे सोडोन उदकांत ।।

यानंतर तुकोबांच्या मनाचा झालेला उद्वेग महीपतीबुवांनी फार चांगल्या व समर्पक रीतीने वर्णन केला आहे 'देवालयाच्या द्वारासमोर । वृंदावनीं होती पाथर । वैष्णव तुका तिजवर । बैसे सत्वर जाऊनिया' या स्थानावरून तुकोबांनी जे हृदयस्पर्शी अभंग रचिले, त्यांच्या आधाराने महीपतीबुवांनी तुकोबांच्या विकल मनाचे चित्र रेखाटले आहे तेरा दिवसांची घोर उपासना व साधना पूर्ण झाल्यावर पांडुरंगाचेही अंतःकरण द्रवले आणि 'ऐसे लोटतां तेरा दिवस । काय करी जगन्निवास । रात्रीं स्वप्नांत बहुतांस । दाखवितसे जगदात्मा ।। म्हणे तुक्याचे अभंग निश्चित । म्यां कोरडेचि रक्षिले जळांत । आतां वह्या तरंगोनि वरत्या येत । तरी काढाव्या त्वरित जाओनि' तुकारामांच्या वह्या पांडुरंगाने उदकांतून कोरड्या वर काढल्यामुळे तुकोबांचे माहात्म्य वाढले पण पांडुरंगास शीण दिल्याने त्यांच्या मनास फारच यातना झाल्या त्यांनी ईश्वराची पुनः सात अभंगांत करुणा भाकली तेही अभंग अत्यंत रसाळ व तळमळीचे आहेत. महीपतींनी म्हटले आहे, 'तेरा दिवस बुडविता शेखीं । कोरड्या वह्या निघाल्या उदकीं । त्या तरी लुटूनि नेल्या भाविकीं । प्रख्यात लोकीं व्हावया ।। कोरडे कागद उदकांत । स्वयें रक्षिले रुक्मिणीकांतें । हे देशोदेशी प्रगटली मात । प्रीतीनें प्रत उतरिती ।। जैसीं पुष्प असतां एके स्थळीं । परी सुवास धांवे नभमंडळीं । तैसी तुक्याची कीर्ती भूमंडळीं । होय ते वेळीं' जलदिव्याच्या प्रसंगामुळे अशा रीतीने तुकाराम महाराजांची कीर्ती चोहों दिशांना फाकून राहिली

२२४८ बरे आम्हां कळों आले देवपण । आतां गुज कोण राखे तुझें ।। १ ।।
मारिले कां मज सांग आजिवरी । आतां सरोवरी तुज मज ।। २ ।।
जें आम्ही बोलों ते आहे तुझ्या अंगीं । देईन प्रसंगीं आजि शिव्या ।। ३ ।।
*निलाजिरा तुज नाहीं याति कुळ । चोरटा शिंदळ ठावा जना ।। ४ ।।*
खासी घोडे माती जीव जंत झाडें । एकले उघडें परदेसी ।। ५ ।।
गाढव कुतरा ऐसा मज ठावा । बईल तू देवा भारवाही ।। ६ ।।
लटिका तू मागें बहुतांसी ठावा । आले अनुभवा माझ्या तें ही ।। ७ ।।
तुका म्हणे मज खवळिलें मांडा । आतां धीर तोंडा न धरवे ।। ८ ।।

जे जे बोलतो ते ते सर्व तुझ्या अंगी आहे देवा, यासाठीच मी आजच्या प्रसंगी शिव्या देणार आहे. ३ देवा, तू निलाजरा आहेस. तुला याती-कुळ काही नाही तू चोरटा आणि शिंदळ आहेस हेही मला माहीत आहे. ४ जीव, जंतु, झाडे, माती यांचे तू भक्षण करतोस तू परदेशी असून एकटा व उघडानागडा आहेस. ५ देवा, तू गाढव व कुत्रा आहेस. तू नुसते ओझे वाहणारा बैल आहेस. ६ तू पिशी लबाड आहेस हे पूर्वी पुष्कळांना माहीत झाले आहे, आणि तोच अनुभव आज मलाही आलेला आहे. ७ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, मला भांडखोरास तूच खवळविले आहेस. म्हणून माझ्या तोंडास आता धीर धरवत नाही. ८

२२४९ आम्ही भांडों तुजसवें । वर्मी धरूं जालें ठावें ॥ १ ॥
होसी सरड बेंडुक । बाघ गांढ्या हो पाईक ॥ २ ॥
बळ करी तया भ्यावें । पळो लागे तया घ्यावें ॥ ३ ॥
तुका म्हणे दूर परता । नर नारी ना तूं भूता ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – गाढ्या-भित्रा.

अर्थ – देवा, तुझे वर्म आम्हास माहीत झाल्यामुळे आम्ही आता तुझ्याबरोबर भांडणार आहोत १ कधी तू सरड व बेडूक होतोस, तर कारणपरत्वे तू भित्रा सेवक अथवा वाघही बनतोस. २ जो कुणी तुझ्याशी बळजोरीने वागतो त्याला तू भितोस आणि जे कुणी तुझ्यापासून दूर पळतात त्याना तू जवळ करतोस ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, असा तू पुरुष आहेस, की स्त्री आहेस, की भूत आहेस हे काहीच समजत नसल्यामुळे तू आमच्या पासून दूर राहा कसा ४

२२५० काय साहतोसि फुका । माझा बुडविला रुका ॥ १ ॥
रीण घराचें पांगिलें । तें न सुटे कांहीं केलें ॥ २ ॥
चौघांचिया मतें । आधीं खरें केलें होतें ॥ ३ ॥
तुका म्हणे यावरी । आतां भीड कोण धरी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- फुका-फुकटचे, रुका-साठविलेले धन, रीण-कर्ज, पांगिलें-शिरले, घुसले

अर्थ :- देवा, हे माझे बोलणे तू फुकट का सहन करतोस ? माझ्यासारख्या गरिबाचा साठलेला ठेवा तू बुडविला आहेस १ घरात एकदा कर्ज शिरले की मग ते काही केल्या फिटतच नाही २ माझे हे जे सेवेचे कर्ज देवा, तुझ्याकडे आहे ते चारचौघासमक्ष खरे करून दाखविले आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, आता यानतर तुला कोण भीड घालणार ? ४

२२५१ प्रीतीचा कळ्हे[१] पदरासी घाली पीळ । सरों नेदी बाळ मागें पुढें पित्यासी ॥ १ ॥
काय लागे त्यासी बळ हेडावितां कोण काळ । गोविलें सबळ जाळीं स्नेहसूत्राचीं ॥ २ ॥
सलगी दिला लाड बोले तें तें वाटे गोड । करी बुझावोनि कोड हातीं देऊनि भातुकें ॥ ३ ॥
तुका म्हणे बोल कोणा हें कां नेणां नारायणा । सलगीच्या वचना कैचें उपजे विषम ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- कलहे-कलह, भाडण, हेडाविता-झिडकारून, कोड-कौतुकाने, विषम-भेदाची भावना.

अर्थ :- प्रेमाचा कलह म्हणून बालक बापाच्या पदरास पीळ घालून त्याच्याशी झोंबते व आपल्या बापास मागेंपुढे सरकू देत नाही १ त्या मुलास झिडकारून दूर करण्यास पित्यास किती वेळ आणि बळ लागणार ? पण

१ कळह

थकल्यावर मला प्रेमळ आईप्रमाणे कडेवर घेतील मी त्यांच्या संगतीने सर्व सुखास पात्र होईन ३ तुकाराम महाराज म्हणतात, त्यांच्या सेवनातील उरलेला भाग मी आवडीने सेवन करीन त्यांनी जी आज्ञा केली आहे ती मी कधीही मोडणार नाही ४

विवरण – वरील तीन अभंगात तुकाराम महाराजानी साधुसंतांना आपणास श्रीहरीच्या स्वाधीन करण्याविषयी कळकळून विनंती केली आहे आपणांस केवळ ईश्वराचे स्वाधीन करण्यासाठी त्यांनी संताजवळ प्रार्थना केली आहे हे संत मोठे कनवाळू व वत्सल आहेत परमार्थाच्या वाटेवर चालताना जर शीण आला तर हे प्रेमळ आईप्रमाणे आपणास खांद्यावर अथवा कडेवरही घेतील असा विश्वास येथे व्यक्त झाला आहे यांच्या तत्परतेनेच गोपाळ आपल्यावर कृपा करील अशी तुकोबाची श्रद्धा आहे असा या संताचा महिमा अनेक साधुसंतानी वर्णन केला आहे ' ब्रह्ममूर्ती संत जगीं अवतरले । उद्धराया आले दीन जना ' म्हणून नामदेवांनी या संताचे वर्णन केले आहे ' माझे मायबाप साधुसंतजन । माझे जीव प्राण अंतरींचे ॥ भयभयाहूनि तारियेले मज । चाळे भोळें गुज प्रेम दावी ' असा त्यांचा प्रेमळ स्वभाव नामदेवानी वर्णन केला आहे यामुळेंच मायबापाप्रमाणे वागतात या संताना देवापेक्षाही महत्त्व दिलेले आढळते एकनाथानी म्हटले आहे ' संतचरणींचे रज कण । तेणें तिन्ही देव पावन ' अशी या संताची थोर योग्यता म्हणूनच 'संतद्वारीं कुतरा झालों । प्रेमरसासी सोकलों ' असे त्याना म्हटले आहे तुकाराम महाराजांनी तर या मायबाप संताची अनेक अभंगातून स्तुती केली आहे यांच्याच कृपेमुळे आपली ' काया झोरली ' असे त्यांनी एके ठिकाणी म्हटले आहे ज्यावर संत पाय देतील अशी पायरी होण्यातही त्यांनी धन्यता मानली आहे या संताचे उपकार तरी किती मोठे ? हे आपणास नित्य जागतीत असतात याचे सहज बोलणेही हिताचे असते गाय जशी आपल्या वासराला सांभाळते, तसे हे संत आपणास सांभाळतात अशी बुवाची खात्री होती या साधुसंताचे आगमन घरी झाले की, दसरा दिवाळीचा आनंद बहरून येतो संताच्या आलिंगनाने त्यांची काया दिव्य होऊन जायची ' आम्हा सोयरे हरिजन । असा त्यांचा विश्वास होता माऊलीला नेहमी लेकराचेच हित दिसते कोणत्याही लाभाचा हेतू मनात धरून ती प्रेम करीत नाही संतही असेच असतात म्हणून त्यांच्या पायावर लोळण घेण्यात तुकोबाना धन्यता वाटते संतानी आपणांस सांभाळले, यामुळे आपण कृतकृत्य झालो असे त्यानी म्हटले आहे या संतानी आपणास देवाच्या स्वाधीन केले असल्यामुळे बुवाना मोठीच धन्यता वाटत आहे

२२५८ लाघवी सूत्रधारी दोरी नाचवी कुसरी ।
उपजवी पाळूनि संहारि नानापरिचीं लाघवें ॥ १ ॥
पुरोनि पढरिये उरले भक्तिसुखें लाचावले[1] ।
उभेंचि राहिले कर कटीं न बैसे ॥ २ ॥
बहु काळें ना सावळें बहु कठिण ना कोंवळें ।
गुणत्रया वेगळें बहुबळें आथीलें ॥ ३ ॥
असोनि नसे सकळामधीं मना अगोचर बुद्धी ।
स्वामी माझा कृपानिधि तुका म्हणे विठ्ठल ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – कुसरी–कौशल्याने, अगोचर–न भासणारा

अर्थ – हा श्रीहरी मोठा लाघवी आहे तो सर्वांना जन्म देतो, त्यांचे पालन करतो त्यांचा संहार करतो इत्यादी नाना प्रकारची लाघवे हातात प्रारब्धाची दोरी धरून तो कौशल्याने करीत असतो १ तो सर्वत्र भरून राहिलेला असून पंढरीच्या ठिकाणी उरलेला आहे तो नेहमीच भक्तिसुखास लालचावलेला असून कमरेवर नीट हात ठेवून उभा राहिलेला आहे तो कधी खाली बसतच नाही २ हा श्रीहरी फार काळा नाही की सावळाही नाही

१ सुखावले

तो फार कठीण नाही, कोवळाही नाही. तो सत्वरजतम या गुणत्रयापलीकडचा असून अतिशय बलवान आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, तो सर्वांत असून नसल्यासारखा आहे, तो मनबुद्धींना न भासणारा, न समजणारा आहे. असा हा माझा स्वामी कृपेचा साठा श्रीविठ्ठल आहे. ४

२२५९ कीर्तन ऐकावया भुकले श्रवण । श्रीमुख लोचन देखावया ॥ १ ॥
उदित हें भाग्य होईल कोणे काळीं । चित्त तळमळी म्हणऊनि ॥ २ ॥
उतावीळ बाह्या भेटिलागीं दंड । लोटांगणी धड जावयासी ॥ ३ ॥
तुका म्हणे माथा ठेवीन चरणीं । होतील पारणीं इंद्रियांचीं[1] ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – श्रवण–कान, लोचन–डोळे, धड–शरीर, देह.

अर्थः– श्रीहरीचे कीर्तन ऐकण्यासाठी माझे कान उत्सुक झाले आहेत. तसेच माझे डोळे त्याचे मुख पाहण्यासाठी उतावीळ बनले आहेत १ अशा प्रकारे माझे भाग्य कोणत्या वेळी बरे उदयास येईल ? यासाठीच माझे चित्त तळमळत आहे २ माझे बाहू अथवा दंड या श्रीहरीला आलिंगन देण्यासाठी उतावीळ बनले असून माझा देह त्याला लोटांगण घालण्यासाठी अतिशय उत्सुक बनला आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी माझे मस्तक श्रीहरीच्या चरणावर ठेवीन. त्यामुळे माझ्या सर्व इंद्रियांची पारणे फिटतील ४

२२६० नाम घेतां कंठ शीतळ शरीर । इंद्रियां व्यापार नाठवती ॥ १ ॥
गोड गोमटें हे अमृतासी वाड । केला कइवाड माझ्या चित्तें ॥ २ ॥
प्रेमरसें जाली पुष्ट अंगकांति । त्रिविध सांडिती ताप अंगें ॥ ३ ॥
तुका ह्मणे तेथें विकाराची मात । बोलों नयें हित सकळांचें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा.– शीतळ–शांत, वाड–मोठे, थोर, कईवाड–निश्चय, मात–गोष्ट

अर्थः– श्रीहरीचे नाम घेतल्यानंतर माझा कंठ व माझा देह शांत होऊन जातो. विविध इंद्रियांना आपापले विषय सुद्धा आठवेनासे होतात १ अशा प्रकारचे हे थोर श्रीहरिनाम अमृतापेक्षाही गोड असल्यामुळे तेच घेण्याचा माझ्या मनाने निश्चय केला आहे. २ या श्रीहरीच्या प्रेमरसाने माझी अंगकांती पुष्ट झालेली आहे. यामुळे माझे त्रिविध ताप नाहीसे होतात. ३ तुकाराम महाराज म्हणतात, श्रीहरीच्या नामामुळे नाना विकार निर्माण होतात ही गोष्टही कधी बोलू नये. यातच सर्वांचे हित आहे. ४

२२६१ स्वामिकाज[2] गुरुभक्ति । पितृवचन सेवा पति ॥ १ ॥
हेचि विष्णूचि महापूजा । अनुभाव नाहीं दुजा ॥ २ ॥
सत्य बोले मुखें । दुखवे आणिकांच्या दुःखें ॥ ३ ॥
निश्चयाचे बळ । तुका म्हणे तेंच फळ ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपाः– अनभाव–दुसरा विचार.

अर्थः– धन्याचे काम, गुरुची भक्ती, पित्याचे वचन व पतीची सेवा १ या गोष्टी करीत राहाणे हीच खरी विष्णूची महापूजा आहे. यात दुसरा विचार संभवत नाही २ मुखाने खरे बोलणे आणि दुसऱ्याच्या दुःखाने स्वतः दुःखी व्हावे, हीही विष्णूची महापूजा आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, ज्याचा जसा निश्वास असेल तसे त्याला फळ मिळेल. ४

१ डोळियांची, २ स्वामिसेवा गुरु भक्ति । पितृवचन पाळिती ॥

तसे काही तो करीत नाही कारण सबळ अशा पुत्रप्रेमामुळे तो त्या जाळ्यातच गुतून जातो २ प्रथम मोठ्या लाडाने सलगी करून त्याच्याशी वागल्याने ते जे बोलील तेच मग गोड वाटते उलट त्याने हट्ट केला तर त्याची कौतुकाने समजूत करून त्याच्या हातावर प्रेमाने लाऊच दिला जातो ३ तुकाराम महाराज म्हणतात, नारायणा हे सर्व मी कुणाजवळ बोलू ? हे तुम्हाला समजत का नाही ? आमच्या सलगीच्या बोलण्याने तुमच्या मनात भेदाची भावना कशी निर्माण होणार ? ४

२२५२ भार देखोनि वैष्णवांचे । दूत पळाले यमाचे ॥ १ ॥
आले आले वैष्णववीर । काळा कापती असुर ॥ २ ॥
गरुडटकयाच्या भारे । भूमी गर्जे जयजयकारें ॥ ३ ॥
तुका म्हणे काळ । पळे देखोनियां बळ ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – भार–समुदाय

अर्थ – वैष्णवांचे समुदाय पाहून यमाचे दूत पळून जातात १ वैष्णववीर आलेले पाहाताच असुर काळ थरथर कापू लागतो २ गरुडटकादी करून नामप्रेम्यांच्या समुदायामुळे ही भूमी हरिनामाच्या गर्जनेने दुमदुमून जाते ३ तुकाराम महाराज म्हणतात, या वैष्णववीरांचे बळ पाहून काळ भिऊन दूर पळ काढतो ४

२२५३ रगीं रगें रे[1] श्रीरंगें । काय भुललासी पतंगे ॥ १ ॥
शरीर जायाचें ठेवणें । धरिसी अभिळास झणें ॥ २ ॥
नव्हे तुझा हा परिवार । द्रव्य दारा क्षणभंगुर ॥ ३ ॥
अंतकाळींचा सोइरा । तुका म्हणे विठो धरा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – अभिलाष–इच्छा, लोभ, झणें–नको, दारा–बायको.

अर्थ – श्रीहरीच्या रंगाने तू रंगून जा पतंगांच्या बरबरच्या पण नाहीसा होणाऱ्या रंगांना काय भुलून राहिलास ? १ शरीर हा नष्ट होणाराच ठेवा आहे त्याचा लोभ तू मनात धरू नकोस २ द्रव्य, पत्नी इत्यादी भोवतीचा परिवार हा खरोखर तुझा नसून तो क्षणात नाहीसा होणारा आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, अंतःकाळी सोडविणारा सोयरा हा श्रीहरीच आहे, त्याचाच आश्रय घ्या ४

२२५४ जन्मा येउनि काय केले । तुवा मुदल गमाविलें ॥ १ ॥
का रे न फिरसी माघारा । अझुनि तरी फजितखोरा ॥ २ ॥
केली गाठोळीची नासी । पुढें भीकचि मागसी ॥ ३ ॥
तुका म्हणे ठाया । जाईं आपल्या आलिया ॥ ४ ॥

२२५५ पंढरीस जाते निरोप आइका । वैकुंठनायका क्षेम सांगा ॥ १ ॥
अनाथांचा नाथ हे तुमें वचन । धांवें नको दीन गांजों देऊं ॥ २ ॥
ग्रासिलें भुजंगें सर्पे महाकाळें । न दिसे हें जाळें उगवतां ॥ ३ ॥
कामक्रोधसुनीं श्वापदीं बहुतीं । वेढलों आवर्ती मायेचिये ॥ ४ ॥
मृगजळनदी बुडविना तरी । आणूनियां वरी तळा नेते ॥ ५ ॥
तुका म्हणे तुवां धरिलें उदास । तरि पाहों वास कवणाची ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा :- जाते-जाणारे, क्षेम-कुशलता, सुखरूपता, भुजंगें-सर्पाने, उगवतां-सुटका, सुनीं-कुत्री आवर्ती-भोवऱ्यात, वास-वाट.

अर्थ :- अहो, पंढरीच्या यात्रेस जाणारे लोकहो, माझा एक निरोप तुम्ही ऐका. वैकुंठनायक जो श्रीविठ्ठल त्याला माझा एक निरोप तुम्ही सांगा १ देवा, 'मी अनाथांचा नाथ आहे' हे तुझेच वचन आहे ना ? हे वचन सार्थ करण्यासाठी तू धावून ये. या दीनास दुःखीकष्टी करू देऊ नकोस. २ या महाकाळरूपी सर्पाने मला ग्रासलेले आहे. त्याच्या मिठीतून सुटका होईल असे दिसत नाही ३ कामक्रोधादी कुत्र्यांनी व अनेक श्वापदांनी मला घेरलेले असून मी मायेच्या भोवऱ्यात सापडलो आहे. ४ ही मृगजळरूपाची संसाररूपी नदी मला बुडवत नसली तरी कधी तळाशी नेते, तर कधी वर आणते ५ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तू जर आमच्या ठिकाणी उदास राहिलास तर आम्ही वाट तरी कुणाची पाहावी ? ६

२२५६ कृपाळू सज्जन तुम्ही संतजन । हेंचि कृपादान तुमचें मज ॥ १ ॥
आठवण तुम्ही द्यावी पांडुरंगा । कींव माझी सांगा काकुलती ॥ २ ॥
अनाथ अपराधी पतिताआगळा[1] । परि पायांवेगळा नका करूं ॥ ३ ॥
तुका म्हणे तुम्हीं निरविल्यावरि । मग मज हरि उपेक्षीना ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- आगळा-विशेष प्रकारचा, निरविल्यावरी-स्वाधीन केल्यावर.

अर्थ :- तुम्ही संतजन सर्वच कृपाळू व सज्जन आहात. तुम्ही मला पुढीलप्रमाणे कृपेचे दान द्यावे. १ तुम्ही माझी आठवण त्या पांडुरंगास द्यावी व अशी माझी कीव त्याला काकुळतीने सांगावी. २ मी अनाथ आहे, अपराधी आहे, विशेष प्रकारचा पापी आहे पण तुम्ही मला आपल्या पायांपासून वेगळे करू नका, असे तुम्ही देवाला माझ्याबद्दल सांगा. ३ तुकाराम महाराज म्हणतात, एकदा तुम्ही साधुसंतांनी मला श्रीहरीच्या स्वाधीन केल्यानंतर तो माझी उपेक्षा कधीही करणार नाही. ४

२२५७ संतांचिया पायीं माझा विश्वास[2] । सर्वभावें दास जालों त्यांचा ॥ १ ॥
तेचि माझें हित करिती सकळ । जेणें हा गोपाळ कृपा करी ॥ २ ॥
भाग्लिया मज वाहतील कडे[3] । त्यांचियानें जोडे सर्व सुख ॥ ३ ॥
तुका म्हणे शेष घेईन आवडी । वचन न मोडीं बोलिलों तें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- भागलिया-थकल्यावर, शेष-उरलेला

अर्थ :- संतांच्या पायांवर माझा मोठा विश्वास असल्यामुळे मी सर्वभावाने त्यांचा दास झालो आहे. १ त्यांच्यामुळेच हा गोपाळ माझ्यावर कृपा करील आणि माझे त्यामुळे सर्व प्रकारचे हितच होईल. २ हे संतजन मी

१ पतित, २ विसावा, ३ कडिये.

२२६२ चित्त घेऊनियां तूं काय देसी । ऐसें मजपाशीं सांग आधीं ॥ १ ॥
तरिच पंढरिराया करिन साटोवाटी । नेघें जया तुटी येईल तें ॥ २ ॥
रिद्धिसिद्धि कांहीं दाविसी अभिळास । नाहीं मज आस मुक्तीची ही ॥ ३ ॥
तुका म्हणे तुझें माझें घडे तर । भक्तीचा भाव रे देणें घेणें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– साटोवाटी–देवघेव, बदला, अभिलाष–लालुच, आशा

अर्थ .– देवा, तू माझे चित्त घेशील, पण त्याच्या बदली तू मला काय देणार आहेस ? हे मला आधी सांग १ पंढरीनाथा, तरच मी तुझ्याशी देवघेवीचा व्यवहार करीन ज्यात मला तूट येईल, असे मी काही घेणार नाही. २ मला रिद्धीसिद्धीची आशा दाखविलीत तर त्याचा काही उपयोग नाही मला मुक्तीचीही इच्छा नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, तुझा व माझा जर हा व्यवहार झाला तर आम्ही तुला आमचे चित्त देणे व तू आम्हांला भक्तीचा जिव्हाळा देणे असा प्रकार होईल ४

२२६३ तुझा संग पुरे संग पुरे । संगति पुरे विठोबा ॥ १ ॥
आपल्या सारिखें करिसी दासां । भिकारिसा जग जाणे ॥ २ ॥
रूपा नाहीं ठाव नांवा । तैसें आमुचे[1] करिसी देवा ॥ ३ ॥
तुका म्हणे तोयें आपुलें भेंडोळें । करिसी वाटोळें माझें तैसें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– संग–सोबत, तोयें–तो ये, तुवा, तू, भेंडोळें–गुंडाळे

अर्थ – विठोबा, आता तुझी संगत पुरे झाली असे मी पुन पुन सांगतो १ तू जसा भिकारी आहेस तशीच अवस्था तू आपल्या दासांची करितोस हे सर्वांना माहीत आहे २ तुझ्या रूपाचा व नावाचा जसा पत्ता नाही त्याप्रमाणे तू आम्हासही नामरूपविरहित करतोस ३ तुकाराम महाराज म्हणतात, त जसे स्वत चे सर्वस्व गुंडाळून ठेविले आहेस, त्याप्रमाणे माझेही वाटोळे तू करशील ४

२२६४ आतां मज तारीं । वचन हें साच करीं ॥ १ ॥
तुझें नाम दिनानाथ । ब्रिदावळी जगविख्यात ॥ २ ॥
कोण लेखी माझ्या दोषा । तुझा त्रिभुवनीं ठसा ॥ ३ ॥
वांयां जातां मज । तुका म्हणे तुम्हां लाज ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – साच–खरे, लेखी–ध्यानात ठेवणार

अर्थ–: देवा, तू आता माझे रक्षण कर मला तार व आपले पतितपावन हे ब्रीद खरे करून दाखीव १ दीनांचा नाथ हे तुझे नाव, ही तुझी ब्रीदावळी, सर्व जगात प्रसिद्ध आहे २ अनाथनाथ व पतितपावन, असा त्रिभुवनात गाजलेला तुझा शिक्का माझ्यावर असताना माझे दोष कोण ध्यानात ठेवणार ? माझ्या दोषांची काय किंमत आहे ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी तुमचा असूनही जर वाया गेलो तर मात्र याची लाज तुम्हांलच वाटावयास हवी ४

२२६५ विठ्ठल आमुचा निजाचा । सज्जन सोयरा जीवाचा ॥ १ ॥
मायबाप चुलता बंधु । अवघा तुजशीं संबंधु ॥ २ ॥
उभयकुळींसाक्ष । तूंचि माझा मातुळपक्ष ॥ ३ ॥
समर्पिली काया । तुका म्हणे पंढरिराया ॥ ४ ॥

---
१ आम्हां.

शब्दार्थ व टीपा – निजांचा–आत्मस्वरूपाचा काया–शरीर

अर्थ – श्रीविठ्ठल हा आमच्या जीवाचा सज्जन असा सोयरा असून तो आम्हांस आत्मस्वरूपाचा वाटतो १ माझे मायबाप, चुलता, बंधू तूच असून हे सर्व सबंध तुझ्याशीच आहेत २ पिता व माता या दोनही कुळांशी तूच संबंधी असून मातुलपक्षीही तूच आहेस अशी साक्ष आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात पंढरीनाथा हा माझा देह मी तुलाच समर्पण केला आहे ४

२२६६ वेदाचा तो अर्थ आम्हांसीच ठावा । येरानीं वाहावा भार माथा ॥ १ ॥
खादल्याची गोडी देखिल्यासी नाहीं । भार धन वाही मजुरीचे ॥ २ ॥
उत्पत्तिपाळणसंहाराचें निज । जेणें नेलें बीज त्याचे हातीं ॥ ३ ॥
तुका म्हणे आलें आपणचि फळ । हातोहातीं मूळ सांपडलें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – येरानी–दुसऱ्यानी, इतरानी

अर्थ – वेदांचे खरे तात्पर्य आम्हांसच माहित आहे खरा अर्थ आम्हीच जाणतो इतरानी उगाच आपल्या डोक्यावर ओझे मात्र वाहावे १ प्रत्यक्ष पदार्थ खाण्यात जी रुची आहे, ती काही तो पाहण्यात नाही संपत्तीचे ओझे वाहाणाऱ्या मजुरास त्याचा काय उपयोग ? २ उत्पत्ती, पालन, संहार यांच्या स्वरूपाचे बीज ज्याने नेले त्याच्याच हाती ते आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, आम्हाला सर्वांचे मूळ सापडले असून त्याचे फळही हाती आलेले आहे ४

विवरण – तुकारामबुवांच्याच सांगण्याप्रमाणे ते जातीने शूद्र कुणबी, त्यांचा धंदा वैश्याचा, परंतु ईश्वरी कृपेने त्यांचे संपूर्ण जीवन पालटून गेले श्रीहरीशी त्यांचे जीवन एकरूप झाले भगवच्चिंतन, कथाकीर्तन, नामस्मरण, एकान्तवास सद्गुरुकृपा, सतसहवास यानी त्यांचे आयुष्य बदलून गेले ईश्वरी तेजाने प्रकाशित झाल्याने त्यांच्या मुखातून ईश्वराचीच वाणी प्रकट झाली या प्रसादपूर्ण व प्रासादिक वाणीमुळे त्यांचा लौकिक वाढू लागला आपली वाणी आपली स्वतःची नसून विठ्ठलाची आहे अशी त्यांची निष्ठा असल्याने त्यांनी तसे अनेकदा बोलून दाखविले ' नव्हती माझे बोल बोले पांडुरंग ', ' बोलविता देव मज ', ' आपुलिया बळें नाहीं मी बोलत । सखा कृपावंत वाचा त्याची ', 'परि त्या विश्वंभरें बोलविलें ', ' तुका म्हणे मज बोलवितो देव ',' मज विश्वंभर बोलवितो',' वदे साक्षत्वेंसी वाणी । नारायणी मिश्रित ' इत्यादी वचनातून तुकोबांच्या कर्तृत्वामागील ईश्वरी प्रेरणा स्पष्ट झाल्यामुळे सहजच त्यांच्या भोवती अनेक लोक जमू लागले त्यांच्या कथाकीर्तनास गर्दी झाली त्यांच्या पायावर लोक डोके ठेवू लागले, यामुळे काही लब्धप्रतिष्ठित कष्टी झाले हा शूद्र तुकाराम ब्रह्मज्ञान सांगतो वेदातील तत्त्वज्ञान बोलतो याला काय अधिकार ? असा त्यांच्यावर प्रचार सुरू झाला आणि या विरोधकाला तुकारामबुवा कधी सौम्यपणाने, कधी कडक रीतीने उत्तरेही देताना दिसतात आपणासच वेदाचा खरा अर्थ माहीत असल्याचे त्यांनी या अभंगात आत्मविश्वासपूर्वक सांगितले आहे वेदाची नुसती घोकपट्टी करणारे नुसते भारवाही आहेत पण खरा वेदार्थ आपणच जाणला आहे अशी त्यांची श्रद्धा आहे ' सकळ शास्त्रांचे हें सार । हें वेदांचें गव्हार ' म्हणजे हा पंढरीराणा असल्याचे त्यांनी सांगितले आहे ' वेदाचें गव्हार न कळे पाठका ' असे त्यांनी एका अभंगात म्हटले आहे तुकोबांच्या या अधिकाराचे महत्त्व अनेकांनी मान्य केले आहे

२२६७ आमचा तू ऋणी ठायींचाचि देवा । मागावया ठेवा आलों द्वारा[१] ॥ १ ॥
वर्म तुझें आह्मा सांपडलें हातीं । धरियेलें चित्तीं दृढ पाय ॥ २ ॥
बैसलों धरणें कोंडोनिया द्वारीं । आतूनि बाहेरी येओं नेदी ॥ ३ ॥

[१] द्वारा

तुज मज सरी होईल या विचारें । जळो भाडखोरें निलाजिरीं ॥ ४ ॥
भांडवल माझें मिरवीसी जनीं । सहस्र वोयणी नाममाळा ॥ ५ ॥
तुका म्हणे आह्मी केली जिवें साटी । तुह्मां आह्मां तुटी घालूं आतां ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – ठायींचा–मुळचा, सरी–बरोबरी

अर्थ – देवा, तू आमचा मूळचाच ऋणी आहेस म्हणून आम्ही आमचा कृपेचा ठेवा तुला मागायला आलो आहोत १ तुझे पाय आम्ही आमच्या चित्तात दृढ धरून ठेविले आहेत हेच तू आमच्या हातात सापडल्याचे रहस्य आम्हांस सापडले आहे २ मी तुम्हांला कोंडून ठेविले असून तुमच्या दाराशी धरणे धरून बसलो आहे तुला आता आतून बाहेर येऊच देणार नाही ३ अशा या वागण्याने तुझी-माझी बरोबरी होईल म्हणून या भांडखोरपणाच्या निलाजऱ्या वृत्तीला आग लागो ४ नाममाळेत विष्णुसहस्रनाम ओवणे हेच माझे एक भांडवल तू लोकात मिरवीत आहेस ५ तुकाराम महाराज म्हणतात आम्ही तुम्हांला जीव अर्पण केला असून आता तुमचाआमचा संबंध तुटून गेला आहे ६

२२६८ काय धोविले बाहेरी मन मळलें अंतरीं ।
गादलें जन्मवरी असत्यकाटें काटलें ॥ १ ॥
सांडी व्यापार दंभाचा शुद्ध करीं रे मन वाचा ।
तुझिया चित्ताचा तूच ग्वाही आपुला ॥ २ ॥
पापपुण्यविटाळ देहीं भरितां न विचारिसी काहीं ।
काय चाचपसी मही जी असड सोंवळी ॥ ३ ॥
कामक्रोधा वेगळा ऐसा होईं कां सोंवळा ।
तुका म्हणे कळा गुंडुन ठेवीं कुसरी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – धोविलें–धुतले गादलें–व्यापले, मही–पृथ्वी, गुंडून–गुंडाळून, कुसरी–कला, कौशल्य, चातुर्य

अर्थ – शरीर बाहेरून धुण्यात काय अर्थ आहे ? आतील मन तर मळलेले आहे जन्मभर असत्याचा व्यवहार करून ते अनेक दोषांनी व्यापले आहे १ यासाठी दंभाचा व्यापार तू सोडून दे तू आपले मन व वाणी शुद्ध कर तुझ्या चित्ताचा तूच साक्षी आहेस २ पापपुण्याच्या विटाळाने तू देहाची भरती करीत आहेस यासंबंधी काहीच कसा विचार तू करीत नाहीस ? सदैव सोवळी असणारी पृथ्वी मात्र तू शुद्धाशुद्धतेसाठी चाचपीत बसला आहेस ३ तुकाराम महाराज म्हणतात, कामक्रोधादी विकारापासून वेगळा निघून तू सोवळा बन कलाकुसर व ज्ञानचातुर्य तू गुंडाळून ठेव ४

अर्थ :– ऊस वाढविला की त्याची गोडी वाढत असल्यामुळे म्हणजे गुळ व साखर हे त्याचेच विविध प्रकार होतात. १ बापा, तू सत्यकर्माचेच आचरण कर. त्यामुळे तुझेच हित होऊन असत्याचे दु.ख दूर होईल. २ साखरेचे आळे करून त्यात कांदा लाविला तरी लहानमोठ्या प्रमाणाने त्याची दुर्गंधीच वाढेल. ३ तुकाराम महाराज म्हणतात, सत्य व असत्य हे अशा प्रकारचे असते, याचा विचार तू कर ४

२२७० पाषाण देव पाषाण पायरी । पूजा एकावरी पाय ठेवी ॥ १ ॥
सार तो भाव सार तो भाव । अनुभवीं देव तेचि जाले ॥ २ ॥
उदका भिन्न पालट काई । गंगा गोड येरां चवी काय नाहीं ॥ ३ ॥
तुका ह्मणे हें भाविकांचें वर्म । येरीं धर्माधर्म विचारावे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा– उदका–पाण्यात, येरां–इतरांना, येरीं–इतरांनी, विचारावे–विचार करावा.

अर्थ – देव पाषाणाचाच असतो आणि त्याच्या देवालयाची पायरी पाषाणाचीच असते पण एकाची पूजा करायची असते, आणि एकावर पाय द्यावा लागतो १ यावरून असे दिसते की, भावहेच एक सार आहे असे ज्यांच्या अनुभवास आले ते देवच झाले आहेत. २ पाण्यापाण्यांत भेद असला तरी रुचीत काही बदल असतो का ? गंगेच्या पाण्यास विशेष गोडी व इतर नद्यांच्या पाण्याला काय गोडी नसते ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, यासंबंधीचे रहस्य भाविकानांच समजेल. इतरांनी धर्माधर्माची खुशाल चर्चा करीत बसावे. ४

२२७१ जन्मा येऊनि कां रे निदसुरा । जायें भेटी वरा रखुमाईच्या ॥ १ ॥
पाप ताप दैन्य जाईल सकळ । पावसी अढळ उत्तम तें ॥ २ ॥
संतमहंतसिद्धहरिदासदाटणीं । फिटती पारणी इंद्रियांचीं ॥ ३ ॥
तुका म्हणे तेथें नामाचा गजर । फुकाची अपार लुटी घेई ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपाः– निदसुरा–अडाणी, अर्धवट, दाणटीं–समुदायात.

अर्थः– मनुष्याच्या जन्माला येऊन असा अडाणी का रे राहतोस ? रखुमाईचा पती जो श्रीविठ्ठल त्याच्या भेटीसाठी जा ना तू. १ त्यामुळे तुझे पाप, ताप व दैन्य नष्ट होईल व तू उत्तम असे अढळपद मिळवशील. २ संत, महंत, सिद्ध, हरिदास यांच्या समुदायात तुझ्या इंद्रियांची पारणी फिटतील. ती समाधानी होतील. ३ तुकाराम महाराज म्हणतात, जेथे हरिनामाचा गजर सुरू आहे तेथील सुखाचा लाभ तू अपार लूट. ४

२२७२ काय धोविलें कातडें । काळकुट भीतरि कुडें ॥ १ ॥
उगा राहें लोकभांडा । चाळविल्या पोरें रांडा ॥ २ ॥
घेसी बुंथी पानवथां । उगाच हालविसी माथा ॥ ३ ॥
लावूनि बैसे टाळी । मन इंद्रियें मोकळीं ॥ ४ ॥
हालवीत बैस माळा । विषयजप वेळोवेळां ॥ ५ ॥
तुका म्हणे हा व्यापार । नाम विठोबाचें सार ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा :– धोविलें–धुतले, भीतरीं–आत, अंतःकरणात, कुडें–वाईट. लोकभांडा–भाडखोरा, बुंथी–खोळ, पानवथां–पाणवठ्यावर.

अर्थः– अंगावरचे कातडे धुतल्याने काय उपयोग होणार ? काळकूट विषाप्रमाणे वाईट विकारांनी भरलेले तुझे अंतःकरण आहे. १ भाडखोर माणसा, गप्प राहा. उगाच अडाणी रांडापोरांना का फसवीत आहेस ? २

पाणवठ्यावर बसून डोक्यावर सोळ घेऊन माना हलवून ध्यानधारणेचे सोंग उगाच का करतोस ? ३ तोंड गप्प करून बसलास, पण तुझी इंद्रिये मात्र संराटपणे मोकळी आहेत. ४ हातात माळ घेऊन हालवीत बसला आहेस, पण इंद्रियांच्या विषयांचा मात्र सतत जप चालू आहे. ५ तुकाराम महाराज म्हणतात, हा तर पोट भरण्याचा शुद्ध व्यापार आहे विठ्ठलाचे नाम हेच एक जीविताचे सार आहे. ६

२२७३ येईं वो येईं वो येईं धांवोनियां[1] । विलंब का वायां लाविला कृपाळे ॥ १ ॥
विठाबाई विश्वंभरे भवच्छेदके । कोठें गुंतलीस अगे विश्वव्यापके ॥ २ ॥
न करीं न करीं न करीं आतां आळस अव्हेरु[2] । व्हावया प्रकट कैचें दूरि अंतर ॥ ३ ॥
नेघें नेघें नेघें माझी वाचा विसांवा । तुका म्हणे हांवा हांवा हांवा साधावा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा.– अव्हेरु–अव्हेर, अस्वीकार, हांवा–हव्यास, हाव, इच्छा.

अर्थ — कृपाळे विठ्ठले, तू आता धावत धावत ये. विनाकारण उशीर का लावितेस ? १ संसारपाश तोडणारे, विश्वंभरे, विठाबाई, विश्वव्यापके, तू कुठे गुंतून राहिली आहेस ? २ तू आता आळस करून माझा अव्हेर करू नकोस. तू प्रकट होऊन मला भेट देण्यात आता तुझ्यामाझ्यांत काय फार अंतर राहिले आहे ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, माझी वाणी तुला हाका मारताना कधीच विश्रांती घेत नाही तिला हाच एक हव्यास सतत असतो ४

२२७४ हेंचि याच्या ऐसें मागावें दान । वंदुनि चरण नारायणा ॥ १ ॥
धीर उदारीव निर्मळ निर्मत्सर । येणें सर्वेश्वर ऐसें नांव ॥ २ ॥
हाचि होईजेल याचिया विभागें । अनुभवा अंगें अनुभवील ॥ ३ ॥
जोडे तयाचे कां न करावे सायास । जाला तरि आळस दीनपणें ॥ ४ ॥
पावल्यामागें कां न घलावी धांव । धरिल्या तरि हांव बळ[3] येतें ॥ ५ ॥
तुका म्हणे घालूं खंडीमध्यें टांक । देवाचे हें एक करूनी घेऊं ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा :–उदारीव–उदारपणा, सायास–प्रयत्न, टांक–थोडा भाग.

अर्थ:— या नारायणाचे चरण वंदन करून त्याच्या कृपेचे दान त्यास मागावे १ याच्या अंगी धीर, उदारत्व, निर्मळपणा आणि निर्मत्सरत्व हे चार गुण असल्याने हा सर्वेश्वर म्हणून ओळखला जातो २ या लक्षणांपैकी काहींनी संपन्न असलेला देवच होऊन जाईल अनुभव घेऊ पाहाणारासच याचा अनुभव येईल. ३ जे प्राप्त होण्यासारखे आहे त्याच्याबद्दल प्रयत्न का करू नये ? या कामात जर आळस होईल तर मग दीनत्व पदरी येईल ४ जो आपणास पावण्यासारखा आहे त्याच्या मागे का धावत जाऊ नये ? आपण जशी जशी हाव धरू तसे बळ आपल्या अंगी येत असते ५ तुकाराम महाराज म्हणतात, दुसऱ्याच्या खंडीभर मालामध्ये आपला टाकभर थोडा भाग टाकून त्याच्यावर जसा हक्क सांगितला जातो, तसेच आपण त्या सर्वेश्वर ईश्वराचे वाटेकरी होऊ. ६

२२७५ सत्तावळें येतो मागतां विभाग । लावावया लाग निमित्य करूं ॥ १ ॥
तुझीं ऐसीं मुखें करूं उच्चारण । बोले नारायण सांपडवूं ॥ २ ॥
असेविण नाहीं उपजत मोहो । तरिच हा गोहो न पडे फंदीं ॥ ३ ॥
तुका म्हणे आतां व्हावें याजऐसें । सरिसे सरिसे समागमें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – लाग–संबंध, आसेविण–तीव्र इच्छेशिवाय, गोहो–नवरा.

---

१ धांवोनि लवलाहेंप, २ भाव, ३ बळी येते.

अर्थ :- एक सत्ता असली म्हणजे तिच्या बळावर देवाकडे आपल्या विभागाची वाटणी मागता येते. देवाशी संबंध जोडायला काही तरी असे निमित्त करावे लागतेच. १ 'देवा, आम्ही तुझेच आहोत,' असे मुखाने उच्चारू आणि या बोलण्याने नारायणास सापडवू. २ कुठलीही आशा असल्याशिवाय काही मोह उत्पन्न होत नाही. स्वत:च्या पत्नीविषयी आशा असल्यामुळेच नवरा इतर फंदात पडत नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, आता या देवासारखेच व्हावे आणि एकसारखे त्याच्या बरोबरच असावे. ४

२२७६ करितां होया व्हावें चित्तचि नाहीं । घटापटा कांहीं करूं नयें ॥ १ ॥
मग हालतचि नाहीं जवळून । करावा तो सीण सीणविती ॥ २ ॥
साहतचि नाहीं कांहीं पांकुळलें । उगल्या उगलें ढळत आहे ॥ ३ ॥
तुका म्हणे तरी बोलावें झांकून । येथें खुणे खूण पुरतेंचि ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- होया व्हावें-होला हो, सीण-श्रम, पांकुळलें-विचलित झाले, उगल्या-उगाच, शांत.

अर्थ:— घटपटादी शब्दांच्या खटपटीत जे वाद होतात, त्यांत होला हो म्हणावे. पण त्यात आपले मन मात्र घालून बसू नये. १ असे केल्यानेच ईश्वर आपल्या जवळून हालतच नाही. याखेरीज जे जे करावे ते केवळ श्रमच होतात. २ थोडेसे जरी मन विचलित झाले तरी ते देवाला सहन होत नाही. पण ते जर शांत व स्थिर झाल्यास देव तेथे राहातो आणि ते ढळल्यास तोही चळतो. ३ तुकाराम महाराज म्हणतात, म्हणून जे बोलायचे ते आडपडद्याने बोलावे. असे केल्यानेच खुणेला खूण पटेल आणि कार्यभाग होईल. ४

२२७७ संतसंगें याचा वास सर्वकाळ । संचला सकळ मूर्तिमंत ॥ १ ॥
घालूनियां काळ अवघा बाहेरी । त्यासीच अंतरीं वास दिला ॥ २ ॥
आपुलेंसें जिहीं नाहीं उरों दिलें । चोजवितां भलें ऐसीं स्थळें ॥ ३ ॥
तुका म्हणे नाहीं झांकत परिमळ । चंदनाचें स्थळ चंदनचि ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा - संचला-राहतो, चोजवितां-शोधताना, परिमळ-सुवास.

अर्थ :- हा श्रीहरी पूर्णत्वाने मूर्तिमंत होऊन नेहमी संतांच्या संगतीने राहत असतो. १ कारण या संतानी कामक्रोधादी विकारांचा काळ बाहेर घालवून आपल्या अंत:करणात देवाला राहाण्यासाठी स्थान दिलेले असते. २ ज्यांनी स्वत:चे म्हणून काही उरू दिले नाही अशा संतांचा शोध करीत जाणे चांगले असते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, ज्या ठिकाणी चंदनाचे झाड आहे ते स्थळ चंदनमय होऊन गेले असल्यामुळे त्याचा सुवास काही झाकला जात नाही. ४

२२७८ पुष्ट कांति निवती डोळे । हे सोहळे श्रीरंगीं ॥ १ ॥
अंतर्बाहीं विलेपन । हें भूषण मिरवूं ॥ २ ॥
इच्छेऐसी आवड पुरे । विश्वंभरे जवळी ॥ ३ ॥
तुका करी नारायण । या या सेवन नामाचें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा -विलेपन-मासणे.

राहिलेल्या देवाजवळ आपल्या इच्छेप्रमाणे आपली आवड पूर्ण होते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, या नारायण नामाचे सेवन मी करीत असतो ४

२२७९ सुकाळ हा दिवसरजनी । नित्य[1] धणी नवीच ॥ १ ॥
करुण सेवूं नानापरी । राहे उरी गोडीनें ॥ २ ॥
सरे ऐसा नाहीं सरा । पंक्ती करा समवेत ॥ ३ ॥
तुका म्हणे बरवा पान्हा । कान्हाबाई माउलीचा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – धणी–तृप्ती, करुण–करून असावे, उरी–शिल्लक

अर्थ – याच्या नामस्मरणाचा सुकाळ मला रात्रंदिवस मिळतो त्यामुळे नित्य नवी तृप्ती अनुभवास येते १ या नामाचे सेवन मी नाना प्रकारांनी करून पाहातो तरीही त्याची गोडी अजून शिल्लक आहेच २ याच्या सेवनासाठी पुष्कळांच्याबरोबर पंगत केली तरी हा सरा संपेल असा नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, या कान्हाबाई माऊलीचा प्रेमपान्हा सेवन करण्यास फार चांगला आहे ४

२२८० पाहतां तव एकला दिसे । कैसा असे व्यापक ॥ १ ॥
ज्याचे त्याचे मिळणीं मिळे । तरी खेळे बहुरूपी ॥ २ ॥
जाणिवेचें नेदी अंग । दिसों[2] रंग निवडीना ॥ ३ ॥
तुका म्हणे येचि ठायीं । हे तो नाहीं सर्वत्र ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – जाणिवेचें–ज्ञानाचे

अर्थ – या देवास जेव्हा पाहावे तेव्हा तो एकटाच दिसतो पण तो सर्व जगाला व्यापून राहिलेला आहे. १ ज्याचा जसा भक्तिभाव असेल त्या प्रकारे तो बहुरूपी रूप धारण करून मिळतो, असे मीलनाचे खेळ खेळतो. २ आपल्या ज्ञानाचे अंग तो इतरांना दिसू देत नाही, आणि दुसरा रंग तो आपल्याहून वेगळा दाखवीत नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, असे हे प्रकार याच देवाच्या ठिकाणी आहेत इतरत्र कुठे दिसणार नाहीत ४

२२८१ तुम्हांसाटीं आम्हां आपुला विसर । करितां अव्हेर कैसें दिसे ॥ १ ॥
विचारा जी आतां ठायींचें हे देवा । आम्हां नये हेवा वाढवितां ॥ २ ॥
आलो टाकोनियां सुखाची वसती । पुढें माझ्या युक्ति खुंटलिया ॥ ३ ॥
तुका म्हणे जाला सकळ वृत्तांत । केला प्रणिपात म्हणऊनि ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा –विचाराजी–विचार करा, हेवा–हाव, प्रणिपात–नमस्कार

अर्थ – देवा, तुमची प्राप्ती व्हावी म्हणून आम्हाला आमचा विसर पडतो आता जर तुम्ही आमचा अव्हेर केला तर ते कसे दिसेल बरे ? १ देवा, याचा तुम्हीच अगोदर विचार करा ना आम्हांला आणखी हावही वाढविता येत नाही २ तुमच्या जवळची सुखाची वसती लाभावी म्हणून मी सर्वस्व टाकून तुमच्याकडे आलो आहे. तुमच्या पुढे माझ्या सर्व युक्त्या खुटलेल्या आहेत. ३ तुकाराम महाराज म्हणतात, हा सर्व वृत्तान्त मी आपल्या पायांजवळ बसून सांगितला व तुम्हांस नमस्कार केला ४

२२८२ करावा उद्धार हें तुम्हां उचित । आम्ही केली नीत कळली ते ॥ १ ॥
पाववील हाक धावा म्हणऊन । करावे जतन ज्याचे तेणें ॥ २ ॥

१ नीत, २ दिसे.

दुश्चितासी बोल ठेवायासी ठाव । ऐसा आम्ही भाव जाणतसों ॥ ३ ॥
तुका म्हणे माझें कायावाचामन । दुसरें तें ध्यान करित नाहीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – नीत–वागणूक, रीत.

अर्थ :– देवा, आमचा उद्धार तुम्ही करावा हे उचितच आहे. यासाठी आम्ही जी योग्य वर्तणूक जशी कळली तशी तशी केलीच आहे १ ती अशी की 'देवा, धावा' अशी हाक तुम्हांला पोचेल अशी आम्ही मारली आहे आता उत्तर देण्याचे ज्याचे त्याने पाहावे २ आता जो आपले काम करण्याकडे दुश्चित करील, त्स देणार नाही, त्याला बोल लावण्यास जागा राहील असाच भाव आम्ही जाणून आहो ३ तुकाराम महाराज म्हणतात, कायावाचामनेकरून मी तुझ्याखेरीज दुसरे कसले ध्यान करीतच नाही ४

२२८३ संताचे उपदेश आमुचे मस्तकीं । नाहीं मृत्यलोकीं राहाणेसा ॥ १ ॥
म्हणऊनि बहु तळमळी चित्त । येईं वो धांवत पांडुरंगे ॥ २ ॥
उपजली चिंता लागला उसीर । होत नाहीं धीर निढळ वाटे ॥ ३ ॥
तुका म्हणे पोटीं रिघालेंसे भय । करूं आतां काय ऐसे जाले ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :–निढळ–कपाळी, नशिबात, रिघालेंसे–निर्माण झाले.

अर्थ –मृत्युलोकात राहू नये असा संताचा उपदेश आमच्या मस्तकावर सतत आहे. १ यासाठीच आमचे चित्त फार तळमळते पांडुरंगे, तू त्वरित धाऊन ये. २ तुला यायला फार उशीर झाला म्हणून माझ्या मनात चिंता निर्माण झाली आहे. जिवाला धीर पुरत नाही तुझी–माझी भेट नशिबात नाही असेही वाटू लागते ३ तुकाराम महाराज म्हणतात, याविषयी आता माझ्या पोटात भय निर्माण झाले आहे. आता करू तरी काय असे होऊन गेले आहे. ४

२२८४ काळावरि घालूं तरि तो सरिसा । न पुरतां इच्छा दास कैसे ॥ १ ॥
आतां नाहीं कांहीं उसिराचें काम । न खंडावें प्रेम नारायणा ॥ २ ॥
देणे लागे मग विलंब कां आड । गोड तरि गोड आदि अंत ॥ ३ ॥
तुका म्हणे होइल दर्शनें निश्चिती । गाईन तें गीतीं ध्यान मग ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा — सरिसा–बरोबर

अर्थ :– देवा, तुझीमाझी भेट होत नाही याचे निमित्त अनुकूल न होणाऱ्या काळावर घालावे तर तो काळ नेहमीच माझ्या बरोबर असतो असे असून जर आमची इच्छा पूर्ण होणार नसली तर आम्ही तुझे दास कसे ? १ नारायणा, आता उशीराचे काहीच कारण नाही. आमचे जे प्रेम तुझ्यावर आहे ते खंडित करू नकोस २ ते कधी तरी द्यावेच लागणार आहे. मग उगाच उशीर तरी का ? जे गोड आहे ते आरंभापासून शेवटपर्यंत गोडच असावे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, तुझ्या दर्शनामुळे मन निश्चित होईल आणि मग ते ध्यान मी गीतांत प्रेमाने गाईन. ४

२२८५ परउपकारें[1] कायावाचामन । वेंचे सुदर्शन रक्षी तया ॥ १ ॥
याजसाटीं असें योजिलें श्रीपति । संकल्पाचे हातीं सर्व जोडी ॥ २ ॥
परपीडे ज्याची जिव्हा मुंडताळे[2] । यमदूत डाळे[3] करिती पुजा ॥ ३ ॥
तुका म्हणे अंबऋषी दुर्योधना । काय झालें नेणां दुर्वासया ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:– वेंचे–खर्च करतो, मुंडताळे–वळवळते, हालते, डाळे–टाळे, जोडपाच्या तळव्याने.

१ पर उपकार कायावाचामने, २ मुंडताळे, ३ टाळें

अर्थ – कायावाचामनेकरून जे दुसऱ्यावर उपकार करतात त्यांचे रक्षण श्रीहरी हातात सुदर्शनचक्र घेऊन करीत असतात १ श्रीपतीने याचसाठी सुदर्शनचक्राची योजना केलेली आहे आपापल्या संकल्पाप्रमाणे आपणांस सर्व काही प्राप्त होते २ दुसऱ्याला दुःख देण्यासाठी ज्याची जीभ वळवळते त्याची ओडभाच्या टाळयाने यमदूत पूजा करतात ३ तुकाराम महाराज म्हणतात, अयश्रूषीला छळल्यामुळे दुर्वासास काय झाले व सज्जनाचा छळ केल्यामुळे दुर्योधनास कसे शासन झाले, हे काय तुम्ही जाणीत नाही ? ४

२२८६　हागिल्याचे सिंके[1] ओणयाचि राहे । अपशकुन पाहे वेडगळ ॥ १ ॥
अत्यंत समय नेणता अवकळा । येऊ नये बळा सिक धरा ॥ २ ॥
भोजनसमयीं ओकाचा आठव । ठकोनिया जीव कष्टी करी ॥ ३ ॥
तुका म्हणे किती सांगो उगवून । अभाग्याचे गुण अनावर ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – उगवून–समजावून

अर्थ – लहान मूल हगताना ओणवे उभे राहाते, म्हणून कुणी वेडगळ मनुष्य एरव्ही नुसताच ओणवा उभा राहिला तर तो अपशकुन समजावा १ योग्य असा महत्वाचा समय न ओळखणे ही एक प्रकारची विटंबनाच होय म्हणून भलत्याच गोष्टीचा आग्रह न धरावा, अशी शिकवण मनात असू द्या २ सुग्रास भोजनाच्या वेळेस ओकारीची आठवण केल्यास त्यामुळे फसवणूक होऊन जीव मात्र फार कष्टी होईल ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी आणखी समजावून सांगू तरी किती ? जे अभागी असतात त्यांचे गुणच अनावर असतात ४

२२८७　नारे[2] तरी काय नुजेडे कोंवडें । करूनिया वेडें आग्रो दावी ॥ १ ॥
आइत्याचे साहे फुकाचा विभाग । विक्षेपानें जगाची थू करी ॥ २ ॥
नेमून ठेविला करत्यानें काळ । नल्हायेसें बळ करू पुढें ॥ ३ ॥
तुका म्हणे देव साहे जाल्यावरी । असांगचि करी सर्व[3] सांग ॥४॥

शब्दार्थ व टीपा – नारे–न आरवे, ओरडला नाही तर, नुजेडे–उजाडणार नाही, आग्रो–आग्रह, नल्हायेसें–नलाहेसें, येणार नाही, प्राप्त होणार नाही

अर्थ – कोंबडे पहाटेच्या सुमारास ओरडले नाही तर काय उजाडायचे राहते काय ? पण हे न समजून नाही लोक न उजेडावे म्हणून आग्रहाने आपले कोंबडे झाकून ठेवितात १ पण त्यांना समजत नाही की कोंबडे ओरडल्यामुळे लोकांना जाग आणण्याचे फुकटचे श्रेयही ते घालवून बसतात उलटपा कामात त्यांनी हरकत घेतल्यामुळे जग मात्र त्यांची छी तू करते २ विश्वकर्त्याने काळाचे नियमन करून ठेविले असून त्यातील विपरीत भाग न येईल असे प्रयत्न आपण करावेत ३ तुकाराम महाराज म्हणतात, एक वेळ देव साहाय्य झाला तरच तो अपूर्णाला पूर्ण करील ४

२२८८　तरी सदा निर्भर दास । चिंताआसविरहित ॥ १ ॥
अवघाच एकीं ठाव । सर्व[4] भाव विठ्ठलीं ॥ २ ॥
निरविलें तेव्हां त्यास । जाला वास त्यामाजी ॥ ३ ॥
तुका म्हणे रूप[5] घ्यावे । नाहीं ठावे गुणदोष ॥ ४ ॥

१ सिंके, २ नारडे, ३ सवसंग, ४ शुद्ध, ५ गुण गावे

शब्दार्थ व टीपा :– निर्भर–निष्काळजी.

अर्थ :– श्रीहरीचे दास हे चिंता, आशा यांच्या विरहित असल्याने नेहमीच निष्काळजी असतात. १ त्यांचा सर्व विश्वास एकाच श्रीहरीच्या, विठ्ठलाच्या ठिकाणी असतो २ त्यांना देवाच्या ठिकाणीच निरविलेले असल्यामुळे त्यांचे त्याच ठिकाणी वास्तव्य असते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, सदोदित श्रीहरीचे रूप आठवावे, त्याचे ध्यान करावे, एवढेच त्यांना माहीत असते. त्यांना इतर गुणदोष माहित नसतात. ४

२२८९ वेडिया उपचार करितां सोहळे । काय सुख कळे तयासी तें ।
अंधापुढें दीप नाचती नाचणें । भक्तिभावेंविण भक्ति तैसी ॥ १ ॥
तिमाणें[1] राखण ठेवियेलें सेता । घालुनियां माया चुना तया ।
खादलें म्हणोनि सेवटीं बोंबली । ठायींची भुली कां नेणां रया ॥ २ ॥
मुकियापासाव सांगतां पुराण । रोगिया मिष्टान्न काय होय ।
नपुंसका काय करील पद्मिणी । रुचिविण वाणी तैसें होय ॥ ३ ॥
हात पाय नाहीं करिल तो काय । वृक्षा[2] फळ आहे अमोलिक ।
हातां नये तैसा वांयांच तळमळी । भावेंविण भोळीं म्हणे तुका ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– तिमाणें–शेतातील माणसाच्या आकाराचे बुजगावणे.

अर्थ :– वेड्या माणसास कितीही चांगले उपचार करून नटविले, सजविले तरी त्याचे सुख त्याला काय समजणार ? अंध माणसापुढे खूपसे दिवे लावून नृत्य केले तरी त्याचा त्याला काय उपयोग ? त्याप्रमाणे भावावाचून श्रीहरीची भक्ती व्यर्थ आहे. १ शेताची राखण करण्यासाठी काठीवर मडके घालून, त्याच्यावर चुना फासून बुजगावणे तयार करतात पण पाखरे धान्य खातातच, आणि शेवटी खाल्ले खाल्ले म्हणून ओरड होतेच. पण पक्षी धान्य नेणारच या मूळच्या गोष्टीकडे कसे दुर्लक्ष होते ? २ मुक्या माणसापुढे पुराण सांगून काय उपयोग ? रोगी माणसापुढे मिष्टान्न ठेविले तरी त्याला त्याची चव काय ? जो नपुंसक आहे त्याला सौंदर्यवती स्त्रीचा काय उपयोग ? त्याचप्रमाणे ज्या वाणीस हरिप्रेमाची रुची नाही ती व्यर्थच होय. ३ तुकाराम महाराज म्हणतात, झाडावर अमूल्य असे फळ लगटले आहे, पण ज्याला हात पाय नाहीत त्याला त्याचा काय उपयोग ? फळ हातास येत नाही म्हणून तो उगाचच तळमळतो. त्याप्रमाणे नि सीम भाव जर ईश्वराविषयी नसेल तर या भोळ्या माणसांचा उपयोग नाही. ४

२२९० मेघवृष्टीनें करावा उपदेश परि गुरुनें न करावा शिष्य ।
वांटा लाभे त्यास केल्या अर्धकर्माचा ॥ १ ॥
द्रव्य वेचावें अन्नछत्रीं भूतीं द्यावें सर्वत्र ।
नेदावा[3] हा पुत्र उत्तमयाती पोसणा ॥ २ ॥
बीज न पेरावें खडकीं ओल नाहीं ज्याचे बुडखीं ।
पोतां ठके सेखीं पाठी लागे विवाण ॥ ३ ॥
गुज बोलावें संतांशीं पत्नी राखावी जैसी दासी ।
लाड देतां तियेसी वांटा पावे कर्माचा ॥ ४ ॥
शुद्ध कसूनि पाहावें वरि रंगा न भुलावें ।
तुका म्हणे घ्यावें जया नये तुटी तें ॥ ५ ॥

---

१ तिमानें, २ वृक्षीं, ३ न द्यावा.

शब्दार्थ व टीपा – धीतां–धैर्य, सेवटीं–शेवटी

अर्थ – मेघाचा वर्षाव जसा सर्वत्र समभावाने होतो, त्याप्रमाणे उपदेश करावा पण एखादाच शिष्य निवडून गुरुने त्याला कानमंत्र देऊन दीक्षा देऊ नये असे जो गुरू करील त्याला शिष्याच्या पापाचा अर्धा वाटा घ्यावा लागेल १ जवळचे द्रव्य अन्नछत्र घालून खर्च करावे, ते सर्व प्राणिमात्रांना द्यावे परंतु चांगल्या श्रीमंत जातीच्या माणसाने दुसऱ्याचा पुत्र पोसण्यासाठी दत्तक म्हणून घेऊ नये २ खडकाळ जमिनीत कधी बीज पेरू नये कारण या जमिनीच्या बुडाला ओल नसते अशा ठिकाणी बी पेरले तर व्यर्थ होऊन पेरणारा फसतो आणि सरकाराचा सारा मात्र चालू राहतो ३ जे काही गुज बोलायचे असेल ते साधुसंतांपाशी बोलावे आपल्या बायकोसही गुह्य गोष्ट न सांगता तिला दासीप्रमाणे लेखावे तिचे जर या बाबतीत लाड केले तर तिच्या पापाचा अर्धा वाटा घ्यावा लागतो ४ तुकाराम महाराज म्हणतात, कोणतीही गोष्ट शुद्ध का अशुद्ध आहे याचा निवाडा ती कसावर घासून करावा केवळ बरच्या रंगास भुलून जाऊ नये ज्यापासून आपणाला तोटा येणार नाही, अशाच वस्तूचा स्वीकार करा ५

विवरण – लोकांना उपदेश कसा करावा याविषयी तुकाराम महाराज या अभंगात फार महत्त्वाचे स्पष्टीकरण देत आहेत तुकोबानाही अनुभव आला असावा ईश्वरी साक्षात्काराची प्रभा शरीरावर चळकू लागल्यावर नामसंकीर्तन व अखंड ध्यान व मनन याच सुख प्रकटू लागल्यावर, मुखातून हरिमिश्रित वाणी स्रवू लागल्यावर बुवाच्या भावती शेकडो लोक जमा झाले असावेत त्यांच्या कीर्तनांनी, प्रभुप्रेमाने भुललेले अनेक लोक त्यांना गुरु मानीत असावेत पण समकालीन गुरुप्रमाण कानमंत्र देऊन, छा छू करून तुकाराममहाराजांना गुरुत्व मिरवावयाचे नव्हते स्वतःला झालेल्या श्रीहरिकृपेचा अनुभव आणि प्रेमा सर्व जनतेला वाटायचा हे तर होतेच, पण त्यांतून ढोंगास, बुवाबाजीस अवसर मिळू नये म्हणून ते खबरदारी घेत असत 'तुका म्हणे आता उरलों उपकारापुरता' या वचनाप्रमाणे त्यांचे उरलेले आयुष्य लोकांच्या उद्धाराकडे खर्च झाले 'आपण जेऊन जेववी लोकां। सतर्पण करी तुका' स्वात्मसुखाच्या आस्वादाने भवजन संतुष्ट व्हावेत ही भूमिका तुकोबाची होती पण स्वतः महंत व्हावे, गुरू म्हणून मिरवावे, शिष्यपरंपरा वाढवावी, हाही मार्ग त्यांना पसंत नव्हता समकालीन जगात चाललेला परमार्थाचा व्यापार आणि गुरुबाजीचे ढोंग तर त्यांना बिल्कुल मानवत नव्हते चिंतनसुख एकान्तात जाऊन भोगावे, पण ब्रह्मज्ञान कान फुकून सांगण्यासाठी त्यांना एकान्तवास नको होता 'नेणे फुको कान। नाहीं एकान्तीचें ज्ञान' अशी त्यांची भूमिका होती सरळ साधा, सोपा नामसंकीर्तनाचा मार्ग म्हटला म्हणजे तेथे गुरुत्वास व गुरुमंत्रास फार अर्थ नसावा 'कपट काहीं एक। नेणे भुलवायाचे लोक॥ तुमचें करितों कीर्तन। गातों उत्तम ते गुण॥' असे त्यांनीच एका अभंगात म्हटले आहे जडीबुटी देणे, चमत्कार करणे, चाहुराची वृत्ती मिळवून मठाधिपती होणे, देवताचनाचे दुकान माडणे घटपटादी पांडित्याचा शुष्क वाद करणे, वृथा माळा जपणे, जारणमारण करणे इत्यादी समकालीन गुरुबाजीतील ढोंग बुवांना कसे मानवणार? त्यांना एक विठ्ठल माहीत 'रामकृष्ण हरि' हा एकच मंत्र माहीत गुरुशिष्यपण। हें तो अधम लक्षण। मूर्ती नारायण खरा। आप तैसाचि दुसरा।' अशी त्यांची वृत्ती असल्याने सर्वांभूती नारायणाचे स्मरण राखून सर्वांना उघड्या जागी सारखाच उपदेश द्यावा नारायण अंतर्यामी राहून बोलवितो आणि आपण 'मघवृष्टीन' उपदेश करतो ही बुवांची भूमिका मेघाचा वर्षाव सर्वत्र समान असतो जशी भूमीची कुवत तशी तिच्यातील फलधारणा मेघाला त्याबद्दल कधी खंती वाटत नाही 'उपदेशी तुका। मेघवृष्टीनें आइका।' असाच सूर बुवांच्या उपदेशाचा सर्वत्र आहे कारण त्यांनीच म्हटले आहे,' मेघवृष्टी काहीं न विचारी ठाव। जैसा ज्याचा भाव त्यासी फळे, मेघाचा स्वभाव गुरूने घ्यावा, समत्वाने त्याने पाहावे 'नाहीं विचारीत। मेघ हागणदारी शेत' हे ध्यानात ठेवावे 'पर्जन्यें पडावें आपुल्या स्वभावें। आपुल्याला दैवें पिके भूमी' हेच बुवांच्या उपदेशपद्धतीचे सार होय

२२९१ नावडावें जन नावडावा मान। करूनि प्रमाण तूंचि होई॥ १॥
सोडवूनि[1] देहसंबंध व्यसनें। ऐसी नारायणें कृपा कीजे॥ २॥

[1] सोडूनि, सांडुनियां

नावडावें रूप नावडावे रस । अवघी राहो आस पायांपाशी ॥ ३ ॥
तुका म्हणे आता आपुलिया सत्ता । करूनि अनंता ठेवा[1] ऐसे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – आस–इच्छा, आशा

अर्थ – देवा लोकांनी दिलेला मान मला आवडू नये लोकांनी केलेला गौरव आवडू नये माझ्या आवडीचा विषय तूच एक व्हावास १ देहासंबंधीचे जी जी व्यसने असतील, ती तू दूर करावीस नारायणाने अशी कृपा माझ्यावर करावी २ दुसऱ्या कुठल्याही रूपसौन्दर्याचा आठव मला होऊ नये आणि इतर रसांविषयी गोडी वाटू नये माझ्या सर्व इच्छा केवळ आपल्या पायांशीच असाव्यात ३ तुकाराम महाराज म्हणतात अनंता, तुम्ही आता मला आपल्या सत्तेने अंकित करून ठेवावे ४

२२९२ उपाधिवेगळे तुम्ही निर्विकार । कांहीच संसार तुम्हा नाहीं ॥ १ ॥
ऐसे मज करूनी ठेवा नारायणा । समूळ वासना नुरवावी ॥ २ ॥
निसंग तुम्हासी राहणे एकट । नाहीं कटकट साहों येत ॥ ३ ॥
तुका म्हणे नाहीं मिळों येत शिळा । रंगासी सकळा स्फटिकाची ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – नुरवावी– उरू देऊ नये, काढावी

अर्थ – देवा, तुम्ही सर्व प्रकारच्या उपाधींच्या विरहित आहात निर्विकारही आहात तुमच्या मागे कसलाही संसार नाही १ नारायणा, मला अशीच अवस्था मिळवून द्या माझी कुठलीच वासना समूळ उरू न द्यावी २ निःसंग होऊन एकटे राहाणे तुम्हांला आवडते कुठलीही कटकट तुम्हांला सहन होत नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, स्फटिकाचा दगड सर्व रंगाशी मिळूनही ज्याप्रमाणे वेगळाच दिसतो तशी अवस्था तुम्ही माझी करा ४

२२९३ माहार माते चपणी भरे । न कळे खरें पुढील ॥ १ ॥
योगळ अधमाचे गुण । जातां घडी न लगेचि ॥ २ ॥
श्वान क्षोळी स्वामिसत्ता । कोप येता उतरे ॥ ३ ॥
तुका म्हणे गुमान कां । सांगों लोका अधमासी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – माते चपणी–मातेचे पणी मातेच्याविषयी प्रतिज्ञा गुमान–पर्वा, चिंता.

अर्थ – भागवतमतासारखे नीच कृत्य करण्याविषयी ज्याची प्रतिज्ञा असते तो महार जातीचा समजावा याचा परिणाम काय होईल हे त्याला समजणारे नसते १ अशा अधम माणसाचे गुण अतिशय वाईट असतात ते नाहीसे करण्यास एक क्षणही लागणार नाही २ एखादे कुत्रे लाडाने धन्याच्या अंगावर वस्त्राप्रमाणे चढून सत्ता गाजविते, पण मालक रागावताच निमूटपणे खाली उतरते ३ तुकाराम महाराज म्हणतात अशा अधम लोकांची पर्वा कशासाठी करावी ? त्याना मी समजावून सांगत आहे ४

२२९४ डोळ्यामध्ये जैसे कणु । अणु तें हि न समाये[2] ॥ १ ॥
तैसे शुद्ध करीं[3] हित । नका चित्त वाटवू ॥ २ ॥
आपल्याचा कळवळा । आणिका बाळावरि न ये ॥ ३ ॥
तुका म्हणे बीज मुडा[4] । जैसा[5] चाडा पिकाच्या ॥ ४ ॥

१ ठवी, २ साहे, ३ राखा, ४ मुद्दा, ५ तैसा

शब्दार्थ व टीपा :– मुडा–कणगीत, वाशा–इच्छेने

अर्थ – डोळ्यात गेलेला एखादा लहानसा कणही जसा सोसत नाही १ त्याप्रमाणे तुम्ही आपले शुद्ध हिताचे रक्षण करा विषयलोभाने उगाच चित्त पाटवू नका २ आपल्या लेकरांवर जशी ममता असते तशी इतरांच्यावर कधी नसते ३ तुकाराम महाराज म्हणतात, पुढे चांगले पीक यावे या इच्छेनेच कणगीत धान्याचे बीज लपवून ठेवितात, तसे तुम्ही स्वहितासाठी जपा ४

२२९५ मुखीं नाम हातीं मोक्ष । ऐसी साक्ष बहुतांसी[1] ॥ १ ॥
वैष्णवांचा माल खरा । तुरतुरा[2] वस्तुसी ॥ २ ॥
भस्म दंड न लगे काठी । तीर्थी आटी भ्रमण ॥ ३ ॥
तुका म्हणे आडकाठी । नाहीं भेटी देवाचे ॥ ४ ॥

*शब्दार्थ व टीपा – आटी–कष्ट, श्रम, तुरतुरा–त्वरित*

अर्थ :– मुखात श्रीहरीचे नाम घेतल्याबरोबर मोक्ष हातात आल्यासारखाच असतो अशी पुष्कळांची साक्ष आहे १ नामचिंतन व कीर्तन हा संतांचा माल चांगला व खरा असून याचा खप त्वरित होत असतो २ याच्यासाठी भस्म, दंड व काठी अशा बाह्योपचारांची काहीच गरज नसते तीर्थयात्रांच्या निमित्ताने भ्रमण करण्याचेही श्रम यामुळे नकोत ३ तुकाराम महाराज म्हणतात, या नामचिंतनाने देवाच्या भेटीत काहीच अडथळा उरत नाही ४

विवरण – कलियुगात नामसंकीर्तन हेच एक साधन आबालवृद्धांना सोपे व खात्रीचे असे आहे यज्ञयाग, दानधर्म, व्रतवैकल्ये, कर्मकांड, तीर्थयात्रा, उपासतापास, शरीरदंड इत्यादी खटपटीत न पडता सहज सुलभ व सोपे असे हे नामचिंतनाचे साधन सर्वच साधुसंतांनी गौरविले आहे नामसंकीर्तनामुळे मोक्ष रोकडा होऊन हातात येतो मुखात नाम आणि हातात मोक्ष इतर साधनात देहदंड, उग्रतपश्चर्या, अरण्यवास इत्यादींचे श्रम असतात तीर्थयात्रेने मोक्ष मिळेल, पण तीर्थयात्रेचे कष्ट घ्यावे लागतील 'मोक्ष देऊनि उदार । काशी होय कीर । परि वेंचणे लागे शरीर । तिचे गांवीं ॥ हिमवंतु वोप खाये । परि जीविताची हानि होये ॥' असे ज्ञानेश्वरांनीही म्हटले आहे गंगेत बुडून मरण आले तरच मोक्ष, *नामाचे तसे नाही 'तरी भक्तीं न बुडिजे । रोकडाचि लाहिजे । न मरतां मोक्षु '* या ज्ञानेश्वरांच्या उक्तीप्रमाणे देहदंड अथवा मृत्यू न होता रोख मोक्ष नामसंकीर्तनाच्या साधनाने हाती येतो कपाळाला भस्म लावणे, हातात दंड घेणे, तीर्थयात्रासाठी भ्रमण करणे, इत्यादींची येथे जरूरी नसते म्हणूनच नामदेवांनी म्हटले आहे, 'व्रत, तप दान, हवन, पूजन । न चले साधन नाम म्हणतां ॥' नाम हे सकळ तीर्थांचे तीर्थ आहे हे नामसंकीर्तनाचे अतिशय सोपे साधन कसे आहे हे वर्णन करिताना तुकारामबुवा म्हणतात, 'नामसंकीर्तन साधन पैं सोपें । जळतील पापें जन्मान्तरीचीं । न लगती सायास जावें वनान्तरा । सुखें येतो घरा नारायण ॥' असा या नामाचा महिमा आहे

२२९६ आगी लागो तया सुखा । जेणें हरि नये मुखा ॥ १ ॥
मज होत कां विपत्ति । पांडुरंग राहो चित्तीं ॥ २ ॥
जळो तें समूळ । धन संपत्ति उत्तम कुळ ॥ ३ ॥
तुका म्हणे देवा । जेणें घडे तुमची सेवा ॥ ४ ॥

---

१ बहुतांची, २ तुर्तातुर्त

१ शब्दार्थ व टीपा :– आगी–आग

अर्थ :– ज्यामुळे श्रीहरीचे नाम मुखात येत नाही त्या मुखास आग लागो १ मला कसलीही विपत्ती आली तरी चालेल, पण माझ्या चित्तात पांडुरंगाचे स्थान असावे २ धन, संपत्ती, उत्तम कुळ हे श्रीहरीवाचून असेल तर ते जळून जावो ३ तुकाराम महाराज म्हणतात, ज्यामुळे तुझी सेवा देवा, घडेल अशी अवस्था मला हवी आहे ४

२२९७ आता न म्हणे मी माझें । नये भार काही ओझें ॥ १ ॥
तूंचि तारिता मारिता । कळों आलासी निरुता ॥ २ ॥
अवघा तूंचि जनार्दन । संत बोलती वचन ॥ ३ ॥
तुका म्हणे पाडुरंगा[1] । तुझ्या रिगालों वोसगा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– निरुता–निश्चयाने

अर्थ – हा माझा देह, हा मी, असे मी आता काही म्हणत नाही अशा प्रकारचे ओझे मी कधी शिरावर घेणार नाही १ देवा, तूच आता तारणारा व मारणारा आहेस असे मला निश्चयाने कळून आले आहे २ देवा, तूच एकटा सर्वत्र असणारा जनार्दन आहेस, असे संताचे वचन आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, यात माझे स्वत चे असे तिळमरही नाही ४

२२९८ समुद्रवळयांकित पृथ्वीचे दान । करिता समान न ये नामा ॥ १ ॥
म्हणऊनि कोणीं न करावा आळस । म्हणा रात्रीदिवस रामराम ॥ २ ॥
सकळ ही शास्त्रे पठण करिता वेद । सरी नयें गोंविदनामें एके ॥ ३ ॥
सकळ ही तीर्थे प्रयाग काशी । करितां नामाशीं तुळेति ना ॥ ४ ॥
कर्वतीं कर्मरीं देहासी दडण । करितां समान नये नामा ॥ ५ ॥
तुका म्हणे ऐसा आहे श्रेष्ठाचार । नाम हेंचि सार विठोबाचे ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – वळयांकित–वेष्टिलेल्या, सरी–बरोबरी, तुळेति–बरोबरीने येती, कर्मरीं–एक प्रकारच्या शस्त्राने

अर्थ – विविध समुद्रांनी वेष्टिलेल्या पृथ्वीचे दान जरी दिले तरी त्यामुळे प्रभूच्या नामाची बरोबरी होत नाही १ म्हणून कुणीही या नामाच्या कामी आळस करू नये रात्रदिवस राम राम असे म्हणत राहावे २ सर्व शास्त्रे व वेद पाठ केले तरी गोविंदाच्या नामाची बरोबरी त्यामुळे होणार नाही. ३ प्रयाग, काशी, इत्यादी सर्व तीर्थस्थानाच्या जरी यात्रा केल्या तरी याची बरोबरी नामाबरोबर होणार नाही ४ तीर्थस्थानात देहदंडासाठी करवतीने अथवा तीक्ष्ण शस्त्राने जरी देहावर आघात केले तरी त्यामुळे नामाची बरोबरी कधीच होणार नाही ५ तुकाराम महाराज म्हणतात, विठोबाचे नाम हेच एक सारभूत तत्त्व आहे, असे सर्व श्रेष्ठ लोक सांगत आले आहेत ६

विवरण – या आणखी एका महत्त्वाच्या अभंगात तुकोबानी नामाचे माहात्म्य निवेदन केले आहे समुद्र-वेष्टित पृथ्वीचे दानही नामाच्या बरोबरीने येणार नाही असे त्यानी येथे सांगितले आहे सर्व शास्त्रे पाठ केली, प्रयागकाशी वगैरे तीर्थस्थाने केली, अनेक प्रकारचे देहदंड सोसले तरी नामाची सर काही येणार नाही तुकोबांच्या मते विठ्ठलाचे नाम हेच सर्व साधनाचे एकमेव सार आहे या नामानेच सर्वांचा उद्धार होणार आहे उगाच शरीर-कष्ट देणाऱ्या इतर साधनाकडे जावे कशाला ? ज्ञानेश्वरानी एका बहारदार अभंगात इतर साधनापेक्षा नामाचे साधन कसे श्रेष्ठ आहे हे सांगताना म्हटले आहे ' अष्टांग योगें न शिणिजे । पवनेंम निरोध न कीजे रया ॥ याचा

१ काही । माझें तिळभरी नाहीं.

गीत गाईजे । गातां गातां श्रवणीं ऐकिजे रया । गीता छदें अंग डोलिजे । लीला विनोदें संसार तरिजे रया । बाप-रखुमादेविवरू विठ्ठलु । नामें जोडे हा उपावो कीजे रया ॥' हे नाम अतिशय पवित्र असून अमृताहून उदार आहे असें त्यांनी म्हटले आहे नामदेवांनीही नामालाच महत्त्वाचे स्थान दिले आहे ते म्हणतात, ' नाम हेंचि कर्म नाम हेंचि धर्म । केशव हेंचि वर्म सांगितलें ॥ नाम शुद्ध स्नान नाम शुद्ध संध्या । नामाविणें येवां आणीक नाहीं ॥' या नामाची बरोबरी कुणीसुद्धा करू शकणार नाही नामदेवांनी एका अभंगात म्हटले आहे, ' नामाचे सामर्थ्य नेणती वेदशास्त्रें । शेषाचीं तीं वस्त्रें मौनावलीं ॥ गंगा गणपती चंद्रसूर्य श्रेष्ठ । शंकर वरिष्ठ मौनावले ॥ भीष्म पराशर उद्धव अंगद । ब्रह्मा मुचकुंद मौनावले । नामा म्हणे काय जाणें मी ते स्तुति । दाटोनि श्रीपति उभा केला ॥ ' असा या नामाचा महिमा सर्व संतांनी गायिला आहे

२२९९ अवघ्या वाटा जाल्या क्षीण कळीं[1] न घडे साधन ।
उचित विधि विधान न कळे न घडे सर्वथा ॥ १ ॥
भक्तिपंथ बहु सोपा पुण्य नागवया[2] पापा ।
येणें जाणें खेपा येणेंचि एक खंडती ॥ २ ॥
उभारोनि बाहे विठो पालवीत आहे ।
दासां मोचि साहे[3] मुखें बोलें आपुल्या ॥ ३ ॥
भाविक विश्वासी पार उतरिलें[4] त्यांसी ।
तुका म्हणे नासी कुतर्क्याचि कपाळीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– कळीं–कलियुगात, विधिविधान–विधीप्रमाणे प्रक्रिया, पालवीत–बोलावीत

अर्थ – परमार्थाच्या अथवा प्रभुप्राप्तीच्या सर्व वाटा क्षीण होऊन गेल्या आहेत या कलियुगात ही साधने घडतही नाहीत त्यांच्या विधींचे उचित असे साधनें त्यांच्या प्रक्रियासहित उपलब्धही नाहीत. ती नीट कळत नाहीत आणि कळली तर त्याप्रमाणे काही घडत नाही १ म्हणून या सर्वांत श्रीहरीच्या भक्तीचा मार्ग फार सोपा आहे या मार्गाने पाप नाहीसे करण्यासाठी पुण्य खर्चावे लागत नाही या एकाच मार्गाने जन्ममृत्यूच्या खेपा सुटल्या जातात २ या मार्गाने येण्यासाठी हात उभारून हा विठुराय तुम्हांस बोलावीत आहे 'मी माझ्या दासांचे सर्व काही सहन करीन ' असे तो बोलत आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, या मार्गाविषयी जे कुणी भाविक व विश्वासू आहेत त्यांना हा श्रीहरी संसारसागरातून पार करतो, आणि जे केवळ कुतर्की आहेत त्यांचा नाशच होतो ४

विवरण – नामसंकीर्तनावर आधारलेला हा भक्तिमार्ग अतिशय सोपा असल्याने बहुजनांनी त्याचेच आचरण करावे, असा सर्व साधुसंतांचा उपदेश होता ईश्वरप्राप्तीचे वा परमार्थसाधनाचे इतर सर्व मार्ग कष्टदायक व कटकटीचे आणि फार थोड्या लोकांनाच जमणारे असल्यामुळे साधुसंतांनी भक्तिमार्गाचाच पुरस्कार केलेला आहे अव्यक्ताची, निर्गुण निराकाराची उपासना सहजशक्य नसल्याने सगुणाधिष्ठित भक्तिमार्गास महत्त्व आले भगवद्गीतेनेही ' क्लेशोऽधिकतरस्तेषां अव्यक्तासक्तचेतसाम् 'अव्यक्ताच्या ठिकाणी चित्ताची एकाग्रता करू पाहाणा-राम कष्ट होतात ' असाच अभिप्राय व्यक्त केला आहे या हरिभक्तीच्या मार्गात ' इंद्रिये कोंडितां न कोंडतीं । विषय सोडितां न सांडती । पुढत पुढती बाधी येती । या लागीं हरिभक्ति पोतिली देवे ' अशी धारणा असल्याचे सांगून एकनाथ महाराजांनीं म्हटले आहे, ' इंद्रियें कोंडावीं न लगतीं । सहजें राहे विषयासक्ती । एवढें-सामर्थ्य हरी भक्तीं । जाण निश्चितीं नृपवर्या ॥ योगी इंद्रियें कोंडितीं । ते भक्त लाविती भगवद्भक्ती । योगी विषय ते त्यागिती । ते भक्त अर्पिती भगवतीं ॥ योगी विषय त्यागिती । त्यागितां देह दुःखी होती । भक्त भगवती

१ कलीं, २ नागवतो, ३ आह, ४ उतरील

अर्पिती । तेणें होतो नित्य मुक्त ॥ दारा सुत गृह प्राण । करावे भगवंतासी अर्पण । हे भागवत धर्म पूर्ण । मुख्यत्वें भजन या नांव ॥ ' इतर साधनात व भक्तिमार्गात हा मूलत फरक असल्याने कलियुगात भक्तिमार्गच सुलभ झाला, विनयोक झाला जुन्या अवघड व क्षीण झालेल्या वाटांनी न जाता भक्तिमार्गाच्या सोप्याराजमार्गाने जाण्यासाठी संत यासाठी सांगतात

या राजयोगी मार्गाची सुलभता भक्तविजय ग्रंथाच्या पंधराव्या अध्यायात फार चांगल्या प्रकारे वर्णन केली आहे ' ते निजकळा हातासी येतां जाण । मग न लगेचि तीर्थाटन । वेदशास्त्राभ्यसन । काहीं न लगेचि सर्वथा ॥ मग कासया पाहिजे तपसायास । करणे न लगेचि कायाक्लेश । संतसंगती धरिता विश्वास । नासती दोष क्षणमात्रें ॥ वज्रासनीं बैसावें नेहमीं । काहींच न लगे खटपटी । यास करणे गिरीकपाटीं । वृथा चावटी कासया ? ॥ कासया करावें उग्र तप । नलगेचि काहीं मंत्रजप । संतसंगें त्रिविध ताप । निवतील सर्व क्षणमात्रें ॥ नलगे भस्मोद्धूलन फार । नलगे वाढवणें जटाभार । लोकाचारी दांभिक पसर । नलगचि सर्वथा ॥ सर्वांभूतीं करुणा भरित । जिव्हेसि असावे नामामृत । तेव्हांचि मन होईल निवृत्त । क्षणमात्र न लगता ॥ क्रियाकर्म करिता खटपट । परी प्रेमेंविण येतो वीट । हे आत्मज्ञानासी नव्हे वाट । वृथा कटकट कर्मठा ॥ साधनावांचूनिया जाण । हाचि मार्ग बहु सोपान । प्रेमें करावे हरिकीर्तन । रामकृष्ण गोविंद ॥ तीर्थव्रतें तपें चोखडीं । कीर्तनापुढें तीं बापुडीं । सांडोनि थोरपणाची प्रौढी । लाजोनि गेलीं सकळिका ॥ तो हा प्रसिद्ध राजयोग । सर्वां वरिष्ठ असे चांग । अखंड धरूनि संतसंग । वाचेसि नाम असावे ॥ असा या सहजसुलभ भक्तिमार्गाचा महिमा आहे

२३०० आम्हीं नामाचे धारक नेणों प्रकार आणीक । सर्व भावें एक विठ्ठलचि प्रमाण ॥ १ ॥
न लगे जाणावें नेणावें गावें आनंदें नाचावें । प्रेमसुख घ्यावें वैष्णवाचे संगती ॥ २ ॥
भावबळें घालूं कास लज्जा चिंता दवडूं आस । पायीं निजध्यास म्हणों[1] दास विष्णूचे ॥३॥
भय नाहीं जन्म घेतां मोक्षपदा[2] हाणों लाता । तुका म्हणे सत्ता धरूं निकट सेवेची ॥४॥

शब्दार्थ व टीपा – धारक–धारण करणारे

अर्थ – आम्ही या श्रीहरीचे नाम घेणारे भक्त आहोत याच्याशिवाय आम्हास इतर दुसरे प्रकार माहीत नाहीत आम्हास सवभावानी हा एक विठ्ठलच प्रमाण आहे १ याच्या पुढे आम्ही काही जाणावे अथवा नणावे असे नाहीच याच्या नामाच्या धुंदीत प्रेमाने नाचावे, गावे आणि प्रेमसुखाची लयलूट या वैष्णवाच्या संगतीत करावी एवढेच आम्हास माहीत आहे २ श्रीहरीच्या प्रेमाची कास घालून लज्जा, चिंता, आशा या वृत्तींना नाहीसे करू या एका विठोबाच्याच चरणाचा ध्यास धरून आम्ही स्वत स त्याचेच विष्णुदास म्हणवून घेऊ ३ तुकाराम महाराज म्हणतात, याच्या संगतीत आम्हाला अनक जन्म घेताना कसलेही भय वाटत नाही मोक्षसुखावर तर आम्ही लाथ मारून तुच्छ केलेला असतो यापुढे या श्रीहरीच्या सेवेची सत्ताच संपादन करू ४

२३०१ आम्ही हरिचे सवंगडे जुने ठायींचे वेडे बागडे ।
हातीं धरुनी कडे पाठीसवें वागविलों ॥ १ ॥
म्हणोनि भिन्न भेद नाहीं देवा आम्हा एकदेहीं[3] ।
नाहीं जालों कहीं[4] एका एक वेगळे ॥ २ ॥
निद्रा करितां होतो पायीं सवेंचि लंका घेतली तईं ।
वानरें गोवळ गाई सवें चारित फिरतसों ॥ ३ ॥
आम्हा नामाचे चिंतन राम कृष्ण नारायण ।
तुका म्हणे क्षण खातां जेवितां न विसंभों ॥ ४ ॥

---

१ म्हणवूं, २ मोक्षसुखा, ३ एकदेही, ४ काहीं

शब्दार्थ व टीपा – ठायींचि–मूळचे, गोवळ–गुराखी, नाराट

अर्थ – आम्ही श्रीहरीचे फार जुन्या काळाचे सवंगडी मित्र आहोत मूळचे आम्ही त्याचेच बरोबरचे सोबती असून आम्ही श्रीहरीला हातांवर, खांद्यावर, पाठीवर घेऊन वाढविले आहे १ म्हणून त्याच्यात व आमच्यात भिन्नभाव नाही देव व आम्ही देहानेही एकरूप आहोत यासाठीच आम्ही एकमेकांना सोडून कधी वेगवेगळे झालेलो नाही २ श्रीहरी जेव्हा निद्रा करीत असे तेव्हा त्याच्या पायांशी आम्ही होतो त्याने ज्या वेळी जन्म घेतला त्यावेळी आम्ही वानररूपाने त्याच्या साह्यास होतो गोकुळात त्याच्या बरोबर गोपाळांच्या रूपाने गाई चारताना आम्ही फिरत असू ३ तुकाराम महाराज म्हणतात, आम्हांला रामकृष्ण, नारायण या नावाचे चिंतन खाताना, जेवताना नित्य होत असते त्याला आम्ही कधी एक क्षणभरही विसरत नाही ४

२३०२ मागें बहुतां जन्मीं हेंचि करित आलों आम्ही । भवतापश्रमीं दुःखें पीडिलीं निववूं त्यां ॥१॥
गर्जों हरिचे पवाडे मिळों’ वैष्णव बागडे । पाझर रोकडे काढूं पाषाणामध्यें ॥ २ ॥
भाव शुद्ध नामावळी हर्षे नाचों पिटूं टाळी । घालूं पायां तळीं कळिकाळ त्यावळें ॥ ३ ॥
कामक्रोध बंदखाणी’ तुका म्हणे दिले दोन्ही । इंद्रियांचे धणी आम्ही जालों गोसावी ॥४॥

शब्दार्थ व टीपा – भवतापश्रमीं–संसारतापाच्या मुळे, कष्टाने, बागडे–शूर, बंदखाणी–बंदिखान्यात, तुरुंगात, धणी–मालक, धनी

अर्थ – मागे अनेक जन्मांत आम्ही हेच काम करीत आलो आहोत संसारतापाच्या कष्टाने जे दुःखी झाले असतील त्यांना शांत करणे हेच आमचे काम होते १ आम्ही शूर वैष्णव जमवून हरिकीर्तनाच्या गजराने पाषाण हृदयी माणसाच्या हृदयातूनही करुणेचे पाझर फोडू २ श्रीहरीचे नाम आम्ही शुद्ध भावाने घेऊ आणि मोठ्या आनंदाने नाचत नाचत टाळी पिटू आणि या बळाच्या योगाने प्रत्यक्ष कळिकाळालाही आम्ही पायांखाली तुडवू ३ तुकाराम महाराज म्हणतात आम्ही कामक्रोधादी विकार बंदिखान्यात टाकून इंद्रियांचे मालक असूनही गोसावी बनलो आहोत ४

शब्दार्थ व टीपा – निवाडे-निर्णयासाठी, दाव-दाखीव, साच-खरा

अर्थ :– देवा तू खरा अमर आहेस आणि दातारा, मी मात्र तसा नाही हे कसे होऊ शकते ? १ चल, या वादग्रस्त प्रश्नाच्या निर्णयासाठी आपण संताच्या जवळ जाऊ २ तुला जर नाम नसेल तर मला तरी कुठे आहे दाखीव ३ तुला जर रूप नसेल तर मला तरी कुठून येणार रे ? माझे रूप मग दाखीव ना ४ तू नाना प्रकारच्या लीला खेळतोस, त्याहून मी काय वेगळा आहे का ? ५ तुकाराम महाराज म्हणतात, तू ज्याप्रमाणे खरा अथवा खोटा असशील, त्याचप्रमाणे मीही खराखोटा आहे ६

विवरण – या आणखी एका तत्त्वस्पर्शी अभंगात तुकाबानी आपले व परमेश्वराचे नाते किती दृढ आहे आणि देव व भक्त हे रूपगुणाच्या बाबतीतही अभिन्न कसे आहेत हे मोठ्या समर्पक रीतीने वर्णन केले आहे या अभिन्नत्वाचा खुलासा थोडा करता येण्यासारखा आहे एकच ब्रह्मतत्त्व नाना रंगरूपानी व्यक्त झाले, आकारास आले अर्थात या व्यक्त जगाच्या ठिकाणी मूळच्या बीजाचे सर्व गुण येणारच भक्ताचे नाम व रूप हे मूळ तत्त्वाच्या, ईश्वराच्या नामरूपाहून वेगळे कसे असणार ? भक्त या सापेक्ष शब्दातच ईश्वराचे अस्तित्व असून ते एकरूप आहे बाह्य आकार वेगळा, परंतु रंग गुण, मूलतत्त्व यांची समरूपता आहे एकाच बीजाचा हा विस्तार म्हणजे हे नाना गुणानी, रूपानी नटलेले जग हा संबंध निरंतरचा आहे नित्याचा आहे विषम वस्तूचा संबंध कायम कसा टिकणार ? ' न संभवति संबंधो विषमाणां निरंतरम '–विषम वस्तूचा संबंध निरंतर नसतो गुणरूपानी एक असणाऱ्या वस्तूच एकत्र येऊ शकतात सजातीय वस्तू सजातीय वस्तूशीच एकरूप होते ' सजातीया सजातीयेनैकत्वमधिगच्छति ' असा सिद्धान्त असल्याने वरवरची रूपे भिन्न भासली तरी गुणरूपाच मूळतत्त्व एकच असते 'कटकत्व पृथग्धेम्नस्तरंगत्व पृथग्जलात । यथा न संभवत्येव न जगत्पृथगीश्वरात '–सोन्याचे कडे सोन्याहून भिन्न नसते अथवा पाण्याची लाट पाण्याहून भिन्न नसते त्याप्रमाणे नामरूपात्मक जग हे ईश्वराहून भिन्न असूच शकत नाही गीतेमध्येही भगवताने 'मया ततमिदं सर्वं जगदव्यक्तमूर्तिना '–मीच आपल्या अव्यक्त रूपाने हे जग विस्तारले अथवा व्यापिले आहे का बीजचि जाहलें तरु । अथवा भांगारचि अलंकारु । तैसा मज एकाचा विस्तारु । तें हें जग ॥ असे मोठे समर्पक वर्णन व्यक्त–अव्यक्त जगाचे एकत्व दाखविताना ज्ञानेश्वरानी केले आहे या दृष्टीने ईश्वर व त्याचा भक्त हे भोगासाठी, प्रेम चाखण्यासाठी द्वैतावर असले तरी त्याच्यात एकरूपताच आहे त्याच्या लीलातूनच याची भक्ताची निर्मिती आहे

२३०४ मंत्र चळे[1] पिसे लागतें सत्वर । अबद्ध ते फार तरले नामें ॥ १ ॥
अशौच तो बाधी आणिका अक्षरा । नाम निदसुरा घेता तरे ॥ २ ॥
रागज्ञानघात चुकता होय वेळ । नाम सर्वकाळ शुभदायक ॥ ३ ॥
आणिका भजना[2] बोलिला निषेध । नाम तें अभेद सकळा मुखीं ॥ ४ ॥
तुका म्हणे तपें घालिती घालणी । वेश्या उद्धरुनि नेली नामें ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – चळे-चळला तर, काही चूक झाली तर पिसे-वेड अबद्ध-वेडेवाकडे, निदसुरा-अर्धवट झोपेत असलेला, घालणी-धोका

अर्थ – काही मंत्र असे असतात की, त्यात काही उच्चाराची चूक झाली तर तावडतोब वेड लागण्याची पाळी येते, परंतु श्रीहरीचे नाम कसेही वेडेवाकडे गाइले तरी ते तारते १ इतर मंत्र अशुद्ध अवस्थेत म्हटले तर ते म्हणणारास बाधक होतात आणि नाम मात्र अर्धवट झोपेत असतानाही घतले तरी ते तारते २ इतर गायनास वेळेचे व रागाचे ज्ञान आवश्यक आहे, त्यात जर काही चूक झाली तर मान घात होतो नाम मात्र नेहमीच शुभकारक असते ३ इतर काही भजनाला विधिनिषेध सांगितलेला आहे पण नाम मात्र सर्व जातींनी सदैव घ्यावे असे

१ चळ, २ भजना विधि बोलिला

असते ४ तुकाराम महाराज म्हणतात, इतर जपतपादी खडतर साधने जीवास धोका निर्माण करतात; पण नामाने मात्र बिनधोक कार्य साधते नामोच्चाराने गणिकेचाही उद्धार होऊन गेला ५

२३०५ नव्हती ते संत करितां कवित्व । संताचे ते आप्त नव्हती संत ॥ १ ॥
येथें नाहीं वेश सरतें आडनांवें । निवडे घावडाव व्हावा अंगीं ॥ २ ॥
नव्हती ते संत धरितां भोंपळा । करितां वाकळा प्रावरण ॥ ३ ॥
नव्हती ते संत करितां कीर्तन । सांगतां पुराणे नव्हती संत ॥ ४ ॥
नव्हती ते संत वेदाच्या पठणें । कर्म आचरणें नव्हती संत ॥ ५ ॥
नव्हती संत करितां तप तीर्थाटणें । सेविलिया वन नव्हती सत ॥ ६ ॥
नव्हती संत माळामुद्रांच्या भूषणें । भस्मउद्धूळणें नव्हती संत ॥ ७ ॥
तुका म्हणे नाहीं निरसला देहे । तों अवघे हे संसारिक ॥ ८ ॥

शब्दार्थ व टीपा -- घावडाव-सामर्थ्य, पेच, अधिकार, प्रावर्ण-पांघरूण.

अर्थ :- केवळ कवित्व केल्याने कुणी सत होत नाहीत सतांचे आप्तसबंधी असल्यानेही कुणी सत होत नाहीत १ सतांचा वेष धारण केल्याने अथवा सत हे आडनाव धारण केल्याने कुणी सत होत नाहीत सतत्व येण्यासाठी तसा अधिकारच अंगी यावून जो वेगळा निवडला जातो तोच सत होय २ हातात भिक्षेसाठी भोपळा घेऊन आणि अंगावर चिध्याचिरगुटांची वाकळ पांघरून घेतल्याने कुणी सत कधी होत नाहीत ३ वरवरचे कीर्तन केल्याने कुणी सत होत नाहीत कुणी पुराण सांगितले म्हणून सत होत नाहीत ४ वेदपठण करून कुणी सत होत नाहीत किंवा नाना कर्मांच्या आचरणाने कुणी सत होत नाहीत ५ तपश्चर्या व तीर्थयात्रा केल्याने कुणी सत बनत नाहीत किंवा रानावनात जाऊन बसल्याने कुणी सत होत ,नाहीत ६ गळ्यात माळा व कपाळावर मुद्राभूषणे घातल्याने अथवा सर्वांगावर भस्माची उधळण केल्याने कुणी सत होत नाहीत ७ तुकाराम महाराज म्हणतात, देहभावाचे निरसन झाल्याशिवाय कुणी सत होत नाहीत जोपर्यंत देहमान टिकून आहे तोपर्यंत ते सर्व ससारी आहेत असे जाणावे ८

विवरण -- या एका सुदर अभगात तुकारामबुवांनी सत कुणास म्हणावे आणि कुणास म्हणू नये याची विस्ताराने मांडणी केली आहे ज्याचा देहभाव नष्ट झाला आहे तोच सत जाणावा असे त्यांनी म्हटले आहे केवळ कवित्व करतो, सताचा नातेवाईक आहे, वेषभूषा सताची आहे अंगावर फाटकी वाकळ आहे, कीर्तनपुराण सांगतो, वेदपठण करतो, तप केले आहे तीर्थयात्रा केली आहे या काहीं सतत्वाच्या खुणा नाहीत सतत्व अंगी येण्यासाठी देहभाव निरसला पाहिजे मी, माझेपणा हा भाव नष्ट झाला पाहिजे देहभावाविषयी तो उदासीन हवा त्याच्या अंतःकरणात प्रेमाचा जिव्हाळा निरतर असावा सताचे लक्षण ओळखाया खूण । जो दिसे उदासीन देहभावा । सतत अंतरी प्रेमाचा जिव्हाळा । वाचे वसे चाळा रामकृष्ण ॥ अशी सत ओळखण्याची खूण नामदेवांनी सांगितली आहे ' तेचि एक सत जाणा । आवडतो नारायणा । पांडुरंगावाचुनि । न जाणे दुसरें पाही ॥ मुखीं नाम अमृतवाणी । धाले मनीं डुल्लती ॥ असे सताचे वर्णन सेनामहाराजांनी केले आहे ' तेचि सत तेचि सत । ज्याचा हेत विठ्ठलीं । नेणती कांहीं टाणाटोणा । नामस्मरणावांचुनी । काया वाचा आणि मनें । धाले चिंतनीं डुल्लती ॥ निळा म्हणे विरक्त देहीं । आठवचि नाहीं विषयाचा ॥ ' असे सताचे लक्षण निळोबारायांनी केले आहे

२३०६ हेंचि दान देगा देवा । तुझा विसर न व्हावा ॥ १ ॥
गुण गाईन आवडी । हेचि माझी सर्व जोडी ॥ २ ॥

न लगे मुक्ति आणि[1] संपदा । संतसंग देईं सदा ॥ ३ ॥
तुका म्हणे गर्भवासीं । सुखें घालावें आम्हांसी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – आवडी–प्रेमाने, जोडी–प्राप्ती

अर्थ – देवा, तुझा विसर मला कधीच होऊ नये हेच एक दान मला तू दे १ तुझे गुणगान मी मोठ्या प्रेमाने करीन हीच खरी माझी प्राप्ती आहे २ याखेरीज मला मुक्ती नको अथवा धनसंपदाही नको नेहमी संतांची संगत मात्र असावी ३ तुकाराम महाराज म्हणतात, एवढे दिल्यानंतर मग देवा, मला सुखाने गर्भवास द्यावा ४

विवरण –वारकरी पंथात या अभंगास विशेष प्रकारचे महत्त्व आहे. कथानिरूपण अथवा भजनादी सेवा पूर्ण करताना देवास काय मागायचे ? याचा फार श्रेष्ठ आदर्श संतांनी आपणासाठी ठेवलेला आहे साधुसंत कधी स्वतःसाठी काहीही देवाजवळ मागीत नाहीत लौकिक लाभाची त्यांना इच्छाच नसते ज्ञानेश्वरांनी गीतेचा भावार्थ सांगण्याचा वाग्यज्ञ पूर्ण केल्यावर काय पसायदान मागितले ? तर दुष्टांची वक्रता दूर व्हावी, दुरिताचा तिमिर नाहीसा व्हावा, सर्व विश्व स्वधर्माच्या सूर्योदयाबरोबर संतुष्ट व्हावे, आणि सज्जनांची सोबत मिळावी, सर्व सुखांनी युक्त होऊन आदिपुरुषाच्या ठिकाणी अखंडितपणे भजनमग्न व्हावे या ठिकाणी तुकाराम महाराजही देवाजवळ असेच निःस्वार्थपणे मागणे मागीत आहेत देवाचा आपणास विसर न व्हावा, त्याच्या गुणगानात नेहमी प्रेम वाटावे, साधुसंतांची संगत सदैव असावी असे मागणे बुवांनी या अभंगात केले आहे जन्मजन्मी देवाचेच दास होण्याची इच्छा तुकोबांना आहे 'संतसंग सर्व काळ । अखंड प्रेमाचा कल्लोळ ॥ चंद्रभागे स्नान । तुका मागे हेंचि दान ॥' एवढी साधी इच्छा बुवांच्या मनातील आहे 'या संतांसी निरवी हेंचि मज देईं । आणिक तुजें कांहीं न मागे तुज' अशी त्यांच्या मनाची सहज निश्चिती आहे

२३०७ भाग्यवंता हे परवडी । करिती जोडी जन्माची ॥ १ ॥
आपुलाल्या लाहो भावें । जें ज्या व्हावें तें आहे ॥ २ ॥
इच्छाभोजनाचा दाता । न लगे चिंता करावी ॥ ३ ॥
तुका म्हणे आल्या थान्या । वस्तु बऱ्या मोलाच्या ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – परवडी–प्रकार, लाहो–लाभ, थान्या–मुक्कामास, वस्तीस

अर्थ – जो भाग्यवंत असतो त्याचा प्रकार असा असतो की, तो चांगल्या जन्माची प्राप्ती करून घेत असतो १ जे ज्याला हवे ते त्याला त्याच्या भावनेप्रमाणे लाभते २ हा श्रीहरी इच्छेप्रमाणे हवे ते भोजन देणारा आहे यासाठी कुणी चिंता करू नये ३ तुकाराम महाराज म्हणतात, चांगल्या मोलाच्या वस्तू या ठिकाणी वसतीस आल्या आहेत ४

२३०८ वचुनियां[2] पिंड । भाता दान करी लंड ॥ १ ॥
जैसी याची चाली वरी । तैसा अंतरला दुरी ॥ २ ॥
मेला राखे दिस । ज्यालेपण जाले वोस ॥ ३ ॥
तुका म्हणे देवा । लोभें न पुरेचि सेवा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – पिंड–देह, शरीर, लंड–दांडगा मनुष्य, ज्यालेपणा–जिवंतपणा

अर्थ – आपल्या देहाने सेवा न करता हा दांडगा मनुष्य श्राद्धाच्या दिवशी भाताच्या पिंडाचे दान करीत असतो १ अशी याची वागणूक असल्याने हा देवापासून दूरच राहातो २ पितर जिवंत असेपर्यंत हा कधी

१ धन, २ वेचूनियां

त्यांची चौकशी करीत नाही, आणि ते मेल्यानंतर मात्र ध्यानात ठेवून श्राद्ध करीत असतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा लोभी माणसाची सेवा देवाला पोचत नाही ४

२३०९ अधीरा माझ्या मना ऐकें एकी मात । तूं कां रे दुश्चित निरंतर ॥ १ ॥
हेचि चिंता काय खावें म्हणऊनि । भले तुजहूनि पक्षिराज ॥ २ ॥
पाहा तें चातक नेघे भूमिजळा । वरुषे उन्हाळा मेघ तया ॥ ३ ॥
सकळयातींमध्यें ठक हा सोनार । त्याघरीं व्यापार झारियाचा ॥ ४ ॥
तुका म्हणे जळीं घनीं जीव एक । तयापाशी लेख काय असे ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – मात–गोष्ट, झारिया–झारेकरी, सोनाराच्या दुकानातील राख वगैरे गाळून सोन्याचे कण काढणारा, लेख–विचार कर

अर्थ – माझ्या उतावळ्या मना, तू एक गोष्ट ऐक ना निरंतर तू असा दुश्चित का राहतोस ? १ पोटाला काय खावे ? हीच चिंता तुझ्या मनास आहे ना ? मग अशी चिंता न करणारे पक्षी तुझ्यापेक्षा पुष्कळच चांगले की २ हे चातक पक्षी पाहा. जमिनीवर पडलेले पाणी चातक पीत नाहीत म्हणून त्यांच्यासाठी उन्हाळ्यात सुद्धा मेघांतून पाण्याचा वर्षाव होत असतो ३ सर्व जातीत फसविणारा म्हणजे सोनार होय तरीही त्याच्याच घरी झारेकरी काम करून सोने मिळवितात आणि आपले पोट भरतात ४ तुकाराम महाराज म्हणतात, वनात व पाण्यात जीव आहेत, पण त्यांच्यापाशी कशाचा साठा आहे, हे नीट विचार करून तू पाहा ना ५

२३१० कां रे नाठविसी कृपाळु देवासी । पोसितो जनासी एकला तो ॥ १ ॥
बाळा दुधा कोण करितें उत्पत्ती । वाढवी श्रीपति सवें[1] दोन्ही ॥ २ ॥
फुटती तरुवर उष्णकाळमासीं । जीवन तयासी कोण घाली ॥ ३ ॥
तेणे तुझी काय नाहीं केली चिंता । राहे त्या अनंता आठवूनि ॥ ४ ॥
तुका म्हणे ज्याचें नाम विश्वंभर । त्याचें निरंतर ध्यान करीं ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा– नाठविसी–आठवत नाहीस, जीवन–पाणी

अर्थ –– अरे, तू या कृपाळू देवास का आठवत नाहीस ? तो एकटा देवच सर्व जगाचे पालनपोषण करीत असतो १ बाळासाठी दुधाची निर्मिती कोण करतो ? तोच श्रीपती गर्भामधील बालक व स्तनातील दूध यांना एकदमच निर्माण करतो २ भर उन्हाळ्याच्या दिवसांत तरुवरांना नवी पालवी फुटते त्यांना पाणी कोण घालतो ? ३ अशा या देवाने तुझी चिंता काहीच केली नसेल काय ? त्या अनंताची आठवण करून तू स्वस्थ राहा ४ तुकाराम महाराज म्हणतात, ज्याचे नावच विश्वंभर आहे, त्या देवाचे तू निरंतर ध्यान करीत जा ५

२३११ उदारा कृपाळा पतितपावना । ब्रिदें नारायणा साच तुझीं ॥ १ ॥
वर्णिलासी जैसा जाणतां नेणतां । तैसा तू अनंता साच होसी ॥ २ ॥
दैत्यां काळ भक्तां मेघश्याममूर्ति । चतुर्भुज हातीं शंख चक्र ॥ ३ ॥
काम इच्छा तया तैसा होसी रानीं । यशोदेच्या स्तनीं पान करी ॥ ४ ॥
होऊनि सकळ कांहींच न होसी । तुका म्हणे यासी वेद ग्वाही ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – साच–सत्य, रानीं–रानात, वनात

अर्थ — नारायणा, उदार, कृपाळू पतीतपावन ही तुझी ब्रीदे सत्य आहेत १ अनंता, जाणून अथवा नेणून जे कुणी तुझे वर्णन करतात त्याप्रमाणे खरोखर तू होतोस २ दुष्ट लोकांना तू काळाप्रमाणे आणि भक्तांना

[1] स्वयें.

मेघश्यामाच्या मूर्तीप्रमाणे दिसतोस ३ गोपिकांच्या इच्छेप्रमाणे कुंजवनात तू प्रेमिक झालास आणि यशोदेच्या मांडीवर बसून बालरूपाने तू तिचे स्तनपान केलेस ४ तुकाराम महाराज म्हणतात देवा, तू सर्व होऊनही तू काहीच होत नाहीस याला वेदांची साक्ष आहे ५

२३१२ ऐका संतजन उत्तरें माझे बोबडे बोल
करीं लाड तुम्हापुढें हो कोणी क्षणी कोपाल ॥ १ ॥
उपाय साधन आइका कोण गति अवगति ।
दृढ बैसोनि सादर तुम्ही धरावे चित्तीं ॥ २ ॥
धर्म तयासी घडे रे ज्याचे स्वाधीन[1] भाज ।
कर्म तयासी जोडे रे भीत नाहीं लाज ॥ ३ ॥
पुण्य ते जाणां रे भाइनो परउपकाराचे ।
परपीडा परनिंदा रे खरें पाप तयाचे ॥ ४ ॥
लाभ तयासी जाला रे मुखीं देव उच्चारी ।
प्रपंचापाठी गुंतला हाणी तयासीच थोरी ॥ ५ ॥
सुख तें जाणा रे भाइनो संतसमागम ।
दुःख तें जाणा रे भाइनो सम तेथें विषम ॥ ६ ॥
साधन तयासी साधे रे ज्याची स्वाधीन बुद्धि ।
पराधीनासी आहे घात रे थोर जाण सबधी ॥ ७ ॥
मान पावे तो आगळा मुख्य इंद्रियें राखे ।
अपमानी तो अधररसस्वाद चाखे ॥ ८ ॥
जाणता तयासी बोलिजे जाणे समाधान[2] ।
नेणता तयासी बोलिजे वाद करी भूषण ॥ ९ ॥
भला तोचि एक जाणा रे गयावर्जन करी ।
बुरा धन नष्ट मेळवी परद्वार जो करी ॥ १० ॥
आचारी अन्न काढी रे गाई अतितभाग ।
अनाचारी करी भोजन त्याही नसता संग ॥ ११ ॥
स्वहित तेणेंचि केले रे मूर्ती देखिला देव ।
अनहित तयाचे जाले रे आणी अहंभाव ॥ १२ ॥
धन्य जन्मा तेचि आले रे एक हरिचे दास ।
धिग ते विषयीं गुंतले केला आयुष्या नास ॥ १३ ॥
जोहरी तोचि एक जाणा रे जाणे सिद्धलक्षणे ।
वेडसर तो भुले रे वरदळभूषणे ॥ १४ ॥
बळियाढा तोचि जाणा रे भवित दृढ शरीरीं ।
गाढ्या तयासी बोलिजे एक भाव न धरी ॥ १५ ॥

---

१ आधीन, २ सारलक्षण

खोल तो वचन गुरूचे जो गिळूनि बैसे ।
उथळ धीर नाहीं अंगीं रे ह्मणे होईल कैसें ॥ १६ ॥
उदार तो जीवभाव रे ठेवी देवाचे पायीं ।
कृपण तयासी बोलिजे पेडे उपाधिढाईं ॥ १७ ॥
चागलेपण तेंचि रे ज्याचे अंतर शुद्ध ।
वोंगळ मळिण अंतरीं वाणी वाहे दुर्गंध ॥ १८ ॥
गोड तेंचि एक आहे रे सार विठ्ठलनाम ।
कडु तो संसार रे लक्षचौऱ्याशी जन्म ॥ १९ ॥
तुका ह्मणे मना धरी रे संतसंगतिसोई ।
न लगे काहीं करावें राहें विठ्ठलपायीं ॥ २० ॥

शब्दार्थ व टीपा – माज–बायको, गयावर्जन–गयेस श्राद्धादी कर्मे, आचारी–आचारसंपन्न

अर्थ – अहो संतसज्जन, माझे हे थोडके बोल तुम्ही ऐका मी तुम्हांपुढे लाड करून बोलत आहे याबद्दल कुणी मनात राग धरू नये १ उत्तम गती कोणती, अधोगती कोणती हे तुम्ही एकाग्र चित्ताने नीट ऐका दृढ चित्ताने धारण करा २ ज्याच्या स्वाधीन स्वतःची बायको आहे, त्याच्याकडूनच गृहस्थाश्रमात नीट धर्म घडतो आणि ज्याला कधी भीती व लाज वाटत नाही त्याच्याकडून कर्म घडत असते ३ माझ्या बंधूनो, परोपकार हेच पुण्य आहे असे तुम्ही जाणा दुसऱ्याची निंदा करणे व दुसऱ्यास पीडा देणे हेच पाप आहे असे मानावे ४ जो मुखाने देवाचे नाम नेहमी उच्चारतो त्याला लाभ झाला असे समजावे, आणि जो केवळ प्रपंचातच गुतून राहिलेला आहे त्याची फार मोठी हानी होते ५ बंधूनो, संतांचा सहवास हेच खरे सुख तुम्ही माना, आणि ईश्वर समत्वाने सर्वत्र असूनही त्याविषयी विषम भावना मनात बाळगणे हेच दुःख आहे ६ ज्याची बुद्धी स्वतःच्या स्वाधीन आहे त्याला सर्व प्रकारची साधने साध्य होतात आणि जो दुसऱ्याच्या बुद्धीप्रमाणे वागतो त्याचा मोठाच घात होतो ७ जो कुणी आपल्या मुख्य इंद्रियांचे रक्षण करतो त्याचा सर्वत्र मान होतो आणि जो स्त्रियांच्या शृंगरसाच्या गोडीत रमतो त्याचा अपमान होतो ८ जो सारभूत तत्त्व जाणतो त्याला जाणता म्हणावे आणि जो इतरांबरोबर शुष्क वादविवाद करतो त्यास नेणता समजावे ९ जो कुणी गयेस जाऊन आपल्या वडिलांचे श्राद्धादी कर्म करतो तो भला समजावा आणि जो कुणी द्रव्य मिळवून परद्वार करतो तो वाईट समजावा १० जो भोजनसमयी गाय व ब्राह्मण यांच्यासाठी घास काढून ठेवितो तोच आचारवान समजावा, आणि कुणालाही साक्षीस न घेता एकटाच भोजन करतो तो अनाचारी म्हणावा ११ ज्याने सर्व प्राणिमात्रांत देव पाहिला त्यानेच आपले हित साधले आणि जो अहंभावाने वागतो त्याने मात्र स्वतःचे अहित केले असेच समजावे १२ जन्माला येऊन जे श्रीहरीचे दास झाले तेच धन्य होत आणि जे कुणी विषयांत गुंतले आहेत त्यांचा धिक्कार असो त्यांनी आपल्या आयुष्याचा नाश केला १३ जो सिद्धांची लक्षणे ओळखतो त्यालाच खरा जाणणारा समजावा व जे कुणी वरकड भूषणांस भुलतात ते वेडसरच समजावेत १४ ज्याच्या ठिकाणी ईश्वराची भक्ती दृढ स्वरूपाची आहे तोच एक बलवान असून जो एकनिष्ठ भाव धरून राहात नाही तो गबाळ समजावा १५ जो आपल्या गुरूचे वचन हृदयात साठवून ठेवितो तो सखोल समजावा आणि ज्याला कसलाही धीर नसतो व कसे होईल कसे होईल असेच जो म्हणतो तो उथळ समजावा १६ जो देवाच्या पायी आपला जीव समर्पण करतो तोच उदार समजावा आणि जो व्यवहाराच्या विविध उपाधींत पडतो तोच कृपण मानावा १७ ज्याचे मन शुद्ध आहे तोच चांगला मानावा आणि ज्याचे अंतःकरण मलीन असून वाणीने जो घाणेरडे बोलतो त्याला वाईट समजावे १८ विठ्ठलनामाचे सारभूत हेच एक गोड तत्त्व असून चौऱ्याऐंशी लक्ष योनींतून फिरणारा व संसारात व्यग्र होणारा कडवट समजावा १९ तुकाराम महाराज म्हणतात मना संतांच्या संगतीची सोय तू मनात नीट धर आणि विठ्ठलाच्या पायी लाग मग तुला इतर उपाय करण्याची जरूरी काहीच भासणार नाही २०

## ॥ येकाखडी ॥१॥

२३१३ कराया कैवाड । नाही तरी आला नाड ॥ १ ॥
स्मरा पंढरीचा देव । मनीं धरोनिया भाव ॥ २ ॥
खचविलें काळें । उगवा लवलाहें जाळें ॥ ३ ॥
गजर नामाचा । करा लवलाहे वाचा ॥ ४ ॥
घरटी चक्रफेरा । जन्ममृत्याचा भोंवरा ॥ ५ ॥
नानाहव्यासांची जोडी । तृष्णा करी देशधडी ॥ ६ ॥
चरणीं ठेवा[1] चित्त । म्हणवा देवाचे अंकित ॥ ७ ॥
छंद नानापरी । कळा न पविजे हरी ॥ ८ ॥
जगाचा जनिता । भुक्तिमुक्तींचा ही दाता ॥ ९ ॥
झणी माझें माझें । भार वागविसी ओझें ॥ १० ॥
यांची कां रे गेली बुद्धि। नाहीं तरायाची[2] शुद्धि ॥ ११ ॥
टणक धाकुलीं । अवघीं सरती विठ्ठलीं ॥ १२ ॥
ठसा त्रिभुवनीं । उदार हा शिरोमणि ॥ १३ ॥
डगमगी तो वांयां जाय । धीर नाहीं गोता खाय ॥ १४ ॥
ढळों नये जरी । लाभ घरिचिया घरीं ॥ १५ ॥
नाहीं ऐसे राहे । कांहीं नासिवंत देहे॥ १६ ॥
तरणा भाग्यवत । नटे हरिकीर्तनात ॥ १७ ॥
थडी टाकी पैलतीर । वाहे ठोके होय वीर ॥ १८ ॥
दया तिचे नांव । अहंकार जाय जंव ॥ १९ ॥
धनधान्य हेवा । नाडे कुटुंबाची सेवा ॥ २० ॥
नाम गोविंदाचे । घ्या रे हेंचि भाग्य साचें ॥ २१ ॥
परउपकारा । वेचा शक्ति निंदा वारा ॥ २२ ॥
फळ भोग इच्छा । देव आहे जया तैसा ॥ २३ ॥
बरवा ऐसा छंद । वाचे गोविंद गोविंद ॥ २४ ॥
भविष्याचे माथा । भजन न द्यावे सर्वथा ॥ २५ ॥
माग लागला न संडीं । आळसे माती घालीं तोंडीं ॥ २६ ॥
यश कीर्ति मान । तरी जोडे नारायण ॥ २७ ॥
रवि लोपे तेजें । जरी हारपे हे दुजें ॥ २८ ॥
लकार लाविला । असता नसताचि उगला ॥ २९ ॥
वासनेची धाडी । बद्ध सोडघा नाडचा बेडी ॥ ३० ॥
सरतें[3] न फळे । काय झांकियेले डोळे ॥ ३१ ॥
खंती ते न धरा । होणें गाढव कुतरा ॥ ३२ ॥

१ ठेवी, २ तयाची हे शुद्धी, ३ सार ते.

सायासाच्या जोडी । पिके काढियेल्या पेडी ॥ ३३ ॥
हातीं हित आहे । परि न करिसी पाहें ॥ ३४ ॥
अळंकार लेणें । ल्या रे तुळसीमुद्राभूषणें ॥ ३५ ॥
ख्याती केली विष्णुदासीं । तुका म्हणे पहा कैसी ॥ ३६ ॥

शब्दार्थ व टीपा:- कैवाड-निर्धार, निश्चय. उगवा-मोकळा, घरटीं-फेऱ्यात, फेऱ्यात, जोडी-प्राप्ती, लाभ, तृष्णा-हाव, लोभ, टणक-थोर, सरती-मान्यते, हेवा-हाव, लोभ, सांचें-बरोबर, लबार-लबाडी, लुच्चेगिरी असे शब्द, न सडी-सोडू नका, उगला-शांत

अर्थ:- जनहो, तुम्ही ईश्वराविषयी निर्धार करावा. नाहीतर तुमच्या भाग्यात प्रतिबंध येईल १ मनामध्ये भाव धरून तुम्ही पंढरपुरच्या विठ्ठलाचे नाम स्मरा. २ या काळाने तुम्हांस खचविले आहे. म्हणून त्याच्या जाळ्यातून लौकर सोडवून घ्या. ३ यासाठी या विठ्ठलाच्या नामाचा गजर वाणीने मोठ्या स्वरेने करा. ४ नाहीतर जन्ममृत्यूंच्या फेऱ्यात सापडून भोवऱ्यात पडाल. ५ नानाप्रकारच्या लाभांचा हव्यास मनात धराल तर ही हाव तुम्हांस देशोधडीस लावील. ६ या देवाच्या चरणी चित्त अर्पण करून त्याचे सेवक आहोत असे म्हणा. ७ नाना प्रकारचे छंद अथवा कलाकुसरीचे वागणे यांनी काही हा थोहरी पावत नाही. ८ हा थोहरी सर्व जगाला जन्म देणारा असून सर्व ऐश्वर्यभोग व मुक्ती देणारा आहे. ९ असे असल्याने माझे माझे असे म्हणू नका उगाच ओझे का वागविता ? १० यांना तरून जाण्याची बुद्धीही नाही, अशी यांची बुद्धी का रे केला ? ११ या विठ्ठलाच्या ठिकाणी लहानथोर सर्व सारखेच असतात. १२ असा हा उदारांचा शिरोमणी विठ्ठल असून याचा ठसा सर्व त्रिभुवनावर आहे. १३ जो याविषयी डगमगतो, तो वाया जातो आणि त्याला थोर नाही तो गोतेच खातो. १४ जर घरच्या घरी चांगला लाभ होत असेल तर नित्य नेमापासून कधी ढळू नये. १५ हा देह नाशवंत असल्याने तो नाही असेच समजून तू राहा. १६ जो हरिकीर्तनात प्रेमाने नाचतो तोच खरा तरुण व भाग्यवत होय. १७ जो बाहु ठोकून पैलतीरास संसारनदीतून पोहत जातो तोच खरा शूर होय. १८ मनातील अभिमान जिवानिशी घालविणे याचेच नाव दया आहे. १९ धनधान्याची हाव धरून सतत कुटुंबाची सेवा करणे हीच मोठी नडणारी गोष्ट आहे. २० गोविंदाचे नाम घेणे हीच खरोखरी भाग्याची गोष्ट आहे. २१ परोपकार करण्यात शक्ती खर्च करा आणि कुणाचीही निंदा करणे टाळा २२ ज्या फळाची अथवा भोगाची इच्छा कराल त्याप्रमाणे देव पुरविणारा आहे. २३ वाणीने गोविंद गोविंद म्हणण्याचा छंद चांगला आहे २४ भविष्य काळात म्हातारपणी भजन भक्ती करू असे मुळीसुद्धा म्हणू नका. २५ देवाच्या प्राप्तीचा जो मार्ग सापडला आहे तो तो सोडू नका. यात आळस कराल तर तोंडात माती पडेल. २६ नारायणाची प्राप्ती करून घ्याल तर तुम्हास यश, कीर्ती व मानसन्मान मिळेल २७ जर दुजाभाव नाहीसा होईल तर तुमच्या प्रकाशापुढे सूर्याचे तेजही फिके पडेल. २८ शांत असतानाही नसलेला

२३१४ देवें देउळ सेविलें । उदक कोरडेंचि ठेविलें ॥ १ ॥
नव्हे मत गूढ उमानें कांहीं । तूं आपआपणापें पाहीं[1] ॥ २ ॥
पाठें पूर वोसंडला । सरिता सागर तुंबोनि ठेला ॥ ३ ॥
वांजेघरीं बाळ तान्हा । एक बाळी दों कानां ॥ ४ ॥
तुका म्हणे पैस । अनुभविया ठावा गोडीरस ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपाः– उमान–हुमान, उखाणा, पाठें–घाटात, पैस–मोकळी जागा.

अर्थः – स्वस्वरूपाचा त्याग करून देव देवळात गेल्यामुळे, मीपणाच्या अवस्थेस असल्यामुळे मायारूपी उदक म्हणजे पाणी नाहीसे होऊन कोरडेच उरले. १ हे माझे मत काही गूढ अथवा उखाण्यासारखे नाही. तू आपल्याच ठिकाणी आपलेपणाचा विचार करून पहा २ प्रथम देहभावाची जाणीव होऊन घाटात लहानसा पूर आला, तोच पुढे वाढला व त्यामुळे सर्व नद्या आणि समुद्र भरून गेले. ३ वांझ स्त्रीच्या घरी एक तान्हे मूल असून ते दोन कानांत एकच भिकबाळी घालते, हे जसे खोटे, तसेच मी, माझे, तुझे हे म्हणणेही खोटेच आहे. ४ तुकाराम महाराज म्हणतात, ज्याच्या चित्तात देहभावाचा अथवा मीपणाचा भाव नसून मोकळीच जागा सर्वत्र आहे अशा अनुभवी लोकांना या रसाची गोडी माहीत असते. ५

## लोहगांवीं कीर्तनांत मेलें मूल जीत झालें ते समयीं स्वामींनीं अभंग केले ते.

२३१५ अशक्य तों तुह्मां नाहीं नारायणा । निर्जीवा चेतना आणावया ॥ १ ॥
मागें काय जाणों स्वामीचे पवाडे । आतां कां रोकडे दावूं नये ॥ २ ॥
थोर भाग्य आम्ही समर्थाचे कासे । ह्मणवितों दास काय थोडें ॥ ३ ॥
तुका म्हणे माझे निवविावे डोळे । दावूनि सोहळे सामर्थ्याचे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपाः– चेतना–जिवंत, पवाडे–कीर्ती, रोकडे–प्रत्यक्ष, उघड.

अर्थ – नारायणा, मृत झालेल्या जीवाला परत जिवंत करणे यात तुम्हांला अशक्य असे काही नाही. १ मागील काळात स्वामींनी अशा प्रकारची कीर्ती केलेली आम्हांस माहीत आहे मग आता त्याप्रमाणे प्रत्यक्ष करून का दाखवू नये ? २ समर्थाच्या कासेला आम्ही लागलेलो आहोत, हे आमचे थोर भाग्य आहे. आम्ही देवाचेच दास आहोत, असे स्वतःस म्हणवून घेतो हे काय थोडे झाले ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, आपल्या सामर्थ्याचे सोहळे दाखवून माझे डोळे शांत करावेत. ४

२३१६ दाता तो एक जाणा । नारायणा स्मरवी ॥ १ ॥
आणीक नासिवंतें काय । न सरे हाय ज्यांच्यानें ॥ २ ॥
यावे तयां काकुलती । जे दाविती सुपंथ ॥ ३ ॥
तुका म्हणे उरी नुरे । त्याचे खरे उपकार ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– स्मरवी–स्मरण करवितो, हाय–तळमळ, दुःख, सुपंथ–चांगला मार्ग, उरी–कमतरता, नुरे–उरत नाही.

[1] कांहीं.

अर्थः– जो कोणी नारायणाचे स्मरण करविनो तोच एक दाता आहे असे समजावे १ ज्याच्या दानामुळे याचकांची तळमळ संपत नाही, त्या इतर नाहीशा होणाऱ्या वस्तूंची काय किंमत आहे ? २ जे साधुसंत सन्मार्ग दाखवितात, त्यांनाच तळमळीने शरण जावे ३ तुकाराम महाराज म्हणतात, ज्यांच्या देण्यांने काही कमतरता उरत नाही त्याचेच खरे उपकार समजावेत ४

विवरण –तुकोबांच्या आयुष्यातील एका चमत्काराचा उल्लेख या अभंगाच्या मागे उभा आहे तुकारामबुवा लोहगावी असताना एके दिवशी त्यांचे कीर्तन ऐन रंगात आले होते लोहगावचा जोशी त्यांच्या कीर्तनास नियमाने येत असे या दिवशी त्याचा मुलगा अतिशय आजारी असूनही तो भक्तिप्रेमाच्या नादाने बुवांच्या कीर्तनास आला त्याचे हे वागणे अर्थातच त्याच्या बायकोस पटले नाही. तिला नवऱ्याचा फार राग आला दुर्दैवाने थोड्याच वेळात तिच्या मुलाचा प्राण गेला त्याबरोबर दुःख व नवऱ्याविषयी संताप यांनी बेभान होऊन मृताच्या आईने मुलाचे ते प्रेतच कीर्तनात आणले व ती नवऱ्यास व तुकोबांस वाटेल तसे बोलू लागली मुलाची माया सोडून नवरा कीर्तनास कसा आला ? कीर्तनात सामर्थ्य असेल तर माझ्या मुलास उठवा, त्याला जिवंत करा बाईच्या चित्ताची व्याकुळता पाहून, पांडुरंगाची करुणा भाकून वरील दोन अभंग महाराजांनी म्हटले पुढील प्रसंगाचे वर्णन करताना तुकोबांनी म्हटले आहे 'टाळविणे मृदंग सुस्वर । विठ्ठलनामाचा होतसे गजर । टाळघा चुटक्या वाजती घोर । रंग अपार ओढवला ॥ एक प्रहर ऐशा रीतीं । सकळ श्रोते भजन करीती । तेणेंचि विसरूनि देहभ्राती । विदेह स्थिती तुकयाची ॥ तों कौतुक करी पंढरीनाथ । श्रोते परिसा सभाग्यवंत । कीर्तनामाजी टाकिलें प्रेत । परतले निश्चित प्राण त्याचे ॥' मेलेले मूल कीर्तनातील नामघोषाने व भक्तीच्या सामर्थ्याने परत उठून बसले सर्वांनी पुंडलीकवरद हरी विठ्ठल अशी गर्जना केली

## अलंकापुरीं ब्राह्मण धरणें बसून बेताळीस दिवस उपवासी होता त्यास दृष्टान्त कीं देहूस तुकोबापाशीं जाणें. ब्राह्मण स्वामीपें आला त्याबद्दल अभंग ॥ ३१ ॥

२३१७ श्रीपंढरीशा पतितपावना । एक विज्ञापना पायाशीं ॥ १ ॥
अनाथा जीवांचा तू काजकैवारी । ऐसी चराचरीं ब्रिदावळी ॥ २ ॥
न संगता कळे अंतरींचे गुज । आतां तुझी लाज तुज देवा ॥ ३ ॥
आळिकर ज्याचे करिसी समाधान । अभयाचे दान देऊनिया ॥ ४ ॥

अगा कृपावंता जीवन तूं दाता । अगा सर्वसत्ता धरितया ॥ ३ ॥
अगा सर्वजाणा अगा नारायणा । करुणावचना चित्त द्यावें ॥ ४ ॥
तुका ह्मणे नाहीं अधिकार तैसी । सरती पायांपाशीं केली मागें ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– वरा–पती, विश्वजनित्या–विश्वाला जन्म देणाऱ्या, सरती–जतन केले, रक्षण केले

अर्थ :–रखुमाईच्या पती पांडुरंगा, विश्वंभरा, अरे, तू फारच उदार आहेस. १ अगा कृष्णा, रामा, मेघश्यामा, विश्वास जन्म देणाऱ्या देवा, तू सर्वांत उत्तम आहेस. २ अरे देवा, तू कृपावंत असून सर्वांना जीवनदान देणारा दाता आहेस तू सर्व सत्ता धारण करणारा आहेत. ३ नारायणा, तू सर्व जाणणारा आहेस तू माझ्या करुण वचनांकडे लक्ष द्यावेस ४ तुकाराम महाराज म्हणतात, ज्यांना कसलाही अधिकार नाही, त्यांनाही तुम्ही आपल्या पायांशी आश्रय देऊन त्यांचे रक्षण केले आहे. ५

२३१९ नव्हें दास खरा । परि जाला हा डांगोरा ॥ १ ॥
यासी काय करूं आतां । तूं हें सकळ जाणता ॥ २ ॥
नाहीं पुण्यगांठी । जे[1] हें वेचूं कोणासाठीं ॥ ३ ॥
तुका ह्मणे कां उपाधी । वाढविली कृपानिधी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– डांगोरा–कीर्ती.

अर्थ :– देवा, मी तुमचा खरा दास नसूनही तशी कीर्ती मात्र माझी सर्व जगात झालेली आहे. १ याला मी आता करू तरी काय ? हे तू जाणतच आहेस. २ कोणासाठी पुण्य खर्च करावे तर तेही जवळ नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, कृपानिधी देवा, माझ्या मोठेपणाची अशी उगाचच उपाधी का वाढविली हो ? ४

२३२० तुजविण सत्ता । नाहीं वाचा वदविता ॥ १ ॥
ऐसें आह्मी जाणों दास । ह्मणोनि जालों उदास ॥ २ ॥
तुह्मी दिला धीर । तेणें मन झालें स्थिर ॥ ३ ॥
तुका ह्मणे आड । केलों मी हें तुझें कोड ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– कोड–कौतुक.

अर्थ :– देवा, माझी वाणी वदविण्याची सत्ता तुझ्याशिवाय इतरांत नाही. १ असे आम्ही दास जाणत असून सर्व गोष्टींविषयी उदास झालो आहोत. २ देवा, तुम्हीच धीर दिल्यामुळे माझे मन स्थिर झाले आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, तुम्ही मला आपल्या आड करून पाठीशी घातले हे तुमचेच कौतुक आहे. ४

२३२१ काय मी जाणता । तुह्माहूनि अनंता ॥ १ ॥
जो हा करूं अतिशय । कां तुह्मां दया नये ॥ २ ॥
काय तुज नाहीं कृपा । विश्वाचिया मायबापा ॥ ३ ॥
तुका म्हणे वाणी । माझी वदे तुह्मांहूनि ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा– अतिशय–जास्तपणा, अतिशयोक्ती.

अर्थ :– अनंता, तुमच्यापेक्षा काय मी अधिक जाणता आहे ? १ मी उगाच अतिशयपणा का म्हणून करावा ? तुम्हांला माझी दया का येत नाही ? २ विश्वाच्या मायबापा, तुम्ही माझ्यावर कृपा का करीत नाही ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, माझी वाणी काय तुमच्यापेक्षा जास्त बोलणारी आहे ? ४

---
१ देहे वेचूं.

२३२२ काय ज्ञानेश्वरीं उणें । तिहीं पाठविलें धरणें ॥ १ ॥
ऐकोनियां लिखित । म्हूण जाणवली हे मात ॥ २ ॥
तरी जाणे धणी । वदे सेवकाची वाणी ॥ ३ ॥
तुका म्हणे ठेवा[१] । होतां सांभाळावे देवा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – तिहीं–त्यांनी, म्हूण–म्हणून, मात–गोष्ट, धणी–स्वामी

अर्थ – श्रीज्ञानेश्वरांच्या जवळ कशाची कमतरता आहे म्हणून त्यांनी हा धरणेकरी माझ्याकडे पाठविला १ त्यांनी लिहिलेल्या पत्रातील मजकुर ऐकला, म्हणून तर ही गोष्ट मना समजली २ सेवकाची वाणी ऐकणारा हा स्वामी आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, परमार्थाचा हा ठेवा तुम्ही नीट सांभाळून ठेवा ४

२३२३ ठेवूनियां डोई । पायीं जालों उतराई ॥ १ ॥
कारण तें तुह्मी जाणा । मी तराळ नारायणा ॥ २ ॥
प्रसंगीं वचन । दिले तेंचि खावे अन्न ॥ ३ ॥
तुका म्हणे भार । तुह्मी जाणां थोडा फार ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – डोई–डोके, तराळ–सेवक, बातमी देणारा

अर्थ – देवा, तुमच्या पायांवर डोके ठेवून मी उतराई झालो आहे १ नारायणा, याचे कारण काय आहे ते तुमचे तुम्ही जाणा मी फक्त बातमी देणारा तराळ आहे २ प्रसंग येईल त्याप्रमाणे बोलणे आणि घाल ते अन्न खाणे एवढेच मला समजते ३ तुकाराम महाराज म्हणतात आमचे थोडेफार ओझे तुम्ही जाणीतच आहात ४

## उपदेश अभंग ॥ ११ ॥

२३२४ नको काहीं पडों ग्रंथाचिये भरीं । शीघ्र व्रत करीं हेंचि एक ॥ १ ॥
देवाचिये चाडें आळवावे देवा । ओस देहभावा पाडोनिया ॥ २ ॥
साधनें घालिती काळाचियें मुखीं । गर्भवास सेखीं न चुकती ॥ ३ ॥
उधाराचा मोक्ष होय नव्हे ऐसा । पतनासी इच्छा आवश्यक ॥ ४ ॥
रोकडी पातली अगसगें जरा । आतां उजगरा कोठवरि ॥ ५ ॥
तुका म्हणे घालीं नामासाटीं उडीं । पांडुरंग थडी पाववील ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – चाडें–इच्छेने, सेखीं–शेवटी, जरा–म्हातारपण, उजगरा–जागृत, जागे, थडी–तीर, पैलतीर

अर्थ – तू ग्रंथाचे अध्ययन करण्याच्या खटपटीत उगाच पडू नकोस पुढे सांगितलेले एक व्रत मात्र तू नियमाने कर १ देवाच्या इच्छेने देवास आळवावे देहभावास दूर करून देवाची प्रार्थना करावी २ यासेरीज इतर प्रकारची साधनें तुला काळाच्या मुखात नऊन सोडतील, आणि शेवटी तुझा गर्भवास काही चुकणार नाही ३ मेल्यानंतर मोक्ष मिळेल असे उधारीचे सांगणे म्हणजे मोक्ष नसल्यासारखाच आहे, म्हणून मुद्दाम पतनाची इच्छा का धरतोस ? ४ अगसंगाने उघडउघड वृद्धत्व आले आहे आता तुला जागे तरी कुठवर करू ? ५ तुकाराम महाराज म्हणतात, हा पांडुरंग स्वतः ज्या नामासाठी भवनदीत उडी घालून तुला पैलतीरावर पोचवील ६

---

१ देवा होता सांभाळी हा ठेवा

२३२५ नाहीं देवापाशीं मोक्षाचे गाठोळें । आणूनि निराळें द्यावे हातीं ॥ १ ॥
इंद्रियांचा जय साधुनियां मन । निर्विषय कारण असे तेथें ॥ २ ॥
उपास पारणीं अक्षराची आटी । सत्कर्मा शेवटीं असे फळ ॥ ३ ॥
आदरें संकल्प वारीं अतिशय । सहज तें काय दुःख जाण ॥ ४ ॥
स्वप्नींच्या घायें विवळसी वाया । रडे रडतियासवें मिथ्या ॥ ५ ॥
तुका म्हणे फळ आहे मूळापाशीं । शरण देवासीं जाय वेगीं ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – आटी–खटपट, प्रयत्न, वारीं–दूर करावेत, साडून द्याव

अर्थ – काही निराळेपणाने आणून हातावर ठेवावे असे मोक्षाचे गाठोडे देवाजवळ नाही १ विषयाकडे ओढल्या जाणाऱ्या विषयाना सावरावे, मन निर्विषय करावे, याच गोष्टी मोक्षरूपाच्या आहेत २ नाना प्रकारचे उपास व्रताची पारणी, अक्षरे घोकण्याची खटपट इत्यादींपासून शेवटी असाच सत्कर्माची फळे मिळत राहातात. ३ मोठ्या आदराने नाना प्रकारचे संकल्प करण्याचे सोडून द्यावे, त्याचा सोस सोडावा, म्हणजे दुःखाचा नाश सहज होईल असे समजावे ४ स्वप्नात झालेल्या घायाच्या दुःखामुळे व्यर्थच विवळतोस, उगाचच रडतोस ५ तुकाराम महाराज म्हणतात अरे तू मूळच्या देवासच त्वरित शरण जा म्हणजे तेथील सर्व फलप्राप्ती तुला होईल ६

विवरण –या अभंगात तुकाराम महाराज मोक्षाविषयीची भ्रामक कल्पना दूर करून सत्यस्वरूपाच्या मोक्षाचे स्वरूप स्पष्ट करीत आहेत नानाप्रकारची कर्मे, साधन, व्रते, तीर्थयात्रा केल्यानंतर देव कुठून दुसरीकडून मोक्षाचे गाठोडे आणून देतो असे नाहीं, तर मोक्ष आपल्या वर्तणुकीतच आहे विषयाकडे धावणाऱ्या मनास जिंकणे आणि ते निर्विषय करणे यातच खरा मोक्ष आहे वास्तविक पाहाता मोक्षाची कल्पना सापेक्ष आहे बद्धत्वाच्या कल्पनेखेरीज मोक्षाच्या कल्पनेस थारा नाही आणि बद्धत्वाच्या कल्पनेसही आधार वाहीच नाही इंद्रियादिकांच्या विषयात सापडणे हेच मुख्यत बद्धत्वाचे लक्षण मानतात ‘पदार्थवासनादार्ढ्यं बंध इत्यभिधीयते’ जगातील पदार्थांबद्दलची वासना दृढ होणे हाच बंध यातून सुटका झाली की मोक्ष वेगळा नाही अशा प्रकारच्या वासनांचा त्याग करणे हाच मोक्ष होय ‘अशेषेण परित्यागो वासनानां य उत्तम’ संपूर्ण वासनांचा त्याग म्हणजे उत्तम मोक्ष होय आणि हा मोक्ष कुठून देवापासून अथवा आकाशातून मिळवावयाचा नसतो तर हा एक चित्ताचा धर्म आहे ‘न मोक्षो नभस पृष्ठे न पाताले न भूतले । मोक्षो हि चेतो विमलं सम्यग्ज्ञानविबोधितम्–’ मोक्ष हा कुठे आकाशात, पाताळात किंवा पृथ्वीवर आहे असे नाही, तर सम्यक् ज्ञानाच्या योगाने आत्मस्वरूपात जाऊन पोचलेल्या मनाची निर्मल स्थिती म्हणजे मोक्ष होय बद्धत्वाच्या कल्पनेची सुटका हीच मोक्षाची अवस्था ज्याचे चित्त शीतल असते तो मुक्त व ज्याचे चित्त संतप्त तो बद्ध ‘अत शीतलचित्तो हि मुक्त इत्यभिधीयते ॥ बंध संतप्तचित्तेति’ आणि चित्ताची शीतलावस्था वासनात्यागाने होत असते आणि हा मोक्ष मधाच्या गोडीप्रमाणे चाखणारासच समजतो ‘आत्मसंवेद्य एवासौ मध्वद्यास्वादसौख्यवत् ॥’

योगवासिष्ठात वरीलप्रमाणे बंधत्व व मोक्षत्व यांच्या कल्पना स्पष्ट केल्या आहेत भगवद्गीतेतही ‘संनियम्येन्द्रियग्रामं सर्वत्र समबुद्धय । ते प्राप्नुवन्ति मामेव सर्वभूतहिते रता ॥’ सर्व इंद्रिये आवरून सर्वत्र समबुद्धी होऊन जे राहातात ते सर्व भूतांच्या हितात गढलेले लोक मलाच येऊन पोचतात असे गीतेत प्रतिपादन आहे आणि सर्व इंद्रियांना वगैरे आवरायचे, चित्त ईश्वराला वगैरे समर्पायचे, त्याच्या ठिकाणी बुद्धी स्थिर करायची, अभ्यास करायचा, कर्माचा संन्यास करायचा कर्मफलाचा त्याग करायचा, इत्यादी विवेचन भगवद्गीतेत आलेले आहे या सर्व चर्चेचा मथितार्थ असा की, मोक्षाचे गाठोडे देव कुठून दुसरीकडून आणून देणार नसून तो एक आपल्याच मनाची सर्वोत्तम अवस्था आहे.

२३२६ त्यजिले भेटयी आणूनि वासना । दायिल्याचे जना काय काज ॥ १ ॥
आळवावे देवा माकूनि करुणा । आपुलिया मना साक्ष करीं ॥ २ ॥
नाहीं जावें यावें दुरूनि लागत । आहे साक्षभूत अंतरींचा ॥ ३ ॥
तुका म्हणे हा आहे कृपासिंधु । तोडी भवबंधु तात्काळिक ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – त्यजिलें–जें टाकून दिले आहे, काज–कारण

अर्थ – जे टाकून दिले आहे त्याची इच्छा पुन पुन केली तर त्याची प्राप्ती आपणांस होते मग त्याच केल्याची फुशारकी लोकांत मारण्याचे काय कारण आहे ? १ त्यापेक्षा आपल्या मनास साक्षी करून देवास करुणा भाकून आळवावे हे उत्तम नाही का ? २ यासाठी कोठे दूर जावे यावे लागत नाही याच अंतरींचा प्रभू साक्ष आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, हा कृपेचा सागर तात्काळ भवसागराचे बंधन तोडून टाकण्यास समर्थ आहे ४

२३२७ गोविंद गोविंद । मना लागलिया छंद ॥ १ ॥
मग गोविंद ते काया । भेद नाहीं देवा तया ॥ २ ॥
आनंदलें मन । प्रेमें पाझरती लोचन ॥ ३ ॥
तुका म्हणे आळी । जेवी नुरेचि वेगळी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – काया–शरीर, नुरे–उरत नाही

अर्थ – गोविंद गोविंद असा एकसारखा मनास जर छंद लागेल तर १ त्यामुळे आपला देहच गोविंदरूप होऊन जाईल आणि मग देव व देह यांत काहीच भेद उरणार नाही २ मन आनंदाने भरून जाईल आणि डोळे प्रेमाश्रूंनी पाझरतील ३ तुकाराम महाराज म्हणतात, ज्याप्रमाणे आळी पतंगाचे ध्यान करता करता पतंगच होऊन जाते, निराळी उरत नाही तशी तुमची अवस्था होईल ४

२३२८ ज्याचें जया ध्यान । तेंचि होय त्याचें मन ॥ १ ॥
म्हणऊनि अवघें सारा । पांडुरंग दृढ धरा ॥ २ ॥
सम खूण ज्याचे पाय । उभा व्यापक विटे ठाय ॥ ३ ॥
तुका म्हणे नभा । परता अनूचा ही गाभा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – सारा–दूर करा, नभापरता–आकाशाहून अनूचाही–अणूचा सुद्धा

अर्थ – ज्याला ज्या विषयाचे ध्यान असते तेच रूप शेवटी त्याच्या मनातून साकार होते, त्याच रूपास तो पोचतो १ म्हणून इतर सर्व गोष्टींचा पसारा दूर सारा व या पांडुरंगास मनातून दृढ भावाने धारण करा २ हा पांडुरंग समचरण जोडून विटेवर उभा आहे तोच सर्व जगाला व्यापून आहे अशी खूणगाठ मनात असू द्या ३ तुकाराम महाराज म्हणतात, असा हा देव आकाशाहून थोर असूनही अणुरेणूच्या गाभ्यातही तोच असतो ४

विवरण–या अभंगात तुकारामबुवांनी भक्तिमार्गातील एक सूक्ष्म सिद्धान्त स्पष्ट केलेला आहे ज्या विषयाचे आपले मन ध्यान करते त्या विषयाशीच ते मग एकरूप होते ' आळी करी भृंगध्यान । होई भृंगचि आपण ' अशीच अवस्था भक्ताची होत असते ज्याला ज्याचे ध्यान तेंच त्याचे मन होऊन जाते हा बुवांचा सिद्धान्त आहे या प्रकारच्या तन्मयतेचे एक चांगले उदाहरण म्हणजे गोपिकांचे दिले जाते त्यांची वृत्ती पूर्णपणे कृष्णरूप होऊन

गेलेली होती. कारण त्याचेच ध्यान अखंडपणे त्या करीत असत. 'तन्मनस्कास्तदालापास्तद्विचेष्टास्तदात्मिकाः । तद्गुणानेव गायंत्यो नात्मागाराणि सस्मरुः ॥' त्यांची मने, त्यांची भाषणे, त्यांच्या चेष्टा सर्वच कृष्णमय झाल्या असून त्या तन्मय झाल्या होत्या व त्याचेच गुणानुवाद गात असताना त्याना आपल्या घराचेही भान उरलेले नव्हते.

२३२९ पाहुनियां ग्रंथ करावें कीर्तन । तेव्हां आलें जाण फळ त्याचें ॥ १ ॥
नाहीं तरि वांयां केली तोंडपिटी । उरी ते शेवटी उरलीसे[1] ॥ २ ॥
पढोनियां वेद हरिगुण गावे[2] । ठावें तें जाणावें तेव्हां जालें ॥ ३ ॥
तपतीर्थाटणें तेव्हां कार्यसिद्धि । स्थिर राहे बुद्धि हरिच्या नामीं ॥ ४ ॥
यागयज्ञादिक काय दानधर्म । तरि फळ नाम कंठीं राहे ॥ ५ ॥
तुका म्हणे नको काबाडाचे भरी । पडों सार धरीं हेंचि एक ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा :– तोंडपिटी–फुकट बडबड, काबाडाचे–कष्टाचे.

अर्थ:– अनेक प्रकारचे ग्रंथ पाहून जर कीर्तन केले तरच ते ऐकण्यासारखे, पाहाण्यासारखे होते. १ तरच ते फलद्रूप होईलच; नाहीतर तोंडाने केलेली बडबड व्यर्थच होईल, शेवटी नुसती बडबडच उरेल. २ चारही वेद पढून जर हरीचे गुण गाइले तरच त्यांचा अर्थ समजला असे जाणावे. ३ तपश्चर्या, तीर्थयात्रा, इत्यादींनी कार्यसिद्धी केव्हा होईल ? तर श्रीहरीच्या नामस्मरणात बुद्धी स्थिर राहील तरच. ४ यज्ञयागादी कर्मे, दानधर्म कितीही केले तरी जर प्रभुनाम कंठी असेल तरच त्याचे फळ मिळेल. ५ तुकाराम महाराज म्हणतात, उगाच व्यर्थ खटपटीच्या अथवा श्रमाच्या भरीस पडू नकोस. सर्व साधनांचे सारभूत तत्त्व एक हरिनाम आहे हेच ध्यानी धर ६

२३३० सुखें खावें अन्न । त्याचें करावें चिंतन ॥ १ ॥
त्याचें दिलें त्यासी । पावे फळ आपणासी ॥ २ ॥
आहे हा आधार । नाम त्याचें विश्वंभर ॥ ३ ॥
नाहीं रिता ठाव । तुका म्हणे पसरीं भाव ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– रिता–रिकामा, ठाव–स्थान.

अर्थ :– सुखाने त्याचे चिंतन करीत करीत अन्न खावे, अथवा अन्न खावे आणि त्याचे चिंतन सुखाने करीत असावे. १ ज्याचे अन्न त्यालाच अर्पण केल्याचे फळ मात्र आपणांस मिळेल. २ यास आधार आहे. कारण तो विश्वाचे पालन करणारा विश्वंभर आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, त्याच्या शिवाय कुठेही रिकामे स्थान नाही. अशा भावाचा सतत प्रसार करावा ४

२३३१ संकोचोनि काय जालासी लहान । घेईं अपोशण ब्रह्मांडाचें ॥ १ ॥
करोनि पारणें आंचवें संसारा । उशीर उशिरा लावूं नको ॥ २ ॥
घरकुलानें होता पडिला अंधार । तेणें केलें फार कासावीस ॥ ३ ॥
झुगारूनि दुरी लपविलें काखे । तुका म्हणे वाखे कौतुकाचे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– अपोशण–एकाच घोटात प्राशन करण्याचा विधी, वाखे–चेष्टा, चमत्कार.

अर्थ :– तू चित्ताचा संकोच करून एवढा लहान का होतोस ? देवाला आपल्या चित्तात ठेवून सर्व ब्रह्माण्डास एकाच वेळी प्राशन कर ना. १ अशा प्रकारे संतुष्ट होऊन संसारास सोडून द्यावे. या कामी उशीराने

१ उरली आहे, २ गावे.

उशीर वाढवू नये उगाच. २ मी, माझे लहानसे घर, या भावनेच्या अज्ञानाने अंधार पडलेला होता. त्यामुळे तू फारच कासावीस झालेला होतास ३ तुकाराम महाराज म्हणतात, आई बाळाच्या समाधानासाठी 'एखादा पदार्थ मुठीतून दिल्याचे दाखवून तो परत काखेत लपवून ठेविते. त्याचप्रमाणे या परमेश्वराच्या चमत्कारिक चेष्टा आहेत.४

२३३२ माझ्या बापें मज दिधलें भातुकें । म्हणोनि कवतुकें क्रीडा करीं ॥ १ ॥
केली आळी पुढें बोलिलों वचन । उत्तम हें ज्ञान आलें त्याचें ॥ २ ॥
घेऊनि विभाग जावें लवलाह्या । आलेति या ठाया आपुलिया ॥ ३ ॥
तुका म्हणे ज्ञानदेवीं समुदाय । कराया मी पाय येइन वंदू ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- भातुकें-प्रेमाचा खाऊ, आळी-हट्ट, लवलाह्या-लौकर.

अर्थ - अरे, माझ्या बापाने मला प्रेमाचा खाऊ दिलेला आहे, म्हणूनच मी कौतुकाने येथे क्रीडा करीत आहे. १ मी हट्टाने, लाडाने वागलो आणि त्याच्या पुढे बोललो; त्यामुळें त्याचे उत्तम ज्ञान मला प्राप्त झाले आहे. २ तू ज्या आपल्या स्थानावरून आला आहेस, त्याच ठिकाणी आपल्या वाटणीचा वाटा घेऊन त्वरित तू परत जा. ३ तुकाराम महाराज म्हणतात, ज्ञानदेवांच्या ठिकाणी अनेक भक्तांचा समुदाय आहे. मीही त्या ठिकाणी येऊन त्यांच्या पायांस वंदन करीन ४

२३३३ ज्ञानियांचा गुरु[1] राजा महाराव । म्हणती ज्ञानदेव ऐसे तुम्हां ॥ १ ॥
मज पामरा हे काय थोरपण । पायींची वाहाण पायीं बरी ॥ २ ॥
ब्रह्मादिक जेथें तुम्हां वोळगणे । इतर तुळणे काय पुरे ॥ ३ ॥
तुका म्हणे नेणे युक्तीची ते खोली । म्हणोनि ठेविली पायीं डोई ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- पामरा-गरिबास, वोळगणें-शरण येतात.

अर्थ - आपण ज्ञानी लोकांचा श्रेष्ठ गुरुराज असल्याने आपणांस ज्ञानदेव म्हणतात. १ मग मला गरिबास हा थोरपणाचा मान का दिला ? पायांतील वहाण पायांतच बरी दिसते २ ब्रह्मादिक देव तुम्हांस शरण येतात, मग इतर देवांची तुलना तुम्हांस कशी पुरी पडणार ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी काही इतर कलाकुसरीची अथवा रीतिभातीची खोली जाणीत नाही मी फक्त तुमच्या पायांवर माझे मस्तक ठेविले आहे ४

२३३४ बोलिलों लेंकुरें । वेडीं वाकुडीं उत्तरें ॥ १ ॥
करा क्षमा अपराध । महाराज तुम्ही सिद्ध ॥ २ ॥
नाहीं विचारिला । अधिकार म्या आपुला ॥ ३ ॥
तुका म्हणे ज्ञानेश्वरा । राखा पायांपें किंकरा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा - पायापें-पायापाशी, किंकरा-चाकरास

अर्थ :- लेकरे वेडीवाकडी उत्तरे बोलतात, तसा मी बोललो आहे १ ज्ञानेश्वरमहाराज, मला याबद्दल क्षमा करा तुम्ही सिद्ध आहात माझा अपराध लक्षात आणू नका २ मी तुमचा अधिकार न विचारताच असे बोलत आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, ज्ञानेश्वरा, मला चाकराला आपल्या पायांजीच आश्रय द्या. ४

२३३५ काय तुम्ही जाणा । करूं अव्हेर नारायणा ॥ १ ॥
तरी या लटिक्याची गोही[2] । निवडली दुसरे ठायीं ॥ २ ॥
कळों अंतरींचा गुण । नये फिटल्यावांचून ॥ ३ ॥

---

१ राजा गुरु महा

आणिलें अनुभवा । जनाच्या हें ज्ञानदेवा ॥ ४ ॥
आणीक कोणी मिती । त्यांच्या चिंतने विश्रांति ॥ ५ ॥
तुका म्हणे बीज पोटीं । फळ तैसेचि सेवटीं ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – मोही–माळ

अर्थ – नारायणा, तुम्ही अव्हेर करण्याचे कधी जाणता काय ? १ लटकेपणाची साक्ष दुसरीकडे उघडी पडतेच २ अंतःकरणातील गुण मोकळे झाल्याशिवाय, प्रकट झाल्याशिवाय समजून येत नाहीत ३ ज्ञानेश्वर महाराजांनी हे लोकांच्या अनुभवास आणून दिले आहे ४ त्यांच्या चिंतनाच्या योगाने दुसरे कसलेही भय उरत नाही उलट मनास मात्र समाधान मिळते ५ तुकाराम महाराज म्हणतात, बीजाच्या अंगी जसा गुणधर्म असेल त्याप्रमाणेच शेवटी त्यापासून फळ मिळेल ६

२३३६ अविश्वासीयाचे शरीर सुतकी । विटाळ पातकी भेद वाही ॥ १ ॥
काय त्याचा वेल जाईल मांडवा । होता तैसा ठेवा आला पुढें ॥ २ ॥
मातेचा संकल्प व्हावा राजबिडा । कपाळींचा[1] धोंडा उभा ठाके ॥ ३ ॥
तुका म्हणे जैसा कुचराचा दाणा । परिपाकीं[2] अन्ना न मिळे जैसा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – ठेवा–संचिताचा भाग, कुचर–न शिजणारा दाणा

अर्थ – परमार्थावर अथवा ईश्वरावर ज्याचा विश्वास नाही, त्याचे शरीर सुतकी आहे असा पातकी मनुष्य अंतःकरणात भेदभावाचा विटाळ वागवीत असतो १ अशा माणसाचा वंशविस्तार वाढेल का कधी ? जसे पूर्वसंचित असेल तसा भाग वाटयास येत असतो २ आपले मूल राजबिंडे व्हावे अशी आईची फार इच्छा असते, पण प्रारब्धानुसार तिच्या पुढे निवळ धोंडाच उभा राहतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, ज्याप्रमाणे एखादा कुचर दाणा स्वयंपाकाच्या वेळी टणक होऊन वेगळा निघतो, त्याप्रमाणे तोही खोटाच समजावा ४

विवरण –ज्याचा देवावर, धर्मावर विश्वास नाही त्याची अधोगती होईल तो पातकीच राहील गीतेत म्हटले आहे, ' अश्रद्दधानाः पुरुषा धर्मस्यास्य परन्तप । अप्राप्य मां निवर्तन्ते मृत्युसंसारवर्त्मनि ' धर्मावर श्रद्धा न ठेवणारे पुरुष हे परंतपा, मला येऊन न मिळता मृत्यूने युक्त असणाऱ्या संसाराच्या मार्गात परत येतात जो अश्रद्धावान आहे त्याला कोणतेच ज्ञान नीट मिळणार नाही 'अज्ञश्चाश्रद्दधानश्च संशयात्मा विनश्यति । नायं लोकोऽस्ति न परो न सुखं संशयात्मनः ' पण ज्याला स्वतःला ज्ञान नाही आणि श्रद्धाही नाही, असा संशयखोर मनुष्य नाश पावतो त्याला धड हा लोक नाही परलोक नाही आणि सुखही नाही

विवरण–तपश्चर्या ही फलाची इच्छा न ठेवता करावी. तपाचे सात्त्विक, राजस व तामस असे प्रकार सांगितले आहेत. फलाची इच्छा न ठेवता उत्कट श्रद्धेने व योगयुक्त बुद्धीने केलेले तप सात्त्विक होय. आपला सत्कार, मान, पूजा अशा दभाने केलेले तप राजस होय, आणि ' मूढग्राहेणात्मनो यत्पीडया क्रियते तपः । परस्योत्सादनार्थं वा तत्तामसमुदाहृतम् ' वेड्या आग्रहाने आपल्याला पीडा करणारे किंवा जारणमारणादी कर्मांनी लोकांना नाडविणारे तप तामस असते. आणि या तामस तपाकडेच पुष्कळांची वृत्ती वळते. असे लोक मूर्खपणाने, स्वतःच्या शरीरास उगाचच नष्ट देतात कारण मुळातच त्यांची वृत्ती तामसी असल्याने त्यांचे तपही तामसी व पापमार्गास प्रवृत्त करणारे घडते. या तामसी तपाचे वर्णन करताना ज्ञानेश्वरांनी म्हटले आहे की, अशा तपात पंचाग्नीच्या ज्वाळा शरीराला लावल्या जातात, मस्तकावर गुगूळ जाळले जातात, व पाठीस गळ घातले जातात, रखरखीत निखाऱ्यांनी अंग जाळतात. झाडाला टांगून, तोंड खाली करून धुराचे घास घेतले जातात. थंडीच्या दिवसांत गळ्यापर्यंत थंड पाण्यात उभे राहातात, जिवंतपणी अंगाच्या मांसाचे लचके तोडतात. म्हणूनच ' ऐसो नानापरी हे काया । घाय सूतों पै धनंजया । तप कीजे नाशावया । पुढीलातें ' स्वतःच्या शरीरावर घाव घालून दुसऱ्याचा घात करण्यासाठी तप करणारे तामसी होत. पर्वतावरून सुटलेला धोंडा जसा आपण स्वतः फुटून तुकडे तुकडे होतो व आड येणाऱ्या दगडाचाही चुरा करतो, त्याप्रमाणे हा तामसी स्वतः नष्ट होण्याच्या प्रयास असतोच, पण इतरांनाही नाहीसे करतो.

२३३८ हरिकथेवांचून इच्छिती स्वहित । हरिजन चित्त न घला तेथें ॥ १ ॥
जाईल भंगोन आपुला विश्वास । होईल या नास कारणांचा ॥ २ ॥
ज्याचिया बैसावें भोजनपंगती । त्याचिया संगती तैसें खावें ॥ ३ ॥
तुका म्हणे काय जालेति जाणते । देवा ही परते थोर तुम्ही ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– कारणांचा–कार्याचा. परते–पेक्षा.

अर्थ–हरिकथा न करता स्वतःचे हित होईल असे जे इच्छितात, त्यांच्याकडे हरिभक्तांनी आपले लक्ष जाऊ देऊ नये. १ कारण असे झाले तर हरिकथेवरील त्यांचा विश्वास दुभंगून जाईल आणि त्यामुळे कार्याचा मात्र नाश होईल. २ ज्याच्या पंगतीस भोजनासाठी बसावे त्याच्या प्रमाणेच खावे लागते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, तुम्ही देवापेक्षाही विशेष शहाणे झालात की काय ? ४

२३३९ सेवकें करावें स्वामीचें वचन । त्यासी हुंतुंपण कामा नये ॥ १ ॥
घेईल जीव कां सारील परतें । भंगलिया चित्तें सांदी[1] जेना ॥ २ ॥
खद्योतें दावावी रवी केवीं वाट । आपुलेंचि नीट उसंतावें ॥ ३ ॥
तुका म्हणे तो ज्ञानाचा सागर । परि नेंदी अगर भिजों भेदें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – परतें–दूर, खद्योतें–काजव्यानें, उसंतावें–जावे.

अर्थ – सेवकाने आपल्या धन्याच्या वचनाप्रमाणे वागावे. तेथे मी-तूपणाचा काही उपयोग होण्यासारखा नसतो. १ तो आपला जीव घेईल की कामावरून दूर सारील, पण त्याची आज्ञा मोडू नये. कारण एकदा चित्त भंगले गेले की ते पुन साधले जात नाही. २ एखाद्या काजव्याने सूर्यास वाट कशी दाखवावी ? आपल्या सरळ मार्गाने जावे हे बरे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, ज्ञानेश्वर हे ज्ञानाचे सागर आहेत. भेदभावाच्या ओलाव्याने ते कधी हृदय ओलावू देत नाहीत ४

२३४० जयाचिये द्वारीं सोन्याचा पिंपळ । अंगीं ऐसे बळ रेडा बोलें ॥ १ ॥
करील तें काय नव्हे महाराज । परि पाहे बीज शुद्ध अंगीं ॥ २ ॥

---

[1] सादी जना.

जेणें हे घातली मुक्तीची गवादी । मेळविलो मादी वैष्णवाची ॥ ३ ॥
तुका म्हणे तेथें सुखा काय उणें । राहे समाधानें चित्ताचिया ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – गवादी-अन्नछत्र, मांदी-समुदाय, मेळावा

अर्थ – ज्या ज्ञानेश्वरांच्या दारात सोन्याचा पिंपळ आहे व रेड्याच्या मुखातून वेद बोलविण्याचे सामर्थ्य ज्यांच्या अंगात आहे १ असे ज्ञानेश्वर महाराज काय म्हणून करणार नाहीत ? परंतु ते अंगी असणाऱ्या शुद्ध बीजाची परीक्षा करतात २ या ज्ञानेश्वरांनी मुक्तीचे अन्नछत्र घालून वैष्णवांचा मेळावा जमा केला आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, त्यांच्या ठिकाणी सुखाला कोणती उणीव आहे ? त्यांच्या आश्रयाने चित्तास समाधान मिळते ४

*विवरण – आळंदीस समाधिस्थ झालेल्या श्रीज्ञानेश्वरांचे माहात्म्य व त्यांचे वैभव तुकोबांनी वरील काही* अभंगातून वर्णन केले आहे ज्ञानदेवांनी सर्व वर्णांसाठी मुक्तीचे अन्नछत्र घातले असे सांगून तुकोबांनी त्यांचा यथार्थ गौरव केला आहे ज्ञानेश्वरांनी वैष्णवांचा मेळावा जमा केला, हेही तुकोबांचे निरीक्षण मार्मिक आहे संस्कृतच्या बंदिस्त चौकटीत सामावलेले ज्ञान ज्ञानेश्वरांनी भगवद्गीतेवर भाष्य मराठीमध्ये लिहून सर्व जातींना खुले *केले त्यामुळेच त्यांच्या भोवती अठरापगड जातींचे लोक जमा झाले,* 'सर्वांभूती भगवद्भाव' हे वारकरी पंथाचे एक महत्त्वाचे सूत्र असल्यामुळे ज्ञानेश्वरांच्या या अन्नछत्रास' फारच महत्त्व आले या प्रभावी व्यक्तिमत्वा-भोवती त्या काळी प्रत्येक जातीत एक एक संत निर्माण झालेला दिसून येईल नामदेव शिंपी, सावता माळी, गोरा कुंभार, सेना न्हावी, नरहरी सोनार चोखा महार, दासी जनी ही 'वैष्णवांच्या मांदी' मधील मुख्य मंडळी होत *या काळी विठोबा जणु लेकुरवाळा झालेला दिसतो या लेकुरवाळ्या विठ्ठलाचे एक मनोहर चित्र* जनाबाईने काढले आहे ते असे

' विठो माझा लेकुरवाळा । संगें गोपाळांचा मेळा ॥ १ ॥ निवृत्ति हा खांद्यावरी । सोपानाचा हात धरी ॥२॥ पुढे चाले ज्ञानेश्वर । मागे मुक्ताई सुंदर ॥ ३ ॥ गोरा कुंभार मांडीवरी । चोखा जीवा बरोबरी ॥ ४ ॥ बंका कडियेवरी । नामा करांगुळी धरी ॥ ५ ॥ जनी म्हणे गोपाळा । करी भक्तांचा सोहळा ॥ ६ ॥

२३४१ बहुतां छंदाचे बहु वसे जन । नये वांटू मन त्यांच्या संगें ॥ १ ॥
करावा जतन आपुला विश्वास । अंगा आला रस आवडीचा ॥ २ ॥
सुखाची समाधि हरिकथा माउली । विश्रांति साउली सिणलियांची ॥ ३ ॥
तुका म्हणे बुडे बांधोनि दगड । तेथें काय कोड धांवायाचें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – छंदांचे-मतांचे, आवडीचा-प्रेमाचा, कोड-फायदा

अर्थ – लोक अनेक मतांचे असतात त्यांच्या नादी लागून आपण आपले मन वाटू देऊ नये १ आपल्या ठिकाणी भक्तिसुखाविषयी प्रेमाचा जो विश्वास निर्माण झालेला आहे त्याचे जतन करावे २ हरिकथा माउली ही सुखाची समाधी असून जे दमलेभागलेले आहेत त्यांच्यासाठी विश्रांतीची सावली आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, गळ्यात दगड बांधून जे बुडण्याच्या तयारीत आहेत, त्यांना वाचविण्यासाठी धावत जाण्यात काय फायदा आहे ? ४

२३४२ हरिकथे नाहीं । विश्वास ज्याचे ठायीं ॥ १ ॥
त्याची वाणी अमंगळ । कान उंदराचें बीळ ॥ २ ॥
सांडुनि हा रस । करिती आणीक सायास ॥ ३ ॥
तुका म्हणे पितरीं । त्यांचीं गेलीं किती ऐसीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा– सायास–प्रयत्न, खटपट पिसीं–वेडे लोक

अर्थ – हरिकथेविषयी ज्याच्या मनात विश्वास नाही १ त्याची वाणी अमंगल असून जणू काय ती उदराची बिळेच होत २ हा हरिकथेचा रस सोडून इतर साधनांची खटपट काही लोक करतात ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशी किती तरी वेडी माणसे भलत्या नादी लागून वाया गेली आहेत ४

२३४३ प्रेम अमृताची धार । वाहे देवा[1] ही समोर ॥ १ ॥
उर्ध्ववाहिनी हरिकथा । मुगुटमणि सकळा तीर्थां ॥ २ ॥
शिवाचे[2] जीवन । जाळी महादोष कीर्तन ॥ ३ ॥
तुका म्हणे हरि । इची स्तुति वाणी थोरी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – ऊर्ध्ववाहिनी–वर वाहणारी

अर्थ – हरिकथेचे प्रेम ही अमृताची धार असून देवाच्या समोर ती वाहात असते. १ हरिकथेचे तीर्थ वर वाहात जाणारे असून ते सव तीर्थांचे मुकुटमणी आहे २ कीर्तन हे जीवाचे जीवन असून या कीर्तनश्रवणामुळे महादोषांचे पातक नष्ट होते ३ तुकाराम महाराज म्हणतात, या कथेची स्तुती प्रत्यक्ष श्रीहरीसुद्धा करतात ४

२३४४ आता माझ्या मना । इची घडो उपासना ॥ १ ॥
ऐसे करीं पांडुरंगा । प्रेम वोसंडेसे अंगा ॥ २ ॥
सर्व काळ नये । वाचे विट आड भये ॥ ३ ॥
तुका वैष्णवासंगती । हेंचि भजन[3] पंगती ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – वोसंडेसें–भरून जाईल असे

अर्थ — आता माझ्या मनाकडून याच हरिकथेची उपासना घडावी १ पांडुरंगा, तू आता या कथेविषयी प्रेम अंगभर भरून जाईल असे कर २ सर्वकाळ जरी या हरिकथेचें सेवन केले तरी तिचा वीट येणार नाही वा भयही वाटणार नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, वैष्णवांच्या संगतीत हरिकथेचेंच भोजन होत असते ४

२३४५ उपास करांडी । तिहीं करावीं[4] बापुडीं ॥ १ ॥
आम्ही विठोबाचे दास । चिंता मुगारिली आस ॥ २ ॥
भक्तीच्या उत्कर्षे । नाहीं मुक्तीचे ते पिसे ॥ ३ ॥
तुका म्हणे बळ । अंगीं आमुच्या सकळ ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – करांडी–कष्ट, आस–इच्छा

अर्थ – उपासादिकांचे कष्ट बापडे जे कुणी करणार असतील ते करोत १ आम्ही मात्र या विठोबाचे दास होऊ आणि सर्व चिंता व इच्छा यांना दूर करू २ आमच्यात भक्तीचा उत्कर्ष झालेला असल्यामुळे आम्हांस मुक्तीचे वेड कधी वाटत नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात या भक्तीमुळे आमच्या अंगी सव प्रकारचे बळ आलेले आहे ४

२३४६ करविली तैसी केली कटकट । वाकडें कीं नीट देव जाणे ॥ १ ॥
कोणाकारणें हें जालेंसे निर्माण । देवाचे कारण देव जाणे ॥ २ ॥
तुका म्हणे मी या अभिमाना वेगळा । घालूनि गोपाळा भार असे ॥ ३ ॥

---

१ देवाचे, २ जीवाचे, ३ भोजनपंगती, ४ कडाडी

शब्दार्थ व टीपा :– कटकट–बडबड

अर्थ:– मी ही बडबड जशी करता आली तशी केली आहे. ती सरळ का वाकडी आहे तो एक देवच जाणे १ हे सर्व कुणाकरिता निर्माण झाले आहे ? हे देवाचे करणे देवच जाणणारा आहे. २ तुकाराम महाराज म्हणतात, मी मात्र या अभिमानातून निराळाच राहिलो असून माझा सर्व भार मी गोपाळावर घातलेला आहे. ३

२३४७ तुह्मी येथें पाठविला धरणेकरी । त्याची जाली परी आइका ते ॥ १ ॥
आतां काय पुढें वाढवूनि विस्तार । जाला समाचार आइका तो ॥ २ ॥
देवाचे उचित एकादश अभंग । महाफळ त्याग करूनि गेला ॥ ३ ॥
तुका म्हणे सेवा समर्पूनि पायीं । जालों उतराई ठावें असो ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा– परी–प्रकार, वृत्तान्त, महाफळ–नारळ.

अर्थ–ज्ञानेश्वर महाराज, तुम्ही येथे जो धरणेकरी ब्राह्मण पाठविला त्याचा काय वृत्तान्त झाला तो ऐका. १ आता यापुढे फार विस्तार तरी कशासाठी करू ? काय प्रकार झाला तो ऐका २ देवाचे योग्य वर्णन असलेले अकरा अभंग मी त्याला करून दिले शिवाय प्रसाद म्हणून महाफळ नारळही दिला. पण तो त्यांचा त्याग करून निघून गेला ३ तुकाराम महाराज म्हणतात, तुम्ही सांगितलेली सेवा मी तुमच्याच चरणी अर्पण करून उतराई झालो आहे हे माहीत असू द्या ४

विवरण –वरील एकतीस अभंग हे धरणेकरी ब्राह्मणाच्या प्रकरणातील आहेत. या प्रसंगामागे एक कथा सांगितली जाते. बीड प्रांतातील एका देशपांडे नावाच्या ब्राह्मणाने पंढरपुरास अनुष्ठान केले. आपण पुराणातील व्युत्पन्न व्हावे असे धरणे त्याने पांडुरंगाजवळ धरल्यावर दहा दिवसांनी त्यास विठ्ठलाने संदेश दिला, तो आळंदीस ज्ञानेश्वराची आराधना करण्याचा ब्राह्मण तेथून आळंदीस आला व त्याने ज्ञानेश्वराच्या पायांशी धरणे धरले बारा दिवसपर्यंत अन्न वर्ज करून राहिल्यावर त्याचा निश्चय पाहून ज्ञानेश्वरानी त्यास देहू येथील तुकाराम महाराजांकडे पाठविले. तुकाराम शूद्र. आपणावर ते अनुग्रह कसा काय करणार ? असा विकल्प त्याच्या मनात आलाच तरी ज्ञानेश्वरांची आज्ञा म्हणून तो देहूस तुकोबांकडे आला. त्याचा निरोप ऐकून तुकोबाना ज्ञानेश्वराविषयी धन्यता वाटली. ज्ञानेश्वरांचा उचित व विनम्र शब्दात त्यांनी गौरव केला. वास्तविक पाहाता ज्ञानेश्वराच्या परी नरी काय कमी होते ? ज्ञानेशाच्याच सत्तेने आपण काही बोलू असे समजून तुकोबानी त्याच्या पायावर डोके ठेविले. आपण नारायणाचे निरोपे तराळ आहोत असे त्यानीं मानले व उपदेशाचे प्रसिद्ध असे अकरा अभंग (क्रमांक २३२४ ते २३३४) आणि प्रसाद म्हणून नारळ त्या ब्राह्मणास दिला.

तुकोबानी या अकरा अभंगात जो उपदेश केला आहे तो सर्व सांसारिक जीवाना आजही उपयुक्त होईल असा आहे 'उगाच प्रयाच्या भरीस पडून वेळ घालवू नकोस. आधीच वय झालेले आहे इतर साधनाच्या खटपटी-तही तू पडू नकोस देवाच्या इच्छेने देवाची प्रार्थना कर इतर साधनानी काळाच्या मुखात मात्र व्यर्थ जाशील आज मेल्यावर उद्या मोक्ष मिळेल असा उधारीचा सौदा करू नकोस, आणि मोक्ष म्हणजे काय ? ते काय देवाजव-ळचे एखादे निराळे गाठोडे आहे काय ? इंद्रियावर विजय मिळवून मन निर्विषय करणे हाच मोक्ष. यासाठी आप-ल्याच मनास साक्षी ठेवून देवाची करुणा भाक. गोविंदाचा छंद मनास लावून घे 'आनंदले मन प्रेमें पाझरती लोचन' अशी मनाची अवस्था होऊ दे ज्याचा ध्यास तू धरशील तेच रूप वा तीच अवस्था तुला प्राप्त होईल.' असा मोठा उपयुक्त उपदेश तुकोबाना धरणेकरी ब्राह्मणास केला आणि नंतर अत्यंत विनम्र भावाने त्यानी ज्ञानेश्वरांची क्षमा मागितली. ज्ञानियाचे गुरू महाराज ज्ञानेश्वर, आपण किती पामर आपणास हा मोठेपणा कशासाठी? 'पायीची वहाण पायी बरी' आपल्या वेड्यावाकड्या उत्तराची ज्ञानेश्वरानी क्षमा करावी अशी विनंती करून ज्ञानेश्वरानी आपणास आपल्या पायाशी राखावे अशी प्रार्थना केली. यानंतर 'ज्याचिये द्वारीं सोन्याचा पिंपळ' या एका अप्रतीम अभंगात

बुवांनी ज्ञानेश्वराचा यथार्थ गौरव केला आहे 'जेणे घातली मुक्तीची मर्यादी। मेळविली मांदी वैष्णवांची' या तुकारामाच्या उक्तीत ज्ञानेश्वरीचे सर्व माहात्म्य एकवटलेले आहे

एवढा मोठा सुन्दर व अमोल उपदेश आणि प्रसादाचा नारळ तुकावांनी त्या ब्राह्मणास दिला खरा. पण त्याचे महत्त्व त्यास काहीच वाटले नाही आपण शास्त्रांत व्युत्पन्न होण्यासाठी आलो आणि आपणास 'नको कांहीं पडो प्रपंचियें करी नाहीं,' 'देवापाशीं मागावें गांठोळें,' 'घाली मामासाठी उडी। पांडुरंग घडी घालवील' असा भक्तीचाच उपदेश तुकारामबुवांनी दिला हे पाहून ब्राह्मण खिन्न झाला संस्कृत ग्रंथ वाचण्यास उत्सुक असलेल्या ब्राह्मणास प्राकृत अभंग रुचले नाहीत तो ते अभंग आणि प्रसाद याचा त्याग करून गेला, असेही तुकोबानी ज्ञानेश्वराना शेवटच्या अभंगात कळविले आहे

यापुढे या नारळाच्या प्रसादाची महीपतीबुवानी हकीगत दिली आहे ती थोडक्यात अशी – ब्राह्मण प्रसादाचा नारळ टाकून गेल्यानंतर तुकोबाच्या दर्शनासाठी कांडोबा नावाचा एक स्वयंपाकी आला या अशिक्षित पण भाविक ब्राह्मणास पाहून तुकारामबुवानी ते अकरा अभंग आणि तो नारळ याचा प्रसाद त्यास देऊन टाकला कोंडोबाने नारळ फोडून पाहिला तो त्यातून सुदर व किंमतवान मोत्ये निघाली या नारळाची आणखी हकीगत अशी की, अहमदाबादच्या एका सावकाराने ज्ञानेश्वराना एक नवस केला होता त्या नवसामुळे त्याने एक लक्ष रुपयाचे जडजवाहीर भरून एक नारळ ज्ञानेश्वराना अर्पण करण्यासाठी तो आळंदीला आला यावेळी ज्ञानेश्वरानी त्या सावकारास प्रेरणा दिली की, हा नारळ देहूस जाऊन तुकारामबुवापुढे ठेवावा त्याप्रमाणे त्याने केले व हा नारळ तुकोबाकडे आला धरणेकरी ब्राह्मणास हाच नारळ मिळाला पण त्याला त्याचे महत्त्व पटले नाही कांडोबास नारळांतील द्रव्य व अभंगातील विचारसंपत्ती याचा लाभ झाला व त्यास संस्कृत भाषा चांगलीच अवगत झाली व तो चांगल्या व्युत्पन्नतेने भागवताचा अर्थही सांगू लागला असे सांगतात की, शिवाजी महाराजांपुढे पुराण सांगणाऱ्या पंडिताच्या आश्रयास हा कोंडोबा ब्राह्मण राहात होता कोंडोबाचा अधिकार ऐकून महाराजानाही त्याचे दर्शन घ्यावे अशी इच्छा झाली असल्याचे महीपतीबुवानी लिहिले आहे

२३४८　मरण माझें मरोन गेलें। मज केलें अमर ॥ १ ॥
　　ठाव पुसिले बुड पुसिलें। वोस वोसलें देहभावा ॥ २ ॥
　　आला होता गेला पूर। धरिला धीर जीवनीं ॥ ३ ॥
　　तुका म्हणे बुनादीचें[1]। जालें साचें उजवणें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा–वोस–शून्य, रिकामा, वोसलें–सोडून दिले, बुनादीचें–जुने, साचे–खरोखर

अर्थ – माझे मरणच मरून गेले त्या मरणानेच मला अमर केले आहे १ त्याचा ठाव ठिकाणा असणारा जो देहाभिमान तोच मी मुळापासून सोडून दिला देहभावासच शून्य करून मी सोडून दिले २ ज्या मार्गाने हा देहभावनेच्या विचाराचा पूर आला होता त्याच मार्गाने तो निघूनही गेला, व मी मात्र हरिकृपेने जीवनात धीर धरून राहिलो आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, यामुळे माझ्या जवळ ते फार जुने ठेवणे होते त्याचे खरोखर आज सार्थक झाले ४

२३४९　माझे लेखीं देव मेला। असो त्याला असेल ॥ १ ॥
　　गोष्टी न करीं नाव नेघें। गेलों दोघें सडोनी ॥ २ ॥
　　स्तुतिसमवेत निंदा। केला धदा उदंड ॥ ३ ॥
　　तुका म्हणे निवांत ठेलों। वेचित आलों जीवित्व ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा– लेखीं–दृष्टीने, वेचित–खर्च करीत

[1] अनादीचे

अर्थ :–माझ्या दृष्टीने देव मेला आहे. ज्या कुणास तो असेल तो असेल. १ आता मी त्याची गोष्ट करणार नाही की नावही घेणार नाही. देव-भक्त असा आमचा दोघांचा जो संबंध होता तो संपून गेला आहे. २ आजपर्यंत त्याची स्तुतीसमवेत निंदाही करण्याचा मी पुष्कळ उद्योग केला. ३ तुकाराम महाराज म्हणतात, आजपर्यंत मी त्याच्यासाठी माझ्या जीवनाचा खर्च केला, पण आता मात्र मी सर्व सोडून निवान्तपणें बसलो आहे. ४

२३५० लवविलें तया सवें लवे जाती । अभिमान हातीं सांपडेना ।। १ ।।
भोळिवेचें लेणें विष्णुदासां साजे । तेथें भाव दुजे हारपती ।। २ ।।
अर्चन वंदन नवविधा भक्ति । दया क्षमा शांति तया ठायीं ।। ३ ।।
तये गांवीं नाहीं दुःखाची वसती । अवघाचि भूतीं नारायण ।। ४ ।।
अवघेंचि जालें सोंवळें ब्रह्मांड । विटाळाचें तोंड न देखती ।। ५ ।।
तुका म्हणे गाजे वैकुंठीं सोहळा । याही[1] भूमंडळामाजी कीर्ति ।। ६ ।।

शब्दार्थ व टीपा :–लवविले–नम्र झाले, लेणें–अलंकार, दागिना.

अर्थ :– जो कुणी नम्र झालेला भेटेल त्याच्या बरोबर जे विनम्र होतात, असे वैष्णव कधी अभिमानाच्या हाती लागत नाहीत. १ अशा या विष्णुदासांना भोळेपणाचा दागिनाच खरा शोभून दिसतो. श्रीहरीशिवाय इतर दुसरे असणारे भाव त्याच्या ठिकाणचे लोपून जातात. २ अर्चन, वंदन इत्यादी नवविधा भक्ती व दया, क्षमा, शांती इत्यादींची वसती त्यांच्या ठिकाणी असते ३ त्यांच्या गावात कधी म्हणून दुःखाची वसती होतच नसते. कारण सर्व भूतमात्रांच्या ठिकाणी असणारा नारायण ते ओळखतात. ४ त्यांच्या दृष्टीने सर्व ब्रह्मांड श्रीहरीमुळे सोवळे झाले असून ते अमंगल विटाळाचे दर्शनही कधी घेत नाहीत. ५ तुकाराम महाराज म्हणतात, त्यांच्या थोरवीचा सोहळा वैकुंठात गाजत असतो व या भूमीवरही तो तसाच गाजत आहे. ६

२३५१ पंढरीची वारी आहे माझे घरीं । आणीक न करीं तीर्थव्रत ।। १ ।।
व्रत एकादशी करीन उपवासी । गाईन अहर्निशीं मुखीं नाम ।। २ ।।
नाम विठोबाचें घेईन मी वाचे । बीज कल्पांतींचे तुका म्हणे ।। ३ ।।

शब्दार्थ व टीपा :– कल्पांतींचे–कल्पाचा अंत होण्याच्या वेळचे.

अर्थ:— माझ्या कुळामध्ये चालत आलेली पंढरपूरची वारी आहे. यामुळे मी कोणतेच इतर व्रत करीत नाही. तीर्थयात्राही करीत नाही. १ एकादशी व्रत करून त्या दिवशी उपास करतो आणि रात्रंदिवस मुखाने श्रीहरीचे नाम मी गातो. २ तुकाराम महाराज म्हणतात, कल्पाचा अंत होण्याच्या वेळचे शिल्लक राहणारे विठ्ठलाचे नाम मी वाणीने सतत घेत असतो. ३

विवरण :– या एका लहानशा अभंगात तुकाराम महाराजांनी आपल्या कुळात कोणकोणते दैवत महत्त्वाचे व कोणती प्रथा प्रमुख याचा निर्देश केला आहे. बुवांच्या कुळाचे दैवत श्रीविठ्ठल व कुळाचार म्हणजे पंढरीची वारी, एकादशी व्रत, मुखाने अखंडपणे नामस्मरण. श्रीहरीच्या भक्तीचे हे रोप तुकोबाच्या घराण्यात त्यांचे आठवे पूर्वज विश्वंभरबुवा यांनी रोविले. स्वतःच्या आईच्या सांगण्यावरून त्यांनी पंढरीची वारी पत्करली. कार्तिकापासून ज्येष्ठापर्यंत त्यांनी पंढरपुराच्या दर एकादशीस एक याप्रमाणे सोळा वाऱ्या केल्या. आषाढ महिन्याच्या अष्टमीस रात्री विश्वंभरबुवांच्या स्वप्नात श्रीविठ्ठल आले व त्यांनी 'आपणच देहूस येतो' असे सांगितले. आंबियाच्या वनात त्यांनी त्याप्रमाणे शोध घेतला. बुक्का व तुळशी यांचा सुवास जेथे सुटला होता ती जागा शस्त्र न लावता त्यांनी खणायला सुरवात केली. त्यावेळी बुक्का व तुळशी अधिकच निघू लागल्या. शेवटी त्यांना श्रीपांडुरंग व रुक्मिणी यांच्या

[1] आणि या भूमंडळा

सुवर्ण मूर्ती तेथे सापडल्या. या मूर्तींची यथाविधी स्थापना झाली व तिच्यापुढे भजनकीर्तन सुरू झाले. अशा रीतीने कुळात पूर्वीपासून चालत आलेल्या वारीतून भगवताचे निवासस्थानही देऊळ निर्माण झाले.

पंढरपूरचा विठोबा हे दैवत, वारी, एकादशी व्रत, मुखी सतत प्रभुनाम या वारकरी पंथातील महत्त्वाच्या बाबींचाही उल्लेख या अभंगात आलेला आहे. भागवत संप्रदायात एकादशीच्या उपवासाला फार महत्त्व आहे. चित्तशुद्धी व मनाची एकाग्रता यासाठी उपवास करण्याची पद्धत सुरू झाली असावी. 'तमेतं वेदानुवचनेन ब्राह्मणा विविदिषन्ति यज्ञेन दानेन तपसानाशकेन' या बृहदारण्यकोपनिषदातील वचनात भगवताच्या प्राप्तीचे उपाय सांगितले असून स्वाध्याय, यज्ञ, दान, तप यांच्याबरोबर अनाशन म्हणजे अनशन राहणे, अन्नपाण्यावाचून राहणे, हाही एक उपाय सांगितला आहे. अन्नपाणी वर्ज्य करून भगवताच्या सन्निध जाणे हा उपवासाचा मुख्य उद्देश होय. या उपवासाच्या जोडीला हरिनामाची संगत असेल तरच उपवासाचे सार्थक होते. भागवतातील नवमस्कंधात अंबरीष राजाचे आख्यान आले आहे. त्यातही एकादशीचा संबंध महत्त्वाचा आहे. तुकाराम महाराजांनी या उपवासाचा बाग आपल्या अमर वाणीने वारंवार केलेला आहे. 'एकादशीस अन्नपान । जे नर करिती भोजन । श्वानविष्ठेसमान । अधमजन ते एक ',' एकादशी व्रत सोमवार न करिती । कोण त्यांची गति होईल नेणो ' 'पंधरा दिवसां एकादशी । का रे न करिसी व्रतसार ' इत्यादी ओळींतून तुकाराम एकादशी व्रताचे महत्त्व प्रतिपादन केले असून त्याच्याबरोबर नामसंकीर्तनाचीही जोड दिली आहे.

२३५२ संपदा सोहळा नावडे मनाला । करी[1] तें टकळा पंढरीचा ॥ १ ॥
जावें पंढरिसी आवडी मनासी । कधी एकादशी आषाढी हे ॥ २ ॥
तुका म्हणे ऐसे आर्त ज्याचे मनीं । त्याची चक्रपाणी वाट पाहे ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा – संपदा–संपत्ती, टकळा–ध्यास, आर्त–उत्कट इच्छा.

अर्थ – संपत्तीचा सोहळा माझ्या मनात कधीच आवडत नाही. त्याला एकसारखा पंढरीचाच ध्यास लागलेला आहे. १ पंढरीस जावे हीच आवड माझ्या मनास असून आषाढी एकादशी कधी येते याचीच वाट मी पाहात असतो. २ तुकाराम महाराज म्हणतात, अशा प्रकारची उत्कट इच्छा ज्याच्या मनात आहे, त्याचीच वाट चक्रपाणी एकसारखी पाहत असतात. ३

२३५३ कथनी पठणी करूनि काय । वाचुनि रहणी वाया जाय ॥ १ ॥
मुखी वाणी अमृतगोडी । मिथ्या मुके चरफडी ॥ २ ॥
पिळणी पाक करिता दगडा । काय जडा होय तें ॥ ३ ॥
मधु मेळवूनि माशी । आणिका सांसी पारधिया ॥ ४ ॥
मेळऊनि धन मेळवी माती । लोभ्या हातीं तेंचि मुखीं ॥ ५ ॥
आपलें केलें आपण खाय । तुका वंदी त्याचे पाय ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – रहणी–राहणी, वागणूक.

अर्थ – परमार्थविचाराचे नुसते कथन अथवा पठन असून उपयोग काय ? त्याप्रमाणे वागणूक नसेल तर ते सवच वाया जाईल. १ मुखामध्ये अमृताप्रमाणे गोड वाणी असूनही आपण मात्र मुकेने तडफडतो असे होईल. २ दगड पिळून शिजविला असता त्याचा जडपणा कमी होईल काय ? ३ मधमाशा फुलाफुलातून पुष्कळच मध गोळा करतात, पण त्याचा उपयोग दुसऱ्या पारध्यासाठीच होत असतो. ४ लोभी मनुष्य पुष्कळ धन मिळवून ते मातीत जमिनीत पुरून ठेवितो. शेवटी तीच माती मेल्यानंतर त्याच्या तोंडात पडते. जिवंतपणी त्याच्या हातात मातीच असते. ५ तुकाराम महाराज म्हणतात, आपण स्वतः केले, त्याचा अनुभव जो घेतो त्याचेच पाय मी वंदन करीन. ६

१ करितों

२३५४ उमटती वाणी। वाटे नामाचिया ध्वनी ॥ १ ॥
बरें सेवन उपकारा। धावें द्यावें या उत्तरा ॥ २ ॥
सरळ आणि मृद। कथा पाहावी ते ऊर्ध्व ॥ ३ ॥
गात जात[1] तुका। हाचि उपदेश आइका ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपाः- वाटा-मुखाच्या वाटेनें, ऊर्ध्व-उच्च गतीला, अवस्थेला.

अर्थ – माझ्या मुखातून हरिनामाचाच ध्वनी निघत आहे. १ त्याचेच सेवन करणे बरे. दुसऱ्यावर उपकार करण्यासाठी हेच नाम घ्यावे व द्यावे. २ ही हरिकथा मोठी सरळ व मृदु असून उच्च गतीला नेणारी आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी हे हरिनाम असेच गात जातो आहे हाच माझा उपदेश तुम्ही सर्वजण ऐका. ४

२३५५ कथाकाळींची मर्यादा सागतों ते भावें वंदा।
प्रीतीनें गोविंदा हेंचि एक आवडे ॥ १ ॥
टाळ वाद्य गीत नृत्य अंतःकरणे प्रेमभरित।
वाणिता तो कीर्त तद्भावनें लेखावा ॥ २ ॥
नये अळसें मोडूं अंग कथे कानवडें हुंग।
हेळणेचा रंग दावी तो चांडाळ ॥ ३ ॥
तोंडीं विडा मानें ताठा थोरपणें घाली गेंठा[2]।
चित्त नेदी नामपाठा गोष्टी लावी तो चांडाळ ॥ ४ ॥
कथे इच्छी मान दावूनियां थोरपण।
रजा संकोच[3] न लुगडीं सांवरी तो चांडाळ ॥ ५ ॥
आपण बैसे वाजेवरी सामान्य[4] हरिच्या दासां धरी।
तरि तो सुळावरी वाहिजे निश्चयेसीं ॥ ६ ॥
येतां न करी नमस्कार कर जोडोनियां नम्र।
न म्हणतां थोर आणिकां खेटी तो चांडाळ ॥ ७ ॥
तुका विनवी जना कथे नाणावें अवगुणा।
करा नारायणा ऋणी समर्पक भावें ॥ ८ ॥

शब्दार्थ व टीपा – कीर्त-कीर्ती, कानवडे-वाकडे, हुंग-हुंगण, गेंठा-गळ्यातील किमतवान दागिना, रजा-पायधुळीस, धरी-समजतो, नाणावें-आणू नये

अर्थ – हरिकथा चालली असताना जी मर्यादा प्रत्येकाने पाळावी, ती मी तुम्हांस सांगतो आहे. मोठ भाव मनात धरून ती शिरसावंद्य माना, कारण मनापासून प्रेम करणे हेच गोविंदास आवडते. १ टाळमृदंगासारखी वाद्ये वाजवून, गाणी गाऊन, नृत्य करून प्रेमभरित अंतःकरणाने जो श्रीहरीची गुणकीर्ती गातो तो त्याच्या भावनेशी एकरूप झाला आहे असे समजावे २ कथा चालू असताना आळसाने अंग मोडू नये अथवा हुंगण वाकडे करून बसू नये असे हेळनाचे प्रकार जे कुणी करतील ते चांडाळच आहेत असे समजावे. ३ तोंडात विडा रंगलेला आहे, मोठेपणासाठी गळ्यात किमतवान दागिना घातला आहे आणि कथेकडे मात्र लक्ष नाही, इतरच गोष्टी करण्यात रमून गेला आहे तो चांडाळ समजावा. ४ कथेमध्ये आपणांस मोठेपणा मिळावा अशी जो इच्छा करतो, संतांच्या चरणांवरील धूळीकण अंगावर येतील म्हणून आपली उंची व किमतवान वस्त्रे सावरून बसतो तो चांडाळच समजावा ५

१ जातो, २ गाठा, ३ संकोचोन, ४ सामान

आपण स्वतः उच्च स्थानावर बसतो व जो हरिदासांना मात्र सामान्य समजून वागतो त्याला यमदूत निश्चयाने सुळावरच देतील ६ कथेत आल्यावरोबर जो हरिदासास नमस्कार करीत नाही, हात जोडून नम्र होत नाही, इतरांना न मानता, त्यांची थोरवी न ओळखता जो त्यांना खेटून बसतो, तो चांडाळच समजावा ७ तुकाराम महाराज म्हणतात, मी सर्व लोकांना विनवीत आहे अशा प्रकारचे अवगुण कथेत कधी आणू नयेत आपले सर्व भाव नारायणालाच समर्पण करून त्याला ऋणी करावे ८

विवरण-या व पुढील पाच अभंगात तुकारामबुवांनी हरिकथेचे माहात्म्य वर्णन केले आहे कीर्तनात करून दवाकडे, नामस्मरणाकडे लक्ष असावे इतर बाह्य हावभावास अथवा थाटमाटास तेथे स्थान नाही अंग वेडे वाकडे करणे, पेंगणे, झोपणे तंबाखू अथवा विडा चघळणे, जांभई देणे, खाजविणे, दुसऱ्याशी इतर विषयावर गप्पागोष्टी करणे, आपण कुणी विशेष व थोर आहोत असे मानणे, या गोष्टी कीर्तनात शोभणाऱ्या नाहीत हरिनामाशिवाय व प्रभुस्मरणाशिवाय इतर बाबी कीर्तनात येऊ नयेत अशी बुवाची शिकवण आहे कीर्तन करणारे आणि कीर्तन ऐकणारे या दोहांच्या मर्यादा सत्पुरुषांनी घालून दिलेल्या आहेत

२३५६ कथा देवाचे ध्यान कथा साधना मंडण । कथे ऐसें पुण्य आणीक नाहीं सर्वथा ॥ १ ॥
ऐसा साच खरा भाव । कथेमाजी उभा देव ॥ २ ॥
मंत्र स्वल्प जना उच्चारिता वाचे मना । म्हणता नारायणा क्षणे जळती महा दोष ॥ ३ ॥
भावे करितां कीर्तन तरे तारी आणीक जन । भेटे नारायण संदेह नाहीं म्हणे तुका ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – मंडण-सर्वश्रेष्ठ, साच-खरोखर

अर्थ — हरिकथा हेच देवाचे खरे ध्यान आहे सर्व साधनात कथा श्रेष्ठ असून कथेप्रमाण दुसरी पुण्य कारक गोष्ट नाही १ कथेमध्ये देव उभा असतो असा खरोखर प्रकार असतो २ मनामध्ये देवाचे रूप कल्पून वाणीने त्याच्या नामाचा उच्चार करणे, हाच मंत्र सर्व लोकांना अतिशय सोपा असा आहे नारायण या नामाचा उच्चार करताच एका क्षणात महादोषांची पातके जळून जातात ३ तुकाराम महाराज म्हणतात, जो मनोभावे कीर्तन करून स्वतःबरोबर इतरांना तारील, त्यास प्रत्यक्ष नारायण भेटेल यात कसलीही शंका नाही ४

२३५७ कथा त्रिवेणीसंगम देव[1] भक्त आणि नाम ।
तेथींचे उत्तम चरणरज वंदिता ॥ १ ॥
जळती दोषांचे डोंगर शुद्ध होती नारी नर ।
गाती ऐकती सादर जे पवित्र हरिकथा ॥ २ ॥
तीर्थें तया ठाया येती पुनीत व्हावया ।
पर्वकाळ पाया तळीं वसे वैष्णवां ॥ ३ ॥
अनुपम्य हा महिमा नाहीं द्यावया उपमा ।
तुका म्हणे ब्रह्मा नेणे वर्णूं या सुखा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – चरणरज-पायावरील धुळीचे कण, पुनीत–पवित्र अनुपम्य–उपमा देण्यास दुसरा नाही असा

अर्थ – देव भक्त आणि हरिनाम असा हा त्रिवेणीसंगम हरिकथेत असतो या ठिकाणी असणाऱ्या वैष्णवांच्या चरणावरील धुळीच्या कणांना जो कुणी वंदन करील तो उत्तम गतीस पोचेल १ पवित्र अशी हरिकथा जे गातात ऐकतात ते नर अथवा नारी कुणीही असोत, शुद्ध होऊन जातील त्यांच्या महादोषांचे डोंगर जळून जातील २ अशा वैष्णवांच्या कीर्तनाच्या ठिकाणी सर्व तीर्थे पवित्र होण्यासाठी येतात आणि याच ठिकाणी सर्व सर्व

१ भक्त आणि देव नाम

काळ वास्तव्य करण्यासाठी येतात ३ तुकाराम महाराज म्हणतात, या हरिकथेच्या महिम्यास दुसऱ्या कशाची तुलनाच नाही या सुखाचे वर्णन प्रत्यक्ष महादेव देखील करू शकणार नाही ४

२३५८ साडूनि कीर्तन न करी आणीक काज । नाचेन निर्लज्ज तुझ्या रंगीं ॥ १ ॥
आवडीचे आर्त पुरवीं पंढरिराया । शरण तुझ्या पाया याचि लागीं ॥ २ ॥
टाळी वाऊनिया[1] विठ्ठल म्हणेन । तेणें निवारीन भवश्रम ॥ ३ ॥
तुका म्हणे देवा नुपेक्षावें आम्हा । न्यावें निजधामा आपुलिया ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – काज–कार्य, आर्त–तीव्र इच्छा, वाऊनिया–वाजवून

अर्थ – देवा एका कीर्तनाखेरीज मी दुसरे कोणतेही कार्य करणार नाही याच कीर्तनात तुझ्या प्रेमाच्या रंगात मी निलज्ज होऊन नाचेन १ पंढरीराया, माझ्या मनाची तीव्र व आवडती इच्छा तुम्ही पूर्ण करावी मी यासाठीच तुमच्या पायाशी शरण आलेलो आहे २ मी हातांनी टाळी वाजवून मुखाने विठ्ठलनामाचा गजर करीत राहीन यामुळ माझ्या मनातील सर्व ससारभ्रम दूर करीन ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, आमची उपेक्षा तुम्ही कधी करू नका तुम्ही मला तुमच्या निवासस्थानी घेऊन जा ४

२३५९ जळती कीर्तनें । दोष पळतील विघ्नें ॥ १ ॥
हेचि बळिवंत गाढे । आनंद करू दिंडीपुढें ॥ २ ॥
कळि पापाची हे मूर्ति । नामखड्ग घेऊं हातीं ॥ ३ ॥
तुका म्हणे जाऊं । बळें दमामे ही लावू ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – गाढे–श्रेष्ठ कळी–कली, दमामे–नौबत नगारे

अर्थ – हरिकीर्तनामुळे महादोष जळून जातात आणि नाना प्रकारची विघ्ने पळून जातात १ हेच एक बलवान व श्रेष्ठ असे साधन असल्याने आम्ही दिंडीमध्ये मोठ्या आनंदाने नामघोष करू २ कली हा केवळ पापाची मूर्तीच आहे पण आम्ही नामाचे खड्ग हाती धारण करून त्याला नष्ट केले आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, आम्ही आनंदाचे नगारे वाजवून स्वत बळाने श्रीहरीकडे जाऊ ४

२३६० यम[2] सांगे दूता तुम्हां नाहीं तेथें सत्ता ।
जेथें होय कथा सदा घोष नामाचा ॥ १ ॥
नका जाऊं तया गांवां नामधारकाच्या शिवां ।
सुदर्शन यावा घरटी फिरे भोवती ॥ २ ॥
चक्र गदा घेउनी हरि उभा असे त्याचे द्वारीं ।
लक्ष्मी कामारी रिद्धिसिद्धीसहित ॥ ३ ॥
ते बळियाशिरोमणी हरिभक्त ये मेदिनी ।
तुका म्हणे धार्नी यम सागे दूताचे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – शिवा–शिवेवर सीमेवर, यावा–आगमन, घरटी–फेऱ्या, मंडळ, कामारी–दासी, मेदिनी–पृथ्वी

अर्थ – यम आपल्या दूतांना सांगत असतो, जेथे हरिकथा चाललेली आहे, आणि जेथे सतत नामघोष होत राहिलेला आहे त्या ठिकाणी आपला अधिकार तुम्हास नाही १ जे नामधारक वैष्णव आहेत त्यांच्या

१ वाहूनिया, २ यमधम

नावी जाऊ नका, त्याच्या सीमेकडेही फिरकू नका. कारण तेथे श्रीहरीच्या सुदर्शनचक्राचे आगमन झालेले असते. ते भक्तांच्या रक्षणार्थ सतत फेऱ्या घालीत असते २ हातामध्ये चक्र व गदा घेऊन प्रत्यक्ष श्रीहरी त्यांच्या दारात उभा असतो. त्यांच्या बरोबर लक्ष्मी व रिद्धीसिद्धि या दासीही असतात. ३ तुकाराम महाराज म्हणतात, असे हे हरिभक्त या पृथ्वीवर बलवानांतील श्रेष्ठ असतात, असे यम आपल्या दूतांच्या कानात सांगत असतो. ४

विवरण :– वरील पाचसहा अभगांत तुकाराम महाराजानी कीर्तनभक्तीची सर्वश्रेष्ठता व सुलभता निवेदन केली आहे. परमेश्वर आपल्या भक्तांचे रक्षण कीर्तनप्रसंगी कसे करीत असतो हेही परोपरीने सांगितले आहे. कलियुगातील अतिशय सुलभ आणि सोप्या अशा या साधनाचा गौरव सर्वच साधुसंतानी केलेला आहे. 'तोडी मायाजाल संकीर्तनें' असे निवृत्तिनाथांनी म्हटले आहे. 'कीर्तनाच्या सुखें सुखी होतो देव' 'धन्य धन्य वैष्णव संगी अखंड तेथे पांडुरंग । कीर्तनीं नाचतसे अभंग । अखंड काळ सर्वदा', 'कीर्तन नर्तन वाचे जनार्दन । न पवसी पतन येरझारी' *असा संस्कृत कीर्तनाचे महत्व मराठी कीर्तनाचे प्रमुख नामदेव महाराज यानी केले आहे.* 'भक्तिज्ञानाविरहित गोष्टी इतरा न कराव्या । मनोभावें वैराग्याच्या युक्ति विवराव्या', 'संतसंगें अंतरंगें नाम बोलावें । कीर्तनरंगीं देवासन्निध सुखें डोलावें' असा कीर्तनमहिमा सांगून एकनाथांनी संतांच्या घरची कीर्तनमर्यादाही सांगितलेली आहे. या कीर्तनाने देव कसा संतुष्ट होतो ? त्यांनीच म्हटले आहे, 'कीर्तनाची आवडी देवा । वैकुंठाहूनी धांवे धावा । नवल वैकुंठींच नसे । तो कीर्तनीं नाचतसे' या कीर्तनातील नामघोषानी देव भुलून जातात. त्याना वैकुंठातील शेषशयन आवडत नाही. योगी लोकांचे ध्यान त्याना नको असते, यज्ञयागात त्याचे मन नसते, त्याला सारी ओढ वैष्णवाच्या घराची असते. स्वर्गातील देवसुद्धा या कीर्तनसुखासाठी हपापलेले असतात.

कीर्तनाच्या प्रसंगी पापाचे नावही उरत नाही. जाच करण्यासाठी यमास अथवा यमदूतास तेथे काहीच उरत नाही. यासबधी फार बहारीचे वर्णन श्रीज्ञानेश्वरानी करताना म्हटले आहे– 'तरी कीर्तनाचेनि नटनाचें । नाशिले व्यवसाय प्रायश्चित्तांचे । जें नामचि नाहीं पापाचें ऐसें केलें ॥ यमदमा अवकळा आणिली । तीर्थें ठायावरूनि उठविलीं । यमलोकींची खुंटिली । राहाटीं आघवी ॥ यमु म्हणे काय यमावें । दमु म्हणे कवणातें दमावें । तीर्थें म्हणती काय करावें खावें । दोष ओखदासि नाहीं ॥'

२३६१ कान्हया रे जगजेठी । देई भेटी एकवेळे ॥ १ ॥
काय मोकलिलें वनीं । सावजांनीं वेढिलें ॥ २ ॥
येथवरी होता संग । अंगें अंग लपविलें ॥ ३ ॥
*तुका म्हणे पाहिलें मागें । एवढ्या वेगें अंतरला ॥ ४ ॥*

शब्दार्थ व टीपा :– मोकलिलें–सोडले, टाकले, सावजांनी–हिंस्र पशूंनी, श्वापदांनी.

अर्थ :– कान्हया, जगजेठी, अरे मला एकदा भेट दे ना. १ मला तू अशा या संसारवनात एकटेच का सोडलेस ? येथे कामक्रोधादी श्वापदांनी मला वेढले आहे. २ तुझा येथपर्यंत संग होता. आता मात्र तू आपल्या ठिकाणी अंग का लपविलेस ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी या प्रापंचिक जगाकडे वळून मागे पाहिले तोच तू आपले रूप नाहीसे केलेस. ४

२३६२ आपुल्या आम्ही पुसिलें नाहीं । तुज कांहीं कारणें ॥ १ ॥
मागें मागें धांवत आलों । कांहीं बोलों यासाठीं ॥ २ ॥
बहुत दिस[1] होतें मनीं । ध्यावी धणी एकांतीं ॥ ३ ॥
तुका म्हणे उभा राहें । कान्हो पाहें मजकडे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– धणी–तृप्ती.

---

१ दिवस.

अर्थ :– देवा, तुझ्यासाठी आम्ही आपलेपणासही काही विचारले नाही, त्याची पर्वा केली नाही. १ तुझ्या बरोबर काही थोडे बोलावे म्हणून तुझ्यापाठीमागे आम्ही धावत आलो. २ एकान्तात तुझी भेट घेऊन मनाची तृप्ती करून घ्यावी असे मनात फार दिवस होते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, कान्होबा, तू उभा राहून माझ्याकडे पाहा. जाऊ नकोस. ४

२३६३ धन्य बा[1] ह्या ऐशा नारी । घरीं दारीं नांदती ॥ १ ॥
चोरूनिया तुजपाशीं । येतां त्यांसी न कळतां ॥ २ ॥
दोन्हीं ठायीं समाधान । सम कठिण बहुतचि ॥ ३ ॥
तुका म्हणे जीवासाठीं । दुर्लभ भेटी ते देवा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– जीवासाठी–जीव अर्पण करून.

अर्थ :– घरीदारी व्यग्र असून देवा, तुमची प्राप्ती करून घेणाऱ्या या नारी धन्य आहेत. १ प्रपंचामधील नात्याच्या माणसांना न कळविता त्या तुझ्यापाशी चोरून येतात. २ अशा प्रकारे दोन्हीकडे, प्रपंचात व परमार्थात सर्वांना समाधान देणे ही सर्वांना अवघड गोष्ट आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, आपला जीव देवास अर्पण करणारे जे कुणी असतील त्यांची भेट घेणे देवांनाही दुर्लभ आहे.

२३६४ उदासीना पावल्या वेगीं । अंगा अंगीं जडलिया ॥ १ ॥
वेटाळिला भोंवता हरी । मयूरफेरीं नाचती ॥ २ ॥
मना आले करिती चार । त्या फार हा एकला ॥ ३ ॥
तुका म्हणे नारायणीं । निरंजनी[2] मीनलिया ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– उदासीना–उदासीन झालेल्या गौळणी, चार–वर्तन, चेष्टा, निरंजनी–प्रकाशरूपी, मीनलिया–प्राप्त झाल्या, मिळून गेल्या.

अर्थ :– ज्या गोकुळच्या नारी उदासीन झाल्या त्या प्रभूच्या स्वरूपी एकरूप होऊन गेल्या. १ त्यांनी श्रीहरीच्या भोवती घेर धरून त्याला वेटाळून घेतले व मोराप्रमाणे नाच करू लागल्या. २ अशा प्रकारे मनास येईल त्याप्रमाणे त्या वर्तन करू लागल्या. त्या गौळणी पुष्कळ असून हा श्रीहरी मात्र एकच आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, त्या प्रकाशरूप नारायणाशी मिळून गेल्या आहेत. ४

२३६५ विषमाची शंका वाटे । सारिखें भेटे तरी सुख ॥ १ ॥
म्हणऊनि चोरिलें जना । आल्या रानां एकांतीं ॥ २ ॥
वुजियाशी कळों नये । जया सोय नाहीं हे ॥ ३ ॥
तुका म्हणे मोकळें मन । नारायण भोगासी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– विषमाची–भिन्न स्वभावाची.

अर्थ :– भिन्न स्वभावाची जी माणसे आहेत त्यांच्याबद्दल शंकाच वाटते. आपल्यासारखेच कुणी भेटले तर सुख होते. १ म्हणूनच लोकांना न सांगता चोरून त्या गौळणी श्रीहरीजवळ अरण्यातील एकान्तात आल्या. २ ज्यांना हरिप्राप्तीच्या अनुभवाची गोडी नाही अशा लोकांना असले कृत्य समजत नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, एकान्तात नारायणाशी प्रेमभोग भोगण्यास त्यांचे मन आता मोकळे आहे. ४

१ बाया ऐशा, २ निराजनी.

२३६६ आलिंगन कंठाकंठीं । पडे मिठी सर्वांगें ॥ १ ॥
न घडे मागें परते[1] मन । नारायण संभोगी ॥ २ ॥
वचनासी वचन मिळे । रिघती डोळे डोळियात ॥ ३ ॥
तुका म्हणे अंतर्ध्यानीं । जीव जीवनीं विराल्या ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – कंठाकंठीं गळ्यात गळा घालून

अर्थ :– गौळणींनी श्रीहरीस गळ्यात गळा घालून आलिंगन दिले. त्यामुळे श्रीहरीच्या सर्वांगाचे आलिंगन त्यांना घडले १ त्यांचे मन नारायणापासून परतेनासे झाले नारायणाशी त्या प्रेमभोग घेऊ लागल्या २ श्रीहरीच्या शब्दाला त्यांचे शब्द मिळाले असून त्यांच्या दृष्टीला त्यांची दृष्टी जाऊन भिडली आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, त्या श्रीहरीला अशा प्रकारे अंतरंगात धारण करून त्यांचा जीव त्याच्याच जीवनात विरून गेला आहे ४

२३६७ कोणी सुना कोणी लेकी । कोणी एकी सतता[2] ॥ १ ॥
अवघियांची जगनिंद । जाली धिंद सारखी ॥ २ ॥
अवघ्या अवघ्या चोरा । विना वरा मायबापा ॥ ३ ॥
तुका म्हणे करा सेवा । आले जीवावर तरी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – सतता–स्वतंत्र, जगनिंद–जगाकडून निंदा, धिंद–फजिती, विनावरा–नवऱ्यांशिवाय

अर्थ – श्रीहरीशी एकरूप झालेल्या गौळणींत कुणी सुना होत्या, कुणी लेकी होत्या, तर कुणी स्वतंत्र अशा सासवा होत्या १ या सर्वांची सारखीच निंदा जगाकडून झाली आणि त्या फजित झाल्या २ पती, आईबाप यांना चोरून त्या श्रीहरीकडे आल्या ३ तुकाराम महाराज म्हणतात, तुमच्या जिवावर जरी येऊन ठेपले तरी तुम्ही त्या श्रीहरीची सेवा करावी ४

२३६८ येयील जे एक घडी । तयें जोडी पार नाहीं ॥ १ ॥
किती त्याचा सासुरवास । कैंचा रस हा तेथें ॥ २ ॥
अवघे दिवस गेले कामा । नाहीं जन्मा खंडण ॥ ३ ॥
तुका म्हणे रतल्या[3] जनीं । सोडा झणी कान्होबा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – घडी–घटका, पार–तुलना, झणी–नको

अर्थ – या श्रीहरीच्या जवळ जो एक घटका जाते तीस दुसरी कसलीच तुलना नाही १ त्या गौळणींना प्रपंचात केवढा सासुरवास होता आणि आता या श्रीहरीच्या संगतीत कसा प्रेमरस फुलला आहे २ प्रपंचाच्या कामातच सर्व दिवस गेले, पण त्यामुळे काही जन्म घेण्याचे संकट टळत नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, तुमच्याशी रममाण झालेल्या या गौळणींना कान्होबा, आता पुन्हा लोकात सोडू नका ४

२३६९ चिंता नाहीं गांवीं विष्णुदासांचियें । घोष जयजयकार सदा ॥ १ ॥
नारायण घरीं साठविलें धन । अवघेंचि याण तया पोटीं ॥ २ ॥
सबंध सकळां पुरे धणीवरी । सेवावया नारी नर बाळां ॥ ३ ॥
तुका म्हणे येथें आनंदी आनंदु । गोविंदें गोविंदु पिकविला ॥ ४ ॥

---

१ परतो, २ सतता, ३ रातल्या

शब्दार्थ व टीपा :– धणी–तृप्ती.

अर्थ :– जे विष्णुदास आहेत त्यांच्या मनांत कसलीही चिंता उरत नाही. कारण ते एकसारखा श्रीहरीच्या नामाचा घोष आणि जयजयकार करीत असतात. १ त्यांनी आपल्या हृदयात नारायणरूपी धन साठविलेले असते. याच्या पोटातच सर्व काही पदार्थ एकवटलेले आहेत हे धन स्वस्त असून सगळ्यांना तृप्त होईपर्यंत पुरते. पुरुष, स्त्री व लहान मूल या सर्वांना याचे सेवन सुलभ आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, सर्व ठिकाणी गोविंदाच्या प्रेमाचे पीक पिकलेले असल्याने जिकडे तिकडे आनंदी आनंद आहे. ४

२३७० करितो तया वेवसाव आहे । येथें व्हा रे साहे एकां एक ॥ १ ॥
गातां आइकतां समानचि घडे । लाभें लाभ जोडे विशेषता ॥ २ ॥
प्रेमाचे भरतें भातें घ्यावें अंगीं । नटे टाळी रंगीं शूरत्वेंसी ॥ ३ ॥
तुका म्हणे बहुजन्मांचें खंडण । होईल हा सीण निवारोनि ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:– साहे–मदत, साहय, सीण–शीण, त्रास, दु.ख.

अर्थ :– जो कुणी परमार्थाचा विचार करील त्यांना भरपूर उद्योग आहे. त्यांनी एकमेकांना मदत करून असावे. १ श्रीहरीचे गुण एकाने गावेत, दुसऱ्याने ऐकावेत, कारण गाणारास व ऐकणारास फलप्राप्ती सारखीच आहे. एकमेकांना विशेष प्रकारचा लाभ मिळतो २ श्रीहरीच्या प्रेमाने भरलेल्या हृदयरूपी भात्यातून हरिकीर्तनात टाळी धाजवून प्रेमात रंगावे, नाचावे व शूरत्व प्रकट करावे ३ तुकाराम महाराज म्हणतात, यामुळे तुमचे पुढील अनेक जन्म चुकतील व सर्व दु.ख निवारण होईल. ४

## स्वामीचें अभंगीचें नांव काढून सालोमालो आपुलें नाव घालीत त्यावर अभंग ॥ ८ ॥

२३७१ नाहीं घाटावें लागत । एका सितें कळे भात ॥ १ ॥
क्षीर निवडलें पाणी । चोंची हंसाचिये आणी ॥ २ ॥
आंगडें फाडुनि घोंगडें करी । अवकळा तये परी ॥ ३ ॥
तुका म्हणे कण । भुसीं निवडे कैचा सीण ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:– घाटावें–ढवळावे, आणी–टोकाने.

अर्थ.– सगळे ढवळून पाहावे लागत नाही, एका शिताची जरी परीक्षा केली तरी भाताचे रूप समजते. १ राजहंसाच्या चोचींच्या टोकाने दूध व पाणी निवडून वेगळे होते. २ एखादा अंगरखा फाडून घोंगडे तयार करावे, त्याप्रमाणे प्रासादिक कवीच्या काव्यातील कविनाम काढून आपले नाव घालणे ही विटंबना आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, कण व भूस यांची निवड सहज करता येते, त्यात त्रास कसला आहे ? ४

२३७२ सालोमालो हरिचे दास । म्हणउन केला अवघा नास ॥ १ ॥
अवघें बचमंगळ केलें । म्हणती एकांचें आपुलें ॥ २ ॥
मोडूनि संतांचीं वचनें । करिती आपणां भूषणें ॥ ३ ॥
तुका म्हणे कवी । जगामधीं रूढ दावी ॥ ४ ॥

१ जगाचे.

शब्दार्थ व टीपा :– बचमंगळ–हास्यास्पद स्थिती.

अर्थ.– सालोमालो यांनी स्वतःस श्रीहरीचे दास समजून सर्वच नाश केला आहे. १ प्रासादिक संतांची वाणी व आपली वाणी एकत्र करून सर्वच हास्यास्पद स्थिती त्यांनी करून घेतली आहे हे सर्व आपलेच कवित्व आहे असे ते म्हणू लागले आहेत. २ त्यांनी संतांच्या प्रासादिक काव्यातील वचने मोडली व त्यांची ओबडधोबड कविता करून स्वतःस भूषणे लेवविली. ३ तुकाराम महाराज म्हणतात, असे हे कवी जगतामध्ये कवितेची रुढी दाखवितात. ४

२३७३ जायाचे[1] अळंकार । बुडवूनि होती चोर ॥ १ ॥
त्यांसी ताडणाची पूजा । योग घडे बऱ्या वोजा ॥ २ ॥
अभिलाषाच्या सुखें । अंतीं होती काळीं मुखें ॥ ३ ॥
तुका म्हणे चोरा । होय भूषण मातेरा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा.– वोजा–सहज, मातेरा–नाश.

अर्थ.– मागून आणलेले दुसऱ्याचे अलंकार बुडवून अथवा ते स्वतःचेच आहेत असे भासवून लोक चोरच बनतात. १ त्यांना मार देणे हीच त्यांची पूजा आहे हाच सहज असा योग त्यांना चांगला आहे. २ अभिलाषेच्या सुखामुळे शेवटी तोंड मात्र काळे होते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा प्रकारे नाश होणे मातच चोराला भूषण वाटते. ४

२३७४ कालवूनि विष । केला अमृताचा नास ॥ १ ॥
ऐशा अभाग्याच्या बुद्धि । सत्य लोपी नाहीं शुद्धि ॥ २ ॥
नाक कापुनि लावी सोनें । कोण अळंकार तेणें ॥ ३ ॥
तुका म्हणे बावी । मोडूनि मदार बांधावी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– अमृत–दूध, लोपी–नाहीसे होते, बावी–विहीर, मदार–मशीद.

अर्थ:– दुसऱ्याच्या कवितेत स्वतःचे शब्द घालून या लोकांनी दुधात विष कालवून त्याचा नाश केला आहे. १ अशी दुर्दैवी माणसाची बुद्धी असते. त्याच्या करण्यामुळे सत्य नाहीसे होते, याची शुद्धीही त्यास नसते २ नाक कापून त्यावर सोन्याची नथ घातली तर त्या अलंकाराची काय शोभा राहाणार ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, हे त्यांचे करणे म्हणजे मोठी विहीर मोडून मशीद बांधण्यासारखे आहे ४

२३७५ कण भुसाच्या आधारें । परि तें निवडितां बरें ॥ १ ॥
काय घोंघाणिया[2] घाणी । ताकामध्यें घाटी लोणी ॥ २ ॥
सुइणीपुढें चेटा । काय लपविसी चाटा ॥ ३ ॥
तुका म्हणे ज्ञान । दिमाकाची भनभन ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – घोंघाणी–ओंगळ, मूर्ख, पाधाणी–अडाणी बाई, चेंटा–मुलगा, चाटा–चावट, उनाड.

अर्थ :– भुसकटाच्या अंगात असलेले धान्यकण निवडून काढलेलेच बरे असतात १ ओंगळ, मूर्ख अथवा अडाणी बाई ताकात लोणी घोटते, हे त्या बाईचे कृत्य नासधूस करण्यासारखेच नाही काय ? २ उनाड व चावट बये, सुइणीपुढे का कधी मुलगा लपविता येईल ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, पोकळ ज्ञान ही उगाचच रिकाम्या ढोलाची भणभण आहे ४

---

१ जयांचे, २ काय घोंघालि पाधाणी

२३७६ विकल तेथें विका । माती नाव ठेवूनि बुका ॥ १ ॥
हा तो निवाड्याचा ठाव । खऱ्या खोट्या निवडी भाव ॥ २ ॥
गहवारे हा विधि । पोट वाढविले चिंधी ॥ ३ ॥
लावू जाणे विल्हे । तुका साच आणिक कल्हे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – ठाव–ठिकाण, गहवारे–गरोदर, विल्हें–व्यवस्था, साच–सत्य, खरे, कल्हे–कल्हईचे, मुलाम्याचे, खोटे

अर्थ — मातीलाच बुक्का हे नाव ठेवून तो जेथे विकता येईल तेथे विका, १ पण येथें मात्र खऱ्या-खोट्याचा निवाडा होण्याचेच हे ठिकाण आहे २ पोटावर चिंध्या बांधून आपण गरोदर आहोत असे दाखविण्या साठी एखादीने पोट वाढविले तरी त्याचा काय उपयोग ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, खरे काय आणि खोटे काय, याची व्यवस्था मी लावू शकतो ४

२३७७ विषयीं अद्वये । त्यासी आम्हा सिवों नये ॥ १ ॥
देव तेथुनि निराळा । असे निष्काम वेगळा ॥ २ ॥
वासनेची बुथी[1] । तेथें कैंची ब्रह्मस्थिति ॥ ३ ॥
तुका म्हणे असता[2] देहीं । तेथें नाहीं जमतीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – बुथी–गुता

अर्थ – जे इंद्रियादिकांच्या विषयाशी एकरूप झाले आहेत त्यांनी आम्हाला शिवू नये १ देव निष्काम असल्यामुळे त्याच्याहून फारच निराळा आहे २ जेथे नाना वासनांचा गुता आहे [तेथें ब्रह्मस्थिती कशी अनुभवास येणार ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, जेथे देहबुद्धी शिल्लक आहे, त्याची सेवा देवापुढे कधी रुजू होत नाही ४

२३७८ नमितों या देवा । माझी एके ठायीं सेवा ॥ १ ॥
गुणअवगुण निवाडा । म्हैस म्हैस रेडा रेडा ॥ २ ॥
जनीं जनार्दन । साक्ष त्यासी लोटांगण ॥ ३ ॥
तुका म्हणे खडे । निवडू दळणीं घडघडे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – घडघडे–घडघडतील, खडखड वाजतील

अर्थ – मी या देवाला नमन करतो माझी सेवा याच एका ठिकाणी आहे १ म्हैस ती म्हैस व रेडा तो रेडा इतका स्पष्ट निवाडा कवितेतील गुण व अवगुण यांचा असतो २ जगामध्ये जनताजनार्दन हा एकच साक्षी असल्याने मी त्यास लोटांगण घालीत आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, दळण दळण्याच्या धान्यातील खडे निवडून काढू, नाहीतर ते दळण्याच्या वेळी धडधडतील ४

विवरण – सालोमालो नावाचा कुणी एक हरिदास तुकारामबुवांच्या वेळी होता तो बुवांच्या अभंगात आपले स्वत चे चारदोन शब्द घालून ते अभंग स्वत चे म्हणून मिरवी त्याच्या या कृत्याचा बुवांनी वरील आठ अभंगात निषेध केला आहे श्रेष्ठ कवीच्या काव्याची मोडतोड करून ते आपणे स्वतच्या नावाने खपविण्याचा उद्योग नेहमीच होत असतो बुवांनी या प्रवृत्तीचा येथ कडक शब्दात धिक्कार केला आहे भुसातून कण निवडणे सोपे असून खरे रसिक हे काम चांगले करतात असे त्यांनी सुचविले आहे संतांची वचने प्रासादिक असतात ईश्वरी कृपेचा ठसा त्यांवर असतो तो मोडून आपली नवी भूषणे भरण्याचा 'वचभगळ' प्रकार हरिदास म्हणविणाऱ्या सालोमालोनी करावा हे बुवांना पसंत पडले नाही

१ गुती, २ असा

२३७९ जीव जीती[1] जीवना संगें । मत्स्या मरण त्या वियोगें ॥ १
जया चित्तीं जैसा भाव । तयां जवळि तैसा देव ॥ २ ॥
सकळां पढियें भानु । परि त्या कमळाचे जीवनु ॥ ३ ॥
तुका म्हणे माता । वाहे तान्हयाची चिंता ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – जीती–जगतात, जीवन–पाणी, मत्स्या–माशास, पढियें–आवडता, भानु–सूर्य, कमळाचे–सूर्यामुळे विकसणारे, फुलणारे कमळ

अर्थ – सर्व प्राणी पाण्याच्या साहाय्यानेच जगतात हे खरे, परंतु पाण्याचा वियोग होताक्षणीच माशाला मात्र मरण येते १ ज्याच्या चित्तामध्ये जसा भाव असतो त्याप्रमाणे देव त्याच्या जवळ निवास करतो २ सूर्य तर सर्वांचाच आवडता असतो परंतु सूर्यविकासिनी कमळाचे तो तर प्रत्यक्ष जीवनच आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, तान्हे मूल सर्वांनाच आवडत असले तरी त्याच्या आईला त्याची काळजी विशेषच असते ४

२३८० मुंगीचिया घरा कोण जाय[2] मूळ । देखोनिया गूळ धाव घाली ॥ १ ॥
याचकाविण काय खोळंबला दाता । तोचि धावे हिता आपुलिया ॥ २ ॥
उदक अन्न काये म्हणे मज खा ये । भुकेला तो जाये चोजवीत ॥ ३ ॥
व्याधी पिडिला धावे वैद्याचिया घरा । दुःखाच्या परिहारा आपुलिया ॥ ४ ॥
तुका म्हणे जया आपुले स्वहित । करणे तोचि प्रीत धरी कये ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – मूळ–आमंत्रण, चोजवीत–शोध करीत

अर्थ – गूळ खायला या असे आमंत्रण मुंगीच्या घरी जाऊन कोण देत असतो ? तो गूळ पाहून आपण होऊनच गुळाकडे धावत येते १ दाता कधी याचकासाठी खोळंबून राहिलेला असतो काय ? तो याचकच आपले हित साधण्यासाठी दात्याकडे धावत येतो २ 'या, मला खा' असे कधी अन्नपाणी म्हणतात काय ? जो भुकेलेला आहे तो त्याचा शोध करीत येतच असतो ३ जो रोगांनी पीडलेला आहे तो वैद्याच्या घरी धावतच जातो आपले दुःख दूर व्हावे म्हणून तो वैद्याचा शोध घेतो ४ तुकाराम महाराज म्हणतात, ज्याला स्वतःचे हित व्हावे असे वाटते तो हरिकथेवर प्रीती करतोच ५

२३८१ जन्मांतरिंचा परिट न्हावी । जात ठेवी त्यानें ते ॥ १ ॥
वाखर जैसा चरचरी । तोंड करी सवदणी ॥ २ ॥
पूर्व जन्म शिखासूत्र । मळ मूत्र अंतरीं ॥ ३ ॥
तुका म्हणे करिती निंदा । धुवटधंदा पुढिलाचा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – जन्मांतरिंचा–पूर्वजन्मीचा वाखेर–वस्तरा, सवदणी–परटाचे कपडे धुण्याचे पात्र

अर्थ – पूर्वजन्मी कोण परीट होता, कोण न्हावी होता, हे पुढे दिलेल्या कृतींवरून समजून येईल १ ज्याचे बोलणे वस्तऱ्याप्रमाणे चरचर करण्यासारखे म्हणजे कटू असते तो पूर्वजन्मी न्हावी होता असे समजावे २ आणि ज्याच्या मुखातून सतत दुसऱ्याची निंदाच येते ते तोंड म्हणजे परिटाचे कपडे धुण्याचे पात्र समजावे ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा लोकांचा धंदा म्हणजे दुसऱ्यांची निंदा करून त्यांना शुद्ध करण्याचा आहे ४

[1] जीवती, [2] धाडी

२३८२ नामें[१] दूषी त्याचे नको दरषण । विष तें वचन वाटे मज ॥ १ ॥
अमंगळ वाणी नाइकवे कानीं । निंदेची पोहणी उठे तेथें ॥ २ ॥
काय साचें लभ्य त्याचिये वचनीं । कोणत्या पुराणीं दिली ग्वाही ॥ ३ ॥
काय आड लावूं त्याचिया तोंडासी । आता या जिभेसी काय करूं ॥ ४ ॥
तुका म्हणे संत न मनिती त्यास । घेऊं पाहे ग्रास यमदूत ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – दरषण–दर्शन, पोहणी–घाण, दुर्गंधी, साच–खरोखर सत्य, ग्रास–घास, मनिती–मानीत

अर्थ – जो श्रीहरीच्या नामास दूषण देतो त्याचे दर्शनही मला नको त्याचे वचन म्हणजे मला विषाप्रमाणे वाटते १ त्याची वाणी अमंगळ असून ती कानानी ऐकवतही नाही कारण तिला नामाच्या निंदेची सतत घाण येते २ त्याच्या शब्दानी खरोखर काय लाभ होणार आहे ? याची साक्ष कोणत्या पुराणात दिलेली आहे ? ३ हरिनामाची निंदा करणाऱ्या माणसाच्या तोंडास काय लावून ते बंद करू ? त्याच्या जिभेस आता करू तरी काय ? ४ तुकाराम महाराज म्हणतात, अशा माणसाला संत बिलकुल मानीत नाहीत आणि यमाचे दूत तर त्याचा घास घेण्यासच टपलेले असतात ५

२३८३ येऊनि नरदेहा झांकितील डोळे । बळेंचि अंधळे होती लोक ॥ १ ॥
उजडासरसी न चलती वाट । पुढील बोभाट जाणोनिया ॥ २ ॥
बहु फेरे आले सोसोनि वोळसा । पुढें नाहीं ऐसा लाभ मग ॥ ३ ॥
तुका म्हणे जाऊं सादावीत वाट । भेटे[२] तरी भेटे कोणी तरी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – सादवीत–सावध करीत

अर्थ – चांगला नरदेह प्राप्त होऊनही जे डोळे झाकून घेतील ते विचार न करता बळेच आंधळे होतात १ *ज्ञानाच्या प्रकाशाने जी वाट उजळलेली आहे तीने ते कधीच चालत नाहीत, पुढील जे याची आशा त्याना* का वाटत नाही ? २ आजवर पुष्कळ जन्माचे फेरे व चळसे सोसून या नरदेहाचा लाभ झाला आहे हा जर आता वाया घालविला तर मग पुढे असा लाभ होणार नाहीच ३ तुकाराम महाराज म्हणतात, आम्ही आमच्या मार्गाने लोकाना सावध करीत जाऊ कुणीतरी आमचे ऐकणारा आम्हास भेटेलच ४

२३८४ नव्हे जाखाई जोखाई । मायराणी मेसाबाई ॥ १ ॥
बळिया माझा पंढरिराव । जो या[३] देवाचा ही देव ॥ २ ॥
रंडी चंडी शक्ति । मद्यमांसातें भक्षिती ॥ ३ ॥
बहिरव खंडेराव । रोटीसुटीसाटीं देव ॥ ४ ॥
गणोबा[४] विक्राळ । लाडुमोदकाचा काळ ॥ ५ ॥
मुंज्या म्हैसासुरें । हे तों कोण लेखी पोरें ॥ ६ ॥
वेताळें फेनाळें । जळो त्याचे तोंड काळें ॥ ७ ॥
तुका म्हणे चित्तीं । धरा रखुमाईचा पती ॥ ८ ॥

अर्थः– जाखाई, जोखाई, मायाराणी, मेसाबाई या क्षुद्र देवता म्हणजे देव नव्हे. १ माझा पंढरीनाथ हा सर्व देवांत श्रेष्ठ असून तो सर्व देवांचाही देव आहे २ रंडी, चंडी या शक्तिदेवता मद्यमांसाचे भक्षण करणाऱ्या आहेत ३ वहिरोबा आणि खंडोबा हे देव तर भरितरोडग्यांना खाणारे आहेत ४ मोठ्या देहाचा गणपतीबाबा तर लाडूमोदकांचा काळ आहे ५ मुंजाबा, म्हैसासुर यांची गणना तर पोरांतच करावी लागेल ६ वेताळ-पिशाचांचे तर काळे तोंड जळून जावो ७ तुकाराम महाराज म्हणतात, तुम्ही आपल्या चित्तात एक रखुमाईचा पती पांडुरंग धारण करा ८

विवरण – तुकारामबुवांच्या काळी खऱ्या देवाचे रूप न ओळखता नाना प्रकारच्या क्षुद्र देवतांची उग्र व वामिक उपासना लोक करीत असत देवाच्या, धर्माच्या, भक्तीच्या नावावर वाटेल तसा अनाचार करण्यास भोंदू-गुरु व त्यांचे भगतगण प्रवृत्त झालेले होते जोखाई, रंडी, चंडी यासारख्या क्षुद्र देवतांना मांसाचा व रक्ताचा नैवेद्य दाखविण्याची अघोरी पद्धत बळावत होती शक्तीच्या उपासकांत वाममार्गाचे प्राबल्य होत होते मांस, मद्य, मैथुन असे घाणेरडे प्रकार परमार्थाच्या क्षेत्रात शिरून धुडगूस घालत होते बहिरोबा, खंडोबा, मुंजाबा, म्हैसासुर या चिरकोळ देवाचे माहात्म्य वाढत होते खऱ्या देवाचे प्रेमस्वरूप कुणासच पटत नव्हते. व्यावहारिक लाभासाठी लोक या क्षुद्र देवदेवतांच्या नादी लागून अनाचारास प्रवृत्त झालेले पाहून तुकोबाना त्यांची कीव आली, आणि त्यांनी कडक शब्दात त्याचा निषेध केला आहे देवांचाही जो देव पंढरीनाथ त्याला प्रेमाने भजावे, असा त्यांचा उपदेश आहे. केवळ रखुमाईचा प्रेमळ पती चित्तात धारण करावा अशी त्यांची शिकवण आहे 'हरिहर सांडूनिया देव । धरती भाव क्षुल्लकीं ' याबद्दल बुवांच्या मनास फार खेद होत असे यात देव व भक्त अशा दोघांचीही विटंबनाच नव्हे काय ? गळ्यात कवड्यांची माळ घालणारे, माथ्यावर शेंदुर थापणारे, दात करकरा खाणारे, लोकांना व्यसनात लुबाडणारे क्षुद्र देव तुकोबाना नको होते 'बहु लाज वाटे चित्ता । आणिका ते देव म्हणितां ' असे म्हणून त्यांनी स्पष्ट केले आहे की, 'सांडूनिया हिरा । कोणें वेचावें त्या गारा ?' हिरा सोडून क्षुल्लक गारांची वेचणी कुणी करावी ? पण पुष्कळ लोक 'अवघियांचा धणी । त्यासी गेलीं विसरोनी ' अशी स्थिती असल्यामुळे तुकोबांनी स्पष्टपणे आपले मत दिले आहे की 'बहुत गेलीं वाया । न भजतां पंढरीराया ॥ ' एका पंढरीरायाला न

नामाच्या[1] चिंतनें । बारा वाटा पळती विघ्नें ॥ ३ ॥
तुका म्हणे प्राण । करा देवासी अर्पण ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा– जड–संकट, नेदी–देत नाही, सीण–कष्ट, त्रास

अर्थ – एखादे फार मोठे संकट आले की दासांनी, हरीच्या भक्तांनी श्रीहरीची आठवण करावी १ मग तो आपल्या भक्तांना त्रास होऊ देत नाही त्याच्या रक्षणासाठी सुदर्शनचक्र धरून तो दूर करतो २ श्रीहरीच्या नामचिंतनामुळे नाना प्रकारची विघ्ने बारा वाटांनी पळून जातात ३ तुकाराम महाराज म्हणतात, म्हणून आपला प्राण भगवतास अर्पण करावा ४

हा एक अभंग एका फार मोठ्या तत्त्वाचे सुबोध दर्शन घडविणारा असून भक्तांना दिलासा देणारा आहे एखादे मोठे संकट येत राहिले तर भक्तांनी आपल्या देवाचे नुसते स्मरण अंत:करणपूर्वक करावे देव त्याचे संकट दूर करील तो आपल्या भक्तांना कसलाही शीण होऊ देणार नाही त्याचे रक्षण करण्याची जबाबदारी स्वत: भगवंतानीच घेतली असल्याचे स्पष्ट झालेले आहे 'अनन्याश्चिन्तयन्तो मां ये जना: पर्युपासते । तेषां नित्याभियुक्तानां योगक्षेमं वहाम्यहम '—जे अनन्यनिष्ठ लोक माझे चिंतन करून मला भजतात त्या नित्ययोगयुक्त पुरुषांचा योगक्षेम मी चालवत असतो मात्र हे भक्त अनन्य वृत्तीने स्मरण करणारे असावेत अशा भक्तांना 'मीवाचूनि कांहीं । आणीक गोमटेंचि नाहीं ' त्यांना ईश्वरावाचून दुसरे काही सुचतच नाही अशा भक्तांची सेवा ईश्वर आपण होऊन करीत असतो ज्ञानेश्वरांनी ईश्वराच्या या प्रेममय तत्परतेचे वर्णन करताना म्हटले आहे ' आपली तहान भूक नेणें । तान्हया निकें तें माउलीसीचि करणें । तैसें अनुसरले जे मज प्राणें । तयांचेन काइसेनिहि न लजे मी ॥ 'आपली तहान भूक न जाणता मुलाचे उचित अनुचित काय ते आईच जाणीत असते

२३८६ मायें मोकलिलें कोठें जावें बाळें । आपुलिया बळें न वचे[2] तें ॥ १ ॥
रुसोनिया पळे साडुनिया[3] ताट । मागें पाहे वाट यावें ऐसी ॥ २ ॥
भांडवल आम्हां आळी करावी हे । आपणची माये धांवसील ॥ ३ ॥
तुका म्हणे आळी करुनिया निकी । देसील भातुकी बुझाऊनि ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – मोकलिले–सोडल्यावर, आळी–हट्ट, निकी–चांगली, जोरदार, भातुकी–प्रेमाचा खाऊ, बुझाऊनि समजावून

अर्थ – आईने एकदा सोडल्यावर मग तिच्या बालकाने जावे तरी कोठे ? तो आपल्या सामर्थ्याने कधीच वाचणार नाही १ आईने जेवणासाठी वाढलेले ताट टाकून तो रुसतो आणि दूर पळून जातो आणि आईने आपणास बोलवावे म्हणून वाट पहात असतो २ आम्ही लेकरांनी हट्ट करणे हेच आमचे मुख्य भांडवल आहे विठ्ठलमाऊले, तूच मग आपण होऊन प्रमाने आमच्याकडे धावत येशील ३ तुकाराम महाराज म्हणतात, चांगला हट्ट केल्या-नंतर तू आम्हाला प्रेमाचा खाऊ देऊन आमची समजूत काढशील ४

विवरण–ईश्वराच्या वात्सल्याचे फार बहारदार वर्णन करणारे प्रसंग बुवांनी या अभंगात चित्रित केलेत आहेत लहान मुलास काय स्वत:च्या बळावर मोठे होता येईल ? आईनेच त्याला सोडल्यावर तो जाणार तरी कुठे? उलट तोच आईवर रुसतो वाढलेले ताट मागे सारून तो पळून जातो आणि मनात इच्छा मात्र अशी की आईने आपल्या मागे धावून यावे, आपली समजूत काढावी आणि आपणास पुन: पाटावर बसवावे हा अतिशय घरगुती व वात्सल्यपूर्ण अनुभव बुवांनी या अभंगात सजीवतेने रंगविला आहे हट्ट करणे एवढेच आमचे काम,आणि तो पुरविणे ईश्वराचे काम. या श्रेष्ठ भूमिकेवरील वात्सल्य तुकाराम महाराजांच्या इतर अभंगातूनही वारंवार दृष्टीस पडते ' तू माऊलीहून मायाळ । चंद्राहूनी शीतळ । पाणियाहूनि पातळ । कल्लोळ प्रेमाचा ।' या एका सरस अभंगात

१ हरिनामाच्या, २ वाचे, ३ सोडोनिया.

बुवांनी ईश्वराच्या मायाळूपणाचा गौरव केला आहे 'आळी करावी तें कळतें बाळका। मुखावे हें कां नेणां तुम्हीं–' या ओळीत ईश्वराचे व भक्ताचे कर्तव्य कोणते ते सुचविले आहे कधीकधी आई निष्ठुर झाली तरी काय तिच्या चित्तातील प्रेमभाव आटेल की काय ? 'बाळा माते निष्ठुर होये। परी ते स्नेह करीत आहे' असाच अनुभव सर्वत्र येतो मातृप्रेमाचे व वात्सल्याचे असे अनेक हृद्य उल्लेख तुकारामबुवांनी आपल्या अभंगातून केले आहेत

२३८७ नागर गोडें[1] बाळरूप। तें स्वरूप काळींचें ॥ १ ॥
गाईगोपाळांच्या मगें। आलें लागें पुंडलीका ॥ २ ॥
तें हें ध्यान दिगंबर। कटीं कर मिरवती ॥ ३ ॥
नेणपणें उगेंचि उभें। भक्तिलोभें राहिलें ॥ ४ ॥
नेणे वरदळाचा मान। विटे चरण सम उभें ॥ ५ ॥
सहज कटावरी हात। दहींभात शिदोरी ॥ ६ ॥
मोहरी पावा गांजिवा पाठीं। धरिली काठी ज्या काळें ॥ ७ ॥
रम्य स्थळ चंद्रभागा। पांडुरंगा क्रीडेसी ॥ ८ ॥
भीमा दक्षणमुख वाहे। दृष्टी पाहे समोर ॥ ९ ॥
तारावेसे मूढ लोक। दिली भाक पुंडलिका ॥ १० ॥
तुका म्हणे वैकुंठवासी। भक्तापासीं राहिला ॥ ११ ॥

शब्दार्थ व टीपा – नागर–सुंदर, गोडें–गोंडस, वरदळांचा–वरवरचा मोहरी–मुरली, गांजिवा–फळे वगैरे नेण्याचे जाळें, भाक–शब्द वचन

अर्थ – या श्रीहरीचे हे बाळरूप मोठे सुंदर व गोंडस दिसते बाल्यावस्थेतील हे स्वरूप असे आहे १ गाईगोपाळांच्या बरोबर ते पुंडलीकासाठी पंढरपुरास आले २ हे ध्यान दिगंबर असून त्याने आपले हात कमरेवर ठेवून मिरविले आहेत ३ हे अज्ञानाची भूमिका घेऊन उगीचच भक्तीच्या लोभाने उभे राहिलेले आहे ४ वरवर प्रेम दाखविणारांचा हा मान ठेवीत नाही हा विटेवर समचरण ठेवून उभा आहे ५ या श्रीहरीने आपले हात सहजच कमरेवर ठेविले असून दहीभाताची शिदोरी बरोबर घेतलेली आहे ६ मुरली, पावा, फळे वगैरे नेण्याचे जाळे इत्यादी वस्तू याने पाठीवर घेतल्या असून गुराचे रक्षण करण्यासाठी याने हातात काठी घेतलेली आहे ७ या पांडुरंगास क्रीडा करण्यासाठी हे चंद्रभागातीर अतिशय रम्य असे आहे ८ याच्या दृष्टीसमोर भीमा नदी दक्षिणमुख होऊन वाहात आहे ९ मतिमंद व पतित लोकांना तारण्याबद्दल याने पुंडलीकास वचन दिले आहे १० तुकाराम महाराज म्हणतात असा हा वैकुंठात राहाणारा श्रीहरी भक्तापाशी येऊन उभा राहिलेला आहे ११

२३८८ विठ्ठलनामाचा नाहीं ज्या विश्वास। तो वसे उदास नरकामध्यें ॥ १ ॥
त्यासी बोलतां होईल विटाळ। नवे[2] जाये तो जळस्नान करितां ॥ २ ॥
विठ्ठलनामाची नाहीं ज्या आवडी। त्याची काळ घडी लेखिताहे ॥ ३ ॥
तुका म्हणे मज विठोबाची आण। जरी प्रतिवचन करिन त्यासी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – उदास–दुःखी घडी–घटका, आण–शपथ

अर्थ – विठ्ठलनामाचा ज्यास विश्वास वाटत नाही, तो दुःखी होऊन नरकातच पडेल १ त्याच्याशी नुसते भाषण केले तरी विटाळ होईल पाण्यात स्नान केले तरी तो विटाळ मग जाणार नाही २ विठ्ठलाच्या

१ गोडें, २ न वजे तो

नामाची ज्यास आवड नाही, त्याच्या आयुष्याची घटका काळ मोजीत असतो ३ तुकाराम महाराज म्हणतात ' मी जर त्याच्याशी भाषण करीन तरी मला विठ्ठलाची शपथ आहे ४

२३८९ तया घडले सकळ नेम । मुखीं विठोबाचे नाम ॥ १ ॥
काहीं न लगे सिणावे । आणिक वेगळाल्या भावे ।
वाचे उच्चारावे । रामकृष्णगोविंदा ॥ २ ॥
फळ पावाल अवलिळा । भोग वैकुंठ सोहळा ॥ ३ ॥
तुका म्हणे त्याच्या नावे । तोचि होइजे स्वभावे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – अवलिळा–सहज

अर्थ – ज्याच्या मुखात विठोबाचे नाम आहे त्याला सर्व नियमाचे फळ प्राप्त होते १ यासाठी नाना प्रकारच्या साधनाच्या वाटानी जाऊन उगाच श्रम घेऊ नयेत रामकृष्णगोविंद असे नाम मात्र वाणीने सतत उच्चारावे २ यामुळे वैकुंठाच्या सुखसोहळयाचे फळ तुम्हास सहजासहजी मिळत राहील ३ तुकाराम महाराज म्हणतात, त्या श्रीहरीच्या नामचिंतनाच्या योगाने तुम्ही स्वभावत च हरिरूप होऊन जाता ४

२३९० पुराणप्रसिद्ध सीमा । नामतारकमहिमा ॥ १ ॥
मागें जाळी महा दोष । पुढें नाहीं गर्भवास ॥ २ ॥
जें निंदिले शास्त्रें । वद्य जाले नाममात्रें ॥ ३ ॥
तुका म्हणे ऐसा । त्रिभुवनीं नामठसा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – सीमा–मर्यादा

अर्थ – नाम हे पापी जीवाना तारक आहे असा महिमा पुराणामध्ये प्रसिद्ध असल्याची सीमा झालेली आहे १ हरिनामाच्या चिंतनामुळे मागील महादोष जळून जातात व मग पुन काही जन्म घ्यावा लागत नाही २ शास्त्रांनी जे निंदिले, दोषी ठरविले ते नामस्मरणामुळे वद्य ठरते ३ तुकाराम महाराज म्हणतात, त्रैलोक्यात असा हा नामाचा ठसा प्रसिद्ध आहे ४

२३९१ नाम घेता न लगे मोल । नाममंत्र नाहीं खोल ॥ १ ॥
दोंचि अक्षराचे काम । उच्चारावे राम राम ॥ २ ॥
नाहीं वर्णधर्मयाती । नामीं अवघींचि सरतीं ॥ ३ ॥
तुका म्हणे नाम । चैतन्य निजधाम ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – मोल–किंमत

अर्थ – श्रीहरीचे नाम घेण्यासाठी काही किंमत द्यावी लागत नाही शिवाय हा नाममंत्र फार अवघडही नाही १ ' राम ' या दोन अक्षरांचेच काम आहे, म्हणूनच वाणीने ' राम राम ' असा उच्चार करावा २ या नामाच्या ठिकाणी धर्म, वर्ण, जात असा भेदभाव नसतो हरिनामाच्या ठिकाणी सर्वच समान रूपाचे असतात ३ तुकाराम महाराज म्हणतात, असे हे श्रीहरीचे नाम चैतन्याचे स्वत चे निवासस्थान आहे ४

२३९२ नाम घेता वाया गेला । ऐसा कोणे आईकिला ॥ १ ॥
सांगा विनवितो तुम्हासी । संत महंत सिद्ध ऋषी ॥ २ ॥
नामें तरला नाहीं कोण । ऐसा द्यावा निवडून ॥ ३ ॥
सलगीच्या उत्तरा । तुका म्हणे क्षमा करा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीप '— उदंड-पुष्कळ, अतिशय, सिद्ध-सिद्धी जाणणारे योगी

अर्थ श्रीहरीचे नाम घेतल्याने कोणी वाया गेला असे तुम्ही कधी ऐकले आहे काय ? १ अहो, संत, महंत, सिद्ध, ऋषी तुम्ही तरी याबद्दल सांगा, अशी विनंती मी तुम्हांस करीत आहे २ नेहमी नामस्मरण करून तरला नाही असा एखादा तरी निवडून तुम्ही दाखवाल काय ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी तुमच्या जवळ मोठ्या सलगीने हे बोलत आहे त्याची मला क्षमा करावी ४

२३९३ फुकाचें तें लुटा सार । व्हा रे अमर सदैव ॥ १ ॥
नाहीं गर्भवास पुढती । डोंगर जळती दोषांचे ॥ २ ॥
उदंड भावें उदंड घ्यावें । नाम गावें आवडी ॥ ३ ॥
तुका म्हणे घरिच्या घरीं । देशा उरीं न सीणीजे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा — उदंड-पुष्कळ, अतिशय

अर्थ '— सारभूत असणारे श्रीहरीचे नाम तुम्ही फुकटच्या फुकट लुटा व त्यायोगाने नित्य अमर व्हा, सुदैवी व्हा १ पुढे, कधी तुम्हांस जन्म घ्यावा लागणार नाही, आणि पुढील पापांचे डोंगर मात्र जळून जातील २ अतिशय तीव्र भावभक्तीने हरिनाम घ्यावे, प्रेमाने श्रीहरीच नाम गावे ३ तुकाराम महाराज म्हणतात, श्रीहरीच्या नामस्मरणामुळे घरच्या घरी त्याचा लाभ होतो त्यासाठी देशभर भटकण्याचा शीण घ्यावा लागत नाही ४

२३९४ प्रीती नाहीं राया[1] वर्जिली ते कांता । परी तिची सत्ता जगावरी[2] ॥ १ ॥
तैसे दंभी जालों तरी तुझे भक्त । वास यमदूत न पाहाती ॥ २ ॥
राजयाचा पुत्र अपराधी देखा । तो काय आणिकां दंडवेल ॥ ३ ॥
बाहातरी खोडी परी देवमण कंठीं । तैसा जगजेठी म्हणे तुका ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :— राया-राजाने, वर्जिली—टाकली, सोडली, वास—वाट बाहातरी खोडी-बहात्तर खोडींचा, देवमण—घोडयाच्या गळयातील शुभदायक केसांचा भोवरा

अर्थ — प्रीती नसलेल्या आपल्या राणीचा त्याग जरी राजाने केलेला असला तरी सर्व जगावर तिचा अधिकार चालू शकतो १ त्याप्रमाणेच आम्ही जरी दांभिक बनलो असलो तरी शेवटी तुमेच भक्त आहोत, म्हणून आमची वाट यमदूत कधी पाहात नाहीत २ राजाच्या मुलाने जरी मोठा अपराध केला तरी त्याला शिक्षा करता येईल का ? पाहा ना ३ तुकाराम महाराज म्हणतात, एखाद्या घोड्याला जरी बहात्तर खोडी असल्या तरी त्याच्या गळ्यास देवमण असेल तर त्याच्या इतर खोडी व्यर्थच होतात जगजेठी विठ्ठला, त्याचप्रमाणे माझी अवस्था आहे ४

२३९५ करावा उद्धार किंवा घ्यावी हारी । एका बोला स्थिरी राहें देवा ॥ १ ॥
निरसनें माझा होईल संदेह । अवघेंचि आहे मूळ पायीं ॥ २ ॥
राहिलों चिकटून कांहींचि न कळे । कोणा नेणों काळे उदय भाग्य ॥ ३ ॥
तुका म्हणे बहु उद्वेगला जीव । भाकीतसें कीव देवराया ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा — हारी-पराजया, हार, मूळ—आश्रयस्थान

अर्थ — देवा, तुम्ही माझा उद्धार तरी करा किंवा उद्धार करवत नाही अशी पराजयाची कबुली तरी द्या कोणत्या तरी एका बोलावर तुम्ही स्थिर राहा १ तुम्ही माझ्या संशयाचे निरसन करावे किंवा देवा, तुम्ही

[1] राय, [2] सर्वांवरी

माझी निराशा कराल तर माझा संशय मात्र वाढेल; कारण माझे सर्व आश्रयस्थान तुमच्याच पायांशी आहे. २ मी तुमच्या पायास चिकटून राहिलेलो आहे. त्याच्यावाचून दुसरे काहीच मला समजत नाही. माझे भाग्य आता कोणत्या काळात उदयास येईल ते काही समजत नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, माझा जीव या चिंतेने फारच गलबलून गेला आहे. म्हणूनच मी तुमची करुणा भाकीत आहे ४

२३९६ आलिया भोगासी असावें सादर। देवावरी भार घालूं[1] नये ॥ १ ॥
मग तो कृपासिंधु निवारी सांकडें। येर तें बापुडें काय रंक ॥ २ ॥
भयाचिये[2] पोटीं दुःखाचिया रासी। शरण देवासी जातां भलें ॥ ३ ॥
तुका म्हणे नव्हे काय त्या करितां। चिंतावा तो आतां विश्वंभर ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:– सादर-तयार, उत्सुक, सांकडें-संकट, येर–इतर, दुसरे, रंक-दीन, भिकारी.

अर्थ – प्रारब्धकर्मानुसार जे भोगावे लागणार आहे ते भोगण्यासाठी देवावर भार न घालता स्वतः भोगण्यास सिद्ध असावे. अथवा, देवावर भार घालून आपण भोगण्यासाठी तयार असावे. १ यानंतर मात्र तो कृपेचा सागर भक्तांवरील संकट दूर करील इतर दीन बापडे या कामी काय करू शकणार ? २ मनात एकदा भीती निर्माण झाली की त्यातून दुःखाच्या राशीच्या राशी निर्माण होतात; यासाठीं देवाला शरण गेले की बरे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, त्याने केले असता काय होणार नाही ? म्हणून त्या विश्वंभराचे चिंतन करावे. ४

२३९७ भोग तो न घडे संचितावांचूनि। करावें तें मनीं समाधान ॥ १ ॥
म्हणऊनी मनीं मानूं नये खेद। म्हणावा गोविंद वेळोवेळां ॥ २ ॥
आणिकां रुसावें न लगे बहुतां। आपुल्या संचितावांचूनियां ॥ ३ ॥
तुका म्हणे भार घातलिया वरी। होईल कैवारी नारायण ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– संचितावांचूनि-साचलेल्या प्रारब्धकर्मानुसार.

अर्थ:– आपल्या संचित प्रारब्धकर्मानुसार जे सुखदु:खादी भोग असतात ते भोगावेच लागतात. या विचाराने मनाचे समाधान करावे. १ यासंबंधी मनात काही खेद बाळगू नये. वारंवार गोविंदाचे नाव घ्यावे. २ आपल्या प्रारब्धकर्मावाचून कुणावरच कधी रुसू नये. ३ तुकाराम महाराज म्हणतात, आपण आपला सर्व भार त्या नारायणावर घातल्यावर तो आपला कैवारी होईल. ४

२३९८ निर्वैर व्हावें सर्वभूतांसवें। साधन बरवें हेंचि एक ॥ १ ॥
*तरीच अंगीकार करिल[3] नारायण। बडबड तो सीण येरेंविण ॥ २ ॥*
सोइरे पिशुन समानचि घडे। चित्त पर ओढे उपकारी ॥ ३ ॥
तुका म्हणे चित्त जालिया निर्मळ। तरिच सकळ केलें होय ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– पिशुन–परके लोक.

अर्थ– सर्व प्राणिमात्रांच्या ठिकाणी आपण निर्वैर व्हावे, कुणाविषयीही वैर धरू नये हेच एक चांगले साधन आहे १ असे झाले तरच नारायण आपला स्वीकार करील याशिवाय इतर बडबड व्यर्थ आहे. २ आपले जवळचे सोयरे आणि परके लोक ज्याना समान वाटतात व ज्याचे चित्त परोपकाराकडे ओढ घेते त्यांचा स्वीकार नारायण करील. ३ तुकाराम महाराज म्हणतात, आपले चित्त जर निर्मळ असेल तर सर्व केल्याचे सार्थक होईल ४

१ घालूंनिया, २ भयाचिया, ३ करी.

तु. गाथा–२ ..६२

२३९९ दिली चाले वाचा। क्षय मागित्या तपाचा ॥ १ ॥
रिद्धि सिद्धि येती घरा। त्याचा करिती पसारा ॥ २ ॥
मानदंभांसाटीं। पडे देवासवे तुटी ॥ ३ ॥
तुका म्हणे मेवा। वेंचा वेठीच्या निर्देवा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा– क्षय–नाश

अर्थ – आपण एखाद्यास आपल्या सिद्ध वाणीने शाप अथवा आशीर्वाद दिला तर त्या प्रमाणात आपले तप नाश पावेल १ अशा रीतीने सिद्धी व सिद्ध त्याचा घरी येऊन त्याच्या साधुत्वाचा प्रसार करतात २ पण यामुळें त्याचा मानदंभ वाढतो आणि यामुळे देव मात्र दुरावला जातो ३ तुकाराम महाराज म्हणतात एखाद्या मजुराच्या डोक्यावर मेवामिठाईचे ओझे दिले तर त्यास त्याचा काय उपयोग ? ४

२४०० तापल्यावांचून नव्हे अळंकार। पिटूनियां सार उरलें तें ॥ १ ॥
मग कदाकाळीं नव्हे शुद्ध जाति। नासें शत्रु होती मित्र तेचि ॥ २ ॥
कळिवर बरें भोगू द्यावे भोगा। फासिलें तें रोगा हाती सुटे ॥ ३ ॥
तुका म्हणे मन करावे पाठेळ। साहावेचि जाळ सिजेंवरि ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – कळिवर–शरीर, फासिलें–फासण्या टाकून फोडल ते, पाठेळ–ओझ्याच्या जनावराप्रमाणे धीट

अर्थ – चांगल्या प्रकारे तापविल्याशिवाय अथवा ठोकल्याशिवाय असार जळून सारभूत शुद्ध सोने उरून त्याचा अलंकार होत नाही १ असे केले तर मग केव्हाही जे अशुद्ध आहे ते शुद्धपणास येणार नाही जे मित्र आहेत त्याचा काही नाश केला तर तेच शत्रू होतात २ आपल्या देहास प्रारब्धभोग जे जे आहेत ते भोगू द्यावेत उठाव्या गळवास फासण्या टाकल्या आहेत तेच फुटून रोगापासून मुक्त होते ३ तुकाराम महाराज म्हणतात आपल्या मनास चांगले धीट करावे पदार्थ चांगले शिजेपर्यंत अग्नीची आग सहन करावी लागते ४

२४०१ पाठळे करिता न साहावे वारा। साहेलिया ढोरा गोणी चाले ॥ १ ॥
आपणां आपण हेचि कसवटी। हर्षामर्ष पोटीं विरो द्यावे ॥ २ ॥
नवनीत तोंवरी कडकडी लोणी। निश्चळ होऊनी राहे मग ॥ ३ ॥
तुका म्हणे जरी जग टाकी घाया। त्याच्या पडे पायां जन मग ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा –पाठळे–ओझ्याचे जनावर

अर्थ –ओझ्याच्या जनावरास धीट करीत असताना ते माणसाचा वाराही सहन करीत नाही पण पुढे ते माणसाळले की मग पाठीवर मोठ्या गोण्या देखील घेऊन जाऊ शकते १ याप्रमाणे आपणास अशी कसोटी लावून दुःख आनंद यांचे कढ पोटात विरू द्यावेत २ जोपर्यंत कडणाऱ्या तुपात लोण्याचा भाग आहे तोपर्यंतच ते कडकड करीत असते पण मग लोणी नाहीसे झाल्यानंतर मात्र निश्चळ असे तूप खाली उरते ३ तुकाराम महाराज म्हणतात, टाकीचे घाव सहन करून जो जगेल त्याच्याच लोक पाया पडतील ४

२४०२ कावळियासी नाहीं दया उपकार। काळिमा अंतर विटाळसे ॥ १ ॥
तैसे कुधनाचे जिणे अमंगळ। घाणेरी बोगळ वदे वाणी ॥ २ ॥
कडू भोंपळ्याचा उपचारें पाक। सेविल्या तिडीक कपाळासी ॥ ३ ॥
तुका म्हणे विष साडू नेणे[1] साप। आदरें तें पाप त्याचे ठायीं ॥ ४ ॥

---
१ नये

शब्दार्थ व टीपा – अंतर–मन कुधनाचे–वाईट मार्गाने ज्याने धन मिळविले आहे अशाचे

अर्थ – कावळ्यास कुणाची दया येत नाही, की कुणाचे उपकारही माहीत त्याचे मन काळिमेनेचे विटाळलेले असते १ त्याचप्रमाणे ज्याच्या जवळ वाईट मार्गाने विटाळलेले धन आहे अशाचे जगणेच अमंगल आहे त्याच्या वाणीतून घाणेरडे व अमंगल शब्द बाहेर पडत असतात २ कडू भोपळ्याचे खूप चामले पदार्थ साखरेचा पाक करून केले तरी त्याचे सेवन केल्यास कपाळास तिडीकच उठते ३ तुकाराम महाराज म्हणतात, साप कधी विषाचा त्याग करु शकत नाही त्याच्या ठिकाणी नेहमी पापाचाच आदर वसत असतो ४

२४०३ लाभ खरा नये तुटी । नाहीं आडखळा भेटी ॥ १ ॥
जाय अवघिया देशा । येथें सचलासी तैसा ॥ २ ॥
मग न लगे पारखी । अवघीं सकट[1] सारखीं ॥ ३ ॥
तुका म्हणे बोळे । रूपें भुलविले डोळे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – सचलासी–साचलला बोळे–प्रकट झाला

अर्थ – श्रीहरीचे चिंतनाचा लाभ हा खरा आहे यापासून काही नुकसान तर होत नाही व त्याच्या भेटीस अडचणाही येत नाही १ हा माल सव देशाना जाऊनही येथे जसाचा तसा भरलेला असतो २ त्याची एकदा प्राप्ती झाली की मग कुणी परीक्षा करणारा लागत नाही त्याच्या ठिकाणी सर्वजण सारखेच असतात ३ तुकाराम महाराज म्हणतात, असे हे श्रीहरीचे रूप सवत्र प्रकट असून त्यामुळे दृष्टी मोहित झालेली दिसते ४

२४०४ नको आता पुसो काहीं । लवलाहीं उसती ॥ १ ॥
जाय वेगीं पंढरपुरा । तो सोयरा दीनाचा ॥ २ ॥
वचनाचा न करीं गोवा । रिघें देवासीं शरण ॥ ३ ॥
तुका म्हणे कृपावंता । बहु चिंता दीनाची ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – उसती–संसारातून बाहेर ये, गोवा–गुंता रिघें–जा

अर्थ – आता तू दुसरेतिसरे काही विचारूच नकोस या संसारपाशातून लवकर बाहेर पड तू १ आणि त्वरेने पंढरपुरास जा तेथे दीनांना सांभाळणारा सोयरा पांडुरंग उभा आहे २ मी जाईन मी जाईन अशा शब्दाचा नुसता गुंता करून ठेवू नकोस तू त्या देवालाच शरण जा कसा ३ तुकाराम महाराज म्हणतात तो फार कृपावंत असून त्याला आपल्या दीन दासाची फारच चिंता आहे ४

२४०६ म्हणऊनि काकुळती । येतों पुढतों पुढती ।
तुम्हा असे हातीं । कमळापती भांडार ॥ १ ॥
फेडूं आलेती दरिद्र । तरी न लगें उशीर ।
पुरे अभयकर । ठाया[1] ठाव रकाशी ॥ २ ॥
कोठें न घली धाव । याजसाठीं तजिली हाव ।
घेऊं नेदी वाव । मना केला विरोध[2] ॥ ३ ॥
कारणाच्या गुणे । वेळ काळ तोही नेणे ।
तुमच्या कीर्तनें । तुका तुम्हा जागवी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – ठाया ठाव–जागच्या जागी, रकाशी–गरिवास, कारण–काय

अर्थ – देवा, तुमच्या हातातच सर्व भांडार असल्यामुळे कमलापती, मी एवढा काकुळतीस येत आहे १ तुम्ही सर्वांचे दारिद्र्य दूर करू शकता, तर आता उशीर करू नका जागच्या जागी गरिबास हाताने अभय दिले तरी आम्हांस पुरे होईल २ देवा, तुमच्याशिवाय मी कुठही धाव घालीत नाही, इतर ठिकाणची हावही सोडून दिली आहे मनाला विरोध करून त्याला इतर कुठे जाण्यासाठी वावच ठेविलेला नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, माझे कार्य व्हावे म्हणून काही काळवेळ न जाणता मी तुमच्या कीर्तनाने तुम्हास जागवीत आहे ४

२४०७ बहु नावें ठेविलीं स्तुतीचे आवडी । बहुत या गोडी आली रसा ॥ १ ॥
बहु सोसें सेवन केलें बहुवस । बहु आला दिस गोमटयाचा ॥ २ ॥
बहुता पुरला बहुता उरला । बहुताचा केला बहु नट ॥ ३ ॥
बहु तुका जाला निकट वृत्ती । बहु काकुलती येऊनिया ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – आवडी–प्रमाने, गोमटयाचा–चागला, नट–वेषधारी, सोगाड्या

अर्थ – तुमची स्तुती करण्याच्या प्रेमाने मी तुम्हाला पुष्कळ नावे ठेविली त्यामुळे प्रेमरसाला फारच गोडी आली १ फार मोठ्या सोसाने मी त्याचे पुष्कळ सेवन केले, त्यामुळे पुष्कळच चांगले दिवस उदयास आले आहेत २ हा श्रीहरी पुष्कळांना पुरून पुष्कळांच्यासाठी उरलेला आहे अनेक प्रकारचे वेष धारण करून याने अनेकांचा उद्धार केलेला आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, पुष्कळच काकुळतीस येऊन मी आपली वृत्ती त्याच्या ठिकाणी निकटची केलेली आहे ४

२४०८ इहलोकीं आम्हा वस्तीचे पेणें । उदासीन तेणें देहभावीं ॥ १ ॥
काय पुरतें कारण मारगीं । उल्लंघूनि वेगीं जावें स्थळा ॥ २ ॥
सोंगसपादणी चालवितो वेव्हार । अंतरीं आदरें नाहीं गोवा ॥ ३ ॥
तुका म्हणे वेच लाविला संचिता । होईल घेतां देतां लाभ कोणा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – पेणें–मुक्काम, गोवा–गुंतवणूक, वेच–खर्च

अर्थ – या मृत्युलोकात आमचा देह हे एक मुक्काम करण्याचे ठिकाण असूनही आम्ही त्याच्या विषयी नेहमी उदासीन असतो १ या मार्गात कार्यासाठीच कारणाचा आश्रय शोधावा लागतो, हे जाणून त्याचे उल्लंघन करावे आणि स्वस्वरूपाच्या स्थळास जावे २ मी जो लौकिक व्यवहार करीत आहे तो एक केवळ सोंगसपादणी आहे त्यात आपल्या आदराने माझी गुंतवणूक झालेली नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, माझ्या जवळच्या सर्व संचित कर्मांचा खर्च मी करीत आलेलो आहे जो कुणी याचो देवघेव करील त्यास फायदा होईल ४

[1] ठार्यी, [2] निरोध

२४०९ रोजकीर्दी जमा धरूनी सकळ । खताविला काळ बराबरी ॥ १ ॥
नाहीं होत झाडयापाडयाचें लिगाड । हुजराती ते गोड सेवा रुजू ॥ २ ॥
चोरासाटीं रदबदल आटाहास । जळो जिणें दास्य बहुताचें ॥ ३ ॥
सावधान तुका निर्भर मानसीं । सालझाडयापाशीं गुंपों नेणे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– रोजकीर्द–जमाखर्चाची वही, खतावणे–खात्यात घालणे, बराबरी–पुन:पुन:, लिगाड–लचांड, झाडापाडा–हिशेबाचा निकाल, हुजराती–स्वामीच्याजवळ, निर्भर–निश्चित, सालझाडा–वर्षाच्या अखेरचा हिशेब, गुंपों–गुतू.

अर्थ.– मी रोजकीर्दीत आजपर्यन्त गेलेल्या काळाचा हिशेब जमा करून ठेविलेला असून पुन: पुन. काळाची खतावणी केलेली आहे. १ आता हिशेबाच्या निकालाचे लचांड उरलेले नाही. माझी ही गोड सेवा स्वामीच्या चरणांवर रुजू झालेली आहे २ याशिवाय काही रदबदली करून अट्टहास करणे हे सर्व चोरासाठी होईल. असे पुष्कळांचे दास्य करणाऱ्या जिण्यास आग लागो. ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी माझ्या मनाशी सावध व निश्चित झालो आहे. आता वर्षाअखेरीच्या लचांडात गुंतण्याचे कारण मला काही उरलेले नाही. ४

२४१० त्रिविधकर्माचे वेगळाले भाव । निवडूनि ठाव दाखविला ॥ १ ॥
आलियाचा झाडा राहिल्याचा ठाव । सुख गौरव संतां अंगीं ॥ २ ॥
हिशेबें आलें तें सकळांसी प्रमाण । तेथें नाहीं आन चालों येत ॥ ३ ॥
तुका म्हणे नाहीं पापपुण्य खतीं[1] । झाडयाची हुजती हातां आली ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– ठाव–स्वरूप, खतीं–कागदोपत्रात, झाडयाची–हिशेबाची, हुजती–पावती.

अर्थ:– कर्म हे तीन प्रकारचे असते. त्याचे वेगवेगळे भाव मी निवडून दाखविले आहेत. १ जे कर्म करीन त्याचा सर्व हिशेब पूर्ण करून जे उरेल ते संतांच्या अंगी लावून मी सुखाने गौरवाची स्थिती भोगीत आहे. २ हिशेबाने आले आहे ते सर्वांनाच कबूल आहे, येथे दुसरे काही उपाय कधी चालत नाहीत. ३ तुकाराम महाराज म्हणतात, आता माझ्या कागदात पापपुण्य काही उरलेले नाही. [अथवा पापपुण्याची काही चिंता उरलेली नाही. सर्व हिशेब चुकता झाल्याची पावती ही माझ्या हाती आलेली आहे. ४

२४११ साकरेचें नाम घेतां फळे गोडी । तैसी आम्हां जोडी वैष्णवांची ॥ १ ॥
मोक्ष गांठी असे ठेविला बांधोनी । सोस तो भजनीं आवडीचा ॥ २ ॥
भोजनाची चिंता माय वाहे बाळा । आम्हां तरी खेळावरि चित्त ॥ ३ ॥
तुका म्हणे आम्ही देहउपकारें । गाऊं निरंतर नाचों लागों ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– गाठीं–पदरी.

अर्थ. – साखरेचे नाव घेताच तिची गोडी समजते. त्याप्रमाणे वैष्णवांचा लाभ आम्हांला झालेला आहे. १ मोक्ष तर आम्ही आमच्या पदरी बांधूनच ठेविलेला आहे.] म्हणूनच आमच्या वृत्तीत प्रेमाने हरिभजनाचा सोस आहे २ आमच्या भोजनाची चिंता आमच्या आईस असल्यामुळे आमचे चित्त खेळावरच असते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवाने हा मनुष्यदेह दिलेला आहे तो दुसऱ्यावर उपकार करण्यासाठीच म्हणूनच त्याचे गुणगान सतत करीत आम्ही गाऊ व नाचत राहू. ४

२४१२ सुखें घेऊं जन्मांतरें । एक[2] बरें इहलोकीं ॥ १ ॥
पंढरीचे वारकरी । होतां थोरी जोडी हे ॥ २ ॥

---

[1] पापपुण्यें, खती, [2] हेंचि.

हें तों आलें अनुभवा । पाहावें जीवावरूनि ॥ ३ ॥
तुका म्हणे केला त्याग । सर्वसंग म्हणऊनि ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – थोरी–मोठा, जोडी–लाभ

अर्थ – सुखानें आम्ही जन्म घेऊ. कारण या मृत्युलोकी एक गोष्ट बरी आहे १ येथें पंढरपूरची वारी वारकरी होऊन केल्यामुळे हा मोठा लाभ झालेला असतो २ हा तर माझा अनुभवच आहे प्रत्येकानें आपल्या जीवितात हा अनुभव घेऊन पाहावा ३ तुकाराम महाराज म्हणतात म्हणूनच मी सर्वसंगाचा त्याग केलेला आहे ४

२४१३ करू जाता सन्निधान । क्षणि जन पालटे ॥ १ ॥
आता गोमटे ते पाय । तुझे माय विठ्ठले ॥ २ ॥
हरिदासाचा समागम । अगीं प्रेम विसावे ॥ ३ ॥
तुका म्हणे हेंचि मन । इच्छादान मागतसे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – सन्निधान–जवळीक, गोमटे–चांगल

अर्थ – देवा, तुमची जवळीक केल्याबरोबर एका क्षणात सर्व लोकांची वृत्ती पालटते १ विठ्ठले आई, आता तुझे पाय फार चांगले दिसत आहेत २ हरिदासाचा सहवास झाल्यामुळे प्रभुप्रेम अंगावर भरून राहिलेले आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात माझ्या मनाची हीच इच्छा असून मी हेच एक दान मागीत आहे ४

२४१४ क्षीर मागे तया रायतें वाढी । पाधानी गधडी ऐसा नांवें ॥ १ ॥
समयो जाणा समयो जाणा । मलतें नाणा मलतेयें ॥ २ ॥
अमंगळ वाणी वदवी मंगळी । अशुभ वोंगळी शोभन तें ॥ ३ ॥
तुका म्हणे नेणे समयो ठाया ठाव । राहाडी ते वाव नरकाडी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – क्षीर–खीर, पाधानी–अडाणी, नाणा–आणू नका, रहाडी–वागणूक, वाव–व्यर्थ

अर्थ – पंगतीमध्ये भोजन करताना कुणी खीर मागितली तर त्यास तिखटआंबट रायते वाढणारी अडाणी स्त्री गधडी या नावानेच ओळखली जाते १ यासाठी नीट समय ओळखून वागावे मलत्याच ठिकाणी मलते आणू नका २ अमंगळ वाणी मंगल प्रसंगी कुणी बोलेल तर ती वाईट वाणी तेथे शोभून दिसणारच नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात जे कुणी चांगल्यावाईट समयाचा व जागेचा विचार करीत नाहीत त्यांची वागणूक व्यर्थ असून ती नर्काप्रमाणेच समजावी ४

२४१५ विंचा पीडी नागी । ज्याचा दोष त्याचे अंगीं ॥ १ ॥
केला पाहिजे विचार । मन मित्र दावेदार ॥ २ ॥
मधुरा उत्तरीं । रावा[1] खेळे उरावरी ॥ ३ ॥
तुका म्हणे रेडा । सुखें जाती ऐसा पीडा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – रावा–पोपट

अर्थ – विंचवाची विषारी नांगी विंचवास सुद्धा पीडा करते ज्याचा दोष असेल तसा तो त्यास दुःखकारक होतो १ आपले मनच याप्रमाण आपले वैरी आहे, याचा विचार तुम्ही केला पाहिजे २ गोड गोड बोलून पोपट मालकाच्या उरावर बसूनही खेळतो ३ तुकाराम महाराज म्हणतात उलट रेड्याचे पाहा तो सर्वनाच पीडा देत राहतो ४

---

१ रावा

२४१६ तीर्थीची अपेक्षा स्थळीं वाढे धर्म । जाणावें तें वर्म बहु पुण्य ॥ १ ॥
बहु बरी ऐसी भाविकांची जोडी । काळ नाहीं घडी जात वांयां ॥ २ ॥
करूनी चिंतन करवावें आणिकां । तो या जाला लोकां नाव जगीं ॥ ३ ॥
तुका म्हणे ऐसे परउपकारी । त्यांच्या पायांवरी डोई माझी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- घडी-क्षण.

अर्थ :- तीर्थयात्रेला जाऊन जे काही मिळवू तेच आपण आहोत त्याच ठिकाणी बसून पुण्याची वाढ करण्याचे मर्म जाणावे. १ ज्यांचा एक क्षणही असे पुण्य मिळविताना वाया जात नाही अशा भाविक लोकांची संगत फार बरी असते २ जो कुणी स्वत: हरिनामाचे चिंतन करतो आणि इतरांनाही घडवितो तो या लोकाना या जगात ससार तरून जाणारी नावच आहे असे समजावे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, असे जे दुसऱ्यावर उपकार करणारे आहेत त्यांच्या पायावर मी माझे डोके ठेवीत आहे. ४

२४१७ भयाची तो आम्हां चित्तीं । राहो खंती सकेना ॥ १ ॥
समर्पिलों जीवें भावें । काशा भ्यावें कारणें ॥ २ ॥
करीन तें कवतुकें । अवघें निकें शोभेल ॥ ३ ॥
तुका म्हणे माप भरूं । दिस सारूं कवतुकें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा.- खंती-चिंता, निकें-चागले.

अर्थ :- आमच्या चित्तामध्ये कोणत्याही भीतीची शंकाच कधी राहू शकत नाही. १ आम्ही जीवाभावाने देवास समर्पित झालेलो आहोत मग आम्ही कुणास भ्यावे ? २ जे आम्ही मोठ्या कौतुकाने करू ते सर्व चांगले असून शोभणारेच आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, आमच्या हृदयाचे माप प्रभुप्रेमाने भरून सर्व दिवस मोठ्या कौतुकाने व आनंदाने घालवू. ४

२४१८ पाचारितां धावे[1] । ऐसी ठायींची हे सवे ॥ १ ॥
बोले करुणा वचनीं । करी कृपा लावी स्तनीं ॥ २ ॥
जाणे कळवळा । भवसिद्धीचा जिव्हाळा[2] ॥ ३ ॥
तुका म्हणे नाम । मार्गें मार्गें धांवे प्रेम ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:- सवे-सवय, पाचारिता-बोलावल्यावर.

अर्थ :- एखाद्या भक्ताने प्रेमाने हाक मारली की हा त्याच्याकडे धावत जातो. ही त्याची मूळचीच सवय आहे. १ त्याच्याशी हा मोठ्या करुणवचनांनी बोलतो व त्याच्यावर कृपा करून त्याला स्तनपान देतो २ हा देव आपल्या भक्ताच्या ठिकाणी असलेला कळवळा जाणतो, भावसिद्धीचा सोहळा याला समजतो. ३ तुकाराम महाराज म्हणतात, जो कुणी याचे नाम मनापासून घेतो त्याच्या मागे त्याचे प्रेम धावत असते ४

२४१९ कां जो माझे जीवीं । आळस ठेविला गोसावीं ॥ १ ॥
येवढा घात आणीक काय । चिंतनासी अंतराय ॥ २ ॥
देहआत्म बंदी । केला घात कुबुद्धी ॥ ३ ॥
तुका म्हणे मन । कळवळी वाटे सीण ॥ ४ ॥

१ धांवे. २ सोहळा.

शब्दार्थ व टीपा -- गोसावी-स्वामी, अतराय-अतर

अर्थ -- स्वामी, माझ्या जीवनात एवढा आळस तुम्ही का ठेविला हो ? १ यामुळे तुमच्या चिंतनात अंतर पडते यापेक्षा मोठा आघात दुसरा आहे काय ? २ देहालाच आत्मा म्हणणे हाच वध असून अशा कुबुद्धीमुळे घात झालेला आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, यामुळे माझे मन कळवळते आणि त्याचा मला फार त्रास होतो ४

२४२० दर्शनाचे आर्त जीवा । बहु देवा राहिले ॥ १ ॥
आता जाणसी तें करीं । विश्वंभरीं काय उणें ॥ २ ॥
येथें जरी उरे चिंता । कोण दाता याहूनी ॥ ३ ॥
तुका म्हणे जाणवलें । आम्हा भले एवढेंच ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा -- आर्त-तीव्र इच्छा

अर्थ -- देवा, या जीवास तुमच्या दर्शनाची तीव्र इच्छा आहे, अशी आवड बहुत राहिलेली आहे १ देवा, आता याविषयी तुम्हाला समजेल ते तुम्ही करा तुम्ही विश्वंभर असल्याने तुमच्या ठिकाणी काय कमी आहे ? २ या ठिकाणी जर आमची चिंता उरणार असेल तर याच्या खेरीज मोठा दाता कोणता असेल ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, आम्हाला एवढेच काय ते नीट समजले आहे ४

२४२१ बैसों पाठमोरीं । मना वाटे तैसें करीं ॥ १ ॥
परि तूं जाणसी आवडी । बाळा बहुताची परवडी ॥ २ ॥
आपुलाल्या इच्छा । मागो जया व्हावें जैसा ॥ ३ ॥
तुका म्हणे आई । नव्हसी उदास विठाई ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा -- परवडी-प्रकार

अर्थ -- देवा आता आम्ही तुझ्याकडे पाठ करून बसलो आहोत तुझ्या मनास येईल तसे तू कर १ पण आपल्या बालकाची पुष्कळ प्रकारची आवड आहे हे तू जाणीत आहेस २ ज्याला जशी इच्छा होईल तसे त्याने आपल्या इच्छेप्रमाणे मागावे ३ तुकाराम महाराज म्हणतात, विठाई, माऊले, तू आमच्याविषयी उदासीन नाहीस ४

२४२२ विश्वंभरा वोळे । बहुत हात कान डोळे ॥ १ ॥
जेथें असे तेथें देखे । मागितलें तें आइके ॥ २ ॥
जें जें वाटे गोड । तैसे पुरवितो कोड ॥ ३ ॥
तुका म्हणे भेटी । काहीं पडों नेदी तुटी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा -- वोळ-प्राप्त झाले आहेत कोड-इच्छा

अर्थ -- या विश्वंभराला अनेक हात व अनेक पाय आणि कान व डोळे आहेत १ तो जेथे असेल तेथून पाहातो व जेथून असेल तेथून तो ऐकू शकतो २ ज्याला जे गोड वाटते ते त्याला देऊन तो आपल्या भक्तांची आवड पूर्ण करीत असतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, आपली व आपल्या भक्ताची एकदा भेट झाल्यानंतर तो काही कमी पडू देत नाही ४

विवरण -ईश्वराला अनेक हातपाय व अनेक मुखे आणि नेत्र आहेत ही कल्पना आपल्या उपनिषदातून व गीतेतून स्पष्ट झालेली आहे अर्जुनाला जेव्हा विश्वरूपदर्शन झाले तेव्हा त्याला ईश्वराच्या या सर्वव्यापी रूपाची चांगलीच कल्पना आली 'अनेक वक्त्रनयनमनेकाद्भुतदर्शनम' त्या विश्वरूपाला अनेक तोंडे आणि डोळे असून त्यांत अनेक अद्भुत देखावे दिसत होते असे गीतेने वर्णन केलेले आहे या विश्वरूप देवाला अनेक बाहू, अनेक उदरे, असतात याचे रूप अनंत असते अशा या सर्वव्यापक ईश्वराला आपल्या भक्ताचे मनोगत समजणे अतिशय सुलभ असते.

२४२३ दाटे कंठ लागे डोळिया पाझर । गुणाची अपार वृष्टि वरी ॥ १ ॥
तेणे सुखें छंदें घेईन सोहळा । होऊनि निराळा पापपुण्या ॥ २ ॥
तुझ्या मोहें पडो[1] मागील विसर । आलापें सुस्वर करिन कंठ ॥ ३ ॥
तुका म्हणे येथें पाहिजे सौरस । तुह्माविण रस गोड नव्हे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – सौरस-प्रेम

अर्थ – देवा, तुमच्या आठवणींनी माझा कंठ दाटून यावा डोळ्यांतून प्रेमाश्रू यावेत तुमच्या गुणांचा अपार वर्षाव माझ्यावर व्हावा १ त्याच छंदाने मी मोठ्या सुखाने सोहळा भोगेन आणि पापपुण्यापेक्षा निराळा होईन २ देवा, तुमच्या मोहामुळे मला मागचा विसर पडतो म्हणून मी आलाप व सुस्वर यांनी मुला गाऊन कंठ धन्य करीन ३ तुकाराम महाराज म्हणतात, आपल्या ठिकाणी हरिविषयी प्रेम हवे तुमच्याशिवाय देवा, या रसाला गोडी येणार नाही ४

२४२४ पसरूनि राहिलों बाहो । सोयी अहो तुमचिये ॥ १ ॥
आतां यावे लागवेगें । पांडुरंगे धावत ॥ २ ॥
बैसायाची इच्छा कडे । चाली खडे रुपताती ॥ ३ ॥
तुका म्हणे कृपाळुवा । करीन सेवा लागली ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – बाहो-बाहू, हात, लागवेगें-लावगीने, त्वरेने, रुपताती-रुततात, बोचतात

अर्थ -देवा, तुमची प्राप्ती व्हावी म्हणून आम्ही आमचे हात पसरून राहिलो आहोत १ पांडुरंगे आता तू मोठ्या त्वरेने धावत यावेस २ देवा, पायी चालण्याने पायास खडे बोचत असल्यामुळे आता मला तुमच्या कडेवर बसण्याची इच्छा झाली आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, कृपाळू देवा, तुमची लागेल ती सेवा करण्यास मी तत्पर आहे ४

२४२५ आह्मी जालों एकविध । सुधा सुदें असावें ॥ १ ॥
यावरी तुमचा मोळा । तो गोपाळा अकळ ॥ २ ॥
घेतले तें उसणें द्यावें । काहीं भावे विशेषें ॥ ३ ॥
तुका म्हणे क्रियानष्ट । तरी कष्ट घेतसा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – सुधा-सुध्यास, सरळास, सुदें-सुधे, सरळ मोळा-वागण्याची रीत, अकळ-न समजण्यासारखी

अर्थ -देवा, आम्ही तुमच्याशी एकत्वाने अनन्य झालो आहोत तेव्हा आता तुम्ही आमच्याशी सरळपणाने सरळ असावे १ गोपाळा, यावर तुमची वागण्याची रीत काय आहे हे मला न समजण्यासारखेच आहे २

१ पडे
तु गाथा २ ६३

जे काही उसने घेतले असेल ते काही विशेष भावनेने परत करायला हवे ३ तुकाराम महाराज म्हणतात, तुम्ही क्रियानष्ट आहात म्हणूनच तुम्ही आमच्याकडून सेवा घेत असता ४

२४२६ आह्मी आर्तभूत जिवीं । तुह्मीं गोसावी तो उदास ।। १ ।।
वादावाद समर्थाशीं । काशानशीं करावा ।। २ ।।
आह्मी मरों वेरझारीं । स्वामी घरीं वैसले ।। ३ ।।
तुका म्हणे करितां वाद । काहीं भेद कळेना ।। ४ ।।

शब्दार्थ व टीपा – आर्तभूत-इच्छा धरणारे, काशानशीं-कशासाठी

अर्थ –देवा, आम्ही जिवानिशी तुमच्या भेटीची इच्छा करणारे आहोत, आणि तुम्ही मात्र याविषयी अगदी उदासीन आहात १ तुमच्यासारख्या समर्थाशी उगाच वादविवाद का करावा ? २ आम्ही मात्र येरझारा करताना मरावे आणि तुम्ही स्वामींनी मात्र स्वस्थ चित्तानें स्वतःच्या घरी बसावे ३ तुकाराम महाराज म्हणतात, तुमच्या बरोबर वादविवाद करून यातील काही प्रकारच समजत नाही ४

२४२७ पुसावे ते ठाईं आपुल्या आपण । अहंकारा शून्य घालूनिया ।। १ ।।
येर वाग्जाळ मायेचा अहंकार । वचनाशीं थार अज्ञान ते ।। २ ।।
फळ तेंचि बीज बीज तेंची फळ । उपनावें मूळ न पालटे ।। ३ ।।
तुका म्हणे अवघे गव्हाचे प्रकार । सोनें अलंकार मिथ्या नाव ।। ४ ।।

शब्दार्थ व टीपा . येर-इतर, बाकीचे, वाग्जाळ-वाणीचे जाळे, थार-आधार, स्थान

अर्थ –देहादिकांचा अहंकार नाहीसा करून आपणच आपल्या ठिकाणी विचार करून पाहावा १ इतर सर्व बोलणे हे वाग्जाळ असून तो मायेचा अहंकार आहे अशा वचनांचा आधार अज्ञान असते २ जे फळ तेच बीज व जे बीज तेच फळ असते त्याला मूळ असे दुसरे नाव दिल्याने त्याचे स्वरूप काही बदलत नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, पोळी, खीर, लाडू असे अनेक प्रकार गव्हाचे केले तरी गहू तेच असतात नाना प्रकारचे अलंकार केले तरी सोने मात्र एकच असते अलंकार व गव्हाचे नाना प्रकार यांची नावे मिथ्याच असतात ४

२४२८ माझी आतां सत्ता आहे । तुह्मा पाया हे वरती ।। १ ।।
एकाविण नेणे दुजा । पंढरिराजा सर्वांगे ।। २ ।।
पुरवावी केली आळी । जे जे काळीं मागेन ते ।। ३ ।।
तुका ह्मणे सुटसी कैसा । धरूनि दिशा राहिलो ।। ४ ।।

शब्दार्थ व टीपा – आळी-हट्ट

अर्थ –देवा, आता माझी सत्ता तुमच्या पायावरती आहे १ मी सर्वांगानी या एका पंढरीराजाखेरीज दुसऱ्या कुणासच ओळखीत नाही २ जो जो हट्ट आम्ही ज्या ज्या वेळी करू त्या त्या वेळी तो तुम्ही देवा, पूर्ण करावा ३ तुकाराम महाराज म्हणतात, तुम्ही आता माझ्या हातातून कसे सुटणार? मी सर्व दिशा रोखून राहिलो आहे ४

२४२९ फावले तुह्मां मागें । नयतो लागें पावलो ।। १ ।।
आलों आतां उभा राहें । जवळी पाहे सन्मुख ।। २ ।।

घरीं होती गोवी जाली । कामें बोली न घडेचि ॥ ३ ॥
तुका ह्मणे धडफुडा । जालो झाडा देईं देवा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – गोवीं-गुतवणूक, धडफुडा-खरोखरच, झाडा-हिशेब

अर्थ–देवा, मी यापूर्वीच तुमच्या पाठीमागे लागलो नव्हतो म्हणून तुमचे फावले १ पण देवा, आतां मी तुमच्याकडे आलो असून मी आता जवळ उभा राहूनच तुम्हास सन्मुख होऊन पाहात आहे २ मी घरच्या भानगडींत आतापर्यंत गुतून राहिलो होतो त्यामुळे अनेक कामांत गुरफटलो व तुमच्याशी बोलणे झालेच नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, मी आता खरोखर सर्वांपासून मोकळा झालो आहे आता तुम्ही तुमचा हिशेब मात्र द्यावा ४

२४३० आतां नये बोलो अव्हेराची मात । बाळावरि चित्त असों द्यावें ॥ १ ॥
तुज का सांगणें लागे हा प्रकार । परि हें उत्तर आवडीचें ॥ २ ॥
न दंवीं वो कांहीं एकही प्रकार । आपणां अंतर नका मज ॥ ३ ॥
तुका ह्मणे मोहो राखावा सतत । नये पाहों अंत पाडुरंगा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – अव्हेराची-सोडून देण्याची, मात-गोष्ट

अर्थ – देवा, आता तुम्ही मला सोडून देण्याची गोष्ट बोलू नये आपल्या बालकावर चांगले लक्ष असावे १ तुला हे प्रकार सांगण्याची देवा, काही जरूरी आहे का ? पण मी आपल्या प्रेमाने हेच पुन बोलत आहे २ एकाही प्रकारात देवा, तुम्ही मला फसवू नये, अंत देऊ नये ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, मोहापासून माझे सतत रक्षण करावे, माझा आता असा अंत पाहू नका ४

२४३१ करूनि राहों जरी आत्माचि प्रमाण । निश्चळ नव्हे मन काय करूं ॥ १ ॥
जेवलिया विण काशाचे ढेंकर । शब्दाचे प्रकार शब्दचि ते ॥ २ ॥
पुरे पुरे आता तुमचें ब्रह्मज्ञान । आम्हासी चरण न सोडणें ॥ ३ ॥
विरोधें विरोध वाढे पुढतोपुढती । वासनेचे हातीं गर्भवास ॥ ४ ॥
सांडीमांडीअगीं बसे पुण्यपाप । बंधन संकल्प याचि नांवें ॥ ५ ॥
तुका म्हणे नाहीं मुक्तता मोकळी । ऐसा कोण बळी निरसी[२] देह ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – निश्चळ स्थिर, सांडीमांडी-खटाटोप, प्रयत्न

अर्थ – नित्य शुद्ध, बुद्ध, असंग असा आत्मा मी आहे असा निश्चय करून जरी वागलो तरी माझे मन स्थिर होत नाही याला काय करावे ? १ जेवण खरोखरी झाले तरच ढेकर येणार, नाही तर कशाचे येतील ? बाकी सर्व शब्दांचेच प्रकार आहेत २ देवा आता तुमचे ब्रह्मज्ञान पुरे झाले आम्ही काही तुमचे चरण सोडणार नाही ३ विरोधामुळे पुढे पुढे विरोधच वाढत आपणांस जशी वासना असेल तसा पुढील जन्म येईल ४ इतर काही खटाटोप करण्यामध्ये पापपुण्य उत्पन्न होते व याच प्रकारच्या संकल्पास बंध म्हणतात ५ तुकाराम महाराज म्हणतात, मुक्ततेची स्थिती ही सहज प्राप्त होण्याइतकी मोकळी नाही ती मिळविण्यासाठी देहाचा निरास करायला हवा एवढा बलवान आहे तरी कोण ? ६

२४३२ तुमचे स्तुतियोग्य कोठें माझी वाणी । मस्तक चरणीं ठेवीतसें ॥ १ ॥
भक्तिभाग्य तरी नेदीं तुळसीदळ । जोडूनि अंजुळ उभा असें ॥ २ ॥

१ सोडवे, २ निरसे

कैंचें भाग्य ऐसें पाविजे संनिध । नेणें पाळूं विध करुणा भाकीं ॥ ३ ॥
संतांचे सेवटीं उच्छिष्टाची आस । करुनियां वास पाहातसें ॥ ४ ॥
करीं इच्छा मज म्हणोन आपुलें । एसादिया बोलें निमित्याच्या ॥ ५ ॥
तुका ह्मणे शरण आलों हें साधन । करितों चिंतन रात्रदिवस ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा :–अंजुळ–ओंजळ, दोन्ही हात, विध–विधी, वास–वाट.

अर्थ – देवा, तुमची स्तुती करण्याइतकी माझी वाणी कुठे योग्य आहे ? म्हणून मी आपले मस्तक तुमच्याच चरणावर ठेविले आहे १ भक्तीने प्राप्त झालेले माझे भाग्य म्हणावे तर मी कधी तुम्हांस तुळसीचे एक पान देखील अर्पण केलेले नाही मात्र दोनही हात जोडून तुमच्यापुढे उभा आहे २ तुमच्या जवळ मला उभे राहाता येईल असे माझें भाग्य कुठे आहे ? तुमच्या सेवेचा विधी कसा पाळावा हे देखील मला समजत नसल्याने मी नुसती तुमची करुणा भाकत आहे ३ संतांच्या उच्छिष्टाची इच्छा मनात धरुन मी त्याची वाट पाहात आहे-४ एखाद्या शब्दाच्या निमित्ताने तुम्ही मला आपले म्हणाल अशी मी इच्छा करीत आहे. ५ तुकाराम महाराज म्हणतात, मी तुम्हांला शरण आलो आहे व रात्रदिवस एकसारखे तुमचेच चिंतन करुन साधन करीत आहे ६

२४३३ सर्वविशीं आम्हीं हेचि जोडी केली । स्वामीची साधिली चरणसेवा ॥ १ ॥
पाहिलेचि नाहीं मागें परतोनी । जिंकिला तो क्षणीं[1] क्षण काळ ॥ २ ॥
नाहीं पडों दिला विचाराचा गोवा । नाहीं पाठी हेवा येऊं दिला ॥ ३ ॥
केला लाग वेगीं अवघेचि तांतडी । भावना ते कुडी दुराविली ॥ ४ ॥
फोठें मग ऐसें होतें सावकास । जळो तया आस वेव्हाराची ॥ ५ ॥
तुका ह्मणे लाभ घेतला पालवीं । आतां नाहीं गोवी कशाची ही ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – सर्वविशीं–सर्वस्वी, गोवा–गुंता. कुडी–वाईट, पालवीं–पदरात. गोवी–गुनगणूक.

अर्थः-स्वामीची चरणसेवा साधून घेतली हाच मोठा लाभ आम्हास झालेला आहे. १ असे करताना आम्ही मागे प्रपचाकडे परतूनही पाहिले नाही काळाला मात्र क्षणाक्षणाने आम्ही जिंकिले आहे २ काही लौकिक विचारांचा गुंता आम्ही पडू दिला नाही आणि प्रपचाची हावही कधी मनात येऊ दिली नाही ३ मोठ्या त्वरेने हृदयातील वाईट भावना काढून टाकून आम्ही सर्वस्वाचा लाभ करुन घेतला. ४ व्यवहाराच्या, प्रपचाच्या आस आता आग लागो आता येथून पुढे असा सावकाशीचा काळ पुन. केव्हा येणार आहे ? ५ तुकाराम महाराज म्हणतात, आम्ही प्रभुकृपेचा लाभ पदरात बाधून घेतला आहे आता कोणताही गुंता आम्हांस राहिलेला नाही ६

२४३४ येणें मुखें तुझे वर्णी गुण नाम । तेंचि मज प्रेम देईं देवा ॥ १ ॥
डोळे भरुनिया पाहें तुझें मुख । तेंचि मज सुख देईं देवा ॥ २ ॥
कान भरोनिया ऐके[2] तुझी कीर्ती । ते मज विश्रांती देईं देवा ॥ ३ ॥
वाहें रंगीं टाळी नाचेन उदास । हें देईं हातास पायां बळ ॥ ४ ॥
तुका म्हणे माझा सकळ देहभाव । आणीक नको ठाव चिंतूं मासी ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा — वाहे–वाजवीत, ठाव–विश्रांती, स्थान

अर्थ :– देवा, या माझ्या मुखाने तुझेच गुणगान मी करीत राहीन असे प्रेम मला तू दे १ मी डोळे भरुन तुझेच मुख पाहीन अशा प्रकारचे सुख तू मला द्यावेस २ तुझी कीर्ती मी माझे कान भरुन ऐकेन, तीच देवा, मला

[1] क्षणक्षणी, [2] ऐकेन.

चांगली विश्रांती होईल ३ तुझ्या प्रेमाच्या रंगात दंग होऊन मी टाळी वाजवेन संसाराविषयी उदास होऊन मी नाचेन, अशा प्रकारचे बळ तू माझ्या हातापायांस दे. ४ तुकाराम महाराज म्हणतात, माझ्या सर्व देहभावास तुझ्या शिवाय इतर कोणतेही स्थान तू योजू नकोस. ५

२४३५ तूं माझा मायबाप सकळ वित्त गोत । तूंचि माझें हित करिता देवा ॥ १ ॥
तूंचि माझा देव तूंचि माझा जीव । तूंचि माझा भाव पांडुरंगा ॥ २ ॥
तूंचि माझा आचार तूंचि माझा विचार । तूंचि सर्व भार चालविसी ॥ ३ ॥
सर्व भावें मज तूं होसी प्रमाण । ऐसी तुझी आण वाहातसें ॥ ४ ॥
तुका म्हणे तुज विकला जीवभाव । कळे तो उपाय करीं आतां ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा:- वित्त-संपत्ती, गोत-नातेवाईक, आण-शपथ, उपाव-उपाय.

अर्थः- देवा, तूच आता माझा आईबाप आहेस. सर्व नातेवाईक तूच आहेस. माझी सर्व संपत्तीही देवा, तूच आहेस. तूच माझे सर्व प्रकारचे हित करणारा आहेस. १ पांडुरंगा, तूच माझा देव व तूच माझा जीव असून माझा भावही तूच आहेस. २ माझा आचार, माझा विचार, सर्व काही तूच आहेस. माझा सर्व भार देवा, तूच चालवितोस. ३ सर्व भावांनी तूच मला मान्य होतोस, असे मी तुझी शपथ घेऊन सांगत आहे. ४ तुकाराम महाराज म्हणतात, माझा सर्व जीवभाव मी तुला विकून टाकला आहे. आता तुला जो उपाय सुचेल तो तू कर. ५

२४३६ वारंवार तुज द्यावया आठव । आइक तो भाव माझा कैसा ॥ १ ॥
गेले मग नये फिरोन दिवस । पुढिलांची आस गणित नाहीं ॥ २ ॥
गुणां अवगुणांचे पडती आघात । तेणें होय चित्त कासावीस ॥ ३ ॥
कांहीं एक तुझा न देखों आधार । म्हणऊनी धीर नाहीं जिवा ॥ ४ ॥
तुका म्हणे तूं ब्रह्मांडाचा जीव । तरी कां आम्ही कींव भाकीतसों ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा -आठव-आठवण, आस-आशा, गणित-मोजीत

अर्थः- देवा, मी माझी आठवण तुला वारंवार एवढ्यासाठीच देतो की, माझा भाव कसा आहे ते तू ऐकावेस १ आयुष्याचे दिवस पूर्वी गेले ते काही फिरून परत येणार नाहीत आणि पुढील दिवस मी काही मोजीत नाही. २ वारंवार चांगल्यावाईट गुणाचे आघात मनावर होत असतात. त्यामुळे माझे चित्त फारच कासावीस होते ३ माझ्या जीवास तुमचा कसलाच आधार दिसत नाही म्हणून माझ्या जीवास कसलाही धीर वाटत नाही. ४ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तू सर्व ब्रह्मांडाचा जीव आहेस, असे असूनही आम्ही तुझी एवढी करुणा का भाकीत आहोत ? ५

२४३७ असोत हे तुझे प्रकार सकळ । काय खळखळ करावी हे ॥ १ ॥
आमुचे स्वहित जाणतसों आम्ही । तुझें वर्म नामीं आहे तुझ्या ॥ २ ॥
विचारितां आयुष्य जातें वांयांविण । रोज नागवण पडतसे ॥ ३ ॥
राहेन मी तुझे पाय आठवूनी । आणीक तें मनीं येऊं नेदीं ॥ ४ ॥
तुका म्हणे येथें येसो अनायासें । थोर तूज पिसें कीर्तनाचें ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :- विचारितां- विचार करीत असता, पिसे-वेड

अर्थ :- देवा, तुझ्या घरी मोक्षादी प्राप्तीचे अनेक प्रकार असून मला काय त्याचा उपयोग? त्यांची ळळ· ळळ मला काय करायची ? १ कारण आमचे हित कशात आहे, हे आम्ही चांगले जाणले आहे. तुझे वर्म देवा, तुझ्या नामात आहे हे आम्ही ओळखले आहे. २ याखेरीज दुसऱ्या गोष्टींचा विचार केला तर मग हे आयुष्य व्यर्थ वाया जाते रोजच्या रोज मन माझे त्यामुळे नुकसान होत आहे. ३ यासाठी देवा, मी तुझे पाय आठवून राहीन. याखेरीज दुसरे काहीही मी माझ्या मनात येऊ देणार नाही ४ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तुम्हांस कीर्तनाचे फार वेड असल्यामुळे तुम्ही अनायासेच येथे माझ्याकडे धावून येता ५

२४३८ विष्णुदासां[1] भोग । जरी[2] आम्हां पीडी रोग ॥ १ ॥
तरि हें दिसे लाजिरवाणें । काय तुम्हांसी सांगणें ॥ २ ॥
आह्मां काळें खावें । बोलिलें तें वांयां जावें ॥ ३ ॥
तुका म्हणे दास । आह्मी भोगूं गर्भवास ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :-काळें-यमाने, मृत्यूने

अर्थ :- देवा, विष्णुदासांना प्रारब्धाचे भोग भोगावे लागले तर रोग निर्माण झाल्याने आम्हांला कष्ट होतात. १ पण हे फारच लाजिरवाणे दिसते. हे काय तुम्हास सांगायला पाहिजे ? २ देवा, आम्हांस मृत्यूने ग्रासावे आणि आम्ही जे बोलतो ते वाया जावे हे चांगले काय ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, आम्ही तुझे दास असून गर्भवासाची दु खे भोगावीत काय ? किंवा आम्ही तुझे दास गर्भवासाची दु खे भोगायला तयार आहोत ४

२४३९ भावें गावें गीत । शुद्ध करूनियां चित्त ॥ १ ॥
तुज व्हावा आहे देव । तरि हा सुलभ उपाव ॥ २ ॥
आणिकांचे कानीं । गुण दोष मना नाणीं ॥ ३ ॥
मस्तक ठेंगणा । करी[3] संतांच्या चरणा ॥ ४ ॥
वेचीं तें वचन । जेणें राहे समाधान ॥ ५ ॥
तुका म्हणे फार । थोडा तरी पर उपकार ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – उपाव-उपाय, नाणीं-आणीत नाही.

अर्थ :- आपले चित्त शुद्ध करून मोठ्या प्रेमभावाने ईश्वरास गीत गाऊन आळवावे १ जर तुला देवाची प्राप्ती करून घ्यावयाची असेल तर हाच एक सुलभ व सोपा उपाय आहे. २ इतरांचे गुणदोष कानांनी कधी ऐकू नये; मनातही आणू नयेत ३ संतांच्या चरणांवर मस्तक ठेंगणे करून राहावे. ४ ज्या आपल्या बोलण्याने समाधान होईल तेच बोलावे ५ तुकाराम महाराज म्हणतात, लोकांवर थोडा फार तरी उपकार करावा. ६

२४४० वचन तें नाहीं तोडीत शरीरा । भेदत अंतरा वज्राऐसे ॥ १ ॥
कांहीं न सहावे काशा ही कारणें । संदेह निधान देह बळी ॥ २ ॥
नाहीं शब्द मुखीं लागत तिखट । नाहीं जड होत पोट तेणें ॥ ३ ॥
तुका ह्मणे जरी गिळे अहंकार । तरी वसे घर नारायण ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – अंतरा-मनास

अर्थ :-कुणाचे वाईट वचन काही आपल्या शरीरास कधी तोडीत नाही. पण मनास मात्र ते वज्राप्रमाणे भेदून जाते. १ कुठल्याही कारणाने काहीही सहन होत नाही, याविषयीचा संदेह देवास देह बळी दिल्यावर

[1] नाहीं हरिच्या दासां, [2] तरी, [3] रागें, [4] हें

फिटेल २ धाईट शब्द बोलणाराच्या तोंडास तिखट लागत नाही व तो ऐकणाराचे पोटही पण जड होत नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, जर अहंकार गिळून नाहीसा केला तरच हृदयरूपी घरात नारायण वसती करील ४

२४४१ नव्हो आता जीवीं कपटवसती । मग काकुळती कोणा यावें ॥ १ ॥
सत्याचिये मापें गाठीं नये नाड । आदि अंत गोड नारायण ॥ २ ॥
चोखटिया नाहीं विटाळाचा आघात । साच तें साचात साचा पडे ॥ ३ ॥
विचारिली वाट उसंत सीतळ । बुद्धीपुढें बळ तृणतुल्य ॥ ४ ॥
आहाराच्या घासे पचोनिया जिरे । वासना ही उरे उर्वरीत ॥ ५ ॥
तुका म्हणे ताळा घालावा वचनीं । तू माझी जननी पांडुरंगे ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा –गाठीं–पदरी, नाड–तूट, चोखटिया–खऱ्यास शुद्धास साच–खरे, साचापडे–साठा होणे उर्वरित–शिल्लक राहाते

अर्थ –आता माझ्या जीवनात, मनात कपटाची वसती कधी होऊ नये असे झाले तर मग मी कुणापुढे काकुळतीस यावे ? १ सत्याच्या मापाने पदरी काही तूट येणार नाही कारण सत्याच्या आदिअंती नारायण गोडच, असतो २ जे खरे शुद्ध आहे त्याला विटाळाचा आघात कधीच होत नाही खरेपणात खऱ्याचाचा साठा होतो ३ आधी नीट विचार करूनच मी ही सोपी वाट चालत आहे माझ्या या बुद्धीपुढे बळ गवताप्रमाणे आहे ४ आहारामध्ये जो घास पोटात जातो तो नीट पचला पाहिजे, तर पुन शिल्लक राहाते ते सेवन करण्याची इच्छा राहील ५ तुकाराम महाराज म्हणतात या वचनाचा ताळा तुम्हीच आपल्या मनाशी घालावा कारण पांडुरंगा, तूच माझी आई आहेत ६

२४४२ सद्गुणी ही माझीं जाणार्चीं भूषणे । असे नारायणे उचित केलें ॥ १ ॥
शब्दाच्या वोवोनी रत्नाचिया माळा । मुळींच जिव्हाळा झरवणी ॥ २ ॥
अर्थांतरीं असे अनुभवसेवन । परिपाकीं मन साक्ष येथें ॥ ३ ॥
तुका म्हणे मज सरते परतें । हे नाहीं अनंतें उरो दिले ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा– झरवणी–झरा

अर्थ – माझी ही भूषणे काही जाणारी नाहीत नारायणाने हे असे फारच उचित केले आहे १ माझ्या कवित्वाचा मूळचाच झरा जिव्हाळ्याचा असल्याने त्याच्या साहाय्याने शब्दाच्या रत्नाची माळ ओवून मी तयार करीन २ अनेक अर्थांचा अनुभव सेवन करण्याचा मला अनुभव आहे असे ज्याचे मन परिपक्व झाले आहे तोच साक्ष देईल ३ तुकाराम महाराज म्हणतात, माझी ही अनंताने दिलेली कवित्वाची स्फूर्ती कधीही न संपणारी आहे ४

२४४३ सहज लीळा मी साक्षी याचा । नये वचूं वाचा ऐसें जालें ॥ १ ॥
उपक्रमें वदे निशब्दाची वाणी । जे कोठें बंधनीं गुपों नेणें ॥ २ ॥
तम नासी परि वेव्हारा वेगळा । रविप्रभाकळा वर्ते जन ॥ ३ ॥
तुका म्हणे येथें गेला अतिशय । आता पुन्हा नये तोंड दावूं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – वचू–त्याग करू गुपों–गुंतत, तम–अंधार, अतिशय–आग्रहीपणा

अर्थ – या जगतात होणाऱ्या सर्व लीलांचा मी साक्षी आहे त्यांचा वाणीने त्याग करू नये असे झाले आहे १ माझी वाणी नि शब्द तत्त्वाचेच निरूपण प्रथमपासून करीत आहे ती कुठल्याही बंधनात गुंतत नाही २ सूर्याच्या प्रकाशाने सर्व अंधार नष्ट होतो त्यामुळे सर्व जगाचे व्यवहार सुरू होतात, पण स्वत सूर्य मात्र या व्यवहारांपासून

निराळाच असतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, या ठिकाणी मी माझा आग्रहीपणाही सोडून दिलेला आहे आता त्याने आपले तोंड मला पुन कधीही दाखवू नये ४

२४४४ बोलाल या आता आपुल्यापुरतें । मज या अनतें गोवियेले ॥ १ ॥
झाडिला न सोडी हातींचा पालव । वेधी वेधें जीव वेधियेला ॥ २ ॥
तुमचे ते शब्द कोरडिया गोष्टी । मज सर्वे मिठी अगसगें ॥ ३ ॥
तुका म्हणे तुम्हां होईल हे परी । अनुभव वरी येईल मग ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – पालव–पदर, परी–प्रकार

अर्थ — तुम्ही आता माझ्याशी बोलाल तर आपल्या पुरतेच बोला कारण मला या अनताने आपल्याच वेधात गुतवून ठेविले आहे १ माझा पदर त्याने जो धरला आहे तो कुणी हिसडून टाकण्याचा प्रयत्न केला तरी तो हातून सोडीत नाही त्याने अशा प्रकारे आपल्या वेधाने माझा जीव वेधून टाकला आहे २ आता तुमच्या गोष्टी मला कोरडेपणाच्याच वाटतात कारण त्या प्रभूने मला अगसग देऊन मिठी मारली आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, असा प्रकार तुम्हालाही अनुभवास मग येईल ४

२४४५ जैशा तुम्ही दुरी आहा । तैशा राहा अतरें ॥ १ ॥
नका येऊ देऊ आळ । अगीं गोपाळ जडलासे ॥ २ ॥
अवघा हाचि राखा काळ । विकाळचि भोंवता ॥ ३ ॥
तुका म्हणे मज ऐशा । होता पिशा जगनिंद्य ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – अतरें–अतरावर, पिशा–वेडया

अर्थ – जशा तुम्ही दूर आहात तशाच दूर अतरावर माझ्यापासून राहा १ कारण माझ्या अतरगात गोपाळाने प्रवेश केला आहे म्हणून तुम्ही माझ्यावर उगीच कसला तरी आळ येऊ नका २ तुमच्या भोवती असणाऱ्या विकाळ व भयानक काळाचेच तुम्ही रक्षण करा ३ तुकाराम महाराज म्हणतात, तुम्ही जर माझ्या सारख्या वेडया झालात तर मात्र जगाकडून तुमची निंदा होईल ४

२४४६ सतीचे तें घेता वाण । बहु कठिण परिणामीं ॥ १ ॥
जिवासाटीं गौरव वाढे । आहाच जोडे तें नव्हे ॥ २ ॥
जरि होय उघडी दृष्टी । तरि गोष्टी युद्धाच्या ॥ ३ ॥
तुका म्हणे अगा येता । तरी सत्ता धैर्याची ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – आहाच–व्यर्थ

अर्थ – सतीचे वाण घेणे हे परिणामाच्या दृष्टीने फार कठीण आहे १ जिवाची पर्वा न करता काम केले तरच आपला गौरव वाढतो उलट वरवर काही कराल तर ते व्यर्थच होईल त्याने काहीही होणार नाही २ ज्याची दृष्टी युद्धाविषयी उघडी झाली आहे, निर्धावलेली आहे, त्यानेच युद्धाच्या गोष्टी कराव्यात ३ तुकाराम महाराज म्हणतात, असे प्रसग अगाशी आल्यानतर धैर्याचीच सत्ता चालते ४

२४४७ आडवा तो उभा । असे दाटोनिया[1] प्रभा[2] ॥ १ ॥
देव नाहीं एकविध । एक भाव असे शुद्ध ॥ २ ॥
भेदाभेद आटी । नाहीं फार कोठें तुटी ॥ ३ ॥
तुका म्हणे गोवा । उगवा वेव्हाराचा हेवा ॥ ४ ॥

१ दाटोनियां २ उभा

शब्दार्थ व टीपा – आटी-खटपट, गोवा-गुंता, हेवा-हाव

अर्थ – ईश्वर हा प्रकाशरूपाने या विश्वात उभाआडवा असा दाट भरून राहिलेला आहे १ देव हा काही एकविध नाही पण भाव जर शुद्ध असेल तर तो एक होतो २ हा भेदाभेद मोडण्याची खटपट केली तर तो वाद कधीच तुटणार नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, प्रपंचाच्या व्यवहारातील हावेचा गुंता सोडवावा ४

२४४८ एका बोटाची निशाणी । परीपाक नाहीं मनीं ॥ १ ॥
तरि ते संपादिले सोंग । कारणावाचूनिया व्यंग ॥ २ ॥
वैष्णवांचा धर्म । जग विष्णू नेणे वर्म ॥ ३ ॥
अतिशयें पाप । तुका सत्य करी माप ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – निशाणी-खूण

अर्थ – वैष्णव एका बोटाने कपाळाला अंगारा बुक्का लावतात ही त्यांची खूण आहे, पण त्याचे मन जर वैष्णवधर्माविषयी परिपक्व नसले तर काय उपयोग त्या चिन्हाचा ? १ मग त्या वैष्णवाच्या सोंगाच्या संपादणीचा काय उपयोग ? मनाची परिपक्वता हे कारण त्यामागे नसतेच २ सर्व जग विष्णुमय असल्याचे ओळखणे या वैष्णवधर्मास ते कधी ओळखतच नसतात ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा वागण्यामुळे मोठेच पाप घडते मी तसे न वागता सत्यत्वाने माप धरीत आहे, वैष्णवधर्म जाणीत आहे ४

२४४९ सत्यत्वेशीं घेणे भक्तीचा अनुभव । स्वामीचा गौरव इच्छीतसे ॥ १ ॥
मग तें अधीट न भंगे साचारें । पावले विस्तारें फिरो नेणे ॥ २ ॥
वाणी वदे त्याचा कोणासी विश्वास । अभयें करे दास सत्य तई ॥ ३ ॥
तुका म्हणे आधीं न करीं तातडी । पायीं जाली जोडी तेणे शुद्ध ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – साचार-खरोखर, जोडी-प्राप्ती

अर्थ – मी सत्यत्वानें भक्तीचा अनुभव घ्यावा व स्वामीने माझ्या भक्तीचा गौरव करावा अशी माझी खरी इच्छा आहे १ मग तो भक्तीचा अनुभव खरोखर कधीच विटणार नाही की भंगणार नाही एकदा भक्तीचा विस्तार होत राहिला की मग ती मागे फिरणार नाही २ अनुभवाशिवाय उगाच वाणीने काही तरी बडबड केली तर त्याचा कोण विश्वास धरणार ? जेव्हा स्वामी मस्तकावर अभय देण्यासाठी हात ठेवील तेव्हा सत्यत्वाचा अनुभव येईल ३ तुकाराम महाराज म्हणतात, अगोदरच उतावळेपणा करू नये, प्रभूच्या पायाची प्राप्ती झाली म्हणजे त्यायोगे शुद्धत्व प्राप्त होईल ४

२४५० सर्वात्मकपण । माझें हिरोनि नेतो कोण ॥ १ ॥
मनीं भक्तीची आवडी । हेवा व्हावी ऐसी जोडी ॥ २ ॥
घेऊन जन्मांतरें । हेंचि करावया खरें ॥ ३ ॥
तुका म्हणे देवा । ऋणी करूनि ठेवू सेवा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – सर्वात्मकपण-आत्मतत्वाने सर्वत्र व्यापून राहिल्याची अवस्था, जोडी-लाभ, प्राप्ती हेवा-हाव

अर्थ :- मी आत्मतत्वाने सर्वत्र व्यापून राहिलो असल्याची अनुभूती माझी कोण हिरावून घेणार आहे. १ परंतु माझ्या मनात भक्तीविषयी फार प्रेम आहे. तिचाच लाभ व्हावा अशी माझ्या मनाची हाव आहे २ भक्तीचे हे वैभव खरे करण्यासाठी मी अनेक जन्मसुद्धा घेईन. ३ तुकाराम महाराज म्हणतात, आम्ही सेवा करून देवास ऋणी करून ठेवू. ४

२४५१ आणितां त्या गती । हंस काउळे न होती ॥ १ ॥
सांडा सांडा रे मठारे । येथें गांठीसवें धुरे ॥ २ ॥
नाकेंविण मोती । उभ्या बाजारें फजिती ॥ ३ ॥
हुकुमदाज तुका । येथें कोणी फुंदों नका ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – गती–रूप, मठारे–मठात राहाणारे ढोंगी साधु, धुरें–श्रेष्ठ, फुंदों–मिजास, घमेंड करणे.

अर्थ :- एखाद्या कावळ्याने हंसाच्या रूपाप्रमाणे कितीही बदल करण्याचा प्रयत्न केला तरी काय होणार आहे ? १ ढोंगी साधूंनो, तुम्ही आपले मठ सोडून द्या, आणि सर्वश्रेष्ठ पांडुरंग आहे, त्याच्याशी संबंध ठेवा. २ नाकाशिवाय भारी नथ घालणे म्हणजे साऱ्या गावातच फजिती आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, या ठिकाणी कुणीही घमेंड करू नये असा मी हुकुम देत आहे. ४

२४५२ ढेंकणासी बाज गड । उतरचढ केवढी ॥ १ ॥
होता तैसा कळों भाव । आला वाव अंतरींचा ॥ २ ॥
घोरामध्यें वसे[1] अळी । अठोळीच भोंवती ॥ ३ ॥
पोटासाटीं वेंची चणे । राजा म्हणे तोंडें मी ॥ ४ ॥
बेडकानें चिखल खावा । काय ठावा सागर ॥ ५ ॥
तुका म्हणे ऐसे आहे । काय पाहे त्यांत से ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपाः- अठोळीच–कोय, बी

अर्थ – ढेकणांना बाज ही गडाप्रमाणेच वाटते. तीवर चढणे आणि उतरणे त्यांना अवघडच वाटते. १ अंतःकरणातील जसा स्वयं भाव होता तसा मला तो समजून आला आहे. २ घोरामध्ये अळी आतील बोमोवतीच असते तिला तेच जग वाटते ३ पोट भरण्यासाठी रस्त्यावरील हरभऱ्याचे दाणे वेचणारा मनुष्य स्वत ला स्वतःच्या तोंडाने राजा म्हणवून घेत असतो. ४ डबक्यात राहणाऱ्या बेडकाने चिखलच खावा, त्यांना मोठ्या सागराची काय कल्पना ? ५ तुकाराम महाराज म्हणतात, देहभावाची संकोचित कल्पना ही अशी आहे. सांत काय आहे ते पाहावे ६

२४५३ धाव धाव गरुडध्वजा । आम्हां अनाथांच्या काजा ॥ १ ॥
बहु जालो कासावीस । म्हणोनि पाहें तुझी वास ॥ २ ॥
पाहें पाहे त्या मारगें । कोणी येतें माझ्या लागें ॥ ३ ॥
असोनिया ऐसा । तुज सारीखा कोवसा ॥ ४ ॥
न लवावा उशीर । नेणो कां हा[2] केला धीर ॥ ५ ॥
तुका म्हणे चालो । नको चालूं धांव घालीं ॥ ६ ॥

१ असे, २ हो.

शब्दार्थ व टीपा :– काजा–कामासाठी, वास–वाट, कोंवसा–आधार, आश्रय

अर्थ :– गरुडध्वजा, आम्हां अनाथांच्या कामासाठी तू धावत धावत ये १ मी फारच कासावीस झालो असून तुझीच वाट पाहात आहे २ माझ्यासाठी कोण धावत येते म्हणून मी त्या वाटेने पाहात आहे ३ तुझ्या-सारखा आश्रय असूनही मी असा घावरा झालो आहे ४ देवा, धावून येण्यास उशीर करू नका तुम्ही आज असा न येण्याचा धीर का केला आहे, काही समजत नाही ५ तुकाराम महाराज म्हणतात, तू नेहमीच्या चालीप्रमाणे चालू नकोस, माझ्यासाठी धावत ये ६

२४५४ पांडुरंगें पांडुरंगे । माझे गंगे माउलिये ॥ १ ॥
वाऱ्हां घालीं प्रेमधारा । पूर क्षीरा लोटों दे ॥ २ ॥
अंगें अंग मेळउनी । करीं धणी फेडावा[1] ॥ ३ ॥
तुका म्हणे घेइन उडचा । सांडिन कुडया भावना ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– क्षीर–दूध धणी–तृप्ती, कुडया–वाईट

अर्थ – अगे पांडुरंगे, तू माझी गंगामाऊली आहेस १ तुझ्या प्रेमधारेचा पान्हा मला पाज प्रेमदुधाचा पूर येऊ दे २ अंगाला अंग मिळवून तू आमची अखंड तृप्ती कर ३ तुकाराम महाराज म्हणतात असा हा प्रेम-पान्हा घेण्यासाठी मी सर्व वाईट भावनांचा त्याग करीन ४

२४५५ गजइंद्र[2] पशु आप्तें मोकलिला । तो तुज स्मरला पांडुरंगा ॥ १ ॥
त्यासाठीं गरुड सांडुनि धांवसी । माया झळंबसी दीनानाथा ॥ २ ॥
धेनु वत्सावरी झेंप घाली जैसी । तैसें गजेंद्रासी सोडविलें ॥ ३ ॥
तुका म्हणे ब्रीद बांधलें यासाठीं । भक्तांसी संकटीं रक्षावया ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा– गजेंद्र–हत्तीचा राजा, आप्तें–नातेवाईकांनी, मोकलिला–सोडून दिला, झळंबसी–त्वरेनें आलास

अर्थ – हत्तींचा राजा असलेल्या गजेन्द्रास सुसरीनें धरल्याबरोबर व त्यास आप्तवर्गानें सोडल्याबरोबर त्यानें तुझे पांडुरंगा, स्मरण केले १ ते ऐकून गरुडासारख्या वाहनाचा त्याग करून मोहानें तू दीनानाथा, धावून आलास २ गाय आपल्या वत्सावर सरंक्षणासाठी जशी झडप घालते त्याप्रमाणे तू त्या गजेंद्रास सोडविलेस ३ तुकाराम महाराज म्हणतात, भक्तांना संकटांतून सोडविण्याचे बीद तू धारण केले आहेस ४

विवरण –संकटात सापडलेल्या आपल्या भक्ताची हाक परमेश्वरास कशी पोचते आणि त्या हाकेसरशी देव धावून कसा येतो, याचे अनेक दाखले दिले जातात त्यातील नक्राच्या मिठीत सापडलेला गजेन्द्र व त्याचा धावा याचे महत्त्व विशेष आहे या गजेन्द्राची कथा पुराणातून सांगितलेली आहे हा पूर्वीचा द्रविड देशाचा इंद्रद्युम्न नावाचा राजा असून मोठा भगवद्भक्त होता मलयाचलावर एकदा तपश्चर्या करीत असताना याच्या हातून न कळत अगस्ती ऋषींचा अपमान घडला तेव्हा मुनीने त्याला गज म्हणजे हत्ती होण्याचा शाप दिला व विष्णू तुझा उद्धार करतील असा उःशापही दिला या शापाप्रमाणे हा गजेंद्र होऊन त्रिकूट पर्वतावर भ्रमण करू लागला एकदा पाणी पिण्यासाठी हा हत्ती सरोवरात उतरला असताना त्याचा पाय मगरीने धरला तेव्हा त्याने करुण वाणीने भगवंताचा धावा केला तो धावा ऐकून विष्णू प्रसन्न झाले व त्यांनी नक्र व गजेन्द्र या दोघांनाही मुक्त केले हा नक्रही पूर्वजन्मीचा एक गंधर्व असून देवलमुनींच्या शापामुळे नक्रयोनीत खितपत पडला होता अशा या गजेन्द्राच्या कथेवर अनेक संस्कृत मराठी कवींनी काव्यरचना केलेली आहे 'गजेंद्र तो हस्ती सहस्रवर्षे' (अभंग २०८७) या अभंगात तुकाराम महाराजांनी पुन्हा एकदा गजेन्द्राची कथा गाइली आहे

[1] फेडावया [2] गजेंद्र

२४५६ चारी वेद ज्यासाठीं । त्याचें नाम धरा कंठीं ॥ १ ॥
न करीं आणीक साधन[1] । कष्टसी का वायांविण ॥ २ ॥
अठरा पुराणाचे पोटीं । नामाविण नाहीं गोठी[2] ॥ ३ ॥
गीता जेणे उपदेशिली । ते ही[3] विटेवरी माउली ॥ ४ ॥
तुका म्हणे सार धरीं । वाचे हरिनाम उच्चारी ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – गोठी-गोष्टी

अर्थ :– चारही वेद ज्याचे वर्णन करण्यात तत्पर आहेत त्याचे, त्या श्रीहरीचे नाम तुम्ही तुमच्या कंठात धारण करा १ याशिवाय दुसरे कसलेही साधन करण्याची जरुरी नाही उगाच कष्ट कशासाठी करायचे ? २ अठरा पुराणांतही या नाममाहात्म्याशिवाय इतर कसल्याच गोष्टी नाहीत ३ ज्या श्रीकृष्णाने अर्जुनाला गीतेचा उपदेश केला तोच श्रीकृष्ण विठ्ठलमाऊली होऊन विटेवर उभा आहे ४ तुकाराम महाराज म्हणतात, यासाठी सारभूत असे जे श्रीहरीचे नाम तेच तू आपल्या वाणीने उच्चारीत जा ५

२४५७ पाहाता ठायाठाव । जातो अंतरोनि देव ॥ १ ॥
नये वाटो गुणदोषीं । मना जतन येविशीं ॥ २ ॥
त्रिविधदेह परिचारा । जनीं जनार्दन खरा ॥ ३ ॥
तुका म्हणे धीरें- । विण कैसे होतें बरे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – ठायाठाय-बरीवाईट ठिकाणें

अर्थ – बरीवाईट ठिकाणे पाहाताना देव मात्र अतरून जातो १ म्हणून आपले मन गुणदोषांकडे जाऊ देऊ नये याविषयी मनास नीट सांभाळावे २ उत्तम, मध्यम, कनिष्ठ अशा प्रकारचे लोक जरी प्रचारात असले तरी त्यात जनार्दन हाच एक खरा आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, धीर धरल्याशिवाय काम कसे होणार ? ४

२४५८ नामसंकीर्तन साधन पैं सोपें । जळतील पापें जन्मांतरें[4] ॥ १ ॥
न लगे[5] सायास जावें वनांतरा । सुखें येतो घरा नारायण ॥ २ ॥
ठायींच बैसोनि करा एकचित्त । आवडी अनंत आळवावा ॥ ३ ॥
रामकृष्णहरिविठ्ठलकेशवा । मंत्र हा जपावा सर्वकाळ ॥ ४ ॥
याविण[6] असता आणीक साधन । वाहातसे आण विठोबाची ॥ ५ ॥
तुका म्हणे सोपें आहे सर्वांहूनि । शाहाणा तो धणी घेतो[7] येथें ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – सायास–श्रम, ठायींच–आपल्याच जागी, आवडी–प्रेमाने, वाण–शपथ, धणी–तृप्ती

अर्थ – सर्व साधनात नामसंकीर्तन हे साधन फार सोपे आहे या योगे अनेक जन्मातील पापे जळून जातील १ या साधनाशिवाय इतर साधनाचे श्रम करून रानावनात जाण्याची जरुरी नाही नामसंकीर्तनाच्या साधनामुळे नारायण सुखाने घरी यतो २ तुम्ही आपल्याच ठिकाणी बसून एकचित्त करा व मोठ्या प्रेमाने त्या अनंतास आळवा ३ ' रामकृष्ण हरी विठ्ठला केशवा ' या मंत्राचा जप सर्वकाळ करावा ४ याशिवाय दुसरे कुठले साधन असेल तर मी विठ्ठलाची शपथ घेऊन सांगत आहे की तशी गोष्ट नाही ५ तुकाराम महाराज म्हणतात, हे नामसंकीर्तनाचे साधन सर्व साधनांहून सोपे असून जो कुणी शहाणा असेल तो आपली तृप्ती यामुळे करून घेईल ६

१ साधनें, २ गोष्टी, ३ हें, ४ जन्मजन्मांतरींची, ५ लगती ६ याहूनि आणिक नाहीं पैं साधन, ७ घेत असे

विवरण – अतिशय प्रसिद्ध अशा या तुकाराम महाराजांच्या अभंगात सर्व साधनापेक्षा नामसंकीर्तनाचे साधन सोपे व सरळ असल्याचे सांगितले आहे नाना व्रते वैकल्ये, यज्ञयाग, जपतप, अनुष्ठाने, तीर्थयात्रा, योगादी क्रिया इत्यादींच्या बिकट व कष्टदायक साधनापेक्षा 'रामकृष्ण हरी केशवा' या मंत्रावर आधारलेले नामसंकीर्तनाचे साधन सर्वच साधुसंतांनी श्रेष्ठ मानले आहे संसारसागर तरून जाण्याची, ईश्वरप्राप्तीची अनेक साधने शास्त्रकारांनी व धर्मपंडितांनी सांगितलेली आहेत पण नदी तरून जाताना अपघात झाल्याचीच उदाहरणे फार आहेत श्रीज्ञानेश्वरांनी म्हटले आहे, 'तया पाणियाचेनि वहिलेंपणें । अझुनी न धरती बोभाणें । ऐसा मायापूर हा तरवणें । तरिजेल गा ॥ येथें एक लवलाहो । जो जो कीजे तरणोपावो । तो तो अपावो । होय तो एक ॥' जो जो उपाय करावा तो अपाय होणारीच साधने फार कुणी अभिमानात बुडणार कुणी स्वर्गातील अप्सरांच्या मागे लागणार, कुणी सिद्धी व रिद्धी यांच्या चमत्कारात सापडणार, कुणी विधिनिषेधांच्या जंजाळात सापडणार, कुणी गृहदारा सोडून, कर्मे सोडून, कर्तव्ये सोडून रानावनात जाऊन बसले, कुणी अंगाला भस्म लावले, कुणी जटा वाढविल्या, कुणी दिगंबर वेषात देह कष्टविला, कुणी सर्व शास्त्रे व पुराणे यांची पारायणे केली, कुणी प्राणायाम करून अष्टांग योग साधण्याचा प्रयत्न केला, कुणी लोकमान्यतेत, कुणी द्रव्यलोभात गुंतून गेला देह दडून तप केल्याने ईश्वर कसा सापडणार ? क्रोधाची वाढ, अभिमानाची वाढ होऊन श्रीहरी मात्र या मार्गांनी दुरावतो दातेपणाचा अभिमान वाढतो, नाना व्रतांची बंधने निर्माण होतात मंत्रतंत्र बहुधा सिद्धीस जात नाहीत, यमनियमांच्या खड्ड्यात अडकून पडावे लागते या सर्व बंधनात अडकून फसणाऱ्या लोकांविषयी एकनाथांनी म्हटले आहे–

'नाना यज्ञ करितां विधी । मंत्र तंत्र पात्रशुद्धी ॥
सहसा पावों न शके सिद्धी । पावल्या बांधी फळ भोगू ॥
नाना छंदें रहस्य मंत्र । विकळ होतें नये उच्चार ॥
मंत्री मंत्र रचिले साचार । चळले अपार मंत्रवादी ॥
मगयों करून ताबडीं । तीर्थाभिमानें जाले कापडी ॥
भिके लागलीं बापुडीं । नाहीं अर्धघडी विश्रांती ॥
यम नियम बारा बारा । करिता अखंड घोर वारा ॥
चोविसांमाजीं याचा उभारा । नेणती सोवरा पंचविसावा ॥
एवं सांगितल्या साधनांसी । अपमतीं करिता त्यांसी ॥
बाधकता आहे सर्वांसी । ते म्यां तुजपासीं सांगीतली ॥

या उलट नामसंकीर्तनात मात्र अहंकार, अभिमान मरून जातो, आणि जो उरतो तो आनंदघन श्रीविठ्ठलच 'तुका म्हणे नाम । चैतन्य निजधाम ।' अशी या नामाची ख्याती आहे नामामुळे श्रीहरीची प्राप्ती त्वरित व खात्रीने होते. 'मुखीं नाम हातीं मोक्ष ' अशीच साक्ष बहुतेक नामधारकांची आहे नामस्मरणास काळवेळ नको, जातीचे बंधन नाही, मंत्रोच्चारात काही चूक झाली तरी श्रीहरीच्या प्राप्तीत खंड पडत नाही 'मंत्र चळे पिसे लागतें सत्वर' तर उलट 'नाम सर्वकाळ शुभदायक' असल्याचे बुवांनी सांगितले आहे या 'रामकृष्णहरि' मंत्राचा गौरव करताना ज्ञानेश्वरांनी म्हटले आहे–' अशौचिया जपों नये, आणिकाते ऐकों नये । ऐतिया मंत्राते जग विहे । त्याचे फळणे थोडें दरी खोंपणें बहु । तैसा मंत्रराज नव्हे नव्हे रे,' शिवाय या नामसंकीर्तनाचा लाभ दुराचारी, पापी माणसानाही पश्चातापानंतर घेता येण्यासारखा असतो सत्वगुणाची वृध्दी, चित्ताची शुध्दी, आणि मनाची प्रसन्नता या गोष्टी नामाने श्रवण, मनन, निजध्यास यामुळे सहज साध्य होणाऱ्या आहेत इंद्रियांचे दमन, मनाचा विरोध, आचारविचार यातील कठोर कर्मकांड यांच्या जंजाळात न सापडता 'तुज पापचि नाहीं ऐसे । नाम घेतां जवळी वसे ' हा मार्ग तुकोबासारख्या संतांनी उपदेशिला आहे 'काय करितील केलीं नित्य पापें । वसे नाम ज्यापें विठोबाचें । तृणीं हुताशन लागला ते रासी । जळतील तैसी क्षणमात्रें असे सामर्थ्य हरिनामामध्ये आहे 'तुका म्हणे नाम जाळी महादोष' अशी नामाची सत्ता आहे 'नाम घेतां कंठ शीतळ शरीर । इंद्रिया व्यापार नाठवती ।' अशी नामाची महती आहे नामसंकीर्तनामुळे केवळ प्रमप्रेमाचा झरा अंतःकरणात निर्माण होतो 'प्रेम तेथें वास करी । मुखीं उच्चारितां हरी '

अशा प्रभुप्रेमाने दाटलेल्या मनास जगातील सर्व काही नामापुढे तुच्छ वाटते. 'समुद्रवलयांकित पृथ्वीचे दान करितां समान नये नामा।' अशी महत्त्वाची साक्ष तुकाराम महाराजांनी दिलेली आहे.

बाकी सारी शास्त्र आणि वेद आणि साधने आत्म्याचे वर्णन करतात, तर नाम आत्म्याची प्रचीती आणून देत असते श्रीज्ञानेश्वरांनी म्हटले आहे, 'तत्त्वमस्यादि महावाक्य उपदेश। नामाचा अर्धांश नाहीं तेथें। म्हणोनि नामसंकीर्तन करिता। जवळी जोडिलासी आना। क्षणभरी न विसंबे जिवांचिया जीवना रया-॥' या नामामुळे महान दोषी व तापी तरून गेले वाल्या, अजामीळ, गणिका ही उदाहरणे नेहमीच येणारी आहेत असे हे अतिशय सोपे, खात्रीचे आणि लाभदायक साधन कलियुगात साधुसंतानी उपलब्ध करून दिले आहे 'सोपें हें साधन लाभ येतो घरां। वाचेसी उच्चारा रामहरि॥ न लगती कष्ट नलगे सायास। करावा अभ्यास विठ्ठलाचा॥ तुका म्हणे कांहीं न वेचितां धन। जोडे नारायण नामासाठीं॥' अशा शब्दात तुकोबांनी नामाचा गौरव अनेक ठिकाणी केलेला आहे. 'विठोबाचें नाम सुलभ सोपा रे' असा त्याचा सिद्धान्त आहे म्हणून या नामाचा प्रचार तुकाराम महाराजांनी आयुष्यभर केला.

कलियुगाच्या अत्यंत संमिश्र व गतिमान युगात नामासारखे दुसरे कोणतेच साधन नाहीं. '*हरेर्नाम हरेर्नाम हरेर्नामैव केवलम्। कलौ नास्त्येव नास्त्येव नास्त्येव गतिरन्यथा-॥*' कलियुगात श्रीहरीच्या नामाशिवाय दुसरी गतीच नाही असे नारदपुराणात म्हटले आहे 'कलियुगीं हेंचि सार। नाम स्मरावें निरंतर। करिती नामाचा निजगजर। ते मुक्त कर नृपनाथा-'असे एकनाथीभागवतात म्हटले आहे या हरिकीर्तनाने व नामधारकांनी इतर साधनाचे काय केले हे सांगताना एकनाथांनी म्हटले आहे. 'एवं योगयागादि तपसाधनें। पोरटीं केलीं हरिकीर्तनें। कलियुगीं नाम-स्मरणें। जड उद्धरणें हरिकीर्तनीं' नामसंकीर्तनाच्या या समर्थ साधनावरच वारकरी संप्रदायाची इमारत उभी आहे.

२४५९ भाविकांचें काज अंगें देव करी। काढी धर्माघरीं उच्छिष्ट तें॥ १॥
उच्छिष्ट तीं फळें खाय भिल्लटीचीं। आवडी तयांची मोठी देवा॥ २॥
काय देवा घरीं न मिळेची अन्न। मागें भाजीपान द्रौपदीसी॥ ३॥
अर्जुनाचीं घोडीं धुतलीं अनंतें। संकटें बहुतें निवारिलीं॥ ४॥
तुका म्हणे ऐसीं आवडती लडिवाळें। जाणीवेचें काळें तोंड देवा॥ ५॥

शब्दार्थ व टीपा - काज-कार्य, भिल्लटीची-शबरी भिल्लणीची

अर्थ :- जे कुणी आपले परम भक्त आहेत त्यांचे काम हा देव स्वतः होऊन करीत असतो. भगवंतांनी धर्मराजाच्या घरी स्वतः होऊन उष्टी काढलेली आहेत. १ रामाच्या अवतारात भगवंतांनी भिल्लीणीचा भाव ओळखून तिची उष्टी बोरे भक्षण केली होती देवाला त्यांची आवड फारच होती २ देवाने पांडव वनवासात असताना एकदा द्रौपदीजवळ एक भाजीचे पान मागितले, ते काय त्याच्या घरी अन्न नव्हते म्हणून की काय? ३ या अनंताने आपला सखा अर्जुन याची घोडी स्वतःच्या हातांनी धुतली त्याची अनेक संकटे त्याने निवारण केली आहेत ४ तुकाराम महाराज म्हणतात, देवास असे हे लडिवाळ भक्त फारच आवडतात, आणि ज्यांना स्वतःच्या जाणिवेचा म्हणजे ज्ञानाचा अभिमान आहे ते काळतोंडे समजावेत ५

२४६० सांवळें रूपडें चोरटें चित्ताचें। उभें पंढरीचे विटेवरी॥ १॥
डोळियांची धणी पाहातां न पुरे। तया लागीं झुरे मन माझें॥ २॥
आन गोड कांहीं न लगे संसारीं। राहिलें अंतरीं पाय तुझे॥ ३॥
प्राण रिघों पाहे कुडी हे सांडुनी। श्रीमुख नयनीं न देखतां॥ ४॥
चित्त मोहियेलें नंदाच्या नंदनें। तुका म्हणे येणें गरुडध्वजें॥ ५॥

शब्दार्थ व टीपा :- धणी-तृप्ती, कुडी-देह, शरीर

अर्थ– श्रीहरीचे हे सावळे व चित्त चोरणारे रूपडे पंढरपुरास विटेवर उभे आहे. १ याचे रूप कितीही पाहिले तरी डोळ्यांची तृप्ती कधीच होत नाही. यासाठीच माझे मन झुरते आहे. २ या संसारात या सावळ्या रूपाशिवाय मला दुसरे काहीच गोड लागत नाही. तुझे पाय देवा, माझ्या मनात स्थिर झाले आहेत ३ हे श्रीमुख जर माझ्या डोळ्यांना दिसले नाही तर माझा प्राण माझ्या देहातून निघून जाण्याचा प्रसंग येतो. ४ तुकाराम महाराज म्हणतात, या नंदाच्या मुलाने, गरुडध्वजाने माझे चित्त मोहित केले आहे ५

२४६१ ऐका ऐका भाविकजन । कोण कोण व्हाल ते ॥ १ ॥
तार्किकांचा टाका संग । पांडुरंग स्मरा हो ॥ २ ॥
नका शोधूं मतांतरें । नुमगे खरे बुडाल ॥ ३ ॥
कलिमध्यें दास तुका । जातो[1] लोकां सांगत ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– नुमगे–उमगणार नाही, समजणार नाही.

अर्थ:– भाविक जनहो, ऐका नीट माझे. तुम्ही कोण कोण व्हावे, कसे वागावे ते मी सांगतो १ जे कुणी शुष्क तार्किक आहेत त्यांची संगत सोडून द्या आणि मनात पांडुरंगाला स्मरून राहा. २ उगाच वाटेल ती मत-मतांतरे शोधीत बसू नका. त्यामुळे खरे काय आहे हे समजणारच नाही. उगीच बुडाल मात्र ३ तुकाराम महाराज म्हणतात, या कलियुगात मी असाच उपदेश करीत जात आहे ४

२४६२ आपुलिया आंगें तोडी मायाजाळ । ऐसें नाहीं बळ कोणापाशीं ॥ १ ॥
रांडापोरें त्याग करी कुटुंबाचा । नावरे हे वाचा आणि मन ॥ २ ॥
हर्षामर्ष जों हे नाहीं जो जिराले । तोवरि हे केलें चार त्यांनीं ॥ ३ ॥
मुक्त जालो ऐसें बोलों जाये मुखें । तुका म्हणे दुःखें बांधला तो ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– नावरे–आवरत नाही, चार–चाळे.

अर्थ – स्वतःच्या सामर्थ्याने मायाजाळ तोडून मुक्त होण्याचे सामर्थ्य कुणाजवळही नाही. १ फार झाले तर एखादा घरातील बायकापोरांचा त्याग करील, पण त्याची वाणी व त्याचे मन त्याला आवरत नाहीत. २ त्याच्या वृत्तीमधील आनंद, दुःखादी भावना जोपर्यन्त संपल्या नाहीत, तोपर्यंतच त्याचे हे चाळे शोभतील. ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी मुक्त झालो होतो असे तो तोंडाने वारंवार म्हणत असला तरी खरोखर तो दुःखाने बांधला आहे ४

२४६३ आलिया अतीतां म्हणतसां पुढारें । आपुलें रोकडें सत्व जाय ॥ १ ॥
काय त्याचा भार घेऊनि मस्तकीं । हीनकर्मी लोकीं म्हणावया ॥ २ ॥
दारीं हाका कैसें करवते भोजन । रुची तरि अन्न कैसें देतें ॥ ३ ॥
तुका म्हणे ध्वज उभारिला कर । ते शक्ति उदार काय जाली ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– अतीता–अतिथीस, पुढारें–पुढे जा

अर्थ :– दारात एखादा अतिथी आला तर त्यास दानधर्म न करता, त्याचे स्वागत न करता 'पुढे जा' असे म्हणून हाकून दिले तर आपले सत्व नाहीसे होते १ आपल्या दारात येणाऱ्या श्रमाचा त्याचा भार मस्तकी घेऊन आपण हीनकर्मी आहोत असे लोकाकडून का म्हणवून घ्यावे ? २ असा हा अतिथी दारात भुकेने अन्नासाठी ओरडत असताना तुम्हांस भोजन करवते तरी कसे ? अन्नाला रुची तरी कशी लागते ? ३ तुकाराम महाराज

[1] करी लोका सावध.

म्हणतात, सर्व याचकाची इच्छा तृप्त करणारा असा जो हात तुम्ही वर उभारलेला होता, त्याची ती उदार शक्ती काय झाली ? ४

२४६४ जेथें लक्ष्मीचा वास । गंगा आली पापा नास ॥ १ ॥
तें म्यां हृदयीं धरिलें । तापे[1] हरण पाउलें ॥ २ ॥
सेवा केली संतजनीं । सुखें राहिले लपोनि ॥ ३ ॥
तुका म्हणे वाकी । भाट जाली तिहीं लोकीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – वास–निवास, ठाव–ठिकाण, वाकी–वाळे

अर्थ – जेथे लक्ष्मीचा वास असून गंगाही आलेली आहे तेथे पापाचा नाशच होतो १ देवा, तुमची पावले फारच सुकुमार आहेत रे माझे चित्त त्याच्या ठिकाणी भ्रमर होऊन राहिले आहे २ त्याच ठिकाणचा आश्रय करून संतजन लीन होऊन सुखाने राहिले आहेत ३ तुकाराम महाराज म्हणतात, तुमच्या पायांतील वाकी तुमची कीर्ती त्रैलोक्यात वर्णन करणारी झाली आहे ४

२४६५ रूपीं जडले लोचन । पायीं स्थिरावलें मन ॥ १ ॥
देहभाव हरपला । तुज पाहातां विठ्ठला ॥ २ ॥
कळों नये सुखदुःख । तान हरपली भूक ॥ ३ ॥
तुका म्हणे नव्हे परती । तुझ्या दर्शनें मागुती ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – परती–परत फिरण्याची क्रिया

अर्थ – देवा, माझे डोळे तुझ्या रूपात गुंतून गेले आहेत व तुमच्या चरणी माझे मन स्थिरावले आहे १ विठ्ठला, तुला पाहाताच माझा देहभाव हरपून गेला आहे २ तुझ्या दर्शनामुळे मला सुखदुःखाचे भान राहीनासे झाले असून माझी तहानभूकही संपलेली आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, एकदा तुझे दर्शन झाले की मग तेथून मन परत प्रपंचाकडे वळत नाही ४

विवरण – तुकोबाच्या पुष्कळ अभंगातून ईश्वर भेटत नाही, स्वस्वरूपाची अनुभूती येत नाही म्हणून मनाची तळमळ आहे, चिंता आहे, आर्त पुकार आहे त्याचप्रमाणे हा आर्त पुकार ऐकल्यावर पांडुरंग धावून आला व तुकोबाना कडकडून भेटला त्यावळचेही तृप्तीचे, आनंदाचे, समाधानाचे उद्‌गार बुवांच्या अभंगातून सर्वत्र विखुरलेले दिसतील वास्तविक पाहाता या अद्वितीय सुखाचे कधी वर्णन करता येणार नाही पण प्रसंग पाहून बुवा कधी कधी आपल्या दिव्य अनुभूतीचे व अद्वितीय आनंदप्राप्तीचे प्रसन्न चित्ताचे वर्णन करताना दिसतात या एका सोप्या व सरळ अभंगात विठ्ठलाच्या रूपात डोळे जडल्यावर, त्याच्या पायात मन स्थिरावल्यावर देहभाव कसा हारपून गेला, याचे मोठे रेखीव व गोचर वर्णन त्यांनी केले आहे या प्रसंगी तहानभूक सपने, देहभावाचा निरास होणे 'आत हरी बाहेर हरी। हरीनें घरी कोंडिलें' अशी अवस्था तुकाराम महाराजांनी परोपरीने समजावून देण्याचा प्रयत्न केला आहे 'तरुवर बीजा पोटीं। बीज तरुवरा शेवटीं। तैसें तुम्हां आम्हां झालें। एकीं एक सामावलें॥ उदकावरी तरंग। तरंग उदकाचें अंग' असा मोठ्या मनोरम भाषेत तुकोबा आपले श्रीहरीशी झालेले तादात्म्य वर्णन करताना दिसतात 'ततुपट जैसी एक। तुका विश्वेंसी व्यापक–।' म्हणून त्यांनी आपला व परमेश्वराचा संबंध एके ठिकाणी वर्णन केला आहे, अंतरीची खूण एकदा मनोमय पटली की मग 'स्थिरावली वृत्ती पांगुळला प्राण' अशी अवस्था होऊन जाते 'देशकाल वस्तुभेद मावळला। आत्मा निर्वाळला निरावार' अशी मनाची उदात्त अवस्था होऊन जाते. 'आनंदाचे डोहीं आनंद तरंग। आनंदचि अंग आनंदाचें' अशी थोर अनुभूती त्यांना येऊन जाते 'हरीनें माझें हरिलें

---

१ तापशमन

चित्त' अशी अवस्था झाल्यावर मग 'आता कैसी जाऊं घरा ?' असा प्रश्न निर्माण होणारच. रसना अमृताने ओलावली जाते, सर्व इंद्रियें ब्रह्मरूप होऊन जातात, आणि मग तुकोबांच्या मनात दुसरे काहीही उरत नाही. कस्त्याही दुःखाचा लवलेशही उरत नाही. सगुण व साजिरे रूप पाहाताच त्याचे डोळे सुखावतात. मन त्याच सुखास लालचावून जाते. 'होतां दृष्टादृष्टी। ताप गेला उठाउठी' असा अनुभव त्याना येतो 'तुज पाहतां सामोरी। दृष्टी न फिरे माघारी' अशी मनःस्थिती त्यांची होऊन जाते. 'साजिरें गोजिरें रूप मनोहर। ध्यानीं निरंतर आवडलें' अशी खूणगाठ त्यांच्या मनास पटते. 'पैल पाहतां श्रीमुख। तहान हारपली भूक' असा अनुभव तर त्याना नित्य परिचयाचा असे.

२४६६ जाणतें[1] लेंकरूं। माता लागे दूर धरूं ॥ १ ॥
तैसें न करीं कृपावंते। पांडुरंगे माझे माते ॥ २ ॥
नाहीं मुक्ताफळा। भेटी मागुती त्या जळा ॥ ३ ॥
तुका म्हणे लोणी। ताक सांडी निवडूनि ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– मुक्ताफळ–मोती.

अर्थ :– एकदा लेकरू जाणते झाले की मग आई त्याला दूर करू लागते १ माझ्या माते, पांडुरंगे, तू मात्र असे माझ्या बाबतीत करू नकोस. २ पाण्यातून एकदा मोती बाहेर काढले की मग पुन. त्या पाण्याची भेट त्याला होत नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, एकदा ताक घुसळून त्यातील लोणी बाहेर काढले की मग पुनः ते ताकात मिसळले जात नाही ४

२४६७ तुजविण कोणां। शरण जाऊं नारायणा ॥ १ ॥
ऐसा न देखें मी कोणी। दुजा तिहीं त्रिभुवनीं ॥ २ ॥
पाहिलीं पुराणें। धांडोळिलीं दरुषणें ॥ ३ ॥
तुका म्हणे ठायीं। जडून ठेलों तुझ्या पायीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:– दरुषणें–शास्त्रे, ठेलों–राहिलो

अर्थ – नारायणा, तुझ्याशिवाय मी कुणाला रे शरण जाऊ ? १ तुमच्या सारखा समर्थ मी त्रिभुवनात देखील पाहिलेला नाही. २ मी सर्व पुराणे वाचून काढली, शास्त्रे धुंडाळून पाहिली; पण मला शोध लागला नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, म्हणून मी तुझ्याच पायांशी जडून राहिलो आहे. ४

२४६८ ऐसें भाग्य कई लाहाता होईन। अवघे देखे जन ब्रह्मरूप ॥ १ ॥
मग तया सुखा अंत नाहीं पार। आनंदे सागर हेलावती ॥ २ ॥
शांति क्षमा दया मूर्तिमंत अंगी। परावृत्त संगीं कामादिकां ॥ ३ ॥
विवेकासहित वैराग्याचें बळ। धगधगितोज्ज्वाळ अग्नि जैसा ॥ ४ ॥
भक्ति नवविधा भावशुद्ध बरी[2]। अळंकारावरी मुगुटमणि ॥ ५ ॥
तुका म्हणे माझी पुरवी वासना। कोण नारायणा तुजविण ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – लाहाता–लाभता, मिळविता.

अर्थ – देवा, सर्व जग मी ब्रह्मरूपात पाहात आहे असे भाग्य मला केव्हा लाभेल ? १ असे भाग्य एकदा प्राप्त झाल्यानंतर मग त्या सुखाला अंतपार नाही आनंदाचे सागर जणु हेलावत राहतील. २ कामादिक

---

१ जाले जाणतें. २ बरी

विकारांपासून परावृत्त झालेले मन लाभल्यानंतर शांती, दया, क्षमा या मूर्तिमंत बिंबलेल्या राहतील ३ धगधगणाऱ्या अग्निज्वालेप्रमाणे विवेकासहित वैराग्याचे सामर्थ्य असते. ४ शुद्ध भावाने होणारी नवविधा भक्ती ही सर्व अलंकारांत मुकुटमण्याप्रमाणे श्रेष्ठ आहे ५ तुकाराम महाराज म्हणतात, देवा नारायणा, माझी ही वासना तुमच्यावाचून कोण पुरविणारे आहेत ? ६

विवरण:– सर्व भूतमात्रांत ब्रह्मरूपाची जाणीव होणे हे समत्वाचे प्रमुख लक्षण होय. या अभंगात तुकारामबुवा 'समं सर्वभूतेषु' असणारा परमेश्वर आपणांस आकलन झाल्याचे भाग्य केव्हा निर्माण होईल ? या विचाराने व्याकुळ झालेले दिसतात. 'सर्वभूतस्थितं यो मां भजत्येकत्वमास्थित.' एकत्वबुद्धी म्हणजे सर्व भूतांमध्ये ऐक्यबुद्धी मनात ठेवून वागणारा पुरुष श्रेष्ठ असल्याचे गीतेनेही सांगितले आहे. 'म्हणोनि असो हें विशेषें । आपणपयासारिखें । जो चराचर देखे । अखंडित ॥ हें एकचि वाप सांगावें । जया त्रैलोक्यचि आपवें । मी ऐसें स्वभावें बोधा आलें ॥ म्हणोनि आपणपां विश्व देखिजे । आणि आपण विश्व होईजे' अशी भूमिका साधकाची होत असते मग सहजच त्याच्या अंगी दया, क्षमा, शांती या गुणांची वाढ होत राहाते. कारण 'दया क्षमा शांती' जेथे असते तेथेच देवाची वसती असल्याचे तुकारामबुवांनी दुसऱ्या एका अभंगात म्हटले आहे. सर्व चराचरांत असलेल्या ब्रह्मतत्त्वाला ओळखणे हेच ज्ञानी माणसाचे मुख्य लक्षण गीतेनेही सांगितले आहे 'समं सर्वेषु भूतेषु तिष्ठन्तं परमेश्वरम् । विनश्यत्स्वविनश्यन्तं य: पश्यति स पश्यति' सर्व भूतांच्या ठिकाणी सारख्याच असणाऱ्या व भूते नाहीशी झाली तरी ज्याचा नाश होत नाही अशा परमेश्वराला ज्याने ओळखले त्यानेच खरे जाणले असे म्हणावयाचे.

असा हा एकत्वाचा साक्षात्कार आपणास व्हावा म्हणून तुकोबाची तळमळ आहे. 'मयि सर्वमिदं प्रोक्तं सूत्रे मणिगणा इव' दोऱ्यात अनेक मणी ओवावेत त्याप्रमाणे माझ्याच ठिकाणी सर्व चराचर विश्व ओविले गेले आहे. या भगवद्गीतेतील वचनातील त्रुटी दूर करून ज्ञानेश्वरांनी म्हटले आहे, 'सुवर्णाचे मणी केले । ते सोनियाचे सुतीं वोविले । तैसे म्यां जग धरिलें । सबाह्याभ्यंतरीं' सूत्र व मणी यातील पदार्थ वरवर पाहाता वेगळाच; पण सुवर्णाचे मणी व सोन्याचेच सूत्र यातील एकत्वाची बहार ज्ञानेश्वरांनी येथे वर्णन केली आहे ही एकत्वाची, समत्वाची अनुभूती आपणांस यावी, हे भाग्य आपल्या वाट्यास यावे असे तुकारामबुवांना वाटते. 'वासुदेवः सर्वमिति' जे जे काही आहे ते वासुदेवच आहे अशी प्रचीती येणे महत्त्वाचे आहे 'ते वेळीं जयाकडे वास पाहे । तेउता मीचि तया एकु आहे । अथवा निवान्त जरी राहे । तरी मीचि तया ॥ हे समस्तही श्रीवासुदेवो । ऐसा प्रतीति रसाचा वोतला भावो ।' निर्माण व्हावा अशीच भक्ताची इच्छा आहे 'जिकडे पाहे तिकडे देव । ऐसा भाव दे काहीं' अशी इच्छा तुकोबांनी याही महत्त्वाच्या अभंगात व्यक्त केली आहे.

२४६९ कासया करावे तपाचे डोंगर । आणीक अपार दुःखरासी ॥ १ ॥
कासया फिरावे अनेक[1] ते देश । दावितील आस पुढे लाभ ॥ २ ॥
कासया पुजावीं अनेक [2]दैवतें । पोटभरे तेथें लाभ नाहीं ॥ ३ ॥
कासया करावे मुक्तीचे सायास । मिळे पंढरीस फुका साटीं ॥ ४ ॥
तुका म्हणे करीं कीर्तन पसारा । लाभ येईल घरा पाहिजे तो ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– कासया–कशासाठी, सायास–प्रयत्न

अर्थ.— तपाचे डोंगर विनाकारण कशासाठी उभे करावेत ? आणि अपार दुःखराशी देणारी साधने तरी कशासाठी करावीत ? १ विनाकारण अनेक देशांतून कशासाठी फिरावे ? ती काय पुढील लाभाची आशा दाखविणार आहेत ? २ अनेक देवदैवतांचे पूजन कशासाठी करावे ? त्यापासून काही पोट भरणारा लाभ कधीच होणार नाही ३ मुक्ती प्राप्त व्हावी म्हणून कशासाठी प्रयत्न करावेत ? ती तर पंढरपूर येथे फुकटचीही मिळते. ४ तुकाराम महाराज म्हणतात, श्रीहरीच्या कीर्तनाचा प्रसार कर. त्यायोगे तुला हवा तो लाभ तुझ्या घरी चालून येईल ५

[1] आणीक [2] आणीक

२४७० वैष्णवमुनिविप्राचा सन्मान । करावा आपण घेऊं नये ॥ १ ॥
प्रभु जाला तरी ससाराचा दास । विहित तयासी याची सेवा ॥ २ ॥
तुका म्हणे हे आशीर्वादें बळी । जाईल तो छळी नरकायासीं ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा – विप्रांचा-ब्राह्मणाचा, प्रभु-राजा, विहित-योग्य

अर्थ – खरे म्हणजे वैष्णव मुनी व ब्राह्मण याचाच सत्कार करावा त्याचा मान आपण कधी घेऊ नये १ राजा झाला तरी काय झाले ? तोही समारिक गोष्टींचा दास असल्याने त्यानेही त्याचे पूजन करावे हेच योग्य होय २ तुकाराम महाराज म्हणतात, संत व ब्राह्मण याच्यात आशीर्वाद देण्याचे सामर्थ्य असल्यामुळे त्याना जो छळतो तो नरकासच जाईल ३

विवरण – येथे वैष्णव मुनी व ब्राह्मण याचा सत्कार सामान्य लोकाप्रमाणेच राजे लोकानीही करावा असे सागितले आहे वैष्णव मुनी म्हणजे परमेश्वराच्या भजनपूजनात दग झालेले ईश्वरभक्त सुख दुख, लाभालाभ, जयाजय, शीतोष्ण इत्यादी द्वद्वाच्या पलीकडे जाऊन जगास मार्गदर्शन करण्याचे कार्य हे वैष्णव मुनी करीत असतात. ब्राह्मण म्हणजे ब्रह्म जाणणारे, त्याचाही सन्मान करावा असे तुकोबानी या अभगात सागितले आहे कारण इतरत्रही तुकाराम महाराजांनी ब्राह्मणाची आपली कल्पना स्पष्ट केलेली आहे ‘जयासी नावडे हरिनाम कीर्तन । आणीक नर्तन वैष्णवाचें’ त्यास ब्राह्मण म्हणू नये असे बुवानी म्हटले आहे ‘रामकृष्णनामें उच्चारी सरळें । आठवी सावळ रूप मनीं । ’ अशी ज्याची वृत्ती आहे तो ब्राह्मण जातीचा नसला तरी त्यास ब्राह्मण म्हणाव असा तुकोबाचा अभिप्राय आहे तुकोबाची शिष्या बहिणाबाई हिने तर ‘ब्राह्मण कोणासी म्हणावें निश्चित’ यासबधी अति विस्ताराने विवेचन केले आहे त्यावरून ‘ब्रह्म जाणे तोचि बोलिजे ब्राह्मण’ असा निष्कर्ष तिने काढला आहे अशाच ब्राह्मणाचा सन्मान करावा असे बुवाना वाटते

२४७१ देव वसे चित्तीं । त्याची घडावी संगती ॥ १ ॥
ऐसे आवडतें मना । देवा पुरवावी वासना ॥ २ ॥
हरिजनासी भेटी । नहो अंतरसंगें तुटी ॥ ३ ॥
तुका म्हणे जिणे । भले संतसंघष्टणे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – नहो–न व्हावी

अर्थ– ज्याच्या चित्तामध्ये देवाची वसती आहे त्याची मला नेहमी सगती मिळावी १ देवा, माझ्या मनात हेच फार आवडते माझी ही इच्छा तुम्ही पूर्ण करावी २ एकदा हरिजनाची भेट झाल्यावर त्यांच्या सगतीत तुटी निर्माण होऊ नये अतसगात कमतरता करू नये ३ तुकाराम महाराज म्हणतात, सतांच्या सगतीमुळे माझे जीवन फार चांगले होऊन गेले आहे ४

२४७२ भाग सीण गेला । माझा सकळ विठ्ठला ॥ १ ॥
तुझा म्हणवितों दास । केली उच्छिष्टाची आस ॥ २ ॥
राहिली तळमळ । तई पासोनी सकळ ॥ ३ ॥
तुका म्हणे धालें । पोट ऐसे फळों आले ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – आस–इच्छा, धालें–सतुष्ट झाले

अर्थः– विठ्ठला, मला झालेला सर्व शीणभाग दूर झाला. १ मी तुझा दास आहे असे स्वतः म्हणवून घेतो. मी तुझ्या उच्छिष्टाचीच इच्छा केलेली आहे. २ त्या वेळेपासून माझ्या मनाची सर्व तळमळ दूर झाली आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, यामुळे माझे पोट भरले व मी संतुष्ट झालो असे मला वाटते. ४

२४७३ रायाचे सेवक । सेवटीचें पीडी रंक ॥ १ ॥
हा तों हिणाव कवणा । कां हो नेणां नारायणा ॥ २ ॥
परिसेंसी भेटी । नव्हे लोहोपणा तुटी ॥ ३ ॥
तुझें नाम कंठीं । तुका काळासवें भेटी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपाः– रायाचे-राजाचे, सेवटीचें-सेवटचे, खालचे, नीच, हिणाव-हीनपणा.

अर्थः– आम्ही राजाचे सेवक असूनही नीच लोकांनी आम्हांस पीडा द्यावी ना ! १ नारायणा, हा कमीपणा मग आता कुणाकडे येणार ? हे तुम्ही जाणीत का नाही ? २ परिसाचा व लोखंडाचा संबंध येऊनही लोखंडाचा लोखंडपणा कमी का होत नाही ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, तुझे नाम नेहमी कंठात असूनही देवा, हा तुकाराम काळाच्या तावडीत सापडावा काय ? ४

२४७४ सुखरूप ऐसें कोण दुजें सांगा । माझ्या पांडुरंगा सारिकें तें ॥ १ ॥
न लगे हिंडणें मुंडणें तें कांहीं । साधनाची नाहीं आटाआटी ॥ २ ॥
चंद्रभागे स्नान विध तो हरिकथा । समाधान चिता सर्वकाळ ॥ ३ ॥
तुका म्हणे काला वैकुंठीं दुर्लभ । विशेष तो लाभ संतसंग ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- दुजा-दुसरा, आटाआटी-खटपट, प्रयत्न, विध-विधी, काला-गोपाळाचा प्रसाद.

अर्थः– माझ्या पांडुरंगासारखा दुसरा कोण सुखस्वरूप आहे ते सांगा. १ या पांडुरंगास सोडून कुठे दुसरीकडे हिंडण्याची गरज नाही, किंवा मुंडणादी क्रिया करण्याचीही आवश्यकता नाही इतर कोणत्याच साधनांची खटपट करण्याची जरुरी नाही. २ चंद्रभागेत स्नान करून हरिकथा गाणे हाच एक मुख्य विधी होय. त्यामुळे चित्तास सदोदित समाधान होईल ३ तुकाराम महाराज म्हणतात, श्रीकृष्ण व गोपाळमित्र यांच्या संगतीतील काला वैकुंठातही दुर्लभ आहे. संतांच्या संगतीने त्याचा लाभ फक्त पंढरपुरालाच होतो ४

२४७५ नसतां अधिकार उपदेशासी बळात्कार ।
तरि ते केले हो चार माकडा आणि गारोडी ॥ १ ॥
धन धान्य राज्य बोल वृथा रंजवणें फोल ।
नाहीं तेथें ओल बीज वेचो मूर्ख तो ॥ २ ॥
नये बांधों गांठी पदरा आणी[1] ऐसी तुटी ।
आसोन कसोटी शिष्टाचारअनुभव ॥ ३ ॥
उपदेसी तुका मेघ वृष्टीनें आइका ।
संकल्पासी धोका सहज तें उत्तम ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा.– चार-चाळे, मेघवृष्टीनें-मेघाप्रमाणे सहज व समान

अर्थ :– एखाद्याचा अधिकार नसताना जर त्याला उपदेश केला तर तो बळाचा प्रकार होईल. गारोड्याने माकडास खेळवावे तशी गत होईल ती १ धनधान्य, राज्य इत्यादी मनोरंजक असले तरी ते व्यर्थच आहेत ज्या

[1] आण

अमिनीत ओलसरपणाच नाही तेथे बी पेरणारा मनुष्य मूर्खच म्हणावा लागेल २ शिष्टाचाराच्या अनुभवाची कसोटी ज्यास आहे आणि जे नुकसानीत यण्यासारखे आहे, असे आपल्या पदरी काही बांधून घेऊ नये ३ तुकाराम महाराज म्हणतात मी हा उपदेश मेघवृष्टीप्रमाणे समान व सहज वृत्तीने करीत आहे तो त्याच दृष्टीने तुम्ही ऐका एखादा सकल्प करून एखाद्यामध उपदेश करणे धोक्याचे असून सहजासहजी जो होईल तोच उपदेश उत्तम मानावा ४

२४७६ घालुनिया मापीं । देवभक्त बैसले जपीं ॥ १ ॥
तैसी होते साडउलडी । निजनिजाची मुकुंडी ॥ २ ॥
अमुपीं उखते । आपण वोस आपण यातें ॥ ३ ॥
देव आता जाला । उगवे सकोच वहिला[1] ॥ ४ ॥
अखड नेले वेठी । भार सत्याविण गाटी[2] ॥ ५ ॥
आडकिला झोपा । रिता कळिवराचा खोपा ॥ ६ ॥
गोदातीरीं आड । करिते वरविते द्वाड ॥ ७ ॥
तुका म्हणे बळें । उपदेशाचे तोड काळें ॥ ८ ॥

शब्दार्थ व टीपा – साडउलडी-साडग्वड, उखतें-मोजके, झोपा-दार, खोपा-खोपटे, झोपडी

अथ – समाप व अमर्याद असणा या ईश्वराला मापामध्ये बसवून मर्यादित घालून हे ढोंगी देवभक्त खोटयाच जपाला बसले आहेत १ आपलीच मुरकंडी त्यानी आपल्याच ठिकाणी याप्रमाणे केलेली असल्याने सर्व सत्तात्मक व पूर्ण परमात्म्याची मात्र साडलवड होत आहे २ परमेश्वर अखड अमाप असताना त्याला मोजके स्वरूप देऊन यांनी आपला अपलेपणाच नाहीसा केला आहे ३ हा देव झाला हे देवाचे स्वरूपच याच्यापुढे नाही असे सांगून हे लोक पहिला सकोच तोडण्यात व आपणच सांगितलेल्या मर्यादित देवाचे स्वरूप मानण्यास आग्रह धरतात ४ सत्यस्वरूपाच्या ईश्वरास सोडून खोटया देवाचे ओझे त्यांनी आपल्या शिरावर घेतले आहे ५ रिकाम्याच देह बुद्धीच्या खोपटास यानी दार लावले व ते त्यात अडकून पडले आहेत ६ गोदावरीच्या तीरावर राहून आड खणण्याचे काम द्वाडपणाचेच आहे ७ तुकाराम महाराज म्हणतात, अशा प्रकारे नित्य परिपूर्ण व अमर्याद असणाऱ्या देवाचे स्वरूप सकोचित करणे, बळेच त्याचे माप करणे आणि त्याप्रमाणे उपदेश करणे ही गोष्ट त्याची तोंडे काळी करणारी आहे ८

२४७७ उवरातील कीटका । हेचि ब्रह्मांड ऐसे लेखा[4] ॥ १ ॥
ऐसीं उवरे किती झाडीं । ऐसीं झाडें किती नव खडीं ॥ २ ॥
हेंचि ब्रह्मांड आह्मासी । ऐसीं अगणित अडें कैसीं ॥ ३ ॥
विराटाचे अगीं तैसे । मोजू जाता अगणित केश ॥ ४ ॥
ऐशा विराटाच्या कोटी । साठवल्या ज्याच्या पोटीं ॥ ५ ॥
तो हा नदाचा बाळमुकुद । तान्हा म्हणवी परमानद ॥ ६ ॥
ऐसी अगम्य ईश्वरी लीळा । ब्रह्मादीं गम्य तुक्याला ॥ ७ ॥

शब्दार्थ व टीपा – लेखा-समजा गम्य-समजण्यासारखी

अर्थ – उंबराच्या फळामध्ये राहणाऱ्या कीटकांना तेवढेच जग अथवा ब्रह्मांड वाटते असे समजा १ परंतु उंबराची झाडे या नवखडात किती व प्रत्येक झाडाला फळे किती तरी आहेत २ आम्हांला हेच अवाढव्य ब्रह्मांड माहीत असून अशी ब्रह्मांडही अगणित आहेत ३ या विराट स्वरूपाच्या अगावर केस किती आहेत, याची

१ वहिला, २ गोठी, ३ गमेनारी ४ देखा

जशी गणना होऊ शकत नाही, तसेच या ब्रह्मांडाची संख्या मत्पयत नाही ४ आणि अशी कोट्यावधी विराटे ज्या परमेश्वराच्या पोटात साठविली आहेत, ५ तोच हा परमात्मा यशोदेचा बाळ मुकुंदा होऊन स्वतःस तान्हा समजत आहे तो परमानंदस्वरूपाचा आहे ६ तुकाराम महाराज म्हणतात, श्रीहरीची अशी ही लीला अगम्य असली तरी मी ब्रह्मानंदी रमल्यामुळे मला ती समजण्यासारखी आहे ७

२४७८ ब्रह्मज्ञान जरी[1] एके दिवसीं कळे । तात्काळ हा गळे अभिमान ॥ १ ॥
अभिमान लागे शुकाचिये पाठी । व्यासे उफराटी दृष्टी केली ॥ २ ॥
जनकभेटीसी पाठविला तेणे । अभिमान नाणे खोटें केले ॥ ३ ॥
खोटें करूनियां लाविला अभ्यासीं । मेरुशिखरासी शुक गेला ॥ ४ ॥
जाऊनिया तेणे[2] साधिली समाधी । तुका म्हणे तधीं होतो आम्ही ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – शुकाचिये-ईश्वराच्या निर्गुण स्वरूपास मानणारा ब्रह्मनिष्ठ मुनी, त्याच्या

अर्थ :– ब्रह्मज्ञानाची गोष्ट ही एका दिवसात समजण्यासारखी असती तर हा अभिमान तावडतोब गळाला असता १ असाच अभिमान शुकाचार्यांच्या पाठीमागे लागला, पण व्यासांच्या ध्यानात आल्यावर त्यांनी त्यांची दृष्टी फिरविली २ मग त्यांनी शुकाचार्यांना जनकभेटीस पाठविले आणि जनकराजाने शुकाला ब्रह्मज्ञानाचा उपदेश देऊन त्यांचा अभिमान दूर केला ३ अभिमान खोटा केल्यानंतर त्याना जनकाने ब्रह्मप्राप्तीच्या अभ्यासास लावले, त्याच्या साधनासाठी शुकाचार्य मेरुपर्वतावर गेले ४ तुकाराम महाराज म्हणतात, आणि त्यांनी त्या पर्वतावर समाधी लावली, आम्ही त्या वेळेस तेथे होतो ५

विवरण :– शुकाचार्यांचा अभिमान दूर करण्याचा प्रयत्न व्यासांनी व जनकराजाने कसा केला हे या अभंगात तुकाराम महाराजांनी सांगितले आहे पराशरसत्यवतीपुत्र व्यासास शुकाचे रूप धारण करून राहिलेल्या एका ऋषीपासून झालेला हा पुत्र असून आजन्म ब्रह्मनिष्ठ व मोठा भगवद्भक्त म्हणून याची प्रसिद्धी होती याच्या उग्र तपामुळे भयभीत होऊन इंद्राने त्याचे तप भग्न व्हावे म्हणून वसंत व काम यांच्याबरोबर रंभा नावाच्या रूपवतीस त्याच्याकडे पाठविले तरीही त्याचे एकचित्त ढळले नाही याला तपश्चर्येचा व ब्रह्मज्ञानाचा सूक्ष्म अभिमान असल्यामुळे व्यासांनी जनकराजाकडे त्याची रवानगी केली जनकाने त्याचा अभिमान दूर केला येथून पुढे एक मोठा भगवद्भक्त म्हणून त्याची ख्याती झाली याने च परीक्षिती राजास भागवत सांगितले याचे सर्व आयुष्य परमेश्वराच्या चिंतनात गेले निर्गुण ब्रह्माच्या उपासनेपेक्षा त्याचे मन भगवंताच्या सगुण लीला वर्णन करण्यातच विसावले 'मी निर्गुण ब्रह्माच्या ठिकाणी नेहमी रममाण असलो तरी पुण्यश्लोक नारायणाच्या लीलेने माझे मन वेधून घेतल्याने मी भगवताचे पुष्कळ अध्ययन केले ते तुला सांगतो,' असे शुकानेच म्हटलेले आहे

शुकाचार्यांचा अभिमान नष्ट होऊन ते भगवंताच्या चिंतनात कसे रममाण झाले, एवढेच सांगण्याचा हेतू या अभंगाचा नाही, तर 'तुका म्हणे तधीं होतों आम्ही' आम्ही स्वतः त्यावेळी उपस्थित होतो असे तुकारामबुवांनी म्हटले आहे, त्याचाही भावार्थ समजावून घ्यायला पाहिजे आपला आणि श्रीहरीचा फार जुना संबंध आहे असे तुकोबा वारंवार सांगताना दृष्टीस पडतात, आपण श्रीहरीचे जुने सवंगडी आहोत असे त्यांनी एका अभंगात म्हटले आहे आपण खरे म्हणजे श्रीहरीच्या बरोबर वैकुंठात राहणारे असून धर्मरक्षणासाठी, संतांचे मार्ग झाडण्यासाठी, खऱ्याखोट्याचा निवाडा करण्यासाठी पृथ्वीवर अवतरलो असे बुवांनी अनेकदा म्हटले आहे मागें बहुतां जन्मीं। हेंचि करित आलों आम्हीं' असे बुवा म्हणतात हे मागील जन्म कोणते? याही प्रश्नाचे उत्तर त्यांच्याच अभंगात सापडण्यासारखे आहे अंबरीष, प्रल्हाद, अंगद, उद्धव, नामदेव असे चार युगातील चार अवतार होऊन शेवटी तुकाराम महाराजांच्या ठिकाणी सर्व अवतारांचा कळस झाला असे त्यांनी स्वतःच एका अभंगात म्हटले आहे 'अंबरीष प्रल्हाद अंगद । उद्धव नाम या नामाचा बोध ॥ हाच भक्तीचा कळस । पिका आला ब्रह्मरस' अशा या अवतारपरंपरेत तुकोबा शुकाच्या समाधीच्या वेळी असणे हे सहज शक्य आहे

१ तरी, २ तेथें

२४७९ सहज पावतां भगवंतीं परि हीं विकल्पे परतीं ।
फुकाची हे चित्तीं आठवण कां न धरितो ॥ १ ॥
हरि व्यापक सर्वगत हे तंव मुख्यत्वें वेदांत ।
चिंतनासी चित्त असों द्यावें सावध ॥ २ ॥
विरजाहोम याचि नांवें देह नव्हे मी जाणावें ।
मग कां जी यावें वरी लागे संकल्पा ॥ ३ ॥
कामक्रोधें देह मळिण स्वाहाकारीं कैचें पुण्य ।
मंत्रीं पूजियेला यज्ञ मनमुंडण नव्हेचि ॥ ४ ॥
अनन्यभक्तीचे उपाय ते या विठोबाचे पाय ।
ध्याइल तो काय जाणे चुकों मारग ॥ ५ ॥
आतां सांगे तुका एक तुह्मी चुकों नका ।
सांडीमांडी धोका शरण रिघतां गोमटें ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा :- विकल्पे-संशयामुळे, विरजाहोम-सन्यास घेताना करावयाचा होम, सांडीमांडी-खटाटोप, प्रयत्न, गोमटें-चांगले.

अर्थ :- जी जी कर्मे आपल्याकडून होतात ती सर्व सहजच भगवंताला अर्पण होत असतात. पण तीच मी केलीत असा संशय आला तर ती भगवताकडून आपल्याकडे परततात आपल्या कर्मांचा कर्ता आपण नसून भगवंतच आहे अशी फुकटची आठवण का ठेवीत नाही १ श्रीहरी हा व्यापक व सर्वत्र भरून राहिलेला आहे अशी तर वेदान्ताची शिकवण आहे यासाठी सर्वव्यापी अशा या श्रीहरीच्या चिंतनाविषयी आपले चित्त सावध करून ठेवावे.२ मी म्हणजे माझा देह नव्हे हे जाणणे हाच खरा विरजा होम होय. असा सन्यास धारण केल्यानतर मग मी देह आहे अशा संकल्पावरून येण्याचेच कारण उरणार नाही ३ देहातील कामक्रोधानी मलिन झालेल्या अतःकरणाचा त्या यज्ञात होम केला तरी त्याचा काय उपयोग ? कसले पुण्य मिळणार त्यामुळे ? मनाचे खरेखुरे मुंडण जर झाले नसेल तर मंत्रांच्या साहाय्याने केलेल्या यज्ञपूजेचा काय उपयोग ? ४ एका विठ्ठलाचे पाय धरून त्याची अनन्य भक्ती करणे हाच एक काय तो उपाय आहे. त्याचे ध्यान करावे तो कधी मार्ग दाखविण्यास चुकतो का ? ५ तुकाराम महाराज म्हणतात, मी जे एक तुम्हास सांगतो ते तुम्ही कधी चुकू नका ते असे की, श्रीविठ्ठलाला शरण जाणे हे चांगले; त्याशिवाय इतर खटाटोप करण्यातील धोका मोठाच आहे ६

२४८० आह्मीं जाणावे ते काई तुझें वर्म कोणे ठायीं ।
अंतपार नाहीं ऐसे श्रुति बोलती ॥ १ ॥
होईं मज तैसा मज तैसा साना सकुमार हृषीकेशा ।
पुरवीं माझी आशा भुजा चारी दावयीं ॥ २ ॥
खालता सप्त ही पाताळा वरता स्वर्गाहूनि ढिसाळा ।
तो मी मशक डोळां कैसा पाहों आपुल्या ॥ ३ ॥
मज असे हा भरवसा पढीयें होसी तयां तैसा ।
पंढरीनिवासा तुका म्हणे गा विठोबा ॥ ४ ॥

अर्थ :– देवा आम्ही तुझ्या स्वरूपाच्या प्राप्तीचे वर्म कोणत्या ठिकाणी जाणावे ? तुझ्या स्वरूपाला अतपार नाही असे श्रुती सांगतात १ तेव्हा तू माझ्या अल्प भावनेप्रमाणे लहान, सुकुमार व मर्यादित हो हृषिकेशा, माझी एवढी आशा तुझे स्वत चे चतुर्भुज असे रूप दाखवून पूर्ण कर २ तुझे स्वरूप किती अवाढव्य ! खाली सात पाताळे व वरती विस्तीर्ण स्वर्ग यांच्या पलीकडे पसरणारे तुझे रूप मग ते अवाढव्य व सर्वव्यापक असे तुझे स्वरूप एखाद्या घुगुरट्याप्रमाणे असणारा मी माझ्या डोळ्यानी कसे पाहू शकणार ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, पंढरीनिवासा, विठोबा, पण मला तुझा असा भरवसा आहे की, तू आपल्या भक्ताची जशी आवड असेल त्याप्रमाणे सगुण व चतुर्भुज होतोस ४

विवरण – परमेश्वर सर्व ब्रह्मांडास व्यापून राहिलेला आहे त्याच विस्तीर्ण, अमर्याद, असीम स्वरूप कल्पनेने जाणले तरी भक्ताला प्रेमभोगासाठी त्याचा उपयोग नाही लहान, सगुण, सुदर, नटलेले रूप त्याला नेहमीच प्रिय असते अमर्याद विश्वव्यापी परमेश्वर त्याच्या बुद्धीला पटतो, पण भोगासाठी सगुणाची व सानुल्या रूपाची आवड त्याच्या मनात नेहमीच असते भगवताने आपले व्यापकत्व व अमर्याद असणाऱ्या स्वरूपाचा विस्तार वर्णन केल्यानतर ते जगड्व्याळ रूप पाहाण्याची इच्छा अर्जुनास झाली ' द्रष्टुमिच्छामि ते रूपमैश्वर पुरुषोत्तम ' परमेश्वरा, मी आपले वर वर्णन केलेले अमर्याद रूप पाहू इच्छितो अशी विनती अर्जुनाने केली आणि ही विनती मान्य करून श्रीकृष्णाने आपले विस्तारलेले व विश्वास भरून राहिलेले रूप दाखविले बारा आदित्य, आठ वसू, अकरा रुद्र, दोन अश्विनीकुमार, एकूणपन्नास मरुद्गण यानी युक्त असलेले विश्व अर्जुनाने पाहावे म्हणून भगवताने त्याला दिव्य दृष्टी दिली या विश्वरूप परमात्म्याला अनेक तोंडे, अनेक डोळे, अनेक हात, अनेक पाय आहेत आकाशात एक हजार सूर्य प्रकाशित व्हावेत अशी त्याची प्रभा आहे या अवाढव्य विश्वरूपास ना आदी ना अत ! त्याला अनत बाहू, चद्र व सूर्य हे त्याचे डोळे, पेटलेला अग्नी हे त्याचे तोंड आकाशाला जाऊन भिडणारे हे भव्य रूप पाहून अर्जुन भयभीत झाला त्याला दिशा कळेनाशा झाल्या त्याचे समाधान नाहीसे झाले ' प्रसीद देवेश जगन्निवास ' जगन्निवासा, देवा, तुम्ही प्रसन्न व्हा, असी त्याने प्रार्थना करायला सुरुवात केली त्याने श्रीकृष्णाची क्षमायुक्त अत करणाने प्रार्थना केली त्याला हजार वेळा त्याने नमस्कार केला, व त्याने प्रसन्न होऊन आपले पहिले सगुण, सुदर रूप धारण करण्यासाठी प्रार्थना केली ' किरीटिन गदिन चक्रहस्तमिच्छामि त्वा द्रष्टुमह तथैव । तेनैव रूपेण चतुर्भुजेन सहस्रबाहो भव विश्वमूर्ते ' किरीट व गदा धारण करणारे, हातात चक्र घेतलेले, पूर्वीप्रमाणेच मी तुम्हाला पाहू इच्छितो म्हणून सहस्रबाहो विश्वमूर्ते, त्याच चतुर्भुज स्वरूपाने तुम्ही प्रकट व्हावे अशी विनती अर्जुनाने केली या सौम्य सगुण व चतुर्भुज रूपानेच अर्जुनाचे प्रक्षुब्ध मन शात झाले

तुकाराम महाराजानाही ईश्वराचे व्यापक रूप मान्य असूनही त्याचे लहान व सुकुमार रूप हवे ' पुरवी माझी आस । भुजा चारी दाखवीं ' अशी सगुणरूपाची आवड त्याच्या मनात आहे ईश्वराच्या भव्य, दिव्य, अमर्याद स्वरूपदर्शनाने बुद्धीची भूक भागली तरी मनाची भूक सगुण रूपाने पूर्ण होते ' ते हें विश्वरूप आपुलें । तुम्हीं मज डोळां दाखविलें । तरि माझें मन झालें । तुष्ट देवा ॥ परि आता ऐसी चाड जीवीं । जे तुजसी गोठी करावी । जवळीक भोगावी आलिंगावी ' या ज्ञानेश्वराच्या उक्तीप्रमाणे ईश्वराशी ' गोठी ' करून त्याला आलिंगन द्यावयाचे तर सगुण व लहान रूपच हवे यासाठीच ' तेंचि चतुर्भुज रूप तुझें । तो विसावा आम्हा ' असे थोर भक्ताना वाटते कारण शेवटी अर्जुनानेही म्हटले की, हे विश्वरूपाचे सोहळे । मोगूनि निवाले जी डोळे । आतां होताति आधलें । कृष्णमूर्तीलागीं ॥ तें साकार कृष्णरूपडें । धावूनि पाहों नावडे । तें न देखतां थोडें । मानिताती हे ॥ आम्हां भोग-मोक्षाचिया ठायीं । श्रीमूर्तिवांचूनि नाहीं । म्हणोनि तैसाचि साकार होईं । हें सांवरी आता ' आणि भगवतानेही आपल्या भक्ताची ही इच्छा पूर्ण केली

२४८१ वृक्ष वल्ली आम्हा सोयरीं वनचरें । पक्षी ही सुस्वरें आळविती ॥ १ ॥
येणें सुखें रुचे एकांताचा वास । नाहीं गुण दोष अंगा येत ॥ २ ॥

आकाश मंडप पृथिवी आसन । रमे तेथें मन क्रीडा करी ॥ ३ ॥
कंथाकुमंडल देहउपचारा । जाणवितो वारा अवसरु ॥ ४ ॥
हरिकथा भोजन परवडी विस्तार । करोनि प्रकार सेवूं रुची ॥ ५ ॥
तुका म्हणे होय मनासी संवाद । आपुलाचि वाद आपणासी ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा –वनचरें–वनात चरणारी श्वापदे प्राणी इ. कंथा वाकळ, जाडेभरडें वस्त्र. परवडी–प्रकार

अर्थ – या वनातील अनेक प्रकारचे वेल आणि वृक्ष आणि वनात राहणारे प्राणी, सुस्वर स्वराने ईश्वरास आळविणारे पक्षी हेच आता आमचे सोयरेधायरे बनले आहेत १ या सुखानेच आम्हाला या एकांताचा निवास प्रिय झाला आहे यामुळे कोणताही गुणदोष आमच्या अंगास कधी येत नाही २ आम्हाला वर डोक्यावर आकाश हे मंडपाप्रमाणे असून पृथ्वी हे आमचे बसण्याचे आसन आहे आमचे मन जेथे रमेल तेथे आम्ही मनसोक्तपणे क्रीडा करू ३ जाडीभरडी वाकळ पाण्यासाठी कमंडलू ही आमच्या देहाच्या उपचाराची दोनच साधने भरपूर आहेत. आणि या चिंतनात किती वेळ गेला हे वाऱ्यामुळे आम्हास जाणवते ४ या ठिकाणी आमच्या भोजनास हरिकथा असून आम्ही तिचे नाना प्रकार करून तिचे सेवन मोठ्या आवडीने करू ५ तुकाराम महाराज म्हणतात, एकांताच्या अवस्थेत माझा माझ्या मनाशीच संवाद होत असतो मी आपल्या स्वतःशीच वादविवाद करीत असतो ६

विवरण – या अतिशय प्रसिद्ध व मर्मग्राही अभंगात तुकारामबुवांनी निसर्गरूपी परमेश्वरात विलीन झालेल्या आपल्या वृत्तीचे मोठे बहारदार वर्णन केले आहे संसाराची वाताहत झाली, व्यवसाय बुडाला, आणि आधीच परमार्थप्रवण असलेले बुवांचे मन संसारपाशातून निसटले त्यांना हरिकथेचा वेध लागला सत्संगाची गोडी त्यांना लागली कीर्तनभजनात त्यांचे मन रमू लागले ज्ञानेश्वरी व एकनाथी भागवत यांची पारायणे करण्यात ते रमून गेले एकांतवासाची त्यांना गोडी निर्माण झाली भंडारा, भामनाथ या डोंगरावर वृक्षवल्ली, पक्षी व इतर प्राणी यांच्या सहवासात त्यांचे मन रमून गेले वरती आकाश हे आच्छादन व खाली पृथ्वी हे आसन अशा विस्तीर्ण पार्श्वभूमीवर बुवांचे मन परमार्थचिंतनात व प्रभुप्रेमात रमून गेले श्रीहरीच्या नामस्मरणाचे निरनिराळे प्रकार करून याच भोजनावर ते संतुष्ट झाले आपल्याच मनाशी वक्ता व श्रोता अशा भूमिकांनी त्यांनी रमविले

निर्माण होतात तुकोबानी दुसऱ्या एका अभगात म्हटले आहे 'एकान्ताचें सुख जडलें जिव्हारीं । वीट परिवारीं बरा आला' लोकसमुदायाचा वीट आल्यामुळे आपण एकान्तवास पत्करला आता या एकान्तात आपणच आपल्या मनाशी वादविवाद करू, सवाद करू, अशी त्याची वृत्ती बळावली 'खेळों मनासवें जीवाच्या सवादें । कौतुकें विनोदें निरजनीं' असे त्यानी एके ठिकाणी म्हटले आहे

२४८२ अनत ब्रह्माडें । एके रोमीं ऐसें घेंडें ॥ १ ॥
तो या[1] गौळियाचे घरीं । उबरा चढता टेंका धरी ॥ २ ॥
मारी[2] दैत्य गाढे । ज्याचे पुराणीं पवाडे ॥ ३ ॥
तुका म्हणे कळा । अगीं जयाच्या सकळा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – घेंडें–अफाट, अमर्याद, टेंका–आधार, कळा–कला

अर्थ – याच्या एका केसावर अनत ब्रह्माडे भावतील असे याचे अफाट रूप आहे १ असा हा श्रीहरी गोकुळातील गवळ्याच्या घरी उबरा चढताना हात लावून त्याचा आधार घेतो २ यानेच अनेक दैत्याना ठार केले असे पुराणातून याचे पवाडे गाइलेले आहेत ३ तुकाराम महाराज म्हणतात, याच्या अगी नाना कला वसत आहेत ४

२४८३ सावधान ऐसें काय तें विचारा । आले हो ससारा सकळ ही ॥ १ ॥
अतीं समयाचा करणें विचार । वेचली सादर घटिका पळें ॥ २ ॥
मगळ हें नोहे कन्यापुत्रादिक । राहिला लौकिक अतरपाट ॥ ३ ॥
*तुका म्हणे देव अतरला दुरी । डोळियां अधारी पडलीसे ॥ ४ ॥*

शब्दार्थ व टीपा – विचारा–विचार करा

अर्थ – ससारास उत्सुक असलेले सर्व लोकहो सावधान म्हणजे काय याचा थोडा विचार करा ना १ अतकाळी केव्हा कोणता समय येणार हे विचारात घ्यावे आयुष्याची घटका, पळे असा सर्व वेळ प्रपचातच खर्च होत आहे, याचा काही तरी विचार व्हावा २ कन्या-पुत्रादिकांचा मोह धरून त्यात गुतणे हे काही मगलकारक नाही त्यामुळे परमेश्वर व आपण याच्यात एक लौकिकाचा पडदा निर्माण होतो ३ तुकाराम महाराज म्हणतात त्यामुळेच देव दूर अतरला असून डोळ्यापुढे अधारी निर्माण झाली आहे ४

२४८४ लवण मेळविता जळें । काय उरलें निराळें ॥ १ ॥
तैसा समरस जालों । तुजमाजी हरपलों ॥ २ ॥
अग्निकर्पूराच्या मेळीं । काय उरली काजळी ॥ ३ ॥
तुका म्हणे होती । तुझी माझी एक ज्योती ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – लवण–मीठ, कर्पूर–कापूर

अर्थ – पाण्यात मीठ मिसळल्यावर मग निराळे असे तेथे काय उरणार ? १ त्याप्रमाणे देवा, मी तुमच्याशी समरस झाल्यामुळे माझा आत्मा तुमच्यातच हरपून गेला आहे २ अग्नी आणि कापूर यांचा मिलाफ झाल्यावर त्यावर काजळी कधी तिळमात्र राहाते काय ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, त्याप्रमाणे तुझी व माझी एकच ज्योत होऊन जाते ४

२४८५ सुख नाहीं कोठें आलिया ससारीं । वाया हावभरी होऊं नका ॥ १ ॥
दुःखबांदवडी आहे हा ससार । सुखाचा विचार नाहीं कोठें ॥ २ ॥

[1] हा [2] मारियेले

चवदा कल्पेंवरी आयुष्य जयाला । परी तो राहिला ताटीखालीं[1] ॥ ३ ॥
तुका म्हणे वेगीं जाय सुटोनियां । धरूनि हृदयामाजी हरे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :— वाया–व्यर्थ, बांदवडी–बंदीखाना.

अर्थ :— या संसारात वावरत असताना सुख पाहु जाता ते कुठेही मिळणार नाही यासाठी सुखाची हाव व्यर्थ करीत जाऊ नये. १ हा संसार खरे पाहाता दु:खाचा बंदिखानाच आहे येथे सुखाचा विचारही कुठे दिसणार नाही २ मार्कंडेयास चौदा कल्पेपर्यंत जरी आयुष्य होते, तरी संसाराचा लोभ न धरता तो सूर्याच्या उष्णतेपासून रक्षण व्हावे म्हणून तो एका ताटीच्या सावलीत राहिला होता ३ तुकाराम महाराज म्हणतात, ज्याने श्रीहरीस आपल्या हृदयात धरून ठेविले आहे तो मात्र त्वरेने या संसारामधून मुक्त होतो. ४

विवरण:–या संसारात सर्वांनाच सुख हवे असते दु:ख कुणासच नको असते. 'सुख पाहातां जवापाडें । दु:ख पर्वताएवढें' असे बुवानी एका अभंगात (क्र ८८) म्हटले आहे. तुकारामबुवा सुख जवाएवढे म्हणतात, तेही निर्मळ असे नाही. संसार हा 'सुखबांदवडी' असून त्यातून सुटून शाश्वत सुखाची प्राप्ती व्हायची असेल तर श्रीहरीचा आश्रय घ्यावा असे माधमत म्हणत आले आहेत. 'संसार एव दु:खानां सीमान्त इति कथ्यते' असे योगवासिष्ठात म्हटले आहे. 'अनन्तानीह दु:खानि सुखं तृणालवोपमम्' म्हणजे या संसारात सुख पाहावे तर ते अत्यंत अल्प आहे आणि जे आहे ते आभासात्मक आहे असा अत्यल्प सुखाच्या मागे लागल्यानेच दु:खाचा ससेमिरा पाठीशी लागतो. दु:ख मात्र अनंत आहे. या दु:खातून तरून जाण्यास आत्मज्ञानाशिवाय दुसरा मार्ग नाही. मार्कंडेय हा एक चौदा कल्पपर्यंत शंकराकडून आयुष्य मिळालेला ऋषी. याने सहा मन्वंतराचे घोर तप करून हे दीर्घायुष्य मिळविले होते.

२४८६ तुज करितां नव्हे[2] ऐसें कांहीं नाहीं । डोंगराची राई रंक राणा ॥ १ ॥
अशुभाचें शुभ करितां तुज कांहीं । अवघड नाहीं पांडुरंगा[3] ॥ २ ॥
सोळा सहस्र नारी ब्रह्मचारी कैसा । निराहारी दुर्वासा नवल नव्हे ॥ ३ ॥
पंचभ्रतार[4] द्रौपदी सती । करितां पितृघाती पुण्य धर्मा ॥ ४ ॥
दशरथा पातकें ब्रह्महत्ये ऐसीं । नवल त्याचे कुशीं जन्म तुझा ॥ ५ ॥
मुनेश्वरा नाहीं दोष अनुमात्र । मांडवितां सुत्र वध होती ॥ ६ ॥
तुका म्हणे माझे दोष ते कायी । सरतां तुझे पायीं जालों देवा ॥ ७ ॥

शब्दार्थ व टीपा – राई–मोहरी, रंक–भिकारी, राणा–राजा, पुत्र–सुत, मुलगा, सरतां–निष्पाप

अर्थ :— देवा, तू एकदा मनामध्ये आणलेस तर होणार नाही असे काय आहे ? पर्वताची मोहरी व दरिद्री माणसास तू राजा करून टाकशील. १ पांडुरंगा, कोणत्याही अशुभाचे शुभ करताना तुला काहीच कष्ट पडत नाहीत २ सोळा हजार बायका असूनही तो ब्रह्मचारी कसा ? साठ सही अन्न खाऊनही दुर्वास ऋषी निराहारी कसा ? हे नवल काही उलगडत नाही ३ पाच पतींची पत्नी असून द्रौपदी पतिव्रता कशी ? सर्व गोत्रजांचा नाश करणारा धर्मराज पुण्यवान कसा मानला जातो ? ४ दशरथाने ब्रह्महत्या केलेली असूनही देवा, तुम्ही त्याच्या पोटी जन्म घ्यावा हे नवलच आहे. ५ पुत्राचे भांडण लावून मुनीश्वरांनी परस्परांचा वध केला त्यासाठी त्यांना अणुमात्र दोष कसा लागत नाही ? ६ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, एवढ्या दोषांपुढे माझे दोष ते काय ? मी तुझ्या पायांशी येऊनच निष्पाप झालो आहे ७

---

१ ताटीतळीं, २ होय, ३ नारायणा, ४ पंचभ्रतारांची द्रौपदी ते सती.

## पाळणा

२४८७ जननिया बाळका रे घातले पाळणा । पंचतत्त्वीं जडियेल्या वारतिया चहू कोणा ।
अखंड जडियेल्या तया ढाळ अगणा । वैखरी धरूनि हातीं माव दावी खेळणा ॥ १ ॥
निजीं रे निजीं आता । म्हणोनि परिये दे माता ।
खेळता कष्टलासी बाळा तूं रे नेणता । निजीं रे निजीं आता ॥ २ ॥
खेळता बाहेरि रे मुला लोकाच्या सवे । बागुल काळतोंडा नाहीं नेतो तें ठावें ।
खेळता दुश्चित्ता रे देखोनि तें न्यावे । म्हणोनि सांगें तुज शीघ्र वचन पाळावें ॥ ३ ॥
सचित मागें तुज शुद्ध होतें सांगातीं । तेणें तुज वाचविले वेरझारिया हातीं ।
आणीक नेलीं मागें काय जाणो तीं किती । आलासि येथवरि थोरपुण्यें बहुतीं ॥ ४ ॥
खेळता शुक देवा तो रे लागला पाठीं । लपाला वरुषें बारा तिये मातेचे पोटीं ।
रिघता बाहेरि रे पळे घेऊनि कासोटी । तेंचि परी जाली स्वामी भेणें रिघे कपाटीं ॥ ५ ॥
खेळता चक्रवर्ती जनका लागला धाक । पडिला अग्नीमाजी पाव जळत एक ।
भरलासे काप अगीं सुख नाठवे दुःख । आप पर तें ही नाहीं देहभाव सकळिक ॥ ६ ॥
सिभ्रीया चक्रवर्ती कव पडिली अवचिती । धीट तो न भे तया मास कापिलें हातीं ।
टाकिलें तयावरी खुणे गोविला अंतीं । पावला मायबाप हिरोन घेतला हातीं ॥ ७ ॥
बाधलें अजामेळा वेश्यागणीका कैसी । मारिली हाक धाके कळले मायबापासी ।
घातली धाव नेटें वेगीं पावला त्यासी । हिरोनि नेलीं दोघें आपणया तीं पासीं ॥ ८ ॥
धरूनी आठवू रे बाळा राहें निश्चळ । खेळता दुश्चिता रे नको जाऊं वरळ ।
टोंकताहे तुजलागीं दिवस लेखूनी काळ । मग नेदी आठवूं रे नेत्रीं घालीं पडळ ॥ ९ ॥
ऐसी तीं कृपावंतें बाळा मोहिलें चित्त । सुस्वरें कंठ गाय मधुर आणि संगीत ।
तेणें तेंचि चित्त राहे होऊनिया निवांत । पावती तुका म्हणे नाहीं विश्वास ते घात ॥१०॥

हा चक्रवर्ती राजा जनक क्रीडा करीत असताना त्यासही काळाचा अथवा बागुलबुवाचा धाक उत्पन्न झाला आणि त्याचा एक पाय अग्नीत पडून जळत राहिला तरी या बागुलबुवाच्या भयाने त्याला सुखदु:खांची आठवणही होईनाशी झाली. त्याचा आपपर भावही नाहीसा होऊन देहभाव गळून गेला ६ पृथ्वीचा राजा शिबी याच्यावर अचानकपणे या बागुलबुवाची मिठी पडली. पण तो इतका धीट होता की त्याने न भिता आपल्या हाताने श्रीहरीस मांस कापून दिले. आणि उरलेले दुसरे अंग सार्थकी लागलेले नाही म्हणून ते रडते असे सांगून त्याने श्रीहरीलाच कुंठित केले. नंतर तो मायबाप देव त्याला प्रसन्न झाला. त्याला त्याने काळाच्या हातून सोडवून हाताशी धरले. ७ अजामेळासही या बागुलबुवाने असेच धापले होते. पिंगला नावाच्या एका वेश्येसही त्याने अशाच प्रकारे धरले. त्यानी यावेळी भयभीत होऊन मायबाप देवाला हाक मारली. तो त्यांना समजलीही आणि त्याने नेटाने धाव घेऊन त्यांना त्या काळाच्या हातून मुक्त केले. त्या दोघांना त्याने आपणा-पाशीच नेले. ८ बाळा, अशा प्रकारे त्या श्रीहरीची आठवण करून तूही निश्चल म्हणजे स्थिर राहा. खेळ खेळताना दुर्दैवाने वाटेल त्या प्रकारे बरळत जाऊ नकोस. काळ हा तुझी एकसारखी वाट पाहात असून तो तुझ्या आयुष्याचे एक्एक दिवस मोजीत बसला आहे. मग तो तुला श्रीहरीची आठवणही करू देणार नाही. तुझ्या डोळ्यांसमोर एक प्रकारचा पडदा निर्माण करील. ९ तुकाराम महाराज म्हणतात अशा प्रकारे हा बाळ हरीच्या कृपेनें सपन्न झाला. त्याने या बाळाचे चित्त मोहून टाकले. तो सुस्वर गळयाने श्रीहरीचे मधुर गान करू लागला. त्यामुळे त्याचे चित्त निवान्त व स्वस्थ होऊन गेले. अशा प्रकारे त्याच्या वचनावर जे विश्वास ठेवतात त्यांना तो पावतो. त्यांना इष्ट अशी फलप्राप्ती होते. त्यांचा विश्वासघात कधीच होत नाही. १०

२४८८ उभ्या बाजारांत कथा । हे तों नावडे पंढरिनाथा ॥ १ ॥
अवघें पोटासाठीं ढोंग । तेथें कैंचा पांडुरंग ॥ २ ॥
लावी अनुसंधान । कांहीं देईल म्हणऊन ॥ ३ ॥
काय केलें रांडलेका । तुला राजी नाहीं तुका ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– अनुसंधान–बरवरचे, खोटे आख्यान.

अर्थ :– भर बाजारात उभे राहून कथा केलेली पंढरीनाथास आवडत नाही. १ जे कुणी अशी कथा करतील त्यांचे ते सर्व पोटासाठी ढोंग असते. त्यांच्या कथेत पांडुरंगास कसले आले आहे स्थान ? २ कुणी काही चांगली बिदागी देईल काय ? या इच्छेने हा कथेकरी वरवरचे खोटेच आख्यान लावीत असतो. ३ तुकाराम महाराज म्हणतात, रांडलेका, तू अशी कथा करून काय केलेस ? मी काही तुला राजी नाही. ४

२४८९ असोत लोकांचे बोल शिरावरी । माझी मज बरी विठाबाई ॥ १ ॥
आपंगिलें मज आहे ते कृपाळु । बहुत कनवाळु अंतरींची ॥ २ ॥
वेदशास्त्रें जिसी वर्णितो पुराणें । तिचे मी पोसणें लडिवाळ ॥ ३ ॥
जिचें नाम कामधेनु कल्पतरू । तिचें मी लेंकरूं तुका म्हणे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– आपंगिले–आपला म्हटले, सांभाळले.

अर्थ – लोकांचे अनेक प्रकारचे बोल माझ्या शिरावर असू द्यात. मला माझी विठाबाई माऊलीच बरी वाटते १ ती मनाने फारच कृपाळू असल्यामुळे तिने मला दयाळू होऊन सांभाळले आहे. २ या विठाबाईचे वर्णन वेद, शास्त्रे व पुराणे करीत असतात. अशा या आईचे मी एक लडिवाळ लेकरू तिच्या पदरी आले आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, हिचे नाव कामधेनू, कल्पतरू असून मी एक तिचे लाडके लेकरू आहे. ४

२४९० वाराणसी गया पाहिली द्वारका । परी नये तुका पंढरीच्या ॥ १ ॥
पंढरीसी नाहीं कोणा अभिमान । पायां पडे जन एकमेकां ॥ २ ॥
तुका म्हणे जाय एकवेळ पंढरी । तयाचिये घरीं यम न ये ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा – तुका–तुलना, बरोबरी

अर्थ – मी काशी, गया, द्वारका इत्यादी अनेक तीर्थे पाहिली, पण त्यांची तुलना पंढरपुराच्या बरोबर होऊ शकत नाही १ पंढरपुरात कुणाच्याही अंगी अभिमान नसतो सर्वजण एकमेकांच्या पायां पडतात २ तुकाराम महाराज म्हणतात, जो एक वेळा का होईना पण पंढरीस आईल त्याच्या घरी यम येत नाही ३

विवरण –वारकरी लोकांचे एकमेव आश्रयस्थान म्हणजे भिवरेच्या तीरावरील पंढरपूर हे होय या ठिकाणी दीनाचा सखा पांडुरंग आहे, या ठिकाणी माय रुक्मिणी आहे, या ठिकाणी गोपाळांचा व साधुसंतांचा समुदाय आहे याच ठिकाणी वारकरी आषाढी व कार्तिकी एकादशीस सर्व दिशांकडून येतात व विठ्ठलाच्या नामसंकीर्तनात तल्लीन होऊन जातात काशी, गया, द्वारका पाहून साधुसंतांना पंढरपूर अधिक महत्त्वाचे वाटते येथील ओढ त्यांच्या मनास नित्याची असते 'पंढरीस जावें ऐसें माझे मनीं । विठाई जननी भेटे केव्हां' असा ध्यास तुकोबांना नेहमीच असे या पंढरपुरास आल्याबरोबर ते आनंदाने भारावून जात असं 'पावलों पंढरी वैकुंठभुवन । धन्य आजि दीन सोनियाचा ॥ ... पावलों पंढरी क्षेम आलिंगनीं । संत या सज्जनीं निववीलों ॥ पावलों पंढरी पार नाहीं सुखा । भेटला हा सखा मायबाप ॥' असे हे पंढरपूर तुकोबासारख्या संतांना माहेर वाटते यात नवल काय ? या पंढरपुरचे भीमातीर धन्य, येथील भूमी धन्य, येथील तरुवरही धन्य होत येथील सरोवर तीर्थरूप आहे येथील पशू, पक्षी, कीटक, पाषाण धन्य धन्य होत. सब तीर्थांचे मूळ आणि सर्व व्रतांचे फळ असे परब्रह्म या पंढरीस कटीवर हात ठेवून आपल्या भक्तांच रक्षण करीत उभे राहिलेले आहे या पंढरपुरास दुःख औषधासही कधी मिळणार नाही त्यामुळे 'आता जावें पंढरीसी । दंडवत विठोबासी ' अशीच इच्छा सर्वांना असते येथे आल्यावर रखुमादेवीवराचे दर्शन होईल, त्याला पाहून डोळे निवतील, मनास समाधान होईल, संतमहात्म्यांच्या भेटी होतील, वाळवंटात आनंदाने नाचायला मिळेल, अशा या सुखमय स्थानाचे वर्णन करताना तुकाराम महाराज म्हणतात, 'तें तीर्थांचें माहेर । सर्व सुखाचें भांडार' या अनुभवामुळेच साधुसंतांना इतर क्षेत्रांचे माहात्म्य वाटत नाही वैकुंठाची ही मातबरी त्यांना नसत 'जववरी माहीं देखिली पंढरी । तववरी थोरी वैकुंठीची' अशी त्यांची श्रद्धा असत 'सकळ तीर्थांचें माहेर भूवैकुंठ निर्विकार । होतो नामाचा गजर । असुर काळ कांपती । ' असा त्यांची निष्ठा असत या पंढरपुराचे वारकरीच खरे म्हणजे मोक्षाचे अधिकारी असतात काशीस मोक्ष मिळेल, पण तेथें देहपतन व्हावयास हवं हिमालयात दाय जातील पण तेथे शरीर क्षीण व्हावे लागते, तसे या पंढरपुरचे नाही येथे फक्त नामस्मरणान, संतसंगतीत जावाचे कल्याण आहे, 'तुका म्हणे सोपी केली पायवाट । पंढरी वैकुंठ भूमीवरी ' या ओळीत म्हटल्याप्रमाणे आबालवृद्धाना अतिशय सोपी अशी वाट म्हणजे ही पंढरपुरची नगरी होय मुक्तीसाठी इतर जपाचे व साधनाचे परिश्रम करण्याची काय आवश्यकता ? 'कासया करावे मुक्तीचे सायास । मिळे पंढरीस फुकासाठी ' पंढरीच्या या लौकिकामुळेच श्रीज्ञानदेव महाराजानी म्हटले आहे, 'काशी अयोध्या अवंति कांति । मथुरा माया गोमती । ऐसी तीर्थे इत्यादिकें आहेती । परि सरी न पावती पांडुरंगीं ' अशा या पंढरपुराचे माहात्म्य अनेक साधुसंतानी मोठ्या गौरवाच्या भाषेत लिहिले आहे

२४९१ सांडुनिया सर्व लौकिकाची लाज । आळवा यदुराज भक्तिभावें ॥ १ ॥
पाहूनिया झाडें वरवडूनि पाला । खाऊनि विठ्ठला आळवावें ॥ २ ॥
वेंचूनिया चिंध्या भरूनिया धावर । गुडाळूनि दुगा आळवावें ॥ ३ ॥
तुका म्हणे ऐसें मांडिल्या निर्वाण । तया नारायण उपेक्षीना ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – यदुराज–श्रीकृष्ण

अर्थ – सव लौकिकाची लाजलज्जा सोडून मोठ्या भक्तिभावाने या यदुराज श्रीकृष्णास आळवावे १ झाडे नीट पाहून, पाने खाण्यासारखी आहेत हे पाहून त्यांचा पाला ओरबडून खावा व विठ्ठलाचे चिंतन करावे २

रस्त्यावरील चिंध्या वेचाव्यात, त्या धागा घेऊन एकत्र शिवाव्यात, आणि तेच वस्त्र हुंगणास नेसून श्रीविठ्ठलास आळवावे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा प्रकारचे निर्वाण मांडल्यावरच तो हरी त्याची उपेक्षा कधीच करणार नाही. ४

२४९२ दह्यांचिया अंगीं निघे ताक लोणी । एका मोलें दोन्हीं मागों नये ॥ १ ॥
आकाशाचे पोटीं चंद्र तारांगणें । दोहींशी समान पाहों नये ॥ २ ॥
पृथ्वीचा पोटीं हिरा गारगोटी । दोहींसी संसाटी[1] करूं नये ॥ ३ ॥
तुका म्हणे तैसे संत आणि जन । दोहींसी समान भजूं नये ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– संसाटी–बदली, सारखे मानणे.

अर्थ :– एकाच दह्याचे मंथन केले की ताक व लोणी तयार होत असले तरी या दोन वस्तू एकाच किंमतीने कधी मागू नयेत. १ एकाच आकाशाच्या पोकळीत चंद्र आणि इतर तारे असले तरी दोन्ही समान दृष्टीने पाहू नये. २ एकाच पृथ्वीच्या पोटात हिरा आणि गारगोटी सापडत असले तरी एकीचे बदली दुसरी वस्तू मागू नये. ३ तुकाराम महाराज म्हणतात, याचप्रमाणे इतर लोक व संतजन एकाच जगात वावरत असले तरी त्या दोघांना एकाच रीतीने कधी भजू नये. ४

२४९३ तेरा दिवस जाले निश्चक्र करितां । न पवसी अनंता मायबापा ॥ १ ॥
पाषाणांची[2] खोळ घेउनि बैसलासी । काय हृषीकेशी जालें तुज ॥ २ ॥
तुजवरी आतां प्राण मी त्यजीन । हत्या मी घालीन पांडुरंगा ॥ ३ ॥
फार विठाबाई धरिली तुझी आस । करीन जीवा नास पांडुरंगा[3] ॥ ४ ॥
तुका म्हणे आतां मांडिलें निर्वाण । प्राण हा सांडीन चंद्रभागे[4] ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– निश्चक्र–कडकडीत उपास.

अर्थ:– अनंता, मायबापा, तेरा दिवस झाले, मी काही एक न खाता, न पिता येथे कडकडीत अनुष्ठान मांडून उपवास केला आहे; पण तू काही मला पावत नाहीस. १ तू तर पाषाणाचीच खोळ डोक्यावर घेऊन बसला आहेस. हृषीकेशा, तुला झाले तरी काय रे ? २ पांडुरंगा, मी आता तुझ्यावरून माझा प्राण ओवाळून टाकीन, मी ही माझी हत्या तुझ्यावर घालीन. ३ विठाबाई, मी तुझी फार आशा केली ग. पांडुरंगा, आता मात्र मी माझ्या जीवाचा नाश करीन पाहा ४ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, मी आता निर्वाणच मांडले आहे. मी आपला हा प्राण तुझ्यावरून ओवाळून टाकीन. ५

२४९४ लोक फार वाखा अमंगळ जाला । त्याचा त्याग केला पांडुरंगा ॥ १ ॥
विषयां[5] वंचलों मीपणा मुकलों । शरण तुज आलों पांडुरंगा ॥ २ ॥
घर दार अवघीं त्यजिलीं नारायणा । जीवींच्या जीवना पांडुरंगा ॥ ३ ॥
तुका म्हणे पडिलों पुंडलिकापाशीं । धांव हृषीकेशी आलिंगीं मज ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– वाखा–संकट, चमत्कार, वंचलों–मुक्त झालो.

अर्थ– देवा, लोक फार असून अमंगळ असे संकट झाले आहे. पण पांडुरंगा, तुझ्या कृपेने तू त्याचा त्याग केलास. १ नाना प्रकारच्या इंद्रियविकारांच्या विषयांतून मी मुक्त होऊन मीपणास मुकलो व पांडुरंगा, तुला

१ समसाटी, २ दोघांची, ३ तुजवरी, ४ तुजवरी, ५ विषयीं चेवलों.

शरण आलो आहे २ नारायणा, जीवीच्या जीवना, पांडुरंगा, मी घरदार वगैरे सर्व काही टाकून दिले आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी आता या पुंडलीकापाशी पडलो आहे हृषीकेशी, तू धावत ये व मला आलिंगन दे ४

२४९५ इंद्रियांचीं दिनें । आम्हीं केलों नारायणें ॥ १ ॥
म्हणऊनि ऐसे सोसीं । काय सांगों कोणांपाशीं ॥ २ ॥
नाहीं अंगीं बळ । त्याग करीता सकळ ॥ ३ ॥
तुका म्हणे मोटें । प्रारब्ध होतें खोटें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – करीता–कराया तर

अर्थ –इंद्रियांच्या विषयांत गुतवून या नारायणाने आम्हांस दीन करून टाकले आहे १ म्हणून तर हे ससाराचे दुःख सोसीत आहे मी हे कुणापाशी सांगू ? २ सर्वस्वाचा त्याग करावा तर तसे सामर्थ्यही माझ्या अंगी नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, माझे प्रारब्धच फार खोटे आहेसे दिसते ४

२४९६ हातीं धरूं जावें[१] । तेणें परतेंचि व्हावें ॥ १ ॥
ऐसा का हो आला वांटा । हीन भाग्याचा करटा ॥ २ ॥
देव ना ससार । दोहीं ठायीं नाहीं थार ॥ ३ ॥
तुका म्हणे पीक । भूमि न दे न मिळे भीक ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा– थार–आधार, आश्रय

अर्थ – ज्याला हातांत धरायला जावे त्याने दूर व्हावे अशी स्थिती झालेली आहे १ असे भाग्य माझ्या वाट्यास का हो आले ? मी इतका का हीन भाग्याचा व करटा आहे ? २ देवाचा लाभ मला झाला नाही व संसाराचेही सुख नीट मिळाले नाही दोनही ठिकाणी मला आधारच नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, जमीन पीक देत नाही आणि कुणी भीकही वाढत नाही ४

२४९७ मोलें घातलें रडाया । नाहीं असु आणि माया ॥ १ ॥
तैसा भक्तिवाद काय । रगवेगडीचा न्याय ॥ २ ॥
वेठी धरिल्या दावी भाव । मागें पळायाचा पाव[२] ॥ ३ ॥
काजव्याच्या ज्योती । तुका म्हणे न लगे वाती ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा –असु–अश्रू पाव–पाय

अर्थ – पैसे देऊन रडायला बसवलेल्या माणसाच्या डोळ्यांत अश्रू येत नाहीत कारण त्याला खरी मायाच वाटत नसते १ त्याप्रमाणे श्रीहरीची भक्ती प्रेमावाचून काय कामाची ? बेगडाच्या चकाकीप्रमाणेच ती व्यर्थ आहे २ मजुराला वेठीला धरल्यावर त्याचा भाव मागें पाय काढून पळण्याचा असतो ३ तुकाराम महाराज म्हणतात काजव्याच्या तेजाचा काय उपयोग ? त्याने काही वाती लावता येत नाहीत ४

२४९८ तरि च जन्मा यावें । दास विठ्ठलाचे व्हावें ॥ १ ॥
नाहीं तरि काय थोडीं । श्वानशूकरें बापुडीं ॥ २ ॥
ज्यालियाचें तें फळ । अगीं लागो नेदी मळ ॥ ३ ॥
तुका म्हणे भले । ज्याच्या नावें मानवलें ॥ ४ ॥

१ धावे, २ ठाव

शब्दार्थ व टीपा :– शूकरें–डुकरें, ज्यालयाचें–जन्माला आल्याचें.

अर्थ :– विठ्ठलाचे दास व्हावयाचे असेल तरच जन्मास यावे. १ नाही तर गरीब बापडी कुत्री व डुकरे काय थोडी आहेत ? २ दुर्गुणाचा मळ अंगास लागू नये हेच माणसाच्या जन्मास आल्याचे फळ आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, ज्या सज्जनांना हे विठ्ठलाचे दास्यत्व मानवले ते भले आहेत. ४

## ॥ ळळतें १ ॥

२४९९ देव ते संत देव ते संत । निमित्य त्या प्रतिमा ॥ १ ॥
मी तों सांगतसें भावें । असो ठावें सकळां ॥ २ ॥
निराकारी ओस दिशा । येथें इच्छा पुरतसे ॥ ३ ॥
तुका म्हणे रोकडें केणें । सेवितां येणें पोट धाय ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – केणें–माल, धाय–तृप्त होते.

अर्थ :– देव हाच संत असून संत हा देवाप्रमाणे आहे. त्यांच्या मूर्ती निमित्त मात्र आहेत. १ मी हे मोठ्या भावानें सांगत आहे. हे सर्वांना नीट माहीत असावे. २ निराकाराच्या स्वरूपात सर्व दिशा शून्य आहेत. पण येथे सगुणसाकाराच्या ठिकाणी मात्र सर्व इच्छा पूर्ण होतात. ३ तुकाराम महाराज म्हणतात, सगुणस्वरूपाचा माल हा रोकडा असून त्याच्या सेवनानें आपली सर्व इच्छा तृप्त होत असते. ४

२५०० 'न कळे माव मुनि मागे एकी[1] अंतुरी । साठी संवत्सरां जन्म तया उदरीं ॥ १ ॥
ऐसा आकळे गे माये चपळ वो । त्रिभुवनव्यापक सकळ वो ॥ २ ॥
हनुमंता भेटी गर्व हरिला दोहींचा । गरुडा विटंबना रूपा सत्यभामेच्या ॥ ३ ॥
द्रौपदीचा भेद पुरविला समयीं । ऋषि पाळवनीं देठीं लाविता ठायीं[2] ॥ ४ ॥
अर्जुनाच्या रथीं कपि स्तंभीं ठेविला । दोहीं पैज तेथें गर्व हरी दादुला ॥ ५ ॥
भावभक्ती सत्त्वगुण जाला दुर्जना । तुका म्हणे सकळां छंदें खेळे आपणा[3] ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा:– माव–माया, मुनि–नारद, अंतुरी–स्त्री, आकळे– कळणारा, दादुला–श्रेष्ठ पुरुष.

अर्थ.– या श्रीहरीची माया काही समजत नाही. नारद मुनीने श्रीहरीकडे अनेक वायकांतील एक मागितली आणि या नारदास साठ संवत्सरे ही मुले झाली. १ असा हा श्रीहरी न कळणारा चपळ असा आहे. या हरीने साऱ्या त्रिभुवनास व्यापून टाकले आहे २ याने द्वारकेत रामरूपाने हनुमानास भेट देऊन गरुड व सत्यभामा यांची विटंबना करून स्वरूप व सामर्थ्य यांच्याविषयी दोघांचाही गर्व हरण केला ३ द्रौपदीच्या मनात जो संशय होता तो ऋषींच्या मनात जांभूळ देठाला लावण्याच्या प्रसंगी नाहीसा झाला. ४ अर्जुन व मारुती यांची सेतुबंधावद्दल पैज लागली असताना या श्रेष्ठ श्रीहरीने या दोघांचीही पैज खोटी ठरवून हनुमंतास अर्जुनाच्या रथाच्या ध्वजावर युद्धाच्या वेळी स्थापन केले. ५ तुकाराम महाराज म्हणतात, ज्याच्या ठिकाणी भावभक्ती आहे त्याला तो सत्त्वगुणी करतो आणि दुर्जनाचा नाश करतो. अशा प्रकारे सर्व छंद हाच आपणहोऊन खेळत असतो. ६

२५०१ उदारा कृपाळा अगा देवांचया देवा । तुजसवें पण आतां आमुचा दावा ॥ १ ॥
कैसा जासी सांग आतां मजपासुनी । केलें वाताहात दिलें संसारा पाणी ॥ २ ॥

---

१ एक, २ तई ३ आपण

अवघीं आवरूनि तुझें लाविलीं पाठीं । आता त्या विसर सोहकोहंच्या गोष्टी ॥ ३ ॥
तुका म्हणे आता चरणीं घातली मिठी । पडिली ते पडो तुम्हा आम्हासी तुटी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– सोहकोहंच्या–मी तोच आहे, मी कोण आहे असा

अर्थ – देवाच्या देवा, तू कृपाळू व उदार आहेस आता मी तुझ्याबरोबर प्रतिज्ञा करून दावा निर्माण करतो १ आता तू माझ्यापासून कसा जाशील ते सांग कारण मी आपल्याच संसारावर पाणी सोडून त्याची वाताहत केली आहे २ मी माझ्या सर्व वृत्ती नीट आवरून तुझ्याच पाठीशी लाविल्या आता तू त्या साहकोहंच्या गोष्टी विसरून जा ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी आता तुझ्या चरणी मिठी घातलेली असून आता तुमचीआमची तुटी झाली तर होवो ४

२५०२ जाली होती काया । बहु मळीन देवराया ॥ १ ॥
तुमच्या उजळली नामें । चित्त प्रक्षाळिलें प्रेमें ॥ २ ॥
अनुतापें झाला झाडा । प्रारब्धाचा केला तोडा ॥ ३ ॥
तुका म्हणे देह पायीं । ठेवूनि झालो उतराई ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – काया–शरीर, प्रक्षाळिलें–शुद्ध केले, झाडा–हिशेब, तोडा–संबंध तोडला

अर्थ –देवराया, माझा देह फारच मलीन झाला होता रे १ त्याची शुद्धी तुझ्या नामचिंतनाने झाली त्या योगे माझे चित्त प्रेमाने शुद्ध केले गेले २ अनुतापाच्या योगाने सर्व हिशेब चुकता झाला व प्रारब्धाचाही संबंध तुटला ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी हा माझा देह तुझ्या पायावर ठेवून उतराई झालो आहे ४

२५०३ आजि आनंदु रे एकी परमानंदु रे । जया श्रुति नेति नेति म्हणती गोविंदु रे ॥ १ ॥
विठोबाचीं वेडीं आम्हा आनंदु सदा । गाऊं नाचों वाऊं टाळी रंजवूं गोविंदा ॥ २ ॥
सदा सण सांत आम्हा नित्य दिवाळी । आनंदें निर्भर आमचा कैंवारी बळी ॥ ३ ॥
तुका म्हणे नाहीं जन्ममरणाचा धाक । संत सनकादिक तें आमचे कवतुक ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – वाहू–वाजवू, साच–खरोखर, निर्भर–परिपूर्ण

अर्थ – आज आम्हास परमानंदस्वरूपाच्या प्राप्तीचा आनंद झाला आहे कारण जे वेदांना, श्रुतींनाही समजले नाही ते गोविंदाचे स्वरूप त्याच्या नामस्मरणाने समजले आहे १ आम्ही या विठोबाची वेडीवाकडी मुले असून आम्हास सदोदित आनंदच आहे त्यामुळे आम्ही सतत त्यालाच मुखाने गाऊ त्याच्याच नादाने नाचू टाळी वाजवून त्या गोविंदाला रंजवू २ असा हा आनंदाचा दिवाळीचा सण आम्हास खरोखर नित्याचा म्हणून मिळालेला आहे कारण आम्हास हा परिपूर्ण असा बलिष्ठ देव साहाय्यकारी म्हणून प्राप्त झाला आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, आता आम्हास जन्ममरणाची भीती नाही सनकादिक संत हे आमचे अतिशय प्रिय असे विषय बनले आहेत ४

२५०४ प्राणिया एक बीजमंत्र उच्चारीं । प्रतिदिनीं रामकृष्ण म्हण का मुरारि ॥ १ ॥
हेंचि साधन रे तुज सर्व सिद्धींचे । नाम उच्चारीं पां[२] गोपाळाचें वाचे ॥ २ ॥
उपास पारणें न लगे वनसेवन । न लगे धूम्रपान पंचाग्नितापन[३] ॥ ३ ॥
फुकाचे सुखाचें कांहीं न वेचे भांडार । कोटी यज्ञा परिस तुका म्हणे हें सार ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा– पंचाग्नितापन–चार बाजूस चार अग्नीचे कुंड आणि वरून माध्यान्हीच्या सूर्याचा ताप असे साधन

१ बहुत मळिण पडरिराया, २ रे, ३ पंचाग्निसाधन

अर्थ :– अरे प्राण्या, ' रामकृष्ण मुरारी ' हा एक बीजमंत्र तू रोज वाणीने का उच्चारीत नाहीस ? १ सर्व सिद्धींचे हेच एक साधन असून वाणीने गोपाळाचे नाव उच्चारणे हेच एक फक्त तू करावेस. २ याखेरीज तुला नाना प्रकारचे उपवास, रानावनात जाणे, पंचाग्निसाधनाचा, धूम्रपानाचा त्रास इत्यादी कठीण साधने करण्याची जरुरी नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, हे नामसाधन फुकटचे व सुखाचे असून कोटयावधि यज्ञांपेक्षाही सार-भूत असे आहे. ४

२५०५ विठ्ठल कीर्तनाचे अंतीं । जय जय हरी जे म्हणती ॥ १ ॥
तेंचि सुकृताचें फळ । वाचा रामनामें निखळ ॥ २ ॥
वैसोनि हरिकथेसी । होय सावध चित्तासी ॥ ३ ॥
तुका म्हणे त्याचा जन्म । सुफळ जाला भवक्रम[1] ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:– सुकृताचे-पुण्याचे, निखळ-निर्मळ, केवळ.

अर्थ :– श्रीहरीच्या कीर्तनाच्या शेवटी जय हरी जय विठ्ठल असे जे लोक नामस्मरण करतात १ तेच त्यांच्या पुण्यकर्माचे फळ आहे. वाचेने निर्मळ रामनामाचा उच्चार करावा. २ श्रीहरीच्या कथेस बसून चित्त सावध ठेवावे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशांचा संसार व जन्म सफळ झाला असून त्यांच्या सर्व जीविताच्या धर्मांचे सार्थक झाले. ४

२५०६ न चलवे पंथ वेच नसतां पालवीं । शरीर विटंबिलें वाटे भीक मागावी ॥ १ ॥
न करीं रे तैसें आपआपणा । नित्य राम राम तुम्ही सकळ म्हणा ॥ २ ॥
राम म्हणवितां रांडा पोरें निरविशी । पडसी यमा हातीं जाचविती चौऱ्याशी ॥ ३ ॥
मुखीं नाहीं राम तो ही आत्महत्यारा । तुका म्हणे लाज नाहीं तया गंव्हारा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– पालवीं-पदरात, संग्रही, बरोबर, गव्हारा-गावढळास.

अर्थ :– रामनामाचे वचन जर संग्रही नसेल तर आयुष्याचा मार्ग चालवणार नाही. त्याच्या शिवाय शरीराची विटंबना होऊन भीक मागण्याचाच प्रसंग येईल. १ तेव्हा तुम्ही आपापल्या ठिकाणी तसे न करता नित्य सर्वजण मुखाने रामनामाचा उच्चार करा. २ रामनामाचा उच्चार करताना बायकामुलांच्या निरवानिरवीची चिंता तुम्ही का करता ? हे नाम घेतले नाही तर तुम्ही यमाच्या हातांत सापडून चौऱ्याऐंशी लक्ष योनींत सापडाल. ३ तुकाराम महाराज म्हणतात, ज्याच्या मुखात रामनाम नाही, त्याने आत्मघात केला आहे असे समजावे. त्या गावढळ मूर्खास काहीच लाज नाही असे समजावे. ४

२५०७ पडियेसी निघतां पाषाणांच्या सांगडी । बुडतां मध्यमार्गी तेथें कोण घाली उडी ॥ १ ॥
न करी रे तैसें आपआपणिया । पतंग जाय वांयां जीवें ज्योती घालूनिया ॥ २ ॥
सावधपणें सोमवल[2] वाटी भरोनियां प्याला । मरणा अंतीं वैद्य बोलाविती गहिला ॥ ३ ॥
तुका म्हणे करीं ठायींचाचि विचार । जंव नाहीं पातला यमाचा किंकर ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– पडियेसी-पैलतीरावर, सांगडी-नाव, किंकर-दास.

अर्थ – दगडाच्या नावेत बसून नदीचे पैलतीर गाठण्यास निघाला असता मध्येच एखादा बुडाला तर त्याला वर काढण्यासाठी कोण उडी मारणार ? १ याप्रमाणे आपला घात आपणच कधी करू नये. दिव्यावर झडप घातल्याने पतंगाचे जीवित वायाच जात नाही काय ? २ सावध बुद्धी ठेवून जो सोमल विषाचे प्राशन करतो

१ भवभ्रम, २ सोमल, सोमवेल.

त्यानें मरणाच्या वेळेस सावधपणे त्वरित वैद्यास बोलाविले तरी काय उपयोग ? ३ तुकाराम महाराज म्हणतात जोपर्यंत यमाचे दूत आलेले नाहीत तोपर्यंतच तू आत्मस्वरूपाच्या प्राप्तीचा विचार कर ४

२५०८ द्या जी माझा विचारोनिया विभाग। न सडे हा लाग आहाचपणे ॥ १ ॥
किती नेणो तुम्हा साहाते कटकट। आम्हीच वाईट निवडलों ते ॥ २ ॥
करितां कलह जिवाचियेसाटीं। हे तुम्हा बोभाटीं दाळ देवा ॥ ३ ॥
तुका म्हणे धीर कारण आपुला। तुम्हीं तो विठ्ठला मायातीत ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – आहाचपणें–उगाच, व्यर्थ लाग–पाठलाग बोभाटी–वाईट दाळ–खोड सवय

अर्थ — जी महाराज माझा जो काय वाटा असेल तो नीट विचार करून द्या नाही तर हा लाभ मिळावा यासाठी आम्हास उगाचच तुमचा पाठलाग करावा लागेल १ तुम्ही ही आमची कटकट तरी किती सहन करता ते काही समजत नाही आम्हीच या कामी वाईट म्हणून ठरलो २ आम्हांस जीव जाईपर्यंत तुमच्याशी भांडण करावे लागते ही तुम्हाला अतिशय वाईट खोड लागली आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात आम्हांस आपला धीर वाटावा हेच एक कारण आहे विठ्ठला तुम्ही तर मायेच्या पलीकडचे आहात ४

२५०९ आमुचे ठाउके तुम्हा गर्भवास। वळिवत दोष घेले भोग ॥ १ ॥
काय हा सांगावा नसता नवलाव। मंदपणें भाव भुलवणेचा ॥ २ ॥
एका पळवूनि एका पाठी लावा। कवतुक देवा पाहावया ॥ ३ ॥
तुका म्हणे ज्याणे असे चेतविलें। त्याच्याने उगलें बैसे नव्हे ॥ ४ ॥

वांया जात नाहीं । वचन प्रीतीचें तें कांहीं ॥ ३ ॥
तुका म्हणे देवा । सत्य येतें अनुभवा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – धालें-संतुष्ट झाले.

अर्थ.– देवा, तुमच्या कृपेचे दान जर मला मिळाले असते तर ही अशी केविलवाणी अवस्था माझ्या मनाची झाली नसती. १ ज्याचे मुख टवटवीत आहे व ज्याचे चित्त संतुष्ट झाले आहे त्याच्यावर कृपा झाली असे समजावे. तीच त्याची ओळख आहे. २ तुमचे व आमचे काही प्रीतीचे भाषण झाले तर देवा, ते काही वाया जाणार नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, मला हेच खरोखर अनुभवास येत आहे. ४

२५१२ जालों[१] तंव साचें । दास राहवणें काचें ॥ १ ॥
हें कां मिळतें उचित । तुम्ही नेणा कृपावंत[२] ॥ २ ॥
सिंहाचें तें पिलें । जाय घेऊनियां कोल्हें ॥ ३ ॥
तुका म्हणे नास । आम्हां म्हणविलियां दास ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– सांचें-खरोखर, काचें-कच्चे.

अर्थ :– देवा, आम्ही एक तुमचेच खरोखर दास झाल्यावर मग तुझ्या ज्ञानात कच्चे का म्हणून राहू ? १ कृपावंता, हे आम्हांस मिळते ते उचित अथवा अनुचित हे तुम्हांस समजत नाही काय ? २ सिंहाची पिले कोल्ह्याने धरून न्यावीत, असे कुठे घडले आहे काय ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, याप्रमाणे तुमचे दास म्हटल्यावर आमचा नाश होतो हे बोलणे खरे आहे का ? ४

२५१३ देवाच्या उद्देशें जेथें जेथें भाव । तो तो वसे ठाव विश्वंभरें ॥ १ ॥
लोभाचें संकल्प पळालियावरी । कैंची तेथें उरी पापपुण्या ॥ २ ॥
शुद्ध भक्ती मन जालिया निर्मळ । कुश्चळी विटाळ वज्रलेप ॥ ३ ॥
तुका म्हणे ज्याचें तयासीच फळे । प्रांत येतो फळें काळीं मग ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– ठाव-स्थान.

अर्थ :– देव आहे अशी भावना ज्या ज्या स्थानावर धरावी त्या त्या ठिकाणी विश्वंभर आहे असे दिसेल. १ एखाद्या लाभाचे संकल्प दूर झाल्यानंतर त्या ठिकाणी पापपुण्यास स्थान कसे राहाणार ? २ मन निर्मळ झाल्यावर श्रीहरीची भक्ती शुद्ध होते आणि मनच मलीन असेल तर विटाळ वज्रलेपासारखा अंगी चिकटतो. ३ तुकाराम महाराज म्हणतात, असे हे ज्याचे त्यासच समजत असते. जशी त्याची फळाची इच्छा असेल तशी ती फलद्रूप होते. ४

२५१४ कडसणी धरितां अडचणीचा ठाव । म्हणऊनि जीव त्रासलासे ॥ १ ॥
लौकिकाबाहेरि राहिलों निराळा । तुजविण वेगळा नाहीं दुजा ॥ २ ॥
संकोचानें नाहीं होत धरणोवरी । उरवूनि उरी काय काज ॥ ३ ॥
तुका म्हणे केलें इच्छेचि सारिखें । नाहींसें पारिखें येथें कोणी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– कडसणी-निवड, शोध, विचार, धणोवरी-इच्छातृप्ती, काज-कारण.

अर्थ :– जसजसा विचारपूर्वक शोध करावा तसतशी अडचणच फार येते म्हणून माझा जीव त्रासून गेला आहे. १ याकरिता मी सर्व लौकिकाच्या बाहेर येऊन निराळाच होऊन राहिलो आहे आता मला तुझ्याशिवाय

१ जाले नवमाचे, २ कृपावता.

वेगळे असे त्यानच नाही २ येथे मी संकोच केला तर माझी इच्छातृप्ती कधीच होणार नाही मग संकोच मनात ठेवण्याचे तरी काय कारण ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी माझ्या इच्छेप्रमाणे केले असून आता यापे तुझ्यावाचून दुसरे कोणी परके राहिले नाही ४

२५१५ हेंचि जतन करा दान । धरुनी चरण राहिलो[1] तो ॥ १ ॥
आणीक काहीं न घलों[2] भार । बहुत फार साकडें ॥ २ ॥
घ्यावी माझ्या हातें सेवा । हेंचि देवा विनवणी ॥ ३ ॥
तुका तुमचा म्हणवी दास । तेणें[3] आस पुरवावी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – साकडें–संकट

अर्थ :– देवा, मी तुमचे चरण धरून राहिलो आहे हेच दान तुम्ही मला जे दिले आहे ते नीट जतन करून ठेवा १ याशिवाय मी दुसरा कुठलाही भार तुमच्यावर घालीत नाही, व फार मोठ्या संकटातही टाकीत नाही २ माझ्या हातून तुम्ही सेवा घ्यावी हीच देवा, तुमच्यापाशी एक विनवणी आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी तुमचा दास म्हणवीत असल्याने माझी इच्छा तुम्ही पूर्ण करावी ४

२५१६ आपल्याच स्फुदें । जेथें तेथें घेती छंदें ॥ १ ॥
पडिला सत्याचा दुष्काळ । बहु फार जाली घोळ ॥ २ ॥
विश्वासाचे माठ । त्याचे कपाळीं तें नाट ॥ ३ ॥
तुका म्हणे घाणा । मूढा तीर्थी प्रदक्षिणा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:– स्फुदें–अभिमानाने छंद–आग्रह, माठ–मट्ठ मतिमंद, जडबुद्धी

अर्थ – काही लोक आपल्याच अभिमानाने आग्रह धरीत असतात १ त्यामुळे सर्वत्र सत्याचा दुष्काळ पडलेला असून फारच घोटाळा निर्माण झालेला आहे २ जे मतिमंद व मूढ लोक विश्वास धरीत नाहीत त्यांच्या कपाळी नाटच लागतो त्याना काहीच प्राप्त होत नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात घाण्याच्या बैलाप्रमाणे हा मूर्ख पृथ्वीची प्रदक्षिणा करीत असतो ४

२५१७ उद्वेगाची धाव बैसली आसनीं । पडिलें नारायणीं मोटळें हें ॥ १ ॥
सकळ निश्चिंती जाली हा भरवसा । नाहीं गर्भवासा येणें ऐसा ॥ २ ॥
आपुलिया नावें नाहीं आम्हां जिणें । अभिमान तेणें नेला देवें ॥ ३ ॥
तुका म्हणे चळे एकाचिया सत्ता । आपुलें मिरविता पणें ऐसे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – उद्वेग–चिंता

अर्थ – सर्व वृत्तींसहित मी माझ्या देहाचे मोटकुळे या नारायणाच्या ठिकाणी समर्पण केले असल्यामुळे माझ्या सर्व चिंताची धाव याच एका ठिकाणी बसली आहे १ म्हणूनच मी सर्व चिंतातून मुक्त झालो असा भाव मला प्राप्त झाला आहे आता पुन: गर्भवासास येण्याचे कारण नाही २ माझा सर्व अभिमान त्या देवाने नेलेला असल्याने माझे जिणे माझ्या स्वतंत्र अशा नावाने उरलेले नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात माझे हे शरीर त्याच्याच एका सत्तेने चालते म्हणून मी आपलेपणा टाकून रिकामा झालेलो आहे ४

२५१८ बहुतां पुरे ऐसा वाण । आले धन घरासी ॥ १ ॥
घ्या रे फुका मोलेविण । नारायण न मुला ॥ २ ॥

१ राहिलोसे २ घाली ३ त्याची ४ मी रितापणे आसे

ऐका निवळल्या मनें। बरवें कानें सादर ॥ ३ ॥
तुका म्हणे करूनि अंतीं। निश्चितीं हे ठेवावी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- वाण-माल.

अर्थ :- पुष्कळांना पुरेल असा परमार्थविचाराचा माल आमच्या घरी धनरूपाने आलेला आहे. १ याला काही मोल नाही. फुकटचे हे धन तुम्ही लुटा ना या नारायणाला चुकू नका. २ हे जे मी सांगत आहे ते नीट शुद्ध मनाने व तत्परतेने कान देऊन ऐका. ३ तुकाराम महाराज म्हणतात, शेवटी निश्चित व्हावे म्हणून असा संग्रह करून ठेवावा. ४

२५१९ माझी मज जाती आवरली देवा। नव्हतां या गोवा इंद्रियांचा ॥ १ ॥
कासया मी तुझा म्हणवितों दास। असतों उदास सर्व भावें ॥ २ ॥
भवाचिये[1] भेणें धरियेली कास। न पुरतां आस काय थोरी ॥ ३ ॥
तुका म्हणे आपआपुलीं जतन। कैंचें थोरपण मग तुम्हां ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- गोवा-गुता.

अर्थ :- देवा, माझी इंद्रियें जर मला आवरता आली असती तर मग मी या गुंत्यात सापडलोच नसतो. १ मग मी स्वतःस तुझा दास कशासाठी म्हटले असते? सर्व भावांनी उदास होऊनच राहिलो असतो. २ पण मला या संसाराचे भय वाटू लागले आणि त्या भातीने मी तुमची कास धरली. आता जर माझी इच्छा पूर्ण न झाली तर तुमची थोरवी ती काय राहिली? ३ तुकाराम महाराज म्हणतात, आम्हीच आमचे विकार संभाळून ठेविले तर मग तुम्हांस मोठेपणा कशाचा आहे? ४

२५२० विनवितों तरी आणितोसि परी। याचकानें थोरी दातयाची ॥ १ ॥
आमुचे ही कांहीं असों द्या प्रकार[2]। एकल्यानें थोर कैंचे तुम्ही ॥ २ ॥
नेघावी जी कांहीं बहु साल सेवा। गौरव तें देवा यत्न कीजे ॥ ३ ॥
तुका म्हणे नाहीं आमुची मिरासी। असावेंसीं ऐसीं दुर्बळेंचि ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- परी-प्रकार, थोरी-थोरवी, मोठेपणा.

अर्थ :- देवा, मी तुम्हास जो जो विनवतो तो तो तुम्ही आणखीनच काही प्रकार मला दाखविता. पण मी याचक असल्यानेच तुमच्यासारख्याची थोरवी आहे. १ आमचेही काही उपकार तुमच्यावर आहेत हे ध्यानी असू द्या. तुम्ही एकटेच असाल तर मोठेपणा कसा मिळेल? २ देवा, तुम्ही माझ्याकडून फार सेवा करून घेऊ नये. जेणेकरून आपणा उभयतांचा गौरव होईल असाच प्रयत्न तुम्ही करा. ३ तुकाराम महाराज म्हणतात, आम्ही नेहमीच दुर्बल असावे ही काही आमची सततची मिरास नाही. ४

२५२१ एका ऐसें एक होतें कोणा काळें। समर्थाच्या बळें काय नव्हे ॥ १ ॥
घालुनि बैसलों मिरासीस पाया। जिंको देवराया संदेह नाहीं ॥ २ ॥
केला तो न संडीं आतां कइवाड। वारीन हे आड कामक्रोध ॥ ३ ॥
तुका म्हणे जाळीं[3] अळसाची धाडी। नम्हती आली जोडी फळीं साच ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- कइवाड-निश्चय, साच-खरोखरचे.

अर्थ :- कधी कधी एकाचे दुसरेच होऊन बसते. समर्थांच्या सामर्थ्याने काय होणार नाही? १ म्हणूनच देवराया, मी तुम्हांला जिंकण्यासाठी मिरासीचा पाया घालून बसलो आहे. तुम्हांला जिंकणार यात संशय नाही. २

१ भयाचिये, २ उपकार, ३ जाली.

आता मी जो एक निश्चय केला आहे तो काही सोडणार नाही. पापपुण्यादी विचार जर तुमच्याआमच्या आड आले तर ते मी दूर करीन. ३. तुकाराम महाराज म्हणतात, तुमच्या लाभाचे खरे मर्म मला जेव्हा समजले नव्हते तेव्हा आळसाने माझ्यावर धाड घातली होती. ४.

२५२२ जालें समाधान । तुमचे धरिले[1] चरण ॥ १ ॥
आता उठावेसें मना । येत नाहीं नारायणा ॥ २ ॥
सुखाडिक्पणे । येथें सापडलें केणें ॥ ३ ॥
तुका म्हणे भाग[3] । गेला निवारिला लाग ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – सुखाडिकपणें–सुखदुखदायक, केणें–माल

अर्थ – देवा, मी तुमचे चरण धरले यातच माझ्या मनाचे समाधान झाले. १. नारायणा, आता तुमच्या पायांवरून उठावे असे माझ्या मनात येतच नाही. २. मला या ठिकाणी हा स्वरूपप्राप्तीचा माल मोठ्या सुखदायकपणाने मिळालेला आहे. ३. तुकाराम महाराज म्हणतात, यामुळे माझा सर्व प्रारब्धभोग दूर झाला. ४.

२५२३ मुखाकडे वास । पाहें करूनिया आस[4] ॥ १ ॥
आता होईल तें शिरीं । मनोगत आज्ञा धरीं ॥ २ ॥
तुह्मीं अंगीकार । केला पाहिजे हे सार ॥ ३ ॥
तुका म्हणे दारीं । उभें याचक मीं हरी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – वास–वाट

अर्थ – देवा, मी मोठी आशा धरून, तुमच्या मुखाकडे पाहून तुमची वाट पाहात आहे. १. आता तुमचे जे मनोगत असेल त्याप्रमाणे करा. मी ते शिरसावंद्य मानीन. २. देवा, तुम्ही माझा आता स्वीकार केला पाहिजे, हेच याचे सार आहे. ३. तुकाराम महाराज म्हणतात, श्रीहरी, मी हा याचक भिकारी तुमच्या दारात उभा राहिलो आहे. ४.

२५२४ नाहीं माथा भार । तुह्मी घेत हा विचार ॥ १ ॥
जाणोनिया ऐसें केलें । दुरिल अंगेसी लाविलें ॥ २ ॥
आतां बोलावें आवडी । नाम घ्यावें घडी घडी ॥ ३ ॥
तुका म्हणे दुरी[5] । देवा खोटी ऐसी उरी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – आवडी–प्रेमानें

अर्थ – देवा माझा भार तुम्ही शिरावर घेत नाही हे पाहून मला फार विचार पडलेला आहे. १. असे जाणून आम्ही आजवर जे दूर होतो ते तुमच्या अंगाशी येऊन लागलो. २. आता तुमच्याबरोबर मोठ्या प्रेमाने बोलावे आणि क्षणाक्षणाला तुमचे नाव घ्यावे. ३. तुकाराम महाराज म्हणतात, देवा आता तुमच्यापासून दूर राहणे ही किती खोटी व वाईट स्थिती होईल. ४.

२५२५ माझें जड भारी । आता अवघें तुह्मावरी ॥ १ ॥
जालों अंकित अंकिला । तुमच्या मुकलों मागिला ॥ २ ॥
करितों जें काम । माझी सेवा तुझें नाम ॥ ३ ॥
तुका पाया लागे । काहीं नेदी ना न मगे[6] ॥ ४ ॥

---

१ देखिले, २ पेणे, ३ भोग ४ वास, ५ धरी, ६ मागे

शब्दार्थ व टीपा – अंकिला–स्वाधीन असलेला

अर्थ – देवा, आता माझे सर्व ओझे मी तुमच्यावरच टाकलेले आहे १ तुमच्या स्वाधीन असलेला हा मी तुमचा आज्ञाधारक सेवक असून मागच्या सर्व लौकिक प्रपचास मी मुकलो आहे २ तुमचे नाम सदोदित घ्यावे हीच माझी सेवा असल्याने मी नेहमी हेच काम करीत आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी तुमच्या पायास लागलेलो असून मी तुम्हास काही देत नाही की मागत नाही ४

२५२६ तुम्ही आम्ही भले आता । जालो चिंता काशाची ।। १ ।।
आपुलाले आलो[1] स्थळीं । मौन कळी वाढेना ।। २ ।।
सहज जें मनीं होतें । तें उचितें घडलें ।। ३ ।।
तुका म्हणे नसते अगा । येत संगा सारिखें ।। ४ ।।

शब्दार्थ व टीपा – कळी–भांडण

अर्थ –देवा, आम्ही सेवक व तुम्ही स्वामी या नात्यानी तुम्हीआम्ही आता ठीक आहोत आता चिंता कशाची आहे ? १ तुम्ही स्वामी व आम्ही सेवक, या आपापल्या स्थानी आपण आता असल्यामुळे मौन आहे आता भांडण वाढणार नाही २ जे माझ्या मनात होते ते तुम्ही योग्य रीतीने उघडकीस आणले ३ तुकाराम महाराज म्हणतात, ज्याची जशी संगत असेल त्याप्रमाणे अंगी नसलेले गुणही येत असतात ४

२५२७ चिंता ऐसी नको देऊं आठवण । जेणें देवाचे चरण अंतरे तें ।। १ ।।
आलिया वचनें रामनामध्वनि । ऐकावी श्रवणीं ऐसीं गोडें ।। २ ।।
मत्सराचा ठाव शरीरीं नसावा । लाभेंविण जीवा दुःख देतो ।। ३ ।।
तुका म्हणे राहे अंतर शीतळ । शांतीचें तें बळ क्षमा संगीं ।। ४ ।।

शब्दार्थ व टीपा – अंतर–मन, शीतळ–शांत थंड

अर्थ –चिंता, ज्यायोगे देवाचे चरण अंतरतील अशी आठवण मला तू कधी देऊ नकोस १ वाणीतून रामनामाचा ध्वनी निघावा आणि तो मी कानांनी ऐकावा ही गोडी आता असावी २ दुसऱ्याच्या मत्सरास माझ्या शरीरात स्थान नसावे त्यापासून कोणताही लाभ तर होत नाहीच पण जीवास दुःख मात्र होते ३ तुकाराम महाराज म्हणतात, मन शांत राहावे क्षमाशील वृत्ती असणे हेच शांतीचे सामर्थ्य आहे

२५२८ कोण पुण्य कोणा गांठी । ज्यासी ऐसियाची भेटी ।। १ ।।
जिहीं हरी धरिला मनीं । दिले संसारासी पाणी ।। २ ।।
कोण हा भाग्याचा । ऐसियासी बोले वाचा ।। ३ ।।
तुका म्हणे त्याचे भेटी । होय संसारासी तुटी ।। ४ ।।

२५२९ तरिच हा जीव ससारीं उदास । धरिला विश्वास तुह्मां[1] सोई ॥ १ ॥
एके जातीविण नाहीं कळवळा । ओढली गोपाळा सूत्रदोरी ॥ २ ॥
फुटतसे प्राण क्षणांच्या विसरें । हें तों परस्परें सारिखेंचि ॥ ३ ॥
तुका म्हणे चित्तीं राखिला अनुभव । तेणें हा सदेह निवारला[2] ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – सदेह–सशय

अर्थ –देवा, तुमच्याबद्दल आम्ही विश्वास धारण केला आहे म्हणूनच आमचा हा जीव या ससारात उदास झालेला आहे १ गोपाळा, एकाच जातीचे मिळाल्याखेरीज खरी प्रीती निर्माण होत नाही या एकत्वामुळेच प्रेमसूत्र सारखे ओढले जाते २ तुमचा विसर क्षणभर झाला तरी त्यामुळे आमचा जीव कासावीस होतो ही स्थिती तर उभयतांतही समानच असेल ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशाच प्रकारचा अनुभव मी माझ्या चित्तात राखून ठेविला आहे त्यामुळे माझा सशय दूर झाला ४

२५३० किती विवंचना करीतसे जीवीं । मन धावडवी दाही दिशा ॥ १ ॥
कोणा एका भावें तुह्मी अंगिकार । करावा विचार याच साठीं ॥ २ ॥
इतर ते आतां लाभ तुच्छ जाले । अनुभवा आले गुणागुण ॥ ३ ॥
तुका म्हणे लागो अखंड समाधि । जावें प्रेमबोधीं बुडोनिया ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा –धांवडवी–धावते

अर्थ –मी आपल्या जीवाच्या ठिकाणी किती चिंता करीत असतो। तुम्हांला देवा, हुडकण्यासाठी दशदिशांना माझे मन धावते १ कोणत्या एका भावाने तुम्ही माझा अंगिकार कराल याचाच मी विचार करीत असतो २ तुमच्यावाचून मला इतर लाभ आता तुच्छ झाले असून त्यातील सर्व चांगलेवाईट गुण माझ्या अनुभवास आले आहेत ३ तुकाराम महाराज म्हणतात माझी अखंड समाधी लागून मी तुमच्याच प्रेमबोधाच्या सागरात बुडून जावे असे माझ्या मनास वाटते ४

२५३१ दिकचि या नाहीं ससारबधा । तुटेना[3] या बाधा भवरोगाची ॥ १ ॥
तातडींत[4] करीं ह्मणऊनि तातडी । साधिली ते घडी सोनियाची ॥ २ ॥
सकल्पाच्या बीजें इंद्रियांची चाली । प्रारब्ध ते घाली गर्भवासीं ॥ ३ ॥
तुका म्हणे बीजें जाळुनी सकळ । करावा[5] गोपाळ आपुला तो ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – दिक–मर्यादा

अर्थ –या ससारबधनास काही मर्यादाच नाही, व या भवरोगाची बाधाही कधी होत नाही १ म्हणूनच मी अत्यत त्वरेची तातडी करून परमार्थसाधनाची सोन्याची वेळ साधत आहे २ आपल्या सकल्पाच्या बीजाप्रमाणे इंद्रियांचे चलनवलन होत असते आणि प्रारब्धाप्रमाणे गर्भवास घडतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, ही सर्व कर्मबीजे जाळून मला देवा तुमचे वर्णन करणारा भाट करा ४

२५३२ आतां होइन धरणेकरी । भीतरींच कोंडीन ॥ १ ॥
नाहीं केली जीवेंसाटीं । तों का गोष्टी रुचे ते ॥ २ ॥
आधीं निर्धार तो सार । मग भार सोसीन ॥ ३ ॥
तुका म्हणे खाऊं जेवूं । नेदूं होऊं वेगळा ॥ ४ ॥

१ तुह्मा, २ निरसला, ३ तुटचि ना बाधा, ४ तातडी ते, ५ करावे गोपाळें आपुले भाट

शब्दार्थ व टीपा – भीतरींच-अंत.करणात.

अर्थ :— देवा, आता मी तुझ्या दारातच धरणे धरून बसेन आणि तुला मी माझ्या अंत करणातच कोंडून ठेवीन. १ मी माझ्या जीवावर जोपर्यंत उदार झालो नाही तोपर्यंत तुम्हांला या गोष्टी कशा रुचणार ? २ आधी निश्चय करणे हेच एक सार आहे. नाहीतर तुम्हांला मार सोसणार नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात देवा, मी तुला खाऊ देणार नाही, की माझ्याहून वेगळाही होऊ देणार नाही. ४

२५३३ होइल तरि पुसापुसी । उत्तर त्यासी योजावें ॥ १ ॥
तोंवरि मी पुढें कांहीं । आपुलें नाहीं घालीत ॥ २ ॥
जाणोनियां अंतर देव । जेव्हां भेव फेडील ॥ ३ ॥
तुका म्हणे धरिला हातीं । करील खंतीवेगळें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– पुसापुसी-विचारपूस, भेव-भय.

अर्थ:– कुणी विचारपूस करील या विचाराने आपले उत्तर आपण तयार ठेवावे १ तोपर्यंत मी माझें म्हणणे आपल्यापुढे ठेवीत नाही. २ जेव्हा देवच माझे अंत करण समजून घेईल तेव्हा माझे भय दूर होईल. ३ तुकाराम महाराज म्हणतात, जेव्हा हा देव मला हाती धरील तेव्हा तो मला या चिंतेच्या वेगळे करील ४

२५३४ हा तों नव्हे कांहीं निराशेचा ठाव । भलें पोटीं वाव राखलिया ॥ १ ॥
विश्वंभरें विश्व सामाविलें पोटीं । तेयेंचि सेवटीं आह्मी असों ॥ २ ॥
नेणतां चिंतन करितों अंतरीं । तेथें अभ्यंतरीं उमटेल ॥ ३ ॥
तुका म्हणे माझा स्वामी अबोलणा । पुरवूं खुणें खुणा जाणतसों ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– वाव-निश्चय, अबोलणा-न बोलणारा.

अर्थ :— हे स्थान काही निराश होण्याचे नाही, म्हणून आपल्या मनाचा निश्चय कायम राखावा.१ या विश्वास भरून राहिलेल्या देवाने सर्व विश्व आपल्या पोटात साठविले आहे आम्हीही शेवटी त्याच ठिकाणी जाऊन बसू. २ न जाणता जरी आम्ही आमच्या अंत करणात त्याचे चिंतन केले तरी त्याच्या अंत.करणास ते समजते ३ तुकाराम महाराज म्हणतात, माझा हा स्वामी न बोलणारा आहे म्हणून आम्ही खूण करूनच, त्याला सर्व कळवू. तो जाणत आहे. ४

२५३५ निष्ठुर तो विसे[1] निराकारपणें । कोंवळा सगुणें प्रतिपाळी ॥ १ ॥
केलाच करावा केला कइवाड । होईल तें गोड न परेते[2] ॥ २ ॥
मथिलिया लागे नवनीत हातां । नासे वितळितां आहाच तें ॥ ३ ॥
तुका म्हणे आतां मनाशीं विचार । करावा तो सार एकचित्त ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :— कइवाड–निश्चय, आहाच–व्यर्थच

अर्थ:– हा देव आपल्या निराकार, निर्गुण स्थितीत निष्ठुर दिसत असला तरी तो सगुणरूपाने मनाचा कोवळा असून आपल्या भक्तांचा सांभाळ करीत असतो. १ यासाठी आपल्या मनाचा केलेला निश्चय पक्का करावा. त्यामुळे बदलणार नाही असे कल्याण आपल्या जीवनाचे होईल. २ दह्याचे नीट घुसळण केले तरच लोणी हाताशी येईल आणि नुसतेच ताक घुसळले तर ते व्यर्थ नाहून जाऊन वितळेल मात्र. ३ तुकाराम महाराज म्हणतात, आता आपण आपल्या मनाशीच विचार करावा. एकचित्ताने विचार करणे हेच एक सारभूत तत्त्व आहे ४

१ असे, २ पुरते.

२५३६ बहु देवा बरें जालें । नसतें गेलें सोवळें ॥ १ ॥
घोंवटाशीं पडिली गाठी । जगजेठीप्रसादें ॥ २ ॥
गादल्याचा जाला जाडा । गेली पीडा विक्लर ॥ ३ ॥
तुका म्हणे बराबरी । निर्मळ करी निर्मळा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – घोंवटाशीं-शुद्धाशी, गादल्याचा–मलीन झाल्याचा.

अर्थ – देवा, लौकिकातले खोटे व नसते सोवळे नष्ट झाले हे फार बरे झाले १ या जगजेठीच्या कृपेने माझी आता शुद्धाशीच गाठ पडली आहे २ जे जीवन मलीन झाले होते त्याचा झाडा झाला आणि विकल्पाची सव पीडा दूर झाली ३ तुकाराम महाराज म्हणतात, असे वरचेवर निर्मलाने निर्मलच होत असते ४

२५३७ स्वामित्वाचीं वर्मे असोनि जवळी । वाहों जावें मोळी गुणासवे ॥ १ ॥
कावाडापासूनि सोडवा दातारा । कांहीं नका भारा पात्र करूं ॥ २ ॥
धनवंत्र्याचिये[1] अगीं सत्ताबळ । व्याधि तो सकळ तोडावया ॥ ३ ॥
तुका म्हणे आलें मोडघासी कोंपट । सांडव्याची वाट विसरावी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – कावाड-कष्ट कोंपट–कुटी, खोपडी

अर्थ – आपल्या अगी स्वामित्वाची म्हणजे ईशकृपेची वर्मे असल्याचे दिसत असूनही आम्ही या त्रिगुणांच्या संगतीने मलीन व दरिद्री होऊन प्रपंचाच्या मोळीचा भार वाहणारे झालो आहोत १ दातारा, मला आता या कष्टापासून तुम्ही सोडवा या संसाराच्या ओझ्यास मला तुम्ही पात्र करू नका २ सर्व व्याधी दूर करण्याचे सामर्थ्य धन्वतरीच्या अगी असते तसेच तुम्ही आहात तुमच्या हाती सर्व सत्ता आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, माझे हे देहरूपी खोपटे मोडकळीस आलेले आहे त्याच्या त्यागाची वाट मी विसरावी असे तुम्ही करा म्हणजे या देहाचा स्वीकार करा ४

२५३८ ऋणाच्या परिहारा जालों बोळगणा । द्यावी नारायणा वासलाती ॥ १ ॥
जालो उतराई शरीरसंकल्पें । चुकों द्यावीं पापें सकळ हीं ॥ २ ॥
आजिवरि होतो धरूनि जिवासी । व्याजें कासाविसी बहु केलें ॥ ३ ॥
तुका म्हणे मना आणिला म्या भाव । तुमचा तेथें ठाव आहे देवा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – बोळगणा–दास, सेवक, वासलाती–निकाल, हिशेब

अर्थ – देवा तुमचे ऋण फेडण्यासाठी मी तुमचा सेवक झालो आता तुम्ही त्याचा हिशेब द्या पाहू १ मी माझे शरीर तुम्हास अर्पण करून उतराई झालो आहे आता माझी सव पातके तुम्ही नाहीशी करावीत २ मी हे ऋण आजपर्यंत माझ्या जीवाशी धरून होतो, पण त्याच्या वाढणाऱ्या व्याजाने मला फारच कासावीस केले ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, माझे हे शरीर तुमच्या राहाण्याचे ठिकाण आहे असे समजून मी ते तुम्हास अर्पण केले आहे ४

२५३९ येणें पागें पायापाशीं । निश्चयेंसी राहेन ॥ १ ॥
सांगितली करीन सेवा । सकळ देवा दास्यत्व ॥ २ ॥
बंधनाची तुटली बेडी । हेचि जोडी मग आम्हां ॥ ३ ॥
तुका म्हणे नव्हें क्षण । पायांविण वेगळा ॥ ४ ॥

---

१ धनमत्र्याचिये

शब्दार्थ व टीपा – पार्गे–पराधीनता सेवाभाव

अर्थ – देवा मी तुमचा सेवाभाव पत्करला असल्यामुळे निश्चयाने तुमच्या पायाशीच राहीन १ मी तुमची सेवा तुम्ही सांगाल त्याप्रमाणे करीन दास्यभावाने सर्व सेवा मी करीन २ सर्व बंधनाची बेडी तुटल्यामुळेच तुमच्या पायाची प्राप्ती झाली आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात तुमच्या पायापासून मी एक क्षणही वेगळा होणार नाही ४

२५४० आपुल्या आपण उगवा लिगाड । काय माझें जड करून घ्याल ॥ १ ॥
उद्धारासी[१] काय उधाराचे काम । वाढवूचि श्रम नये देवा ॥ २ ॥
करा आता मजसाटीं वाड पोट । ठाव नाहीं तट[२] जाले लोकीं ॥ ३ ॥
तुका म्हणे बाकी झडलियावरी । न पडें व्यवहारीं संचिताचे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – उगवा–सोडवा, नाहीसे करा, लिगाड–लचाड, वाड–मोठे तट–बोभाटा, दुष्कीर्ती

अर्थ – देवा तुम्ही तुमचे लचाड स्वतःच नाहीसे करा माझा जडपणा घेऊन तुम्ही काय करणार ? माझा उद्धार करण्याचे काम असे उधारीवर लावणीवर का टाकता हो ? उगाच श्रम वाढवू नयेत २ देवा आता माझ्यासाठी तुम्ही आपले पोट मोठे करा कारण आमच्या भक्तपणाचा बोभाटा सर्व जगात झाला असल्याने तुम्हास माहीत नाही काय ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, माझ्या एकंदर मागील कर्मांचा हिशेब लौकर पूर्ण करा, म्हणजे मग मी पुन्हा या संचित कर्मांच्या व्यवहारात पडणार नाही ४

२५४१ सर्व सुर्गी विट आला । तूं एकला आवडसी ॥ १ ॥
दिली आता पायीं मिठी । जगजेठी न सोडीं ॥ २ ॥
बहु जालों खेदक्षीण । येणें सीण तो नासे ॥ ३ ॥
तुका म्हणे गंगे वास । बहु त्या आस स्थळाची ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – खेदक्षीण–फार कष्टी, आस–इच्छा

अर्थ –देवा, मला आता इतर सर्व सगांचा वीट आलेला आहे तू एकटाच फक्त मला आवडतोस १ मी आता तुमच्या पायांस मिठी दिली आहे ती जगजेठी आता कधीही सोडणार नाही २ देवा, मी फारच दुःखीकष्टी झालो असून ते श्रम तुमच्या पायाच्या दर्शनाने नाहीसे होणार आहेत ३ तुकाराम महाराज म्हणतात, ज्या तुमच्या पायांशी गंगेचे वास्तव्य आहे त्या पायाची मला फार मोठी आशा आहे ४

२५४२ शीतळ तें शीतळाहुनी । पायवणी चरणींचे ॥ १ ॥
सेवन हें शिरसा धरीं । अंतरीं ही वरदळा ॥ २ ॥
अवघेंचि नासी पाप । तीर्थ बाप माझ्याचे ॥ ३ ॥
बैसोनियां तुका तळीं । त्या कल्लोळीं डौरला ॥ ४ ॥

२५४३ गोदे काठीं होता आड । करूनि कोड क्वतुकें ॥ १ ॥
देखण्यानीं एक केलें । माइत्या नेलें जिवनापें ॥ २ ॥
राखोनिया ठाव । अल्प जीव लावूनि ॥ ३ ॥
तुका म्हणे फिटे धनी । हे सज्जनीं विश्रांति ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – कोड-लाड, कौतुक, देखण्यानी-ज्ञानी माणसांनी, साधुसंतांनी जीवनापें-पाण्याच्या प्रवाहाजवळ, धनी-इच्छा

अर्थ –आजपर्यंत ज्ञानदृष्टी नसल्यामुळे प्रत्यक्ष गोदावरी असूनही तिच्या काठी आड खणून त्याचेच कोड-कौतुक मी करीत होतो १ पण या साधुसंतांनी एक असे केले की, मला त्या पाण्याच्या ओघापाशीच नेले २ मी माझा अल्पजीव लावून ते ठिकाण जपून राखले होते ३ तुकाराम महाराज म्हणतात, या साधुसंतांच्या ठिकाणी मला विश्रांती मिळून माझी इच्छा पूर्ण झाली ४

२५४४ न पाहें माघारें आता परतोनि । संसारापासूनि विटला जीव ॥ १ ॥
सामोरें येऊनि कवळीं दातारा । काळाचा हाकारा न साहावे ॥ २ ॥
सावधान चित्त होईल आधारें । खेळतां ही बरें वाटेईल ॥ ३ ॥
तुका म्हणे कंठ दाटला या सोसें । न पवेचि कैसें जवळी हें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – कवळीं-आलिंगन दे, हाकारा-दरारा, धाक

अर्थ –माझा जीव आता या संसारापासून पूर्ण विटेला आहे मी आता त्याकडे परत माघारी वळून पाहाणार नाही १ दातारा मला काळाचा हा धाक आता सहन होत नाही तू आता त्वरेनें माझ्याकडे ये, मला आलिंगन दे २ तुझ्या आधारानेच माझे चित आता सावध होईल त्यानंतर कोणतेही खेळ खेळताना मग मला बरेच वाटेल ३ तुकाराम महाराज म्हणतात, या तुझ्या सोसाने देवा माझा कंठ दाटून आला आहे, इतके असूनही मी तुझ्याजवळ कसा पोचत नाही ? ४

२५४५ मथनीचे नवनीत । सर्व हितकारक ॥ १ ॥
दंडवत दंडा परी । मागें उरी नुरवावी ॥ २ ॥
वचनाचा तो पसरु काई । तातडी डोईपायींच ॥ ३ ॥
तुका म्हणे जगजेठी । लावीं कंठीं उचलूनि ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – मथनीचे-घुसळलेले, मथन केलेले पसरु-पाल्हाळ, विस्तार.

अर्थ –घुसळून काढलेले लोणी नेहमीच सर्व दृष्टींनी हितकारक असते १ त्याप्रमाणे मागे काही न उरविता मी तुम्हास दंडाप्रमाणे नमस्कार घालीत आहे २ आता उगीच बरबर बोलण्याचा पाल्हाळ काय कामाचा? तुमच्या पायांवर मस्तक ठेवून त्वरा करावी हे चांगले ३ तुकाराम महाराज म्हणतात, जगजेठी, मला उचलून घ्या व प्रेमभराने आलिंगन द्या ४

२५४६ अवचिताचि हातीं ठेवा । दिला सेवा न करितां ॥ १ ॥
भाग्य फळलें जाली भेटी । नेघें तुटी यावरी ॥ २ ॥
दैन्य गेलें हरली चिंता । सदैव आता यावरी ॥ ३ ॥
तुका म्हणे वाटा जाला । बोलों बोली देवासीं ॥ ४ ॥

१ रावी

शब्दार्थ व टीपा – नेघें-घेत नाही, सदैव-भाग्यवान

अर्थ – मी या देवाची सेवा वगैरे न करताच अवचितपणे या देवाने मला आपला सर्व ठेवा देऊन टाकला १ माझे भाग्य उदयास आल्यामुळेच याची भेट झाली आता मी याचा वियोग कधीही होऊ देणार नाही. २ माझे सर्व दैन्य संपून माझी चिंताही हरपली आहे आता यामुळे मी फार मोठा भाग्यवान झालो आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, आता माझी वाट मला मिळाल्यामुळे आम्ही देवाशी भाषण करू ४

२५४७ समर्थाची धरिली कास । आतां नाश काशाचा ॥ १ ॥
धांवें पावें करीन लाहो । तुमचा आहो विठ्ठला ॥ २ ॥
न लगे मज पाहाणें दिशा । हाकेसरिसा ओढसी ॥ ३ ॥
तुका म्हणे नव्हे धीर । तुह्मां स्थिर दयेनें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – ओढसी-धावून येशील लाहो-छंद.

अर्थ –मी आता या समर्थ देवाची कास धरलेली आहे आता माझा नाश कशासाठी होईल ? १, विठ्ठला, तू धाव व मला पाव असा मी छंद घेईन २ मी तुला हाक मारल्याबरोबर तू धावत येशील म्हणून मला इतर दिशांकडे पाहाण्याची जरूरी नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, तुमच्याजवळ आम्हा दीनाविषयी दया असल्यामुळे तुम्हाला फार वेळ धीर धरवणार नाही ४

२५४८ करूं तैसें पाठांतर । करुणाकर भाषण ॥ १ ॥
जिहीं केला मूर्तिमंत । ऐसे संतप्रसाद ॥ २ ॥
सोज्ज्वळ केल्या वाटा । आइत्या नीटा मागीलां ॥ ३ ॥
तुका म्हणे घेऊं धांवा । करूं हावा ते जोडी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– करुणाकर–दया येईल अशा, जोडी-प्राप्ती.

अर्थ :– तुमच्या अंतःकरणात दया निर्माण होईल अशा शब्दानी मी तुम्हास वारंवार आळवीन. १ या संतांनी अमूर्त देवास मूर्तिमंत केले त्याचा हा प्रसाद आहे २ ऋषिवर्यांनी ज्या वाटा पूर्वीच निर्माण केल्या होत्या, त्या त्यांनी चांगल्या स्वच्छ केल्या आहेत ३ तुकाराम महाराज म्हणतात, आम्ही अशा वेळी धाव घेऊ व मागील संतांनी जो लाभ घेतला आहे तो घेण्याची हाव धरू. ४

२५४९ अचळ न चळे ऐसे जालें मन । धरूनि निज खुण राहिलोसें ॥ १ ॥
आवडी बैसली गुणांची अंतरीं । करूं धणीवरी सेवन तें ॥ २ ॥
एकविध भाव नव्हे अभावना । आणिकिया गुणां न मिळवे ॥ ३ ॥
तुका म्हणे माझें पडिले आहारीं । ध्यान विटेवरी ठाकले तें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – अचल-अति चपळ, चचल, धणीवरी–तृप्ती होईपर्यंत.

अर्थ :– जे माझे मन चंचल होते ते परमात्म्याची खूण धरून राहिले म्हणून स्थिर झाले १ या परमात्म्याच्या गुणांचे प्रेम मनात आहेच आता त्याचेच सेवन मनाची तृप्ती होईपर्यंत आम्ही करू. २ या प्रभुविषयी जो आमचा एकविध भावना झाली आहे ती यापेरोज आता वेगळी होणार नाही, आणि त्याच्याशिवाय इतर गुणांशी ती समरसही होणार नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, जे विठ्ठलाचे ध्यान विटेवर उभे आहे ते माझ्या चांगलेच आहारी आले आहे ४

२५५० काय तुझी थोरी वर्णू मी पामर । होसी दयाकर कृपासिंधु ॥ १ ॥
तुज ऐसी दया नाहीं आणिकासी । ऐसे[1] हृषीकेशी नवल एक ॥ २ ॥
कुरुक्षेत्रभूमीवरी पक्षी व्याले । तृणामाजी केले घोटें त्यांनीं ॥ ३ ॥
अकस्मात तेथें रणखांब रोविला । युद्धाचा नेमिला ठाव तेथें ॥ ४ ॥
कौरव पांडव दळभार दोन्ही । झुजावया रणीं आले तेथें ॥ ५ ॥
तये काळीं तुज पक्षी आठविती । पाव बा श्रीपती म्हणोनियां ॥ ६ ॥
हस्ती[2] घोडे रथ येथें धांवतील । पाषाण होतील शतचूर्ण ॥ ७ ॥
ऐसिये आकांतीं वांचों कैसे परी । धाव बा श्रीहरी लवलाहें ॥ ८ ॥
टाकोनियां पिलीं कैसे जावे आतां । पावें जगन्नाथा लवलाहीं ॥ ९ ॥
आली तिये काळीं कृपा तुझ्या चित्ता । अनाथाच्या नाथा नारायणा ॥ १० ॥
एका गजाचिया कंठीं घंटा होती । पाडिली अवचिती त्यावरी ॥ ११ ॥
अठरा दिवस तेथें द्वंद्वयुद्ध जालें । वारा ऊन लागलें नाहीं त्यां ॥ १२ ॥
जुंज जाल्यावरी दाविलें अर्जुना । तुह्मीं नारायणा पक्षियासी ॥ १३ ॥
पाहें आपुलिया दासा म्या रक्षिलें । रणीं वांचविलें कैसा परी ॥ १४ ॥
ऐसी तुज माया आतुल्या भक्ताची । माउली आमुची तुका म्हणे ॥ १५ ॥

शब्दार्थ व टीपा — दयाकर-दयेचा सागर, घोटें-घरटे ठाव-तळ, दळभार-सैन्याचा समुदाय, जुंज-झुंज, युद्ध

अर्थ – देवा, तुझ्या थोरवीचे मी काय वर्णन करावे ? तू दयेचा सागर, कृपेचा सिंधू आहेस १ तुझ्या इतकी दया इतर कुणासही कधी येत नाही हृषीकेशी असे तुझे एक नवल तू ऐक २ एकदा कुरुक्षेत्रावर पक्षी व्याले व त्यांनी पिलांच्या रक्षणासाठी गवतात एक लहानसे घरटे बांधले. ३ एवढ्यात एकदमच त्या स्थानावर रणखांब उभारून युद्धाची तयारी झाली युद्धाचा तळच त्या ठिकाणी पडला ४ कौरव व पांडव यांच्या सैन्यांचे समुदाय युद्ध खेळण्यासाठी त्या रणभूमीवर एकमेकांसमोर ठाकले ५ त्यावेळी भयभीत झालेल्या त्या पक्ष्यांनी देवा, तुझी प्रार्थना केली ‘ बा श्रीपती, तूच आता पाव ’ त्यांनी अशी विनवणी केली ६ ते म्हणाले, ‘ देवा, आता या ठिकाणी हत्ती घोडे धावतील आणि त्यांच्या पायांच्या टापांखाली दगडाचाही चुरा होऊन जाईल ७ अशा त्या आकांतात आम्ही कसे वाचणार ? श्रीहरी तू लौकरच धावून ये आम्हास पाव ८ ही लहान लहान पिले सोडून तरी कुठे जावे आता ? तेव्हा तू जगाचा नाथ आहेस तू लौकर पाव ना आम्हांस ९ त्यावेळी अनाथांच्या नाथा नारायणा, तुमच्या चित्तास दया आली १० एका हत्तीच्या गळ्यात एक मोठी घंटा होती ती तुम्ही अवचितपणे त्या पिलांच्यावर पाडली ११ त्या रणभूमीवर अठरा दिवसपर्यंत घनघोर युद्ध झाले, पण त्या पिलांना तू वारा व ऊन यांचा त्रास होऊ दिला नाहीस १२ युद्ध संपल्यावर नारायणा तुम्ही अर्जुनाला ती पक्ष्याची पिले दाखविलीत १३ आणि तुम्ही म्हणालात, ‘ आज मी माझ्या दासाचे कसे रक्षण केले आहे ! रणांगणावरही कसे वाचविले !’ १४ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, अशी माया तुम्ही तुमच्या भक्तावर करता तुम्ही आमचीही माऊलीच आहात १५

२५५१ वैष्णवा संगती सुख वाटे जीवा । आणीक मी देवा काहीं नेणें ॥ १ ॥
गायें नाचे उडे आपुलिया छंदें । मनाच्या आनंदें आवडीनें ॥ २ ॥

[1] ऐक, [2] हत्ती

लाज भय शंका दुराविला मान । न कळे साधन यापरतें ॥ ३ ॥
तुका म्हणे आतां आपुल्या सायासें । आह्मां जगदीशें सांभाळावें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – सायासे-प्रयत्नाने.

अर्थ :- देवा, या वैष्णवांच्या संगतीतच मला फार सुख वाटते. मी त्यांच्याशिवाय दुसरे काहीच जाणीत नाही. १ त्यांच्याच संगतीने मी हरिनाम गातो व आपल्याच छंदाने उड्या मारतो, नृत्य करतो. मनाच्या आवडीने मी हे सर्व करतो. २ याबद्दल माझ्या मनातील लाज, भय, शंका या सर्व वृत्ती दूर झाल्या आहेत. याखेरीज दुसरे साधनही मला माहीत नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, आता या जगदीशानेच आपल्या प्रयत्नांनी मला सांभाळावे ४

२५५२ शरण शरण वाणी । शरण त्रियाचा विनवणी ॥ १ ॥
स्तुती न पुरे हे वाचा । सत्य दास मी दासांचा ॥ २ ॥
देह[1] सांभाळून । पायांवरी लोटांगण ॥ ३ ॥
विनवी तुका संतां दीन । नव्हे गोरवें उत्तीर्ण ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- उत्तीर्ण- उतराई.

अर्थ :- मी तुम्हांस शरण आहे असे तीनदा वाणीने उच्चारून सांगतो १ माझ्या वाचेने पाहिजे तशी स्तुती पूर्ण होत नाही. मी तुमच्या दासाचा दास खरोखर आहे २ मी आपल्या देहाची पर्वा न करता तुमच्या पायावर लोटांगण घालीत आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी तुमचा कितीही गौरव केला तरी तुमच्या उपकारातून उतराई होणार नाही, अशी विनंती मी दीन होऊन संतांना करीत आहे ४

२५५३ लेंकरा लेववी माता अळंकार । नाहीं अंतपार आवडीसी ॥ १ ॥
कृपेचे पोसणे तुमचें मी दीन । आजि संतजन मायबाप ॥ २ ॥
आरुषा उत्तरीं संतोषे माउली । कवळूनि घाली हृदयांत ॥ ३ ॥
पोटा आलें त्याचे नेणे गुणदोष । कल्याणचि[2] असे असावें हें ॥ ४ ॥
मनाची ते चाली मोहाचिये सोई । ओघें गंगा काई परतों जाणे ॥ ५ ॥
तुका म्हणे कोठें उदार मेघां शक्ति । माझी तृषा किती चातकाची ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा :- आवडीसी- प्रेमास, आरुष- बोबड्या.

अर्थ :- आई आपल्या बालकास मोठ्या प्रेमाने नाना प्रकारचे अलंकार घालीत असते तिच्या प्रेमास मर्यादा नसते. १ अहो मायबाप संतजनहो ! तुमच्या कृपेवर पोसलेला मी एक दीन आहे. २ आपले बालक कसेही बोबडे बोल बोलले तरी आईच्या अंतःकरणात संतोषच निर्माण होतो. ती त्याला मिठी मारून हृदयाशीच धरते ३ जो आपल्या पोटी आला आहे त्याचे ती कधी गुणदोष बघत नाही. त्याचे नेहमी कल्याणच असावे अशी तिची एकमेव इच्छा असते ४ तिच्या मनाची धाव बालकाच्या मोहाकडेच असते. ती कधी गंगेच्या ओघाप्रमाणे मागे परतत नाही. ५ तुकाराम महाराज म्हणतात, उदार अशा मेघाची औदार्यशक्ती केवढी मोठी असते, त्या मानाने माझ्यासारख्या चातकाची तहान ती किती थोडी आहे ! ६

२५५४ युक्ति तंव जाल्या कुंटित सकळा । उरली हे कळा जीवनाची ॥ १ ॥
संतचरणीं भावें ठेविले मस्तक । जोडोनि हस्तक राहिलोंसे ॥ २ ॥

१ देह न सांभा०, २ कल्याणाची आस असावे हें.

जाणपणे नेणे काहींचि प्रकार । साक्षी तें अंतर अंतरासी ॥ ३ ॥
तुका म्हणे तुम्ही केले अभयदान । तेणे[1] समाधान राहिलेंसे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – कळा– स्थिती ज्ञान

अर्थ – संताचे स्तवन करण्याविषयी माझ्या सर्व युक्त्या कुंठित होऊन गेल्या एक जीवनाच्या स्थितीचे ज्ञान मात्र उरले आहे १ म्हणूनच मी मोठ्या भक्तिभावाने संतांच्या चरणी मस्तक ठेवून व दोन्ही हात जोडून राहिलो आहे २ जाणत्याची भूमिका घेऊन काही त्यांचे प्रकार पाहावेत तर ते समजतच नाहीत याला माझ्या मनाची साक्ष आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात तुम्ही संतानी मला अभयदान दिल्यामुळे माझ्या चित्ताचे समाधान झाले आहे ४

२५५५ हा गे आलों कोणी म्हणे बुडतिया । तेणें किती तया बळ चढे ॥ १ ॥
तुझी तव भार घेतला सकळ । आश्वासिलो बाळ अभयकरें ॥ २ ॥
भुकेलिया आस दाविता निर्धार । किती होय धीर समाधान ॥ ३ ॥
तुका म्हणे दिली चिंतामणीसाटीं । उचित फाचवटी दडवत ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – आस– आशा

अर्थ – कुणी पाण्यात बुडत असताना 'हा पाहा मी आलोच' असे नुसते म्हटल्यानेही त्याला केवढा मोठा धीर येतो १ आणि तुम्ही संतानीच माझा सर्वस्वी भार घेतलेला असून तुमच्या अभय देणाऱ्या हातानी मला वाऱ्यावर न सोडण्याचे आश्वासन मिळालेले आहे २ भुकेलेल्या माणसास निर्धाराने जेवावयास घालण्याची आशा दाखविली तरी त्याला किती समाधान वाटून धीर येतो ३ तुकाराम महाराज म्हणतात या तुमच्या उपकारासाठी मी तुम्हास दडवत घातले आहे हे करण म्हणजे तुमच्या चिंतामणीबद्दल काच दिल्यासारखेच आहे ४

२५५६ कैसा तीं[2] देखिला होसील गोपाळीं । पुण्यवतीं डोळीं नारायणा ॥ १ ॥
तेणे लोभें जीव जालासे वराडी । आम्ही ऐशी जोडी कईं लाभों ॥ २ ॥
असेल तें कैसे दर्शनाचे सुख । अनुभवे श्रीमुख अनुभविता ॥ ३ ॥
तुका म्हणे वाटे देसी आलिंगन । अवस्था ते क्षणक्षणा होते ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा — वराडी– भुकेलेला

अर्थ – नारायणा, त्या पुण्यवान अशा गोपाळांनी आपल्या डोळयांनी तुला कोणत्या स्वरूपात पाहिले असेल ? १ त्याप्रमाणे तू माझ्या दृष्टीस पडावास या लोभाने माझा जीव भुकेलेला आहे आम्हास असा लाभ कधी मिळेल काय ? २ तुमच्या दर्शनाचे सुख कसे असेल ? ज्यांना या श्रीमुखाचा साक्षात अनुभव असेल त्यांनाच ते समजून येईल ३ तुकाराम महाराज म्हणतात, माझी अवस्था तुमच्या दर्शनाविषयी क्षणाक्षणाला वाढत आहे आता तुम्ही मला आलिंगन द्याल असे वाटत आहे ४

२५५७ कासया या लोभें केले आर्तभूत । सांगा माझें चित्त नारायणा ॥ १ ॥
चातकाचे परी एकचि निर्धार । लक्षभेदीतीर फिरों नेणे ॥ २ ॥
सावळें रूपडें चतुर्भुज मूर्ति । कृष्णनाम चित्तीं संकल्प हा ॥ ३ ॥
तुका म्हणे करीं आवडीसी ठाव । नको माझा भाव भंगों देऊं ॥ ४ ॥

---

१ जणे २ तो

शब्दार्थ व टीपा :– आर्तभूत– आतुर

अर्थ :— नारायणा, तुमच्या दर्शनाच्या लोभाविषयी माझे मन एवढे आतुर का केले ते सांगा. १ चातका-प्रमाणे माझा एकच निश्चय झाला आहे लक्ष्यभेद करणारा तीर जसा मागे फिरत नाही, त्याप्रमाणे माझा निश्चय बदलणार नाही २ जे रूप सावळे व चतुर्भुज आहे, त्या श्रीकृष्णाच्या नामाचाच संकल्प माझ्या चित्तात आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, माझ्या प्रीतीला तुम्ही आश्रय द्यावा. माझ्या भावनेचा भंग करू नका. ४

२५५८ काय माझा पण होईल लटिका । ब्रिदावळी लोकां दाविली ते ॥ १ ॥
खरी करूनियां देई माझी आळी । येऊनि कुरवाळीं पांडुरंगे ॥ २ ॥
आणीक म्यां कोणा म्हणावें हातीं । नये काकुलती दुजियासी ॥ ३ ॥
तुका म्हणे मज येथेंचि ओळखी । होईन तो सुखी पायांनींच ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– आळी– आग्रह, हट्ट.

अर्थ :– हा नारायण आम्हा पापी लोकांचा उद्धार करणारा आहे. अनाथनाथ आहे; अशी तुझी ब्रीदावली मी लोकात प्रतिज्ञेने प्रकट केली; ती काय लटकी ठरणार की काय ? १ पांडुरंगा, माझा वरील हट्ट तू खरा करून दाखीव आणि तू येऊन मला पांडुरंगा, प्रेमाने कुरवाळ. २ मी आणखी कुणाच्या हाती आहे असे कसे म्हणावे ? माझी दया दुसऱ्या कुणासही येणार नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, माझी ओळख फक्त तुमच्या-शीच आहे. म्हणून मी केवळ तुमच्या पायाच्या आश्रयानेच सुखी होईन. ४

२५५९ तुम्हां आम्हां जंव जालिया समान । तेथें कोणां कोण सनमानी ॥ १ ॥
उरी तों राहिलें गोमटें गौरव । ओढे माझा जीव पायांपाशीं ॥ २ ॥
नेणपणें आम्ही आळवूं वोरसें । बोलवितों रसें शब्दरत्नें ॥ ३ ॥
तुका म्हणे लळे पाळीं वो विठ्ठले । कां हे उरविले भेदाभेद ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– वोरसे– प्रेमरसाने.

अर्थ :— देवा, एकदा तुमची व आमची समानता झाली, तुम्हीआम्ही एकरूप झालो की मग तेथे कुणी कुणाचा सन्मान करायचा ? १ म्हणूनच देवा, मी भक्त व तुम्ही देव असा भेदभाव उरत आहे तोपर्यंत तुमचा चांगला गौरव करता येण्यासारखा आहे. म्हणूनच माझा जीव देवा, तुमच्या पायांपाशी ओढला जात आहे २ आम्ही अज्ञानी असल्यामुळे तुमचे चिंतन प्रेमरसाने करतो रसपूर्ण शब्दरत्नांनी तुम्हांस बोलावितो. ३ तुकाराम महाराज म्हणतात, विठ्ठले, माझे हे लाड तुम्ही पूर्ण करा तुमच्या व आमच्यात असा भेदभाव का उरावा ? ४

२५६० नको माझे मानूं आहाच ते शब्द । कळवळ्याचा वाद करीतसें ॥ १ ॥
कासयानें वळ करूं पायांपाशीं । भाकावी ते दासीं करुणा आम्हीं ॥ २ ॥
काय मज चाड असे या लौकिकें । परी असे निकें अनुभवाचें ॥ ३ ॥
लांचावल्यासाटीं वचनाची आळी । टकळ्याचेनें घोळी जवळी मन ॥ ४ ॥
वाटतसे आस पुरविसी ऐसें । तरि अंगीं पिसें लावियेलें ॥ ५ ॥
तुका म्हणे माझी येथेंचि आवडी । श्रीमुखाची जोडी इच्छीतसें ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा :– आहाच–व्यर्थ, उगाच, चाड–इच्छा, निकें–चागले, आळी– हट्ट, पिसे– वेड.

अर्थ – देवा, मी मोठ्या कळकळीने तुमच्याशी वादविवाद करीत असतो ते माझे शब्द उगाच फोकळ मानू नका तुम्ही १ मी कोणत्या आधारावर तुमच्या पायांपाशी जोर धरून राहू? आम्ही दासांनी तुमची करुणा भाकावी हेच एक बरे दिसते २ या लौकिक गोष्टींची इच्छा मला काय आहे ? तुमचा चांगला अनुभव यावा हे मात्र वाटते ३ मी तुमच्यासाठी लाचावलेला असून तोच एक माझा हट्ट आहे म्हणूनच मी माझ्या वचनांनी तुमचा टपळा धरून तुमच्या भोवती मनाने फिरत आहे ४ देवा, तुम्ही माझी इच्छा पूर्ण करावी, अशी माझी फार इच्छा आहे म्हणूनच तुमचे वेड मी माझ्या मनाला लावून घेतले आहे ५ तुकाराम महाराज म्हणतात, तुमच्या श्रीमुखाच्या दर्शनाचा लाभ व्हावा हीच इच्छा असून त्याच्याविषयी मनात फार प्रीतीही आहे ६

२५६१ म्हणऊनी लवलाहें । पाय आहे[१] चिंतीत ॥ १ ॥
पाठिलागा येतो काळ । तू कृपाळ माउली ॥ २ ॥
बहु उसतीत आलों । तया भ्यालों स्थळासी ॥ ३ ॥
तुका म्हणे तू जननी । ये निर्वाणीं विठ्ठले ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – उसतीत– चिंतन करीत

अर्थ – देवा, म्हणूनच मी तुमच्या पायांचे चिंतन त्वरेने करीत आहे १ काळ हा माझा पाठलाग करीत येत आहे त्याच्या हातून सोडविणारी तुम्ही कृपाळू माऊली आहेत २ त्या यमलोकास फार भिऊन मी तुमचेच चिंतन करीत आलो आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात विठ्ठले, तू माझी जननी आहेस अशा या संकटप्रसंगी तू धावतच ये ४

२५६२ जेणें वाढे अपकीर्ति । सर्वार्थी तें वर्जावें[२] ॥ १ ॥
सत्य रुचे भलेपण । वचन तें जगासी ॥ २ ॥
होइजेतें शुद्ध[३] त्यागें । वाउगें तें सारावें ॥ ३ ॥
तुका म्हणे खोटें वर्म । निंद्यकर्म[४] काळिमा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – सर्वार्थी– सर्वस्वी, त्यजावे– टाकावे

अर्थ – ज्यामुळे आपली अपकीर्ती होईल त्याचा सर्वस्वी त्याग करावा १ सत्य बोलणं हे चांगले असल्यामुळे ते जगाला प्रिय होते २ खोट्याचा मात्र त्याग करून या जगात शूर व्हावे ३ तुकाराम महाराज म्हणतात, खोटे वर्म हे काळिमा लावणारे निंद्य असे असते ४

२५६३ याची सवे लागली जीवा । गोडी हेवा सगाचा ॥ १ ॥
परतें न सरवे दुरी । क्षण हरीपासूनि ॥ २ ॥
जाले तरीं काय तट । आता चट न सडे ॥ ३ ॥
तुका म्हणे चक्रचाळे । वेड वळें लाविलें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – सवे– सवय, हेवा– हाव परतें– पासून, तट– बोभाट, चट– चटक

अर्थ – या देवाची सवय माझ्या जीवाला लागलेली आहे आता त्याच्या संगतीची हाव मला फार आहे १ या श्रीहरीपासून एक क्षणभरही दूर होता येत नाही २ याचा कितीही बोभाटा झाला म्हणून काय झाले ? आता याची चटक काही आम्हाला सोडवत नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात विश्वचक्राला चालना देणाऱ्या देवा, तुम्ही मला आपले वेड बळानच लावले आहे ४

१ असे, २ त्यजावे, ३ शूर, ४ नित्यकर्म

२५६४ याचा तव हाचि मोळा । देखिला डोळा उदड ॥ १ ॥
नेदी मग फिरो मागें । अगा अगें सचरे ॥ २ ॥
का या याची नेणा खोडी । जीभा जोडी करितसां ॥ ३ ॥
पाघरे तें वहु काळें । घोगडें ही ठायींचे ॥ ४ ॥
अगीं वसेचि ना लाज । न म्हणे भाज कोणाची ॥ ५ ॥
सर्वसाक्षी अबोल्यानें । दुश्चित कोणें नसावे ॥ ६ ॥
तुका म्हणे धरिला हातीं । मग निश्चितीं हरीनें[1] ॥ ७ ॥

शब्दार्थ व टीपा – मोळा– रीत वागणूक, उदड– पुष्कळ, भाज– बायको दुश्चित- उदास, सचित

अर्थ – या श्रीहरीची हीच रीत असल्याचे मी डोळ्यानी पुष्कळ पाहिले आहे १ ती अशी की, जे कुणी याच्याशी अगानी समरस झाले आहेत त्यांना हा मागे फिरू देत नाही २ अशी ही या प्रभूची रीत तुम्ही का जाणीत नाही ? स्वयं जिभेची बडबड कशासाठी करता ? ३ मूळच्या स्वरूपातील पुष्कळ काळापूर्वीचे घोंगड याने पाघरलेले आहे ४ याला कशाचीही लाज नसून, ही कुणाची बायको याचाही तो कधी विचार करीत नाही ५ तो सर्व साक्षी असून अबोलपणाने राहातो त्याच्यासाठी कुणीही उदास राहू नये ६ तुकाराम महाराज म्हणतात, या श्रीहरीने एकदा हाती धरले की मग सर्व चिंता नाहीशी होते ७

२५६५ प्रसिद्ध हा असे जगा । अवघ्या रगारगाचा ॥ १ ॥
तरी वाटा न वजे कोणी । नारायणीं घरबुडी ॥ २ ॥
बहुता ऐसे केले मागें । लाग लागें लागेना ॥ ३ ॥
हो का नर अथवा नारी । लाहान थोरीं आदर ॥ ४ ॥
जाले वेगळें लोकीं पुरे । मग नुरे समूळ ॥ ५ ॥
कळेना तो आहे कैसा । कोणी दिशा बहु थोडा ॥ ६ ॥
तुका म्हणे दुसऱ्या भावे । छायें नावे न देखवे ॥ ७ ॥

शब्दार्थ व टीपा – न वजे– जात नाही लाग– माग, तपास

अर्थ – हा श्रीहरी सर्व रगानी परिपूर्ण असल्याची याची जगात प्रसिद्धी आहे १ या नारायणाच्या नादी लागले की घर बुडते म्हणून याच्या वाटकडे फारसे कुणी जात नाही २ यापूर्वी याने अनेक भक्तजनाचे असेच वाटोळे केले याचा काही तपास लागत नाही ३ पुरुष असोत स्त्रिया असोत, लहान असोत, मोठे असोत, हा सर्वांचा आदरान स्वीकार करतो ४ या लोकात एखादा लोकिकापासून वेगळे झाले की पुरे मग तो अशा लोकाचे समळ वाटोळ करतो ५ हा श्रीहरी कशा स्वरूपाचा आहे कोणत्या दिशस आहे, लहान, मोठा आहे की काय ? हे काही समजत नाही ६ तुकाराम महाराज म्हणतात यासाठी आपण दुज्या भावान कधीच वागू नये आपली छायासुद्धा दुस या भावान पाहू नये तीही ब्रह्मस्वरूप मानावी ७

२५६६ न सडावा आता ऐसें वाटे ठाव । भयाशी उपाव रक्षणाचा ॥ १ ॥
म्हणऊनि मनें वळियलें मन । कारियेकारण चाड नाहीं ॥ २ ॥
नानाची उपाधि करूनिया मूळ । राखता विटाळ तेचि व्हावें ॥ ३ ॥
तुका म्हणे यथें न वेचे वचन । निजों निजखूण सापडली ॥ ४ ॥

---

१ हरीन

शब्दार्थ व टीपा – ठाव– ठिकाण, उपाव– उपाय, चाड– पर्वा, जरुरी

अर्थ – विविध प्रकारच्या भयांपासून रक्षण करणाऱ्या उपायांचे ठिकाण आता सापडले असल्यामुळे ते आता कधी सोडू नये असे मला वाटते १ म्हणूनच मनानेच मी आपले मन वळविले आहे मला कार्यकारणाची आता काही पर्वा नाही २ हा सर्व प्रपंच उपाधीमूल आहे असे जाणावे या प्रपंचरूपी विटाळाचे रक्षण केले असता उपाधीरूप राहावे लागते ३ तुकाराम महाराज म्हणतात मी आता या प्रपंचउपाधीच्या संबंधी फार बोलणार नाही कारण मला निजात्मबोधाच्या खुणचा अनुभव आलेला आहे ४

२५६७ सत्तेचे भोजन समर्थी आतुडे । सेवन ही घडे रुचिनेसी ॥ १ ॥
वर्म श्रम नेला जाले एकमय । हृदयस्थीं सोय संग जाला ॥ २ ॥
कोथळीस जमा पडिले संचित । मापल्याचा वित्त नेम जाला ॥ ३ ॥
तुका म्हणे धणी ऐसा जालों आता । करीन ते सत्ता माझी आहे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा .– आतुडे– मिळाले

अर्थ – योग्य भुकेच्या वेळेस जर स्वसत्तेचे जेवण मिळेल तर त्याचे सेवनही मोठ रुचीने करता येते १ असे वर्म मला सापडल्यामुळे माझा श्रम नाहीसा होऊन सर्व जीवनच हरिरूप होऊन गेले कारण माझ्या हृदयात वास करून राहणाऱ्या नारायणाची संगत मला झाली आहे २ माझे जे संचित कर्म आहे ते मी आता कोथळीत जमा केले आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात आता मी अशा प्रकारचा मालक झालो असून माझ्या मनास वाटेल ते मी करीन, अशी सत्ता माझ्या हातात आली आहे ४

२५६८ देईल तें उणे नाहीं । याचे काहीं पदरीं ॥ १ ॥
पाहिजे तें संचित आता । येथें सत्ता करावया ॥ २ ॥
गुणा ऐसा भरणा भरी । जो जें विचारी तें लाभे ॥ ३ ॥
तुका म्हणे देवीं देव । फळे भाव आपुला ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – संचित-साठलेले पुण्य

अर्थ – हा देव जर काही देत राहील तर याच्याजवळ काहीच कमी नाही १ पण याच्यावर सत्ता गाजविण्यासाठी आपल्याजवळही साठलेल्या पुण्याचा साठा हवा २ एखादी गाय जसा चारा मिळेल आणि जसे तिचे गुण असतील त्याना अनुसरून ती दुधाचा भरणा करते, तशीच या देवाची अवस्था आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, आपला जसा आपल्या देवाच्या ठिकाणी भाव असेल त्याप्रमाणे तो फलद्रूप होत असतो ४

२५६९ तेव्हां होतों भोगाधीन । तुम्हा भिन्न पासूनि ॥ १ ॥
आतां बोलों नये ऐसे । आनारिसे वेगळें ॥ २ ॥
सन्मुख जालों स्वामीकडे । भव थोंकडे निराळे ॥ ३ ॥
चिंतिलें तें चिंतामणी । फिटे धणी तों धावें ॥ ४ ॥
सहज स्थिति आहे अंगीं । प्रसंगीं ते वचेना ॥ ५ ॥
तुमची देवा धरिली कास । केला नास प्रपंचा ॥ ६ ॥
तुका म्हणे जाणोनि वर्म । कर्माकर्में ठेविलीं ॥ ७ ॥

शब्दार्थ व टीपा :– अनारिसें–वेगळे, निराळे, धणी–इच्छा.

अर्थ :– देवा, तुमच्यापासून मी जेव्हा भिन्न होतो तेव्हा प्रारब्धकर्माच्या भोगाच्या स्वाधीन मी होतो १ पण आता मी तुमच्याजवळ आलो असल्याकारणाने यापासून वेगळे असे बोलूही नये. २ मी आता संसाररूपी अगरखा टाकून स्वामींच्या पुढे उभा राहिलो आहे. ३ चिंतामणीचा स्वभाव असा की, जो ज्याचे चिंतन करील त्याची तशी इच्छा पूर्ण व्हावी. ४ ही स्थिती आता माझ्या अंगी सहजच आहे. पण प्रसंग आला की मी हे बोलून दाखवितो ५ देवा, मी तुमची कास आता धरली आहे. त्यामुळे माझ्या प्रपंचाचा नाश झाला आहे. ६ तुकाराम महाराज म्हणतात, ही तुझी सर्व मर्मे मी जाणलेली असून कर्माचा व अकर्माचा त्याग केलेला आहे. ७

२५७० केला कईवाड संतांच्या आधारें । अनुभवें खरें कळों आलें ॥ १ ॥
काय जीविताची धरुनियां आशा । व्हावें गर्भवासा पात्र भेणें ॥ २ ॥
अबाळीने जावें निश्चितीच्या ठायां । रांडा रोटा वांयां करूं नये ॥ ३ ॥
तुका म्हणे बळी देतां तें निधान । भिकेसाटीं कोण राज्य देतो ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– कईवाड–निश्चय, रोटा–पोटासाठी केवळ.

अर्थ :– संतांच्या आधारावर मी हा निश्चय केलेला आहे, हे मला अनुभवाने खरे कळून आले आहे. १ आता जीविताची आशा धरून काय उपयोग आहे ? कारण जीविताची एकदा भीती मनात धरली की मग गर्भवास भोगावे लागतीलच. २ म्हणून जीविताची अबाळ करावी व आपण चिंतारहित असे ते परमेश्वराचे स्थान आहे तेथे जावे उगाच रांडेसारखी व्यर्थ पोटासाठीच खटपट कधी करू नये. ३ तुकाराम महाराज म्हणतात, आपल्या जीविताचा एकदा बळी दिल्यानंतर ते ईश्वराचे निधान हस्तगत होते. नाहीतर भीक मागण्यावारी कोणी राज्यपद देईल काय ? ४

२५७१ संगतीनें होतो पंगतीचा लाभ । अशोभीं अनुभव[1] असिजेतें ॥ १ ॥
जैसीं तैसीं असों पुढिलांचे सोई । धरिती हातीं पायीं आचारिये ॥ २ ॥
उपकारी नाहीं देखत आपदा । पुढिलांची सदा दया चित्तीं ॥ ३ ॥
तुका म्हणे तरीं सज्जनाची कीर्ति । पुरवाची आर्ति निर्बळांची ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– अशोभीं–प्रपंचात, आपदा–संकटे, आर्ति–हेतू, इच्छा.

अर्थ :– एखाद्याची संगत धरली असता त्याच्या पंगतीचा लाभ आपणास मिळतो असा अनुभव प्रपंचात नेहमीच येतो. १ म्हणूनच आम्ही जसे आहोत तसेच पुढे जाणाऱ्या संतांच्या सोयीप्रमाणे चालू. जे आचार्य, सत्पर्य आहेत ते आम्हांस हाती धरून, पायी चालवून योग्य त्या ठिकाणी पोचवतील. २ जो उपकार करणारा आहे त्याला दुसऱ्यावर आलेली संकटे पाहावत नाहीत त्याच्या अंतःकरणात नेहमीच भरपूर दया असते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, म्हणूनच साधुसंतांची कीर्ती वाढलेली असून ते दीन लोकांच्या मनातील इच्छा पूर्ण करीत असतात. ४

२५७२ करितां विचार सांपडलें वर्म । समूळ निश्रम परिहाराचें ॥ १ ॥
मज घेऊनियां आपणांसी द्यावें । साटीं[2] जीवें जीवें नारायणा ॥ २ ॥
उरी नाहीं मग पडदा का आला । स्वमुखेंचि भला करितां वाद ॥ ३ ॥
तुका म्हणे माझें खरें देणे घेणें । तुम्हां साक्षी जाणे अंतरींचे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– निश्रम–श्रम नाहीसे करणारे

१ अशोभ, २ सांडी जीवे भावे नारायणा.

अर्थ :– देवा, विचार केल्यानंतर सर्व धर्मांचा परिहार करणारे वर्म आम्हांस सापडले आहे. १ नारायणा, तुम्ही मला माझ्या जीवभावासहित घ्या व आपणांसाठी राखून ठेवा. २ तुमच्यांत व आमच्यांत जर भेदभाव नाही तर मग हा मायेचा पडदा मध्येच का निर्माण केला ? यासाठी तुमच्याबरोबर स्वतःच्या मुखाने वादविवाद करावा हेच चांगले. ३ तुकाराम महाराज म्हणतात, माझे देणेघेणे हे खरे असून याला तुम्ही साक्ष आहात. कारण तुम्ही माझ्या मनातील सर्व काही जाणता. ४

२५७३ कुळींची हे कुळदेवी । केली ठावी संतांनीं ।। १ ।।
बरवें जालें शरण गेलों । उगविलों संकटीं ।। २ ।।
आणिला रूपा ही बळें । करूनि खळें हरिदासीं ।। ३ ।।
तुका म्हणे समागमें । नाचों प्रेमें लागलों ।। ४ ।।

शब्दार्थ व टीपा :– उगविलों–मुक्त झालो, खळें–दुष्टानी

अर्थ :– आमच्या कुळाची ही कुळदेवी आम्हांस साधुसंतानी माहिती करून दिली. १ बरे झाले मी त्यांना शरण गेलो ते. त्यातीच सर्व संकटातून मला मुक्त केले २ या हरिदासानी मोठा प्रयत्न करून बळानेच त्या निराकार कुळदेवीस आकारास आणले आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, म्हणून मी त्यांच्या सहवासात मोठ्या प्रेमभाराने नाचू लागलो आहे. ४

अर्थ :– देवा, विचार केल्यानंतर सर्व धर्मांचा परिहार करणारे वर्म आम्हांस सापडले आहे १ नारायणा, तुम्ही मला माझ्या जीवभावासहित घ्या व आपणांसाठी राखून ठेवा २ तुमच्यात व आमच्यात जर भेदभाव नाही तर मग हा मायेचा पडदा मध्येच का निर्माण केला ? यासाठी तुमच्याबरोबर स्वतःच्या मुखाने वादविवाद करावा हेच चांगले. ३ तुकाराम महाराज म्हणतात, आम्ही देणेघेणे हे सरे असून याला तुम्ही साक्ष आहात. कारण तुम्ही माझ्या मनातील सर्व काही जाणता ४

२५७३ कुळींची हे कुळदेवी । केली ठावी संतांनीं ॥ १ ॥
बरवें जाले शरण गेलो । उगविलों संकटीं ॥ २ ॥
आणिला रूपा ही बळें । करुनि खळें हरिदासीं ॥ ३ ॥
तुका म्हणे समागमें । नाचों प्रेमें लागलों ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– उगविलों–मुक्त झालो, खळें–दुष्टानी

अर्थ :– आमच्या कुळाची ही कुळदेवी आम्हांस साधुसंतांनी माहिती करून दिली १ बरे झाले मी त्याना शरण गेलो ते त्यांनीच सर्व संकटातून मला मुक्त केले २ या हरिदासांनी मोठा प्रयत्न करून बळानेच त्या निराकार कुळदेवीस आकारास आणले आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, म्हणून मी त्यांच्या सहवासात मोठ्या प्रेमभराने नाचू लागलो आहे. ४

शब्दार्थ व टीपा – गदारोळें-गर्जनेत, आगळा-श्रेष्ठ, लागें-लाभाने

अर्थ – मी आता माझ्या देहाचा शेवट होईपर्यंत पुढे विठ्याप्रमाण त्याचे चिंतन करीन १ हरिनामाच्या गर्जनेत मी गाईन, नाचेन व त्यायोगे या संसारास जिंकेन २ या सेवारूपी धनाच्या अभिमानाने आम्ही बळकट होऊ. ३ तुकाराम महाराज म्हणतात, असे करण्यास मी काही मागे सरणार नाही त्याच्या लाभाने मी श्रेष्ठ पदवीस पोचेन ४

२५७५ ज्याने आड यावे काहीं । त्याचे नाहीं बळ आता ॥ १ ॥
मन येथें साह्य जाले । हरिच्या धाले गुणवादीं ॥ २ ॥
चुकुर तो गेला काळ । जाले बळ संगाचे ॥ ३ ॥
तुका म्हणे धरू सत्ता । होईल आता करू ते ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – धाले-संतुष्ट झाले

अर्थ .– आता आमच्या मार्गात जी जी बंधने येतील त्याचे काही एक बळ चालणार नाही १ माझे मन मला या श्रीहरीच्या गुणानुवादात साह्य झाले असून श्रीहरीच्या कृपेने तृप्त झाले आहे २ याच्या संगतीचे बळ लाभल्यामुळे चुकारपणा करणारा काळ नाहीसा झाला आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, आता आम्ही सत्ताधारी झालो असल्यामुळे जें करू ते आता आमच्याकडून होईल ४

२५७६ देवासी तो पुरे एकभाव गांठी । तोचि त्याचे मिठी देईल पायीं ॥ १ ॥
पाहोनि राहीन कवतुक निराळा । मी मज वेगळा होऊनिया ॥ २ ॥
कांहीं नेघें शिरीं निमित्याचा भार । न लगे उत्तर वेचावेंचि ॥ ३ ॥
तुका म्हणे जीवें पडिलिया गांठी । मग नाहीं मिठी सुटों येत ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – गांठी-जवळ, ठिकाणी, वेंचावेंचि-व्यय, खर्च करावे

अर्थ – आपल्याजवळ देवाविषयी एकभाव असला की पुरे तो भावच त्याच्या पायाशी मिठी घालील १ मी मीपणापासून वेगळा होऊन कौतुकाने या जगाचे स्वरूप पाहीन २ यापुढे कोणत्याही निमित्ताने कसलाही भार मी माझ्या शिरावर घेणार नाही आणि याबद्दल मी काही उत्तरही देणार नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, आपल्या जीवाची व देहाची एकदा गाठ पडल्यावर मग काही केल्या ती कधी सुटणार नाही ४

२५७७ लौकिकासाटीं या पसाऱ्याचा गोवा । काहीं नाहीं देवा लागों येत ॥ १ ॥
ठेवावा माया तो नुचलावा पायीं । ठायींचिये ठायीं हालों नये ॥ २ ॥
डवळिल्या मनें वितळिले रूप । नावडेसे पाप उपाधीचे ॥ ३ ॥
तुका म्हणे देव प्रीतीनें फावली । ठेवील जवळी उठवुनि ॥ ४ ॥

२५७८ नाहीं होत भार घातल्या उदास । पुरवावी आस सकळ हीं ॥ १ ॥
ऐसा नाहीं मज एकाचा अनुभव । धरिला तो भाव [1]उद्धरील ॥ २ ॥
उतावीळ असे शरणागतकाजें । धांव केशीराजे आइकतां ॥ ३ ॥
तुका म्हणे हित चिंतन[2] सर्वांसी । नेदी गर्भवासा येऊं देवा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– काजें–कामासाठी.

अर्थ :– देवावर भार घालून कुणी वागू लागला तर देव त्याच्याविषयी कधीही उदास राहात नाही. उलट त्याची सर्व इच्छा तो पूर्ण करतो. १ असा हा अनुभव माझा एकाचा नाही. जो कुणी हा भाव मनात धरील त्याचा देव उद्धार करील. २ शरण आलेल्या भक्तांचे रक्षण करण्यासाठी, त्यांचे काम करण्याविषयी तो उतावीळ असतो. कुणी धावा केला की तो केशीराजा धावत जातो. ३ तुकाराम महाराज म्हणतात, श्रीहरीचे चिंतन केल्यामुळेच सर्वांचे हित होणार असून त्यामुळे देव गर्भवास देणार नाही असा माझा विश्वास आहे. ४

२५७९ उपजों[3] मरों हे तों आमुची मिरासी । हें तूं निवारिसी तरी थोर ॥ १ ॥
उभा राहीं करीं खरा खोटा वाद । आम्ही जालों निंद्य लंडीपणें ॥ २ ॥
उभयतां आहे करणें समान । तुम्हां ऐसा म्हणे मी ही देवा ॥ ३ ॥
तुका म्हणे हातीं सांपडलें वर्म । अवघाची भ्रम[4] फेडिन आतां ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:– लडीपणें–दांडगेपणाने.

अर्थ :– जन्माला यावे आणि मरून जावे ही तर आमची मिरासदारीच आहे. देवा, याचे निवारण तू केलेस तरच तुला आम्ही मोठा म्हणू. १ यासाठी तू आमच्या समोर उभा राहा. याविषयीं आम्ही तुझ्याशी वादविवाद करतो. तू यासंबंधी खऱ्याखोट्याचा निवाडा कर. आम्ही तर आमच्या दांडगेपणाने लोकात निंद्य झालो आहोतच. २ देवा, मला तुझी बरोबरी करावयाची असल्यामुळें तू व मी एकच आहो असे मी मानतो. ३ तुकाराम महाराज म्हणतात, तुझ्या प्राप्तीचे रहस्य आता आमच्या हाती सापडले आहे त्यामुळे मी आता सर्व भ्रम दूर करीन. ४

२५८० मेलियांच्या रांडा इच्छितील फरूं । लाज नाहीं धरूं प्रीती कैशी ॥ १ ॥
मागिलां पुढिलां एक[5] सरोबरी । काळाची पेटारी खांदा वाहे ॥ २ ॥
आन दिसे परी मरणेंचि खरें । सांपळा उंदिरें सामाविलीं ॥ ३ ॥
तुका म्हणे जाली मनाची परती । निवळली ज्योती दिसों आली ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– सरोबरी–एकसारखा, परती–परतण्याची क्रिया.

अर्थ :– ज्या बायका विधवा आहेत, पण मुले व्हावीत अशी इच्छा करतात, त्यासाठी प्रीती धारण करतात. त्यांना लाज कशी वाटत नाही ? १ अशा प्रकारे मागचा व पुढचा व्यवहार एकसारखा होऊ लागला तर ते पेटाऱ्यात बसून काळाच्या खांद्यावरूनच चालले आहेत असे समजावे. २ सापळ्यामध्ये उंदीर सापडले असताना त्यांना ते घरच वाटले तरी ते खरोखर त्यांचे मरणच असते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, एकदा मन विषयापासून परावृत्त झाले की मग शुद्ध स्वरूपातील आत्मज्योत उजळू लागते ४

२५८१ निष्ठुर मी जालों अतिवादागुणें । हें कां नारायणें नेणिजेल ॥ १ ॥
सांडियेली तुम्ही गोत परिसोय । फोडविली डोय कर्मा हातीं ॥ २ ॥
सांपडूनि संदी केली जीवेंसाटीं । घ्यावयासि तुटी कारण हें ॥ ३ ॥
तुका म्हणे तुज काय म्हणो उणे । नाहीं अभिमानें चाड देवा ॥ ४ ॥

---

१ उद्धरलें, २ चिंतने, ३ उपजोनि मरों– ४ श्रम, ५ एकी.

शब्दार्थ व टीपा :- डोय-डोकी, संदी-संधी, प्रसग.

अर्थ :- देवा, तुमच्याशी अतिशय वादविवाद करून मी आता निष्ठुर बनलो आहे. नारायणा, हे का तुम्ही जाणीत नाही ? १ तुम्ही आपल्या गोताचा सबंध सोडून दिला आणि आमच्या कर्माकडून आमची डोकी फोडून टाकली. २ मी प्रसंग पाहून आपला जीव तुम्हांस समर्पण केला इतर सर्वांशी संबंध सुटावा हेच त्याचे कारण आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तुझ्याकडे दोष तरी मी कसा देऊ ? अभिमानाने बद्ध झालेल्यांची गरज तुला कधी उरत नाही. ४

२५८२ माझें माझ्या हाता आलें । आतां भलें सकळ ॥ १ ॥
कशासाटीं विषम यारा । तो अंतरा विटाळ ॥ २ ॥
जालीं तया दुःखें तुटी । मागिल पोटीं नसावें ॥ ३ ॥
तुका म्हणे शुद्धकुळ । तेथें मळ कशाचा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा'- विषम-विपरीत, प्रतिकूल.

अर्थ :- माझ्या स्वरूपाचा लाभ आता माझ्या हाती आला आहे. आता सर्व काही चांगले झाले आहे. १ आता विपरीत भावनेस कशासाठी थारा द्यावा ? त्यामुळे अंत करणास विटाळच होईल २ पूर्वीची दुःखे आता संपून गेल्यामुळे त्यांना पोटात स्थान नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, प्रभुकृपेने जे कुळ शुद्ध बनले आहे त्याला कशाचा मळ लागू शकणार. ४

२५८३ समर्थपणें हे करा संपादणी । नसतेंचि मनीं धरिल्याची ॥ १ ॥
दुसऱ्याचें येथें नाहीं चालों येत । तरि[1] मी निवांत पाय पाहें ॥ २ ॥
खोटियाचें खरें खरियाचें खोटें । मानलें गोमटें तुम्हांसी तें ॥ ३ ॥
तुका म्हणे तुम्हां सवें करितां वाद । होईजेतें निंद्य जनीं देवा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा.- गोमटें-चांगले.

अर्थ :- देवा, तुमच्या मनात नाही त्याची संपादणी तुम्ही वरवर चांगली समर्थपणे करीत असता. १ दुसऱ्या कुणाचेच येथे काही चालत नाही. यासाठीच मी निवांतपणाने तुमच्या पायांवर चित्त देऊन आहे. २ खोट्याचे खरे व खऱ्याचे खोटे करण्याचे तुम्हांस फार चांगले साधले आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तुमच्या बरोबर वादविवाद करण्याने मी जगात निंद्य झालो आहे. ४

२५८४ तुम्हां आम्हांसवें न पडावी गांठी । आलेति जगजेठी कळों आतां ॥ १ ॥
किती म्हणों आतां वाइटा वाइट । शिवों नये वीट आलयावरी ॥ २ ॥
बोलिल्याची आतां हेचि परचित । भीड भार थीत बुडवील ॥ ३ ॥
तुका म्हणे आली रोकडी प्रचिती । झांकणें तें किती कोठें देवा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा - थीत-व्यर्थ.

अर्थ '- जगजेठी, आता तुमचीआमची गाठ पडू नये हेच बरे. तुम्ही कसे आहात हे चांगले समजून आले आहे. १ जे वाईट आहे त्याला वाईट तरी किती वेळा म्हणावे ? एकदा एखाद्या वाईटाचा वीट आल्यावर त्याला शिवू सुद्धा नये. २ मी जे काही आजपर्यंत बोललो त्याची हीच प्रचीती आली आहे की, तुमच्या सवयीच्या भिडेचे ओझे मला व्यर्थ बुडवून टाकील. ३ तुकाराम महाराज म्हणतात, याची मला रोकडी प्रचीती आली आहे. तुम्ही त्यावर कितीही झाकण घातले तरी देवा, ते कसे पुरणार ? ४

---

१ परी.

२५८५ सकळ सत्ताधारी । व्हावें ऐसे काय हरी ॥ १ ॥
परि या कृपेच्या पोरसें । कुडायचेचि पिसे ॥ २ ॥
अगें सर्वोत्तम । अवघाचि पूर्णकाम ॥ ३ ॥
तुका म्हणे दाता । तरि हा जीव दान देतां ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – पोरसे–स्नेहभरित पाहुण्यानें, पिसे–वेड

*अर्थ* – श्रीहरी, आम्ही ज्यामुळे सर्वसत्ताधीश होऊ असे काय साधन आहे ? १ पण या स्नेहभरित अशा कृपेच्या पाहुण्याने कुडायचे वेड आम्हांस लागले आहे २ हा अगाने सर्वोत्तम असून सर्व कामना पूर्ण करणारा आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात जर खरा दाता असता तर त्याने जीवदान दिले असते ४

२५८६ कोणापाशीं द्यावें माप । आपीं[1] आप राहिलें ॥ १ ॥
कासयाची भरोवरी । काय दुरी जवळी ॥ २ ॥
एके दाखविलें दाहा । फाटा पाहा पुसून ॥ ३ ॥
तुका म्हणे सरलें वोझें । आता माझें सकळ ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – माप–हिशेब, भरोवरी–श्रम आयास, खटपट

*अर्थ* – आयुष्याचा हिशेब तरी कुणाजवळ द्यावा ? कारण सर्व काही आपण आपलेच आहोत १ ही सर्व खटपट तरी कशासाठी करायची ? दूर व जवळ असे तरी काय आहे ? २ एकाच्या आकड्यावर शून्य दिले तरच दहा ही संख्या होते त्याचा एक हा आकडा पुसून पाहा काय उरले ते ३ तुकाराम महाराज म्हणतात आता माझे देहात्मबुद्धीचे ओझे संपले असल्यामुळे सर्व बाबतींत माझा मीच आहे ४

२५८७ नभोमय जालें जळ । एकीं सकळ हरपले ॥ १ ॥
आता काय सारासारी । त्याच्या लहरी तयात ॥ २ ॥
कैंचा तेथ यावा साडी । आप कोंडी आपणा ॥ ३ ॥
तुका म्हणे कल्प जाला । अस्त गेला उदय ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – सारासारी–कमीजास्त प्रकार

अर्थ – विश्वात आकाशापर्यंत सर्वत्र जलमय स्थिती झाल्यानंतर मग इतर भेद सर्व संपूनच जातात १ त्या विशाल स्वरूपाच्या उदकाच्या ठिकाणी कमीजास्त प्रकार काहीच नसतो त्याच्या लाटा त्याच्यातच विरून जातात २ *अशा अवस्थेत पाण्याची भरती येणे व ओहोटी येणे कसे संभवेल ?* कारण त्या ठिकाणी पाण्यानेच स्वतःस स्वतःच्या ठिकाणी कोंडून घेतलेले असते ३ तुकाराम महाराज म्हणतात, याप्रमाणे सृष्टीच्या कल्पांताच्या वेळी अस्त व उदय हे दोनही उरत नाहीत ४

२५८८ राजा करी तैसे दाम । ते ही चाम चालती ॥ १ ॥
कारण ते सत्ता शिरीं । कोण करी अव्हेर ॥ २ ॥
वाइलें[2] तें सुनें खादों । चाले पदीं बैसविले ॥ ३ ॥
तुका म्हणे विश्वंभरें । करुणाकरें रक्षिलें[2] ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – दाम–पैसे चाम–चामड्याचे नाणे वाइलें–वाहिले सुनें–कुत्र

---

१ आपे आप २ रक्षीला

अर्थ :- राजाने चामड्याचे जरी पैसे केले तरी त्यांना किंमत असते. ते त्याप्रमाणे चालतात. १ कारण त्याच्यावर सरकारी सत्तेचा शिक्का असतो त्याचा कोण अव्हेर करणार मग ? २ आपले स्वत:चे पुत्र खांद्यावर वाहिले तरी शोभेल अथवा स्वत:च्या पदी बसविले तरी चालेल. ३ तुकाराम महाराज म्हणतात, त्या कृपासागर विश्वंभराने माझे रक्षण केले आहे. ४

२५८९ आम्ही देव तुम्ही देव । मध्यें भेव अधीक ॥ १ ॥
कैवाडाच्या धांवा लागें । मागें मागें विठ्ठले ॥ २ ॥
भेडसाविलें हाकें नादें । वोळखी भेदें मोडिली ॥ ३ ॥
तुका म्हणे उभा राहे । मागें पाहे परतोनि ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- भेव-भीती, कैवाडाच्या-निर्धारी भक्ताच्या.

अर्थ :- आम्ही देव आहोत व तुम्हीही देवच आहात; पण दोघांच्यांतील भीती ही अधिक आहे. १ जे कुणी निर्धारी भक्त आहेत त्यांच्या पाठीमागे विठ्ठल पाठलाग करीत धावतात. २ मोठ्याने आवाज करून किती जरी भेडसावले तरी मग भीती वाटत नाही. कारण भेदाची ओळख नष्ट झालेली असते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, उभे राहा. मागे परतून स्थिरावून पाहा. ४

२५९० हीनसुरबुद्धीपासीं । आकृतीसी भेद नाहीं ॥ १ ॥
एक वांडी एक खांदी । पदीं पदीं भोगणें ॥ २ ॥
एकाऐसें एक नाहीं । भिन्न पाहीं प्रकृती ॥ ३ ॥
तुका म्हणे भूमी खंडे । पीक दंडे जेथें तें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- सुर-शूर, चांगले.

अर्थ :- चांगले व वाईट या केवळ बुद्धीच्या कल्पना असून मूळ आकृतीत काही भेद नसतो. १ एक पालखीचा दांडा खांद्यावर घेऊन चालला आहे व दुसरा त्याच्या खांद्यावर पालखीत बसला आहे. असा पावलोपावली भोग चालू आहे. २ या सृष्टिरचनेत एकसारखे दुसरे नाही. अशी भिन्नता असली तरी प्रकृती मात्र एक आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, जसेजसे भूमीचे विभाग वेगवेगळे पडतील, त्याप्रमाणे तेथल्या पिकाची शोभा वाढणारी आहे. ४

२५९१ काय बोलों सांगा । याउपरी पांडुरंगा ॥ १ ॥
कांहीं आधारावांचून । पुढें न चले वचन ॥ २ ॥
वाढे ऐसा रस । कांहीं करावा सौरस ॥ ३ ॥
भक्तिभाग्यसीमा । द्यावा जोडोनियां प्रेमा ॥ ४ ॥
कोरड्या उत्तरीं । नका गौरवूं वैखरी ॥ ५ ॥
करी विज्ञापना । तुका प्रसादाची दाना ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा :- सौरस-गोडी, प्रसाद, विज्ञापना-विनंती.

अर्थ :- पांडुरंगा, आता यानंतर मी काय बोलावे ते तुम्हीच सांगा. १ तुमचा थोडा आधार असल्यावाचून माझे बोलणे पुढे काहीच होत नाही. २ माझ्या बोलण्यातील रस वाढेल असा काही तरी प्रसाद माझ्यावर करा. ३ भक्तीच्या भाग्याची सीमा होईल अशा प्रकारचे प्रेम तुम्ही मला द्यावे. ४ नुसत्या कोरड्या उत्तरांनी जिभेचा

गौरव तुम्ही वृथा करू नका. ५ तुकाराम महाराज म्हणतात, तुम्ही मला प्रसादाचे दान करावे अशी माझी तुम्हांस विनंती आहे. ६

२५९२ आहाच तो मोड वाळलियामधीं । अधीराची वुद्धि तेणें न्यायें ॥ १ ॥
म्हणऊनि संग न करीं दुसरें । चित्त मळीन द्वारें दोड पडे ॥ २ ॥
विषासाटीं सर्पां भयाभीत लोक । हें तों सकळीक जाणतसां ॥ ३ ॥
तुका म्हणे काचें राहे फुळांकुड । अवगुण तो नाड ज्याचा तया ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:– आहाच–व्यर्थ, काचें–कच्चे, फुळांकुड–वाईट लाकूड, नाड–नाश, अडवणूक.

अर्थ:– जमिनीतून वर आलेला मोड जर वाळून गेला तर त्याचे जिणे व्यर्थच होते; त्याचप्रमाणे जो अधीर आहे त्याची बुद्धी वायाच जाते. १ यासाठी कुणा दुसऱ्याची संगत धरी करू नये. कारण त्यामुळे आपले चित्त मलीन होईल आणि त्याचा वाईट परिणाम होईल. २ सर्पाच्या मुखात विष असल्यामुळे लोक त्याला भितात. हे सर्व प्रकार तर तुम्ही जाणीत आहातच. ३ तुकाराम महाराज म्हणतात, कच्चे राहिलेले लाकूड वाईटच असते. यावरून ज्याच्यात जो अवगुण असतो तो त्याला नडत राहातो. ४

२५९३ क्षणक्षणां जीवा वाटतसे खंती । आठवती चित्तीं पाय देवा ॥ १ ॥
येई यो येई वो येई लवलाहीं । आळिंगूनि वाहीं क्षेम देई ॥ २ ॥
उतावीळ मन पंथ अवलोकी । आठवा ते चुकी काय जाली ॥ ३ ॥
तुका म्हणे माझ्या जीवींच्या जीवना । घाला नारायणा उडी वेगीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा– खंती–चिंता, वाही–बाहू, हात, क्षेम–आलिंगन, पंथ–वाट, मार्ग.

अर्थ– देवा, तुम्हीमाझी भेट होत नसल्याने क्षणोक्षणी माझ्या जीवास भारी चिंता लागून राहिली आहे. आणि तुमच्या पायांचा आठव पुन: पुन: माझ्या चित्तात होत आहे. १ यासाठी देवा, तू लौकर धावून ये आणि आपले हात पसरून मला आलिंगन दे. २ तुमच्या भेटीसाठी माझे मन फार उतावळे झाले असून ते एकसारखी तुमची वाट पाहात आहे आणि स्वत:कडून काही चूक झाली की काय, याचा सारखा आठव ते करीत असते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, माझ्या जीवीच्या जीवना, नारायणा, सत्वर उडी घालून माझे रक्षण करा. ४

२५९४ आळी करावी ते कळतें बाळका । बुझवावें हें कां नेणां तुम्ही ॥ १ ॥
निवाड तो तेथें[1] असे पायांपाशीं । तुम्हांआम्हांविशीं एकेठायीं ॥ २ ॥
आणीक तों आम्ही न देखोसें जालें । जाणावें शिणलें भागलेंसें ॥ ३ ॥
तुका म्हणे तुम्हां लागतें सांगावें । अंतरींचें ठावें काय नाहीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– आळी–हट्ट, बुझवावें–समजूत करावी.

अर्थ :– देवा, हट्ट करण्याचे फक्त बालकास समजते. त्याची समजूत कशी करावी हे काय तुम्हांस समजत नाही ? १ हा तुमच्या आमच्यामधील निकाल तुमच्या पायांच्या ठिकाणीच होण्यासारखा आहे. २ तुमच्या खेरीज आम्ही काहीसुद्धा पाहू शकत नाही असे होऊन गेले आहे. यासाठी आम्ही शिणलो आहोत, भागलो आहोत, हे तुम्ही नीट जाणावे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, हे काय तुम्हांस सांगायला लागावे ? आमच्या मनातील भाव काय तुम्ही जाणीत नाही ? ४

---

१ येथें.

२५९५ तांतडीनें आम्हां धीरचि न कळे । पाळावे हे लळे लवलाहीं ॥ १ ॥
नका कांहीं पाहों सावकाशीं देवा । करा एक हेवा तुमचा माझा ॥ २ ॥
वोरसाचा हेवा[१] सांभाळावी प्रीत । नाहीं राहों येत अंगीं सदा ॥ ३ ॥
तुका म्हणे मज नका गोवूं खेळा । भोजनाची वेळा राखियेली ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- हेवा-हाव, इच्छा, वोरसाचा-प्रेमाच्या पान्हयाचा, गोवूं-गुंतवू.

अर्थ:- देवा, तुझ्या भेटीविषयी फारच तातडी झाली असल्यामुळे माझ्याच्याने धीर धरवत नाही. म्हणून तू माझे लाड लौकर पुरवावेस १ देवा, मला भेट देण्याविषयी सावकास पाहू असे मनात आणू नकोस याविषयी तुमची व माझी इच्छा एक राहील असे करा. २ माझ्या प्रेमाची इच्छा आणि तुमची प्रीत यांचा सांभाळ तुम्ही करावा याशिवाय दुसरा कुठला काही उद्योग आमच्या अंगी राहाणार नाही असे करा. ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी भोजनाची वेळ राखून ठेवलेली आहे. मला आता दुसऱ्या कुठल्या खेळात गुतवून ठेवू नकोस. ४

२५९६ नाहीं लोपों येत गुण । वेधी आणीके चंदन ॥ १ ॥
न संगतां पडे ताळा । रूप दर्पणीं सकळां ॥ २ ॥
सारविले वरी । आहाच तें क्षणभरी ॥ ३ ॥
तुका म्हणे वोहळें । सागराच्या ऐसें व्हावें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा .— नाहीं लोपों-दडले जात नाहीत, दर्पणीं-आरशात, आहाच-उगाच.

अर्थ :— चंदनाचा गुण काही दडला जात नाही. तो दुसऱ्यानाही वेध लावतो. १ आपले रूप आरशात पाहिल्यावर दुसऱ्याने काही न सांगताच आपले सर्व ज्ञान आपणांस होते. २ जमीन शेणाने जरी सारवली तरी वरवर ती उगाचच क्षणभर स्वच्छ दिसते ३ तुकाराम महाराज म्हणतात, पावसाळ्यात पावसाचा पूर आल्याबरोबर क्षणभर ओहोळही समुद्रासारखा भासतो. ४

२५९७ वचनेंचि व्हावें आपण उदार । होइल विश्वंभर संतुष्टचि ॥ १ ॥
सत्यसंकल्पाचीं फळें बीजाऐसीं । शुद्ध नाहीं नासी पावो येत ॥ २ ॥
वंचिलिया काय येतसे उपेगा । शरीर हें नरकाचेचि आलें ॥ ३ ॥
तुका म्हणे जीव जितां थारे लावा । पाडिलिया गोवा देशघडी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा - वंचिलिया-फसविले तर, थारे-आश्रयास, गोवा-हरकत, अडचळा.

अर्थ:- आपण आपल्या वाणीने देवाचे नाव घेऊन उदार व्हावे. त्यामुळेच तो विश्वंभर संतुष्ट होईल. १ आपला संकल्प जर सत्य स्वरूपाचा असेल तर त्याप्रमाणेच त्याला फळही प्राप्त होईल कारण शुद्ध बीजाचा कधीही नाश होत नाही २ फसवणूक करून जर आपण आपला देह देवाच्या सेवेत लावला नाही तर मग त्याचा काय उपयोग ? आपले शरीर तर नरकाचेच आले आहे ते देवाच्याच सेवेत लावावे ३ तुकाराम महाराज म्हणतात, जोपर्यंत जीव आहे तोपर्यंतच तो देवाच्या आश्रयास लावावा, नाही तर काही अडचळा याविषयी आला तर मात्र देशोधडीस जावे लागेल ४

२५९८ उरलें आयुष्य जावाचें कलिवर । अवघें वोडंबर विषयांचें ॥ १ ॥
कोणासी हा लागे पुसणे विचार । मनेंचि सादर करूं आतां ॥ २ ॥

१ पान्हा, २ धंदा.

उत्पत्ति प्रळय पहिले वळण । पाकाचे भोजन बीज वाढे ॥ ३ ॥
तुका म्हणे जाऊं अभयाच्या ठाया । रिघों देवराया शरण वेगीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – उसर्ते–मोजके दिवसांत, कलेवर–देह शरीर

अर्थ — आपले आयुष्य फारच मर्यादित व मोजके असून शरीर तर जाणारेच आहे आणि सर्व विषयांचे अवसर तर व्यर्थच आहे १ हा विचार कुणास पुसावा लागणार आहे ? म्हणून याविषयी आपलेच मन आपण सावध करू २ सव लोकांची उत्पत्ती त्याचा नाश यांचे एक प्रकारचे वळणच फार कठीण आहे त्याचाच स्वयपाक करून काळ भोजन करतो व आपले बीज वाढवीत असतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, आम्ही लौकरच देवरायास शरण जाऊन अभयाप्रत जाऊ ४

२५९९ बोलावे म्हूण हे बोलतो उपाय । प्रवाहें हें जाय गंगाजळ ॥ १ ॥
भाग्ययोगें कोणां घडेल सेवन । कैंचे येथें जन अधिकारी ॥ २ ॥
मुळीं देता घास पळवितीं तोंडें । अगींचिया भांडे असुकानें ॥ ३ ॥
तुका म्हणे पूजा करितों देवाची । आपुलिया रुची मनाचिये ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – भांड–भाडखोर लोक

अर्थ – गंगेचे पाणी जसे आपल्या ओघानेच जात असते तसेच हे उपाय सहज बोलावे म्हणूनच बोलतो १ जे कुणी भाग्यवान असतील त्यांनाच याचे सेवन घडेल या ठिकाणी काय सर्व लोक अधिकारी आहेत ? २ जे कुणी मूळचेच भांडखोर आहेत, त्यांना याचा घासभरीन जरी घास देऊ केला तरी ते कष्टाने दुःखाने आपले तोंड लपवितात ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी आपल्या आवडीप्रमाणे माझ्या देवाची पूजा करीत असतो ४

२६०० लटिकयाचे वाणी चवी ना सवाद । नाहीं कोणा वाद यचो येत ॥ १ ॥
अन्याय तो त्याचा नव्हे वायचाळा । मायबापीं वेळा न साधिली ॥ २ ॥
अनावर अगीं प्रबळ अवगुण । तांतडीनें मन लाहो साधी ॥ ३ ॥
तुका म्हणे दोष आणि अवकळा । न पडता ताळा घडतसे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – सवाद–स्वाद, रुची, वायचाळा–व्यर्थ चाळा वडबड

अर्थ – जो कुणी लबाड बोलणारा असतो त्याच्या वाणीस कसलीच चव नसते की तीस कसलाही स्वाद नसतो आणि ते बोलणं कधी कुणास आवडत नाही १ हा काही त्याने केलेला अन्याय अथवा व्यर्थ बडबड नसते त्याच्या जन्माच्या निमित्ताने त्याच्या आईबापानी नीट वेळ साधलेली नसते २ त्याच्या अंगी फार प्रबळ व अनावर असे अवगुण असतात म्हणूनच तसे वागून त्या दुर्गुणाचा लाभ तो करून घेत असतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, त्याच्या वागण्याबोलण्यात काही विशेष नसल्यामुळे त्याच्याकडून दोष घडून त्याची अवकळा होते ४

२६०१ नये स्तवू काचे होतें क्रियानष्ट । फुदाचे ते कष्ट भगा मूळ ॥ १ ॥
नाहीं परमार्थ साधत लौकिकें । धरुन होतो फिके अगा आले ॥ २ ॥
पारखिया पुढें नय घालू तोंड । तुटी लाभा खड होतो माना ॥ ३ ॥
तुका म्हणे तरी मिरवतें परवडी । कामाचल्या गोडी अविनाश ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – काचे–कच्चा अनधिकारी, फुदाचे–गर्वाने, परवडी—चांगला, उत्तम

अर्थ – जो परमार्थविषयात कच्चा आहे त्याची कधी स्तुती करू नये. कारण त्यामुळे तो क्रियानष्ट होतो त्याच्या ठिकाणी गर्व उत्पन्न होऊन त्याचे सारे प्रयत्न भंग पावतात १ लौकिक गोष्टींने कधी परमार्थसाधन होत नाही. जो लौकिकास धरून राहातो त्याचा परमार्थ फिकाच पडतो. २ म्हणून जे कुणी परमार्थाचे पारखी आहेत त्याच्यापुढे अनधिकारी माणसाने तोंड उघडू नये. त्यानी असे जर केले तर त्याचा लाभ कमी होतो आणि त्याची मानहानीही फार होते ३ तुकाराम महाराज म्हणतात, आपल्या कमावण्याने स्वयंपाक केल्यास त्याची गोडी अविनाशी होऊन त्याची शोभा पंगतीमध्ये वाढत असते ४

२६०२ कोण्या काळें येईल मना । नारायणा तुमचिया ॥ १ ॥
माझा करणें अंगीकार । सर्व भार फेडूनि ॥ २ ॥
लागली हे तळमळ चित्ता । तरी दुश्चिता संसारीं ॥ ३ ॥
सुखाचीच पाहे वास । मार्गे दोष संभाळीं ॥ ४ ॥
इच्छा पूर्ण जाल्याविण । कैसा सीण वारेल ॥ ५ ॥
लाहो काया मने वाचा । देवा साच्या भेटीचा ॥ ६ ॥
कांटाळा तो न धरावा । तुम्ही देवा दासांचा ॥ ७ ॥
तुका म्हणे माझे वेळे । न कळे कां हे उफराटें ॥ ८ ॥

शब्दार्थ व टीपा – वास–वाट, वारेल–दूर होईल, लाहो—छंद, नाद.

अर्थ :– नारायणा, तुमच्या मनात माझ्याविषयी प्रेम केव्हा बरे निर्माण होईल ? १ माझा सर्व भार फेडून तुम्ही माझा स्वीकार कधी करणार आहात ? २ 'माझ्या मनास हीच एक तळमळ लागलेली आहे यासाठी मी या ससारात फारच उदास होऊन राहिलो आहे ३ देवा, मी तुमच्याच सुखाची वाट पाहात आहे. या दासाचा सांभाळ तुम्ही करावा अशी माझी मागणी आहे ४ तुम्ही माझ्या मनातील इच्छा पूर्ण केल्याखेरीज मला झालेला शीण कसा दूर होईल ? ५ कायावाचामनेकरून मला तुमची भेट कधी होईल; हाच एक ध्यास असतो ६ देवा, तुम्ही या आपल्या दासाचा कधी कटाळा करू नये. ७ तुकाराम महाराज म्हणतात, माझ्या वेळेलाच तुमचे असे हे उफराटे वागणे का झाले ते समजत नाही ८

२६०३ घ्यावी तरी घ्यावी उदंडचि सेवा । द्यावे तरी देवा उदंडचि ॥ १ ॥
ऐसीं कैचीं आम्ही पुरतीं भांडवलें । आल्या करीं बोले समाधान ॥ २ ॥
व्हावे तरी व्हावे बहुतचि दुरी । आलिया[3] अंतरीं वसवावें ॥ ३ ॥
तुका म्हणे तुझें सख्यत्व आपणीं । असतील ऋणी आवडीचा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :— अतरीं–मनात, अत करणात

अर्थ .– देवा, तुम्हाला घ्यायची असेल तर माझ्याकडून भरपूर सेवा करून घ्या आणि काही द्यायचे असेल तर तेही विपुल प्रमाणात द्या. १ असा काहीतरी प्रकार घडावा यासाठी आमच्या जवळ भरपूर भांडवल आहे. त्याच्या जोरावर जो कुणी आमच्याकडे येईल त्याचे पूर्ण समाधान आम्ही करू २ आणि देवा, तुम्हाला दूरच व्हायचे असेल तर एकदम फार दूर व्हावे, अथवा जवळ यायचे असेल तर अगदी आमच्या अंत करणातच तुम्ही निवास करावा. ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तुझे सख्यत्व जोडणे हे तुझ्याकडेच आहे. तू तुझ्या प्रेमाच्या माणसांचा ऋणी असतोस. ४

१ चिंता २. दिवसाच्या भेटीचा, ३ आपुल्या

२६०४ काय करूं जीव होतो कासावीस । कोंडलिये[1] दिस गमेचि ना ॥ १ ॥
पहिलें हें दिसे ब्रह्मांडचि वोस । दाटोनि उच्छ्वास राहातसे ॥ २ ॥
तुका म्हणे आगा सर्वजाणतिया । विश्वंभरें काया निववावी ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा :– काया–शरीर, देह.

अर्थ – काय करू ? या श्रीहरीशिवाय माझा जीव फारच कासावीस होत राहिला आहे त्यामुळे मला कोंडल्यासारखे झाले आहे मला करमतच नाही १ हे सारे ब्रह्मांड ओस पडल्यासारखे दिसत असून त्यामुळे माझा श्वास कोंडून राहिलेला आहे. २ तुकाराम महाराज म्हणतात, अगा, सर्व काही जाणणाऱ्या विश्वंभरा, माझा देह तू शांत कर ३

२६०५ सुकलियां कोंभां अत्यंत जळधर । तेणेंच प्रकार न्याय असे ॥ १ ॥
न चले पाउलीं साडीं गरुडासन । मनाचें हो[2] मन त्वरेलागीं ॥ २ ॥
तुका म्हणे भूक न साहावे बाळा । जीवनाची कळा ओढलीसे ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा :– अत्यंत–अतिशय, उपयुक्त, जळधरे–वर्षाव करणारे मेघ

अर्थ – सुकत चाललेल्या झाडास, अंकुरास वर्षाव करणाऱ्या मेघांचा उपयोग फार होतो, त्याप्रमाणे देवा तुझी मला जरूरी आहे १ देवा, तू पायानी अथवा गरुडाच्या आसनावर बसून येऊ नकोस त्यामुळे तुला फारच वेळ लागेल मनाचेही मन होऊन अतिशय वेगाने तू माझ्याकडे धावत ये २ तुकाराम महाराज म्हणतात, या बालकास आता भूक सहन होत नाही जगण्यासाठी, अन्नप्राशनासाठी त्याचे प्राण आतल्या आत ओढले जात आहेत ३

२६०६ शृंगारिक माझीं नव्हती उत्तरें । आळवितों खरे अवस्थेच्या ॥ १ ॥
न घलावा मर्यी कामाचा विलंब । तुम्ही तो स्वयंभ करुणामूर्ति ॥ २ ॥

२६०८ कराल तें करा । हातें आपुल्या दातारा ॥ १ ॥
बळियाचीं आम्ही बाळें । असों निर्भर या सळें ॥ २ ॥
आतां कोठें काळ । करील[1] देवापाशीं बळ ॥ ३ ॥
तुका म्हणे पंढरीराया । यापदितों ठोके बाहृचा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– निर्भर–निर्भय, सळें–बळाने.

अर्थ :– दातारा, तुम्ही माझ्याविषयी जे काय कराल ते स्वत:च्या हातांनी करा. १ आम्ही तुमच्या-सारख्या समर्थांची बालके असल्यामुळे त्या बळावर अगदी निर्भय आहोत. २ त्यामुळे आता आमच्यात त्या अमंगल काळाचा शिरकाव तरी कसा होऊ शकेल ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी हे दंड थोपटून सांगत आहे. ४

२६०९ डोळां भरिलें रूप । चित्ता पायांपें संकल्प ॥ १ ॥
अवघी घातली वांटणी । प्रेम राहिलें कीर्तनीं ॥ २ ॥
वाचा केली माप । राशीं हरिनाम अमुप ॥ ३ ॥
भरुनियां भाग । तुका बैसला पांडुरंग ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– अमुप-अमाप, असंख्य, भाग–वाटा.

अर्थ :– देवा, तुमचे हे रूप माझ्या डोळ्यांत भरून राहिले आहे आणि माझे चित्त तुमच्या पायांचाच संकल्प करीत आहे. १ मी माझ्या सर्व इंद्रियवासना तुमच्याच पायांवर समर्पित केल्या आहेत. तुमच्या कीर्तनात माझ्या मनातील प्रेम भरून आले आहे. २ अमाप असलेल्या श्रीहरीच्या नामाचे मोजमाप करण्यासाठी मी माझ्या जिभेचेच माप केले आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, पांडुरंगाचा वाटा मी माझ्या जवळ साठवून स्वस्थ राहिलो आहे. ४

२६१० आतां आहे नाहीं । न कळे आळी करा कांहीं ॥ १ ॥
देसी पुरवुनी इच्छा । आतां पंढरीनिवासा ॥ २ ॥
नेणे भाग सीण । दुजें कोणी[2] तुम्हांविण ॥ ३ ॥
आतां नव्हे दुरी । तुका पायीं मिठी मारी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – आळी–हट्ट

अर्थ :– आपल्या आईजवळ आपण मागू ती गोष्ट आता आहे अथवा नाही याचा विचार न करताच बालक मनास मानेल तसा हट्ट धरीत असते. १ पंढरपूरनिवासा, तू त्याप्रमाणे माझी इच्छा पूर्ण होईपर्यंत द्यावेस. २ देवा, आम्हांला झालेले श्रम व कष्ट तुमच्यावाचून कोण दुसरे जाणणार आहे ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी काही आता दूर राहणार नाही तुमच्या पायांशी मिठी घालूनच राहीन ४

२६११ संकल्पासी अधिष्ठान । नारायण गोमटें ॥ १ ॥
अवघियांचें पुरे कोड । फिटे जड देहत्व ॥ २ ॥
उभय लोकीं उत्तम कीर्ति । देव चित्तीं राहिलिया ॥ ३ ॥
तुका म्हणे जीव धाय । नये हाय जवळी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– गोमटें–चागले, कोड–इच्छा, धाय–तृप्त, सतुष्ट, हाय–तळमळ, हायहाय.

१ मध्यें रिघेल बोगळ, २ नाही.

अर्थ – कोणत्याही सत्कृत्यास उत्तम अधिष्ठान म्हणजे नारायण हेच होय १ त्याच्या प्राप्तीने सर्वांची इच्छा तृप्त होते आणि देहाची आसक्ती दूर होते २ देव एकदा आपल्या चित्तात राहिला तर आपली या लोकी व परलोकीही चांगली कीर्ती होईल ३ तुकाराम महाराज म्हणतात, एकदा त्याच्या ठिकाणी आपला जीव जडला की त्याची तृप्ती होते आणि मग कसलीही हाव उरत नाही ४

२६१२ भाग्यवंता ऐसी जोडी । परवडी संताची ॥ १ ॥
धन घरीं पांडुरंग । अभंग जें सरेना ॥ २ ॥
जनाविरहित हा लाभ । टाचे नभ साठवणें ॥ ३ ॥
तुका म्हणे विष्णुदासां । नाहीं आशा दुसरी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– परवडी भरपूर सोबत, पंगतीचा लाभ, टाचे–कमी

अर्थ – जे कुणी भाग्यवंत असतात त्यांना साधुसंतांच्या सोबतीचा लाभ महत्त्वाचा वाटतो १ त्यांच्या घरी पांडुरंग हेच धन कधीही न सरणारे व न भंगणारे असे असते २ हा त्यांचा लाभ सर्वांपेक्षा वेगळाच असून त्याचे साठवण करायला आकाशही कमी पडेल ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा प्रकारे विष्णुदासांना या धनाखेरीज दुसरी कसलीही आशा नसते ४

२६१३ जरी आले राज्य मोळविक्या हाता । तरी तो मागुता व्यवसायी ॥ १ ॥
तृष्णेचीं मजुरें नेणती विसावा । वाढे हाव हावा काम धामीं ॥ २ ॥
वैभवाचीं सुखें नातळतां अंगा । चिंता करी भोगा विघ्न जाळी ॥ ३ ॥
तुका म्हणे वाहे मरणाचे भय । रक्षणउपाय करूनि असे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – नातळतां–लागत नाहीत

अर्थ – एखाद्या मोळी विकणाऱ्या माणसाच्या हातात राज्य जरी आले तरी त्याला नंतर मोळ्या विकण्याचा व्यवसाय करण्याची बुद्धी होतेच १ केवळ इंद्रियसुखांचीच इच्छा करणारे व मजुराप्रमाणे राबणारे त्याच तृष्णेचे दास होतात त्यांना विसावा कसा तो माहीत नसतो त्यांची हाव हावेने आणि इच्छा इच्छेने वाढत असते २ चांगले वैभव जरी त्यांना प्राप्त झाले तरी ते काही त्यांच्या अंगी लागत नाही चांगले भोग पुढे असूनही एखादे विघ्न त्यात येईल की काय या चिंतेने त्याचे चित्त नेहमी जळत असते ३ तुकाराम महाराज म्हणतात, असा लोभी मनुष्य भय बाळगीत असला तरी आपले ऐश्वर्य रक्षण करण्याचे उपाय सतत करीतच असतो ४

असला हीन मानावा ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी प्रभुकृपेने सहजच पाहाणारा झालो आहे कारण त्या देवाने मला त्याच्या स्वत च्या खुणा दाखविल्या आहेत ४

२६१५ आम्हां शरणागतां । एवढी काय करणें चिंता ॥ १ ॥
परि हे कौतुकाचे खेळ । अवघे पाहातों[1] सकळ ॥ २ ॥
अभयदानवृदें । आम्हा कैंचीं भयद्वद्वें[2] ॥ ३ ॥
तुका म्हणे आम्ही । हरिजन साधनाचे स्वामी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- भयद्वद्वें–सुख दुःखादी भीतीची द्वद्वें

अर्थ – आम्ही देवास मनापासून शरण गेलेलो असल्याने आम्हास एवढी चिंता तरी करण्याचे काय काम आहे ? १ परंतु हे सर्व क्रीडाकौतुक आम्ही पाहात असतो २ ईश्वराने आम्हांस 'तुमचे अभय असो' अशा शब्दांनी दान दिलेले असल्याने आम्हास सुख दुःखादी भीतीची द्वद्वे कुठून असणार ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, आम्ही या श्रीहरीचे दास असून सर्व साधनाचे धनी झालो आहोत ४

२६१६ देवाचिये चाडे प्रमाण उचित । नये वाटू चित्त निषेधासीं ॥ १ ॥
नये राहों उभें कसमळापाशीं । भुकतील तैसी साडावीं तीं ॥ २ ॥
तुका म्हणे क्षमा सुखाची हे रासी । साडूनि का ऐसी दुःखी व्हावे ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा – चाडे–किमतीने, गरजेने, कसमळापाशीं–दुराचारी, वाईट लोकापाशी

अर्थ :– एका देवाच्याच किंमतीने योग्य असे कर्तव्य कोणते ते ठरवावे मात्रिवाय आपल्या चित्ताची वाटणी इतर निषिद्ध कर्मात करू नये १ जे दुराचारी लोक आहेत त्यांच्यापाशी क्षणभरही उभे राहू नये त्यांचे बोलणे कुत्र्याच्या भुकण्याप्रमाणे सोडून देऊन त्यांचा त्याग करावा २ तुकाराम महाराज म्हणतात, क्षमा ही सर्व सुखाची रास आपल्याजवळ असताना ती सोडून उगाच दुःखीकष्टी का व्हावे ? ३

२६१७ खळा सदा क्षुद्रीं[4] दृष्टी । करी कष्टी सज्जना ॥ १ ॥
करिती आपुलाले परी । घणीवरी व्यापार ॥ २ ॥
दया सता भाडवल । वेची बोल उपकार ॥ ३ ॥
तुका म्हणे आपुलाले । उसतिले ज्याणीं तें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – खळा–दुष्ट लोकाची, घणीवरी–तृप्ती होईपर्यंत, उसतले–शेवटास नेले

अर्थ – दुष्ट लोकाची दृष्टी नेहमी क्षुद्र गोष्टींकडेच असते ते सतत सज्जन लोकाना कष्ट देत असतात १ ते अशा प्रकारे दुःख देण्याची कृती आपापल्या परीने स्वत ची तृप्ती होईपर्यंत करीत असतात २ उलट सर्वांवर दया करणे हेच संताचे भाडवल असते म्हणून त्याचे बोलणे नेहमी दुसऱ्यावर उपकार करण्यासाठीच असते ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा प्रकारचे व्यवहार ज्याचे त्याने आपापल्या योग्यतेप्रमाणे चालविले आहेत, शेवटास नेले आहेत ४

२६१८ जग ऐसे बहुनावे । बहुभावे भावना ॥ १ ॥
पाहों बोलों बहु नये । सत्य काय साभाळा ॥ २ ॥
करियासी जें कारण । तें जतन करावे ॥ ३ ॥
तुका म्हण सतजनीं । हेंचि मनीं धरावे ॥ ४ ॥

१ पाहातो गोपाळ, २ द्वद्वे, ३ कस्मळापाशी, ४ क्षुद्र

शब्दार्थ व टीपा – कारियासी-कार्यासाठी

अर्थ – अनेक भावांनी व अनेक भावभावनांनी जे भरून राहिलेले आहे ते हे जग १ यासाठी यासंबंधी फारसे पाहू नये की बोलू नये जे सत्य आहे त्याचा मान सांभाळ करावा २ आपले साध्य, कार्य लक्षात ठेवून त्याच्या कारणाचे नीट जतन करावे ३ तुकाराम महाराज म्हणतात, संत लोकांनी मी हे प्रकार सांगितले आहेत ते नीट जपून ठेवावेत. ४

२६१९ निघालें तें अंगीहूनि । आतां क्षणी आतळे ॥ १ ॥
पळवा परपरतें दुरी । आता हरी येथूनि ॥ २ ॥
धरिलें तैसें श्रुत करा हो । येथें आहों प्रपचीं ॥ ३ ॥
अबोल्यानें ठेला तुका । भेउनि[1] लोकां निराळा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा '– क्षणी-क्वचितार्थी, क्वचित्, आतळे–स्पर्श करतील, परपरतें-परा वाचेच्या पलीकडे, श्रुतकरा-ऐकवा

अर्थ – माझ्या शरीरातून आता जे विचार बाहेर पडले आहेत ते क्वचितच मला परत येऊन स्पर्श करतील १ श्रीहरी, आता मागे विचार परावाणीच्या पलीकडे दूर पळवून लावा २ अहो हरी, आता या प्रपचात मी माझ्या मनात जे जे धरले आहे ते ते ऐकवा ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी या सर्व लोकांना भिऊन अबोल होऊनच निराळा व मौन व्रत धारण करून राहिलो आहे ४

२६२० आता दुसरें नाहीं वनीं । निरजनीं पडिलों ॥ १ ॥
तुमचीच पाहें वास । अवघी आस निरसली ॥ २ ॥
मागिलाचा मोडला माग । घडला त्याग अवघी ॥ ३ ॥
तुका म्हणे करुणाकरा । तू सोयरा जीवींचा[2] ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – निरजनीं-निराजनी पटाळून वास-वाट, आस-इच्छा, माग-मार्ग, संबंध

अर्थ – देवा, सर्व लौकिकास कटाळून आता मी येथे वनात पडलो असून मला तुमच्यावाचून दुसरे कुणीही नाही १ मी आता फक्त तुमचीच वाट पाहात आहे माझ्या इतर सर्व आशा मावळून गेल्या आहेत २ मागील सर्व सांसारिक गोष्टींचा मला वीट आला असल्यामुळे मी त्यांचा सबंध सोडून दिला आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात करुणेच्या सागरा, देवा तू गरीबाचा सोयरा आहेस ४

२२२१ धरूनिया सोई परतलें मन । अनुलक्षीं[4] चरण करूनिया ॥ १ ॥
येईं पाडुरंगे नेईं सांभाळूनि । करुणावचनीं आळवितों ॥ २ ॥
बुद्धि जाली साह्य परि नाहीं बळ । अवलोकितों जळ वाहे नेत्रीं ॥ ३ ॥
न चलती पाय गळित जाली काया । म्हणऊनि दया येऊं द्यावी ॥ ४ ॥
दिशेच्या करितों वारियासीं मात । जोडूनिया हात वास पाहे ॥ ५ ॥
तुका म्हणे वेग करावा सत्वर । पावावया तीर भवनदीचे ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – अनुलक्षीं-लक्ष ठेवून काया–शरीर मात-गोष्ट, विचारपूस

१ बोलुनि, २ निराजनी, ३ दीनाचा ४ अनुरक्षी ५ व्हावी

अर्थ – तुमच्या चरणावर लक्ष ठेवून व त्याच मार्गाची सोय ध्यानात ठेवून मी माझे मन प्रपंचातून परतविले १ 'पांडुरंगे, ये तू मला सामाळून ने ' अशी करुण वाणीने मी तुमची आठवण केली आहे २ या कामी माझी बुद्धी साहाय्यभूत झाली असली तरी माझ्या अंगी तुमच्याकडे येण्याइतपत शक्ती उरलेली नाही, म्हणून मी फक्त तुमची वाट पाहातो आणि त्यामुळे माझ्या डोळ्यांतून एकसारखे पाणी पाझरत असते ३ तुझ्याकडे वाटेने चालावे तर पाय उचलत नाहीत, माझे सर्व शरीरच गळून गेले आहे म्हणून देवा, तुम्ही माझ्यावर दया करावी ४ तुमच्या दिशेकडून वारा जरी आला तरी मी त्याच्याजवळ तुमच्याविषयी विचारपूस करीत असतो हात जोडून देवा, मी तुमची वाट पाहात आहे ५ तुकाराम महाराज म्हणतात, या संसारनदीचे पैलतीर गाठण्यासाठी तुम्ही त्वरा करून मला साहाय्यभूत व्हा ६

२६२२ कौले भरियेली पेंठ । निग्रहाचे खोटे तंट ॥ १ ॥
ऐसे माता जाणे वर्म । बाळ वाढविता धर्म ॥ २ ॥
कामविता[1] लोहो कसे । तातडीनें काम नासे ॥ ३ ॥
तुका म्हणे खडे । देता अक्षर[2] ते जोडें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- निग्रह–भलता आग्रह, तंट–बोभाटा, गवगवा, लोहो–लोखंड, कसे–कसास, किंमतीस.

अर्थ – ही पेठ अनेक साधनरूपी कौलांनी भरलेली आहे या ठिकाणी भलता आग्रह धरून उगाच तंटा करून चालणार नाही १ आपल्या बालकास कसे वाढवावे याचे मर्म फक्त आईसच माहीत असते २ लोखंड जर चांगले कमावले तरच त्याची किंमत वाढते उलट उतावळेपणा केला तर मात्र कामाचा नाश होतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, लहान मुलास जर नीट खडे मांडून शिकविले तरच त्याला अक्षरज्ञानाची प्राप्ती होत असते ४

२६२३ चालिले न वाटे । गाऊनियां जाता वाटे ॥ १ ॥
बरवा वैष्णवांचा संग । येतो सामोरा श्रीरंग ॥ २ ॥
नाहीं भय आड । कांहीं विषमाचे जड ॥ ३ ॥
तुका म्हणे भक्ति । सुखरूप आदीं अंतीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- बरवा–चांगला. विषमांचे–संकटाचे, जड–ओझे

अर्थ :– श्रीहरीचे नाम मुखाने गातगात चालले तर वाटेने होणारे श्रम वाटत नाहीत १ साधुसंतांचा सहवास नेहमीच फार चांगला असतो कारण त्यांच्या सगे चालले असताना श्रीरंग आपल्या समोर येतो २ या वाटेने चालले असताना कसलीही भीती नसते, की कसल्याही संकटाचे ओझे निर्माण होत नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, याप्रमाणे भक्ती ही प्रारंभापासून शेवटपर्यंत सुखदायकच आहे ४

२६२४ करितां विचार तो हा दृढ संसार । ब्रह्मादिकां पार नुलंघवे सामर्थ्ये ॥ १ ॥
शरण शरण नारायणा मज अंगीकारीं दीना । आले ते वचनापासीं माझ्या सामर्थ्य ॥ २ ॥
पाठीवरी मोळी तोंचि कळवा पायीं तळीं[3] । सांपडला जाळीं मत्स्य जाला तो न्याय ॥ ३ ॥
आतां करीन तातडी लाभाची ते याच जोडी । तुका म्हणे ओढी पाया सोई मनाची ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- दृढ–तरून जाण्यास कठीण

अर्थ – जो जो विचार करून पाहातो तो तो हा संसारसमुद्र तरून जाण्यास फारच कठीण आहे असे आढळून येते हा पार करण्याचे सामर्थ्य ब्रह्मादिकांसही नाही १ नारायणा, मी तुम्हास मनोभावे शरण आलो आहे,

---

१ कामाविता, २ अक्षरें, ३ पायांतळीं.

मज दीनाचा तुम्ही स्वीकार करावा माझ्या मनात आले ते बोलावे हेच माझे खरे सामर्थ्य आहे २ पाठीवरती मोळीचे जरी ओझे घेतले तरी त्याची जाचणूक केवळ पाठीसच होते असे नाही, तर ती तळपायापर्यंत पोचते पाण्यात मासा सापडावा तशी माझी अवस्था झाली आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात तुमची प्राप्ती व्हावी म्हणून मी आता त्वरा करणार आहे देवा तुमच्या पायाची ओढ माझ्या मनाला फार तीव्रतेने आहे ४

२६२५ बहुता जातीचा केला अंगीकार । बहुत ही फार सर्वोत्तमें ॥ १ ॥
सरलाचि[1] नाहीं कोणाचिये वेचे । अक्षोभ ठायींचे ठायीं आहे ॥ २ ॥
लागतचि नाहीं घेता अतपार । वसवी अतर अणुचे ही ॥ ३ ॥
तुका म्हणे केला होय टाकीऐसा । पुरवावी इच्छा धरिली ते ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – वेचे–खर्चामुळे

अर्थ – या सर्वोत्तम अशा देवाने अनेक जातींच्या लोकाचा स्वीकार केलेला आहे १ अशा रीतीने ह सर्वांवर कृपा करीत असला तरी या खर्च होण्याने हा कधी संपतच नाही उलट हा आपल्या जागी आहे तसाच स्थिरावलेला आहे २ याचा अतपार पाहू गल्यास काहीही सापडत नाही याचे वास्तव्य अणूच्याही अंतरगात असते ३ तुकाराम महाराज म्हणतात, याला जसे करावे तसा तो होतो मनात जी इच्छा आपण धरावी ती तो पूर्ण करीत असतो ४

२६२६ पोट धालें आता जीवनीं आवडी । पुरवावे परवडी बहुतांचे ॥ १ ॥
काय आचवणा तातडीचे काम । मागील तीं श्रम न पवावीं[2] ॥ २ ॥
वाढितिया पोटीं बहु असे वाव । सांभाळिता ठाव धाम वाचे[3] ॥ ३ ॥
दाविल्यावाचूनि नाहीं कळों येत । तेथें ही वुचित एकपणे ॥ ४ ॥
नावेचा भार तो उदकाचे शिरीं । काय हळू भारी तये ठायीं ॥ ५ ॥
तुका म्हणे गीतीं गाऊनि गोविंद । करु ब्रह्मानंद एकसरे ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा — धालें–तृप्त झाले परवडी–प्रकार

अर्थ – आता आमचे पोट भरुन तृप्त झाले आहे आता आमचे जीवन असणारा हा श्रीहरी याच्या विषयीच प्रेम आमच्या मनात आहे अशी प्रीती अनेक प्रकार करुन त्याने अनेकाची पुरवावी १ अहो अशा प्रकारच्या जेवणात तातडी करुन लगेच हात आचविण्याचे काय काम आहे ? यापूर्वीच्या पाकसिद्धीचे श्रम तुम्हांस सोसणारे नाहीत २ येथ जे वाढणारे आहेत त्यांच्या पोटात पुष्कळच सद्भाव असून ते उदार आहेत अशा प्रसगी आपण आपले ठिकाण सांभाळून पगतीचा लाभ घेतला तर आपले काय खर्च होणार आहे ? ३ अशा प्रसगी काही प्रकार दाखविल्याशिवाय काही समजून यत नाही या ठिकाणी एकटेपणाने राहाणे चांगले आहे ४ नौका पाण्यावर चालते, पण तिचा भार पाण्यास सहन करावा लागतो नावेत बसणारांना काही ते ओझे जड वाटण्याचे कारण आहे काय ? ५ तुकाराम महाराज म्हणतात, आम्ही आमच्या गायनात त्या गोविंदाचेच गुणगान गाऊ आणि एकसारखा ब्रह्मानंदाचा अनुभव घेऊ ६

२६२७ एका हातीं टाळ एका हातीं चिपळिया । घालिती हुमरी एक वातातो टाळिया ॥ १ ॥
मातले वैष्णव नटती नाना छंदें । नाहीं चाड मोक्षपदें भजनीं आवडी ॥ २ ॥
हाका अरोळिया गीत वाद्यें सुखसोहळे । जाय तें न कळे येऱ्हां रजनी दिवस ॥ ३ ॥
तीर्थी नाहीं चाड न लगे जाव वनांतरा । तुका म्हणे हरिहरात्मकचि पृथिवी ॥ ४ ॥

---

१ धरला २ पावावीं, ३ वचे

शब्दार्थ व टीपा :– हुंमरी–एक प्रकारचा खेळ, चाड–इच्छा, पर्वा, रजनी–रात्र.

अर्थ :– या वैष्णवांच्या समुदायात कित्येकांनी हातांत टाळ घेतले आहेत, तर कित्येकांनी हातांत चिपळ्या घेतल्या आहेत. तर कुणी हुंमरी घालून खेळ खेळतात व आनंदाने टाळ्या वाजवितात. १ अशा प्रकारे हे वैष्णव भक्तिसुखाने मत्त झालेले असून अनेक प्रकारच्या छंदांनी नटलेले आहेत. त्यांना हरिभजनात प्रेम असल्यामुळे ते मोक्षसुखाची कधीच पर्वा करीत नाहीत. २ ते देवास मोठ्याने आरोळी ठोकून हाक मारतात, नाना प्रकारची वाद्ये वाजवतात आणि सुखसोहळ्यात दंग होऊन जातात. अशा या आनंदात दिवस या रात्र कशी येतात आणि जातात तेच कधी समजत नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, या वैष्णवांना तीर्थयात्रा करण्याची कधीच इच्छा नसते. त्यांना वनांत जाण्याची जरूरी वाटत नाही; कारण त्याना ही सर्व पृथ्वी हरिहरमयच झालेली अनुभवास येते. ४

विवरण :– या एका सुंदर अभंगात तुकारामबुवांनी भजनात तल्लीन झालेल्या वैष्णवसमुदायाचे मोठे हृद्य आणि गोचर असे वर्णन केले आहे. ते नामघोषात, टाळांच्या गजरात, चिपळ्यांच्या आवाजात एवढे दंग झालेले असतात की, त्याना कधीही मोक्षसुखाची आठवणही होत नाही. या संतसंगाच्या आणि भजनाच्या आनंदापुढे त्यांना मोक्षसुख अगदीच फिके वाटते. या तल्लीनतेच्या अवस्थेत ते असताना दिवस व रात्र केव्हा सपून जातात याचेही भान त्याना नसते. त्याना या नामसंकीर्तनाच्या व भजनाच्या सुखापुढे रानावनात जाण्याची व तीर्थव्रते करण्याचीही गरज वाटत नाही. सर्व पृथ्वी हरिहराच्या रूपानेच व्यापलेली असल्याचा अनुभव त्याना येत असतो.

शब्दार्थ व टीपा :– गोतें–नातेवाईक, सपुरतीं–पूर्णपणाने, पार–अंत, आरोया–अपूर्व इच्छा.

अर्थ:– आम्ही या देवाला सखा करून घेतले असल्यामुळे आमचे आता काय होण्यासारखे नाही ? यामुळे सर्व जीव आमचे सखेसोयरेच बनलेले आहेत. १ या योगे आम्ही भाग्यवंत झालो असून सर्वजण आमचे पूर्णपणे नातेवाईक झाले आहेत आता आमच्या पुण्यास व नीतीस अंत नाही असे झाले आहे. २ आमच्या हृदयात श्रीहरीचा ठसा कायमचा बसलेला असल्यामुळे आम्ही लोकत्रयांत पाहू तेव्हां सर्वच दिशा याच देवाने भरून गेलेल्या आम्हांस दिसतात. ३ आम्हा भाग्यवंतांना अविनाशी अशा या परमात्म्याची प्राप्ती झालेली आहे आमच्या प्रारब्धाच्या सत्तेनेच हे सर्व घडून आले आहे. ४ या श्रीहरीच्या पायांवर आम्ही मस्तक ठेवावे हीच एक आमची तीव्र इच्छा आहे. त्यास आलिंगन द्यावे अशी आमची सत्ता आहे. ५ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, आम्ही तुमचे आहोत असे म्हटल्यामुळे आमचा जीव पूर्णपणे विश्रांतीस पावलेला आहे ६

२६२९ कोण आतां कळिकाळा । येऊं बळा देईल ॥ १ ॥
सत्ता झाली त्रिभुवनीं । चक्रपाणी कोवसा ॥ २ ॥
लडिवाळांचा भार वाहे । उभा आहे कुढावया ॥ ३ ॥
तुका ह्मणे घटिका दिस । निमिष ही न विसंबे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– कोंवसा–आश्रय, आधार, कुढावया–रक्षण करण्यासाठी, विसंबे–विसरत.

अर्थ :– आता श्रीहरीची कृपा झाल्यावर आमच्यापुढे कळिकाळास कसले बळ चढणार आहे ? १ या चक्रपाणीचा आधार आम्ही घेतला असल्याने आमची सत्ता त्रिभुवनात झालेली आहे २ या श्रीहरीने आम्हा लडिवाळ लेकरांचे सर्व ओझे शिरावर घेतले असून तो रक्षण करण्यासाठी सदैव उभा आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, असा हा देव आम्हास एक दिवसभर अथवा क्षणभरही विसरत नाही ४

२६३० आम्हां आवडे नाम घेतां । तो ही[2] पिता संतोषे ॥ १ ॥
उभयतां एकचित्त । तरी प्रीत वाढली ॥ २ ॥
आम्ही शोभों निकटवासें । अनारिसें न दिसे ॥ ३ ॥
तुका म्हणे पांडुरंगे । अवघीं अंगें निवालीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :— अनारिसे–वेगळे.

अर्थ :– या श्रीहरीचे नाव घेणे आम्हास फार आवडते आणि त्यामुळे हा आमचा पिता, परमात्माही संतुष्ट होतो १ त्याचे व आमचे चित्त एकच आहे म्हणून आम्हा उभयतांत प्रीतीची वाढ झालेली आहे. २ त्याच्याशी आमचा निकटचा संबंध असल्यामुळे आम्ही शोभून दिसतो त्याच्याहून आम्ही कुणी निराळे आहोत असे नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, पांडुरंगा, तुझ्या प्राप्तीमुळे माझी सर्व अंगे शांत झाली आहेत, तृप्त झाली आहेत. ४

२६३१ देह तंव असे भोगाचे अधीन । याचें सुख क्षीण क्षणभंगुर ॥ १ ॥
अविनाश जोडी देवापायीं भाव । कल्याणाचा ठाव सकळही ॥ २ ॥
क्षणभंगुर हा येयील पसारा । आलिया आकारा अवघें नासे ॥ ३ ॥
तुका म्हणे येथें सकळ विश्रांति । आठवावा चित्तीं नारायण ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– जोडी–प्राप्ती, लाभ.

अर्थ .– आमचा हा देह प्रारब्धकर्माच्या स्वाधीन असल्यामुळे त्याच्या संबंधीचे सुख क्षीण व क्षणभंगुर आहे.१ या देवाच्या पायांशी भाव ठेवणे हा एक कधी नष्ट न होणारा असा लाभ आहे. याच त्याच्यापासून सर्व कल्याणकारक

---

१ कुढावया, २ हा.

गोष्टी प्राप्त होतात. २ याच्याखेरीज येथील बाकीचा सर्व पसारा क्षणभंगुर असून जे जे आकारास आले आहे ते ते नाशवंत आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, चित्तामध्ये या नारायणाचे स्मरण करणे हेच मोठे विश्रांतीचे स्थान आहे ४

२६३२ आतां आवश्यक करणें समाधान । पाहिलें निर्वाण न पाहिजे ॥ १ ॥
केलें तरी आतां सुशोभ्य करावें । दिसतें बरवें संतांमधीं ॥ २ ॥
नाहीं भक्तिराजीं ठेविला उद्धार[1] । नामाचा आकार त्यांचियानें ॥ ३ ॥
तुका म्हणे माझ्या वडिलाचें ठेवणें । गोप्य नारायणें न करावें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– निर्वाण–अंत, बरवें–चांगले, गोप्य–गुप्त, दडवून.

अर्थ :– देवा, आता तुम्ही माझे समाधान जरूर केले पाहिजे तुम्ही आता माझा अंत उगाच पाहू नये. १ आता जे संतामध्ये बरे दिसेल असे व शोभून राहील असे तुम्ही मजविषयी करावे. २ यापूर्वीच्या भक्तश्रेष्ठांनी तुमची उधारी काही ठेवलेली नाही. त्यांच्याच नामस्मरणामुळे तुम्ही निराकाराचे साकार व निर्गुणाचे सगुण झालात. ३ तुकाराम महाराज म्हणतात, माझ्या वाडवडिलांचा ठेवा तुमच्या जवळ आहे तो नारायणानी दडवून ठेवू नये. ४

२६३३ काया वाचा मनें श्रीमुखाची वास । आणीक उदास विचारासी ॥ १ ॥
काय आतां मोक्ष करावा जो देवा । तुमचिया गोवा दर्शनासी ॥ २ ॥
केलिया नेमासी उभें ठाडें व्हावें । नेमलें तें भावें पालटेना ॥ ३ ॥
तुका म्हणे जों जों कराल उशीर । तों तों मज फार रडवील ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– वास–वाट, गोवा–अडथळा, अंतर, ठाडें–उभे.

अर्थ :– मी कायावाचामनेंकरून या श्रीहरीच्याच मुखाची वाट पाहात आहे यावाचून इतर विषयांत मी उदासीन आहे १ देवा, आता तुमचा मोक्ष घेऊन मला काय करायचेय ? त्याच्या प्राप्तीने तुमच्या दर्शनास मात्र अंतर पडत रहाते. २ मी जो नियम केला आहे त्याप्रमाणे आपण माझ्या पुढे नीट उभे राहावे माझ्या नियमाच्या भावनेत कधीच बदल होणार नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तुम्ही जो जो मला दर्शन देण्यासाठी उशीर कराल तो तो त्यामुळे मला जास्त रडे येईल. तो उशीर मला रडवील ४

२६३४ पुढीलांचे सोयी माझ्या मना चाली । मताची आणिली नाहीं बुद्धी ॥ १ ॥
केलासि तो उभा आजवरी संतीं । धरविले हातीं कट देवा ॥ २ ॥
आहे तेंची मागों नाहीं खोटा चाळा । नये येऊं बळा लेकरांशीं ॥ ३ ॥
तुका म्हणे माझा साक्षीचा व्यवहार । कृपण जो थोर परी तुम्ही ॥ ४ ॥

२६३५ बहुत करुनि चाळवाचाळवी । किती तुह्मी गोवी करीतसा ॥ १ ॥
लागटपणे मी आलो येथवरी । चाड तें दुसरी न धरुनि ॥ २ ॥
दुजियाचा तव तुह्मांसी कांटाळा । राहासी निराळा एकाएकीं ॥ ३ ॥
तुका म्हणे आता यावरी गोविंदा । मजशीं विनोदा येऊं नये ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – गोवी–गुंता, चाड–इच्छा

अर्थ – देवा, आजपर्यन्त तुम्ही कितीतरी भवताना चाळवून, फसवून गोत्यात टाकले आहे १ मी दुसरी कुठलीच इच्छा न करता तुमच्या जवळ लगट करीत आहे २ देवा, तुम्हास दुजेपणाचा कंटाळा आला असल्यानच तुम्ही सर्व उपाधी सोडून वेगळे व एकटे राहाता ३ तुकाराम महाराज म्हणतात गोविंदा, आता यानतर माझ्याशी विनोदी व्यवहार तुम्ही करू नये ४

२६३६ तीर्थ जळ देखे पाषाण प्रतिमा । संत ते अधमा माणसाऐसे ॥ १ ॥
वाजेच्या मैथुनापरी गेले वाया । वांडेल्याचे जाया जाले पीक ॥ २ ॥
अभाविक सदा सुतकी चांडाळ । सदा तळमळ चुकेचि ना ॥ ३ ॥
तुका म्हणे वरदळी ज्याची दृष्टी । देहबुद्धि कष्टी सदा दुःखी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – वांडेल्याचे–कणसे न आलेले वरदळी–वरवरची, वाहयात्कारी

अर्थ – जो तीर्थाच्या पाण्यास सामान्य जल मानतो देवाच्या प्रतिमेस पाषाण मानतो आणि संत अधम माणसाना मानतो १ त्याचे हे कृत्य वाझेच्या मैथुनाप्रमाणे किंवा कणसे न आलेल्या पिकाप्रमा[illegible] जाणारे असते २ जो ईश्वराविषयी भावना ठेवणारा नाही तो नेहमीच सुतकी व चांडाळच समजावा त्याच्या हृदयातील तळमळ कधीच चुकत नाही तो सतत दुःखीच राहातो ३ तुकाराम महाराज म्हणतात ज्याची दृष्टी वरवरची आहे ज्याची देहबुद्धी कायमची आहे तो नेहमीच दुःखी व कष्टी असायचा ४

२६३७ नव्हे मतोळयाचा वाण । नीच नवा नारायण ॥ १ ॥
सुख उपजे श्रवणे । खरें टाकसाळी नाणें ॥ २ ॥
लाभ हातोहातीं । अधिक पुढतोपुढती ॥ ३ ॥
तुका म्हणे नेणों किती । पुरोनि उरले पुढती ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – मतोळयाचा–घाटाळयाचा, नुकसानीचा वाण–नमुन्याचा माल, नीच–नित्य

अर्थ – नारायणा, हा माल काही घाटाळ्याचा अथवा नुकसानीचा नाही हा तर नित्य नवा असा आहे १ याच्या नामाचे श्रवण केले तर सुखच होईल असे हे टकसाळीतील खरे नाणे आहे २ त्याचा लाभ हातोहात आणि पुनः पुनः त्वरित होत असतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, श्रीहरीच्या नामाचे धन कितीकांना पुरून पुढल्या लोकासाठी उरले आहे हे काही समजत नाही ४

२६३८ घातला[1] दुकान । देतो आलियासी दान ॥ १ ॥
संत उदार उदार । भरले अनंत भांडार ॥ २ ॥
मागत्याची पुरे । धणी आणिकांसी उरे ॥ ३ ॥
तुका म्हणे पोतें । देवें भरिले नव्हे रितें ॥ ४ ॥

१ उघडला २ पोतडें

अर्थ :– ज्या विकारांच्या भोवऱ्यात मी सापडलो होतो ते मी स्वच्छ करून झाडून टाकले आहेत. १ आता एकट्या मनाशीच विचार करू दुसरे कुठलेही ओझे आता उरलेले नाही. २ प्रसादाच्या सेवनामुळे मला उच्छिष्टाची प्राप्ती झालेली आहे. हा सर्व प्रकार योग्य वेळी अवचितपणे घडून आलेला आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, भक्तिमार्गाचे मर्म आता आमच्या हाती सापडले आहे यामुळे मनातील चिंता व दुःख याचा नाश झाला आहे. ४

२६४२ आवडीभोजन प्रकार परवडी । भिन्नभिन्न गोडी एका रसा ॥ १ ॥
भोगिल्या पंगती लाधलो प्रसाद । तिहीं नाहीं भेद राखियेला ॥ २ ॥
पाकसिद्धि स्वहस्तकें विनियोग । आवडीचे भाग सिद्ध केले ॥ ३ ॥
तुका म्हणे आला उच्छिष्ट प्रसाद । तेणें हा आनंद माझ्या जीवा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – परवडी–निरनिराळे प्रकार.

अर्थ :– साधुसंतांच्या पंगतीत बसून श्रीहरीच्या गुणवर्णनरूपी भोजनाचे नाना प्रकार मी करीत आहे. परंतु सर्वांना भिन्न भिन्न रस असले तरी प्रभुप्रेमाची गोडी मात्र एकच आहे १ हरिभक्तांच्या पंगतीत लाभ घेणाऱ्या संताकडून मला हा प्रसाद मिळालेला आहे. त्यांनी कधीच याविषयी भेद केलेला नाही २ हरिभक्तांच्या स्वयंपाकाची तयारी स्वतःच्या हातांनी करून मोठ्या प्रीतीने मग त्याचे विभाग केले ३ तुकाराम महाराज म्हणतात, मला त्यामधील उच्छिष्टाचा प्रसाद मिळाल्यामुळे माझ्या जीवास फार मोठा आनंद झाला आहे. ४

२६४३ समर्थाचा ठाव संचलाचि असे । दुर्बळाची आस पुढें करी ॥ १ ॥
पावलें घेईन पदरीं हें[1] दान । एकांतीं भोजन करूं जाऊं ॥ २ ॥
न लगे पाहावी उचिताची वेळ । अयाचित काळ साधला तो ॥ ३ ॥
तुका म्हणे पोट धालिया उपरी । गौरवा उत्तरीं पूजूं देवा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– संचलाचि–समृद्ध झालेला, साचलेला.

अर्थ :– समर्थ जे आहेत त्यांच्या ठिकाणी समृद्धीचे ऐश्वर्य नेहमीच भरलेले असते आणि दुर्बळ माणसाची आशा आपणांस काही मिळावे म्हणून पुढे पुढे करीत असते १ समर्थाकडून जी काही दानाची भिक्षा मिळेल ती मी माझ्या पदरी घेईन आणि एकान्तात जाऊन तिचे सेवन करीन २ ते प्राप्त होण्यासाठी योग्य अशी वेळ कधी पाहावी लागत नाही कसलीही याचना केल्याशिवाय अनुकूल असा काळ प्राप्त होत असतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, साधुसंतांनी भरपूर दान दिल्यावर त्याने पोट भरून तृप्तता येईल आणि मग या देवाची गौरवपूर्ण शब्दांत पूजा करू. ४

२६४४ आपुल्यांचा करीन मोळा । माझ्या कुळाचारांचा ॥ १ ॥
अवघियांचे वंदिन पाय । ठायाठाय न देखें ॥ २ ॥
नेदीं तुटों समाधान । यांचो जन सकळ ॥ ३ ॥
तुका म्हणे झाडा होय । तों हे सोय न संडीं[2] ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – मोळा–रिवाज, रीती, ठायाठाय–योग्य वा अयोग्य.

अर्थ :– मी माझ्या कुळातील रीतिरिवाजांप्रमाणे आपल्यासारख्या साधुसंतांचा सत्कार करीन. १ मी सर्वांच्या पायांस वंदन करीन योग्यअयोग्य असे यात काही येऊ देणार नाही २ मी माझ्या हृदयाचे समाधान कधी

[1] ते, [2] सोडी

सांगू देणार नाही आणि इतर लोकांचाही यधी खोळंबा होऊ देणार नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी माझ्या सर्व कर्मांचा हिशेब देईन. तोपर्यंत ही रीत सुटणार नाही. ४

२६४५ जन्ममरणांची विसरलों चिंता । तूं माझा अनंता मायबाप ॥ १ ॥
होतील ते डोळां पाहेन प्रकार । भय आणि भार निरसली ॥ २ ॥
लिगाडाचें मूळ होतीं पंच भूतें । त्यांचें यां पुरतें विभागिलें ॥ ३ ॥
तुका म्हणे जाला प्रपंच पारिखा । जिवासी तूं सखा पांडुरंगा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– लिगाडाचें–लचाडाचे

अर्थ :– अनंता, तू माझा मायबाप आहेस. म्हणूनच मी माझ्या जन्ममरणांची चिंता विसरून गेलो आहे. १ जे काही प्रकार होतील ते मी माझ्या डोळ्यांनी पाहीन मला वाटणारे भय आणि प्रपंचाचे ओझे नाहीसे झाले आहे २ या सर्व लचांडाचे मूळ म्हणजे हा पंचमहाभूतात्मक देह होय. मी त्या भूतांची त्या त्या ठिकाणी वाटणी करून टाकली. ३ तुकाराम महाराज म्हणतात, पांडुरंगा, मला हा आता लौकिक प्रपंच परक्यासारखा झाला असून जिवाचा सखा असा तूच एक उरला आहेस. ४

२६४६ उदार तूं हरी ऐसी कीर्ति चराचरीं । अनंत हे थोरी गर्जतील पवाडे ॥ १ ॥
तुझे पायीं माझा भाव पुसी जन्ममरणां ठाव । देवाचा तूं देव स्वामी सकळा ब्रह्मांडा ॥२॥
मागणें तें तुज मागों जीवभाव तुज सांगों । लागों तरी लागों पायां तुमच्या दातारा ॥ ३ ॥
दिसों देसी कींविलवाणे । तरी तुजचि हे उणें । तुका म्हणे जिणें माझें तुज अधीन ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– ठाव–स्थान, ठिकाण.

अर्थ :– श्रीहरी, तू मोठा उदार आहेस अशी तुझी कीर्ती साऱ्या चराचर जगात पसरलेली आहे. तुझी थोरवी मोठी असून तिच्या अनंततेचे पवाडे चराचरात गर्जत आहेत १ तुझ्या पायी माझा भाव मी अर्पण केला असून तू माझे जन्ममरणाचे स्थानच पुसून टाकले आहेस. कारण तू सर्व देवांचा देव असून सर्व ब्रह्मांडांचा धनी आहेस. २ जे काय मागायचे आहे ते आम्ही तुझ्याजवळ मागू व जीवीचे हितगुज तुझ्याजवळच सांगू आणि दातारा, पाया पडायचे झाले तरी तुझ्याच पाया पडू. ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तू जर आम्हास दीन आणि केविलवाणे ठेवशील तर त्याचा कमीपणा तुलाच येणार आहे. देवा, माझे सर्व जीवन तुझ्याच स्वाधीन आहे. ४

२६४७ पाहा किती आले शरण समानीच केले । नाहीं विचारिले गुण दोष कोणांचे ॥ १ ॥
मज सेवटींसा द्यावा ठाव तयांचिये देवा । नाहीं करीत हेवा कांहीं थोरपणाचा ॥ २ ॥
नाहीं पाहिला आचार कुळगोत्रांचा विचार । फेडूं आला भार मग न म्हणे दगड ॥ ३ ॥
तुका म्हणे सर्वजाणा तुझ्या आल्यावरि मना । केला तो उगाणा घडल्या महादोषांचा ॥४॥

शब्दार्थ व टीपा– ठाव–आश्रय, उगाणा–गणना, झाडा, हिशेब

अर्थ :– देवा, पाहा, आजपर्यंत तुला जेवढे लोक मनोभावे शरण आले त्यांच्या ठिकाणी असणाऱ्या गुणदोषांचा काहीसुद्धा विचार न करतां तू त्यांना आपल्या समान केलेस. १ त्यांना दिलेल्या गतींपेक्षा शेवटची गती दिली तरी चालेल. देवा, मी काही थोरपणाची पदवी मिळावी अशी कधी इच्छा करीत नाही २ या देवाने कुणाचा आचार पाहिला नाही, कुणाचे कुळगोत्र पाहिले नाही; एखाद्याच्या संसाराचे ओझे दूर करताना तो दगड आहे की

१ वर्णितातो.

चांगला मनुष्य आहे असा विचार हा देव कधी करीत नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, सर्व जाणणाऱ्या देवा, तुझ्या एकदा मनात आल्यावर पापी लोकांच्याकडून जे महादोष घडतात त्यांचा पूर्ण हिशेब तू करून टाकतोस ४

२६४८ आतां चुकले बंधन गेले विसरोनि दान । आपुले ते धाण सावकाश विकावें ॥ १ ॥
लाभ जोडला अनंत घरीं सांपडलें वित्त । हातोहातीं थीत उरो तळ नल्हाचि ॥ २ ॥
होतें गोंविलें विसारें भाप जालें एकसरें । होतें होरें वारें तोंचि लाहो साधिला ॥ ३ ॥
कराया जतन तुका म्हणे निजधन । केला नारायण साह्य नेदी विसंबों ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – धाण-माल, थीत–व्यर्थ वाया, नल्हाची–राहात नाही, होरें वारें–वाटाघाट, लाहो–लाभ

अर्थ :– आता लौकिकबंधनापासून सुटका झाली आहे प्रभूने हे दान जणु चुकून मला दिलेले दिसते पण आता हा माल मला सावकाश विकता येईल १ मला अनंत लाभांची प्राप्ती झाली असून हे धन घरच्या घरी सापडले आहे आता हा माल हातोहात खपत असून तळाला व्यर्थ जाण्यास काहीच शिल्लक राहिलेला नाही २ मी तो माल विसार देऊन गुंतविला होता म्हणून त्याचे एकदम माप झाले ज्या मालाची मी वाटाघाट करीत होतो त्याच मालाचा मला लाभ झालेला आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात या निजधनाची आता नीट जपणूक केली पाहिजे. यासाठी आम्ही नारायणास साह्यभूत करून घेतले आहे तो आता कधी आम्हांस विसंबणार नाही ४

२६४९ तुझ्या रूपें माझी काया भरो द्यावी पंढरीराया । दर्पणींची छाया एका रूपें भिन्नत्व ॥ १ ॥
सुख पडिलें साटवण सत्ता वेंचे शनें शनें । अडचणींचे कोन चारी मार्ग उगवले ॥ २ ॥
वसो[1] डोळ्याची बाहुली कवळें भिन्न छाया आली । कृष्णांजन चाली नव्हे परती माघारी ॥३॥
जीव ठसावला शिवें मना आले तेथें जावें । फाटा पडिला नावें तुका म्हणे खंडलें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – काया–शरीर शनें शनें–हळूहळू, कवळें–काविळीने

अर्थ – पंढरीराया, तुझ्या स्वरूपाने माझे शरीर पूर्णपणे भरून जाऊ दे आरशात पडणारी छाया भिन्न दिसत असली तरी ती मूळ वस्तूशी एकरूपच असते १ सुखाची साठवण चांगलीच झाली आहे त्याचा खर्च हळूहळू सत्तेने होत आहे यामुळे आर्त, जिज्ञासू, अर्थार्थी व ज्ञानी असे चार अडचणींचे कोपरे दूर झाले आहेत २ डोळ्यांत बाहुली असूनही काविळीचा दोष असेल तर छाया भिन्नत्वाने भासते कृष्णांजनाच्या योगानेही मग दृष्टीची चाल माघारी फिरत नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, माझ्या जीवात शिवाचा ठसा उमटला आहे आता मनास जिकडे जावे वाटेल तिकडे जावे आता त्याला भटकण्यासाठी फाटा फुटला हे म्हणणे संपले ४

२६५० सोसें सोसें मारूं हाका । होईल चुका म्हणऊनि ॥ १ ॥
मागें पुढें क्षणभरी । नव्हे दुरी अंतर ॥ २ ॥
नाम मुखीं बैसला चाळा । वेळोवेळा पडताळीं ॥ ३ ॥
तुका म्हणे सुखी केले । या विठ्ठलें बहुतांसी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – पडताळी–अनुभव यतो

अर्थ – देवा, तुमची व आमची चुकामूक होईल म्हणून मी सोसासोसाने हाका मारीत आहे १ मागपुढे अथवा क्षणभरही तुम्ही दूर राहू नये अथवा अंतर पडू नये २ माझ्या वाणीला एकसारखा दयाचाच छंद लागला आहे वेळोवेळी त्याचाच अनुभव येत आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, माझ्याप्रमाणेच या विठ्ठलाने अनेकांना सुखी केले आहे ४

---

१ गेलीं, २ वसे

२६५१ धरूनियां चाली हांवा । येइन गांवां धांवत ॥ १ ॥
पाठविसी मूळ तरी । लवकरी विठ्ठले ॥ २ ॥
नाचेन त्या प्रेमसुखें । कीर्ती मुखें गाईन ॥ ३ ॥
तुका म्हणे संतमेळीं । पायधुळी वंदीन ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– हांवा–हाव, इच्छा

अर्थ :– देवा, मनामध्ये तुझी हाव धरून मी तुझ्या गावास धावतच येईन. १ विठ्ठले, पण यासाठी तू लौकर मला निमंत्रण पाठीव ना. २ मी त्या प्रेमसुखाने नाचेन व तुझी कीर्ती मुखाने गाईन ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी या संतमेळ्यात राहून त्यांच्या पायावरील धूळीस वंदन करीन ४

२६५२ मायबापांचिये भेटी । अवघ्या तुटी संकोचा[1] ॥ १ ॥
भोगिलें तें आहे सुख । खातां मुख मोकळें ॥ २ ॥
उत्तम तें बाळासाटीं । लावी ओंठी माउली ॥ ३ ॥
तुका म्हणे जाली धणी । आनंद मनीं न समाये ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – धणी–तृप्ती, न समाये–मावत नाही

अर्थ :– आईबापांची भेट होताच बालकाचा सर्व संकोच दूर होतो १ असे जे भोगले आहे ते सुखच आहे आणि आणखी भोगण्यासाठी मुख मोकळेच आहे. २ जे उत्तम आहे ते आई आपल्या मुलासाठी ठेवून त्याच्या मुखात घालते ३ तुकाराम महाराज म्हणतात, मुलाच्या मनाची एकदा तृप्ती झाली की मग त्याच्या आईच्या मनात आनंद मावेनासा होतो ४

२६५३ उदासीनाचा देह ब्रह्मरूप । नाहीं पुण्य पाप लागत त्या ॥ १ ॥
अनुताप अंगीं अग्निचिया ज्वाळा । नाहीं मृगजळा विझों येत ॥ २ ॥
दोष ऐसा नांवें देहाचा आदर । विटलें[3] अंतर अहंभावें ॥ ३ ॥
तुका म्हणे जाय नासोनियां खंती । तंवचि हे चित्तीं बद्धता ते ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– अंतर–मन, अंतःकरण, खंती–चिंता, तळमळ.

अर्थ :– लौकिकाविषयी व देहाविषयी जे उदासीन झाले आहेत त्यांचा देह ब्रह्मरूप झाला आहे असे समजावे त्यांना कसलेही पापपुण्य लागत नाही. १ त्यांच्या चित्तास अनुतापाच्या आगीच्या ज्या ज्वाळा लागलेल्या असतात त्या मृगळजळाप्रमाणे असणाऱ्या प्रपंचविचाराने विझत नाहीत. २ देहाचा आदर करीत राहाणे यालाच दोष असे नाव आहे या प्रकारच्या अहंभावानें अंतःकरण विटाळून जाते ३ तुकाराम महाराज म्हणतात, जोपर्यंत चित्ताची तळमळ नाहीशी होत नाही तोपर्यंत ते बद्धतेच्या अवस्थेत आहे असे समजावे. ४

२६५४ बंधनाचा तोडूं फांसा । देऊं आशा टाकोनि ॥ १ ॥
नाहीं तेंच घेतां शिरीं । होइल दुरी निजपंथ ॥ २ ॥
नाथिलेचि माझें तुझें । कोण वोझें वागवी ॥ ३ ॥
तुका म्हणे अंतराय । देवीं काय जिणें तें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– फांसा–पाश, नाथिलेंचि–नसलेले, खोटेच

१ चाले, २ संकोच्या, ३ विटाळे.

अर्थ :— सर्व प्रकारच्या वधनाचा पाश नी आशा तीच टाकून देऊ १ जे आपले नाही ते व्यर्थ डोक्यावर घेतल्याने स्वस्वरूपाच्या प्राप्तीचा आपला मार्ग दुरावतो २ तुझेमाझेपणाचे खोटे ओझे उगाच शिरावर कोण वागवील ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, जेथे ईश्वराविषयी दूरत्व निर्माण होते ते जगणे काय कामाचे ? काय त्याचा उपयोग ४

२६५५ तेंच किती वारंवार । बोलो फार बोलिलें ॥ १ ॥
आतां माझें दंडवत । तुमच्या संत चरणासी ॥ २ ॥
आवडी ते नीच नवी । जाली जीवीं वसती ॥ ३ ॥
तुका म्हणे बरवें जालें । घरा आले बदरीचे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– नीच–नित्य, बरवें–चांगले

अर्थ – मी पुष्कळ वेळ जे बोललो तेच आता पुन पुन किती वेळ बोलू ? १ आता संतचरणांवर माझे दंडवत आहेत २ माझ्या जीवात तीच एक नित्य नवी आवड निर्माण झाली आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, दूर द्वारकेच्या बदरीशी असलेले हे श्रीहरीचे रूप माझ्या चित्तात स्थिरावले हे फार चांगले झाले ४

२६५६ उपासा सेवटीं अन्नासवे भेटी । तैसी माझी मिठी पडो पायीं ॥ १ ॥
पुरवीं वासना साच सर्वजाणा । आम्हां नारायणा अंकिताची ॥ २ ॥
बहुदिसां पुत्रामातेमध्यें भेटी । तैसा दाटो पोटीं प्रीतिउमड ॥ ३ ॥
तुका म्हणे धन कृपणा सोइरें । यापरि दुसरें नहो आता ॥ ४ ॥

सेवावें तें वरी । दावी उमटूनि ढेंकरीं ॥ ३ ॥
तुका म्हणे सुरा । दुधा म्हणतां केवीं वरा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– वारा–सोडा, सुरा–दारू

अर्थ – सर्व प्रकारची पूजा व स्तुती करण्यासाठी जातीवीच म्हणजे अधिकाराची माणसे हवीत. १ यासाठी लोकांच्या सहवासाचा त्याग करा आणि संत व नारायण यांची पूजा करा २ चांगले ढेकर येईपर्यंत तृप्ततेने जेवावे हे चांगले. ३ तुकाराम महाराज म्हणतात, दुधाला दारू म्हटल्यास ते काय चांगले दिसेल ? ४

२६५९ धीर नव्हे मनें । काय तयापाशीं उणें ॥ १ ॥
भार घातलियावरी । दासां नुपेक्षील हरी ॥ २ ॥
याऐसी आटी । धावी द्रव्याचिये साटी ॥ ३ ॥
तुका म्हणे पोटें । देवा बहु केलें खोटें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– नुपेक्षील–उपेक्षा करणार नाही, आटी–प्रयत्न, खटपट.

अर्थ :– आमच्या मनास धीर धरवत नाही. नाही तर देवापाशी काय कमी आहे ? १ एकदा त्याच्यावर भार घातल्यावर तो श्रीहरी आपल्या दासाची उपेक्षा कधीही करणार नाही २ द्रव्य मिळविण्यासाठी जशी खटपट आपण करतो तशी ती देवाच्या प्राप्तीसाठी करावी. ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, या पोटाने आम्हांस फार लबाड करून ठेविले आहे. ४

२६६० द्रव्याचिया कोटी । नये गांडीची लंगोटी ॥ १ ॥
अंतीं बोळवणेसाटीं । पांडुरंग धरा कंठीं ॥ २ ॥
लोभाचीं[1] लोभिके । यांचें सन्निधान फिके ॥ ३ ॥
तुका म्हणे हितें । जग नव्हो पडो रितें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– रितें–रिकामे, व्यर्थ.

अर्थ :– कोट्यवधी द्रव्य जरी जवळ असले तरी शेवटी ढुंगणाची लंगोटीसुद्धा बरोबर येत नाही. १ अंतसमयास निरोप देण्यासाठी आपल्याबरोबर पांडुरंग असावा म्हणून त्याचे नाम मुखात धारण करा. २ लोभाने लोभावलेल्यांची संगत नेहमीच फिकी पडणारी असते ३ तुकाराम महाराज म्हणतात, लौकिक जग हे आपले हित करणारे नसते. ते व्यर्थच आहे असे समजावे. ४

२६६१ कोणापाशीं आतां सांगों मी बोभाट । कधीं खटखट सरेल हे ॥ १ ॥
कोणां आराणूक होईल कोणे काळीं । आपुलालीं जाळीं उगवूनि ॥ २ ॥
माझा येणे दुःखें फुटतसे प्राण । न कळतां जन[3] सुखी असे ॥ ३ ॥
भोगा आधीं मनें मानिलासे त्रास । पाहें लपायास ठाव कोठें ॥ ४ ॥
तुका म्हणे देतों देवाचे गाऱ्हाणें । माझें ऋण येणें सोसियेलें ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– बोभाट–बोभाटा, तक्रार, आराणूक–विश्रांती, उगवूनि–सोडवून

अर्थ – मी आता ही तक्रार करू तरी कुणापाशी ? प्रपंचाची ही खटपट कधी संपणार आहे ? १ या प्रपंचाच्या जाळ्यातून माझी सोडवणूक कोणत्या काळी होऊन मला चांगली विश्रांती मिळेल ? २ या प्रापंचिक

१ लोभाचे, २ जाग नको पडो रितें, ३ जाण

दुःखानें माझे प्राण फुटायची वेळ आली आहे लोकाना याचे स्वरूप माहीत नसल्याने ते सुखी आहेत ३ नाना प्रकारचे भोग घेण्याआधीच माझे मन त्रासून गेले आहे म्हणून मी लपण्यासाठी कुठे जागा मिळते की काय हे पाहात आहे ४ तुकाराम महाराज म्हणतात, मी हे देवाचे गाऱ्हाणे सांगत आहे ते असे की त्यानेच हे ऋण सहन केले आहे ५

२६६२ राहिलों निराळा । पाहों कवतुक डोळां ॥ १ ॥
करूं जगाचा विनोद । डोळा पाहोनिया छंद ॥ २ ॥
भुललिया संसारें । आले डोळयासी मांजिरें ॥ ३ ॥
तुका म्हणे माया । कोणी नुचली सर्वथा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – मांजिरें–माज, धुंदी

अर्थ – मी या प्रपंचापासून निराळा राहून सर्व प्रकारचे कौतुक डोळ्यांनी पाहात आहे १ सर्वांचे प्रपंचाविषयीचे छंद पाहून आम्ही त्याचा विनोद करू २ संसारभ्रमात भुलून जाणाऱ्या लोकांच्या डोळ्यांत एक प्रकारची धुंदी चढलेली असते ३ तुकाराम महाराज म्हणतात, संसारसमुद्रात बुडालेले जीव कधी डोके वर काढीतच नाहीत ४

२६६३ आम्हां एकविधा पुण्य सर्वकाळ । चरणसकळ[1] स्वामीचे ते ॥ १ ॥
चित्ताचे संकल्प राहिले चळण । आज्ञा ते प्रमाण करूनी असों ॥ २ ॥
दुजियापासून परतलें मन । केलें द्यावें[2] दान होईल तें ॥ ३ ॥
तुका म्हणे आतां[3] पुरला नवस । एकाविण ओस[4] सकळ ही ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – चळण–चलनवलन हालचाल

अर्थ – आम्ही स्वामीशी एकनिष्ठ आहोत म्हणूनच स्वामीचे चरणकमळ धरण्यात आमचे सर्वकाळ पुण्य आहे १ त्याच्याशिवाय आमच्या चित्ताचे इतर संकल्प व चलनवलनादी क्रिया राहूनच गेल्या आहेत आम्ही फक्त स्वामींची आज्ञा प्रमाण मानून वागत आहोत २ स्वामींशिवाय दुसऱ्यापासून आमचे मन परत फिरले आता स्वामी आम्हांस जे दान देईल ते आम्ही घेत असतो ३ तुकाराम महाराज म्हणतात आता आमचा नवस पूर्ण झाला आहे कारण या एका स्वामीशिवाय आम्हांस सर्व जग ओस वाटते ४

२६६५ चंदन,तो चंदनपणें । सहजगुणें[1] संपन्न ॥ १ ॥
वेधलिया धन्य जाती । भाग्यें होती सन्मुख ॥ २ ॥
परिसा अंगीं परिसपण । बाणोनि तें राहिलें ॥ ३ ॥
तुका म्हणे कैंची खंती । सुजाती ते ठाकणी[2] ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– खंती–चिंता, ठाकणी–स्थान.

अर्थ :– चंदनाचा वृक्ष आपल्या सुगंधाच्या सहजगुणानेच संपन्न असा आहे १ ज्या वृक्षांच्या जाती त्याच्या भोवती राहून वेधल्या जातात, सुगंधित होतात त्या धन्य होत. २ परिसाच्या अंगी लोखंडाचे सुवर्ण करण्याचा धर्म बाणून राहिलेला आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा प्रकारे ज्या जातींना चांगल्या प्रकारचे स्थान मिळालेले आहे त्यांना कसली चिंता आहे ? ४

२६६६ लय लक्षीं मन न राहे निश्चळ । मुख्य तेथें बळ आसनाचें ॥ १ ॥
हें तों असाध्य जी सर्वत्र या जना । भलें नारायणां आळवितां ॥ २ ॥
कामनेचा त्याग वैराग्य या नांव । कुटुंब ते सर्वविषयजात ॥ ३ ॥
कर्म उसंतावें चालत पाउलीं । होय जों राहिली देहबुद्धि ॥ ४ ॥
भक्ती तें नमावें जीवजंतुभूत । शांतवूनि ऊत कामक्रोध ॥ ५ ॥
तुका म्हणे साध्य साधन अवघडें । देतां हें सांकडें देह बळी ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा :– लय–एकतानता, विकारांचा वा कल्पनांचा अभाव, लक्षीं–स्वरूपाच्या ठिकाणी, आत्मस्वरूपावर, उसंतावें–शेवटास न्यावे, पूर्ण करावे, पार पाडावे, ऊत–कढ, सांकडें–संकट.

अर्थ :– ज्या ठिकाणी स्थिर आसन हेच मुख्य बळ आहे अशा योगादिकांच्या प्रक्रियेत एकतानता स्वीकारून स्वरूपी चित्त लावावे तर ते स्थिरच होत नाही १ या सर्वसामान्य लोकांना ही गोष्ट तर असाध्य वाटते. म्हणून नारायणास प्रेमभावाने आळवावे हे बरे. २ सर्व विषयांचा व कुटुंबाचा त्याग विविध कामनांसहित करणे हेच खरे वैराग्य होय. ३ चालत्या पावली कर्मे पार पाडावीत तर त्यास देहबुद्धी नाहीशी व्हावयास हवी. ४ मनातील कामक्रोधांचे कढ शांत करून लहानसान जीवजंतूंतीलही परमेश्वरतत्त्वास वंदन करणे हीच खरी भक्ती होय. ५ तुकाराम महाराज म्हणतात, इतर विविध प्रकारची साधने व साध्ये या गोष्टी अवघडच आहेत. देहाचा बळी देण्याचे संकट त्या ठिकाणी निर्माण झालेले असते. ६

विवरण :— या एका महत्त्वाच्या अभंगात तुकारामबुवांनी भक्तिमार्गाची सुलभता पटवून देवून वैराग्यमूलक नामस्मरणाच्या साधनाची श्रेष्ठता पटवून दिलेली आहे योगादी प्रक्रीयांत देहाला कष्ट फार अपयश येण्याची भीती मोठीच. आधीच चंचल मनास एका स्थानी स्थिर करणे भारी अवघड. बळकट आसन घालून मनाचा लय साधणें सर्वांना कसे साधणार ? म्हणून इतर जनांनी ' भलें नारायणा आळवितां ' असेच मानावे. सर्व विषयांचा व कौटुंबिक मोहाचा त्याग करून वैराग्य धारण करावे आणि सर्व जीवजंतूतील ईश्वरास ओळखून त्याला नमावे. हाच भक्तिमार्ग अतिशय सोपा, सुलभ व बिनसंकटाचा आहे. अव्यक्ताची उपासना योगमार्गाच्या साह्याने करणे हे भारी कष्टदायक असल्याचे गीतेचे म्हणणे आहे देह धारण करणाऱ्या माणसास अव्यक्ताच्या उपासनेचा मार्ग मोठ्या कष्टाने प्राप्त होतो. ' अव्यक्ता हि गतिर्दुःखं देहवद्भिरवाप्यते ' असा गीतेचा निर्वाळा आहे.

सर्व साधुसंतांनी याचाच आधार घेऊन भक्तिपथाची सुलभता विशद केलेली आहे. एका भक्तीशिवाय या योगमार्गाचे स्वरूप कसे होईल ? ज्ञानेश्वरांनी म्हटले आहे, ' किंबहुना पांडवा । हा अग्निप्रवेश नीच नवा । ऐसें मृत्यूहूनि तिख । पां घोटें पढत विख । डोंगर गिळितां मुख । न फाटे काई ? ॥ म्हणोनि योगाचिया वाटा । जे

१ सहज गुणसंपन्न, २ ठिकाणी.

निमाले ते सुभटा । तया दुःखाचाचि वाटा । भाग आला ॥' असा दुःखदायक व कष्टकारक मार्ग साधुसंतांनी सामान्य लोकांसमोर ठेवलेला नाही. भक्तिमार्गात हा श्रीहरी अतिशय सुलभ व खात्रीचा आहे 'योगी शिणताती साधन कपटीं । तया नोहे भेटी काही केल्या ॥ तो हरी गोकुळीं बाळवेषें खेळे । पुरती सकळ मनोरथ' अशी एकनाथांनी भक्तीची महती वर्णन केली आहे 'योग याग तप व्रतें आचरिता । नाम सोपें गाता सर्व जोडे' असे त्यांनी आणखी एका ठिकाणी म्हटले आहे 'योगयाग, तपव्रत आणि दान । करितां साधन नाना कष्ट । सुलभ सोपा रे नाम विठोबाचे । सरळ साधनांचे मूळबीज' म्हणून चोखाबानी भक्तिमार्गाची सुलभता वर्णन केली आहे. आपला 'अनुभव उघडा', प्रकट केला आहे श्रीभानुदास महाराजांनी एका अभंगात इतर साधने आणि भक्तिपथ

दिली तिळांजुळी कुळनामरूपांसी । शरीर ज्याचें त्यासी समर्पिलें ॥ ५ ॥
तुका म्हणे रक्षा जाली आपींआप[1] । उजळला दीप गुरुकृपा ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा :-लक्षियेला–पाहिला, स्वीकारला, शेणी–गोवऱ्या, घट–मातीचा घडा.

अर्थ – माझ्या शरीराचे सर्व धर्म प्रेताप्रमाणे झालेले असल्याने मी आता स्मशानातील स्थान स्वीकारीत आहे. १ यामुळे कामक्रोधादी विकार व माया याना फार दुःख झाले असून रात्रदिवस ते रडत आहेत यमधर्म तर हायहाय करून फारच शोक करीत आहे. २ माझ्या शरीरास सालूनवरून वैराग्याच्या गोवऱ्या लावल्या असून तो ज्ञानाच्या अग्नीने पेटवून ब्रह्मत्वास गेला आहे ३ देवाच्या भोवती माझ्या देहाचा हा घट फोडून त्याच्या चरणावर अर्पण केला आहे व 'अहं ब्रह्मास्मि' अशा महावाक्याची मी बोंब मारली आहे ४ मी आपल्या नावारूपास व कुळविचारास तिलांजली दिली असून शरीर ज्या पंचमहाभूताचे घडले होते ते त्याचे त्याना अर्पण केले आहे ५ तुकाराम महाराज म्हणतात, माझ्या या शरीराची आपोआप राख झाली असून मी त्या स्थानावर आता गुरुकृपेचा दिवा लावून ठेविला आहे. ६

२६६९ आपुलें मरण पाहिलें म्यां डोळां । तो जाला सोहळा अनुपम्य ॥ १ ॥
आनंदें दाटलीं तिन्ही त्रिभुवनें । सर्वात्मकपणें भोग जाला ॥ २ ॥
एकदेशीं होतो अहंकारें आथिला । त्याच्या त्यागें जाला सुकाळ हा ॥ ३ ॥
फिटलें सुतक जन्ममरणाचें । मी माझ्या संकोचें दुरी जालों ॥ ४ ॥
नारायणें दिला वसतीस ठाव । ठेवूनियां भाव ठेलों पायीं ॥ ५ ॥
तुका म्हणे दिलें उमटूनि जगीं । घेतलें तें अंगीं लावूनियां ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा :– अनुपम्य दुसरी उपमा नसलेला, आथिला–असलेला.

अर्थ :– मी आपल्याच मरणाचा, देहबुद्धीच्या नाशाचा सोहळा माझ्या डोळ्यांनीच पाहिला त्या सोहळ्यास दुसरी कुठली उपमाच नाही १ यामुळे मला झालेला आनंद त्रिभुवनात दाटून आलेला आहे. सर्वात्मकस्थितीचा भोग त्यामुळे मला फार सुखाचा झाला. २ मी आतापर्यंत देहात्मबुद्धीच्या अहंकाराने ग्रस्त असल्यामुळे एकदेशी होतो पण आता त्यांचा त्याग झालेला असल्यामुळे सर्वात्मसुखाचा सुकाळच होऊन गेलेला आहे. ३ मी माझा देह व त्यासंबंधीचे सर्व काही, हा भेदच संपल्यामुळे मी संकोचाने दूर झालो त्यामुळे माझे जन्ममरणाचे सुतक फिटून गेले. ४ नारायणाने आपल्या ठिकाणी वस्ती करण्यासाठी मला स्थान दिले असल्याने मी त्याच्याच पायी भाव धरून राहिलो आहे ५ तुकाराम महाराज म्हणतात, अशा प्रकारचे भाव मी माझ्या अंगी प्रथम बाणवून घेतले व मग सर्व जगामध्ये प्रकट केले. ६

२६७० बोळविला देह आपुलेनि हातें । हुताशिलीं भूतें ब्रह्माग्नीसीं ॥ १ ॥
एकवेळे जालें सकळ कारण । आतां नारायण नारायण ॥ २ ॥
अमृतसंजीवनी निववली खाई । अंगीं तये ठायीं हारपलीं ॥ ३ ॥
एकादशीविध जागरण उपवास । बारावा दिवस भोजनाचा ॥ ४ ॥
अवघीं कर्मे जालीं घटस्फोटापाशीं । संबंध एकेसी उरला नामीं ॥ ५ ॥
तुका म्हणे आतां आनंदीं आनंदु । गोविंदीं गोविंदु विस्तारला ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा :– बोळविला–पोचविला, हुताशिली–अग्नीस अर्पण केली, खाई–चिता

---

१ आपेंआप.

अर्थ – मी आपला देह आपल्याच हातानी स्मशानात नेऊन पोचता केला आहे माझा पचमहाभूतात्मक हा देह मी ब्रह्मबोधाच्या अग्नीस समर्पण करून टाकला आहे. १ यामुळे माझे सर्व काम आता एकदमच झाले; आणि आता फक्त त्या नारायणाचेच चिंतन उरले आहे २ माझ्या देहाची जी चिता पेटली होती ती ज्ञानाच्या अमृतसंजीवनीने मी विझवून टाकली. माझी सर्व अगे मी त्याच ठिकाणी नाहीशी केली ३ आता दहा दिवसातील अनेक जन्माचे सुतक फिटल्याने मी एकादशीस उपवास व जागरण करून बाराव्या दिवशी म्हणजे द्वादशीस भोजन करून पारणे फेडणार आहे ४ जेव्हा मी माझ्या देहाचा हा घट त्या प्रभूच्या पायांशी फोडला तेव्हाच माझी सारी कर्मे संपून गेली आता माझा सबध फक्त त्याच्या नामाशी उरलेला आहे ५ तुकाराम महाराज म्हणतात, आता या गोविंदाने सर्व जगतात विस्तारून, मला सर्वत्र आनदाचाच अनुभव आणून दिलेला आहे ६

२६७१ पिंडदान[1] पिंडें ठेविले करून । तिळीं तिळवण मूळत्रयीं ॥ १ ॥
१ सारिले संकल्प एकाचि वचनें । ब्रह्मीं ब्रह्मार्पण सेवटींच्या ॥ २ ॥
सव्य अपसव्य बुडाले हे कर्म । एका[2] एक वर्म एकोविष्णु ॥ ३ ॥
पित्यापुत्रत्वाचे जाले अवसान । जनीं जनार्दन अभेदेंसी ॥ ४ ॥
आहे तैसी पूजा पावली सकळ । सहज तो काळ साधियेला ॥ ५ ॥
तुका म्हणे केला अवघ्याचा उद्धार । आतां नमस्कार सेवटींचा ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा :– पिंडे–शरीराने, अवसान-शेवट.

अर्थ .– माझ्या देहरूपी पिंडाचेच पिंडदान करून मी मूळ त्रिगुणाच्या तिळाची तिळाजली दिली आहे १ शेवटी मी ' ब्रह्मार्पण ' या एकाच शब्दाचा सकल्प सोडून हे तिलोदक सोडले व त्यायोगे माझे सर्व सकल्प नाहीसे झाले. २ सव्य आणि अपसव्य ही कर्मकटकट आता नाहीशी झाली आहे कारण मला विष्णुमय जगत हे वर्म सापडले आहे. ३ सर्व जगतात जनार्दन भरून राहिलेला आहे असे ज्ञान झाल्यावरून पितापुत्रत्वाच्या नात्याचा सकोचित अभिमान नाहीसा झाला आहे ४ मी ही सर्व पूजा जशी आहे तशी त्याला अर्पण केली., आणि हा काळ मी सहजासहजी सपविला ५ तुकाराम महाराज म्हणतात, मी सर्वांचा उद्धार केला आहे., माझा हा शेवटचा नमस्कार आहे ६

झालेल्या सर्व उपाधी ज्याच्या त्यास समर्पित केलेल्या असतात या सर्व उपाधींची राख गुरुकृपेचा दीप प्रकाशित झाल्यानतर होऊन जाते तुकारामबुवानी आपल्या विदेही अवस्थेचे, मुक्ततेच्या अवस्थेचे, निर्विकार मन स्थितीचे समर्पक वर्णन मृत्यूच्या उदाहरणाने केलेले आहे शरीर प्रेतरूप झाले, स्मशानाचा वास झाला, रात्रदिवस काम-क्रोधाचे रडणे आणि यमधर्माचे हायहाय करणे, वैराग्याच्या शेणी, ज्ञानाचा अग्नी, देहाच्या अभिमानाचा घट, महावाक्याची बोंब, कुळनामाची तिलांजली, देहाभिमानाची झालेली राख व गुरुकृपेचा दीप, असे मोठे सुंदर रूप तुकोबानी रगविले आहे मरण, स्मशान, शोक इत्यादींचे एवढे मोठे समर्पक, सजीव व समर्थ वर्णन इतरत्र दुर्लभ आहे.

१ शरीरातून प्राण निघून गेल्यानतर सुखदु खादी विकार सपावेत यात नवल ते काय ? पण शरीर आहे आणि शरीराचे भाव अथवा सुखदुखादी विकार मात्र नाहीत, ही अवस्था फारच श्रेष्ठ मानावी लागेल मृत्यूसही जिंकणाऱ्या थोर महात्म्याची ही विदेही अवस्था, जिवतपणीच मुक्तीचे भोग भोगण्याची अवस्था फारच श्रेष्ठ मानावी लागते ज्याला दुसरी तुलनाच असू शकत नाही असा हा जिवतपणीचा मुक्तीचा सोहळा आहे. आपल्या स्वत च्या डोळ्यानी स्वत चे 'मरण' पाहण्याचा हा सोहळा अवर्णनीयच म्हणावा लागेल हे 'मरण' मरणालाही मारून अमर झालेले असते. तीन साडेतीन हाताच्या देहात आपण सापडलो आहोत ही भावनाच नष्ट होणे आणि आपण सर्व विश्वात सामावून आहोत अशी अनुभूती येणे ही गोष्ट लौकिक दृष्टीने मरणासारखीच नव्हे काय ? कारण अशा व्यक्तीची सुखदु खे लौकिक स्वरूपाची नसतात अशा प्रकारचे 'मरण' आपल्याच डोळ्यानी पाहिले की शोक कुणाला होतो ? काम, क्रोध, माया याना रडावे लागते हाय हाय कोण करते ? तर यमधर्म, आणि या विदेही महात्म्याची अवस्था कशी असते ? या 'मरणा'मुळे तो तर त्रैलोक्यातील आनदाचा ठेवा अनुभवीत असतो 'आनंदें दाटलीं तिन्ही त्रिभुवनें' असा अनुभव त्याला येतो मी म्हणजे माझा देह, त्याच्या वृत्ती, त्याचे इद्रियविषय हा अहकार समूळ नष्ट झाल्या-मुळे आत्मानदाचा सर्वत्र सुकाळच असतो नारायणाच्या चरणाशी वसतीस जागा मिळाल्यामुळे जन्ममरणाचे सोयर व सुतक सपून गेलेले असते. आपला देह आपल्याच हातानी वोळविण्यात, देहबुद्धी नष्ट करण्यात, पचमहाभूतात्मक देहाचे पचविषय ब्रह्माग्नीत समर्पण करण्यात फार मोठा आनद आहे सर्वस्वाची आहुती दिल्यानतर उरते काय ? तर केवळ नारायण नारायण हा भाव. देहबुद्धी नष्ट झाल्यावर शरीराची चिता नामामृताच्या सजीवनीने शात होते दहा दिवसपर्यंत सुतकाचे झाल्यावर एकादशीस जागरण करावे, उपवास करावा आणि बाराव्या दिवशी पारणे फेडून उपवास सोडण्यासाठी भोजन करावे. अशी या शरीराच्या बोळवणीची सागता बुवानी वर्णन केली आहे या बोळवणीत कुठेही उदासीनता, दु ख, यातना, शोक याचे नावही नाही उलट 'आता आनंदीं आनंदु । गोविंदा गोविंदु विस्तारला' असाच अद्वितीय अनुभव या मरणप्रसगीचा आहे या दिवसात कराव्या लागणाऱ्या पिंडदानाचा, तिलांजलीचा, सध्यापसध्याचाही यथोचित उल्लेख करून तुकारामबुवानी आपल्या आयुष्याची ही 'प्रेतयात्रा' संपविली आहे येथे मरणे आणि जगणे याचे अर्थ वेगळेच आहेत

१ सुखदु ख आशानिराशा, यशापयश, शीतोष्णादी विकार याच्या पलीकडे जाऊन केवळ स्वस्वरूपात रमणाऱ्या तुकोबासारख्या सतश्रेष्ठाच्या, विदेही सत्पुरुषाच्या या अवस्थेचे आपणास जवळून दर्शन घेण्यासारखे आहे. पचमहाभूताचा हा देह पचमहाभूताना समर्पण करणे म्हणजे काय ? या पंचभूतामुळे जे इद्रियाचे पचविषय निर्माण होतात त्याचा त्याग करणे आणि मी म्हणजे माझा देह हा अहकार नष्ट करणे म्हणजेच देहाचा प्रेतभाव नव्हे काय ? 'इद्रियार्थेषु वैराग्यमनहकार एव च' इद्रियाच्या विषयाचे ठिकाणी वैराग्य आणि अहकाराचा अभाव हेच लक्षण ज्ञानी माणसाचे गीतेने सागितले आहे अशा ज्ञानी माणसाला विषयाविषयी प्रीती वाटतच नाही ओकलेल्या अन्नावर कधी वासना जाते का ? प्रेतास कामबुद्धीने आलिंगन देण्याची इच्छा कधी होते का ? विष कधी कुणास खावेसे वाटेल ? जळत्या घरात कोण प्रवेश करील ? वाघाच्या दरीत कोण वसतीस राहील ? अजगराची उशी कुणी कधी करील का ? याचप्रमाणे ज्ञानी मनुष्य विषयांकडे पाहातही नाही स्वर्गीचे भोग याला कुत्र्याच्या मांसाप्रमाणे वाटतात. अशा या वैराग्यसाधनेमुळेच 'ब्रह्मानंदा योग्य जीव होतो ॥'

तु. गाथा २..७४

असे वैराग्य निर्माण झाले, शरीराचा भाव प्रेतरूप झाला की मग जगराहाटीस धरून कर्मे केली तरी त्याचे कर्तृत्व अंगी उरत नाही मी हे केले असा अहंकार राहात नाही हा ज्ञानी व मुक्त मनुष्य कर्मे करीत असेल्ही, पण तो त्यात नसतो 'वर्णाश्रमपोषके। कर्मे नित्यनैमित्तिके। तयामाजीं काहीं न ठके। आचरतां ॥ परि हें मियां केलें। कीं हें माझेनि सिद्धि गेलें। ऐसें नाहीं ठेविलें। वासनेमाजीं' मी अमुक अमुक केले असा भाव त्याच्या ठिकाणी नसतोच. वायूचा संचार सर्वत्र असतो सूर्याचे उगवणे निरभिमानी असते वेद स्वभावताच बोलतात, गंगा नदी निर्हेतुक होऊनच वाहते तसे अहंकाराशिवाय त्याचे बोलणेचालणे होत असते विमुक्त ज्ञानी पुरुषाच्या निरहंकारी वृत्तीचे वर्णन करताना ज्ञानेश्वरानी फार चांगले व समर्पक दृष्टान्त दिले आहेत आपण काही कर्मे करीत आहोत अशी जाणीवही कर्त्याच्या ठिकाणी नसते योग्य ऋतुकाळात वृक्ष फुलाफळानी बहरतात त्याप्रमाणे ज्ञानी माणसास कर्मांची जाणीव नसते एकपदरी माळेची दोरी काढली की तिचे मणी ओघळून पडतात, त्याप्रमाणे मन, कर्म, वाचा यातून अहंकार लोप पावलेला असतो शरीराचा प्रेतभाव अनुभवण्यासाठी, आपलेच मरण आपल्या डोळ्यानी पाहाण्यासाठी देहभावाचा अहंकार अशा रीतीने नष्ट होणे अगत्याचे आहे शरीर आहे, शरीराकडून कर्मेही होत आहेत, पण त्यात अहंकार नसणे हे विदेहीचे मुख्य लक्षण आहे. यासच तुकोबानी 'एकदेशी होतों अहंकारें आथिला। त्याच्या त्यागें जाला सुकाळ हा' असे म्हटले आहे मद्यपान केलेल्या माणसास वस्त्राची कधी शुद्ध असते का ? चित्रातील व्यक्तीच्या हातात शस्त्र असले तरी काय उपयोग ? बैलाच्या पाठीवर शास्त्रज्ञानाचे ओझे असून काय उपयोग ? याचप्रमाणे 'तया पाडें देहीं। जया मी आहे तेंचि नाहीं। निरहंकारता पाहीं। तया नांव' देहात मी आहे, कर्मात मी आहे, वाणीत मी आहे, याची जाणीव नसणे म्हणजे निरहंकारता. या निरहंकारामुळे तुकोबाना 'याच देहीं याचि डोळां' जिवतपणीच मुक्तीचा सोहळा पाहायला सापडला, भोगायला

सीण[1] विचारी भाग । नव्हे निष्ठुर नाहीं राग ॥ ३ ॥
भेदाभेद नाहीं । तुका म्हणे तिच्याठायीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- सीण-त्रास, भाग-कष्ट, विचारी-विचार करीत.

अर्थ :- या विठ्ठलमाऊलीजवळ कोणत्याही वेळेस गेले तरी ती कधी 'आता सर्व संपले, काही उरले नाही द्यायला' असे म्हणत नाही १ अशी ही विठ्ठलमाऊली फार कृपाळू असून सर्वोचित प्रेमाचा पान्हा तिला फुटलेला असतो. २ ती कधी स्वत च्या त्रासाचा व कष्टाचा विचार करीत नाही. तिला कधी राग येत नाही, की ती कधी निष्ठुर होत नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, तिच्याजवळ असा काही भेदभावही उरत नाही. ४

२६७३ तुज पाहावें हे धरितों वासना । परि आचरणा नाहीं[2] ठाव ॥ १ ॥
करिसी कैवार आपुलिया सत्ता । तरिच देखता होइन पाय ॥ २ ॥
बाहिरल्या वेषें उत्तम दंडलें । भीतरीं मुंडलें[3] नाहीं तैसें ॥ ३ ॥
तुका म्हणे वांयां गेलोंच मी आहें । जरी तुम्ही साहे[4] न व्हा देवा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा - वासना-इच्छा, दंडिले-शासन केले, भीतरीं आतील अंतकरणातील, साहे-साहचभूत.

अर्थ :-देवा, तुला पाहावे अशी इच्छा मी माझ्या मनात धारण केली आहे. पण ज्यामुळे तुझे दर्शन होईल, असे आचरण मात्र माझ्याकडून होत नाही. १ तू तुझ्या सत्तेने माझा कैवार घेतोस म्हणूनच मला तुझ्या पायांचे दर्शन होईल. २ मी बाह्यवेष धारण करून माझ्या शरीरास उत्तम रीतीने शासन केले; पण अंत करणातील वासनांचे मुंडण करणे मात्र मला जमले नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी देवा, आता वायाच जात आहे; कारण तुमचे साहाय्य मला काहीच होत नाही ४

२६७४ दुष्ट आचरण ग्वाही माझें मन । मज ठावे गुण दोष माझे ॥ १ ॥
आतां तुम्ही सर्वजाण[5] पांडुरंगा । पाहिजे प्रसंगाऐसें केलें ॥ २ ॥
व्याह्याजांवायांचे पंगतीं दुर्बळ । वंचिजे तो काळ नव्हे कांहीं[6] ॥ ३ ॥
तुका म्हणे आतां जालों शरणागत । पुढील उचित तुम्हां हातीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- ग्वाही-साक्षी.

अर्थ :-देवा, माझे आचरण दुष्ट आहे याच्याबद्दल मी माझ्या मनाची साक्ष देतो. मी माझ्या ठिकाणचे गुणदोष नीट जाणून आहे १ पांडुरंगा, आता तुम्ही सर्व काही जाणत आहात म्हणून तुम्ही प्रसंग पाहून वागले पाहिजे २ व्याहीजावई यांची पंगत असली तरी एखादा दुबळा मनुष्य त्या पंगतीस बसला तर वेळ पाहून त्याच्याविषयी कुणी पंक्तिप्रपंच करीत नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, मी तुला आता शरण आलेलो आहे; जे काही योग्य करायचेच असेल ते तुमच्याच हातात आहे ४

२६७५ आतां भय नाहीं ऐसें वाटे जीवा । घडलिया सेवा समर्थाची ॥ १ ॥
आतां माझ्या मनें धरावा निर्धार । चिंतनीं अंतर न पडावें ॥ २ ॥
येथें नाहीं जाली कोणाची निरास । आल्या याचकास कृपेविशीं ॥ ३ ॥
तुका म्हणे येथें नाहीं दुजी परी । राया रंका सरी देवा पायीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- निरास-निराशा, परी-प्रकार, सरी-बरोबरी, सारखेपणा.

१ सीण न विचारी, २ ठाव नाही, ३ दंडिले, ४ साह्य ५ सर्व जाणा, ६ वायी

अर्थ – या समर्थ श्रीहरीची सेवा घडली की आता मुळीच भय नाही असे जीवास वाटते १ याच्या चिंतनात याच्याविषयी आता अंतर पडू नये हाच माझ्या मनाने चांगला निश्चय करावा २ याच्या ठिकाणी जो याचक कृपा व्हावी म्हणून येतो त्याची निराशा कधीच झालेली नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, येथे कृपेविषयी दुसरा कसला प्रकार नाही राजा आणि गरीब यांना देवाच्या पायाजवळ सारखेच वागविले जाते ४

२६७६ वैष्णवे चोरटीं । आलीं घरासी करटीं ॥ १ ॥
आजि आपुलें जतन । करा भाडें पाघरुण ॥ २ ॥
ज्याचे घरीं खावे । त्याचे सर्वस्व ही न्यावें ॥ ३ ॥
तुका म्हणे माग । नाहीं लागों देत लाग ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – माग–मागमूस

अर्थ – वैष्णव हे करटे व चोरटे असून ते आज घरी आले आहेत १ तेव्हा आज तुम्ही आपले अंथरुण पांघरुण व भांडीकुंडी नीट जपून ठेवा २ ज्याच्या घरी जेवावे त्याचे सर्वस्व हरण करून न्यावे ही त्यांची रीत आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात हे वैष्णव जी एखादी चीजवस्तू नेतील तिचा काही मागमूसही लागू देत नाहीत ४

२६७७ ऐकतों दाट । आले एकाचे बोभाट ॥ १ ॥
नका विश्वासों यावरी । चोर देहाचे खाणोरी ॥ २ ॥
हेचि याची जोडी । सदा बोडकीं उघडीं ॥ ३ ॥
तुका म्हणे न्यावें । ज्याचें त्यासी नाहीं ठावें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – दाट–पुष्कळ, बोभाट–तक्रारी, खाणोरी–खाणारे

अर्थ – पुढे सांगितल्याप्रमाणे पुष्कळांच्या अनेक तक्रारी आलेल्या मी पुष्कळ ऐकतो आहे १ हे वैष्णव देहातील कामक्रोधादी विकारांना खाणारे असल्यामुळे यांचा विश्वास तुम्ही धरू नका २ हे सदा उघडेबोडके असतात याच गुणाची प्राप्ती याच्या घरी येण्याने तुम्हास होईल ३ तुकाराम महाराज म्हणतात हे वैष्णव ज्याचे काही चोरून नेतात ते त्याचे त्यालाही माहीत होत नाही ४

२६७८ आणिकांची सेवा करावी शरीरें । तीं येथें उत्तरें गोरटींच ॥ १ ॥
ऐसा पांडुरंग सुलभ सोपारा । नेघे येरझारा सेवकाच्या[1] ॥ २ ॥
आणिकांचे भेटी आडकाठी पडे । येथें तें न घडे वचन ही ॥ ३ ॥
आणिकांचे देणे काळीं थोडें भरे । येथील न सरे कल्पांतीं ही ॥ ४ ॥
आणिकें दंडिती चुकलिया सेवा । येथें लोभ हेवा नाहीं दोन्ही ॥ ५ ॥
तुका म्हणे करी आपणासारिखें । उद्धरी पारिखें उंच निच[2] ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – आणिकांची–इतर देवांची, नेघे–घेत नाही, हेवा–हाव, पारिखें–दुसरे

अर्थ – इतर देवाची सेवा शरीरास कष्ट देऊन करावी लागते परंतु या विठ्ठलाजवळ नुसत्या कोरड्या शब्दांनी त्याला हाक मारली तरी ती सेवा त्याला पावते १ असा हा पांडुरंग फारच सुलभ आणि सोपा आहे हा आपल्या प्राप्तीसाठी सेवकास कधी हेलपाटे देत नाही २ इतर देवांच्या नुसत्या भेटीसाठीच कितीतरी अडचणी येतात पण येथे मात्र एका शब्दानेही प्रतिबंध होत नाही ३ इतर देवांनी जर काही दिले तर ते काही थोडा

---

१ यायरांच्या, २ नीच

वेळपर्यंत पुरते पण याने दिलेले कल्पाचा अंत झाला तरी संपत नाही ४ इतर देव सेवा थोडी फार चुकली की शिक्षा करतात पण या देवाच्या ठिकाणी मात्र सेवा करवून घेण्याचा सोस अथवा हाव या दोनही गोष्टी नाहीत ५ तुकाराम महाराज म्हणतात, हा देव आपणांकडे यणारे कोण श्रीमंत आहेत कोण गरीब आहेत हें न पाहाता, वा कोण चागले कोण वाईट हे न पाहाता सर्वांचा उद्धार सारखेपणानेच करून स्वस्वरूपाची प्राप्ती करून देतो ६

२६७९ दुर्जनाची जाती । त्याचे तोंडी पडे माती ॥ १ ॥
त्याची बुद्धि त्यासी नाडी । वाचे अनुचित वडवडी ॥ २ ॥
पाहें सताकडे । दोषदृष्टी पाहे भीडें ॥ ३ ॥
उंच निंच नाहीं । तुका म्हणे सळा काहीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – नाडी–नडते घात करते

अर्थ – ज्याची जात दुर्जनांची आहे त्याच्या तोंडात अखेर मातीच पडते १ त्यांची वाईट बुद्धीच त्यांचा घात करते ते वाणीने वाटेल तशी वडवड करतात २ हे दुजन सताकडेही काही भीडभाड न ठेवता पाहातात दोषदृष्टीनेच ते त्यांच्याकडे पाहातात ३ तुकाराम महाराज म्हणतात, या दुष्टांना चागले कोण, वाईट कोण याविषयी काही समजत नाही ४

२६८० न करीं उदास । माझी पुरवावी आस ॥ १ ॥
ऐका[1] ऐका नारायणा । माझी परिसा विज्ञापना ॥ २ ॥
मायबाप बंधुजन । तूंचि सोयरा सज्जन ॥ ३ ॥
तुका म्हणे तुजविरहित । माझें कोण करी हित ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – आस–इच्छा, परिसा–ऐका, विज्ञापना–विनती

अर्थ – देवा तू मला कधी उदास करू नकोस माझी सर्व इच्छा पूर्ण कर १ नारायणा, माझी विनंती ऐका ना २ तुम्हीच माझे आईबाप, बंधुजन व सोयरेसज्जन आहात ३ तुकाराम महाराज म्हणतात तुझ्याशिवाय माझ्या हिताची गोष्ट कोण करील बरे ? ४

२६८१ जीवन उपाय । वैद्यवाणी तुझे पाय ॥ १ ॥
ते मी नाठवीं घडिघडी । ह्मणोनिया चरफडीं ॥ २ ॥
तुटे भवरोग । जेथें सर्व सुखें[2] भोग ॥ ३ ॥
तुका म्हणे विटे । धरियेलें जें गोमटें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – जीवन–जगण्यासाठी, विटे–विटेवर

अर्थ – देवा, तुझे पाय हाच माणसाच्या जगण्यासाठी एक उपाय आहे असे वैद्यही सागतात १ ते पाय मात्र मी वारवार आठवत नाही म्हणून माझ्या मनाची चरफड होत आहे २ या पायाच्या सेवनाने भवरोग नाहीसा होऊन सर्वसुखाचा भोग प्राप्त होतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, जे पाय तुम्ही विटेवर ठेविले आहेत ते फारच चांगले व साजिरे आहेत ४

२६८२ ऐका हें वचन माझें संतजन । विनवितों जोडून कर तुह्मां ॥ १ ॥
तर्क करूनियां आपुल्या भावना । बोलतिया जना कोण वारी ॥ २ ॥
आमुच्या जीवींचा तोचि जाणे भावो । रखुमाबाईचा[3] नाहो पांडुरंग ॥ ३ ॥

१ एसे, २ सुखभोग, ३ रकुमाईचा

चित्त माझें त्याचे गुंतलेसे पायीं । म्हणऊनि काही नावडे त्या ॥ ४ ॥
तुका म्हणे मज न साहे मीनती । खेद होय चित्तीं भंग मना ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – नोहो–पती मीनती–विनती, आजव

अर्थ – संतजन माझे हे बोलणे तुम्ही ऐकावे मी तुम्हांस हात जोडून विनती करीत आहे १ आपल्याच भावनांचे तर्क लढवून जे बोलतात त्याचे निवारण कोण करणार ? २ रखुमाईचा पती पांडुरंग हाच आमच्या मनातील भाव ओळखणारा आहे ३ माझे चित्त त्याच्या पायाशी गुंतलेले असून त्याला दुसरे काहीच आवडत नाही ४ तुकाराम महाराज म्हणतात मला आजवे व विनत्या करणे सहन होत नाही त्यामुळे माझ्या मनाचा भंग होऊन त्याला भारी खेद होतो ५

२६८३ ऐसा कोणी नाहीं हें जया नावडे । कन्या पुत्र घोडे दारा धन ॥ १ ॥
निंब घेतें रोगी कवणिया सुखें । हरावया दुःखें व्याधि पीडा ॥ २ ॥
काय पळे सुखें[1] चोरा लागे पाठीं । न घलावी काठी आड तया ॥ ३ ॥
जयाचे कारण तोचि जाणे करूं । नये कोणा वारूं आणिकासी ॥ ४ ॥
तुका म्हणे तरी सांपडे निधान । द्यावा ओंवाळून जीव बळी ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – दारा–पत्नी निधान–साठा ठेवा

अर्थ – असा कोण मनुष्य आहे की ज्याला कन्या पुत्र घोडे, पत्नी, संपत्ती इत्यादी प्रापंचिक गोष्टींची आवड नाही ? १ रोगी मनुष्य कडू लिंबाप्रमाणे कडू औषध कोणत्या सुखासाठी घेत असतो ? पुढची व्याधी व दुःखे दूर व्हावीत म्हणूनच त्याचा हा प्रयत्न असतो २ कुणी काही सुखाने जीव घेऊन पळत नाही चोर पाठीशी लागलेला असल्यानेच त्याला पळावे लागते त्याला कुणी प्रतिबंध करू नये ३ ज्याचे जे कार्य तेच तो करू शकतो म्हणून कार्य करू पाहाता निवारण करू नये ४ तुकाराम महाराज म्हणतात जीव ओवाळून समर्पित केला तर हाती स्वसुखाचा ठेवा प्राप्त होतो

२६८४ काय मी अन्यायी तें घाला पालवीं । आणीक वाट दावीं चालावया ॥ १ ॥
माग पाहोनिया जातों तेच सोयी[2] । न वजावें कायी कोण सांगा ॥ २ ॥
धोपट मारग लागलासे गाढा । मज काय पीडा करा तुम्ही ॥ ३ ॥
वारिता ही भय कोण धरी धाक । परी तुम्हा सांगतों मी ॥ ४ ॥
तुका म्हणे शूर दोहीं पक्षीं भला । मरता मुक्त जाला मान पावे ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – पालवीं–पदरात माग–माग न वजावें–न जावे

अर्थ – देवा, माझ्याकडून अन्याय तरी काय झाला आहे तो माझ्या पदरी घाला ना. म्हणजे मी त्या वाटेचा मार्ग चालण्यासाठी इतरांना दाखवीन १ माझ्या आधी झालेल्या संतांनी चोखाळलेला मार्गच मी चालत आहे अशा मार्गाने कुणी न जावे की काय ? २ मला हा सरळ व मोठा मार्ग सापडला असताना त्या मार्गाने जाताना तुम्ही उगाच पीडा का करता ? ३ अशा मार्गाने जाणारास कोण भीती दाखविणार ? ती निवारण केल्यावर त्याचे भय कोण धरणार आहे ? पण मी एक गोष्ट तुम्हांस सांगत आहे ४ तुकाराम महाराज म्हणतात शूराला रणांगणावर दुसऱ्यास जिंकण्यात अथवा युद्धात मरून जाण्यात सारखाच लाभ होतो तो मरण पावला तर मुक्त होतो आणि शत्रूस त्याने जिंकले तर त्याला मोठ्या अधिकाराचा मान मिळतो ५

१ मुखें, २ ठायीं

२६८५ नव्हती माझे बोल जाणां हा निर्धार । मी आहे मजूर विठोबाचा ॥ १ ॥
निर्धारा वचन सोडविलें माझ्या । कृपाळुवें लज्जा राखियेली ॥ २ ॥
निर्भर मानसीं जालों आनंदाचा । गोडावली वाचा नामघोषें ॥ ३ ॥
आतां भय माझें नासलें संसारीं । जालोसें यावरी गगनाचा ॥ ४ ॥
तुका म्हणे हा तों संताचा प्रसाद । लाधलों आनंद प्रेमसुख ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– निर्भर–निश्चित.

अर्थ :— मी जे बोलतो ते माझे बोल नाहीत असे तुम्ही निश्चयाने समजा. मी तर या विठोबाचा मजूर आहे. १ माझ्या निश्चयास या कृपाळू देवाने साथ देऊन माझी लाज राखली आहे २ मी मोठ्या आनंदात असून निश्चित झालो आहे कारण माझी वाणी हरिनामाच्या घोषामुळे गोडावून गेली आहे. ३ आता या संसारातील माझे भय नाहीसे झाले आहे. मी आता यापुढे गगनाकार परमेश्वराशी एकरूप झालो आहे. ४ तुकाराम महाराज म्हणतात, हा सर्व प्रसाद संताचा असून त्यांच्यामुळेच मला प्रेमसुखाचा आनंद प्राप्त झालेला आहे ५

६ जरा कर्णमूळीं सांगों आली गोष्टी । मृत्याचिये भेटी जवळ आली ॥ १ ॥
आतां माझ्या मना होईं सावधान । ॐपुण्याची जाण कार्यसिद्धि ॥ २ ॥
शेवटील घडी बुडतां न लगे वेळ । साधावा तो काळ जवळी आला ॥ ३ ॥
तुका म्हणे चित्तीं कुळींची देवता । वारावा भोंवता शब्द मिथ्या ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– जरा–म्हातारपण, वारावा–त्याग करावा, सोडावा.

अर्थ :– म्हातारपण हे कानाशी येऊन मृत्यूचा समय जवळ आला असल्याचे सांगायास आले आहे. १ माझ्या मना, आता तू नीट सावध हो आणि ॐकाराचे चिंतन करून पुण्य संपादन कर. म्हणजे तुझी कार्यसिद्धी होईल. २ शेवटची घटका बुडण्यास व आयुष्य संपण्यास काही वेळ लागणार नाही. म्हणून आपला अंतसमय जवळ आला असे समजून उरलेल्या वेळाचे सार्थक करा ३ तुकाराम महाराज म्हणतात, यावेळी तू तुझ्या कुलदेवतेचे स्मरण कर. याशिवाय इतर दुसरा कोणताही शब्द मनात आला तरी तू तो खोटा समजून त्याचा त्याग कर. ४

२६८७ मागील ते आटी येणे घडे सांग । सुतवेल गंग एका सूत्रें ॥ १ ॥
पहिपाहुणेर ते सोहळ्यापुरते । तेथूनि आरते उपचार ते ॥ २ ॥
आवश्यक तेथें आगळा आदर । चाली थोडें फार संपादतें ॥ ३ ॥
तुका म्हणे ऋण फिटे एके घडी । अलभ्य ते जोडी हातां आल्या ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– सुतवेल–गुतवून घेशील, आटी–खटपट, आरते–अलीकडचे.

अर्थ :– या श्रीहरीच्याच येथाच्या सूत्राने जर तू आपले चित्त गुंतवून घेशील तर मागे केलेली सर्व खटपट तुझी पूर्ण होईल. १ पैपाहुणे हे केवळ सुखाचे व सोहळ्याचेच सोयरे आहेत त्यांचे सर्व उपचार अलीकडचेच असतात. २ आवश्यक असलेले स्वस्थानाचे ठिकाण विशेष प्रकारचा आदर दाखविला की आपणास मिळते. त्याची रीत संपादन करता येते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, श्रीहरीच्या लाभाची अलभ्य प्राप्ती झाल्याने एका क्षणात सर्व प्रकारचे ऋण फिटून जाते. २

२६८८ साधाया तो देय सर्वस्याचेसाटीं । प्रारब्ध तुटी क्रियमाण ॥ १ ॥
मग कासयानें पुन्हा संसार । बीजाचे अंकुर दग्ध होतो ॥ २ ॥

जिणें दिल्हें त्यासी द्यावे पिंडदान । उत्तीर्ण चरण धरूनि व्हावें ॥ ३ ॥
तुका म्हणे निज भोगईल निजता । नाहीं होइल सत्ता दुजियाची ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– तुटी–अंत, नाश

अर्थ :– श्रीहरीला सर्वस्व अर्पण करून त्याची प्राप्ती करून घ्यावी यामुळे प्रारब्धक्रियमाण वगैरे कर्माचा नाश होईल. १ मग पुन संसाराची प्राप्ती कशी होईल ? कारण यासबंधीचे अकुरच दग्ध होऊन जातील २ ज्या ईश्वराने आपणास हा जन्म दिला त्यालाच हा देह समर्पण करून टाकावा त्याच्या चरणास मिठी मारून आपण उतराई व्हावे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा प्रकारे,निजस्वरूपाच्या ठिकाणी अनुसरल्यावर निजस्वरूपाची प्राप्ती होईल आणि मग इतराची सत्ता नाहीशी होईल ४

२६८९ जळो[1] अगी पडो खाण । नारायण भोगिता ॥ १ ॥
ऐसी ज्याची वदे वाणी । नारायणीं ते पावे ॥ २ ॥
भोजनकाळीं करितां धंदा । ह्मणा गोविंदा पावले ॥ ३ ॥
तुका म्हणे न लगे मोल । देवा बोल आवडती ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– खाण पडणे–नष्ट, नाहीसे होणे.

अर्थ – मीच सर्व विषयांचा भोक्ता आहे या समजुतीस आग लागो ती नष्ट होवो नारायण सर्व भोक्ता आहे अशी भावना दृढ रहावी १ असे ज्याची वाणी वदत असते त्याचे सर्व काही नारायणाला पावत असते २ भोजनाच्या वेळी इतर कोणताही उद्योग केला तरी सर्व काही गोविंदाला पावले असे म्हणावे ३ तुकाराम महाराज म्हणतात, या करण्याला काही मोल द्यावे लागत नाही आपले सर्व ईश्वराला अर्पण असो, हे बोलणे देवाला फारच आवडते. ४

२६९० संतांसी क्षोभवी कोण्या ही प्रकारें । त्याचे नव्हे वरें उभयलोकीं ॥ १ ॥
देवाचा तो वैरी शत्रु दावेदार । पृथ्वी ही थार नेदी तया ॥ २ ॥
संतांपाशीं ज्याचा नुरेचि विश्वास । त्याचे जाले दोष बळिवंत ॥ ३ ॥
तुका ह्मणे क्षीर वासराच्या अंगें । किंवा धावे लागे विषमें मारं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – क्षोभवी–राग आणतो, थार–आश्रय, विषमें–रागाने.

अर्थ :– कोणत्याही प्रकारे संतांस राग आणणाराचे उभयलोकात बरे होणार नाही १, असा मनुष्य देवाचा दावेदार शत्रू असून त्याला पृथ्वीवर कुठेही आश्रय मिळत नाही २ संतांच्या ठिकाणी ज्यास कधी विश्वास वाटत नाही, त्याचे दोष अतिशय बलवान होतात ३ तुकाराम महाराज म्हणतात, दूध काढायच्या वेळेस गाईचे वासरू जवळ केले तरच तिचे दूध आपणांस मिळते नाही तर ती रागाने मारायलाच धावते. ४

२६९१ उदकीं कालवी शेण मलमूत्र । तो होय पवित्र कासयाने ॥ १ ॥
उद्धारासी ठाव नाहीं भाग्यहीना । विन्मुख चरणा संतांचिया ॥ ३ ॥
दुखवी तो बुडे सांगडीचा तापा । अतित्याई पापाचीच मूर्ति ॥ ३ ॥
तुका ह्मणे जेव्हां फिरतें कपाळ । तरी अमंगळ योग होतो[2] ॥ ४ ॥

---

१ जळतां आगी पडतां खाण, २ येतो.

२६९५ कळों आलें ऐसें आतां । नाहीं सत्ता तुह्मांसी ॥ १ ॥
तरी वीर्य नाहीं नामा । जातो प्रेमा खंडत ॥ २ ॥
आड ऐसें येतें पाप । वाढे ताप आगळा ॥ ३ ॥
तुका ह्मणे गुण जाला । हा विठ्ठला हीनशक्ति ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– वीर्य–सामर्थ्य.

अर्थ :– देवा, तुमच्या हातात आता काहीच सत्ता नाही असे मला चांगले कळून आले आहे. १ तुमच्या नामात आता सामर्थ्य उरलेले नाही. त्यामुळे त्यावरील आमचे व इतरांचे प्रेम कमी कमी होत आले ना. २ अशी ही पापकल्पना आमच्या मनात निर्माण होते, व त्यामुळे अधिकच ताप मनास होतो. ३ तुकाराम महाराज म्हणतात, विठ्ठला, शक्तिहीनतेचा हा एक गुण तुझ्या अंगी निर्माण झाला आहे. ४

२६९६ लागों दिलें अंगा । ऐसें कांगा सन्निध ॥ १ ॥
कोण्या पापें उदय केला । तो देखिला प्रळय ॥ २ ॥
न देखवे पिडला सर्प । दया दर्प विपाचा ॥ ३ ॥
तुका ह्मणे भले । मज तो न वजे साहिलें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– कांगा–का हो ? सनिध–जवळ.

अर्थ – देवा, अशा प्रकारचे वाईट विचार माझ्याजवळ का हो निर्माण केलेत ? माझ्या अंगी का लावलेत ? १ माझ्या कोणत्या पापाचा उदय झाला म्हणून मी हा असा प्रलयकाळ पाहिला ? २ विषाच्या दर्पानें सर्पाला पीडा झाली तरी ती मला पाहावत नाही, सहन होत नाही, अशी दयावृत्ती माझ्यात आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा दुर्जनांना पीडा होणे चांगले असले तरी ते पाहावत नाही ४

२६९७ धांवा शीघ्रवत । किंवा घ्यावें दंडवत ॥ १ ॥
तुमचा जातो वडिवार । आह्मी होतों हीनवर ॥ २ ॥
न धरावा धीर । धांवा नका चालों स्थिर ॥ ३ ॥
तुका ह्मणे वाणी । माझी लाजली जी गुणीं ॥ ४ ॥

अर्थ :– सेवकाने मालकाची जशी आज्ञा होईल त्याप्रमाणे काम करावे; हेच त्याचे कर्तव्य आहे आता स्वामीचे कर्तव्य काय आहे ते स्वामी जाणतीलच. १ मनाचे जे मूलस्थान श्रीहरीरूप त्याच ठिकाणी बसून राहावे आणि सर्व गुणांचे आकर्षण त्याच्या पायांशी असावे. २ तुमची भेट व्हावी म्हणून माझ्या मनाने ध्यास घेतलेला आहे. तुमच्यावरून जीव ओवाळून टाकावा असे मला वाटते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, तुम्ही माझ्यावर कृपा करण्याचे माझे कार्य करावे आणि त्यायोगे आपले ब्रीद सांभाळावे. ४

२६९९ उद्वेगासी बहु फाकती मारग । नव्हे ऐसें अंग माझें होतें ॥ १ ॥
आतां कोण यासी करणें विचार । तो देखा साचार पांडुरंगा ॥ २ ॥
मज तो अत्यंत दर्शनाची आस । जाला तरी हो नाश जीवित्वाचा ॥ ३ ॥
तुका ह्मणे आहे वचनाची उरी । करितों तोंवरि विज्ञापना ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– फाकती–फुटतात, साचार–यथार्थपणाने, आस–इच्छा, उरी–त्रुटी, कमतरता, मर्यादा, विज्ञापना–विनंती.

अर्थ :– एकदा चित्त उदास झाले की, मग त्यास विचारांचे अनेक मार्ग फुटतात. मग माझा हा देह, वा माझे हे अंग नाही असेच मला वाटते १ पांडुरंगा, आता याविषयी कोणता विचार करावा, हे तुम्ही यथार्थपणे जाणावे, पाहावे. २ मला तर तुमच्या दर्शनाची फारच इच्छा झाली आहे. यासाठी माझे आयुष्य नाश झाले तरी होवो ३ तुकाराम महाराज म्हणतात, जोपर्यंत माझ्या तोंडातून निघणाऱ्या वचनांना मर्यादा आहे तोवरच मी ही विनंती तुम्हांस करीत आहे. ४

२७०० दुःखाची संगति[1] । तिच्याठायीं कोण प्रीति ॥ १ ॥
अवघें असो हें निराळें । करूं सोइरें सावळें ॥ २ ॥
क्षणभंगुर तें ठाव । करूनि सांडावेंचि वाव ॥ ३ ॥
तुका म्हणे बरा । ठाव पावलों हा थारा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– साईरे–सोयरे, संबधित, वाव–व्यर्थ, ठाव–आधार.

अर्थ :– ज्याच्या संगतीत दु:ख होते तेथे प्रेम तरी कोणत्या रीतीने करावे ? १ आता हे सर्व निराळे ठेवून त्या सावळ्या श्रीहरीशी संबंध जोडू. २ याच्या खेरीज इतर सर्व आधार क्षणभंगुर व व्यर्थ असल्याने त्यांचा त्याग करावा ३ तुकाराम महाराज म्हणतात, मला श्रीहरीचा हा आधार मिळाला हे फार बरे झाले आहे ४

२७०१ मेला तरी जावो मुखें नरकासी । कळंकी याविशीं शिवों नये ॥ १ ॥
रजस्वला करी वेलासी आघात । अंतरें[2] तों हित दुरी बरें ॥ २ ॥
उगीच कां आलीं नासवावीं फळें । विटाळ विटाळें कालवूनि ॥ ३ ॥
तुका म्हणे लोणी घालोनि शेणांत । उपेगाची मात काय असे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– कळंकी–पापी माणसास, रजस्वला–विटाळशी.

अर्थ :– जो मरण पावला तो सुखाने नरकास जावो; अशा पापी माणसास शिवू देखील नये. १ एखादी विटाळशी वेलास शिवली तर तो वेल जळून जातो यासाठी ज्यामुळे हितात अंतर पडते त्यापासून दूर असणे बरे २ एकमेकांस शिवून, विटाळ कालवून चांगली आलेली फळे उगीच का नासवावीत ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, शेणात उगीच लोणी कालविण्यात काय फायदा आहे ? ४

---

१ सांगातीं. २ अंतरतो.

२७०२ वर्णावे ते किती । केले पवाडे श्रीपति ॥ १ ॥
विश्वासिया घडे लाभ । देइल तरी पद्मनाभ ॥ २ ॥
भाव शुद्ध तरी । सांगितले काम करी ॥ ३ ॥
तुका म्हणे भोळा देव । परि हा नागवी संदेह ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– संदेह–संशय, अश्रद्धा

अर्थ :– श्रीपती, तुमच्या कीर्तीचे पोवाडे किती वर्णन करावेत ? १ या पद्मनाभाच्या ठिकाणी जर विश्वास धरला तर त्यामुळे मोठा लाभ होईल २ माझा भाव शुद्ध असून मी सांगितलेले काम करीत आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, देव हा भोळा असला तरी त्याच्याविषयी आपण संशय बाळगतो मग मात्र आपण नागवले जातो अथवा याच्यावर विश्वास ठेविला तर तो आपला संदेह दूर करील ४

अर्थ – एखाद्या वेडगळ माणसाचे चागल्या उपदेशाने कान भरण्याचा प्रयत्न केला तर उगाचच तो मान हालवील, पण उपदेश काही त्याच्या मनावर ठसणार नाही त्याच्या कानाची भोके रिकामीच राहातात १ अशी ही माणसे नीट भावाने माझे म्हणणे ऐकत नाहीत म्हणून मी स्पष्टपणे काही सागत नाही २ ज्याचे चित्त अनेक दोषांनी बाटून गेले आहे त्यास किती जरी सांगितले तरी त्याला त्याचे हित काही केल्या समजत नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा फजितखोर माणसास काही न करता उगीच गप्प बस असे म्हणणेच बरे असते ४

२७०६ नाहीं सरों येत जोडिल्या वचनीं । कवित्वाची वाणी कुशळता ॥ १ ॥
सत्याचा अनुभव वेधी सत्यपणे । अनुभवाच्या गुणे रुची येती ॥ २ ॥
काय अगीपाशीं शृंगारिले चाले । पोटींचे उकले कसापाशीं ॥ ३ ॥
तुका म्हणे येथें करावा उकल । लागेचि ना बोल वाढवूनि ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – सरों येत–समजून येत, मान्य होत

अर्थ – मोठ्या कौशल्याने शब्दाची जोडणी करून कुणी वाणीने कवित्व करील तर ते काही मान्यतेस पोचणार नाही १ ज्यास सत्यत्वाचा अनुभव आला आहे तो सत्यत्वानेच दुसऱ्याचे अत करण वेधून घेईल अनुभवामुळेच त्याच्या वाणीस गुणांची रुची येते २ हिणकस धातूचा अलकार वर सोन्याचा मुलामा देऊन केला तरी त्याचा काय उपयोग ? त्याचा तो शृगार अग्नीपुढे काही कधी चालणार नाही कसोटीच्या दगडावर त्यास घासले असताना त्याच्या पोटातील हिणकस बाहेर पडते ३ तुकाराम महाराज म्हणतात, ज्याच्या हृदयात सत्यत्वाचा अनुभव आलेला आहे, त्याचा उकल शब्दानी वाढवून करावा लागत नाही ४

२७०७ लचाळाच्या कामा नाहीं ताळावाळा । न कळे ओंगळा उपदेश ॥ १ ॥
वचनचर्येची न कळे चाचणी । ऐसी सघष्टनी अमगळ ॥ २ ॥
समय न कळे वेडगळ बुद्धि । विजाती[1] ते शुद्धि चाच चाट[2] ॥ ३ ॥
तुका म्हणे याचा धिक्कारचि बरा । बहुमति खराहूनि हीन ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – लचाळाच्या–सोकवलेल्या, चाच–चलाख, चचल चाट–उनाड, रिकामटेकडा, खराहुनी–गाढवापेक्षा

अर्थ – जो कुणी सोकवलेला आणि चावट मनुष्य आहे त्याच्या वर्तनात काही ताळमेळ नसतो त्या घाणेरड्या माणसास कितीही उपदेश केला तरी त्याला काही तो समजत नाही १ वाणीने त्याला कितीही समजावून सांगितले तरी त्याला त्यातील रहस्य कधी समजत नाही अशाची सगत दुःख करणे ही अमगळ गोष्ट आहे २ अशा वेडगळ लोकाना काळवेळ काही समजत नाही हे विजातीय लोक वृत्तीने चचल असून उनाड असतात ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा लोकाचा धि कार करणेच बरे अनेक मतांचे असे लोक गाढवापेक्षाही नीच समजावे ४

२७०८ एक धरिला चित्तीं । आम्हीं रखुमाईचा पती ॥ १ ॥
तेणें जालें अवघें काम । निवारला भवश्रम ॥ २ ॥
परद्रव्य परनारी । जाली विषाचिये परी ॥ ३ ॥
तुका म्हणे फार । नाहीं लागत व्यवहार ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – भवश्रम–ससारांचे दुःख, परी–समान गारखेपणाने

१ जीवाची, २ चाट ३ त्याचा

अर्थ :— एक रखुमाईचा पती पांडुरंग आम्ही आमच्या चित्तात धारण केला आहे १ त्यामुळे आमचे सर्व काम झाले असून संसारदु:खही संपून गेले आहे २ परद्रव्य व परनारी ही आम्हास विषाप्रमाणे झाली आहेत ३ तुकाराम महाराज म्हणतात, आता काही वेगळा व्यवहार फारसा करावा लागणार नाही ४

२७०९ भेणे पळे डोळसा । न कळे मृत्यु तो सरिसा ॥ १ ॥
कैसी जाली दिशाभुली । न वजातिये वाटे चाली ॥ २ ॥
संसाराची खती । मावळल्या तरी शक्ति ॥ ३ ॥
तुका म्हणे हीणा । बुद्धि चुकली नारायणा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – भेणे–भीतीने, सरिसा–बरोबरच न वजातिये–जात नाहीत

अर्थ :— जी डोळस माणसे भयाने पळून जातात त्याना मृत्यू स्वत बरोबरच आहे हे समजत नाही १ यांची कशी दिशाभूल झाली आहे पहा नीट वाटेने हे जातच नाहीत २ सर्व शक्ती नष्ट झाल्या तरी ते कधी संसाराची चिंता सोडीत नाहीत ३ तुकाराम महाराज म्हणतात, जे कुणी हीनबुद्धीचे आहेत त्यांची बुद्धी नारायणाविषयी बहकलेली आहे ४

२७१० अभिमानाचे तोंड काळें । दावी बळें अंधार ॥ १ ॥
लाभ न्यावा हातोहातीं । तोंडीं माती पाडोनि ॥ २ ॥
लागलीसे पाठी लाज । जाले काज नासाया ॥ ३ ॥
तुका म्हणे कुश्चळ मनीं । विटवनीं पडिलीं तीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – काज–काय, कुश्चळ–पापी

अर्थ – अभिमानी मनुष्य हा काळतोंडचा असून त्याने आत्मज्ञानाविषयी बळेच अंधार निर्माण केलेला आहे १ आत्मज्ञानाचा लाभ त्यामुळे हातोहात दूर होतो आणि शेवटी तोंडात माती मात्र पडते २ झालेले कार्य नष्ट करण्यासाठी लज्जा ही सर्वांच्याच पाठीमागे लागलेली आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, जो मनाने पापी आहे तो नेहमी अशा विटंबनेच्या फेऱ्यातच सापडणार ४

२७११ चोराचिया धुडका मनीं । वसे ध्यानीं लछन ॥ १ ॥
ऐशा आम्ही करणे काय । वरसों[1] न्यायें पर्जन्य ॥ २ ॥
ज्याच्या वसे खतावरी । ते चुरचुरी दुखवूनि ॥ ३ ॥
तुका म्हणे ज्याची खोडी । त्याची जोडी त्या पीडी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – धुडका–धास्ती, वरसों–वर्षाव करू, खतावरी–जखमेवर

अर्थ – जो खरा चोर आहे त्याच्या मनात सतत आपल्या कर्माविषयी लांछनास्पद अशी धास्ती असते १ अशा लोकांना आम्ही करावे तरी काय ? आम्ही पर्जन्याप्रमाणे सहज व सर्वत्र समान रीतीने उपदेशाचा वर्षाव करीत असतो २ ज्याला जखम खोल आहे, ज्याच्यात दोष आहे त्याच्यावर घाव बसून तो दु:खाने चुरचुर करतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, ज्यात जी खोड असते ती त्याला नेहमी दु:ख देते ४

२७१२ बुद्धिहीना उपदेश । तें तें विष अमृतीं ॥ १ ॥
हुगीं नये गोन्हवाडी । तेथे जोडी विटाळ ॥ २ ॥

१ सहमा, २ वर्षे

अळसियाचें अंतर कुडें । जैसें मढें निष्काम ॥ ३ ॥
तुका म्हणे ऐशा हातीं । मज श्रीपती वांचवा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :—गोन्हवाडी–गुखाडी, कुडें–खोटे.

अर्थ:– अमृतात विष टाकल्यावर जसा त्याचा नाश होतो त्याप्रमाणे बुद्धिहीनास उपदेश केलेला व्यर्थच ठरतो १ गुखाडीत जाऊन तेथील घाण कधी हुंगू नये. कारण तेथे केवळ विटाळाचीच प्राप्ती होईल २ आळशी माणसाचे अंतःकरण खोटे असते. जणू निर्विकार मनाचे मढेच ते समजावे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, श्रीपती, अशा लोकांच्या तावडीतून तुम्ही मला वाचवा. ४

२७१३ न करीं तुमची सेवा । बापुडे[1] मी पण देवा ॥ बोलिलों तो पाववा । पण सिद्धी सकळ ॥१॥
आणीक काय तुम्हां काम । आम्हां नेदा तरी प्रेम ॥ कैसे धर्माधर्म । निश्चयेंसी रहाती[2] ॥२॥
आम्ही वेचलों शरीरें । तुम्ही बीज पेरा खरें ॥ संयोगाचे बरें । गोड होतें उभयतां ॥ ३ ॥
एका हातें टाळी । कोठें वाजते निराळी । जाला तरी बळी । स्वामीविण शोभेना ॥ ४ ॥
रूपा यावें जी अनंता । धरीन पुटाची त्या सत्ता । होईन सरता । संतांमाजी पोसणा ॥५॥
ठेविलें उधारा । वरी काय तो पातेरा । तुका म्हणे बरा । रोकडाचि निवाड ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा - नेदा–देत नाही, वेचलों–खर्च केले, समर्पण केले, पुटाची–रूपान्तराची. पोसणा–पोषण ज्याचे करायचें असा, पातेरा–फजिती.

अर्थ :– देवा, तुमची सेवा मी बापुडवाडेपणाने कधी करणार नाही. तुम्ही जी प्रतिज्ञा केली आहे ती पूर्ण करावी. १ आम्हांस तुम्ही तुमचे प्रेम जर देत नाही तर मग तुम्हास दुसरे काम तरी काय आहे हो ? निश्चयाने धर्माधर्म तरी मग कसे राहातील ? २ आम्ही आमचे शरीर देवा, तुम्हास समर्पण केले असून आता तुम्हांस त्यात सद्भावाचे जे बीज पेरायचे असेल ते पेरावे; म्हणजे तुमचा व माझा नीट संयोग होईल आणि उभयतांत त्यामुळे गोडी निर्माण होईल. ३ एका हाताने टाळी कधी तरी वाजते काय ? त्याचप्रमाणे सेवक जरी बलवान झाला तरी त्यास स्वामीशिवाय शोभा नाही. ४ अनंता, तुम्ही आता निराकारपद सोडून आकारास यावे, म्हणजे या रूपान्तराची सत्ता मी मानेन. यामुळे मी संताच्यांत मान्य आणि पोषित होईन ५ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तुम्ही उधार ठेविले तर मग केवढी फजिती आहे; म्हणून जो काय निर्णय करावयाचा आहे तो रोकडाच कराल तर बरे. ६

२७१४ भुके नाहीं अन्न । मेल्यावरी पिंडदान ॥ १ ॥
हें तों चाळवाचाळवी । केलें आपणचि जेवी ॥ २ ॥
नैवेद्याचा आळ । वेच ठाकणीं सकळ ॥ ३ ॥
तुका म्हणे जड । मज न राखावे दगड ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :-आळ–आग्रह, निमित्त.

अर्थ :– जिवंतपणी भूक लागली असताना बापास अन्न देत नाहीत; आणि तो मरण पावल्यावर मात्र श्राद्धविधीप्रमाणे पिंडदान करतात. १ असा हा प्रकार फसवाफसवीचाच आहे. जे काही जेवणाचे केले असेल ते आपण स्वतःच जेवीत असतात. २ देवाला पदार्थ नैवेद्याला आवडतो अशा निमित्ताने नाना पदार्थ करून ते आपल्या पोटात भरण्यात येतात. ३ तुकाराम महाराज म्हणतात, असे हे दगडाप्रमाणे जड बुद्धीचे लोक माझ्याकडून रक्षिले जाणार नाहीत. ४

---

१ बापुडेपणें मी देवा, २ राहातील.

। शब्दार्थ व टीपा – मोट-शरीराचे मोटकुळें, घाटू-चेगटू

अर्थ –सदा सर्व काळ आम्ही कसले सावध राहातो ? अनेक व्यवसायाच्या अभ्यासासाठी आमचे मन गुतल्यामुळे आम्ही सावध कसे राहाणार ? १ असे असले तरी आम्ही आमच्या देहाचे मोटकुळे तुमच्या पायांवर ठेविले आहे कारण अनेक प्रकारच्या गुणावगुणानी आम्हास कासावीस केले आहे २ मी याच्या कामात अनेक प्रकारांनी हाका मारीत आहे आधीमधीच आम्हास आता चेगरू नका ३ तुकाराम महाराज म्हणतात, अहो श्रीपती आमच्या झोपेत जागृतीच्या अवस्थेत आणि स्वप्नातही तुम्हीच एक साक्षी आहात ४

२७१९ नसताचि दाउनि भेव । केला जीव हिंपुटी ।। १ ।।
जालों तेव्हा कळले जना[1] । वाउगा हा आकात ।। २ ।।
गवसिलो पुढें मागें । लाग लागे पावला ।। ३ ।।
तुका म्हणे केली आणि । सलगीच्यानीं सन्मुख ।। ४ ।।

शब्दार्थ व टीपा :– भेव–भीती, हिंपुटी–त्रस्त, कासावीस, गवसिलों–सापडलो, लाग–लाभ,लागें–लगबगीने, आयणी–इच्छा, हेतू

अर्थ – देवा, तुम्ही मला नाही तेच भय दाखवून त्रस्त केलेत माझा जीव फार कष्टी झाला १ हा सर्व पसारा व्यर्थच आहे असे मला मी जेव्हा जागृत झालो तेव्हा समजले २ जन्ममृत्यूच्या तावडीत जेव्हा मागे पुढे मी सापडलो होतो तेव्हा त्वरित लगबग केल्यामुळे तुमचा लाभ मला झाला ३ तुकाराम महाराज म्हणतात, तुमच्या पुढे उभे राहून सलगीच्या भक्तानी तुमच्या प्राप्तीविषयी मनात हेतु धारण केला ४

२७२० हें का आम्हा सेवादान । देखो सीण विषमाचा ।। १ ।।
सांभाळा जी ब्रीदावळी । तुम्ही का कळीसारिखे ।। २ ।।
शरणागत वैऱ्या हातीं । हे निश्चिती देखिली ।। ३ ।।
तुका म्हणे इच्छीं भेटी । पाय पोटीं उफराटे ।। ४ ।।

शब्दार्थ व टीपा – सीण–त्रास, कष्ट, विषम–विरुद्ध, प्रतिकूल भाव

अर्थ – प्रतिकूल भावामुळे आम्हास कष्ट व्हावेत हेच का आम्हाला तुमच्या सेवेचे दान आहे ? १ अहो देवा, तुम्ही आपले ब्रीद सांभाळा ना ! कलियुगाप्रमाणे तुम्ही विपरीत वर्तन का करता ? २ जे तुम्हांस शरण आले आहेत त्यांना शत्रूच्या हातांत तुम्ही देता हीच निश्चित स्थिती तुम्ही त्याची पाहिली, नाही का ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी तुमच्या भेटीची इच्छा करीत आहे, पण तुम्ही मात्र आपले पाय उफराटे पोटात घेऊन माझ्यापासून ते दूर करीत आहात ४

२७२१ का हो आलें नेणो भागा । पांडुरंगा माझिया ।। १ ।।
उफराटी तुम्हा चाली । क्रिया गेली सत्याची ।। २ ।।
साक्षी हेंगे[2] माझें मन । आर्त कोण होतें तें ।। ३ ।।
तुका म्हणे समर्थपणें । काय नेणें करीतसा ।। ४ ।।

शब्दार्थ व टीपा – भागा–वाटयास हेंगे–इकडे, आर्त–इच्छा

अर्थ – पांडुरंगा अशा प्रकारची उपेक्षा आमच्याच वाटयास का आली हे काही समजत नाही १ तुमची सर्व वागणूकच उफराटी झालेली दिसते सरळपणाची वागणूकच नाहीशी झालेली आहे २ पूर्वी तुमची माझ्या

१ जना २ हें गे

विषयी जी इच्छा होती तिच्याबद्दल माझे मनच साक्षी आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, तुम्ही समर्थ असूनही असे काय करता, हे काही माझ्या ध्यानात येत नाही ४

२७२२ शकुनानें लाभ हानि । येथूनिच कळतसे ॥ १ ॥
भयारूढ जालें मन । आता कोण विश्वास ॥ २ ॥
प्रीत कळे आलिंगनीं । संपादनीं अत्यंत ॥ ३ ॥
तुका म्हणे मोकलिले । कळों आले बरवे हे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – मोकलिलें–सोडले, बरवें–चांगले, नीटपणे.

अर्थ – जसा शकुन होत जाईल त्याप्रमाणे हानी अथवा लाभ होईल, हे आपल्याच ठिकाणी समजते १ देवा, माझ्या मनात आता भय निर्माण झाले आहे तुमचा विश्वास आता कुणी कसा धरावा ? २ आत्यंतिक प्रीती संपादन केली आहे हे आलिंगनाच्या प्रकारावरून समजून येते ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तुम्ही, आम्हांस सोडले आहे, हे आम्हास नीटपणे समजून आले आहे ४

२७२३ नव्हेव निग्रह देहासी दंडण । न वजे भूकतान सहावली ॥ १ ॥
तरि नित्य नित्य करीं आळवण । माझा अभिमान असों द्यावा ॥ २ ॥
नाहीं विटाळिले कायावाचामन । संकल्पासी[1] भिन्न असेचि या ॥ ३ ॥
तुका म्हणे भवसागरीं उतार । कराया आधार इच्छीतसे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – निग्रह–निश्चय, न वजे–जात नाही, सहावली–सहन केली, आळवण–विनती, प्रार्थना.

अर्थ – देवा, तुमच्या प्राप्तीसाठी माझ्याकडून निश्चय होत नाही, त्यासाठीच देहास शासन करणे जमत नाही लागलेली तहानभूक सहन करवत नाही १ म्हणून आम्ही रोज तुमची प्रार्थना करीत असतो यासाठी तुम्ही माझा अभिमान धरावा २ तुमच्या शिवाय दुसऱ्या कुठल्याही विचाराने माझे शरीर, माझी वाणी, माझे मन यांना विटाळ झालेला नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, या भवसागरातून तरून जाण्यासाठी तुमच्या आधाराचीच इच्छा मी करीत आहे ४

२७२४ आइकिली कीर्ति संतांच्या वदनीं । तरि हें ठाकोनि आलों स्थळ ॥ १ ॥
मागिला पुढिला करावे सारिखें । पालटो पारिखें नये देवा ॥ २ ॥
आम्हांसी विश्वास नामाचा आधार । तुटता हे थार उरी नाहीं ॥ ३ ॥
तुका म्हणे येथें नसावेंचि दुजें । विनती पंढरिराजें परिसावी हे ॥ ४ ॥

२७२५ मोलाचे आयुष्य वेचतसे सेवे । नुगवता गोवे खेद होतो ॥ १ ॥
उगवूं आलेति तुम्ही नारायणा । परिहार या सिणा निमिपात ॥ २ ॥
लिगाडाचे मासी न्यायें जाली परी । उरली ते उरी नाहीं काहीं ॥ ३ ॥
तुका म्हणे लाहो साधीं वाचाबळें । ओढियेलो काळें धाव घाला ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – नुगवता-सोडवले न जाता गोवे-कोडे, उगवू-सोडविण्यासाठी, सिणा-त्रासाचा, निमिषात-एका क्षणात, लिगाडात-गुळाच्या पाकात, लाहो-लाभ

अर्थ – देवा, मी मोठ्या मोलाचे आयुष्य तुमच्या सेवेत खर्च करीत आहे परंतु संसाराचे कोडे सुटत नसल्यामुळे मनास फार खेद होत आहे १ नारायणा, हा गुंता सोडविण्यासाठी तुम्हीच जर आलात या संसार-दुःखाचा एका क्षणात नाश होईल २ गुळातल्या पाकात अडकलेल्या माशीप्रमाणे माझी स्थिती झालेली आहे आता यात काही कमतरता उरली आहे असे नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, या काळाने मला ओढले आहे तुम्ही धावत या व मला सोडवा मी माझ्या वाणीच्या बलाने हा लाभ करून घेईन ४

२७२६ म्हणऊनि जालो क्षेत्रींचे संन्यासी । चित्त आशापासीं आवरूनि ॥ १ ॥
कदापि ही नव्हे सीमा उलंघन । केले विसर्जन आव्हानींच ॥ २ ॥
पारिखा तो आता जाला दुजा ठाव । दृढ केला भाव एकविध ॥ ३ ॥
तुका म्हणे कार्यकारणाचा हेवा । नाहीं जीव देवा समर्पिला ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – क्षेत्रींचे-देहाचे, आव्हानींच-आरंभीच, प्रथमच, पारिखा-परका, हेवा-हाव

अर्थ — सर्व इच्छाआशातील चित्त आवरून धरून आम्ही देहरूपी क्षेत्राचा त्याग करून संन्यासी बनलो आहोत १ पहिल्या प्रथमच आम्ही देहभावाचे विसर्जन केले असल्यामुळे त्याच्या सीमेचे उल्लंघन आता कधीच होणार नाही २ आम्ही आता देवाबद्दल आमचा भाव दृढ केला आहे यामुळे आता याच्या खेरीज दुसरे स्थान आम्हांस परकेच झाले आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, आम्ही आमचा जीव देवास समर्पण केला असल्याने आम्हांस कार्यकारणाची, व्यवहाराची हाव उरलेली नाही ४

२७२७ विभ्रंशिली बुद्धि देहात जवळी । काळाची अकाळीं[1] वायचाळा ॥ १ ॥
पालटले जैसे देंठ सांडी[2] पान । पिकले आपण तयापरी ॥ २ ॥
न मारिता हीन बुद्धि दुःख पावी । माजल्याची गोवी तयापरी ॥ ३ ॥
तुका म्हणे गळ लागलिया मत्स्या । तळमळेचा तैसा लवलाहो ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – विभ्रंशिली-भ्रष्ट झाली, वायचाळ-व्यर्थ वडबड, गोवी गुंतवणूक, वढता

अर्थ – आपला देहान्त जवळ आला तेव्हा आपली चांगली बुद्धीही भ्रष्ट झाल्यासारखी होते अशी अंतकाळी वेगळीच बडबड करण्याचे काम काळ करीत असतो १ एखाद्या झाडाच्या पानाचा हिरवेपणा ते पिकल्यानंतर पालटतो आणि मग ते देठापासून गळून पडते तसेच अखेरीस आपली स्थिती होते २ ज्याची बुद्धीच हीन प्रकारची आहे त्यास कुणी मारले नाही तरी तो दुःखीच असतो त्याचप्रमाणे कुठलीही वाढता उन्मतता निर्माण करीत असते ३ तुकाराम महाराज म्हणतात, गळास लागलेल्या माशाची जशी तळमळ होते, तशीच अवस्था अंतकाळी लोकांची होत असते ४

२७२८ न वजावा तो काळ वांया । मुख्य दया हे देवा[3] ॥ १ ॥
म्हणऊनि जैसे तैसे । रहणी असे पायांचे ॥ २ ॥

१ अवकाळीं, २ सोडी, ३ देवाची

मोकळें हें मन कष्ट । करी नष्ट दुर्जन ॥ ३ ॥
तुका म्हणे काहीं नेणें । न वजें येणेपरी वाया ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – नवजावा–जाऊ नये, रहणी–रीतीने पद्धतीने

अर्थ – देवा, आमचा वेळ व्यर्थ जाऊ नये हीच दया तुम्ही माझ्यावर करावी १ यासाठी आम्ही जसे आहोत तसेच राहू व तुमच्या पायांजवळ तुमच्याच रीतीने वास करू २ माझे हे मुक्त मन फार दुष्ट असून ते मला फार कष्ट देते ३ तुकाराम महाराज म्हणतात, आम्ही काही इतर जाणीत नाही पण यामुळे आम्ही काही वाया जाणार नाही ४

२७२९ कल्पतरूअंगीं इच्छिलें तें फळ । अभागी दुर्बळ भावे सिद्धी ॥ १ ॥
धन्य त्या जाति धन्य त्या जाती । नारायण चित्तीं सांठविला ॥ २ ॥
बीजाऐसा द्यावा उदकें अंकुर । गुणाचे प्रकार ज्याचे तया ॥ ३ ॥
तुका म्हणे कळे पारखिया हिरा । ओझें पाठी खरा चंदनाचें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – उदकें–पाण्याने, खरा–गाढवास

अर्थ – इच्छेस येईल ते फळ देण्याचे सामर्थ्य कल्पतरूच्या अंगी असते, आणि जे कुणी अभागी व दुर्बल असतात ते याच सिद्धीची इच्छा करतात १ पण ज्यांनी आपल्या चित्तात नारायण साठविला आहे अशाच जाती धन्य धन्य होत २ ज्याप्रमाणे बीज असेल त्याप्रमाणे पाण्याच्या योगाने अंकुर उगवतो ज्याच्या त्याच्या गुणांप्रमाणे जसे तसे प्रकार घडून येतात ३ तुकाराम महाराज म्हणतात, जे पारखी आहेत, त्यांनाच हिऱ्याची परीक्षा नीट करता येईल गाढवाच्या पाठीवर चंदनाचे ओझे असले तरी त्याला त्याच्या सुगंधाचा काय उपयोग ? ४

२७३० उकरडा आधीं अंगीं नरकाडी । जातीची ते जोडी तेचि चित्तीं ॥ १ ॥
कासयाने देखे अंधळा माणिकें । चवीविण फिकें वाया जाय ॥ २ ॥
काय जाणे विष पालटों उपचारें । मुखासी अंतर तोचि बरें ॥ ३ ॥
तुका म्हणे काय उपदेश वेडया । सगें होतो रेडयासवें कष्ट ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – जोडी–प्राप्ती

अर्थ – ज्याचे अंग उकिरड्यासारखे व नरकासारखे आहे त्याची प्राप्ती ज्याच्यात्याच्या मनाप्रमाणे ज्याची त्यास होत असते १ जो कुणी आंधळा आहे त्यास माणिकासारखे रत्न कसे दिसणार ? जिभेला जर चवच नसेल तर मग चांगल्या पक्वान्नाचाही काय उपयोग ? ते रुचिकर असूनही फिकेच पडते २ कितीही उपाय केले तर विषाचा कडवटपणा व जहरीपणा पालटेल काय ? ते आपल्या मुखापासून दूर असते हेच बरे ३ तुकाराम महाराज म्हणतात वेडया माणसास उपदेश करून काय उपयोग ? रेडयासारख्या निर्बुद्ध माणसाच्या संगतीने कष्ट मात्र होणार ४

२७३१ जया शिरीं कारभार । बुद्धि सार तयाची ॥ १ ॥
वर्ते तैसें वर्ते जन । बहुता गुण एकाचा ॥ २ ॥
आपणीया पाक करी । तो इतरीं सेविजे ॥ ३ ॥
तुका म्हणे शूर राखे । गाढ्या[1] वाखे सांगातें ॥ ४ ॥

[1] गांड्या

शब्दार्थ व टीपा - पाक-स्वयंपाक, गाढया-दुबळया अशक्त, थाबे-नाश, संकट

अर्थ - ज्याच्या डोक्यावर भारमाराचे ओझे असते त्याची बुद्धी साररूपाची राहाते १ ती अशी वागणूक ठेवील त्याप्रमाणे इतर लोक वागतात या एकाचा गुण पुष्कळाना लागतो २ चागली माणसे आपण जो स्वयंपाक करितात तोच इतरांना सेवन करण्यास देतात ३ तुकाराम महाराज म्हणतात, शूर माणसाच्या संगतीने आपण गेलो तर आपले रक्षण होईल आणि दुबळ्या माणसाच्या संगतीत आपला नाशच होईल ४

२७३२ एक एका साह्य करू । अवघे धरू सुपथ ॥ १ ॥
कोण जाणे कैसी परी । पुढें उरी ठेविता ॥ २ ॥
अवघे धन्य होऊं आतां । स्मरविता स्मरण ॥ ३ ॥
तुका म्हणे अवघी जोडी । ते आवडी चरणाची ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा - परी-प्रकार, उरी-कमतरता, जोडी-प्राप्ती

अर्थ - जनहो आपण एकमेकाना साह्य करून सन्मार्ग धरू १ नाहीतर काही कमतरता राहिली तर कोण जाणे काय प्रकार होईल तो २ एकमेकाना विठ्ठलाचे स्मरण देताना आपण सर्वजणच धन्य होऊन जाऊ ३ तुकाराम महाराज म्हणतात त्या श्रीहरीच्या चरणाची एकदा आवड निर्माण झाली की सर्व सुखाची प्राप्ती होईल ४

२७३३ फळकट तो संसार । येथें सार भगवंत ॥ १ ॥
ऐसें जागवितो मना । सरसे जनासहित ॥ २ ॥
अवघें निरसूनि काम । घ्यावे नाम विठोबाचें ॥ ३ ॥
तुका म्हणे देवाविण । फेला सीण तो मिथ्या ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा - फळकट-फोलकटाप्रमाणे, काम-सांसारिक वासना

अर्थ - संसार हा फोलकटाप्रमाणे निरर्थक असून या जगात सारभूत असा एक भगवंतच आहे १ मी इतर लोकांबरोबरच या विचाराने माझ्या मनास जागवीत असतो २ सर्व प्रापंचिक वासनांचा त्याग करून विठ्ठलाचे नाम तेवढे घ्यावे ३ तुकाराम महाराज म्हणतात देवाच्या स्मरणावाचून इतर कष्ट व्यर्थच होत ४

२७३४ सुधारसे ओलावली । रसना धाली न धाय ॥ १ ॥
फळों नये जाली धणी । नारायणीं पूर्णता ॥ २ ॥
आवडे तें तेंच यासी । ब्रह्मरसीं निरसें ॥ ३ ॥
तुका म्हणे बहुता परी । करूनि करीं सेवन ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा - धाली-संतुष्ट झाली, धाय-तृप्ती, धणी-तृप्ती

अर्थ - श्रीहरीच्या स्मरणाने माझी जीभ ओलसर झालेली आहे ती संतुष्ट झाली असली तरी तिची तृप्ती अजून झालेली नाही १ नारायणाच्या प्राप्तीची पूर्णता झालेली लक्षातच येऊ नये एवढी ती तृप्त आहे २ तिला या नारायणाचे नामस्मरण सतत आवडते त्यामुळे तिला ब्रह्मरसाच्या प्राप्तीतही निरसता वाटते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा प्रकारे भगवंताच्या नामाचे चिंतन मी बहुत प्रकारांनी करीत आहे ४

२७३५ असतों काटाळा हा नव्हे मत्सर । ब्रह्म तें विकारविरहित ॥ १ ॥
तरि म्हणा त्याग प्रतिपादलासे । अनादि हा असे वेराकार ॥ २ ॥

सिजले हिरवें एका नावें धान्य । सेवनापें भिन्न निवडे[1] तें ॥ ३ ॥
तुका म्हणे भूतीं साक्षी[1] नारायण । अवगुणीं दंडण गुणीं पुजा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – असतों–खोटया गोष्टीत, फाटाळा–नष्ट, श्राम, कटाळा, वैराकार–विरोधाचा भाव, सिजलें–शिजलेले

अर्थ – खोटया गोष्टींविषयी कटाळा असणे याला कधी मत्सर म्हणू नये यहा मात्र सर्व प्रकारच्या विकाररहित असते १ असे असले तरी खऱ्याचा स्वीकार व खोटयाचा त्याग असे प्रतिपादन अनादी कालापासूनचे आहे खऱ्या खोटयातील हा विरोध पूर्वीपासूनचा आहे २ शिजलेले आणि हिरवे असलेले धान्य एकाच नावाने ओळखले असले तरी आपण शिजलेल्याचा स्वीकार करून हिरव्याचा त्याग करतो अशी मत्सरामुळे आपण निवड करतोच ३ तुकाराम महाराज म्हणतात सर्व भूतमात्रात साक्षी नारायण आहे आणि तो अवगुणी लोकांना शिक्षा करतो गुणी लोकाचे मात्र पूजनच होते ४

२७३६ आपुलें आपण जाणावें स्वहित । जेणें राहे चित्त समाधान ॥ १ ॥
बहुरंगें माया असे विखरली[3] । कुंटितचि चाली होता बरी ॥ २ ॥
पूजा ते अबोला चित्ताच्या प्रकारीं । भाव विश्वंभरीं समर्पावा ॥ ३ ॥
तुका म्हणे गेला फिटोनिया भेव । मग होतो देव मनाचाचि ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – चाली–वागणूक वर्तन, भेव–भयभीत

अर्थ – आपले हित कशात आहे हे आपले आपणच जाणावे यामुळेच आपल्या चित्तास समाधान प्राप्त होईल १ या जगतात माया अनेक रंगानी पसरलेली आहे तिच्या विषयीची वागणूक मर्यादित ठेवावी हेच बरे २ विश्वंभरास आपला एकनिष्ठ भाव समर्पण करावा आणि मग अबोल चित्ताच्या स्थितीत राहावे, हीच त्या विश्वंभराची खरी पूजा होय ३ तुकाराम महाराज म्हणतात मनातील भीती एकदा संपून गली की मग मनच देवरूप होऊन जाते ४

२७३७ असोनि न कीजे अलिप्त अहंकारें । उगीच या भारें कुयाकुथी ॥ १ ॥
धावा सोडवणें वेगीं लवकरी । मी तों जालों हरी शक्तिहीन ॥ २ ॥
भ्रमल्यानें दिसे बाधल्याचेपरी । माझें मजवरी वाहोनिया ॥ ३ ॥
तुका म्हणे धांव घेतलीसे सोई । आता पुढें येईं लवकरी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – अलिप्त–वेगळा

अर्थ – आत्मा हा देहापेक्षा वेगळा असूनही अहंकारामुळ तो अलिप्त आहे असे वाटत नाही देहाच्या अनेक विकाराच्या भाराने तो उगाचच कुथत बसला आहे १ श्रीहरी मला या भ्रमातून लौकर सोडविण्यासाठी तुम्ही धावत या मी तर आता अगदीच शक्तिहीन बनलो आहे २ देहभावाच्या भ्रमाने मी बद्ध झाल्यासारखा दिसत आहे मीच माझ्यावर हे बंधन लादून घतले आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात मी आता सोईने तुमच्या कडे धाव घेतली आहे आता तू लौकरच माझ्याकडे धावून ये ४

२७३८ आपुल्याचा भोत चाटी । मारी करटी पारख्या ॥ १ ॥
ऐसें जन भुललें देवा । मिथ्या हेवा वाढवी ॥ २ ॥
गळी गिळी आमिषें मासा । प्राण आशा घेतला ॥ ३ ॥
तुका म्हणे वोकडमोहो । धरी पहा हो लाटिक ॥ ४ ॥

१ निवडणें २ गास ३ विसुरली ४ पारिख्या

शब्दार्थ व टीपा :- भोत-कातडे काढून त्यात भुस्सा भरून तयार केलेली वासराची आकृती, मिथ्या-खोट्या, हेवा-हाव

अर्थ - आपल्याच वासराचा पेंढा भरून तयार केलेला मृत देह गाय चाटते पण दुसऱ्या गाईचे खरे वासरू तिच्या जवळ आले तर ती त्याला मारते १ देवा, लोक अशीच खोट्या प्रपंचाची हाव धरतात खोटी हाव मात्र वाढवतात २ कोळ्याने लावलेल्या गळाच्या आमिषाकडे लक्ष देऊन मासा तो गळ गिळतो व मग प्राण गमावतो त्याचा प्राण या प्रकारच्या आमिषाच्या आशेनेच घतलेला असतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, बोकडसुद्धा मोहामुळेच त्याला मारणाऱ्या खाटकाची संगत धरतो ४

२७३९ विषय तो मरणसर्गी । नेणे सुटिका अभागी ॥ १ ॥
शास्त्राचा केला लुडा । तोडीं पाडियेला धोंडा ॥ २ ॥
अगर्वी मोक्ष नाहीं ठावा । काय सांगावे गाढवा ॥ ३ ॥
तुका म्हणे ग्यानगड । सुखें[1] पावो देवा नाड ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा - सुटिका-सुटका, मुक्तता लुडा-पंगू, लंगडे, ग्यानगड-अल्पज्ञानी व गर्विष्ठ, नाड-फसवणूक

अर्थ - विषयाच्या संगतीन तर मरणाचा घातच आहे त्यातून सुटका कशी करावी हे अभागी माणसास समजत नाही १ अशा माणसाने सत शास्त्राना पंगू करून आपल्याच पायावर धोंडा पाडून घेतलेला आहे २ या माणसास मोक्षाची कल्पनाही काही माहीत नाही अशा गाढवास काय उपदेश करावा ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, अशा प्रकारचे हे अल्पज्ञानी व गर्विष्ठ लोक या प्रपंचात सुखाने फसवणूक पावोत अथवा असे लोक सुखासुखी देवास मिळवीत नाहीत ४

२७४० मीच विखळ मीच विखळ । येर सकळ बहु बरें ॥ १ ॥
पाहिजे हें क्षमा केलें । येणे बोले विनवणी ॥ २ ॥
मीच माझें मीच माझें । जालें ओझें अन्याय ॥ ३ ॥
आधीं आंचवला आधीं आचवला । तुका झाला निमनुष्य ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा - विखळ-दुष्ट दुराचारी, यर-इतर, बावी, निमनुष्य-मनुष्यधर्माशिवाय

अर्थ - मीपणा हा दुष्ट आहे बाकी सर्व फार चांगले आहे १ याबद्दल तुम्ही मला क्षमा करावी अशी माझी विनती आहे २ सर्व मीच आहे, हे माझेच आहे या भावनेच्या ओझ्याने फार मोठा अन्याय झालेला आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात मी या मीपणापासूनच आधीच मोकळा झालेलो असल्यामुळे मनुष्यधर्म-विरहित बनलो आहे ४

२७४१ येणें जाणे तरी । राहे देव कृपा करी ॥ १ ॥
ऐसें तव पुण्य नाहीं । पाहाता माझें गाठी कांहीं ॥ २ ॥
भय निवारिता । कोण वेगळा अनंता ॥ ३ ॥
तुका म्हणे वारे भोग । वारी तरी पांडुरंग ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा - वारे-निवारील

[1] पावे, सुखें देवा पावेना,

अर्थ – या देवाकडे वारवार जाणेयेणे राहिले तर तो आपल्यावर कृपा करील १ अशा प्रकारचे पुण्य तर मात्याजवळ बिलकुल नाही २ या अनंताशिवाय आपले भय निवारण करणारा दुसरा कोण आहे ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, हा पांडुरंग संसारभोग निवारील तरच ते दूर होतील ४

२७४२ भल्याचे कारण सांगावें[१] स्वहित । जैसी कळे नीत आपणासी ॥ १ ॥
परी आम्ही असो एकाचिये हातीं । नाचवितो चित्तीं त्याचे तैसे ॥ २ ॥
वाट सांगे त्याच्या पुण्या नाहीं पार । होती उपकार अगणित ॥ ३ ॥
तुका म्हणे तुम्ही बहु कृपावंत । आपुलें उचित केलें संतीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – कारण–काम, कर्तव्य

अर्थ – जे सज्जन आहेत त्यांचे काम हेच की, त्यांनी स्वहित काय आहे हे आपणास जशी नीत समजेल त्याप्रमाणे लोकांना समजावून सांगावे १ परंतु आम्ही सर्वांच्या चित्तात राहून सर्वांना त्याप्रमाणे वर्तन करावयास लावणाऱ्या श्रीहरीच्या हातात राहू २ आडरानात सापडल्यास जो सरळ मार्ग दाखवितो, त्याच्या पुण्यास पारावार नाही कारण त्याचे लोकांवर अनंत उपकार होत असतात ३ तुकाराम महाराज म्हणतात, तुम्ही संत फारच कृपावंत असून तुम्ही लोकांना नीती सांगण्याचे उचित असे कर्तव्य केले आहे ४

२७४३ लावूनिया पुष्टी पोर । आणि करकर कथेमाजी ॥ १ ॥
पडा पाया करा विनंती । दवडा हातीं धरोनियां ॥ २ ॥
कुर्वाळूनि बैसे मोहें । प्रेम का हें नासीतसे ॥ ३ ॥
तुका म्हणे वाटे चित्त । करा फजित म्हणऊनि ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – पुष्टी–पाठीशी, करकर–कटकट, वाटे–फाटते

अर्थ – आपल्या रडक्या पोरास पाठीशी बांधून ही बाई कथेमध्ये येऊन कटकट फार करते १ तिच्या पाया पडून कथेमधून निघून जाण्याबद्दल तिला विनंती करा तिने काही ऐकले नाही तर हाताला धरून तिला कथे-मधून हाकलून द्या २ आपल्या रडक्या मुलास लाडाने कुरवाळून त्याच्या प्रेमाने ती कथेतच बसते पण यामुळे ती श्रीहरीच्या प्रेमात का बिघाड आणीत आहे ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, तिच्या अशा वागण्याने वक्त्याचे आणि श्रोत्याचे चित्त फाकते म्हणून तिला फजिती करून हाकलून द्या ४

२७४४ पुण्य उभें राहो आता । संताचें[२] याकारणें ॥ १ ॥
पंढरीचे लागा वाटे । सखा भेटे विठ्ठल ॥ २ ॥
संकल्प हे यावे फळा । कळवळा बहुताचा ॥ ३ ॥
तुका म्हणे होऊनि क्षमा । पुरुषोत्तमा अपराध ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – फळा–फलद्रूप अवस्थेस

अर्थ – पुढे सांगितलेल्या कारणासाठी आता या संतांची पुण्याई उभी रहावी १ लोकहो, आता तुम्ही पंढरपूरच्या वाटेला लागा येथेच तुम्हांला तुमचा सखा विठ्ठल भेटेल २ पुष्कळ लोकांच्या कळवळ्याने त्यांचे संकल्प फलद्रूप व्हावेत ३ तुकाराम महाराज म्हणतात, पुरुषोत्तमा, आपणांकडून सर्व अपराधांची क्षमा व्हावयास हवी ४

१ करावें, २ संताचियें कारणें

२७४५ आइकिली मात । पुरविले मनोरथ ॥ १ ॥
प्रेम वाढविले देवा । बरवी घेऊनिया सेवा ॥ २ ॥
केली विनवणी । तैसी पुरविली धणी ॥ ३ ॥
तुका म्हणे काया । रसा कुरोंडी वरोनिया[1] ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – मात–गोष्ट, हकीगत, बरवी–चांगली, धणी–तृप्ती, कुरोंडी–कुरवंडी, काया–शरीर.

अर्थ – देवा, मी तुमची सर्व हकीगत ऐकिली त्यामुळे माझे सर्व मनोरथ पूर्ण झाले १ देवा, माझ्या-कडून चांगली सेवा घेऊन तुमच्या विषयीचे प्रेम चांगलेच वाढविले २ मी जी जी विनती तुम्हांस केली त्याप्रमाणे माझी इच्छा तुम्ही तृप्त केलीत ३ तुकाराम महाराज म्हणतात, तुमच्या प्रेमरसावरून माझा देह कुरवंडी करून ओवाळून टाकावा असे मला वाटते ४

२७४६ संताची स्तुति ते दर्शनाच्या योगें । पडिल्या प्रसगें ऐसी कीजे ॥ १ ॥
संकल्प ते सदा स्वामीचेचि चित्तीं । फाकों नये वृत्ति अखंडित ॥ २ ॥
दास्यत्व तें असे एकविध नावें । उरों नये जीवें भिन्नत्वासी ॥ ३ ॥
निज बीजा येथें तुका अधिकारी । पाहिजे तें पेरी तये वेळे[2] ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – फाकों नये–भलतीकडे नेऊ नयेत

अर्थ – दर्शनाच्या प्रसंगी प्रसंग येईल त्याप्रमाणे संताची स्तुती करावी १ नेहमी स्वामीच्या विषयीच सर्व संकल्प असावेत त्याच्याविषयी अखंडित असणारी वृत्ती उगाच भलतीकडे फाकू देऊ नये २ ईश्वराविषयी एकनिष्ठा असणे हेच खरे दास्यत्व होय आपला जीव स्वामीस अर्पण करावा भिन्नत्वाने 'वेगळे राहूच नये ३ तुकाराम महाराज म्हणतात, निजात्मस्वरूपाच्या बीजाविषयीचा मी येथे अधिकारी असून ज्या वेळेस जे पाहिजे त्याची पेरणी मी करीत असतो ४

२७४७ सेजेचा एकांत अग्नीपाशीं कळे । झाकिलिया डोळे अधःपात ॥ १ ॥
राहो अथवा मग जळो अग्नीमधीं । निवाड तो आधीं होऊनि गेला ॥ २ ॥
भेणें झडपणी नाहीं येथें दुजें । पादरधिट्या ओझें हतियारें ॥ ३ ॥
तुका म्हणे मज नाहीं जों भरवसा । तोंवरि सहसा निवाडा तो ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – निवाड–निर्णय, भेणें–भीतीने, पादरधिटा–खरे धैर्य नसलेला, बढाईखोर

अर्थ – एखादी स्त्री सेजेवर पतीबरोबर एकांतात क्रीडा करीत असते पण शेवटी पतीबरोबर सहगमन करायचा प्रसंग आला की अग्नीच्या सान्निध्यात तिचे प्रेम समजून येते त्यावेळी तिने भयाने अथवा मोहाने डोळे झाकले की तिचा अधःपात झाला असे समजावे १ मग ती जिवंत राहो अथवा आगीत उडी टाकून जळून जावो पण यापूर्वी तिच्या एकनिष्ठेचा निर्णय होऊन गेलेला असतो २ शौर्यवृत्तीच्या ठिकाणी भयाचे वडपण कधी नसतेच परंतु उगाच बढाईखोर पण भित्रा मनुष्य मात्र हत्याराचे ओझे होते म्हणून भिऊन जातो ३ तुकाराम महाराज म्हणतात, कसोटीच्या प्रसंगी जोपर्यंत निवाडा झालेला नाही, तोपर्यंत मला कुणाचाच भरवसा वाटत नाही. ४

२७४८ न सरे भांडार । भरलें वेंचितां अपार ॥ १ ॥
मथित्याचें पोट भरे । पुढिलांसी पुढें उरे ॥ २ ॥

---

१ वरूनियां, २ वेळीं

कारणापुरता । लाहो आपुलाल्या हिता ।। ३ ।।
तुका म्हणे देवा । पुढें केला चाले हेवा ।। ४ ।।

शब्दार्थ व टीपा – वेंचिता–खर्च केले असता, मवित्याचें–माप करणाराचे, हेवा–हाव

अर्थ – श्रीहरीच्या कृपेचे हे भांडार इतके भरलेले आहे की त्यातून कितीही खर्च केला तरी ते कधी सरणारे नाही १ याचे मोजमाप जो करतो त्याचे पोट तर भरतेच, पण पुढल्या लोकांच्यासाठी ते खूपच उरलेले असते २ आपापले हित साधण्यासाठी ज्याने त्याने कारणापुरते त्याचे सेवन करावे, ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवापुढे आपण त्याची हाव धरली तर ती पूर्ण होते ४

२७४९ 'तरी हाव केली अमुपा व्यापारें । व्हावे एकसरें धनवंत ।। १ ।।
जालों हरिदास शूरत्वाच्या नेमें । जालीं ठावीं वर्में पुढिलांचीं ।। २ ।।
जगावेगळें हें असे अभिनव । बळी दिला जीव म्हणऊनि ।। ३ ।।
तुका म्हणे परी लागलों विल्हेसी । चालतिया दिसीं स्वामी ऋणी ।। ४ ।।

शब्दार्थ व टीपा – अमुपा–अमाप, पुष्कळ, विल्हेसी–वाटेस, मार्गात

अर्थ – पुष्कळ व्यापाराची हाव धारण करून एकदम धनवंत व्हावे म्हणून खटपट केली १ मोठ्या शूरत्वाने एकनिष्ठपणें हरिदास झालो पुढे गेलेल्या हरिदासांकडून मला त्याला प्राप्त करून घेण्याची वर्में सापडली २ हा अभिनवत्वाचा लाभ जगावेगळाच असा मला मिळालेला आहे त्याच्यासाठी मी आपला जीव बळी दिलेला आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी या मार्गाने चालू लागलो आणि त्याच दिवसापासून हा स्वामी माझा ऋणी झालेला आहे ४

तुकाराम महाराज म्हणतात, खरे म्हणजे हे विषय विषवत असूनही हे नष्ट लोक त्यास अमृताप्रमाणे मानून पापपुण्यांची चिंता करीत नाहीत. ४

२७५२ कायावाचामनें जाला विष्णुदास । काम क्रोध त्यास बाधीतना ॥ १ ॥
विश्वास तो करी स्वामीवरी सत्ता । सकळ भोगिता होय त्याचें ॥ २ ॥
तुका म्हणे चित्त करावें निर्मळ । येऊनि गोपाळ राहे तेथें ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा :– कायावाचामनें–शरीर , वाणी व मन याच्या साह्याने.

अर्थ :– शरीर, वाणी व मन यांच्या साह्याने जो अनन्यभावाने विष्णुदास बनला आहे त्यास काम, क्रोध इत्यादी विकार कधीच बाधा करीत नाहीत. १ जो सेवक आपल्या स्वामीवर विश्वास ठेवून असतो तोच त्याच्यावर स्वतःची सत्ता गाजवितो; व सर्व प्रकारचे ऐश्वर्य भोगीत असतो २ तुकाराम महाराज म्हणतात, यासाठी आपले चित्त विकाररहित असे निर्मळ करावे. म्हणजे त्या ठिकाणी गोपाळ येऊन वसती करीत असतो. ३

२७५३ याती हीन मति हीन कर्म हीन माझें । सांडोनियां सर्व लज्जा शरण आलों तुज ॥ १ ॥
येईं गा तूं मायबापा पंढरीच्या राया । तुजविण सीण जाला क्षीण जाली काया ॥ २ ॥
दीनानाथ दीनबंधु नाम तुज साजे । पतितपावन नाम ऐसी ब्रीदावळी गाजे ॥ ३ ॥
वीटेवरि नीट उभा कटावरी कर । तुका म्हणे हेंचि आम्हां ध्यान निरंतर ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– याती–जात, काया–शरीर.

अर्थ :– देवा, मी हीन यातीचा आहे, माझी बुद्धी हीन प्रकारची असून माझे कर्मही हीन आहे. मी सर्व लाजलज्जा सोडून तुला शरण आलो आहे १ मायबापा, पंढरीच्या राया, तू माझ्यासाठी धावून ये. तुझ्याशिवाय मला फारच शीण झाला असून माझे शरीर भारी क्षीण होऊन गेले आहे रे. २ दीनांचा नाथ, दीनांचा बंधु असे नाव तुला फार चांगले शोभून दिसते पतितपावन अशी तुझी ब्रीदावळही सर्वत्र गाजून राहिली आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, तू विटेवर नीट उभा असून तुझे हात कमरेवर आहेत हेच ध्यान निरंतर आमच्या स्मरणात असो. ४

२७५४ गंगा आली आम्हांवरि । संतपाउलें साजिरीं ॥ १ ॥
तेथें करीन मी अंघोळी । उडे चरणरजधुळी । येती तीर्थावळी । पर्वकाळ सकळ ॥ २ ॥
पाप पळालें जळालें । भवदुःख दुरावलें ॥ ३ ॥
तुका म्हणे धन्य जालों । सप्तसागरांत न्हालों ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– चरणरजधुळी–चरणावरील धुळीचे कण.

अर्थ :– शोभिवंत दिसणारी संतपाउले आज दृष्टीस पडली, ही एक प्रकारची गंगाच आमच्यावर आलेली आहे. १ ज्या ठिकाणी संतांच्या चरणांवरील धुळीचे कण उडतात त्या ठिकाणी मी अंघोळ करीन त्याच ठिकाणी सर्व तीर्थे व सर्व पर्वकाळ यांची उपस्थिती असते. २ यामुळे माझे सर्व पाप जळून भस्म झाले असून माझे संसारदुःखही दूर झाले आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, संतकृपेच्या या सागरात न्हाल्यामुळे मी आता धन्य धन्य झालो आहे. ४

२७५५ पोटासाटीं खटपट करिसी अवघा वीळ । राम राम म्हणतां तुझी बसली[१] दांतखीळ ॥ १ ॥
हरिचें नाम कदाकाळीं कां रे नये याचे । म्हणतां राम राम तुझ्या बाचें काय वेचे ॥ २ ॥

---
[१] बैसे.

द्रव्याचिया आशा तुजला दाही दिशा न पुरती । कीर्तनासी जाता तुझी जड झाली मती ॥३॥
तुका म्हणे ऐशा जीवा काय करू आता । राम राम न म्हणे त्याचा गाढव मातापिता ॥४॥

शब्दार्थ व टीपा – खोळ–वळ, मती–बुद्धी

अर्थ – अरे तू पोटासाठीच सर्व वेळ आता खटपट तरी किती करशील ? रामनाम म्हणताना मात्र तुझी वातखोळ बसून जाते १ श्रीहरीचे नाम तुझ्या वाणीने कधीच कसे येत नाही रे ? हे रामनाम घतल्याने तुझ्या बापाचे काय खर्च होते रे ? २ द्रव्य मिळविण्यासाठी तुला दहाही दिशा कधी पुरत नाहीत पण कीर्तनास जाताना मात्र तुझी बुद्धी जड होते मद होते ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा जीवाना मी आता करू तरी काय ? जे कुणी रामनाम घेत नाहीत त्याचे आईबाप गाढव आहेत असे समजावे ४

२७५६ आम्हा सुकाळ सुखाचा[1] । जवळी हाट पंढरीचा । सादाविती वाचा । रामनामें वैष्णव ॥ १ ॥
घ्या रे आपुलाल्या परी । नका ठेवूं काहीं उरी । ओसरता भरी । तोडवरी अंबर ॥ २ ॥
वाहे बंदर द्वारका । खेप आली पुंडलिका । उमेंचि विकिले एका । सनकादिका सापडले॥३॥
धन्य धन्य हे भूमंडळी । प्रगटली नामावळी । घेती जीं दुबळीं । तीं आगळीं सदैव ॥ ४ ॥
माप आपुलेनि हाते । कोणी नाहीं निवारितें । पैस करूनि चित्तें । घ्यावें हितें आपुलिया ॥५॥
नाहीं वाटिता सरले । आहे तैसेंचि भरलें । तुका म्हणे गेले । वांयाविण न घेता ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – हाट–बाजार, सादाविती–सावध करतात परी–शक्तिप्रमाण, उरी–कमतरता, अंबर–आकाश, चिदाकाश पैस–मोकळ, मोठ

अर्थ – पढरपूरचा बाजार आम्हाला जवळचा असल्यामुळे सुखाचा मोठा सुकाळ आहे येथील वैष्णवजन रामनामाच्या वाणीने मला सावध करीत आहेत १ अरे तुम्ही आपापल्या शक्तीप्रमाणे येथील रामनामाचा माल घ्या, त्यातील काही उरू देऊ नका कमतरता करू नका त्याचा भर ओसरत आला की ताडावर मी चिदाकाशीचे पटल धरीन २ द्वारकेच्या बदरातुन प्रममक्तीचा हा माल वाहात असून यावेळची याची खेप पढरपुरास पुडलिकासाठी आलेली आहे ती त्यालाच उभी विकलेली आहे हे भाडवल सनकादिकांना सापडले आहे ३ श्रीहरीचे नाम या भूमडळी प्रकटले हें धन्य धन्य झाले जे दीन लोक भक्तिभावाने रामनामाचा लाभ घेतात त्याचे भाग्य विशेष प्रकारचे आहे ४ या हरिनामाच्या मालाचे माप आपण आपल्या हातानच करायचे असते येथे कुणी या वेळी निवारण करणारे नाही आपले चित्त सर्व विकारापासून दूर करून, मोठे करून या रामनामाच्या साहयाने आपले चित्त साधून घ्यावे ५ तुकाराम महाराज म्हणतात हा हरिनामाचा माल कितीही वाटून झाला तरी सरलेला नाही तसाच भरलेला आहे त्याचे ग्रहण न करणारे कित्येकजण वायाच गलेल दिसतात ६

२७५७ चुकलिया ताळा । वाती घालुनि बैसे डोळा ॥ १ ॥
तैसे जागे करीं चित्ता । काहीं आपुलिया हिता ॥ २ ॥
निक्षेपिले धन । तेथें गुतलेंसे मन ॥ ३ ॥
नाशिवतासाटीं । तुका म्हणे करिसी आटी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – ताळा–हिशेब निक्षेपिलें–दडवून मातीत पुरून ठवलले आटी–खटपट, प्रयत्न

अर्थ – रोजच्या व्यवहारातील जर हिशेब चुकला तर डोळ्यात तेलवात घालून बारकाईने त्याचा शोध घेतात १ त्याप्रमाणे आपले हित साधण्यासाठी आपले चित्त सतत जागे करावे २ मातीत पुरून ठवलेल्या धना

[1] नामाचा

पाशी चित्त गुंतून राहिलेले दिसेल ३ तुकाराम महाराज म्हणतात, जे नाशवंत आहे, कायमचे टिकणारे नाही त्यासाठी तुझे प्रयत्न चालू असतात ४

२७५८ करूनि जतन । कोणा कामा आलें धन ॥ १ ॥
ऐसें जाणतां[1] जाणतां । कां रे होतोसी नेणता ॥ २ ॥
प्रिया पुत्र बंधु । नाहीं तुज यांशीं संबंधु ॥ ३ ॥
तुका म्हणे एका । हरीविण नाहीं सखा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :— प्रिया–प्रिय बायको.

अर्थ :— नाशवंत धनाचे तू फार रक्षण करीत आहेस, पण त्यांचा उपयोग कुणास झालेला आहे ? १ हे तू जाणत असूनही नेणता का होत आहेस ? २ प्रिय वाटणारी बायको, मुलगा, बंधू याच्याशी खरे म्हणजे काहीच संबंध नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, श्रीहरीशिवाय दुसरा खरा सखा कुणीही नाही ४

२७५९ आम्ही देतों हाका । कां रे जालासी तूं मुका ॥ १ ॥
न बोलसी नारायणा । कळलासी क्रियाहीना ॥ २ ॥
आधीं करूं चौघाचार । मग सांडूं भीडभार ॥ ३ ॥
तुका म्हणे सेवटीं । तुम्हां आम्हां घालूं तुटी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :— चौघाचार–चारचौघातील न्याय, पंचायत.

अर्थ :— देवा, आम्ही तुला हाका मारीत आहोत; आणि तू मात्र मुका होऊन बसला आहेस. आमच्याशी बोलतच नाहीस, असे का ? १ नारायणा; तू आमच्याशी काहीच बोलत नाहीस. यावरून तू क्रियाहीन झाला आहेस असे समजून येते. २ आम्ही आधी तुला चारचौघात नेऊन न्याय करू तू जर याबाबतीत ऐकले नाहीस तर मग आम्ही काही तुझी भीड धरणार नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, शेवटी तुमचा–आमचा संबंधच आम्ही तोडून टाकू. ३

२७६० नव्हे भिडा हें कारण । जाणे करूं ऐसें जन ॥ १ ॥
जों जों धरावा लौकिक ॥ रडवितोसी[2] आणीक ॥ २ ॥
चाल जाऊं संतांपुढें । ते हें निवडिती रोकडे ॥ ३ ॥
तुका म्हणे तूं निर्लज्ज । आम्हां रोकडी गरज ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :— कारण–कार्य.

अर्थ :— देवा, तुझी भीडभाड धरल्याने काही काम होत नाही असे सर्वच लोक जाणतात आम्हीही आता तसेच करू. १ जसजसा आम्ही तुझा लौकिक राखावा तसतसा तू आम्हांला फारच रडवितोस, दुःखी करतोस. २ चल, आपण संतांपुढे जाऊ. तेच याचा खरा निवाडा करतील. ३ तुकाराम महाराज म्हणतात, तू एक लाज सोडलीस, पण आम्हांस मात्र तुझी उघडउघड जरूरी आहे. ४

२७६१ बहु होता भला । परी मे रांडेनें नासिला ॥ १ ॥
बहु शिकला रंग चाळे । खरें खोटें इचे वेळे ॥ २ ॥
नव्हतें आळवितें कोणी । इनें केला जगऋणी ॥ ३ ॥
ज्याचे त्यासी नेदी देऊं । तुका म्हणे धांवे खाऊं ॥ ४ ॥

१ जाणत, २ रडवितोसी.

शब्दार्थ व टीपा – राडेनें–मायेनें, नासिला–बिघडविला

अर्थ – हा देव पूर्वी फार चागला होता पण या मायारूपी रांडेने त्याला फार बिघडवून टाकले १ हिच्या संगतीने हा अनेक प्रकारचे खरेखोटे चाळे करायला शिकला २ प्रथम याला कुणीच ओळखीत नव्हते पण हिच्यामुळे तो जगाचा ऋणी झाला व जग याच्या नावाने हाका मारू लागले ३ तुकाराम महाराज म्हणतात, ही माया ज्याचे त्यास कधीच मिळू देत नाही, आणि कुणी मागायला आला तर ती त्यासच खाऊन टाकते ४

२७६२ काय करावे ते आता । जाले नयेसे बोलता ॥ १ ॥
नाहीं दोघांचिये हातीं । गाठीं घालावी एकातीं ॥ २ ॥
होय आपुले काज । तो हे[1] भीड सांडू लाज ॥ ३ ॥
तुका म्हणे देवा । आधीं निवडू हा गोवा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – गाठीं–भेट काज–कार्य, गोवा–गुंता

अर्थ – काही बोलता येत नाही असे झाले आहे आता करावे तरी काय ? १ आता दोघांच्याही हातात काहीं उरलेले नाही म्हणून ही माया नसताना त्या देवाची एकातात भेट घ्यावी २ जोपर्यंत आपले कार्य होत आहे तोपर्यंत लाज व भीडभाड सोडून द्यावी ३ तुकाराम महाराज म्हणतात देवा, आधी हा मायेचा गुंता तुम्ही दूर करा ४

२७६३ केली सलगी तोंडपिटी । आम्ही लडिवाळें धाकुटीं ॥ १ ॥
न बोलावें तेंचि आलें । देवा पाहिजे साहिलें ॥ २ ॥
अवघ्यामध्यें एक वेडें । तेंचि खेळविती कोडें ॥ ३ ॥
तुका म्हणे मायबापा । मजवरि कोपों नका ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – तोंडपिटी–बडबड कोडें–कौतुकाने, लाडेने

अर्थ – देवा, आम्ही तुझी लाडकी व लडिवाळ अशी मुले आहोत म्हणून तुम्यापुढे सलगीने वाटेल तशी बडबड केली आहे १ देवा आम्ही जे तुला बोलू नये तेच आमच्या मुखातून आले, तुम्ही हे सारे सहन केले पाहिजे २ सर्व मुलांत जे अवखट व वेडसर असते, त्यासच त्याचे आईबाप मोठ्या कौतुकाने व लाडाने खेळवतात ३ तुकाराम महाराज म्हणतात, मायबापा, माझ्यावर तुम्ही रागावू नका ४

२७६४ शिकवूनि बोल । केले कवतुक नवल ॥ १ ॥
आपणिया रंजविलें । बापें माझिया विठ्ठलें ॥ २ ॥
हातीं प्रेमाचे मातुकें । आम्हा देऊनिया निकें ॥ ३ ॥
तुका करी टाहो । पाहे रखुमाईचा नाहो ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – मातुकें–खाऊ निकें–चांगल्या, नाहो–पती

अर्थ – मला अशा प्रकारे बोलायला याच श्रीहरीने शिकविले आणि तोच माझ्या या बोलण्याचे कौतुक करीत आहे १ माझा बाप जो विठ्ठल त्यानेच मला बोलते करवून स्वत:स रंजवून घेतले आहे २ त्यानेच माझ्या हातात चांगल्या प्रेमाचा खाऊ दिलेला आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी हा असा अट्टाहासाने टाहो फोडीत आहे, आणि रखुमाईचा हा पती माझ्याकडे कृपावंत होऊन पाहात आहे ४

---

१ वरि

२७६५ तेथें सुखाची वसती । गाती वैष्णव नाचती । दिंड्या[1] पताका झळकती । गर्जती हरिनामें ॥१॥
दोषा जाली घेघेमारी । पळती भरले दिशा चारी । न येती माघारीं । नाहीं उरी परताया ॥२॥
विसरोनि देवपणा । उभा पंढरीचा राणा । विटोनि निर्गुणा । रूप धरिलें गोजिरें[2] ॥ ३ ॥
पोट सेवितां न धाये । भूक भुकेलीच राहे । तुका म्हणे पाहे । कोण आस मुक्तीची ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- घेघेमारी-मारामारी, दाणादाण, धाये तृप्त होत

अर्थ - ज्या ठिकाणी वैष्णव प्रभुप्रेमाने नाचतात, गातात, जेथे दिंड्या व पताका झळकतात, जेथे हरि-नामाचा गजर नेहमी होत असतो त्याच ठिकाणी सुखाची वसती असते १ या ठिकाणी सर्व प्रकारच्या दोषांना मारहाण होत असल्याने ते त्रासून चारही दिशाना पळून जातात ते परत माघारी कधी येत नाहीत कारण परत येण्यासाठी ते उरलेलेच नसतात. २ कारण या ठिकाणी स्वत चा देवपणा विसरून हा पंढरीचा राणा उभा राहिलेला आहे. याला आपल्या निर्गुणाचा वीट आल्यामुळे याने हे साजिरेगोजिरे रूप धारण केले आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, या पंढरीच्या राण्यास व वैष्णवाच्या प्रीतीस कितीही पोट भरून पाहिले तरी तृप्ती होत नाही कितीही यांचे सेवन केले तरी भूक तशीच भुकेली राहाते. अशा या सुखापुढे मुक्तीची इच्छा कुणास राहाणार ? ४

२७६६ शूद्रवंशी जन्मलो । म्हणोनि दंभें मोकलिलों ॥ १ ॥
अरे तूंचि माझा आतां । मायबाप पंढरीनाथा ॥ २ ॥
घोकाया अक्षर । मज[3] नाहीं अधिकार ॥ ३ ॥
सर्वभावें दीन । तुका म्हणे यातिहीन ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- मोकलिलों-सोडून दिले आहे

अर्थ '- मी शूद्राच्या म्हणजे कुणब्याच्या वंशात जन्मास आलो म्हणून मला अहंकाराने सोडून दिले आहे. १ पंढरीनाथा, अरे तूच आता माझा मायबाप आहेस. २ वेदाची अक्षरे घोकण्याचा अधिकार मला नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी सर्वभावाने दीन झालो असून हीन जातीचा आहे ४

विवरण .— तुकाराम महाराजानी या ठिकाणी पुन एकदा आपल्या जातीचा उल्लेख केलेला आहे. आपण शूद्र जातीचे कुणीबी आहोत असे ते वारंवार सांगतात. 'याति शूद्र वंश केला व्यवसाय' या प्रसिद्ध अभंगात (क्र. १३३३) आपण यातीने शूद्र आहोत असाच उल्लेख बुवांनी केलेला आहे. आपण कुणबी आहोत, शूद्र आहोत म्हणून आपण दंभापासून मुक्त झालो आहोत असाही निर्वाळा बुवानी दिलेला आहे 'बरा कुणबी केलों । नाहीं तरी दंभेंचि असतों मेलों' (अभंगक्र ३२०) या अभंगातही त्यांनी आपल्या शूद्र जातीचा उल्लेख केलेला आहे आपली जात हीन आहे असेही बुवा वारंवार म्हणतात. 'काय माझी याति नेणां हा विचार', 'काय याती शूद्र आहे कुळधर्म', असे त्यांनी वारंवार विचारलेले आहे 'याति मतिहीन रूपें लीन दीन । आणिक अवगुण जाणोनिया', 'तु श्रीपैचा पति । माझी बहु हीन याती' अशा वाक्यांनीही तुकाराम महाराजानी आपल्या यातिहीनतेचा उल्लेख श्रीहरीजवळ केला आहे, आणि शेवटी 'यातिहीन मतिहीन कर्महीन माझा' असे म्हणून 'सांडोनियां सर्व लाज । शरण आलों तुज' म्हणून तुकोबांनी आपली अनन्यता प्रकट केली आहे

तुकारामबुवांनी आपल्या यातिहीनत्वाचा व शूद्रत्वाचा उल्लेख विनम्रपणे केला असला तरी संतत्व व कवित्व म्हणून त्यांची योग्यता एवढी मोठी आहे की त्यांच्या जातीची व वंशाची आठवणच कुणास राहू नये. श्रीहरीच्या स्वरूपी रमणाऱ्या भक्ताची जात ती कोणती पाहावयाची ? 'जातिपाति पूछै नहिं कोई । हरिको भजै सो हरिका होई' असे कबीरदासांनी म्हटले आहे श्रीहरीला भजणाराची जात श्रीहरीचीच मानावी लागते.

१ दिंडी, २ सगुण ३ मति

तुकोबानीही मोठे सूचक उद्गार काढून म्हटले आहे ' आपणां लागे काम वाण्याघरीं गूळ । त्याचे याति कूळ काय कीजे ?' तुका वाण्याजवळ भगवद्भक्तीचा चवदार गूळ आहे तो पाहावा. आपणास त्याच्या यातीचे काय काम ? ' अवघा गोड अवघा गोड । तुका माझा पाचवा वेद ' असाच लौकिक तुकोबाना समकालीनात मिळालेला होता यासबंधी प्रथम विरोधक असणाऱ्या व नतर तुकोबाचे भक्त बनलेल्या रामेश्वरभट्टांचा एक अभंग मोठा उद्बोधक असा आहे तुकोबांच्या जातिविषयी ते म्हणतात—

' वैष्णवांची याती वाणी जो आपण । भोगी तो पतन कुंभपाकीं ॥ १ ॥
ऐसी वेद श्रुति बोलती पुराणें । नाहीं तें दूषण हरिभक्ता ॥ २ ॥
उच्च निच वर्ण न म्हणावा कोणी । जे कां नारायणीं प्रिय झाले ॥ ३ ॥
चहू वर्णांसी हा असे अधिकार । करितां नमस्कार दोष नाहीं ॥ ४ ॥
जैसा शालिग्राम न म्हणावा पाषाण । होय पूज्यमान सर्वत्रासी ॥ ५ ॥
गुरु परब्रह्म देवाचा तो देव । त्यासी तो मानव म्हणू नये ॥ ६ ॥
म्हणे रामेश्वर नामीं जे रगले । स्वयेंचि ते जाले देवरूप ॥ ७ ॥

याच अभगात तुकाबानी आपणास वेदांतील अक्षर घोकण्याचा अधिकार नाही असे म्हटले आहे अर्थ न जाणता वेदांतील अक्षरे घोकण्याचे काम आपल्या हातून झाले नाही असाही त्याचा अर्थ असावा किंवा आपण शूद्र, यातिहीन, आपण कसे वेदाचे पाठान्तर करावे ? अशीही बुवाच्या मनाची धारणा असावी असे असले तरी बुवाना वेदाचा परिचय नव्हता असे म्हणता येणार नाही वेदांतील उपदेशाचा व तत्त्वविचाराचा ठायीठायी साक्षात्कार त्याच्या अभगातून होत असतो ' वेदांचा तो अर्थ आम्हासीच ठावा । येरांनीं वहावा भार माथां ' असेही त्यानी म्हटले आहे ' वेदविहित तुम्ही आईका हो कर्मे ', ' वेद अनत बोलिला अर्थ इतकाचि साधिला ', ' विठ्ठो विश्वभर । बोले वेदांतींचा सार', ' सांवळें रूप त्यावें डोळां । साही अठरांचा मेळा ', ' सकल शास्त्रांचें हें सार । हें वेदाचे गव्हार ' इत्यादी वचनां-वरून तुकोबाना वेदाविषयी प्रीती होती हेच स्पष्ट होते वेदानी प्रतिपादन केलेलाच श्रीहरी त्याचे उपास्य दैवत होते तुकोबाची ही वेदान्तनिष्ठा व वेदांतील उपदेशाविषयीची आस्था पाहूनच प्रसिद्ध वेदाभ्यासी वामन पंडित यांनीं तुकाराम महाराजांविषयी म्हटले आहे, ' जयाची वदे पूर्ण वेदान्तवाणी । कसे हो म्हणावें तयालागिं वाणी ?'

२७६७ वेडें वाकडें[1] गाईन । परि मी तुझाचि म्हणवीन ॥ १ ॥
मज तारीं दिनानाथा । ब्रीदें[2] साच करीं आतां ॥ २ ॥
केल्या अपराधाच्या राशी । म्हणऊनि आलों तुजपाशीं ॥ ३ ॥
तुका म्हणे मज तारीं । साडीं[3] ब्रीद नाहींतरीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – साच–सत्य, खरी

अर्थ – देवा, मी तुझे गुणगान वेडयावाकडया शब्दात गाईन, तरीसुद्धा मी तुझाच आहे असे मी म्हणेन म्हणवून घेईन १ दीनानाथा, मला तारून तुम्ही तुमचे ब्रीद आता सार्थ करून दाखवावे २ मी आतापर्यंत अनेक अपराधांच्या राशी केल्या आहेत, म्हणून तर आता तुझ्यापाशी आलो आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, मला आता तुम्ही तारा किंवा पतितपावन, दीननाथ हे ब्रीद तरी सोडून द्या ४

२७६८ हरिभक्त माझे जिवलग सोइरे । हृदयीं पाउलें धरीन त्यांचीं ॥ १ ॥
अतकाळीं येती माझ्या सोडवणे । मस्तक वैसणे देईन त्यासी ॥ २ ॥
आणिक सोइरे सज्जन चो कोणी ॥ वैष्णवावांचोनि नाहीं मज ॥ ३ ॥

१ वेडें वाकुडें गायीन । परी तुझा म्हणवीन, २ ब्रीद, ३ सोडी

देईन आलिंगण धरीन चरण । सवसारसीण नासे तेणे ॥ ४ ॥
कठीं तुळशीमाळा नामाचे धारक । ते माझे तारक भवनदीचे ॥ ५ ॥
तयाचे चरणीं घालीन मी मिठी । चाड हे[1] वैकुंठीं नाहीं मज ॥ ६ ॥
आळसे दमें भावे हरिचे नाम गाती । ते माझे सांगाती परलोकींचे ॥ ७ ॥
कायावाचामनें देइन क्षेम त्यासी । चाड जीवित्वासी[2] नाहीं मज ॥ ८ ॥
हरिचे नाम मज ह्मणविती कोणी । तया सुखा धणी[3] धणी वरी ॥ ९ ॥
तुका म्हणे तया उपकारें[4] बांधलो । म्हणऊनि आलो शरण संतां ॥ १० ॥

शब्दार्थ व टीपा – नासे–नष्ट होईल, चाड–इच्छा, क्षेम–आलिंगन, चाड–फिकीर, किंमत, धणी–तृप्ती

अर्थ – श्रीहरीचे भक्त हे माझे जिवलग असे सोयरे असून मी त्यांची पावले हृदयात धरून ठेवीन १ माझ्या अंतकाळी मला सोडविण्यासाठी हेच येतात मी त्यांना ते आले म्हणजे माझे मस्तक बसायला देईन २ या वैष्णवांवाचून मला इतर कुणी दुसरे सज्जन सोयरे नाहीत ३ मी त्याना आलिंगन देईन, मी त्याचे पाय धरीन त्यामुळे माझे संसारदुःख कमी होईल ४ जे वैष्णव नामाचे धारक आहेत व ज्यांच्या गळयात तुळशीची माळ आहे ते मला भवनदीवरून सुखरूपपणे पार करून नेतील ५ अशा वैष्णवाच्या चरणी मी मिठी घालीन याशिवाय मला वैकुंठाची इच्छा नाही ६ जे कुणी आळसाने दंभाने अथवा भावाने श्रीहरीचे नाम गातात ते माझे परलोकीचे सोबती आहेत ७ मी त्यांना कायावाचामनेकरून आलिंगन देईन त्याच्यापुढे मला माझ्या जीवाचीसुद्धा फिकीर नाही ८ जे कुणी माझ्या मुखातून श्रीहरीचे नाम वदवतील तर ते सुख मी माझी इच्छा तृप्त होईपर्यंत घेत राहीन ९ तुकाराम महाराज म्हणतात अशा प्रकारे मी या वैष्णवाच्या उपकाराने बांधला गेलो आहे म्हणूनच मी संतांना शरण आलेलो आहे १०

२७६९ लटिका तो प्रपंच एक हरि साचा । हरिविण आहाच सर्व इंद्रियें ॥ १ ॥
लटिके तें मौन भ्रमाचे ते स्वप्न । हरिविण ध्यान नश्वर अवघें[5] ॥ २ ॥
लटिकिया वित्पत्ति[6] हरिविण करिती[7] । हरि नाहीं चित्तीं तो शव जाणा ॥ ३ ॥
तुका म्हणे हरि हे धरिसी निर्धारीं । तरी तू झडकरी जासी वैकुंठा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – साचा–खरा, आहाच–व्यर्थ, वित्पत्ति–शास्त्रज्ञान, व्युत्पत्ती, शव–प्रेत.

अर्थ – सव बाह्य प्रपंच लटका असून श्रीहरी हा एकच तेवढा खरा आहे या श्रीहरीवाचून सर्व इंद्रियेही लटकीच आहेत १ श्रीहरीशिवाय उगाच मौन धरणे लटकेच असून त्याच्याशिवाय ध्यान धरणेही भ्रमासारखे नाशवंत आहे २ श्रीहरीशिवाय शास्त्रज्ञान अथवा व्युत्पत्ती ही लटकी असून ज्याच्या चित्तामध्ये श्रीहरीविषयी प्रेम नाही तो प्रेतस्वरूपच जाणावा ३ तुकाराम महाराज म्हणतात निश्चयाने तू श्रीहरीस चित्तामध्ये धारण कर, म्हणजे तात्काळ तू वैकुंठाला जाशील ४

२७७० सर्वस्वा मुकावें तेणें हरि[8] जिंकावें । अर्थ प्राण जीवें देहत्याग ॥ १ ॥
मोह ममता माया चाड नाहीं चिंता । विषयकदुवेषा[9] जाळूनिया ॥ २ ॥
लोकलज्जा दंभ आणि अहंकार । करूनि मत्सर देशधडी ॥ ३ ॥
शांति क्षमा दया सखिया विनउनी[10] । मूळ पत्रपाणी धाडी त्यांसी ॥ ४ ॥
तुका म्हणे याती अक्षरें अभिमान । सांडोनियां शरण रिघें संतां ॥ ५ ॥

१ त्या, २ जीवित्वाची, ३ पार नाही, ४ उपकार बांधला ५ आह ६ विपत्ति, ७ रीति, ८ हरीशी, ९ विषय कदवेषा, १० विनवनी.

शब्दार्थ व टीपा – अर्थ–धन, संपत्ती, चाड–गरज, इच्छा, कडुवेषा–मूळांतील दुःख, याती–जात, अक्षरे–विद्वत्ता

अर्थ – ज्याला श्रीहरीस जिंकावयाचे आहे त्याने सर्वस्वाचा त्याग करायला तयार व्हावे धन, संपत्ती, प्राण, जीव, देह इत्यादींचा त्याग करायला तयार व्हावे १ मोह, माया, ममता, चिंता याच्याविषयी कोणतीच गरज न ठेवता सर्व विषयाच्या मूळातील दुःखच जाळून टाकावे २ लोकलज्जा दंभ, अहंकार, मत्सर यांना देशोधडी धाडावे ३ शांती, क्षमा, दया यांना मंत्रिणी करून त्यांना विनंती करून चक्रपाणी देवास आणण्यासाठी पाठवावे ४ तुकाराम महाराज म्हणतात, आपल्या जातीचा आणि विद्वत्तेचा अभिमान सोडून संताना शरण जावे ५

२७७१ एकांताचे सुख देईं मज देवा । आघात या जीवा चुकवूनि ॥ १ ॥
ध्यानीं रुप वाचे नाम निरंतर । आपुला विसर पडों नेदीं ॥ २ ॥
मायबाळा भेटी सुखाची आवडी । तैशी मज गोडी देईं देवा ॥ ३ ॥
कीर्ती ऐकोनिया जालों शरणागत । दासाचे तू हित करितोसी ॥ ४ ॥
तुका म्हणे मी तों दीन पापराशी । घालावे पाठीशी मायबापा ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – वाचे–वाणीत

अर्थ – देवा, माझ्या जीवास होणारे आघात नाहीसे करून मला तुझ्या एकांताचे सुख मिळवून दे ना. १ तुझे रुप माझ्या ध्यानात निरंतर असावे आणि माझ्या वाणीत तुझे नाम सतत राहावे तू आपला विसर मला कधीही होऊ देऊ नकोस २ आईची व मुलाची भेट कशी मोठ्या प्रेमाने होते ! तशीच गोडी देवा तू मला द्यावीस–३ तू दासाचे हित करतोस अशी तुझी कीर्ती ऐकून मी तुला शरण आलेलो आहे ४ तुकाराम महाराज म्हणतात, मी तर दीन पापाची रास असून मायबापा, माझे सर्व अपराध विसरून मला पाठीशी घालावे ५

२७७२ लटिके तें ज्ञान लटिके तें ध्यान । जरि हरिकीर्तन प्रिय नाहीं ॥ १ ॥
लटिकेचि दंभ घातलें दुकान । चाळविलें जन पोटासाठीं ॥ २ ॥
लटिकेचि केलें वेदपारायण । जरि नाहीं स्फुंदन प्रेम कंठी ॥ ३ ॥
लटिके तें तप लटिका तो जप । आळस निद्रा झोंप कथाकाळीं ॥ ४ ॥
नाम नावडे तो करील बाहेरी । नाहीं त्याची खरी चित्तशुद्धी ॥ ५ ॥
तुका म्हणे ऐसीं गर्जती पुराणें । शिष्टाचीं वचनें मानिला ही ॥ ६ ॥

माझें तुझें हा विकार । निरसता एककार । न लगे काहीं फार । विचारचि करणे ॥ ३॥
तुका म्हणे दुजें । हें तों नाहीं सहजें । संकल्पाच्या काजें । आपें आप वाढले ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – निर्भय–निभयतेने, काजें–कारणाने.

अर्थ :– सर्व भूतमात्रांत भगवद्भाव व सर्व जीवमात्रांत एकाच जीवतत्त्वाची अनुभूती असा भेदशून्य अनुभव शुद्ध व एकाकी आहे १ पुराणे, वेद, सर्व लोक असेच बोलत आहेत अशा स्वरूपाच्या अनुभवाने निर्भय होऊन संतही हीच गर्जना करीत आहेत २ तुझें व माझें हा भेदभावाचा विकार आत्मज्ञानाने नाहीसा झाला म्हणजे सर्वच एकाकीपणे धेतपतरयच राहाते याशिवाय तू दुसरा कुठला फार विचार करू नकोस ३ तुकाराम महाराज म्हणतात दुजाभाव हा विपरीत कल्पनेमुळे वाढलेला आहे ही काही त्याची सहजस्थिती नाही जीवाच्या ठिकाणी निरनिराळे संकल्प वाढले म्हणूनच आपोआप द्वैतभावाचा प्रसार झाला ४

२७७४ नेणें फुकों कान । नाहीं एकांतींचे ज्ञान ॥ १ ॥
तुम्ही आइका हो संत । माझा सादर वृत्तांत ॥ २ ॥
नाहीं देखिला तो डोळां । देव दाखवूं सकळां ॥ ३ ॥
चिंतनाच्या सुखें । तुका म्हणे नेणें दुःखें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – कान फुकणे—उगाच अधिकार नसताना गुरुमंत्र देण

अर्थ :– मी उगाच अधिकार नसताना कुणाला कानमंत्र देऊन उपदेश देण्याचे जाणीत नाही एकान्तात तत्त्वमसी महावाक्याचा उपदेश देण्याचे ज्ञानही मला नाही १ संत लोकहो, तुम्ही माझी ही हकीकत सावधान व सादर चित्ताने ऐका २ ज्या देवाला कुणीही डोळयानी पाहिलेले नाही तो देवच आम्ही सर्वांना प्रत्यक्ष दाखवू ३ तुकाराम महाराज म्हणतात श्रीहरीच्या चिंतनाच्या सुखात मी असल्यामुळे कोणत्याही इतर सुखांची जाणीव मला होत नाही ४

२७७५ त्याग तरी ऐसा करा । अहंकारा दवडावें ॥ १ ॥
मग जैसा तैसा राहें । काय पाहें उरले तें ॥ २ ॥
अंतरींचें विषम गाढें । येऊं पुढें नेदावें ॥ ३ ॥
तुका म्हणे शुद्ध मन । समाधान पाहिजे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – विषम–विपरीत भाव, द्वैताची कल्पना, देहभावाची भावना.

अर्थ – त्यागच करायचा झाला तर देहभावाच्या अहंकाराचा त्याग करावा १ नंतर ज्या स्थितीत असशील त्याच स्थितीत राहावे व खाली काय उरते ते पाहावे २ अंतर्यामात असलेली पक्की द्वैताची भावना अथवा देहभावाची कल्पना पुढे येऊ देऊ नये ३ तुकाराम महाराज म्हणतात, मन शुद्ध ठेवून नेहमी समाधानाने राहिले पाहिजे ४

२७७६ मातेचिये चित्तीं । अवघी बाळकाची व्याप्ति ॥ १ ॥
देह विसरे आपुला । जवळीं घेतां सीण गेला ॥ २ ॥
वाढवी प्रेमभातें । आणि अंगावरि घटतें ॥ ३ ॥
तुका संतांपुढें । पायीं झोंबे लाडें कोडें ॥ ४ ॥

माझें तुझें हा विकार । निरसतां एकंकार । न लगे कांहीं फार । विचारचि करणें ॥ ३॥
तुका म्हणे दुजें । हें तों नाहीं सहजें । संकल्पाच्या काजें । आपें आप वाढलें ॥ ४॥

शब्दार्थ व टीपा :- निर्भय-निर्भयतेनें, काजें-कारणानें.

अर्थ :- सर्व भूतमात्रांत भगवद्‌भाव व सर्व जीवमात्रांत एकाच जीवतत्त्वाची अनुभूती असा भेदशून्य अनुभव शुद्ध व एकाकी आहे. १ पुराणे, वेद, सर्व लोक असेच बोलत आहेत. अशा स्वरूपाच्या अनुभवाने निर्भय होऊन संतही हीच गर्जना करीत आहेत. २ तुझे व माझे हा भेदभावाचा विकार आत्मज्ञानाने नाहीसा झाला म्हणजे सर्वत्र एकाकीपणे चैतन्यतत्त्वच राहाते. याशिवाय तू दुसरा कुठला फार विचार करू नकोस. ३ तुकाराम महाराज म्हणतात, दुजाभाव हा विपरीत कल्पनेमुळे वाढलेला आहे. ही काही त्याची सहजस्थिती नाही. जीवाच्या ठिकाणी निरनिराळे संकल्प वाढले म्हणूनच आपोआप द्वैतभावाचा प्रसार झाला. ४

२७७४ नेणें फुंकों कान । नाहीं एकांतींचें ज्ञान ॥ १ ॥
तुम्ही आइका हो संत । माझा सादर वृत्तांत ॥ २ ॥
नाहीं देखिला तो डोळां । देव दाखवूं सकळां ॥ ३ ॥
चिंतनाच्या सुखें । तुका म्हणे नेणें दुःखें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- कान फुंकणे—उगाच अधिकार नसताना गुरुमंत्र देणे.

अर्थ :- मी उगाच अधिकार नसताना कुणाला कानमंत्र देऊन उपदेश देण्याचे जाणीत नाही. एकान्तात तत्त्वमसी महावाक्याचा उपदेश देण्याचे ज्ञानही मला नाही. १ संत लोकहो, तुम्ही माझी ही हकीकत सावधान व सादर चित्ताने ऐका. २ ज्या देवाला कुणीही डोळ्यांनी पाहिलेले नाही तो देवच आम्ही सर्वांना प्रत्यक्ष दाखवू. ३ तुकाराम महाराज म्हणतात, श्रीहरीच्या चिंतनाच्या सुखात मी असल्यामुळे कोणत्याही इतर सुखांची जाणीव मला होत नाही. ४

२७७५ त्याग तरी ऐसा करा । अहंकारा दवडावें ॥ १ ॥
मग जैसा तैसा राहें । काय पाहें उरलें तें ॥ २ ॥
अंतरींचें विषम गाळें । येऊं पुढें नेदावें ॥ ३ ॥
तुका म्हणे शुद्ध मन । समाधान पाहिजे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- विषम-विपरीत भाव, द्वैताची कल्पना, देहभावाची भावना.

अर्थ :- त्यागच करायचा झाला तर देहभावाच्या अहंकाराचा त्याग करावा. १ नंतर ज्या स्थितीत असशील त्याच स्थितीत राहावे व खाली काय उरते ते पाहावे. २ अंतर्यामात असलेली पण ही द्वैताची भावना अथवा देहभावाची कल्पना पुढे येऊ देऊ नये. ३ तुकाराम महाराज म्हणतात, मन शुद्ध ठेवून नेहमी समाधानाने राहिले पाहिजे. ४

२७७६ मातेचिये चित्तीं । अवघी बाळकाची व्याप्ति ॥ १ ॥
देह विसरे आपुला । जवळीं घेतां सीण गेला ॥ २ ॥
दावी प्रेमभातें । आणि अंगावरि चढतें ॥ ३ ॥
तुका संतांपुढें । पायीं झोंबे लाडें कोडें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – स्फूर्ति-विचार मोह प्रेममातें-प्रेमाचा लाड कोडें-कौतुकाने

अर्थ – आईच्या चित्तात सर्वकाळ मुलाविषयीच विचार असतो १ मुलास जवळ घेतल्याबरोबर तिचा सर्व त्रास दूर होतो आणि ती देहभान विसरून जाते २ आई आपल्या मुलाला प्रेमाने लाड देते आणि मग ते मूल तिच्या अंगाखांद्यावर चढते ३ तुकाराम महाराज म्हणतात, मीही त्याप्रमाणे संतांच्या पायांना लाडाने व कौतुकाने मिठी मारीत असतो ४

२७७७ कोणा पुण्या फळ आलें । आजि देखिलीं पाउलें ॥ १ ॥
ऐसें नेणें नारायणा । संतीं सांभाळिलें[1] दीना ॥ २ ॥
कोण लाभकाळ । दीन आजिचा मंगळ ॥ ३ ॥
तुका म्हणे जाला । लाभ सहज विठ्ठला ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – मंगळ-शुभकारक

अर्थ – आज माझे कोणते पुण्य फळाला आले म्हणून मी ही पावले दृष्टीने पाहिली ? १ नारायणा हे मला काही समजत नाही, पण या संतांनी मला सांभाळलेले आहे २ आजचा हा लाभदायक दिवस कसा शुभ कारक आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात विठ्ठला आज मला हा लाभ फारच मोठा झाला ४

२७७८ मान इच्छी तो अपमान पावे । अमंगळ सवे अभाग्याची ॥ १ ॥
एकाचिये अंगीं दुजियाचा वास । आशा पुढें नाश सिद्ध करी ॥ २ ॥
आधीं फळासी कोठें पावों शके । वासनेची भिकेवरी चाली ॥ ३ ॥
तुका म्हणे राजहंस ढोरा नाव । काय तयां द्यावें अळंकाराचें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – सवे-सवय ढोरा-निर्बुद्ध जनावरास चाली-धाव

अर्थ – जो मनातून मानस मानाची इच्छा करतो त्याचा सर्वत्र अपमानच होतो, अभागी जीवास अशी अमंगल सवयच असते १ कोणत्याही एका गोष्टीच्या अंगभूत अशा दुसऱ्या विरुद्ध गोष्टीचा निवास असतो आशा ही अखेरीस नाशच करते ही गोष्ट सिद्ध आहे २ कितीही इच्छा केली तरी त्याप्रमाणे फळ आधीच कधी मिळू शकते काय ? असे असले तरी वासना नेहमीच भीक मागण्याकडे धाव घेते ३ तुकाराम महाराज म्हणतात एखाद्या निर्बुद्ध जनावरास राजहंस असे जरी नाव दिले तरी त्या अलंकाराचे त्याला काय ? ४

२७७९ संसारापासूनि कैसें[2] सोडविशी । न कळे हृषीकेशी काय जाणें ।
करितां न सरे अधिक वाट पाहीं । तृष्णा देशधडी केलों ।
भक्तिभजनभाव यासी नाहीं ठाव । चरणीं तुम्हा अंतरलों ।
मागें पुढें रीग न पुरेचि पाहातां । सवघा अवघीं वेष्टिलों ॥ १ ॥
आतां माझी लाज राखें नारायणा । हीन दीन लीन याचकाची ।
करितां न कळे कांहीं असतील गुण दोष । करीं होळी संचिताची[3] ॥ २ ॥
इंद्रियें द्वारें मन धांवे भेरें । नागवे करिताचि कांहीं ।
हात पाय कान मुख लिंगस्थान । नेत्र घ्राण द्वारें पाहीं ।
जया जैसी सोय तया तैसें होय । क्षण एक स्थिर नाहीं ।
करिती ताडातोडी ऐसी यांची खोडी । न चले माझें यास कांहीं ॥ ३ ॥

---

1 सांभाळिलो, 2 कई 3 संचिताची

शरीरसंबंधु पुत्र पत्नी बंधु । धन लोभ मायावत ।
जन लोकपाळ मैत्र हे सकळ । सोइरीं सज्जनें बहुतें ।
नाना कर्म डाय करिती उपाय । बुडावया घातपातें[1] ।
तुका म्हणे हरी राखे भलत्या परी । आह्मीं तुझीं शरणागतें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – ठाव–पत्ता, रीग–जागा, अवकाश, सैरें–सैरावैरा, नागवे–ताब्यात राहात नाही, डाय–घातुक उपाय, परी–प्रकाराने, उपायाने

अर्थ – हृषीकेशी माझी या संसारापासून तू कशी काय सुटका करशील हे काही समजत नाही असे का झाले हेही समजत नाही काही करावे तर ते पुरेच होत नाही अधिकच वाढत राहाते आणि या तृष्णेने तर मी देशोधडीस लागलो आहे ते पाहा ना श्रीहरीविषयी भजन भवनी असावी तर तिचाही माझ्यात पत्ता नाही यामुळे तुझ्या चरणापासून मी दुरावलो आहे आता मागेपुढे सरकून पाहाण्यासही जागा नाही प्रपंचवृत्तींनी सर्व बाजूनी मी वेढून गेलो आहे १ नारायणा आता तू माझी लाज राखावीस मी हीन दीन असा याचक आहे माझ्यात काही गुणदोष असतील की काय हे कळत नाही, तर त्याची व संचित कर्मांची तू होळी करून टाक २ माझे मन सर्व इंद्रियांच्या द्वारे विविध विषयाकडे सैरावैरा धावून जाते काही केल्या ते ताब्यात राहातच नाही हात पाय कान मुख लिंगस्थान डोळे नाक या इंद्रियांच्या मार्गांनी मन वाटेल तिकडे धाव घेत आहे एक क्षणभर देखील ते स्थिर राहात नाही या मनाने व इंद्रियांनी माझी फार ओढाताण केली आहे तीच यांची खोड आहे आणि या प्रकारापुढे माझे काही चालत नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात पुत्र पत्नी बंधू हे शरीरसंबंधी, धनलोभामुळे मायावंत झालेले लोक व त्याचे पुढारी सब मित्र व सोयरेधायरे, सज्जन इत्यादी परिवार अनेक प्रकारांनी घातक उपयाचे डाव रचीत असतात मला बुडविण्याचा त्यांचा विचार असतो श्रीहरी, मी तुला शरण आलो आहे कोणत्याही प्रकारचा उपाय योजून तुम्ही माझे रक्षण करावे ४

२७८० नाम घेतां उठाउठीं । होय संसारासी तुटी ॥ १ ॥
ऐसा लाभ बांधा गांठी । विठ्ठल पायीं पडे मिठी ॥ २ ॥
नामापरतें साधन नाहीं । जें तूं करिशी आणिक कांहीं ॥ ३ ॥
हाकारोनि सांगे तुका । नाम घेतां राहों नका ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – उठाउठी–तावडतोब, त्वरित परते–सारखे

अर्थ – श्रीहरीचे नाम घेतल्याबरोबर संसारभावनेचा नाश होतो संसारविषयीचा भ्रम दूर होतो १ यासाठी अशा प्रकारचा भाव तुम्ही तुमच्या पदरात पाडून घ्या म्हणजे यामुळे विठ्ठलाच्या पायांशी तुमची मिठी पडेल २ नामासारखे इतर साधन दुसरे तू करू पाहाशील तर नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, लोकहो, नामस्मरण केल्याशिवाय राहू नका असे मी सर्वांना हाका मारून सांगत आहे ४

२७८१ प्राण समर्पिला आम्ही । आतां उशीर का स्वामी ॥ १ ॥
माझें फेडावें उसणें । भार न मना या ऋणें ॥ २ ॥
जाला कठस्फोट । जवळी घातलों निघट ॥ ३ ॥
तुका म्हणे सेवा । कैसी घरी वाटे देवा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – न मना–मानू नका

---

[1] घात पात

अर्थ :– स्वामी आम्ही आमचा प्राण तुम्हास समर्पण केलेला आहे आता कृपेविषयी उशीर का करता ? १ मी तुमची सेवा केली ते उसने आता तुम्ही फेडून टाकावे तुम्ही या माझ्या ऋणाचे ओझे आता मानू नका २ तुम्हाला हाका मारून मारून माझा घसा फुटायची वेळ आलेली आहे त्यामुळेच मी तुमच्या अगदी जवळही येऊन भिडलो आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, तुमच्या कृपेशिवाय तुमची सेवा मला कशी बरे बरी वाटेल ४

२७८२ येणें मार्गे आले । त्याचें निसंतान केलें ॥ १ ॥
ऐसी अवघड वाट । ऐकोन[1] आलों मी बोभाट ॥ २ ॥
नागविल्या थाटी । उरो नेदीच लंगोटी ॥ ३ ॥
तुका म्हणे चोर । तो हा उभा कटिकर ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – बोभाट–कीर्ती, गवगवा, थाटी–समुदाय

अर्थ – या परमार्थमार्गाने जे आले त्याचे देवा तुम्ही निसतान करून वाटोळे केले १ अशी ही अवघड वाट असल्याची कीर्ती ऐकूनही मी या याच वाटेने आलो २ आजपर्यंत कित्येक भक्ताच्या समुदायास तुम्ही नागविलेत, त्याचे सर्वस्व हरण केलेत, कुणाची एक लंगोटी सुद्धा उरू दिली नाहीत ३ तुकाराम महाराज म्हणतात, भक्तजनाचे सर्वस्व हरण करणारा असा हा चोर कमरेवर हात ठेवून विटेवरती उभा राहिला आहे ४

२७८३ तोंवरि तोंवरि जंबुक करी गर्जना । जंव त्या पंचानना देखिलें नाहीं ॥ १ ॥
तोंवरि तोंवरि सिंधु करी गर्जना । जंव त्या अगस्तिब्राह्मणा देखिलें नाहीं ॥ २ ॥
तोंवरि तोंवरि वैराग्याच्या गोष्टी । जंव सुंदर वनिता दृष्टी पडिली नाहीं ॥ ३ ॥
तोंवरि तोंवरि शूरत्वाच्या गोष्टी । जंव परमाईचा पुत्र दृष्टीं देखिला नाहीं ॥ ४ ॥
तोंवरि तोंवरि माळामुद्राचीं भूषणें । जंव तुक्याचें दर्शन जालें नाहीं ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – जंबुक–कोल्हा, पंचानन–सिंह, सिंधु–सागर, अगस्ति–समुद्रास प्राशन करणारा एक ऋषी, वनिता–तरुण स्त्री, परमाईचा–वीरमाता

अर्थ – जोपर्यंत सिंहाचे दर्शन झाले नाही तोपर्यंत कोल्हयाची गर्जना चालू असते १ जोपर्यंत समुद्रास एकाच आचमनात प्राशन करणारा अगस्ती ऋषी दिसलेला नाही तोपर्यंतच समुद्राची गर्जना सुरू असते २ जोपर्यंत सुंदर स्त्री दृष्टीस पडलेली नाही तोवरच वैराग्याच्या गोष्टी बोलल्या जातात ३ जोपर्यंत वीरमातेचा शूर पुत्र भेटलेला नाही तोपर्यंतच शूरत्वाच्या गोष्टी चालतात ४ तुकाराम महाराज म्हणतात जोपर्यंत या तुकारामाची गाठ पडलेली नाही तोपर्यंतच माळामुद्रांच्या भूषणांनी ढोंगी साधू मिरवीत असतात ५

विवरण–भोवती बाह्याचारानी जनतेस फसविणारे ढोंगी साधू कोठवर टिकाव धरतात यासबंधीचा निर्देश तुकोबानी या एका अभंगात मोठ्या स्वाभिमानाने व आत्मविश्वासाने अनेक दाखले देऊन केलेला आहे आपण आहोत तोपर्यंत वरवर माळामुद्रा धारण करणाऱ्याचे आपण काही चालू देणार नाही अशी त्यांची ग्वाही येथे आहे या अभंगात आलेल्या अगस्ती किंवा अगस्त्य ऋषीचा संदर्भ लक्षणीय आहे विंध्य पर्वताच्या दक्षिणेस वसाहत करणारा एक थोर ऋषी म्हणून याचे नाव प्रसिद्ध आहेच, पण समुद्राच्या आश्रयाने राहून लोकाना संत्रस्त करणाऱ्या दैत्याचा नाश व्हावा म्हणून याने समुद्रच पिऊन टाकला, अशी कथा पुराणातून आहे समुद्रातील असुरांनी इंद्रादिक देवाना त्रास देण्यास प्रारंभ केल्यावर देवांनी अग्नी व वायू याना समुद्र शोषून घेण्यास सांगितले, पण समुद्रातील प्राण्याचा नाश होईल या भीतीने त्यानी हे काम नाकारले तेव्हा इंद्रशापामुळे मित्रावरुणाच्या वीर्याने हा कुंभापासून जन्मास आला म्हणून यास मैत्रावरुणी व कुंभयोनी अशीही नावे आहेत विदर्भाच्या नृपतीची कन्या लोपामुद्रा ही याची पत्नी होय यानेच असुरांचा पाडाव करण्यासाठी त्यांचा आधार जो समुद्र तोच पिऊन टाकला तुकारामबुवानी अगस्त्य मुनीचा उल्लेख समर्पक रीतीने येथे केलेला आहे अशाच रचनेचा एक अभंग श्रीज्ञानदेवांच्या गाथेतही आहे पुढल्या एका अभंगात याच भूमिकेतून भाट संत व आपण स्वतः यांत बुवांनी तुलना केलेली आहे

---

१ कोणा सांगावा बोभाट

२७८४ तोंवरि तोंवरि शोभतील गारा । जंव नाहीं हिरा प्रकाशला ॥ १ ॥
तोंवरि तोंवरि शोभती दीपिका । नुगवतां एका भास्करासी ॥ २ ॥
तोंवरि तोंवरि सांगती संतांचिया गोष्टी । जंव नाहीं भेटी तुक्यासवें ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा :– नुगवता–उगवला नाही, भास्कर–सूर्य

अर्थ – जोपर्यंत खऱ्या हिऱ्याचा प्रकाश दृष्टीस पडलेला नाही तोपर्यंतच गाराची शोभा असते. १ जोपर्यंत प्रखर तेजाचा सूर्य उगवला नाही तोपर्यन्त अनेक लहान दीपिकाची शोभा आहे. २ तुकाराम महाराज म्हणतात, जोपर्यंत या तुकारामाची भेट झाला नाही तोपर्यंतच लोक इतर भोंदू साधूंच्या गोष्टी सांगतात ३

२७८५ धरोनि दोन्ही रूपे पाळणें संहार । करी कोप रुद्र दयाळ विष्णु ॥ १ ॥
जटाजूट एका मुगुट माथां शिरीं । कमळापति गौरीहर एक ॥ २ ॥
भस्मउद्धळण लक्ष्मीचा भोग । शंकर श्रीरंग उभयरूपीं ॥ ३ ॥
वैजयंती माळा वासुगीचा हार । लेणें अलंकार हरिहरा ॥ ४ ॥
कपाळ झोळी एका स्मशानींचा वास । एक जगन्निवास विश्वंभर ॥ ५ ॥
तुका म्हणे मज उभयरूपीं एक । सारोनि संकल्प शरण आलों ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – कोप–राग, रुद्र–शंकर, शिव, वासुगी–वासुकी, सर्प, कपाळ–कपाल, डोक्याची फुटकी कवटी.

अर्थ :– या जगाचे पालन पोषण व संहार करण्यासाठी या देवाने दोन रूपे धारण केली आहेत. एक रूप रुद्राच्या स्वरूपाने रागावून सर्व जगाचा संहार करते व दुसरे दयाळू विष्णूच्या रूपाने सर्वांचे पालन करते १ एकाच्या मस्तकावर जटेचा जूट बांधलेला असतो, तर दुसऱ्याच्या मस्तकावर मुकुट शोभत असतो एक कमलेचा पती, तर दुसरा गौरीचा पती आहे २ एकानें सर्व अंगभर भस्माचे लेपन केलेले असते, तर दुसरा सर्व प्रकारच्या ऐश्वर्याचा भोग भोगीत असतो असे असले तरी शंकर व श्रीरंग असे उभय एकरूपाचेच आहेत. ३ एकाच्या गळ्यात वैजयंतीची माळ असून दुसऱ्याच्या गळ्यात वासुकी सर्प रुळत आहे असे हे अलंकार हरिहरांचे शोभतात ४ एकाच्या हातात फुटकी नरकवटी आहे, काखेत झोळी आहे व निवास स्मशानातील आहे; तर दुसरा विश्वंभर सर्व जगतात निवास करून राहिलेला आहे ५ तुकाराम महाराज म्हणतात, शिव व विष्णू असे हे दोनही वेगळे असले तरी ते मी एकरूपच मानतो. सर्व संकल्प नाहीसे करून मी यांतच शरण आलो आहे. ६

विषय म्हणजे एक प्रकारचे आव्हानच बनलेला आहे. एकाच्या मस्तकी गंगा आहे, तर दुसऱ्याच्या पायांनी आहे. एकाचा कंठच काळा निळा आहे, तर दुसऱ्याचे सर्व शरीर काळेनिळे आहे सुरलोकलापवामधील एक श्लोक या दृष्टीने पाहण्यासारखा आहे. 'शैलाधीशधरः कुमारहृषित. सत्यान्वितोऽब्जांकितो । गंगाभूतियुतो विनायकहितश्चक्षुःश्रवो भूषित. । इत्थं नाम मनागपि प्रथमते नो माधवो माधवाद् । भेदं यश्च विभाति सोऽतिगुणस्यानोऽयितो अन्यथा।' या श्लोकात शंकर व विष्णू कसे आहेत, हे वर्णन करताना प्रत्येक शब्दाचे दोन दोन अर्थ पाहावे लागतात. शैलाधीशधरः—कैलासपर्वतनिवासी, गोवर्धनधारी, कुमारहृषितः-कार्तिकस्वामीला पाहून आनंद पावणारा, पृथ्वी व मदन याना पाहून आनंद पावणारा, सत्यान्वित.—सती पार्वतीने युक्त, सत्या, सत्यभामा अथवा अष्टदिनायकापैकी दुसरी जी सत्या तिने युक्त, अब्जांकिता —चंद्राने अंकित, कमल अथवा शंख याने अंकित, गंगाभूतियुत.—गंगा व भस्म धारण करणारा, गंगोत्पत्तीने युक्त, आणि गणपतीचे हित करणारा, गरुडाचे हित करणारा, सर्पभूषित, शेषशायी अशी ही विशेषणे उभयताना लागू होतात; याचाच अर्थ असा की, हे दोघेही एकरूप आहेत.

२७८६ उचिताचा भाग होतों राखोनियां । दिसती ते वांयां कष्ट गेले ॥ १ ॥
वचनाची कांहीं राहेचि ना रुचि । खळाऐसें याची कुची जालें ॥ २ ॥
विश्वासानें माझें बुडविलें घर । करविला धीर येथवरी ॥ ३ ॥
तुका म्हणे शेकीं थार नाहीं बुड । कैसें तुम्हीं कोड पुरविलें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– खळाऐसे-दुष्टाप्रमाणे, कुची–उणीव, खोटी, शेकीं–शेवटी, कोड–इच्छा.

अर्थ :– देवा, आजपर्यंत जे उचित होते त्याचे रक्षण मी करून होतो, पण ते माझे कष्ट वाया गेलेले दिसतात. १ कारण मी जे शब्द बोलत आहे त्यात काहीच गोडी उरलेली नाही. दुष्ट माणसासारखे माझे बोलणे खोटेपणाचे झाले आहे २ मी तुम्ही सांगितल्यावरून बोलायचा धीर केला, पण माझे घर विश्वासघात करून तुम्ही बुडविले. ३ तुकाराम महाराज म्हणतात, शेवटी मला कुणाचाच आधार राहिला नाही. तुम्ही माझी इच्छा पूर्ण केली असे मी कसे म्हणू ? ४

२७८७ लांब लांब जटा काय वाढवूनि । पावडें घेऊनि क्रोधें चाले ॥ १ ॥
खायाचा बोलसा शिव्या दे जनाला । ऐशा तापशाला बोध कैंचा ॥ २ ॥
सेवी भांग अफू तमाखू उदंड । परि तो अखंड भ्रांतीमाजी ॥ ३ ॥
तुका म्हणे ऐसा सर्वस्वें बुडाला । त्यासी अंतरला पांडुरंग ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– पावडें-कुबडीसारखे टेकायचे साधन, बोलसा–व्यसन.

अर्थ :– हा क्रोधी मनुष्य लांब लांब जटा वाढवितो आणि हातात पावडे घेऊन रागारागानेच चालतो; त्याचा काय उपयोग आहे ? १ चांगले खाण्याचे व्यसन यास असल्याने हा त्यासाठी लोकांना शिव्या देतो. अशा या तपस्व्याला कोणता बोध ठसणार ? २ हा तर भांग, अफू, तबाखू यांचे खूप सेवन करतो, आणि याच भ्रांतीमध्ये हा अखंडपणे असतो. ३ तुकाराम महाराज म्हणतात, असा हा मनुष्य सर्वस्वी बुडालेला असल्याने पांडुरंगाच्या भेटीसही अंतरला आहे. ४

२७८८ अवघीच तीर्थें घडलीं एकवेळा । चंद्रभागा डोळां देखिलिया ॥ १ ॥
अवघींच पापें गेलीं दिगांतरीं । वैकुंठ[१] पंढरी देखिलिया ॥ २ ॥
अवघिया संतां एकवेळा भेटी । पुंडलीक दृष्टी देखिलिया ॥ ३ ॥
तुका म्हणे जन्मा आल्याचें सार्थक । विठ्ठलचि एक देखिलिया ॥ ४ ॥

१ झालें, २ भूवैकुंठ.

शब्दार्थ व टीपा :- अवघीं-सर्व.

अर्थ :- ज्याने चंद्रभागेचे दर्शन डोळे भरून घेतले, त्याला त्याच वेळी सर्व तीर्थांचे दर्शन घडते. १ भूवैकुंठ पंढरपुरचे दर्शन ज्याला झाले त्याची सर्व पापे एकदम नाहीशी होतात. २ एका पुंडलीकास दृष्टीभरून पाहिले की सर्व संतांना भेटल्याचे श्रेय मिळते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, एका विठ्ठलाचे दर्शन घेतले की जन्मास आल्याचे सार्थक होऊन जाते. ४

२७८९ सदा सर्वकाळ अंतरीं कुटिल । तेणें गळां माळ घालूं नये ॥ १ ॥
ज्यासी नाहीं धर्म दया क्षमा शांति । तेणें अंगीं[1] विभूती लावूं नये ॥ २ ॥
जयासी न कळे भक्तीचें महिमान । तेणें ब्रह्मज्ञान बोलों नये ॥ ३ ॥
ज्याचें मन नाहीं लागलें हातासी । तेणें प्रपंचासी टाकूं नये ॥ ४ ॥
तुका म्हणे ज्यासी नाहीं हरिभक्ति । तेणे भगवें हातीं धरूं नये ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :- अंतरीं-मनाने, विभूती-राख, भस्म.

अर्थ :- जो नेहमी मनाने कुटिल आहे त्याने गळ्यात कधी माळ घालू नये तिचा काय उपयोग ? १ ज्याच्या अंतःकरणात दया, क्षमा, धर्मभावना या गोष्टी नाहीत त्याने उगाच अंगास राख फासून ढोंग करण्यात काय अर्थ आहे ? २ ज्याला भक्तीचा महिमा समजलेला नाही त्याने ब्रह्मज्ञानाच्या गोष्टी उगाच बोलू नयेत. ३ ज्याचे मन स्वाधीन झाले नाही त्याने उगाच प्रपंचास सोडून देऊ नये. ४ तुकाराम महाराज म्हणतात, ज्याच्या चित्तात हरिभक्ती नाही त्याने अंगावर भगवे वस्त्र उगाच धारण करू नये ५

२७९० आम्ही असों निश्चितीनें । एकया गुणें तुमचिया ॥ १ ॥
दुराचारी तरले नामें । घेतां प्रेमें म्हणोनि ॥ २ ॥
नाहीं तुम्हां धांव घेतां । कृपावंता आळस ॥ ३ ॥
तुका म्हणे विसरूं काईं[2] । तुज वो आई विठ्ठले ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- निश्चितीनें-चिंता न करता.

अर्थ :-देवा, तुमच्या एका गुणामुळे आम्ही चिंता न करता स्वस्थ आहोत. १ तुमच्या नामस्मरणाने पुष्कळ दुराचारी लोक तरून गेलेले असल्यामुळे मी ते प्रेमाने घेत असतो. २ कृपावंता, आपल्या भक्तासाठी धावत येताना तुम्हांला कसलाच आळस नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, आई, विठ्ठले, आम्ही तुला विसरू काय ? ४

२७९१ अनुभवें वदे वाणी । अंतर ध्यानीं आपुलें ॥ १ ॥
कंची चिका दुधचवी । जरी दावी पांढरें ॥ २ ॥
जातीऐसा दावी रंग । बहु जग या नावें ॥ ३ ॥
तुका म्हणे खद्योत तें । ढुंगाभोंवतें आपुलिया ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- अंतर-मन, अंतःकरण, खद्योत-काजवा.

अर्थ :- देवा, आपले ध्यान माझ्या अंतःकरणात वसले असल्यामुळे त्या अनुभवाने मी बोलत आहे. १ गाय व्याल्यावरोबर तिच्या थानांतून निघालेल्या चिकाचा व नंतर येणाऱ्या दुधाचा रंग पांढरा असला तरी दोहोंची चव वेगळी असते दुधाची चव चिकाला कशी येणार ? २ विविध जातींचा रंग विविध प्रकारचा असतो त्याचाच जग असे नाव आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, काजव्याचा प्रकाश त्याच्या ढुंगणाभोवतीच तेवढा असतो. ४

१ अंगासी, २ कांहीं.

२७९२ परपीडक तो आम्हां वांयेदार । विश्वीं विश्वंभर म्हणऊनि ॥ १ ॥
दङू त्यागू वळें नायलोकू डोळां । राखू तो चांडाळा ऐसा दुरि ॥ २ ॥
अनाचार कांहीं न साहे अवगुणें । बहु होय मन कासावीस ॥ ३ ॥
तुका म्हणे माझी एकविध सेवा । विमुख ते देवा टाळी चित्तें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– परपीडक–दुसऱ्याला त्रास देणारा, विमुख–विन्मुख, टाळी–दूर सारतो

अर्थ – सर्व विश्वात भरून राहिलेला ईश्वर असल्यामुळे जो दुसऱ्यास त्रास देतो तो आम्हांस वैऱ्याप्रमाणे वाटतो १ अशा माणसास आम्ही आमच्या सामर्थ्याने शासन करून त्याचा त्याग करू, त्याच्याकडे डोळ्यांनी पाहाणार सुद्धा नाही त्याला एखाद्या चांडाळाप्रमाणे आम्ही दूर ठेवू २ जो वाईट आचरणाचा आहे त्याचे अवगुण काही मला सहन होत नाहीत त्यास पाहताच माझे मन फारच कासावीस होते ३ तुकाराम महाराज म्हणतात मी एकनिष्ठपणे सेवा करीत आहे आणि जो देवास पाहून विन्मुख होतो त्याला मी माझ्या चित्तातून दूर काढतो ४

२७९३ कांहीं न मागे कोणासी । तोचि आवडे देवासी ॥ १ ॥
देव तयासी म्हणावें । त्याचे चरणीं लीन व्हावें ॥ २ ॥
भूतदया ज्याचे मनीं । त्याचे घरीं चक्रपाणी ॥ ३ ॥
नाहीं नाहीं त्यासमान । तुका म्हणे मी जमान ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – जमान–जामीन साक्षी देणे

अर्थ – जो कुणाजवळ काही मागत नाही तोच देवाला फार आवडतो १ अशाच माणसास देव म्हणावे, त्याच्याच चरणी लीन असावे २ ज्याच्या मनात प्राणिमात्राविषयी भूतदया असते त्याच्या घरी चक्रपाणी रक्षणासाठी असतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, त्याच्यासारखा दुसरा कुणी नाही याविषयी मी साक्षी देत आहे ४

२७९४ नाम उच्चारितां कंठीं । पुढें उभा जगजेठी ॥ १ ॥
ऐसे धरीनिया ध्यान । मनें करावे चिंतन ॥ २ ॥
ब्रह्मादिकाच्या ध्याना नये । तो हा कीर्तनाचे सोये ॥ ३ ॥
तुका म्हणे सार घ्यावें । मनें हरिरूप पाहावे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – सोये–सोयीन

अर्थ – श्रीहरीचे नाम मुखाने घेतल्याबरोबर तो जगजेठी देव त्याच्या समोर उभा राहतो १ अशा रीतीने त्याला समोर धरून त्याचे ध्यान करून त्याचे चिंतन करावे २ जो हा देव ब्रह्मादिकांच्याही ध्यानात येत नाही तो या नामसंकीर्तनाच्या सोयीने धावत येतो ३ तुकाराम महाराज म्हणतात सारभूत असलेले नाम नित्य घेत जावे आणि मनाने हरिरूपच पाहात रहावे ४

२७९५ आडलिया जना होसी सहाकारी । अधळियाकरीं काठी तूंचि ॥ १ ॥
आडिले गांजिले पीडिले ससारीं । त्याचा तू कैवारी नारायणा ॥ २ ॥
प्रल्हाद महासंकटीं रक्षिला । तुम्ही अपंगिला नानापरी ॥ ३ ॥
आपुलेंचि अंग तुम्ही वोडविलें । त्याचे निवारलें महा दु ख ॥ ४ ॥
तुका म्हणे तुझे कृपे पार नाहीं । माझे विठाबाई जननीये ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :— आडलिया–अडचणीत असलेल्या, सहाकारी–साहृय करणारा, पार–अंत, सीमा.

अर्थ :— जे कुणी लोक अडचणीत सापडलेले असतात त्यांना तू देवा, साहृयकारी होतोस. अशा प्रकारे तू आंधळयाच्या हातातील काठीप्रमाणेच आहेस. १ नारायणा, या संसारात जे अडलेले आहेत, गांजलेले आहेत, पीडलेले आहेत त्यांचा तू कैवारी होतोस. २ महासंकटात असणाऱ्या प्रल्हादास तुम्ही राखले. नाना प्रकारांनी त्याचे संरक्षण केले. ३ तुकाराम महाराज म्हणतात, विठाबाई, आई, तुझ्या कृपेला अंत नाही. ४

२७९६ तपासी तें मन करूं पाहे घात । धरोनि सांगात इंद्रियांचा ॥ १ ॥
म्हणोनि कीर्तन आवडलें मज । सांडोनियां लाज हेंचि करीं ॥ २ ॥
पाहातां आगमनिगमाचे ठाव । तेथें नाहीं भाव एकविध ॥ ३ ॥
तुका म्हणे येथें नाहीं वो विकार । नाम एक सार विठोबाचें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:– सांगात–संगती, सोबत, आगमनिगम–शास्त्र व वेद.

अर्थ :– काही तप करावे तर मन इंद्रियांची संगती धरून त्यात नाना प्रकारचे आघात निर्माण करते. १ याशाठी मला श्रीहरीचे कीर्तन फार आवडते. म्हणूनच मी सर्व प्रकारची लाजलज्जा सोडून याचाच लाभ घेतो. २ वेदशास्त्रांच्या ठिकाणी शोध करून पाहावे तर तेथे एकनिष्ठ भावाचा पत्ताच लागत नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, या विठोबाचे नाम हे एक सारभूत असे तत्त्व असून यांच्यात कोणतेही विकार नाहीत ४

२७९७ गुरुशिष्यपण । हें तों अधमलक्षण ॥ १ ॥
भूतीं नारायण खरा । आप तैसाचि दुसरा ॥ २ ॥
न कळतां दोरी साप । राहूं नेंदावा तो कांप[1] ॥ ३ ॥
तुका म्हणे गुणदोषी । ऐसें न पडावें सोसीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– आप–आपण स्वतः, कांप–भीती.

अर्थ :– एकाने गुरू व्हावे, दुसऱ्याने शिष्य व्हावे हे फारच अधमपणाचे लक्षण आहे. १ सर्व भूतमात्रांत नारायणच सायत्वाने वास करीत असल्याने आपल्या स्वतःप्रमाणेच दुसऱ्यास मानावे. २ दोरी ही साप नसून दोरी आहे असे समजल्यानंतर अंगाचा थरकाप व मनाची भीती राहू नये. ३ तुकाराम महाराज म्हणतात, म्हणून आपण कधी गुणदोषांच्या मोमात पडू नये. ४

२७९९ धनवंता घरीं । करी धनचि चाकरी ॥ १ ॥
होय बैसल्या व्यापार । न लगे सांडावेंचि घर ॥ २ ॥
रानीं वनीं द्वीपीं । असतीं तीं होतीं सोपीं ॥ ३ ॥
तुका म्हणे मोल । देतां कांहीं नव्हे खोल ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – द्वीपीं—द्वीपकल्पात, खोल–अवघड

अर्थ – जे कुणी धनवंत आहेत त्यांच्या घरी धनच सर्व प्रकारची सेवाचाकरी करीत असते धनाने सर्व काही प्राप्त होते १ घरी बसल्याबसल्या सर्व प्रकारचा व्यापार होत असल्यामुळे त्याना स्वतःचे घर सोडावे लागत नाही २ रानात, वनात द्वीपकल्पात कुठेही कोणतीही अप्राप्य वस्तु असेल तर ती द्रव्याच्या योगाने घरच्या घरी आपल्या हातात सुलभपणे येत असते ३ तुकाराम महाराज म्हणतात एखाद्या वस्तूचे मोल दिल्यानंतर काहीच अवघड होत नाही ४

२८०० हा गे माझा अनुभव । भक्तिभाव भाग्याचा ॥ १ ॥
केला ऋणी नारायण । नव्हे क्षण वेगळा ॥ २ ॥
घालोनियां भार माथां । अवघी चिंता वारली ॥ ३ ॥
तुका म्हणे वचनासाठीं । नाम कंठीं धरोनि ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा — वारली–निवारण केली, दूर केली

अर्थ – भाग्यवान अशा भावभक्तीचा हा माझा अनुभव मी तुम्हास आज सांगत आहे १ या भक्तीने आम्ही नारायणास ऋणी केलेले असल्यामळे तो आम्हास सोडून एक क्षणभरही वेगळा होत नाही २ मी आपले सर्व ओझे त्याच्या मस्तकी घातल्याने माझी चिंता निवारण झाली आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवाच्या स्तुतीची वचने मी माझ्या कंठातून काढली, आणि ती त्याला अर्पण करून त्याचप्राऐवजी हे हरिनाम माझ्या कंठी मी धारण केले आहे ४

बीज नेलें तेथें येईल अंकुर । जतन ते सार करा याची ॥ ३ ॥
तुका म्हणे माझी निश्चिंतीची सेवा । वेगळें नाहीं देवा उरों दिलें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- खुंटोनिया-पकडून, वावडी-पतग, मोकलिली-मोकळी सोडली, जतन-सरक्षण.

अर्थ :- कागदाचा लहान पतंग आकाशात मोकळेपणाने सोडून देऊन त्याची दोरी मात्र आपल्या हातात पकडून ठेविल्यावर तो आपल्याच ताब्यात राहतो. १ एखादी वस्तू गहाण ठेवून कर्ज दिल्यास कर्ज बुडण्याची भीती नसते. कारण त्या वस्तूच्या रूपाने संरक्षण लाभलेले असते २ जमिनीत बीज नाहीसे झाल्यासारखे वाटले तरी त्याला एकदा अंकुर फुटला व त्यास खतपाणी घातले की त्याचे सार धान्याच्या रूपाने आपल्या पदरात पडते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, याप्रमाणे देवा, तुमची सेवा करणें हेच माझ्या निश्चिंतीचे कारण आहे. याखेरीज काही वेगळी इच्छा मी उरू दिलेली नाही. ४

२८०३ शहाणपणें वेद मुका । गोपिका त्या ताकटी ॥ १ ॥
कैसें येथें कैसें तेथें । शहाणे ते जाणती ॥ २ ॥
यज्ञमुखें[1] खोडी काढी । कोण गोडी बोरांची ॥ ३ ॥
तुका म्हणे भावाविण । अवघा सीण केला होय[2] ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – ताकटी-ताक पिणाऱ्या गोपी.

अर्थ :- शहाणपणामध्ये प्रसिद्ध असणारा वेद परमेश्वराचे वर्णन करू शकत नाही तो मौन होऊन राहातो; परंतु गोकुळातील ताक पिणाऱ्या गोपी मात्र त्याची कृपा संपादन करू शकतात १ या ठिकाणी असे कसे; व त्या ठिकाणी असे कसे, हे जे कुणी शहाणे आहेत तेच जाणतील २ कुणी हविर्भाग अर्पण करून अग्नीच्या योगाने देवास संतुष्ट करू लागला तर हा देव त्यातही काही खोडी काढतो. पण शबरी भिल्लिणीची बोरे मात्र यास कोण गोड लागतात ३ तुकाराम महाराज म्हणतात, मनात भावभक्ती असल्याशिवाय हे सर्व उपाय व्यर्थ श्रमच आहेत. ४

२८०४ मजुरांचें पोट भरे । दाता उरे संचला ॥ १ ॥
या रे या रे हातोहातीं । काम माती सारावी ॥ २ ॥
रोजकीर्दी होतां झाडा । रोकडाचि पर्वत ॥ ३ ॥
तुका म्हणे खोल पाया । वेचों काया क्लेशेसीं[3] ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :— झाडा-हिशेब, वेचों-खर्च करून.

अर्थ – जो कुणी दाता आहे त्याच्याजवळ धनाचा संचय असला म्हणजे मजुरी करणाऱ्यास पोटभर मिळते १ लोकहो, तुम्ही आपल्या कामावर माती घालून माझ्याकडे लौकर लौकर धावून या. २ येथे रोज-मेळाची कीर्द असल्यामुळे दररोज हिशेब पूर्ण होतो आणि रोकड शिल्लक राहाते ३ तुकाराम महाराज म्हणतात, आपल्या शरीराने परिश्रम खर्च करून सेवाभावाचा पाया खोल घालावा ४

२८०५ स्मशानीं आम्हां न्याहालीचें सुख । या नांवें कौतुक तुमची कृपा ॥ १ ॥
नाहीं तरीं वांयां अवघें निर्फळ । शब्द ते पोकळ बडबड ॥ २ ॥
झाडें झुडें जीव सोइरे पाषाण । होती तईं दान तुम्हीं केलें ॥ ३ ॥
तुका म्हणे आतां पाहे अनुभव । घेऊनि हातीं जीव पांडुरंगा ॥ ४ ॥

---

१ यज्ञ मुखीं २ तो, ३ क्लेशेंची.

शब्दार्थ व टीपा – न्याहालीचें-गाद्यागिर्दीचे

अर्थ — देवा आम्ही स्मशानात जरी असलो तरी तेथेही गाद्यागिर्दीचे सुख आम्हास प्राप्त झाले म्हणजे तुमची पूर्ण कृपा झाली असे आम्हास वाटेल १ नाही तर पोकळ शब्दाची निरर्थक बडबड व्यर्थच म्हणावी लागेल २ ज्यावेळी तुमची कृपा पूर्णपणे होईल त्यावेळी झाडेझुडपे, इतर जीव, पाषाण इत्यादी आमचे सोयरे झाल्यासारखे वाटतील ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी आता यासंबंधीचा अनुभव माझा जीव हातात घेऊन पाहात आहे ४

२८०६　आमची जोडी ते देवाचे चरण । करावें चिंतन विठोबाचे ॥ १ ॥
लागेल तरी कोणी घ्यावें[1] घणीवरी । आमुपचि परी आवडीच्या ॥ २ ॥
उभारिला कर प्रसिद्ध या जग[2] । कळ केला त्याग मागें पुढें ॥ ३ ॥
तुका म्हणे होय दरिद्र विच्छिन्न । ऐसे देऊ दान एकवेळे ॥

शब्दार्थ व टीपा – जोडी-प्राप्ती घणीवरी-तृप्ती होईपर्यंत, परी-प्रकार

अर्थ – या विठोबाचे चिंतन सदैव करावे आणि त्याच्याच पायाचे सतत ध्यान करणे हीच आमची प्राप्ती आहे १ ज्या कुणास हा लाभ घ्यायचा असेल त्याने तो आपापल्या इच्छेप्रमाणे तृप्ती होईपर्यंत घ्यावा आपल्याच आवडीच्या प्रकाराने हा लाभ घ्यावा २ त्याच्या प्राप्तीशिवाय आम्ही या प्रपंचाचा त्याग मागे केला आहे, पुढेही करू, असे मी माझा हात उभारून सर्व जगात प्रसिद्ध करीत आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात ज्याच्या प्राप्तीने सर्व दारिद्र्य दूर होईल अशा प्रकारचे दान आम्ही एकदम देऊ ४

२८०७　दधिमाझी लोणी जाणती सकळ । तें काढी निराळें जाणे मथन ॥ १ ॥
अग्नि काष्ठामाजी ऐसे जाणे जन । मथिलियाविण कैसा जाळी ॥ २ ॥
तुका म्हणे मुख मळीण दर्पणीं । उजळिल्यावाचूनि कैसें भासे ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा – मथन–घुसळणे, मथिलियाविण–घुसळल्याखेरीज मळीण–मळकट, दर्पणीं–आरशात.

अर्थ — दह्यामध्ये लोणी असते हे सवच जाणतात, पण जो दह्याचे घुसळणे जाणतो त्यालाच ते लोणी मिळते १ काष्ठात अग्नी असल्याचे सवच जाणतात, पण त्याचे एकमेकाशी घर्षण केल्याशिवाय जाळण्याचे कार्य कसे होणार ? २ तुकाराम महाराज म्हणतात, मळलेल्या आरशास स्वच्छ केल्याशिवाय त्यात आपले मुख कसे चांगले दिसेल ? ३

२८०८　नको नको मना गुतू मायाजाळीं । काळ आला जवळी ग्रासावया ॥ १ ॥
काळाची हे उडी पडेल बा जेव्हा । सोडविना तेव्हां मायबाप ॥ २ ॥
सोडवीना राजा देशींचा चौधरी । आणीक सोइरीं भलीं भलीं ॥
तुका म्हणे तुला[3] सोडवीना कोणी । एका चक्रपाणी वाचूनियां ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – ग्रासावया–भक्षण करण्यासाठी चौधरी–देशाचा मालक, अधिकारी

अर्थ – अरे मना तू या संसाराच्या मायाजालात मुळीच गुतू नकोस तुला भक्षण करण्यासाठी काळ जवळ आहे हे ध्यानात असू दे १ ज्यावेळेस या काळाची उडी तुझ्यावर पडेल तेव्हा तुझे आईबापही या प्रसंगी तुला वाचवू शकणार नाहीत २ अशा प्रसंगी देशाचा अधिकारी किंवा प्रत्यक्ष राजाही तुला सोडवू शकणार नाही, इतर काही मोठी मोठी नात्याची माणसेही तुझे रक्षण करणार नाहीत ३ तुकाराम महाराज म्हणतात, या एका चक्रपाणीवाचून तुला कुणीही या संकटातून मुक्त करणार नाही ४

---

१ घ्यारे २ जगें ३ तुज

२८०९ पुढें जेणें लाभ घडे । तेंचि वेडे नाशिती ॥ १ ॥
येवढी कोठें नागवण । अंधारून विष घ्यावें ॥ २ ॥
होणारासी मिळे बुद्धि । नेदी शुद्धी धरूं तें ॥ ३ ॥
तुका म्हणे जना सोंग । दावी रंग आणीक ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– नागवण–आघात, नाश.

अर्थ :– ज्यामुळे पुढे लाभ होणार आहे त्याचा हे वेडे लोक नाशच करतात १ अधारात राहून विषाचे प्राशन करावे, असला आघात कुठे घडला आहे का ? २ पण पुढे जे होणारे आहे त्यासच अनुसरूनच आपणास बुद्धी होते. असे करू नये असा विचार या वेळी तुम्हांस कधी सुचत नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, इतरच रंगांनी वेडे लोक लोकाना सोंग दाखवितात. ४

२८१० ऐका गा ए अवघे जन । शुद्ध मन ते हित ॥ १ ॥
अवघा काळ नव्हे जरी । समयावरी जाणावे ॥ २ ॥
नाहीं कोणी सवें येता । संचिता या वेगळा[1] ॥ ३ ॥
बरवा अवकाश आहे । करा साहे इंद्रियें ॥ ४ ॥
कर्मभूमीऐसा ठाव । वेवसाव जाणावा ॥ ५ ॥
तुका म्हणे उत्तम जोडी । जाती घडी नरदेह ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा :– सवें–बरोबर, बरवा–चागला, साहे–साह्य, जोडी–प्राप्ती.

अर्थ :– अहो सर्व लोकहो, तुम्ही हे सर्व शुद्ध मनाने ऐका. त्यातच तुमचे हित आहे. १ सर्व काळ काही तुमचे चित्त एकाग्र होणार नाही, तरी प्रसग पाहून, जाणून सावध असावे २ तुमच्या सचितकर्मांशिवाय तुमच्या बरोबर इतर कुणीही येणार नाही. ३ अजून चांगला अवकाश आहे अतकाळास, तोपर्यंतच इंद्रियाचे साह्य घेऊन परमार्थसाधन करावे. ४ या कर्मभूमीत ते आपण करावे ते साध्य होईल असे हे ठिकाणी नीट जाणावे. ५ तुकाराम महाराज म्हणतात, या उत्तम नरदेहाची प्राप्ती झाली आहे, तो क्षणाक्षणाला जात आहे हे ध्यानात असावे. ६

२८११ संतसेवेसि अंग चोरी । दृष्टी न पडो तयावरी ॥ १ ॥
ऐसियासी व्याली रांड । जळो जळो तिचें तोंड ॥ २ ॥
संतचरणीं ठेवितां भाव । आपेंआप भेटे देव ॥ ३ ॥
तुका म्हणे संतसेवा । माझ्या पूर्वजांचा ठेवा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – व्याली–जन्म देती झाली.

अर्थ :– संतांची सेवा करताना जे कुणी अग चोरतात त्याचे दर्शन सुद्धा मला नको. १ अशा प्राण्यास ही रांड कशासाठी जन्म देती झाली ? तिच्या तोंडास आग लागो २ सतचरणांवर भाव ठेवून वागलो की, देवाची भेट आपोआप होते ! ३ तुकाराम महाराज म्हणतात, साधुसताची सेवा हा माझा पूर्वजाचा अमोल ठेवा आहे. ४

२८१२ गेले पळाले दिवस रोज । काय ह्मणतोसि माझें माझें ॥ १ ॥
सळे धरोनि बैसला काळ । फाको नेदी घटिका पळ ॥ २ ॥
कां रे अद्यापि न कळे । केश फिरले कान डोळे ॥ ३ ॥

---

१ वेगळे.

हित कळोनि असतां हातीं । तोंडीं पाडोनि घेसी माती ॥ ४ ॥
तुज ठाउके मी जाणार । पाया शोधोनि बांधिसी घर ॥ ५ ॥
तुका म्हणे वेगें । पंढरिराया शरण रिघें ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – सळे–आग्रहाचे माप

अर्थ :– अरे, रोज रोज दिवस पळत आहेत, व्यर्थ जात आहेत उगाच माझे माझे म्हणून व्यर्थ काळ का घालवीत आहेस ? १ हा काळ तुझ्याविषयी आग्रहाचे माप धरून बसलेला आहे तो तुला एक घटका अथवा पळभरही इकडेतिकडे फिरकू देणार नाही २ अरे, तुला अजूनही हे सर्व का समजत नाही ? तुझ्या केसांचा रंग फिरला, कान व डोळे आपले कार्य करीत नाहीसे झाले ३ तुझे हित करून घेणे हे तुझ्या हाती असूनही तू उगाच तोंडात माती घालून का घेतोस ? ४ आपण कधी तरी जाणार आहोत, हे माहीत असूनही तू व्यर्थ खोल पाया शोधून घर बांधायला निघाला आहेस ५ तुकाराम महाराज म्हणतात, या ऐवजी तू त्वरेने पंढरीनाथास शरण जा ना ६

२८१३ आतां माझ्या मायबापा । तूं या पापा प्रायश्चित्त ॥ १ ॥
फजित हे केले खळ । तो विटाळ निवारीं ॥ २ ॥
प्रेम आतां पाजीं रस । करीं वास अंतरीं ॥ ३ ॥
तुका म्हणे पांडुरंगा । जिवलगा माझिया ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – खळ–दुर्जन, दुष्ट लोक, अंतरीं–अंत करण

अर्थ :– माझ्या मायबापा, तूच माझ्या या पातकास प्रायश्चित्त आहेस १ मी सर्व दुष्टाची फजिती केली; त्या पापाचे निवारण तूच आता करावेस २ मला आता तुझ्या प्रेमाचा रस पाज आणि माझ्या अंत करणात निवास कर ३ तुकाराम महाराज म्हणतात, पांडुरंगा, तू माझ्या जीवाचा जिवलग आहेस ४

२८१४ कां रे न पवसी धांवण्या । अंगराख्या नारायणा ॥ १ ॥
अंगीं असोनिया बळ । होसी खटपाळ नाठपाळ ॥ २ ॥
आह्मीं नरकासी जातां । काय येईल तुझ्या हातां ॥ ३ ॥
तुका म्हणे कान्हा । क्रियानष्टा नारायणा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– अंगराख्या–अंग राखून काम करणारा

अर्थ – नारायणा, तू अंग राखून काम करणारा आहेस. रक्षणासाठी तू का धावून येत नाहीस ? १ तुझ्या अंगी मला मदत करण्याचे सामर्थ्य असूनही तू असा खटपाळ व नाठाळासारखा का होतोस ? २ देवा, आम्ही नरकास गेल्यावर तुझ्या हातास काय रे येणार आहे ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, कान्होबा, नारायणा, तू क्रियानष्ट आहेस ४

२८१५ माझे पाय तुझी डोई । ऐसें करिं गा माक देईं ॥ १ ॥
पाहतां तंव उफराटें । घडे तरी[१] भाग्य मोठें ॥ २ ॥
बहु साधन मोलाचे । यासी जोडा दुजें कैंचे ॥ ३ ॥
नका अनमानू विठ्ठला । तुका म्हणे धडा जाला ॥ ४ ॥

---
१ ठाईं

शब्दार्थ व टीपा – भाक–वचन

अर्थ – देवा तुझे पाय हे माझे व्हावेत आणि माझे डोके हे तुझे व्हावे, असे करण्याविषयी तू मला वचन दे १ वरवर पाहाता हे उफराटे दिसते पण असे घडेल तरच भाग्य मोठे आहे २ हे साधन फारच मोलाचे असून याला तुलना दुसरी कुठून येणार ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, विठ्ठला, याविषयी मला धडा मिळालेला आहे तरी तुम्ही मला अव्हेरू नका ४

२८१६ पवित्र तें अन्न । हरिचिंतनीं भोजन ॥ १ ॥
येर वेठ्या पोट भरी । चाम मसकाचे परी ॥ २ ॥
जेऊनि तो धाला । हरिचिंतनीं केला काला ॥ ३ ॥
तुका म्हणे चवी आलें । जें का मिश्रित विठ्ठलें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – वेठ्या–बिगारीने चाम–कातडयाच्या, मसकाचे–पखालीच्या धाला–तृप्त झाला

अर्थ – श्रीहरीचे चिंतन करून भोजनसमयी जे अन्न घतले जाते ते फार शुद्ध व पवित्र असते १ या खेरीज जे बिगारीने काम केल्यासारखे नुसते पोट भरतात, त्याचे हे करणे म्हणजे कातड्याची पखाल भरण्यासारखे आहे २ जे हरिचिंतन करून प्रेमाने काला सेवन करतात ते प्रभुकृपेने तृप्त होतात ३ तुकाराम महाराज म्हणतात जे विठ्ठलनामाच्या मिश्रणाने तयार झाले त्याला फार चांगली गोडी प्राप्त होते ४

विवरण–आपण भोजन करतो ते कशासाठी ? केवळ पोट भरण्यासाठी ? भोजन करताना, घास घेताना कोणती वृत्ती असावी ? यासंबंधी आपल्या धर्मविचारात अतिशय योग्य असे मार्गदर्शन केले आहे अन्न खाणे अथवा भोजन करणे हे नुसते उदरभरण नसून एक प्रकारचे यज्ञकर्म आहे असा भावार्थ सर्वत्र सांगितला गेला आहे भोजनही ईश्वराचे नामस्मरण करून घ्यावे भोजन करणारा अन्न पचविणारा कोण आहे हे ध्यानात असावे नाहीतर उगीच चामड्याची पखाल भरण्यात काय अर्थ ? म्हणून हरिचिंतनात भोजन केले तरच मनाची तृप्ती होत असते अन्न खाणं याचा अर्थ धर्मशास्त्राच्या दृष्टीने अन्न अग्नीस समर्पण करणे असाच आहे प्रत्यक्ष ईश्वरच वैश्वानराच्या रूपाने अन्न पचवीत असतो गीतेत सांगितलेले प्रसिद्धच आहे की अहं वैश्वानरो भूत्वा प्राणिनां देहमाश्रित । प्राणापानसमायुक्त पचाम्यन्नं चतुर्विधम् । –मीच वैश्वानररूप अग्नी होऊन प्राण्याच्या देहात राहिलो असून प्राण व अपान यांनी युक्त होऊन भक्ष्य, चोष्य, लेह्य व पेय असे चतुर्विध अन्न पचन करतो यासाठीच एकट्याने अथवा समुदायाने भोजन करताना ईश्वराचे स्मरण करण्याची पद्धत आहे

२८१७ चरणाचा महिमा । हा तो तुझ्या पुरुषोत्तमा ॥ १ ॥
अंध पारखी माणिकें । बोलविशी स्पष्ट मुकें ॥ २ ॥
काय नाहीं सत्ता । हातीं तुझ्या पंढरीनाथा ॥ ३ ॥
तुका म्हणे मूढा । मज चेष्टविलें जडा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – पारखी–परीक्षा करतात चेष्टविलें–जागृत केले

अर्थ – पुरुषोत्तमा तुझ्या चरणाचा महिमा पुढीलप्रमाणे आहे १ तुझ्या कृपेमुळे आंधळा मनुष्यही माणकासारख्या रत्नाची पारख करू शकतो मुका मनुष्यही स्पष्टपणे बोलू लागतो २ पंढरीनाथा, तुझ्या हातात कोणती सत्ता नाही ? ३ तुकाराम महाराज म्हणतात माझ्यासारख्या मूढाला व जडालाही तू जागृत केलेस ४

२८१८ चळियेत कर्म । करी आपुला तो धर्म ॥ १ ॥
पुढें घालुनियां सत्ता । घ्यावे पतना पतिता ॥ २ ॥

आचरणें खोटीं । केलीं सलताती पोटीं ॥ ३ ॥
तुका म्हणे देवा । नाहीं भजन केली सेवा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– कर्म–प्रारब्धकर्म.

अर्थ :–बळकट झालेले आमचे प्रारब्धकर्म आपल्या स्वभावधर्माप्रमाणे करीत आहे. १ आमचे हे प्रारब्धकर्म आपल्या सत्तेने आम्हांस पतनास पाठविते २ आम्ही जी जी खोटी कर्मे केली ती आमच्या हृदयात आता टोचतात. ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, मी तुमची भजनसेवा कधी मनापासून केलेली नाही. ४

२८१९ कं वाहावें जीवन । कं पलंगीं शयन ॥ १ ॥
जैसी जैसी वेळ पडे । तैसें तैसे होणें घडे ॥ २ ॥
कं भोज्य नानापरी । कं कोरडया भाकरी ॥ ३ ॥
कं वसावें वहनीं । कं पायीं अन्हवाणीं ॥ ४ ॥
कं उत्तम प्रावणें । कं वसनें तीं जीर्णें ॥ ५ ॥
कं सकळ संपत्ती । कं भोगणें विपत्ती ॥ ६ ॥
कं सज्जनाशीं संग । कं दुर्जनाशीं योग ॥ ७ ॥
तुका म्हणे जाण । सुखदु:ख तें समान ॥ ८ ॥

शब्दार्थ व टीपा :– जीवन–पाणी, भोज्य–भोजनासाठी पक्वान्ने, प्रावणें–कपडे, वसनें–वस्त्र, कपडे.

अर्थ :– कधी आपणास कष्टाने पाणी भरण्याचे काम करावे लागते, तर कधी मऊ मऊ पलंगावर झोपायला मिळते १ जशी वेळ येईल त्याप्रमाणे वागावे लागते २ कधी भोजनास नाना प्रकारची पक्वान्ने मिळतात, तर कधी कोरडी भाकरीच खाण्याचा प्रसंग येतो. ३ कधी उत्तम वाहनात बसायला मिळते, तर कधी अनवाणीच रखडावे लागते ४ कधी उत्तमोत्तम वस्त्रे वापरायला मिळतात, तर कधी जीर्ण झालेले व फाटके कपडे घालावे लागतात. ५ कधी सर्व प्रकारची संपत्ती हाती असते, तर कधी विपत्तीत दिवस काढावे लागतात ६ कधी सज्जनांशी संगत करण्याची संधी मिळते, तर कधी दुष्ट माणसाबरोबर संगतीचा योग येतो. ७ तुकाराम महाराज म्हणतात, असे असल्याने सुखदु:ख हे समान जाणावे. ८

२८२० उंच निंच कांहीं नेणे हा भगवंत । तिष्ठे भाव भक्त देखोनियां ॥ १ ॥
दासीपुत्र कण्या विदुराच्या भक्षी । दैत्या घरीं रक्षी प्रल्हादासी[1] ॥ २ ॥
चर्म रगूं लागे रोहिदासा संगीं[2] । कबिराचे मागीं[3] विणी शेले ॥ ३ ॥
सजनकसाया[4] विकूं लागे मास । मळा सांवत्यास खुरपूं लागे ॥ ४ ॥
नरहरिसोनारा घडों फुंकूं लागे । चोख्यामेळया संगें ढोरें ओढी ॥ ५ ॥
नामयाची जनी सवें वेची शेणी । धर्मा घरीं पाणी वाहे झाडी ॥ ६ ॥
नाम्यासवें जेवी नव्हे संकोचित । ज्ञानियाची भिंत अंगीं ओढी ॥ ७ ॥
अर्जुनाचीं[5] घोडीं हाकी हा सारथी । भक्षी पोहे प्रीती सुदाम्याचे ॥ ८ ॥
गौळियाचे घरीं गाई अंगें वळी । द्वारपाल बळीद्वारीं जाला ॥ ९ ॥
यंकोबाचे ऋण फेडी हृषीकेशी । आंबऋषीचे सोसी गर्भवास ॥ १० ॥

१ प्रल्हादासी २ सगें ३ मागें शेले विणी ४ सज्जन कसाया ५ अर्जुनाचे रथीं होय हा सारथी

मिराबाई सार्टीं घेतो विषप्याला । दामाजीचा जाला पाडेवार ॥ ११ ॥
घडी माती वाहे गोऱ्या कुंभाराची । हुंडी महत्याची अंगें भरी ॥ १२ ॥
पुंडलिकासाठीं अझूनि तिष्ठत । तुका म्हणे मात धन्य त्याची ॥ १३ ॥

शब्दार्थ व टीपा :– यंकोबाचें–एकोबाचे, एकनाथाचे, पाडेवार–महार, महत्याची–नरसी मेहत्याची, मात–हकीगत.

अर्थ :– हा भगवंत आपला भक्त उच्च जातीचा आहे की नीच जातीचा आहे हे काही कधीच पाहात नाही. तो आपल्या भक्तांचा भाव पाहून त्यांच्यासाठी तिष्ठत उभा असतो १ विदुर हा दासीपुत्र असला तरी हा भगवत त्याच्या घरी कण्या भक्षण करतो आणि दैत्यकुळात जन्मास आलेल्या प्रल्हादास हाच रक्षीत असतो २ हा भगवत रोहीदास चाभारावरोबर त्याचे कातडे रंगवू लागतो आणि कबीरदासाच्या मागावर त्याच्याबरोबर हा शेले विणीत असतो ३ सजन कसाबाच्या बरोबर हा मांस विकतो व सावत्यामाळ्याबरोबर त्याचा मळा खुरपू लागतो. ४ नरहरी सोनाराबरोबर हा त्याच्या दुकानात दागिने घडवितो आणि त्याची शेगडी फुकतो; चोखा महारावरोबर मेलेली ढोरें ओढण्याचे काम हाच करतो. ५ नामदेवाच्या दासी जनीबरोबर हा गोवऱ्या वेचतो आणि धर्मराजाच्या घरी हा पाणी भरतो. झाडलोटही करतो. ६ नामदेव शिप्याबरोबर जेवण करताना याला कधी सकोच वाटत नाही. ज्ञानेश्वरांची भिंत हाच ओढतो. ७ अर्जुनाचा सारथी होऊन हा त्याची घोडी धूत असतो; आणि मोठ्या आवडीने सुदाम्याचे पोहे हा भक्षण करतो. ८ गोकुळातील गवळ्यांच्या घरी हा स्वतः गाई वळतो व बलिराजाच्या घरी द्वारपाल होऊन राहातो ९ हा हृषीकेशी एकनाथाचे ऋण फेडतो आणि अंबऋषीसाठी गर्भवासही सोसतो. १० मीराबाई-साठी यानेच विषाचा प्याला घेतला होता; दामाजीची रसद पोचती करण्यासाठी हा महार बनला होता. ११ गोरा कुंभाराच्या घरी हा माती तुडवून त्याची मडकी घडवितो आणि नरसी मेहत्याची हुंडी स्वतः भरतो. १२ तुकाराम महाराज म्हणतात, पुंडलीकासाठी हा अजून तिष्ठत उभा आहे. अशी या देवाची हकीकत मोठी धन्य आहे. १३

२८२१ भेटीलागीं जीवा लागलीसे आस । पाहे रात्रीं दिवस वाट तुझी ॥ १ ॥
पूर्णिमेचा चंद्रमा[1] चकोरा जीवन । तैसें माझें मन वाट पाहे ॥ २ ॥
दिवाळीच्या मुळा लेंकी आसावली । पाहतसे वाटुली पंढरीची ॥ ३ ॥
भुकेलिया बाळ अतिशोक करी । वाट पाहे परि माउलीची ॥ ४ ॥
तुका म्हणे मज लागलीसे भूक । धांवूनि श्रीमुख दावी देवा ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– आस–इच्छा, आसावली–इच्छा करते.

अर्थ :– देवा, माझ्या जीवास तुझ्या भेटीची फार इच्छा निर्माण झाली आहे रात्रदिवस मी तुझीच वाट पाहात आहे. १ पौर्णिमेचा चंद्र ज्याप्रमाणे चकोर पक्ष्यास जीवन वाटते; त्याच आतुरतेने माझे मन तुझी वाट पाहात आहे. २ दिवाळीच्या वेळी आपणांस माहेराहून आईबापांचे आमंत्रण येण्याची मुलगी इच्छा करीत असते; त्याच उत्सुकतेने देवा, मी पंढरपुरची वाट पाहात असतो ३ भुकेलेला बाळ आपल्या आईकरता फार शोक करतो; परंतु तिचीच सारखी वाट पाहात असतो; मी त्याचप्रमाणे विठ्ठलाची वाट बघत आहे. ४ तुकाराम महाराज म्हणतात, मला अतिशय भूक लागलेली आहे यासाठी तू धावून ये व मला आपले श्रीमुख दाखीव. ५

२८२२ आले संत पाय ठेवितो मस्तकीं । इहीं उभयलोकीं सरता केलों ॥ १ ॥
वंदीन पाउलें लोळेन चरणीं । आजि इच्छाधणी फिटईल ॥ २ ॥

[1] चंद्र चकोराचे जीवन

अवघीं पूर्व पुण्यें जालीं सानुकूळ । अवघेंचि मंगळ संतभेटी ॥ ३ ॥
तुका म्हणे कृतकृत्य जालों देवा । नेणें परि सेवा डोळा देखें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – इहीं–या लोकी, सरता केलों–मान्य झालो, इच्छाधणी–इच्छेची तृप्ती.

अर्थ :– संत आले व त्यांनी आपले पाय माझ्या मस्तकावर ठविले यामुळे मी या लोकी व परलोकी मान्य झालो. १ मी आता त्यांच्या चरणास वंदन करीन; त्यावर लोळण घेईन. आज माझी पाविषयीची इच्छा पूर्ण झाली आहे. २ अनेक जन्मांची पूर्वपुण्ये आज मला अनुकूल झाली आहेत त्यामुळे संतांची भेट होऊन सर्व काही मंगलच बनले आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, मी आज कृतकृत्य झालो आहे मी दुसरे काही समजत नसलो, तरी मी आज सेवेचे फळ मात्र प्रत्यक्ष अनुभविले आहे ४

२८२३ करीं धंदा परि आवडती[1] पाय । प्रीती सांगों काय नेणां देवा ॥ १ ॥
रूप डोळां देखें सदा सर्वकाळ । संपादितों आळ प्रपंचाचा ॥ २ ॥
नेमून ठेविली कारया[2] कारणीं । आमुचिये वाणी गुण वदे ॥ ३ ॥
मनासीं उत्कंठा दर्शनाचा हेवा । नाहीं लोभ जीवा धन धान्य ॥ ४ ॥
उसंतितो पंथ वेठीचिया परी । जीवनसूत्र दोरीपाशीं ओढ ॥ ५ ॥
तुका म्हणे[3] ऐसे करितों निर्वाण । जीव तुह्मां भिन्न नाहीं माझा ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – आळ–छंद, नाद, हेवा–हाव, उसंतितों–मार्ग आक्रमितो

अर्थ :– देवा, मी उदरनिर्वाहाचा काही धंदा करीत असतो. पण माझी सारी प्रीती तुमच्या पायांच्या ठिकाणीच आहे मी हे काय सांगायला पाहिजे ? तुम्ही जाणीत नाही काय ? १ सदा सर्वकाळ मी तुमचे रूप डोळ्यांनी पाहात आहे व माझ्यावर असलेल्या प्रपंचाचा छंद मी संपादन करीत आहे २ मी, माझे शरीर तुमच्याचसाठी नेमून दिले असून माझी वाणी तुमचेच गुणगान गात आहे ३ माझ्या मनास तुमच्या दर्शनाची उत्कंठा आहे. त्याशिवाय माझ्या जीवास धनाचा लोभ नाही ४ वेठीचा मजूर जसा मार्ग आक्रमण करीत असतो, त्याप्रमाणे मी प्रपंच करीत आहे. पण माझ्या जीवनसूत्राची ओढ तुमच्या पाशीच आहे ५ तुकाराम महाराज म्हणतात, तुमच्यापाशी मी असे निर्वाण मांडले आहे की, माझा जीव तुमच्या जीवाहून भिन्न नाही ६

२८२४ कां रे माझीं पोरें म्हणसील[4] ढोरें । मायबाप खरें काय[5] एक ॥ १ ॥
कां रे गेले ह्मणोनि करिसी तळमळ । मिथ्याचि कोल्हाळ मेलियाचा ॥ २ ॥
कां रे माझें माझें म्हणसोल गोत । नो संडवितों[6] दूत यमा हातीं ॥ ३ ॥
कां रे मी बळिया म्हणविसी ऐसा । सरणापाशीं कैसा उचलविसी ॥४॥
तुका म्हणे न धरीं भरवसा कांहीं । वेगीं शरण जाईं पांडुरंगा ॥ ५ ॥

ना? ४ तुकाराम महाराज म्हणतात, तू यांच्यापैकी कुणाचाच भरवंसा धरू नकोस त्वरेने त्या पांडुरंगास शरण जा. ५

२८२५ अगा करुणाकरा करितसें धांवा । या मज सोडवा लवकरि ॥ १ ॥
ऐकोनियां माझी करुणेचीं वचनें । व्हावें नारायणें उतावीळ ॥ २ ॥
मागें पुढें अवघा दिसे रिता ठाव । ठेवूनि पायीं भाव वाट पाहे ॥ ३ ॥
उशीर तो आतां न पाहिजे केला । अहो जी विठ्ठला मायबापा ॥ ४॥
उरलें तें एक हेंचि मज आतां । अवघें विचारितां शून्य जालें ॥ ५ ॥
तुका म्हणे आतां करीं कृपादान । पाउलें समान दावीं डोळां ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा :- करुणाकरा-करुणेच्या सागरा, रिता-रिकामा, विचारितां-विचार करून पाहाता.

अर्थ – करुणेच्या सागरा, देवा, मी तुमचा धावा करीत आहे लौकर या व मला या संसारपाशातून सोडवा १ माझी ही करुणेची वचने ऐकून नारायणाने उतावीळ होऊन माझ्याकडे धावून यावे. २ तुमच्याशिवाय मागेपुढे सर्वत्र मला ओस दिसत आहे यासाठी मी तुमच्या चरणांवर भाव ठेवून वाट पाहात आहे. ३ अहो विठ्ठला, मायबापा, आता तुम्ही उशीर करू नये. ३ आता माझ्या समोर तुमचे दर्शन हे एकच उरले आहे. बाकी विचार करून पाहता सर्व शून्यच झाले आहे. ४ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तुम्ही माझ्यावर कृपा करा आणि माझ्या डोळ्याना आपले समचरण दाखवा ना ५

२८२६ न मनीं ते ज्ञानी न मनीं ते पंडित । ऐसे परीचे एकएका भावे ॥ १ ॥
धातू पोसोनियां आणिका उपदेश । अंतरीं तो लेश प्रेम नाहीं ॥ २ ॥
न मनीं ते योगी न मनीं ते हरिदास । दर्शनें बहुवस बहुतां परीचीं[1] ॥ ३ ॥
तुका म्हणे तयां नमन बाह्यात्कारी । आवडती परी चित्तशुद्धीचे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – न मनीं–मानीत नाही, अतरीं–हृदयात, बहुवस–बहुतेकाची.

अर्थ :–मी ज्ञानी माणसाना मानीत नाही, पडितांना मानीत नाही कारण त्याचे एक एक भाव पुढील प्रकारचे असतात. १ शरीरातील धातूचे पोषण करून, इंद्रियवृत्तींना पोसून हे दुसऱ्याना उपदेश करतात. त्यांच्या मनात परमार्थाविषयी, प्रभूविषयी प्रीतीचा लवलेशही नसतो. २ ते योगी अथवा ते हरिदासही मी मानीत नाही. कारण बहुतेकांची दृष्टी विविध प्रकारची आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा लोकाना मी नमन बाह्याकाराने करतो पण ज्याचे चित्त शुद्ध आहे ते मात्र मला आवडतात. ४

२८२७ कासिया पाषाण पूजिती पितळ । अष्ट धातु खळ भावे[2] विण ॥ १ ॥
भावचि कारण भावचि कारण । मोक्षाचें साधन[3] बोलियेलें ॥ २ ॥
काय करिल जपमाळा कंठमाळा । करिसी वेळोवेळां विषयजप ॥ ३ ॥
काय करिशील पंडित हे वाणी । अक्षराभिमानी थोर होय ॥ ४ ॥
काय करिशील कुशल गायन । अंतरीं मळीण कुबुद्धि ते ॥ ५ ॥
तुका म्हणे भाव नाहीं करी सेवा । तेणें काय देवा योग्य होती ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा :– खळ–दुष्ट लोक, अंतरीं–अंत करणात, कुबुद्धि–वाईट बुद्धी.

---

१ परी, २ भाव हीण, ३ कारण.

अर्थ – श्रीहरीशिवाय मनात भाव नसताना हे दुष्ट लोक पाषाणाच्या अथवा पितळाची अष्ट धातूच्या मूर्ती कशासाठी पूजतात ? १ सर्व प्रकारच्या परमार्थप्राप्तीसाठी भाव हेच एकमेव कारण आहे हेच एक मोक्षाचे साधन असलेले अनेकांनी सांगितले आहे २ मनात पुन पुन विषयाचा जप करितोस तर मग प्रीतिभावावाचून जपमाळा व कंठमाळा धारण करशील तर त्यांचा काय उपयोग ? ३ उगाच पांडित्याची वाणी काय उपयोगाची? कारण त्यामुळे ज्ञानाचा व्यर्थ अभिमान मात्र वाढणार ४ अंतःकरणातील वाईट बुद्धी मलीन झालेली असेल तर तुझ्या गायनकौशल्याची काय किंमत रे ? ५ तुकाराम महाराज म्हणतात, तू जर देवाची सेवा भावाने केली नाहीस तर तू काय देवाला मान्य होशील ? ६

२८२८ अंतरींचे गोड । राहे आवडीचे कोड ॥ १ ॥
सघष्टणें येती अगा । गुणदोष मनोभगा ॥ २ ॥
उचिताच्या कळा । नाहीं कळत सकळा ॥ ३ ॥
तुका म्हणे अभावना । भावीं मूळ तें पतना ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – कोड–इच्छा, मनोभगा–मनोभग करणारे

अर्थ – अंतःकरणात श्रीहरीचे हे गोड रूप स्थिरावले आहे त्याच्या विषयी मनात इच्छा कायमची असो १ दुसऱ्याच्या सघष्टनाने, सलगीने मनोभग करणारे अनेक गुणदोष हृदयात निर्माण होतात २ उचित अशा स्वानुभवाच्या कळा सर्वांनाच समजत नाहीत ३ तुकाराम महाराज म्हणतात श्रीहरीविषयी अभावना हेच पुढील पतनाचे मूळ कारण आहे ४

२८२९ शिळा जया देव । तैसा फळे त्याचा भाव ॥ १ ॥
होय जतन तें गोड । अंतरा येती नाड ॥ २ ॥
देव जोडे भावे । इच्छेचे तें प्रेम घ्यावे ॥ ३ ॥
तुका म्हणे मोड दावी । तैशीं फळें आलीं व्हावी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – शिळा–दगड, नाड–विघ्न, आडवणूक, मोड–अंकुर

अर्थ – दगडाला देव मानून जो ज्या भावनेने पूजितो तसा प्रकारचे फळ त्याला मिळते १ म्हणून भावाचे जतन करणे हे फार चांगले त्यात अंतर पडल्यास पुष्कळ विघ्ने येतात २ देवाची प्राप्ती भावनेनेच होते. आपल्या इच्छेप्रमाणे त्याचे प्रेम घेत राहावे ३ तुकाराम महाराज म्हणतात, ज्या प्रकारचे वृक्षाचे अंकुर असतात, तशीच फळे त्याला यावीत ४

२८३१ पायां पडावें हें माझें भांडवल । सरती हे बोल कोठें पायीं ॥ १ ॥
तरि हे सलगी कवतुक केलें । लडिवाळ धाकुलें असें बाळ ॥ २ ॥
काय उणें तुह्मां संताचिये घरीं । विदित या परी सकळही ॥ ३ ॥
तुका म्हणे माझें[1] उचित हे सेवा । नये करूं ठेवाठेवी कांहीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– सरती–पुरे पडतात, खपतात, विदित–माहीत.

अर्थ :– अहो संतजन, तुमच्या पायां पडणे हेच माझे भांडवल आहे. नाही तरी स्तुतिपर शब्द तुम्हांला कुठे पुरे पडतात ? १ मी हा व्यवहार सलगीच्या कौतुकाने केलेला आहे. कारण मी तुमचे बालक अतिशय लाडके व सर्वांत लहान असे आहे. २ तुम्हां संतांच्या घरी काय कमी आहे ? काही कमी नसल्याचे सर्वांनाच माहीत आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, माझी ही सेवा उचितच आहे. हिच्या संबंधी खरेखोटेपणाविषयी काही उठाठेव कुणी करू नये. ४

२८३२ वदवावी वाणी माझी कृपावंता । वागपुष्प संता समर्पीशी ॥ १ ॥
सर्वसंकटाचा तुह्मां परिहार । घालावा ग्यां भार पांडुरंगा ॥ २ ॥
एकसरें चिंता[2] ठेवूनियां पायीं । जालों उतराई होतों तेणें ॥ ३ ॥
तुका म्हणे येथें जालें अवसान । कायावाचा मन वेचूनियां ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– वागपुष्प–वाणीची पुष्पे, अवसान–अखेर, समाप्ती.

अर्थ :– कृपावंता, माझ्या वाणीतून अशी वचने वदवा की ती फुलाप्रमाणे होऊन संतांच्या चरणी समर्पण व्हावीत. १ पांडुरंगा, माझ्यावर जी संकटे येतील त्यांचा भार सर्व प्रकारे तुमच्यावर घालावा असे वाटते. तुम्ही मग त्यांचा परिहार करावा. २ एकत्वाने मी माझे चित्त तुमच्या पायांवर ठेवून मी आता उतराई झालो आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, माझे शरीर, माझी वाचा, माझे मन यांना तुमच्या पायांवर समर्पण करून मी योग्य ती अखेर साधली आहे. ४

२८३३ नमावे पाय हें माझें उचित । आशीर्वादें हित तुमचिया ॥ १ ॥
कृपेचा वोरस न समाये पोटीं । म्हणोनि उफराटीं वचनें हीं ॥ २ ॥
तुमची उच्छावळी हे[3] माझें भोजन । झाडावें अंगण केरपुंजे ॥ ३ ॥
परि ऐसें पुण्य नाहीं माझें गांठीं । जेणें पडे मिठी पायांसवें ॥ ४ ॥
तुका म्हणे राहे आठवण चित्तीं । ऐसी कृपा संतीं केली तुह्मीं ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– वोरस–स्नेहभरित पान्हा, न समाये–मावत नाही.

अर्थ :– अहो संतजन, तुमच्या चरणांशी मी नमावे हेच मला उचित आहे. तुमच्याच आशीर्वादाने माझे सर्व प्रकारचे हित होणार आहे. १ तुमच्या कृपेचा स्नेहभरित पान्हा माझ्या पोटात मावेनासा झाला आहे. म्हणूनच ही अनवधानाने उरफाटी बोलणी माझ्या मुखातून निघत आहेत. २ तुमचे उष्टे अन्न हे माझे आवडीचें भोजन असून तुमच्या अंगणातील केराचे पुंज झाडून टाकण्याचे काम माझे आहे. ३ पण ज्यामुळे तुमच्या पायांवर माझी मिठी पडेल असे पुण्य मात्र माझ्याजवळ नाही. ४ तुकाराम महाराज म्हणतात, माझ्या चित्तात ईश्वराची आठवण राहील अशी कृपा तुम्ही संतांनी माझ्यावर केलेली आहे. ५

१ माझी, २ चित्त, ३ तें.

२८३४ काय नाहीं माता गौरवीत बाळा । काय नाहीं लळा पाळीत ते ॥ १ ॥
काय नाहीं त्याची करीत ते सेवा । काय नाहीं जीवा गोमटें तें ॥ २ ॥
अमंगळपणें कांटाळा न धरी । उचलोनि करीं कंठीं लावी ॥ ३ ॥
लेववी आपुले अंगे[1] अळंकार । संतोषाये[2] फार देखोनिया ॥ ४ ॥
तुका म्हणे स्तुति योग्य नाहीं परी । तुम्हा लाज थोरी अंकिताची ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – लळा–हट्ट, गोमटें–चागले, अंकिताची–सेवकाची

अर्थ – आई आपल्या बाळाला नाना प्रकारचे अलंकार घालून भूषवीत नाही का ? त्याने केलेले हट्ट ती काय पुरवीत नाही ? १ ती काय त्याची आवडीने सेवा करीत नाही ? तिच्या जीवाला तेच चागले वाटत नाही काय ? २ बालक अमगल जरी असले तरी ती कधी त्याचा कटाळा करीत नाही उलट दोन्ही हातानी त्याला उचलून आपल्या कठाशीच लावते ३ आई स्वत आपल्या हातानी त्याला अलंकार घालते आणि त्याच्याकडे पाहून फारच सतोष पावते ४ तुकाराम महाराज म्हणतात, तुमची स्तुती करावी अशी माझी योग्यता नाही पण सतजनहो तुम्ही या सेवकाची लाज नीटपणे धरावी ५

२८३५ माझिया मीपणावर पडो पाषाण । जळो हे भूषण नाम माझें ।
पापा नाहीं पार दुःखाचे डोंगर । जालों ये भूमीसी ओझें ॥ १ ॥
काय[3] विटंबना सांगों किती । पाषाण फुटती ऐसे दुःख ।
नर नारी सकळ उत्तम चांडाळ । न पाहाती[4] माझें मुख ॥ २ ॥
काया वाचा मनें अघटित करणें । चर्मचक्षु हात पाय ।
निंदा द्वेष घात विश्वासीं व्यभिचार । आणीक सांगों किती काय ॥ ३ ॥
लक्ष्मीमदे मातें[5] घडलें महा दोष । पत्नी दोनी भेदाभेद ।
पितृवचन घडली अवज्ञा अविचार । कुटिल कुचर वादी निंद्य ॥ ४ ॥
आणीक किती सांगों ते अवगुण । न वळे जिव्हा कांपे मन ।
भूतदया उपकार नाहीं शब्दा धीर । विषयीं लंपट हीन[6] ॥ ५ ॥
संत महानुभाव[7] ऐका हें उत्तरें । अवगुण अविचारें वृद्धि पापा ।
तुका म्हणे सरतें करा पांडुरंगीं । शरण आलों मायबापा ॥ ६ ॥

पित्याची आज्ञा मानली नाही. असा मी अविचारी, कुटिल, कामचुकार, वादविवाद करणारा व निंद्य बनलो आहे. ४ मी माझे अवगुण आणखी सांगू तरी किती ? ते सांगण्यासाठी माझी जीभ वळत नाही मन तर थरथर कापते. मला भूतमात्राविषयी दया वाटत नाही. मी कधी दुसऱ्यांवर उपकार केलेला नाही माझ्या शब्दाला स्थिरता नाही मी विषयांच्या ठिकाणी इतका लपट झालेलो आहे की ते मला सांगवतच नाही ५ तुकाराम महाराज म्हणतात, अहो, संतमहानुभाव, अथवा महानुभावी संत, माझे बोलणे तुम्ही नीट ऐका मी अवगुणी आहे, अविचारी आहे, आणखीही पापाची वाढ होत आहे. यासाठी तुम्ही मी पांडुरंगास मान्य होईन असे करा. मायबापा, मी तुम्हांस शरण आलो आहे. ६

विवरण—या एका महत्त्वाच्या अभंगात तुकाराम महाराजांनी आपल्या वृत्तीचे स्पष्टपणे दिग्दर्शन केले आहे. आपण फार पापी आहोत, लोक आपले तोंडही पाहू इच्छित नाहीत, आपण लोकांची निंदा केली, विश्वासघात केला, व्यभिचार केला, वडिलांची आज्ञा मानली नाही, भूतदया व परोपकार यांविषयी आपण काहीच मानले नाही, नाना विषयांत आपण फार लपट आहोत; अशा प्रकारची कबुली बुवांनी मुक्तपणाने दिलेली आहे. परंतु या आत्मनिवेदनाचा अर्थ फार सावधपणे लावावयास हवा ऐन वैराग्याच्या बहरातील हा एक अभंग असला तरी तो शब्दार्थाने खरा मानणे बरोबर होणार नाही प्रारंभी प्रारंभी चित्ताची फार उलघाल झाली 'पुत्र दारा धन होता मनी धदा । गोविंयेलों सदा होतों कामें ।', 'चित्त गुंतिले प्रपंचे । जालें वेडें ममतेचे ।', 'स्त्रीपुत्रादिकीं राहिला आदर । विषयीं पडिभर अतिशय ।', 'मज हे वासना धनावर ।' इत्यादी वचनांवरून आपले मन संसाराविषयी कसे आसक्त होते हे बुवांनी स्पष्ट केले आहे परंतु हा सर्व प्रकार त्यांच्या मनास झालेल्या अनुतापाचा मानावा लागेल. हे सर्व अपराध तुकोबांनी केले होते असे मानणे बरोबर नाही मी पातकांची राशी आहे याचा वाच्यार्थ घेऊन भागणार नाही मागे अभंगक्र ६१३ ही असाच आहे मी मतिमंद आहे, मला पुराण-कीर्तन आवडत नाही, मी परनिंदा केली, कधी परोपकार केला नाही असे या अभंगात बुवांनी म्हटले आहे. पुढे अभंगक्र. ६७० मध्ये आपण चांडाळ आहोत, निंदा, द्वेष, विश्वासघात, संतउपहास, पितृवचनाची अवज्ञा, परद्वारी, परधनी ध्यान, इत्यादी पापांची रासच त्यांनी येथे उभी केली आहे याचा अर्थ असा नव्हे की, तुकोबांनी ही सर्व पापे केली होती आणि त्यांचे मन अपराधी होते. अनुतापाशिवाय चित्तशुद्धी नसल्याने तुकारामबुवा वळेच अतिरेकाने स्वतःकडे कमीपणा घेऊन, लीनवृत्ती धारण करून आत्मनिवेदन करीत आहेत देवाच्या अंतःकरणास द्रव यावा म्हणून हे त्यांचे उपाय आहेत. 'हेंचि प्रायश्चित्त । अनुतापीं न्हाय चित्त ।'—अनुतापाने चित्त न्हाऊन निघणे हे एक प्रकारचे प्रायश्चित्त त्यांनी मानले आहे याच अनुतापाच्या पोटी 'मी अवगुणी अन्यायी' असे म्हणणे भाग पडते 'मी जों अपराधाची राशी । शिखा अंगुष्ट तोंवरी ।' या ओळीचा अर्थ अनुतापाच्या भूमिकेवरून लावावयास हवा

वरील अभंगात 'घात विश्वासीं व्यभिचार' असे शब्द आहेत याचा अर्थ करतानाही सावधगिरी बाळगावयास हवी. विश्वासघात केला अथवा व्यभिचार केला असे जरी म्हटले असले तरी या व्यभिचाराचा अर्थही नीट ध्यानात घ्यावयास हवा 'विश्वासी व्यभिचार' म्हणजे सबंध विश्वाबरोबर अथवा विश्वास ज्यांनी टाकला त्यांच्याशी गैरवर्तन असा नव्हे या शब्दाचा अर्थ ज्यांनी विश्वास ठेविला त्यांची फसवणूक असाच घ्यावयास हवा आपण बापाची अवज्ञा केली असे म्हणणारे तुकोबा 'मायबापें केवळ काशी' असे म्हणतात हेही ध्यानात असावे 'तुका म्हणे मायबापें । अवघीं देवाचीं स्वरूपें ही त्यांची ओळ आहे पितृवचन हीच विष्णूची पूजा बुवांनी मानली आहे भूतदया, परोपकार, संताविषयी आदर या प्रवृत्ती तुकोबांना प्रथमपासूनच अवगत होत्या पूर्वायुष्यात पापाचा पूर्ण पुतळा आणि उत्तरायुष्यात पूर्ण ईश्वरस्वरूप असे 'नाट्य' रंगवावयास चांगले असले तरी ते वस्तुस्थितीहून फार निराळे आहे

## कृष्णजन्म अभंग ॥ ५ ॥

२८३६ फिराविलीं दोनी । कन्या आणि चक्रपाणी ॥ १ ॥
जाला आनंदें आनंद । अवतरले गोविंद ॥ २ ॥

तुटलीं बंधनें । वसुदेवदेवकीचीं दर्शनें ॥ ३ ॥
गोकुळासी आलें । ब्रह्म अव्यक्त चांगलें ॥ ४ ॥
नंद दसवंती । धन्य देखिले श्रीपती ॥ ५ ॥
निशीं जन्मकाळ । आले अष्टमी गोपाळ ॥ ६ ॥
आनंदली मही । भार गेला सकळ ही ॥ ७ ॥
तुका म्हणे कंसा । आट भोंविला वळसा ॥ ८ ॥

शब्दार्थ व टीपा – दसवंती–यशोदा, निशीं–रात्र, मही–पृथ्वी, आट–चिंता, वळसा–भोवऱ्यात

अर्थ – बंदिशाळेत श्रीकृष्णाचा जन्म झाल्यावर वसुदेवाने त्या चक्रपाणीला गोकुळात नंदाघरी नेले व तेथून यशोदेस झालेली मुलगी घेऊन तो परत बंदिशाळेत आला अशा प्रकारे दोघांची अदलाबदल केली १ या-प्रमाणे गोविंदाचा अवतार झाल्यामुळे सर्वत्र आनंदी आनंद झाला २ श्रीकृष्णाने अवतार घेताच त्याच्या दर्शनामुळे वसुदेवदेवकीची सर्व बंधने तुटून गेली ३ अव्यक्त ब्रह्म या प्रकारे चांगले सगुण होऊन गोकुळात आले ४ या श्रीपतीस पाहून वसुदेव व देवकी धन्य झाले ५ श्रावण वद्य अष्टमीच्या रात्री श्रीकृष्ण गोपाळाचा जन्म झाला ६ यामुळे सर्व पृथ्वी आनंदित झाली तिच्यावरील सर्व भार दूर झाला ७ तुकाराम महाराज म्हणतात, कंस मात्र यामुळे चिंतेच्या भोवऱ्यात अडकून पडला ८

२८३७ सोडियेल्या गांठी । दरपणें कृष्णभेटी ॥ १ ॥
करिती नारी अक्षवाणें । जीवभाव देती दानें ॥ २ ॥
उपजल्या काळें । रूपें मोहिलीं सकळें ॥ ३ ॥
तुका तेथें वारी । एकी आडोनि दुसरी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – अवाक्षणें–आरतीने ओवाळणें

अर्थ – श्रीकृष्णाच्या दर्शनाने सर्व संशयाच्या गाठी आता सुटून गेल्या १ गोकुळामधील स्त्रिया या श्रीकृष्णास आरती घेऊन ओवाळीत आहेत, जीवभावाचे दान देत आहेत २ या श्रीहरीने जन्मल्याबरोबर सर्व लोकांना मोहून टाकले आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी त्या ठिकाणी भगवंताच्या दर्शनास येणाऱ्या स्त्रियांना एकामागून एक अशा क्रमाने सोडण्यासाठी होतो ४

गुढिया तोरणें । करिती कथा गाती गाणें ॥ ३ ॥
तुका म्हणे छंदें । येणें वेधिलों[1] गोविंदें ॥ ४ ॥

शब्दार्थ टीपा – लेखा–समजा.

अर्थ:– गोकुळामधील या सुखाला काही अंतपार नाही असे समजा. १ नंदाच्या घरी बाळकृष्ण प्रकट झाल्यामुळे सर्व स्त्रीपुरुषांना आनंदी आनंद झाला आहे. २ या आनंदाप्रीत्यर्थ सर्वांनी गुढ्या व तोरणे उभारली आहेत. सर्व लोक याच श्रीहरीची कथा गायनाने सांगत आहेत. ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा प्रकारे श्रीकृष्णाने आपला छंद लाविला व त्यांचे हृदय आपणाकडे वेधून घेतले. ४

२८४० विटंविलें भट । दिला पाठीवरी पाट ॥ १ ॥
खोटें जाणोनि अंतर । न साहेचि विश्वंभर ॥ २ ॥
तेंचि करी दान । जैसें आइके वचन ॥ ३ ॥
तुका म्हणे देवें । पूतना शोषियेली जीवें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा.– भट–महाबळ भट, अंतर–अंतःकरण, मन

अर्थ– श्रीकृष्णाचे पारिपत्य करण्यासाठी कंसाकडून महाबळभट गोकुळात आलेला होता. त्याला बसायला जो पाट दिला होता तोच त्याच्या पाठीत बसून त्याची चांगलीच विटंबना झाली. १ त्याच्या मनातील खोटेपणा विश्वात भरुन राहिलेल्या श्रीकृष्णास सहन झाला नाही. २ जसे ज्याचे शब्द श्रीहरि ऐकतो, तसे दान तो करीत असतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, याच श्रीहरीने पूतनामावशीला तिच्या जीवासकट शोषून टाकले. ४

२८४१ प्रेम देवाचें देणें । देहभाव जाय जेणें । न धरावी मनें । शुद्धी देशकाळाची ॥ १ ॥
मुक्त लज्जाविरहित । भाग्यवंत हरिभक्त । जाले ओसंडत । नामकीर्तिपवाडे ॥ २ ॥
जोडी जाली अविनाश । जन्मोनि जाले हरिचे दास । त्यांस नव्हे गर्भवास । सौरस परब्रह्मीं ॥३॥
हेचि वाहाती [2]संकल्प । पुण्यप्रसंगाचे जप । तुका म्हणे पाप । गांवीं नाहीं हरिजना ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– जोडी–प्राप्ती, सौरस–गोडी.

अर्थ :– ज्यामुळे देहभाव नाहीसा होतो अशा प्रेमाची देणगी देव देत असतो. ज्याला अशा प्रेमाचा लाभ झालेला आहे तो श्रीहरीचे चिंतन करताना देशकालाची आठवणसुद्धा मनात ठेवीत नाही. १ असे हे हरिभक्त मुक्त असून लज्जाविरहित असतात हे श्रीहरीचे भक्त नामसंकीर्तनाने हरीची कीर्ती ओसंडून गात असल्याने तेच खरे भाग्यवंत आहेत. २ जन्माला येऊन हे हरिदास झाल्यामुळे त्यांना अविनाशपदाची प्राप्ती झाली आहे त्यांना पुनः गर्भवास नसतात व त्यांना परब्रह्माच्या ठिकाणी गोडी असते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, खरे पुण्य मिळावे म्हणून जप करण्याविषयी त्यांचे मन संकल्प करीत असते आणि हरिजनाच्या गावी पाप तर कधीच नसते. ४

२८४२ तोचि लटिकयामाजी भला । म्हणे देव म्यां देखिला ॥ १ ॥
ऐशियाच्या उपदेशें । भवबंधन कैसें नासे ।
बुडवी आपणासरिसे । अभिमानें आणिकांस ॥ २ ॥
आणिक नाहीं जोडा । देव म्हणवितां या मूढा ॥ ३ ॥
आणिकांचे न मनीं सावें । तुका म्हणे या श्रेष्ठांचें ॥ ४

[1] वेधिलें.

शब्दार्थ व टीपा – भवबंधन-संसाराचा पाश, जोडा-बरोबरीचा, न मनी-मानत नाही, साचें-खरे

अर्थ – मी देव पाहिला आहे असे जो म्हणतो तो खोटे बोलणाऱ्यातील श्रेष्ठ समजावा १ अशा माणसाच्या उपदेशाने संसाराचा पाश कसा सुटणार ? अशा अभिमानाने हा मनुष्य स्वत बरोबरच इतरानाही बुडवितो २ मीच देव आहे असे लोकाना जो सागतो त्या मूढ माणसास दुसरी जोड नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, हा मूढ मनुष्य कुणी श्रेष्ठाने काही खरे सांगितले तर ऐकतच नाही, मानीत नाही ४

२८४३ होईल जाला अगें देव जो आपण । तयासी हे जन अवघे देव ॥ १ ॥
येरानीं सांगावी रेमट काहाणी । चित्त रजवणी करावया ॥ २ ॥
धाला आणिकाची नेणे तान भूक । सुखें पाहे सुख आपुलिया ॥ ३ ॥
तुका म्हणे येथें पाहिजे अनुभव । शब्दाचें गौरव कामा नये ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – येरानी-इतरानी, रेमट-पोकळ, लांबट धाला-संतुष्ट झाला

अर्थ – जो कुणी स्वत सर्वांगाने देव बनलेला आहे त्याला सर्व जग देवस्वरूपात दिसते १ इतरांनी मात्र दुसऱ्याचे चित्त रंगवणारी उगाच पोकळ व लांबट कहाणी कशी तरी सांगावी २ जो तृप्त झाला तो इतराची तहानभूक काही जाणीत नाही आपणासारखेच इतर सुखी असल्याचे तो पाहातो ३ तुकाराम महाराज म्हणतात, येथे देवाचा खराखुरा अनुभव पाहिजे उगाच कोरड्या शब्दांचा गौरव काय कामाचा ? ४

२८४४ का न वजावें बैसोनि कथे । ऐसे ऐका हो श्रोते । पांडुरंग तेथें । उभा असे तिष्ठत ॥ १ ॥
म्हणऊनि करी धीर । लक्ष लावूनि सादर । भवसिंधुपार । असेल ज्या तरणें ॥ २ ॥
कथेकाहीं अणुमात्र । नो[1] बोलावे हा वृत्तांत । देवभक्ता चित्त । समरसीं खडणा ॥ ३ ॥
का वैष्णवा पूजावें । ऐका घेईल जो भावें । चरणरजा शिवें । चोडविला मस्तक ॥ ४ ॥
ऐसे जाणा हें[2] निभ्रांत । देव वैष्णवाचा अंकित । अलिप्त अतीत । परमित त्यासाठीं[3] ॥५॥
घालोनि लोळणीं । तुका आला लोटांगणीं । वंदी पायवणीं । संतचरणींचे माथा ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – न वजावें-जाऊ नये

अर्थ – कथा ऐकणारे लोकहो नीट ऐका हरिकथेत बसल्यानतर तेथून उठून का जाऊ नये ? तर त्या ठिकाणी प्रत्यक्ष पांडुरंग तिष्ठत उभा राहिलेला असतो १ म्हणून ज्याला भवसागर तरून जायचे असेल त्यांनी धीर धरून श्रीहरीची कथा मोठ्या प्रीतीने लक्ष लावून ऐकावी २ कथेच्या ठिकाणी इतर विषयाच्या गोष्टी अणुमात्रही बोलू नयत कारण त्यामुळ देवभक्ताच्या चित्ताच्या समरसतेत अडथळा निर्माण होतो ३ वैष्णवांची पूजा का करावी ? जो कुणी भाव धरून एकेल त्याने यासबधी ऐकावे या वैष्णवांच्या चरणांवरील धूळ आपल्या मस्तकास लागावी म्हणून आपले मस्तक प्रत्यक्ष सदाशिवही पुढे करीत असतो ४ सर्व जगतास निर्माण करून वेगळा राहिलेला देव वैष्णवाच्या भाव स्वाधीन झालेला असतो अलिप्त असलेला, अतीत असलेला हा देव त्यांच्या साठी सीमित व मर्यादित होतो ५ तुकाराम महाराज म्हणतात अशा संताच्या, वैष्णवाच्या चरणी मी लोळण घालून लोटांगण घेतो त्यांचे पाय धुऊन ते तीर्थ मी मस्तकावर धारण करतो ६

२८४५ अनुभवें आलें अंगा । तें या जगा देतसें ॥ १ ॥
नव्हती हातातुके बोल । मूळ ओल अंतरींची ॥ २ ॥
उतरुनि दिलें कसीं । शुद्धरसीं सरे तें ॥ ३ ॥
तुका म्हणे दुसरें नाहीं । ऐसी ग्वाही गुजरली[4] ॥ ४ ॥

१ न, २ र, ३ यासाठीं ४ गुदरली

शब्दार्थ व टीपा – हातवुके-पोकळ, व्यर्थ

अर्थ – जे माझ्या अंगी अनुभवाने आले तेच मी सर्व जगास देत आहे, सांगत आहे १ हे माझे शब्द व्यर्थ व पोकळ आहेत असे नव्हे त्यांत अंतःकरणामधील माझ्या प्रीतीची ओल आहे २ तुम्हाला मी हे शब्द कसोटीला लावून शुद्ध व रसभरीत आहेत, असे सिद्ध करून दिले आहेत ३ तुकाराम महाराज म्हणतात, आता मला यावाचून दुसरे काही करणे नाही, अशी साक्ष देऊन मी हे शब्द तुम्हास दिले आहेत ४

२८४६ साधकाची दशा उदास असावी । उपाधि नसावी अंतर्बाही ॥ १ ॥
लोलुपता काय निद्रेते जिणावें । भोजन करावें परिमित ॥ २ ॥
एकांतीं लोकांतीं स्त्रियांशीं वचन । प्राण गेल्या जाण बोलो नये ॥ ३ ॥
संग सज्जनाचा उच्चार नामाचा । घोष कीर्तनाचा अहर्निशीं ॥ ४ ॥
तुका म्हणे ऐसा साधनीं जो राहे । तोचि ज्ञान लाहे गुरुकृपा ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – जिणावें-जिंकावे, अहर्निशी-दिवसरात्र, लाहे-मिळेल, प्राप्त होईल

अर्थ – जो साधक आहे, तो मनाने उदास वृत्तीचा असावा त्याला अंतर्बाह्य अशी कोणतीही उपाधी असू नये. १ संसाराविषयी लोलुपता काय उपयोगाची ? साधकाने निद्रेस जिंकावे आणि भोजनही मर्यादित स्वरूपाचे करावे २ प्राण गेला तरी एकान्तात किंवा जनसमुदायात स्त्रियांबरोबर साधकाने संभाषण करू नये ३ नेहमी संगत सज्जनांची ठेवावी वाणीने हरिनामाचा उच्चार करावा रात्रदिवस कीर्तनाचा घोष करावा ४ तुकाराम महाराज म्हणतात, अशा प्रकारच्या साधनानी जो राहील त्याला गुरुकृपेने आत्मस्वरूपाच्या ज्ञानाची प्राप्ती होईल ५

विवरण – या एका अभंगात तुकाराम महाराजांनी साधकाची दशा कशी असावी याचे मोठे समर्पक वर्णन केले आहे साधक हा उदास असावा त्याच्या अंगी वैराग्य पूर्णपणे बाणलेले असावे इंद्रियांवर त्याने विजय मिळवावा. एकान्तात अथवा समुदायात स्त्रियांशी भाषण करू नये प्राण गेला तरी बोलू नये असे त्यांनी या अभंगात बजावले आहे साधकाच्या आचरणाची ही रीत समजावून घेण्यासारखी आहे जेथे जेथे मन गुंतून राहण्याची शक्यता ते ते साधकाने टाळावे असा मुख्य भावार्थ समजावा. परमार्थज्ञान हे फार कोवळे असते त्याला विषयाची बाधा चटकन असते महानुभावांच्या श्रीचक्रधरानी म्हटले आहे, 'कोमल ज्ञानीं विखो विघ्न' हे विषयाचे विघ्न दूर सारावे असा साधुसंताचा उपदेश.

नाना प्रकारच्या विषयात साधकही कसे गुंतून राहातात याचे मोठे मार्मिक वर्णन एकनाथांनी आपल्या प्रसिद्ध अशा चिरंजीवपदात केले आहे या सर्व विषयांतून मन मुक्त करण्याकडे साधकाने लक्ष द्यावे एकनाथांनीही म्हटले आहे 'नावडे प्रपंच जनीं बैसणें । नावडे कोणासी बोलणें । नावडे स्त्रियांत बैसणें । नावडे स्त्रियांतें पाहणें । नावडे स्त्रियांचें रमवणें । त्यांचें बोलणें नावडे ॥ नको नको स्त्रियांचा सांगात । नको नको स्त्रियांचा एकान्त । नको नको स्त्रियांचा परमार्थ । करिती आघात पुरुषांसी ' साधुसंताच्या या अतिरेकी बोलण्यावरून संत हे स्त्रीद्वेष्टे होते असा गैरसमज मात्र होता कामा नये गृहस्थ साधकानी स्वस्त्रीशी कसे वागावे याचेही मार्गदर्शन येथेच एकनाथांनी केले आहे '–स्वस्त्रीसही स्वकार्यापुरतें । बोलावें स्पर्शावें निरुतें । परी आसक्त होऊनिया तेथें । सर्वथा चित्त नसावें ' हा दडक इतर ज्ञानाच्या क्षेत्रातही महत्त्वाचा आहे मग परमार्थाच्या क्षेत्रात राहील त्यात नवल काय ?

२८४७ अंतरींची ज्योती प्रकाशली दीप्ति । मुळींची जे होती आच्छादिली ॥ १ ॥
तेथींचा आनंद ब्रह्मांडीं न माये । उपमेशीं काये देऊं सुखा ॥ २ ॥
भावाचे मथिलें निर्गुण सचलें । तें हें उभें केलें विटेवरीं ॥ ३ ॥
तुका म्हणे आम्हां ब्रह्मांड पंढरी । प्रेमाची जे थोरी साठवण ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा — सचलें-साठलेलें

अर्थ – श्रीहरीच्या कृपेचो अंत करणात ज्योत प्रकाशित झाली आहे मुळात ती अज्ञानामुळे आच्छादिलेली होती १ यामुळे आता माझा आनंद ब्रह्मांडातही मावेनासा झाला आहे या माझ्या आत्मसुखास दुसरी कुठली उपमा देऊ ? २ जे निर्गुणपणे साठलेले होते ते मी माझ्या भावभक्तीने मंथन करून या सगुण व सुंदर रूपात विटेवर उभे केले आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात पंढरी हेच आम्हांस ब्रह्मांड असून या ठिकाणी प्रेमाचा फार मोठा साठा झालेला आहे ४

२८४८ कासया गा मज घातलें संसारीं । चित्त पायावरी नाहीं तुझ्या ॥ १ ॥
कासया गा मज घातले या जन्मा । नाहीं तुझा प्रेमा नित्य नवा ॥ २ ॥
नामाविण माझी वाचा अमंगळ । ऐसा का चांडाळ निर्मियेलें ॥ ३ ॥
तुका म्हणे माझी जळो जळो काया । विठ्ठला सखया वाचूनिया ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा –काया–शरीर

अर्थ — देवा, तुझ्या पायावर माझं चित्त जडत नाही, तर मग मला या संसारात तरी का घातलेस रे ? १ नित्य नवे प्रेम जर तुझे अनुभवास येत नाही तर देवा, मला या मनुष्याच्या जन्मास तरी का घातलेस रे ? २ तुझ्या नामाशिवाय माझी वाणी अमंगळ झाली आहे मला असे चांडाळाप्रमाणे का रे निर्माण केलेस ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, विठ्ठल सखा जर मला भेटला नाही तर माझ्या शरीरास आग लागो ४

२८४९ प्रारब्धेंचि जोडे धन । प्रारब्धेंचि वाढे मान ॥ १ ॥
सोस करिसी वाया । भज मना पंढरिराया ॥ २ ॥
प्रारब्धेंचि होय सुख । प्रारब्धेंचि पावे[1] दुःख ॥ ३ ॥
प्रारब्धेंचि भरे पोट । तुका करीना बोभाट ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – सोस–इच्छा

अर्थ — प्रारब्ध असेल तरच धन मिळेल आणि प्रारब्धामुळेच मान वाढेल १ माझ्या मना उगाच इतर इच्छा का करीत आहेस ? पंढरीनाथाचे भजन कर ना २ प्रारब्धामुळे सुख वा दुःख होत असते ३ तुकाराम महाराज म्हणतात, प्रारब्ध जर नीट असेल तर आपले पोट भरेल याविषयी मी उगाचच काही बोभाटा करीत नाही ४

२८५० हीन माझी याति । वरी स्तुती केली संतीं ॥ १ ॥
अगीं वसू पाहे गर्व । मातें हरावया सर्व ॥ २ ॥
मी एक जाणता । ऐसें वाटतसे चित्ता ॥ ३ ॥
राख राख गेलों वायां । तुका म्हणे पंढरीराया ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा — याति–जात

२८५१ तपाचे सायास । न लगे घेणे वनवास ॥ १ ॥
ऐसे कळले आम्हा एक । जालों नामाचे धारक ॥ २ ॥
जाळीं महाकर्म । दावीं निजसुख धर्में ॥ ३ ॥
तुका म्हणे येणें । कळिकाळ ते ठेंगणे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – सायास–प्रयत्न

अर्थ – प्रभूच्या प्राप्तीसाठी तपश्चर्यादी प्रयत्न करावे लागत नाहीत वनवास पत्करावा लागत नाही १ असे आम्हांस समजून आल्यामुळेच आम्ही नामाचे धारक बनलो आहोत २ हे नाम महापातकाची कर्मे जाळून निजसुख आपल्या धर्मानुसार दाखविते ३ तुकाराम महाराज म्हणतात, याच्यामुळे कळिकाळाची भीती नाहीशी होते ४

२८५२ माता कापी गळा । तेथें कोण राखी बाळा ॥ १ ॥
हें कां नेणा नारायणा । मज चाळविता दिना ॥ २ ॥
नागवी धावणे । तेथें साह्य व्हावें कोणे ॥ ३ ॥
राजा सर्व हरी । तेथें दुजा कोण वारी ॥ ४ ॥
तुझ्या केल्याविण । नव्हे स्थिर वश जन ॥ ५ ॥
तुका म्हणे हरी । सूत्र तुम्हा हातीं दोरी ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – नागवी–लुटल्यानतर

अर्थ – आईच आपल्या बालकाचा गळा कापू लागली तर मग त्या मुलास कोण वाचविणार ? १ नारायणा, हे काय तुम्ही जाणीत नाही ? मग मला गरीबाला उगाच का चाळवता ? २ आड रानात चोरांनी लुटल्यानतर त्याची प्रार्थना एकून कोण धावत जाणार ? ३ पृथ्वीचे पालन करणाऱ्या राजानेच प्रजेचे सवस्व हरण केले तर मग दुसरे रक्षण करणारे तरी कोण आहे ? ४ देवा, माझे मन अतिशय चचल असून ते तुम्ही स्थिर केल्याशिवाय आम्हांस वश होणार नाही ५ तुकाराम महाराज म्हणतात हरी, सव जगताची सूत्रे तुमच्याच हातात आहेत ६

२८५३ गाऊं नेणे परी मी काहीं गाईन । शरण जाईन पांडुरंगा ॥ १ ॥
ब्रह्मांडनायक मी त्याचा अंकित । काय यमदूत करिती काळ ॥ २ ॥
वश्या[1] ज्याच्या नामें तारिली गणिका । अजामेळासारिखा पापरासी ॥ ३ ॥
चरणींच्या रजें अहिल्या तारिली । रूपवत केली कुबजा क्षणे[2] ॥ ४ ॥
पृथिवी तारिली पाताळासी जाता । तुका म्हणे आता आम्ही किती ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – अंकित–स्वाधीन सेवक वश्या–वेश्या

अर्थ – मी काही सुस्वरात गाऊ शकत नाही, तरी मी पांडुरंगाचे गुण गाऊन त्याला शरण जाईन १, त्या ब्रह्मांडनायकाचा मी सेवक असल्याने त्या यमदूताचे अथवा काळाचे सेवक मला काय करतील ? २ ज्याच्या नामाने गणिका वेश्याही तरली आणि पापाची राशी असलेला अजामेळही उद्धार करून गला ३ ज्याच्या चरणावरील धूलिकणांनी अहल्येचा उद्धार झाला आणि अष्टवक्रा व कुरूप असणारी कुब्जाही सुस्वरूप एका क्षणात झाली ४ तुकाराम महाराज म्हणतात, हिरण्याक्ष नावाच्या दत्याने पृथ्वी जेव्हा पाताळात दडपली होती त्यावेळी त्यानेच त्याला मारून पृथ्वीचे रक्षण केले अशा एवढ्या मोठ्या देवापुढ आम्ही कितीसे आहोत । ५

१ वेश्या, २ दासी

२८५४ गाजराची पुंगी । तैसे नवे जाले जोगी ॥ १ ॥
काय करोनि पठन । केली अहंता जतन ॥ २ ॥
अल्प असे ज्ञान । अंगीं ताठा अभिमान ॥ ३ ॥
तुका म्हणे लंड । त्याचें हाणोनि फोडा तोंड ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– जोगी–खोटे वैरागी, लंड–नास्तिक, दांभिक.

अर्थ :– गाजराची पुंगी थोडा वेळ वाजवावी आणि लगेच मोडून टाकावी. तसे हे बाह्य वेषधारी खोटे वैरागी झालेले आहेत. १ देहाहंकाराची जपणूक केली तर मग ग्रंथांचे पठन करून काय उपयोग ? २ ज्ञान अल्प, असूनही अंगामध्ये ताठा मात्र मोठाच असतो. ३ तुकाराम महाराज म्हणतात, असे कुणी जे दांभिक आहेत, त्यांचे तोंड हाणून फोडून टाकावे. ४

२८५५ परद्रव्य परनारी । अभिळासूनि नाक धरी ॥ १ ॥
जळो तयाचा आचार । व्यर्थ भार वाहे खर ॥ २ ॥
सोंवळयाची[1] स्फीति । क्रोधें विटाळला चित्तीं ॥ ३ ॥
तुका म्हणे सोंग । दावी बाहेरील रंग ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– अभिळासूनि–मनात इच्छा धरून, खर–गाढव, स्फीति–प्रतिष्ठा, मानमान्यता.

अर्थ :– दुसऱ्याच्या द्रव्यावर व स्त्रीवर लक्ष ठेवून यांची इच्छा मनात धरून हे लोक ढोंगाने नाक धरून अनुष्ठानाचे सोंग करतात. १ त्यांचा असला आचार जळून जावो, उगाच गाढवासारखे ओझे मात्र ते वाहतात. २ अंत:करणात राग पेटलेला असताना, त्याने विटाळलेला असताना वरून मात्र सोवळ्याची प्रतिष्ठा मिरविली जाते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, केवळ बाहेरचा रंग दाखविणारे हे निव्वळ ढोंग आहे. ४

२८५६ टिळा टोपी उंच दावी । जगीं मी एक गोसावी ॥ १ ॥
अवघा वरपंग सारा । पोटीं विषयांचा थारा ॥ २ ॥
मुद्रा लावितां कोरोनि । मान व्हावयासी जनीं ॥ ३ ॥
तुका म्हणे ऐसे किती । नरका गेले पुढें जाती ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– वरपंग–वरवरचा.

अर्थ :- सतत तंबाखू मळून ती ओढावी, अशा प्रकारचे संत या कलियुगात झालेले आहेत. १ स्नान-सध्येचा पवित्र आचार त्यांनी बुडविला असून भांग पिण्याचे व्यसन मात्र जडवून घेतले आहे. २ भांग घाटून पिणे, कोरड्या फकीचा भुरका मारणे, हेच याचे साधन असून मद्याचे पान यांच्या घागलेच पचनी पडलेले असते ३ तुकाराम महाराज म्हणतात, याचे हे सर्व ढोंग असते येथे कसला आला आहे पांडुरंग ? ४

२८५८ जातीची शिंदळी । तिला कोण वंशावळी ॥ १ ॥
आपघर ना बापघर । चित्तीं मनीं व्यभिचार ॥ २ ॥
सेजे असोनियां धणी । परद्वार मना आणी । ३ ॥
तुका म्हणे असल जाती । जातीसाठी खाती माती ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा .- वंशावळी-मुलेबाळे, वंशा वळी.

अर्थ :- जी स्त्री जातीनेच शिंदळ आहे तिला स्वत:च्या मुलाबाळाचे काय ? किंवा तिला कोण कसे वळवू पाहाणार ? १ ती आपल्या पतीच्या घरी असो, अथवा बापाच्या घरी असो; तिच्या मनात फक्त व्यभिचाराचाच विचार सतत असतो २ शेजेवर पती असूनही तिच्या मनात परपुरुषाचे स्थान असते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, जी अस्सल आहे, जातिवंत पतिव्रता आहे ती आपल्याच पतीसाठी माती खाते, आपले पातिव्रत्य टिकवून राहाते ४

२८५९ अंधळ्याची काठी । हिरोनियां कडा लोटी ॥ १ ॥
हें कां देखण्या उचित । लाभ किंवा कांहीं हित ॥ २ ॥
साकर[२] म्हणोनि माती । चाळवूनि द्यावी हातीं ॥ ३ ॥
तुका म्हणे वाटे । देवा पसरावे सराटे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- कडा-डोंगराच्या कड्यावरून, देखण्या-पाहाणारास

अर्थ :- देवा, आंधळ्याच्या हातातील काठी हिसकावून घेऊन त्याला कड्यावरून लोटून द्यावे. १ हे योग्य का ? यात काही लाभ किंवा हित त्याचे होते काय ? २ एखाद्यास साखर म्हणून हातात फसवून माती द्यावी हे बरे का ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा चांगल्या वाटेत काटेरी सराटे पसरणे तुम्हांला बरे वाटते ? ४

२८६० प्रीतिचिया बोला नाहीं पेसपाड । भलतसे गोड करूनि घेई ॥ १ ॥
तैसे विठ्ठलराया तुज मज आहे । आवडीने गायें नाम तुझें ॥ २ ॥
वेडे वांकडे बाळकाचे बोल । करिती नवल मायबाप ॥ ३ ॥
तुका म्हणे तुज येवो माझी दया । जीवींच्या सखया जिवलगा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा .- पेसपाड-पेचपाच.

अर्थ - देवा, प्रीतीच्या बोलात कधी पाचपेच नसतात. मुलाचे बोबडे बोल कसेही असले तरी आईबाप गोड करून घेतात १ विठ्ठलराया, तुझेमाझे नाते असेच आहे मी तुझे नाम मोठ्या आवडीने गात असतो २ बालकाचे बोलणे वेडेवाकडे असले तरी आईबाप मोठ्या प्रेमाने व नवलाईने त्याकडे पाहातात ३ तुकाराम महाराज म्हणतात, माझ्या जीवाच्या सख्या, जीवलगा, तुला माझी दया येऊ दे ४

२८६१ माझे मज कळो येती अवगुण । काय करूं मन अनावर ॥ १ ॥
आता आड उभा राहें नारायणा । दयासिंधुपणा साच करीं ॥ २ ॥
वाचा वदे परी करणें कठीण । इंद्रियां अधीन जालों देवा ॥ ३ ॥
तुका म्हणे तुझा जैसा तैसा दास । न धरीं उदास मायबापा ॥ ४ ॥

---

१ खावी, २ चाळवूनि हातीं साकर म्हणोनि द्यावी माती

शब्दार्थ व टीपा :- अनावर-आवरता न येण्याजोगे, साच-खरे

अर्थ – देवा, माझे अवगुण माझे मलाच समजून येतात पण काय करू रे ? हे माझे मन मला आवरत नाही. १ नारायणा, दयासिंधू हे नाव सार्थ व खरे करण्यासाठी तू माझ्या या अवखळ मनामागे उभा रहा ना २ मी वाणीने बोलतो, पण इंद्रियांच्या आधीन झाल्यामुळे त्याप्रमाणे करणे मात्र कठीण झाले आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी तुझा कसातरी का होईना पण दास झालो आहे मला उदास करू नका ४

२८६२ वर्णावी ते थोरी एका विठ्ठलाची । कीर्ती मानवाची सांगो नये ॥ १ ॥
उदडचि जाले जन्मोनिया मेले । होऊनिया गेले राव रंक ॥ २ ॥
त्याचे नाम कोणी नेवे चराचरीं । साही वेद चारी वर्णिताती ॥ ३ ॥
अक्षय अढळ चळेना ढळेना । तया नारायणा ध्यात जावे ॥ ४ ॥
तुका म्हणे तुम्ही विठ्ठल चित्तीं ध्याता । जन्ममरण व्यथा दूर होती ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – राव-राजे, रंक-भिकारी, साही-सहा शास्त्रे, चारी-चार वेद

अर्थ – एका फक्त विठ्ठलाचीच थोरवी वर्णन करावी माणसाची कीर्ती कधीही वर्णन करू नये. १ या पूर्वी मोठे राजे आणि दरिद्री भिकारी किती तरी होऊन गेले पण ते जन्माला आले आणि मरूनही गेले २ त्यांचे नावही कुणी या चराचर जगात घेत नाही, उलट ईश्वरास मात्र सहा शास्त्रे, चार वेद वाखाणीत असतात ३ जो नारायण अक्षय आहे, अढळ आहे न चळणारा, न ढळणारा आहे त्यालाच पूजीत जावे त्याचेच ध्यान करावे ४ तुकाराम महाराज म्हणतात, विठ्ठलाच्या रूपाचे ध्यान एकदा तुम्ही केले की तुमची जन्ममरणाची व्यथा दूर होईल ५

२८६३ नको देऊ देवा पोटीं हें संतान । मायाजाळें जाण नाठवसी ॥ १ ॥
नको देऊ देवा द्रव्य आणि भाग्य । तो एक उद्वेग होय जीवा ॥ २ ॥
तुका म्हणे करीं फकिराचे परी । रात्रदिवस हरि येईल घरा ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा – नाठवसी-आठवणार नाहीस, आठवण होणार नाही

अर्थ – देवा, मला पोटी पुत्रसंतान तू देऊ नकोस कारण या मायाजाळात एकदा सापडलो की मग तुझी आठवणही होणार नाही १ देवा, द्रव्य व भाग्यही तू मला देऊ नकोस त्यामुळे माझ्या जीवास एक प्रकारचा उद्वेगच होईल २ तुकाराम महाराज म्हणतात देवा, मला फकिरासारखे कर म्हणजे मग रात्रंदिवस माझ्या घरी श्रीहरी राहील ३

२८६४ जोडोनियां धन उत्तम वेव्हारे[३] । उदास विचारें वेच करी ॥ १ ॥
उत्तमचि गती तो एक पावेल । उत्तम भोगील जीव खाणी ॥ २ ॥
परउपकारी नेणे परनिंदा । परस्त्रिया सदा बहिणी माया ॥ ३ ॥
भूतदया गाईपशूचे पालन । तान्हेल्या जीवन वनामाजी ॥ ४ ॥
शांतिरूपें नव्हे कोणाचा वाईट । वाढवी महत्त्व वडिलांचे ॥ ५ ॥
तुका म्हणे हेंचि आश्रमाचे फळ । परमपद बळ वैराग्याचे ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – वेच-खर्च, आश्रमाचे-गृहस्थाश्रमाचे

अर्थ – लोकहो, तुम्ही उत्तम व्यवहार करून द्रव्य खुशाल मिळवा व ते उदास वृत्तीने खर्च करा १ असे जो करील त्यालाच उत्तम गती मिळेल आणि मनुष्यजन्मात चांगले भोग त्याला मिळतील २ जो नेहमी दुसऱ्यावर उपकार करतो, परनिंदा ज्याला आवडत नाही व ज्याला परस्त्रिया नेहमी आईबहिणीप्रमाणे वाटतात, ३ असा

१ बोल, २ होईल, ३ व्यवहारें

मनुष्य सर्व प्राणिमात्रांवर दया करून गाईंचे पालनपोषण करतो, तान्हेलेल्या लोकांना रानावनात पाणी पिण्याची व्यवस्था करतो ४ हा आपली वृत्ती शांत ठेवतो, व कुणाशीही धाईटपणाने वागत नाही आपल्याहून जे कुणी श्रेष्ठ आहेत त्यांचे महत्त्व तो वाढवीत असतो ५ तुकाराम महाराज म्हणतात, गृहस्थाश्रमाचे हेच एक फल असून वैराग्याच्या बळाने परमपदाची प्राप्ती अशा लोकांना होते ६

विवरण —साधुसंत प्रपंचाची निंदा करतात स्त्री पुत्रादिकांची अवहेलना करतात, धनसंपत्तीचा वीट मानतात, असे दृश्य सर्वत्र दिसते चांगल्या चांगल्या अभ्यासकांचाही असाच समज आहे परंतु येथे हे लक्षात घ्यावयास हवे की, संसार करावा, मुलाबाळांवर प्रेम करावं, धनसंपत्ती जोडावी, लौकिक प्रपंचाची दृढता करावी, ही 'प्रवृत्ती' शिकवावी लागत नाही ही माणसात उपजतच आहे, आणि ती अनेक प्रसंगी विधिनिषेधांना न जुमानता कार्यान्वित राहून वाटेल त्या मार्गाने उफाळून येते तिला विवेक राहत नाही बेलगाम झालेल्या प्रवृत्तीतून मग नुसता प्रपंच, नुसती बायकामुले, नुसता जमीनजुमला, नुसता पैसा, नुसता अधिकार एवढेच शिल्लक उरते देवाची, धर्माची, कुळाचाराची, संस्कृतीची, विठ्ठलाची ओळख मग कुणासच राहत नाही तुकोबांनी अशा लोकांच्या संसाराची मनोवेधक पण बोलकी शब्दचित्रे काढली आहेत प्रपंचाविषयीची ही अतिरिक्त आसक्ती संतांना नको आहे 'सोडूनि राम आनंदघन। ज्याचे मनीं विषयचिंतन। त्यासी कैंचे समाधान। लोलंगतासी?' असे त्यांनी स्पष्ट विचारले आहे 'प्रपंच सोडूनि परमार्थ केला। तरी अन्न मिळेना खायाला' हे जसे त्यांनी बजावले आहे त्याचप्रमाणे 'परमार्थ सोडूनि प्रपंच करिसी। तरी तू यमयातना भोगिसी' असेही बजावावयास ते विसरले नाहीत

प्रपंचास पैसा लागतो पण तो वाटेल त्या मार्गाने मिळवावा असे नाही उत्तम व्यवहार करावा, व्यापार करावा, सचोटीने धंदा करावा व त्यापासून धन मिळवावे आणि ते उदास वृत्तीने म्हणजे मी मिळविले, मी खर्च करणार अशा भावनेशिवाय खर्च करावे

पराकोटीच्या साधकास धनसंपत्तीची काहीच जरूरी नसली तरी प्रापंचिकाचा व्यवहार व संसार चालतो तो धनामुळेच हे विसरून कसे चालणार? इतकेच नव्हे तर प्रापंचिकाच्या आधाराने साधकाची, वैराग्याची, साधकाची जीवितयात्राही सुसह्य होते हेही संतांनी मान्य केले आहे गृहस्थधर्माची महती ही नजरेआड होत असली तरी तिची ओळख संतांना नव्हती असे नाही ईश्वरास, पापपुण्यास धर्मविचारास न जुमानता माणसे पशुवत् कशी वागतात हेही त्यांनी पाहिलेले होते 'पापाचे चालते कीर्तिस्तंभ' समाजात कसे वावरत असतात व किती विविध प्रकारांनी हे पापी व दुराचारी लोक समाज पोखरून टाकतात हे संतांनी उघडच्या डोळ्यांनी पाहिले होते 'ईश्वराचें नामही न साहे' अशी ज्यांची वृत्ती होते त्यास धनार्जनाचा विवेक कधीच उरत नाही, आणि धन मदातून इतर अनेक अपप्रवृत्ती जोपासल्या जातात 'जैसे चरणें लोळियेलें। का धावणे वारियाचें' तसे धनमत्त लोक विविध विषयाकडे प्रवृत्त होतात, म्हणून उत्तम व्यवहार करून धन जोडावे व उदास विचाराने ते खर्च करावे असे सांगणे अगत्याचे असते 'परउपकारी नेणें परनिंदा। परस्त्रिया सदा बहिणीमाया। भूतदया गाई पशूचें पालन। तान्हेल्या जीवन वनामाजीं' हा एक श्रेष्ठ जीवनाचा आदर्श तुकारामबुवा या अभंगात देत आहेत 'भलते साह्या आश्रम। उपजले कुळींचे धर्म। आणिक न करावे श्रम। एक पुरे नाम विठोबाचें' अशी त्यांची व्यवहार्य शिकवण आहे केवळ अर्थकामावर भर दिल्यास मात्र 'तया मग अपायो थोर आहे' असा त्यांचा इशारा आहे

अलोट पैसा अलोट सत्ता, अलोट संपत्ती, अलोट सौंदर्यासक्ती यांनी माणसास सुख लाभलेले आहे अशी साक्ष इतिहासाची नाही, यांनी माणसाचे मन शांत झाले? त्याला सुख लाभले? त्याची तृषा तर एकसारखी वाढत असून या पायी चिंता व नाना दुःखे याच्या भोवऱ्यात तो सापडलेला आहे अधिक पैसा, अधिक भोग या आजच्या जीवनसूत्रात वाटेल त्या मार्गाने पैसा हे ओघानेच आले या प्रवृत्तीस पायबंद बसला पाहिजे उत्तम व्यवहार करून धन मिळविण्यास संतांनी प्रापंचिकांना सवलत दिलेली आहे 'हें संपत्तिजात आघवें। हवनद्रव्य मानावें' या उपदेशात मिळालेल्या द्रव्याचा फार चांगला उपयोग सुचविलेला आहे उत्तम व्यवहाराने धन मिळवावं व ते उदास वृत्तीनें खर्च करावे हाच या हवनाचा अर्थ आहे पंचमहायज्ञाची आपली कल्पना याला अनुसरूनच आहे

२८६५ हरि म्हणता गति पातके नासती । कळिकाळ कापती हरि म्हणता ॥ १ ॥
हरि म्हणता भुक्ति हरि म्हणता मुक्ति । चुके यातायाती हरि म्हणता ॥ २ ॥
तपें अनुष्ठानें न लगती साधनें । तुटती बंधनें हरि म्हणता ॥ ३ ॥
तुका म्हणे भावें जपा हरिचें नाम । मग काळयम शरण तुम्हा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – गति–चांगली गती, भुक्ति–भोग

अर्थ – या श्रीहरीचे नाम घेताच सर्व पातके नाहीशी होऊन चांगली गती मिळते श्रीहरीच्या व नामाने कळिकाळही थरथर कापू लागतो १ याच्याच नामाने नाना प्रकारचे उत्तम असे भोग मिळतात आणि सर्व प्रकारची यातायात चुकते २ श्रीहरीचे नाम घेताच सर्व प्रकारची बंधने तुटतील याच्या प्राप्तीसाठी जपतपादी अनुष्ठानादी साधने करण्याची काही जरूरी नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात भक्तिभावाने या श्रीहरीचे नाम जपावे मग तुम्हांस यम अथवा काळ शरण येईल ४

२८६६ नये वाटू मन । काहीं न देखावे भिन्न ॥ १ ॥
पाय विठोबाचे चित्तीं । असो द्यावे दिवसराती ॥ २ ॥
नये काकुळती । कोणा यावें[1] हरिभक्ति ॥ ३ ॥
तुका म्हणे साई । करील कृपेची विठाई ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – साई–सावली

अर्थ – एका विठ्ठलाखेरीज इतरत्र आपले मन वाटू देऊ नये त्याच्याखेरीज वेगळे असे काही पाहू नये १ रात्रंदिवस विठ्ठलाचे पाय आपल्या चित्तात असू द्यावेत २ हरीच्या दासांनी हरीवाचून दुसऱ्या कोणासच काकुळती येऊ नये ३ तुकाराम महाराज म्हणतात ही विठ्ठलमाऊली आपल्यावर कृपेची सावली धामुळे करील ४

२८६७ सकळ देवांचें दैवत । उभें असे रंगा आंत ॥ १ ॥
रंग लुटा माझे बाप । शुद्ध भाव[2] खरें माप ॥ २ ॥
रंग लुटिला बहुतीं । शुक नारदादि संतीं ॥ ३ ॥
तुका लुटितां हे रंग । साह्य जाला पांडुरंग ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – रंगा आंत–कीर्तनाच्या रंगात

अर्थ – सर्व देवतांचे दैवत हे असून कीर्तनाच्या रंगात उभे राहाते १ माझ्या बापहो, या कीर्तनाचा रंग तुम्ही शुद्ध भावाचे खरे माप करून लुटावे २ पूर्वी शुकनारदादी मुनींनी याचा रंग भरपूर लुटला आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, मीही हाच भक्तीचा रंग लुटला म्हणून पांडुरंग मला साहाय्यभूत झाला आहे ४

२८६८ उशीर कां केला । कृपाळुवा जी विठ्ठला ॥ १ ॥
मज दिलें कोणा हातीं । काय मानिली[3] निश्चिंती ॥ २ ॥
कोठवरी धरूं धीर । आतां मन करूं स्थिर ॥ ३ ॥
तुका म्हणे जीव । ऐसी भाकितसे कींव ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – कृपाळुवा–कृपाळु

अर्थ – अहो श्री कृपाळू विठ्ठला मला भेट देण्याविषयी तुम्ही उशीर का हो केला ? १ मला तुम्ही स्वाधीन तरी कुणाच्या हाती केले ? तुम्ही मजविषयी निश्चिंती का मानली ? २ मी आता तुमच्याविना कुठवर धीर धरू ? माझे मन मी स्थिर तरी कसे करू ? ३ तुकाराम महाराज म्हणतात माझा जीव अशा प्रकारची करुणा एकसारखी भाकत आहे ४

---

१ यऊ २ भाव ३ मांडिली

२८६९ तुका वेडा अविचार । करी वडवड फार ॥ १ ॥
नित्य वाचे हाचि छंद । राम कृष्ण हरि गोविंद ॥ २ ॥
घरीं पांडुरंगीं भाव । आणीक नेणे दुजा देव ॥ ३ ॥
गुरुज्ञान सर्वां ठायीं । दुजें न विचारी कांहीं ॥ ४ ॥
बोल नाईके कोणाचे । कथे नागवाचि नाचे ॥ ५ ॥
संगउपचारें कांटाळे । सुखें भलते ठायीं लोळे ॥ ६ ॥
कांहीं उपदेशिलें नेणे । वाचे विठ्ठल विठ्ठल म्हणे ॥ ७ ॥
केला बहुतीं फजित । तरी[1] हेंचि करी नित्य ॥ ८ ॥
अहो पंडितजन । तुका टाकावा थुंकोन ॥ ९ ॥

शब्दार्थ व टीपा :— कांटाळे—कंटाळे

अर्थ — *हा तुकाराम वेडा आणि अविचारी आहे हा फार बडबड करतो* १ रामकृष्ण, हरिगोविंद हाच एक छंद सतत त्याच्या वाणीत आहे. २ याची भक्ती फक्त एका पांडुरंगावर आहे दुसरे काही हा जाणतच नाही.३ सर्वांभूती भगवंत पाहाण्याचे गुरुज्ञानच हा मानतो दुसरा विचारच हा कधी करीत नाही ४ हा कुणाचेही इतर शब्द कधी ऐकत नाही व हरिकथेत हा नागवाच नाचतो ५ याला कोणत्याही उपचारांचा कटाळा असून कुठल्याही ठिकाणी हा मोठ्या सुखाने लोळत असतो ६ दुसऱ्याने काही उपदेश केला तर हा काहीच जाणीत नाही. वाणीने मात्र एकसारखे विठ्ठल विठ्ठल म्हणत असतो ७ पुष्कळांनी याची फजिती अनेकदा केली, तरी त्याचा वर सांगितलेला व्यवहारच नित्य असतो ८ तुकाराम महाराज म्हणतात, अहो पंडितजन, असा हा वेडावाकडा तुकाराम तुम्ही थुंकून टाका, त्याचा नाद सोडून द्या ९

२८७० आलीं सिंहस्थपर्वणी । न्हाव्या भटा जाली धणी ॥ १ ॥
अंतरीं पापाच्या कोडी । वरिवरि बोडी डोई दाढी ॥ २ ॥
बोडिलें तें निघालें । काय पालटलें सांग वहिलें ॥ ३ ॥
पाप गेल्याची काय खुण । नाहीं पालटले अवगुण ॥ ४ ॥
भक्तिभावें विण । तुका म्हणे अवघा सीण ॥ ५ ॥

— शब्दार्थ व टीपा :— धणी—तृप्ती, कोडी—कोट्यावधी, वहिलें—सत्वर

अर्थ — सिंहस्थाची पर्वणी आली की गोदावरीकाठच्या क्षेत्रस्थ न्हाव्याची व भटाभिक्षुकाची तृप्ती होते १ अंतरंगात पापाच्या कोट्यावधी राशी असूनही लोक वरवर डोके मुंडण करतात, दाढी काढून टाकतात २ अशा प्रकारचे वरवरचे बोडून काढून काय होणार ? त्यामुळे अंतरंगातील पालट काय होतो ते सत्वर सांग ३ तुझे अवगुण जर पालटले नाहीत तर पाप गेल्याची तरी खूण काय ? ४ तुकाराम महाराज म्हणतात, एका भक्तिभावा-शिवाय उरलेला सर्व शीण मात्र आहे ५

२८७१ तुज घालोनियां पूजितो संपुष्टीं । परि तुझ्या पोटीं चवदा भुवनें ॥ १ ॥
तुज नाचऊनि दाखवूं कौतुका । परी रूपरेखा नाहीं तुज ॥ २ ॥
तुजलागीं आम्ही गात असो गीत । परी तूं अतीत शब्दांहूनि ॥ ३ ॥
तुजलागीं आम्हीं घातियेल्या माळा । परि तूं वेगळा कर्तृत्वासी ॥ ४ ॥
तुका म्हणे आतां होऊनि परमित । माझें काहीं हित विचारावें ॥ ५ ॥

[1] परी.

शब्दार्थ व टीपा :– संपुष्टीं–लहानसा धातु पात्रात, अतीत–पलीकडे, परमित–सीमित, मर्यादित, विचारावें–विचार करावा.

अर्थ:– देवा, मी तुला संपुष्टात घालून तुझी पूजा करू पाहतो. पण तुझें स्वरूप किती मोठें आहे ! त्यात चौदा भुवनें व्यापलेली असतात. १ आम्ही तुझ्यापुढे मोठ्या कौतुकानें नाचून दाखवितो; परंतु तुला म्हणजे कसलीच रूपरेषा नाही. २ तुझ्यासाठी आम्ही भक्तीने गीत गातो, पण तू तर शब्दाच्याही पलीकडचा आहेस. ३ देवा, तुझ्या गळ्यात आम्ही फुलांच्या माळा घातल्या परंतु तू सर्व कर्तृत्वापासून वेगळा व अकर्ता असा आहेस. ४ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तू आता माझ्यासाठी मर्यादित हो व माझ्या हिताचा काही विचार कर. ५

२८७२ पापाची मी राशी । सेवाचोर पायांपाशीं ॥ १ ॥
करा दंड नारायणा । माझ्या मनाची खंडणा ॥ २ ॥
जना हातीं सेवा । घेतों लंडपणें देवा ॥ ३ ॥
तुझा ना संसार । तुका दोहींकडे चोर ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– लंडपणें–दांभिकपणानें.

अर्थ :– देवा, मी पापांची राशी असून सेवेच्या वेळी विमुख होणारा हा चोर आता तुझ्या पायांशी आलेला आहे. १ नारायणा, माझ्या मनाचे खंडण करून मला तुम्ही शिक्षा करावी २ देवा, मी आजवर दांभिकपणानें लोकांच्याकडून सेवा घेतली ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, मला धड संसार नाही, धड मी तुझाही नाही. मी याप्रमाणे दोन्हींकडून आचवलो गेलो आहे ४

२८७३ दुडीवरी दुडी । चाले मोकळी गुजरी ।। १ ॥
ध्यान लागो ऐसें हरी । तुझे चरणीं तैशापरी ॥ २ ॥
आवंतण्याची आस । जैसी लागे दुर्बळास ॥ ३ ॥
लोभ्या कळांतराची[1] आस । बोटें मोजी दिवस मास ॥ ४ ॥
तुका म्हणे पंढरीनाथा । मजला आणिक नको व्यथा ।। ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– गुजरी–गुजराथी स्त्री, आवंतण्याची–आमंत्रणाची, आस–इच्छा, आशा, कळांतराची–व्याजाची.

अर्थ :– गुजराथी स्त्री डोक्यावर रचलेली एकावर एक अशी भांड्यांची उतरंड घेऊन त्यास हात न लावता मोकळेपणाने चालते. पण तिचे लक्ष मात्र सतत तिकडेच असते. १ श्रीहरी, त्याप्रमाणे माझें चित्त तुझ्या चरणाशी दृढ व्हावे २ एखाद्या भुकेलेल्या दुबळ्या भिक्षुकास आमंत्रणाची इच्छा असते, तशीच अवस्था माझी झाली आहे ३ लोभी माणसास नेहमी व्याजाची हाव असते रात्रंदिवस तो बोटे घालून दिवस व महिने मोजीत असतो ४ तुकाराम महाराज म्हणतात, पंढरीनाथा, असाच ध्यास मला तुझा असावा. आणखी इतर दुसरी कुठलीच व्यथा माझ्या चित्तास नको ५

२८७४ लागोनियां पायां विनवितों तुम्हांला । करें टाळी बोला मुखें नाम ॥ १ ॥
विठ्ठल विठ्ठल म्हणा वेळोवेळां । हा सुखसोहळा स्वर्गी नाहीं ॥ २ ॥
कृष्ण विष्णु हरि गोविंद गोपाळ । मार्ग हा प्रांजळ वैकुंठीचा ॥ ३ ॥
सकळांसीं येथें आहे अधिकार । कलयुगीं उद्धार हरिनामें ॥ ४ ॥
तुका म्हणे नामापाशीं चारी मुक्ति । ऐसें बहुग्रंथीं बोलियेलें ॥ ५ ॥

१ कळांतराची २ बहुता ग्रंथीं.

शब्दार्थ व टीपा :– करें–हातानी, प्रांजळ–सोपा.

अर्थ :– लोकहो, मी तुमच्या पायां पडून तुम्हांस विनती करीत आहे तुम्ही हातांनी टाळी वाजवा आणि मुखाने श्रीहरीचे नाम बोला १ विठ्ठल विठ्ठल असा नामगजर तुम्ही वारवार करा. हा नामाचा सुखसोहळा प्रत्यक्ष स्वर्गात सुद्धा नाही. २ कृष्ण, विष्णु, हरि, गोविंद या नामांचे चिंतन करणे हाच एक वैकुंठास जाण्याचा मार्ग आहे ३ या मार्गाने जाण्याचा अधिकार सर्वांनाच आहे. श्रीहरीच्या नामाने कलियुगात सर्वांचाच उद्धार होत असतो. ४ तुकाराम महाराज म्हणतात, श्रीहरीच्या नामानेच चारी मुक्तींची प्राप्ती होते, असे पुष्कळ जुन्या ग्रंथांतून प्रतिपादन केले आहे. ५

२८७५ लटिकें हासें लटिकें रडें । लटिकें उडे लटिक्यापें ॥ १ ॥
लटिकें माझें लटिकें तुझें । लटिकें ओझें लटिक्याचें ॥ २ ॥
लटिकें गायें लटिकें ध्यायें । लटिकें जायें लटिक्यापें ॥ ३ ॥
लटिका भोगी लटिका त्यागी । लटिका जोगी जग माया ॥ ४ ॥
लटिका तुका लटिक्या भावें । लटिकें बोलें लटिक्यासवें ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– लटिक्यापें–लटक्यापाशी, खोट्याजवळ.

अर्थ :– या व्यवहारी जगात लोक लटकेच म्हणजे खोटेच हसतात, खोटेच रडतात व खोट्यापाशीच खोटे उड्या घेते. १ लोक खोटेच माझे माझे, तुझे तुझे म्हणतात व वृथा खोट्याचेच ओझे शिरावर घेतात. २ लोक खोटेच गातात, खोटेच ध्यान करतात खोटेच खोट्यापाशी जातात ३ या जगात भोगी लटकाच असून त्यागीही लटकाच आहे. योग धारण करणारा योगी लटका आणि सर्व जग हेही लटकेच आहे. ४ तुकाराम महाराज म्हणतात, या मायिक जगतात मीही खोटाच असून खोट्या भावनेने खोट्यापाशी खोटेच बोलत आहे. ५

२८७६ जालों[1] म्हणती त्याचें मज वाटे आश्चर्य । ऐका नव्हे धीर वचन माझें ॥ १ ॥
शिजलिया अन्ना ग्वाही दांत हात । जिव्हेसी चाखत न कळे कैसें ॥ २ ॥
तापलिया तेली[2] बावन चंदन । बुंद एक क्षण शीतळ करी ॥ ३ ॥
पारखी तो जाणे अंतरींचा भेद । मूढजना छंद लावण्यांचा ॥ ४ ॥
तुका म्हणे कसीं निवडे आपण । शुद्ध मंद हीन जैसें तैसें ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– बावन–एक प्रकारचा उत्तम चंदन, बुंद–थेंब, कसीं–कसोटीस.

अर्थ :– आम्ही आता परिपूर्ण झालो असे जे कुणी म्हणतात, त्यांचे मला भारी आश्चर्य वाटते. त्यांच्या संबंधी नीट ऐका. मला सांगण्यासाठी धीर धरवत नाही १ शिजलेले अन्न दातास व हातास जर कळते तर मग जिभेला चाखल्यावर कळणार नाही, हे कसे ? २ तापलेल्या तेलात अस्सल व उत्तम अशा चंदनाचा उगाळून एक थेंब जरी टाकला तरी ते एका क्षणात थंड होते, ३ जो वस्तूचा परीक्षक आहे तोच अंतरंगातील धर्मास व भेदास जाणतो आणि मूढ लोकाना मात्र वरवरच्या सौंदर्याचेच वेड असते. ४ तुकाराम महाराज म्हणतात, सोने एकदा कसोटीला लावले की मग त्याचे शुद्धत्व, मंदत्व व हीनत्व निवडून निघते. ५

२८७७ हेचि थोर भक्ति आवडती देवा । संकल्पावी माया संसाराची ॥ १ ॥
ठेविलें अनंतें तैसेचि राहावें । चित्तीं असो द्यावें समाधान ॥ २ ॥
वाहिल्या उद्वेग दुःखचि केवळ । भोगणें तें फळ संचिताचे ॥ ३ ॥
तुका म्हणे घालूं तयावरी भार । वाहूं हा संसार देवा पायीं ॥ ४ ॥

[1] जाला, [2] तेले.

शब्दार्थ व टीपा :– संकल्पाची–अर्पण करावी.

अर्थ :– संसाराची सर्व माया देवाला अर्पण करावी. हीच एक थोर भक्ती देवास आवडत असते. १ प्रारब्धकर्माने जशी परिस्थिती अनंताने ठेविली असेल तसेच सुखाने राहावे. चित्तात त्याचे समाधान असावे. २ प्राप्त स्थितीसंबंधी सारखी चिंताच करीत राहिल्यास केवळ दु:खच प्राप्त होईल. प्रारब्धाचे फळ आपणांस भोगावेच लागणार. ३ तुकाराम महाराज म्हणतात, आपला हा संसार देवाच्या पायांवर वाहून सर्व भार त्याच्यावर ठेव. ४

२८७८ जन्मा येणें घडे पातकाचे मूळें । संचिताचें फळ आपुलिया ॥ १ ॥
मग वांयांविण दु:ख वाहों नयें । रुसोनियां काय देवावरी ॥ २ ॥
ठाउकाचि आहे संसार दु:खाचा । चित्तीं सीण याचा वाहों नये ॥ ३ ॥
तुका म्हणे नाम त्याचें आठवावें । तेणें विसरावें जन्मदु:ख ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– वायांविण–उगाच, व्यर्थ.

अर्थ :– पूर्वजन्मी काही पातक घडल्यामुळेच पुन: जन्मास यावे लागते. जन्मास येणे हे. आपल्या पूर्वसंचिताचेच फळ आहे. १ मग यासंबंधी व्यर्थ दु:ख मानू नये. याबाबतीत देवावर रुसून काय उपयोग? २ हा सर्व संसार दु:खमय आहे, हे आपणांस माहीत आहेच. मग त्याचा त्रास आपल्याच चित्तात वागवू नये. ३ तुकाराम महाराज म्हणतात, त्या देवाचे नाव आठवावे आणि त्यायोगे आपल्या जन्ममरणाचे दु:ख विसरून जावे. ४

२८७९ आतां माझे नका वाणूं गुण दोष । करितों उपदेश याचा कांहीं ॥ १ ॥
मानदंभासाठीं छळीतसें कोणा । आण या चरणां विठोबाची ॥ २ ॥
तुका म्हणे हें तों ठावें पांडुरंगा । काय कळे जगा अंतरींचें ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा :– वाणूं–वर्णन करू, आण–शपथ.

अर्थ.–आता माझे गुणदोष कुणी वर्णन करू नका. या संबंधीचा मी काही उपदेश करतो तो ऐका. १ मान मिळावा वा दंभाने मी कुणास छळत नाही. यासंबंधी विठोबाच्या पायांची शपथ मी घेतो. २ तुकाराम महाराज म्हणतात, माझी ही स्थिती त्या पांडुरंगास माहीत आहे. माझ्या मनातील भाव जगाला काय समजणार आहे? ३

२८८० काय माझें नेती वाईट म्हणोन । करूं समाधान कशासाटीं ॥ १ ॥
काय मज लोक नेती परलोका । जातां कोणा एका निवारेल ॥ २ ॥
न म्हणें कोणासी उत्तम वाईट । सुखें माझी कूट खावो मागें ॥ ३ ॥
सर्व माझा भार असे पांडुरंगा । काय माझें जगासवें काज ॥ ४ ॥
तुका म्हणे माझें सर्वही साधन । नामसंकीर्तन विठोबाचे ॥ ५ ॥

# द्वितीय खंडातील अभंगसूची

## न

# विवरणसूची

आकडे पृष्ठाचे आहेत

आकडे पृष्ठाचे आहेत